महामुनि आदिकवि श्रीवाल्मीकिप्रणीत

# श्रीरामायण महाकाव्य

[ प्रथम भाग ]

## बाल-काण्ड

( मराठी अनुवाद व उपसंहार सहित )

Shripad Damodar Satavalekar

संपादक
श्रीपाद दामोदर सातवळेकर,
अध्यक्ष, स्वाध्याय-मण्डल, औंध.

विष्णु दामोदरशास्त्री पण्डित ( तोफखाने ),
वाल्मीकिवाक्प्रदीप, आर्मी ऑर्डिनेन्स-रिटायर्ड, ग्वाल्हेर.



प्रथम आवृत्ति.

शके १८६३, सन १९४१

मूल्य ४) रु०

# श्रीवाल्मीकि रामायणाचें प्रकाशन.

श्री '**वाल्मीकि रामायणा**' चें प्रकाशन मराठी अनुवादासह छापून प्रकाशित करण्याचें कार्य '**स्वाध्याय-मण्डला**' ने सध्या चालवलेलें आहे. त्याचा हा पहिला भाग वाचकांच्या समोर ठेवला जात आहे. यांत संपूर्ण '**बाल-काण्ड**' अनुवाद व उपसंहारासह आलें आहे.

श्री '**वाल्मीकि रामायण**' हा स्फूर्तिदायक राष्ट्रीय महाकाव्याचा ऋषि-प्रणीत अद्भुत ग्रन्थ आहे. प्राचीन काळच्या तपस्वी ऋषींच्या राष्ट्रीय आकांक्षा काय होत्या, तें या ग्रंथाच्या अभ्यासाने कळून येणार आहे. यांत रामकालीन इतिहास आहे खरा; पण तो काव्यमय स्वरूपांत आहे. इतिहास व काव्यमय इतिहास यांतील भेद लक्ष्यांत घेऊन या ग्रंथाचें मननपूर्वक वाचन झालें, म्हणजेच कवीचें हृद्गत वाचकांच्या मनांत उतरूं शकेल. या दृष्टीने याचें सर्वत्र वाचन व्हावें, अशी विनंती वाचकांना येथे केली, तर ती अस्थानीं होणार नाही, अशी आशा आहे.

या बाल-काण्डांतील विशेष रीतीने उल्लेखनीय कथांचा व विधानांचा आवश्यक तेवढा ऊहापोह या ग्रंथाच्या शेवटीं उपसंहारामध्ये केला आहे. याशिवाय पुष्कळच अशीं विधानें व अशा कथा या ग्रंथामध्ये आहेत की, ज्यांचा विचार अनेक दृष्टींनी करणें आवश्यक आहे. या सर्वांचा सर्वांगीण विचार करणें, हें फारच मोठें कार्य आहे, तें स्वतंत्रपणें सवडीप्रमाणे केलें जाईल.

या रामायणाचे लेखक आदिकवि श्री वाल्मीकिऋषि, या ग्रन्थाच्या वाचनाने, श्रवणाने व मननाने राष्ट्रावर कोणता इष्ट परिणाम व्हावा अशी अपेक्षा करीत होते, तें त्यांच्याच शब्दांत येथे दाखवणें इष्ट आहे. ते बालकाण्डांत पहिल्याच सर्गात असें लिहितात—

## रामायण-पठणाचें फल.

**इदं पवित्रं पापघ्नं पुण्यं वेदैश्च संमितम् ।**
**यः पठेद्रामचरितं सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ९८ ॥**

*

पठन् द्विजो वागृषभत्वमीयात् ।
स्यात् क्षत्रियो भूमिपतित्वमीयात् ॥
वणिग्जनः पण्यफलत्वमीयात ।
जनश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात् ॥ १०० ॥ ( वा. रा. बा. स. १ )

पुनः युद्धकाण्डाच्या शेवटीं तेच ऋषि असें लिहितात—

धर्म्यं यशस्यमायुष्यं राज्ञां च विजयावहम् ।
आदिकाव्यमिदं चार्षं पुरा वाल्मीकिना कृतम् ॥ १०५ ॥
यः शृणोति सदा लोके नरः पापात् प्रमुच्यते ।
पुत्रकामश्च पुत्रान् वै धनकामो धनानि च ॥ १०६ ॥
लभते मनुजो लोके श्रुत्वा रामाभिषेचनम् ।
महीं विजयते राजा रिपूंश्चाप्यधितिष्ठति ॥ १०७ ॥
राघवेण यथा माता सुमित्रा लक्ष्मणेन च ।
भरतेन च कैकेयी जीवपुत्रास्तथा स्त्रियः ॥ १०८ ॥
श्रुत्वा रामायणमिदं दीर्घमायुश्च विन्दति ।
रामस्य विजयं चेमं सर्वमक्लिष्टकर्मणः ॥ १०९ ॥
शृणोति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ।
श्रद्दधानो जितक्रोधो दुर्गाण्यतितरत्यसौ ॥ ११० ॥
महीं विजयते राजा प्रवासी स्वस्तिमान्भवेत् ।
स्त्रियो रजस्वलाः श्रुत्वा पुत्रान् सूयुरनुत्तमान् ॥ ११३ ॥
भक्त्या रामस्य ये चेमां संहितामृषिणा कृताम् ।
ये लिखन्तीह च नरास्तेषां वासस्त्रिविष्टपे ॥ १२० ॥

कुटुम्बवृद्धिं धनधान्यवृद्धिं स्त्रियश्च मुख्याः सुखमुत्तमं च ।
श्रुत्वा शुभं काव्यमिदं महार्थं प्राप्नोति सर्वां भुवि चार्थ-
सिद्धिम् ॥ १२१ ॥
आयुष्यमारोग्यकरं यशस्यं सौभ्रातृकं बुद्धिकरं शुभं च ।
श्रोतव्यमेतन्नियमेन सद्भिराख्यानमोजस्करमृद्धिकामैः ॥१२२॥
(वा. रा. युद्ध. १२८)

शेवटीं उत्तरकाण्डाच्या शेवटींहि असें लिहिलेलें आढळतें—

**इदमाख्यानमायुष्यं सौभाग्यं पापनाशनम् ।**
**रामायणं वेदसमं श्राद्धेषु श्रावयेद् बुधः ॥ ४ ॥**
**अपुत्रो लभते पुत्रं अधनो लभते धनम् ।**
**सर्वपापैः प्रमुच्येत पादमप्यस्य यः पठेत् ॥ ५ ॥**

( वा. रा. उ. १११)

आदिकवि श्रीवाल्मीकि ऋषींची अपेक्षा काय होती, तसेंच आपल्या या महाकाव्य ग्रन्थाच्या योगानें आपल्या आर्यराष्ट्रांत काय काय इष्ट परिणाम घडून यावे असें ते इच्छीत होते, तें या श्लोकांवरून स्पष्ट समजणें शक्य आहे. वरील श्लोकांवरून त्यांची अपेक्षा दिसते, ती ही आहे—

## वेदासारखें काव्य.

( १ ) हें रामायण वेदांसारखें पूज्य व धर्माचा उपदेश देणारें आहे. '**वेदैः संमितं**' ( बा. १।९८ ) '**रामायणं वेदसमं**' ( उ. १११।४ ) वेदांप्रमाणे या रामायणाची योग्यता आहे; म्हणून हें '**धर्म्यं**' ( यु. १२८।१०५ ) धर्माचा खरा मार्ग दाखवणारें आहे आणि '**शुभं**' ( यु. १२८।१२१ ) सर्वांचें कल्याण करणारें आहे. '**महार्थं**' ( यु. १२८।१२१ ) यांत फार मोठा गंभीर आशय असल्यामुळे हें मोठ्या पुरुषार्थाचें साधन करणारें आहे.

## शुभ प्रवृत्ति.

( २ ) '**पवित्रं पुण्यं**' ( बा. १।९८ ) हें रामायण पवित्र आहे व पुण्यकारक आहे. याच्या वाचनानें व श्रवणानें अन्तःकरण पवित्र होतें व उत्तम कर्मे करावीं, अशी प्रेरणा होते. तसेंच हें—

'**पापघ्नं**' '**यः पठेद्रामचरितं सर्वपापैः प्रमुच्यते**' (बा.१।९८)
**यः शृणोति सदा लोके नरः पापात्प्रमुच्यते** ( यु. १२८।१०६)
**पापनाशनं** । ( उ. १११।४ )

हें पापी विचारांना दूर करणारें आहे. रामचरित्र जो वाचतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. जो रामायण ऐकतो, त्याचीं सर्व पापें नाश पावतात. अर्थात् हें रामायण वाचलें असतां मनुष्याची पापप्रवृत्ति दूर होते व त्याच्याकडून पुढें

पापें होत नाहीत. आत्मशुद्धीसाठी रामायणाचें पठण सर्वांनी अवश्य करावें.

## आरोग्यकर.

( ३ ) **आरोग्यकरं** ( यु. १२८।१२२ ) हें रामायण निरोगीपणा देणारें आहे. पापप्रवृत्ति दूर झाली, शुभ प्रवृत्ति वाढली, म्हणजे आरोग्य वाढतें. रामायणपठणाने अशा रीतीने आरोग्य वाढतें.

**श्रुत्वा रामायणमिदं दीर्घमायुश्च विन्दति ।**
**रामस्य विजयं चेमं सर्वमक्लिष्टकर्मणः ॥**

( यु. १२८।१०९ )

**आयुष्यं ।** ( यु० १२८।१०५;१२२ )

आरोग्य प्राप्त झालें, म्हणजे दीर्घायुष्य प्राप्त होणेंहि स्वाभाविक आहे. उत्तम श्रेष्ठ कर्में करणाऱ्या रामचन्द्राचें चारित्र वाचल्याने किंवा ऐकल्याने दीर्घ आयुष्य मिळतें.

## शक्ति आणि बुद्धि वाढवते.

(४) '**बुद्धिकरं**' ( यु. १२८।१२२ ) बुद्धिचातुर्य वाढवणारें, व '**ओजस्करं**' ( यु. १२८।१२२ ) ओजस्विता वाढवणारें, सामर्थ्य किंवा किंवा शक्ति वाढवणारें हें रामायण आहे. म्हणूनच तें '**यशस्यं**' ( यु० १२८। १०५;१२२ ) यश वाढवणारें आहे आणि '**सुखमुत्तमं**' ( यु० १२८।१२१ ) उत्तम सुख देणारेंही आहे. याचप्रमाणे—

'**प्राप्नोति सर्वां भुवि चार्थसिद्धिम्**' ( यु० १२८।१२१ )
'**सौभाग्यं**' ( उ० १११ । ४ )

'पृथ्वीवर जें भाग्य मिळण्यासारखें आहे व जी सिद्धि प्राप्त होण्यासारखी आहे, तें सर्व या रामायणाच्या पठनाने प्राप्त होतें.' म्हणूनच '**ऋद्धिकामैः श्रोतव्यं** । ( यु० १२८।१२२ ) समृद्धीची इच्छा करणारांनी हें वाचावें अथवा ऐकावें.

## कौटुंबिक सुख देतें.

( ५ ) **सौभ्रातृकं** ( यु. १२८।१२२ ); '**कुटुंबवृद्धि**' ( यु० १२८।

१२१ ) याच्या योगाने भावांभावांमध्ये ‘ प्रेम वाढतें, कुटुंब मोठें होऊन, त्यांत प्रेमभाव वाढतो.’ ‘ **स्त्रियश्च मुख्याः** । ( यु० १२८।१२१ ) उत्तम सुशील स्त्रिया प्राप्त होतात.’ कुटुंबांतील स्त्रियांनी हें रामायण ऐकलें असतां त्या उत्तम, श्रेष्ठ व सुशील होतात. तसेंच–

**अपुत्रो लभते पुत्रं** ( उ. १११।५ )
**पुत्रकामश्च पुत्रान् वै ( लभते )** । ( यु. १२८।१०६ )

ज्याला पुत्र पाहिजे असतील, त्याला उत्तम सुपुत्र होतात.

## स्त्रियांना लाभ.

( ६ ) स्त्रियांनाही या रामायण श्रवणाने फार लाभ होतात, ते असे—

**स्त्रियो रजस्वलाः श्रुत्वा पुत्रान् सूयुरनुत्तमान्** । (यु.१२८।११३)

रजस्वला स्त्रियांनी हें रामायण जर ऐकलें तर त्यांस उत्तम संतति व शूर पुत्र होतील.

**राघवेण यथा माता सुमित्रा लक्ष्मणेन च ।**
**भरतेन च कैकेयी जीवपुत्रास्तथा स्त्रियः ॥** (यु. १२८।१०८)

रामानें जशी कौसल्या, लक्ष्मणाने जशी सुमित्रा, भरताने जशी कैकेयी शोभली, त्याप्रमाणेच सर्व स्त्रिया दीर्घायु व शूर अशा पुत्रांनी युक्त होतील व ते मातांचें यश वाढवतील.

## सर्वांना लाभ.

( ७ ) जे लोक रामायण ऐकतील, त्या सर्वांचीं सर्व संकटें दूर होतील—

**( यः शृणोति ) श्रद्दधानो जितक्रोधो दुर्गाण्यतितरत्यसौ ॥**
( यु. १२८।११० )

श्रद्धा ठेवून व क्रोध जिंकून जो रामायण वाचील किंवा ऐकेल, त्याचीं सर्व संकटें दूर होतील. तसेंच **‘प्रवासी स्वस्तिमान् भवेत्** ।’ ( यु. १२८।११३ ) प्रवासांत असलेला मनुष्य जर हें वाचील, तर त्याचें कल्याण होईल.

## ब्राह्मणाचें हित.

( ८ ) ब्राह्मणानें रामायण वाचलें, तर तो सर्वांत उत्तम प्रभावशाली श्रेष्ठ

वक्ता होईल—

**द्विजः पठन् वागृषभत्वमीयात्** । ( बा. १।१०० )

## क्षत्रियाचें हित.

( ९ ) क्षत्रियाने वाचलें अथवा ऐकलें तर तो विजयी होईल—

**स्यात् क्षत्रियो भूमिपतित्वमीयात्** । ( बा. १।१०० )
**महीं विजयते राजा शत्रूंश्चाप्यधितिष्ठति** ॥ ( यु.१२८।१०७)
**राज्ञां विजयावहम्** । यु. १२८।१०५

क्षत्रियाने रामायण अभ्यासिलें, वाचलें किंवा ऐकलें तर तो उत्तम राजा होईल, त्यास लढाईंत जय मिळेल, तो सर्व शत्रूंचा निःपात करील व विजयशाली बनेल.

## वैश्याचें हित.

(१०) वैश्याने रामायण वाचलें तर तो धनधान्यसंपन्न होईल—

**वणिग्जनः पण्यफलत्वमीयात्** । ( बा. १।१०० )
**धनकामो लभते धनानि** । ( यु. १२८।१०६ )
**अधनो लभते धनम्** । ( उ. १११।५ )
**धनधान्यवृद्धिम्** ( यु. १२८।१२१ )

वाणिज्यव्यवहार करणारांना रामायण वाचल्याने पुष्कळ लाभ मिळेल, धनाची इच्छा असल्यास उत्तम धनें प्राप्त होतील. सर्वत्र धनधान्याची समृद्धि होईल.

## शूद्राचें हित.

(११) शूद्राने रामायण ऐकलें किंवा वाचलें, तर त्याला फार मोठें महत्त्व प्राप्त होईल—

**जनश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात्** । ( बा. १।१०० )

## प्रकाशकांचें हित.

(१२) जे लेखक रामायण लिहून त्याच्या अनेक प्रती करून प्रसार करतील, त्यांना स्वर्गाचें सुख मिळेल—

ये लिखन्तीह च नरास्तेषां वासस्त्रिविष्टपे । ( यु. १२८।१२० )

याचप्रमाणे सध्याच्या व्यवहाराप्रमाणे जर बोलावयाचें असेल, तर जे रामायण छापतील व याचा प्रसार करतील, त्या संपादक, मुद्रक, प्रकाशकांसही स्वर्गसुख मिळेल, असें आज म्हणतां येईल.

याप्रमाणे रामायणाचे लेखक आदिकवि श्रीवाल्मीकि ऋषि यांनी रामायणाच्या पठण, श्रवण व मननानें जनतेवर काय काय परिणाम घडूं शकतील, त्याचें चित्र हें असें लिहिलें आहे.

आजही आपल्या राष्ट्रांत हेंच घडावें, अशी आमची इच्छा आहे. यासाठीच हें रामायणप्रकाशनाचें कार्य चालविलें आहे.

श्रीरामकृपेनें तें यथासांग सिद्धीस जावो !

ज्येष्ठ शु० पूर्णिमा<br>शके १८६३ सोमवार<br>९ जून १९४१

**श्री० दा० सातवळेकर,**<br>अध्यक्ष- स्वाध्याय-मंडळ,<br>**औन्ध,** ( जि. सातारा. )

# श्रीवाल्मीकि रामायणाच्या

# बालकाण्डाची विषयसूची

**सर्ग १— पृष्ठ १–१७**

'या पृथ्वीवर पराक्रमी राजा कोण बरें आहे ?' असा वाल्मीकि मुनींनी नारदास प्रश्न केला ( श्लोक १–५ ). नारदमुनि या प्रश्नाचें उत्तर 'रामराजा महापराक्रमी आहे.' असें देतात व त्यांस संक्षिप्त रामचरित्र सांगतात. ( ६–९७ ). रामायण-पठणाचें फल. ( ९८–१०० )

**सर्ग २— पृष्ठ १७–२४**

नारदमुनि निघून गेल्यावर वाल्मीकिमुनि तमसानदीवर स्नानास गेले व तेथे ते स्नानाच्या तयारीस लागले ( १–६ ). तेथे एक क्रौंचपक्ष्याचें जोडपें क्रीडा करीत असलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. इतक्यांत एका निषादानें बाण मारून त्यापैकी एकास घायाळ केलें. हें पाहून ऋषीचें मन कळवळलें व एकदम **'मा निषाद०'** हे निषादा, तूं फार दिवस जगणार नाहीस, अशा आशयाचा शापमय श्लोकच त्यांच्या तोंडातून बाहेर पडला ! ( ७–१५ ). शापमय छंदोबद्ध श्लोक सहज तोंडावाटें बाहेर पडले-ला पाहून मुनींस फार आश्चर्य वाटलें व असा विचार मनांत आला कि न जाणो आपलें तपही या शापयुक्त वाणीनें कदाचित् कमी होईल ( १६–२२ ). स्नान करून मुनि आश्रमांत आले, इतक्यांत ब्रह्मदेव तेथे आले व वाल्मीकिमुनींनी झालेला सर्व वृत्तांत त्यांस सांगितला. तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले की, 'हें फारच उत्तम झालें. याच छंदामध्ये तूं सर्व रामचरित्र वर्णन कर.' ब्रह्मदेवानें असें सांगितलें व ते निघून गेले ( २३–३८ ). ब्रह्मदेवांच्या सांगण्याप्रमाणे सर्व रामायण व रावण-वधरूप महाकाव्य मुनींनी रचलें. ( ३९–४३ )

**सर्ग ३— पृष्ठ २४–२९**

रामायणाचें संक्षिप्त निरूपण ( १–४० ).

**सर्ग ४— पृष्ठ ३०–३५**

वाल्मीकींनी रामायण लिहिलें व हें रामचन्द्राच्या राजसभेमध्ये जाऊन गाण्यास

कोण बरें समर्थ आहे, असें आपल्या शिष्यास विचारलें, तेव्हा 'लव व कुश' पुढे आले व म्हणाले की, 'आम्ही या रामायणाचें गायन राजसभेमध्ये करूं.' तें ऐकून मुनींनी तें त्यांस शिकविलें (१-७). ते दोघेही तें उत्तम तालसुरामध्ये एकतारीवर गाऊं लागले ( ८-१३ ). जेव्हा या लवकुशांनी हें ऋषिमंडळीमध्ये गाइलें, तें ऐकतांच सर्व ऋषि फार संतुष्ट झाले व त्यांनी यांची फारच प्रशंसा केली ( १४-२७ ). पुढे हे लवकुश अयोध्येच्या रस्त्यांतून हें गात गात जाऊं लागले. यांची कीर्ति ऐकून श्रीरामचन्द्रांनी त्यांस आपल्याजवळ बोलावून आणलें व चरित्र गाण्यास त्यांस आदराने सांगितलें. त्याप्रमाणे त्यांनी तें रामचन्द्रासमोर गाऊन दाखवलें. तें ऐकून श्रीरामचन्द्र फारच प्रसन्न झाले ( २८-३६ ).

### सर्ग ५— पृष्ठ ३६-४१

सरयुनदीच्या तीरावर ( उत्तर ) कोसलदेश आहे. त्याची राजधानी अयोध्या होय. ही उत्तम वैभवसंपन्न नगरी असून सर्व प्रकारें समृद्ध होती ( १-९ ). अयोध्येच्या समृद्धीचें वर्णन ( १०-२३ ).

### सर्ग ६— पृष्ठ ४१-४७

अयोध्येमध्ये महापराक्रमी दशरथ राजा राज्य करीत होता ( १-४ ). त्या राजधानींत सर्व लोक आनंदी, विद्वान् व शूर असे होते. राजा दशरथाने या नगरीचें असें रक्षण केलें होतें की, त्यामुळे ती शत्रूला अगदी अभेद्य बनली होती ( ५-२८ ).

### सर्ग ७— पृष्ठ ४७-५१

दशरथाचे आमात्य आठ होते, ते स्वकर्तव्यांत तत्पर होते. त्याचे ऋत्विज दोन असून, त्यांचे सहायक अनेक ऋषि होते (१-१५). दशरथाने अमात्यांच्या सहाय्याने उत्तम रीतीने राज्य चालवलें होतें ( १५-२८ ).

### सर्ग ८— पृष्ठ ५१-५५

दशरथाला पुत्र नव्हता, म्हणून फार वाईट वाटत होतें. पुत्रासाठी व्रतें वैकल्यें करीत असतांही त्यास पुत्र झाला नाही, म्हणून अश्वमेध व पुत्रकामेष्टी करून पुत्र प्राप्त करून घ्यावा, असा विचार त्याने केला व ( १-३ ) हा विचार मनांत येतांच त्याने पुरोहितांस बोलाविलें व आपला विचार सांगितला. सर्व पुरोहितांनी

त्यास अनुमोदन दिलें, यज्ञाची जुळवाजुळव केली व सरयू नदीच्या तीरावर यज्ञभूमीची सिद्धता झाली (४–१६). राजाने पत्नींस सांगितलें की, पुत्रप्राप्तीसाठी यज्ञ करणार आहें, तेव्हा त्यांनी दीक्षा घेऊन व्रतस्थ रहावें ( १७–२५ ).

**सर्ग ९— पृ० ५५–५८**

सुमंत्र नांवाच्या मंत्र्याने सनत्कुमारांनी सांगितलेला वृत्तांत दशरथराजास सांगितला ( १–३ ). विभाण्डक नांवाचा एक ऋषि होता. त्याला ऋष्यशृंग नांवाचा एक मुलगा होता. तो बापाच्या कडक शिस्तींत वागला असल्यामुळे तो कडक ब्रह्मचारी राहिला होता ( १–७ ). अंग देशांत रोमपाद नांवाचा एक राजा राज्य करीत होता. त्याच्या हातून कांही पाप झाल्यामुळे त्याच्या राज्यांत मोठें अवर्षण पडलें ( ८–९ ). तेव्हा ब्राह्मणांना बोलावून अवर्षणाचें निरसन करण्यासाठी अनुष्ठान करा, असें तो राजा म्हणाला. तेव्हां ते राजास म्हणाले की, 'ऋष्यशृंगास आपल्या राज्यांत आण व आपली मुलगी त्यास दे. म्हणजे त्या ब्रह्मवेत्त्याच्या येथे येण्यानेच वृष्टि होईल' ( १०–१४ ). पुरोहितांस राजा म्हणाला की, तुम्ही त्यास येथे आणा; पण कोणीहि तसें करण्यास तयार होईना. तेव्हा हें काम राजानें आपल्या मंत्र्यांना सांगितलें ( १५–२१ ).

**सर्ग १०— पृ० ५८–६४**

मन्त्र्यांनी रोमपाद राजास सांगितलें की, कांही सुंदर वेश्या ऋष्यशृंगाकडे युक्तीने पाठव व त्यांस त्याला इकडे युक्तीने आणावयास सांगा. त्याप्रमाणे राजानें उत्तम वेश्या ऋष्यशृंगाकडे पाठवल्या. ऋष्यशृंगाने तर पित्याशिवाय कोणाही पुरुषास सुद्धा पाहिलें नव्हतें, तसेंच कोणत्याच स्त्रिया तर त्याने पाहिल्याच नव्हत्या ( १–९ ). एकदा ऋष्यशृंग आश्रमाबाहेर आला असतां त्या वेश्या त्याच्या दृष्टीस पडल्या. त्यांचें सुंदर रूप पाहून, तो त्यांच्या मैत्रीची इच्छा करूं लागला. पुढे त्यांनी त्यास नगरांत आणलें, ऋष्यशृंग नगरांत येतांच पाऊस पडून आनंदी-आनंद झाला. राजाने आपल्या अन्तःपुरांत नेऊन त्याच्याशीं आपल्या मुलीचा विवाह करून दिला व याप्रमाणे ऋष्यशृंग राजवाड्यांत राहूं लागला (१०–३३).

**सर्ग ११— पृ० ६४–६९**

वरील कथा ऐकल्यानंतर दशरथाने रोमपाद राजाकडे जाऊन स्वतः ऋष्य-

शृंगाला आदराने बोलावून अयोध्येस आणलें. ऋष्यशृंग आपल्या शान्तानामक भार्येसह आला व दशरथाच्या राजवाड्यांत राहूं लागला. सर्वांस यामुळे आनंद झाला ( १–३१ ).

**सर्ग १२— पृ० ६९–७२**

बरेच दिवस लोटल्यानंतर दशरथराजाने ऋष्यशृंगऋषीस सांगितलें कीं, कुलवृद्धीसाठी उत्तम मुलगे व्हावे, यासाठी पुत्रकामेष्टी यज्ञ करावयाचा आहे. तर तो याग आपण शेवटास न्यावा. ऋष्यशृंगाने अनुमोदन देतांच विद्वान् ब्राह्मणांस बोलावून आणलें. सर्वानुमतें अश्वमेध करण्याचें ठरलें ( १–२२ ).

**सर्ग १३— पृ० ७२–७८**

वसंतऋतु लागतांच यज्ञीय अश्व सोडला. अश्व सोडल्यास वर्ष पुरें झालें. दुसरा वसंत आला. तेव्हा आता यागविधीस प्रारंभ होण्याची वेळ आली (१-९). यज्ञासाठी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रांस सन्मानाने बोलावलें. ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे त्याचें त्याचें आदरातिथ्य झालें. सर्वांसाठी मोठमोठे प्रासाद निर्माण झाले ( १०-२२ ). सर्व देशांतील अनेक राजे आले व थाटाने अश्वमेधास प्रारंभ झाला ( २३-४२ ).

**सर्ग १४— पृ० ७८–८८**

यज्ञाचें अनुष्ठान उत्तम व निर्विघ्न झालें. सर्व लोक भोजनाने संतुष्ट झाले. या यज्ञामध्ये कोणतीहि न्यूनता राहिली नाही. ‘ तुला उत्तम चार पुत्र होतील, ’ असा अशीर्वाद ऋष्यशृंग ऋषीने दशरथराजास दिला, तेव्हा राजपरिवारांत आनंदी आनंद झाला ( १-६१ ).

**सर्ग १५— पृ० ८८–९४**

पुत्रकामेष्टी यज्ञास प्रारंभ झाला. तेव्हा तेथे गंधर्व, देव, ऋषि, सिद्ध वगैरेंची मोठी परिषद् भरली. रावणाचा काटा समूळ काढण्यासाठी काय करावें, याचा तेथे खल झाला व सर्वानुमतें रावणवधाची सर्व योजना ठरली ( १-३४ ).

**सर्ग १६— पृ० ९५–१००**

पुत्रकामेष्टीयज्ञ झाला. यज्ञपुरुषाने प्रसन्न होऊन, दशरथाला पायस आणून दिला. तो दशरथाने आपल्या चारही राण्यांस वाटून दिला. सर्व राजपत्न्या

गर्भवती झाल्या ( १–३२ ).

**सर्ग १७— पृ० १००–१०६**

ठरल्याप्रमाणें वानरजातीमध्येंही वीर उत्पन्न झाले व त्यांना पर्वतावरील व इतर सर्व प्रकारचीं युद्धें कशीं करावीं, तें शिक्षण देऊन युद्धाविषयीं तयार करण्यांत आलें. ( १–३८ )

**सर्ग १८— पृ० १०७–११५**

यज्ञ संपल्यावर सर्व राजे आपआपल्या देशीं गेले. दशरथराजा आपल्या राजधानींत आला. योग्य वेळीं दशरथाच्या राण्या प्रसूत होऊन, त्यांस चार पुत्र झाले. त्यांस राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न अशीं नांवें ठेवलीं ( १–३३ ). त्यांचें सर्व अध्ययन १५ व्या वर्षीं झालें. तेव्हां राजा त्यांच्या विवाहाचा विचार करूं लागला ( ३४–३७ ). इतक्यांत विश्वामित्र ऋषि दशरथराजाजवळ आले. दोघांचेही कुशल प्रश्न झाले. ( ३८–५९ )

**सर्ग १९— पृ० ११६–११९**

विश्वामित्रानें ' रामलक्ष्मणांस आपल्या यज्ञाच्या रक्षणासाठीं दे, ' अशी मागणी दशरथाजवळ केली. दशरथाला ही ऐकतांच मूर्च्छा आली. ( १–२२ )

**सर्ग २०— पृ० ११९–१२३**

दशरथानें आपल्याकडून घेतां येतील, तेवढे आढेवेढे घेतले व रामाला देत नाहीं, असें सांगितलें.

**सर्ग २१— पृ० १२३–१२७**

तेव्हां विश्वामित्र रागावले व ' प्रतिज्ञाभंग करून सुखी रहा, ' अशी गर्जना करून परत फिरूं लागले. तेव्हां वसिष्ठ ऋषींनी दशरथाला पुष्कळ बोध केला व ' रामलक्ष्मणांस यांच्याबरोबर पाठवण्यांत राजपुत्रांचें हित आहे, ' असें सांगून त्याचें मन त्यांनी वळविलें ( १–२२ ).

**सर्ग २२— पृ० १२७–१३१**

वसिष्ठांचें भाषण ऐकून दशरथाचें मन वळलें व त्यानें रामलक्ष्मणाला विश्वामित्राच्या स्वाधीन केलें ( १–५ ). विश्वामित्राच्या मागोमाग दोघेही राजपुत्र जाऊं लागले. थोड्या वेळानें सरयू नदीवर पोंचतांच विश्वामित्रानें त्या राज-

कुमारांस ' बला व अतिबला ' या विद्या दिल्या. या विद्यांमुळे कधीहि थकवा येणार नाही, व सर्वत्र विजय मिळेल, असें त्यांस सांगितलें. या विद्यांनी राजकुमार फारच शोभूं लागले व त्यांनी ती रात्र तेथेच काढली ( ६–२४ ).

**सर्ग २३— पृ० १३१–१३५**

पुढे मदन–दहन करणाऱ्या श्रीशंकराच्या आश्रमाकडे ते पोचले व तेथेच ते त्या दिवशीं राहिले. ( १–२३ )

**सर्ग २४— पृ० १३५–१४०**

विश्वामित्रांनी रामलक्ष्मणांसह गंगानदी पार केली. गंगानदीच्या पार गेल्यावर ते फार मोठ्या गहन वनांत शिरले. मलद व करुष प्रदेशांची उत्पत्ति (१--२०). सुंदाची भार्या ताटका. तिचा मुलगा मारीच यांची कथा ( २१--३२ ).

**सर्ग २५— पृ० १४०--१४३**

अगस्त्यमुनींनी सुंदराक्षसाचा वध केला. ( १--१० ) तेव्हा ताटका आपल्या पतिला मारणाऱ्या ऋषीस खाण्यास धावली. तेव्हा त्यांनी तिला शापलें. ती ही राक्षसी ताटका आहे, रामा ! तूं हिचा आता वध कर. ( ११--२३ )

**सर्ग २६— पृ० १४४--१४९**

गोब्राह्मणांचें हित करण्यासाठी, देशाचें हित करण्यासाठी व विश्वामित्राची आज्ञा पालन करण्यासाठी राम ताटिकेचा वध करतो. हें पाहून सर्व देव व ऋषि रामाचें अभिनंदन करतात ( १--३० ). तेथेच त्या रात्रीं त्यांनी वसती केली. ( ३१--३६ )

**सर्ग २७— पृ० १४९–१५३**

विश्वामित्रमुनि सर्व अस्त्रें रामचन्द्राला देतात. ( १–२८ )

**सर्ग २८— पृ० १५४–१५५**

विश्वामित्रमुनि श्रीरामचन्द्राला सर्व शस्त्रांचे उपसंहारही सांगतात. अस्त्रें व त्यांचे उपसंहार प्राप्त झाल्यानंतर आपण शत्रूला अजिंक्य झालों आहों, असा आत्मविश्वास रामामध्ये उत्पन्न झाला ( १–२३ ).

**सर्ग २९— पृ० १५७–१६२**

सिद्धाश्रमामध्ये विश्वामित्र व रामलक्ष्मण प्रवेश करतात. येथे महाविष्णूने पूर्वी

तप केलें. येथे विरोचनपुत्र बळीनें मोठा यज्ञ केला होता ( १–५ ). अदितीच्या पोटीं वामनरूपी विष्णूचा जन्म. त्यानें बलीचा निग्रह केला ( ६–२३ ). रामानें विश्वामित्राच्या सिद्धाश्रमास पोंचल्यावर त्यांस सांगितलें कीं, आपण आतां यज्ञ सुरू करावा. मी यज्ञाचें रक्षण करतों. तेव्हा विश्वामित्रांनीं यज्ञदीक्षा घेतली ( २४–३३ ).

## सर्ग ३०— पृ० १६२–१६६

विश्वामित्राचा यज्ञ चालू झाला ( १–४ ). राक्षसांच्या भूतचेष्टा सुरू झाल्या. यज्ञवेदींतून व यज्ञसाहित्यांतून ज्वाला निघूं लागल्या ( ५–११ ). मारीचावर रामानें बाण फेकला. तेव्हा तो राक्षस मूर्च्छीत होऊन, समुद्रांत जाऊन पडला (१२–२१). नंतर सुबाहूचा वध केला. इतर राक्षसही मारले गेले व विश्वामित्राचा यज्ञ निर्विघ्न समाप्त झाला. विश्वामित्राला फार आनंद झाला व रामा ! तूं या आश्रमाला खरोखर सिद्धाश्रम बनवलेंस, असे तें म्हणाले ( २२–२७ ).

## सर्ग ३१— पृ० १६६–१७०

जनकराजाच्या मिथिला नगरीस जाण्यासाठीं रामलक्ष्मणांसह विश्वामित्र निघतात. शिवधनुष्यवर्णन (१–१३). रात्रौ शोणातीरीं वास्तव्य ( १४–२४ ).

## सर्ग ३२— पृ० १७०—१७६

ब्रह्मपुत्र कुश क्षात्रधर्माची वाढ करतो. त्याला चार पुत्र होतात. त्यांनीं चार नगरें वसवलीं. त्यांपैकी वसुराजाची ही मागधी ( शोणा नदी ) होय ( १–१० ). कुशनाभ राजर्षीला १०० सुंदर कन्या झाल्या. त्या वायूच्या कोपानें कुबड्या झाल्या ( २१–२७ ).

## सर्ग ३३— पृ० १७६–१८०

क्षमाशील मुलींची प्रशंसा ( १–४ ). ऊर्मिलेची कन्या सोमदा नांवाची होती, तिनें चूली ब्रह्मर्षीची सेवा केली. ते प्रसन्न झाले, तेव्हा तिनें वर मागितला कीं, आपणांस धार्मिक पुत्र व्हावा ( ५–१७ ). त्याप्रमाणें तिला ‘ ब्रह्मदत्त ’ नांवाचा पुत्र झाला. कुशनाभानें त्या कुबड्या १०० कन्या ब्रह्मदत्ताला दिल्या. पाणिग्रहण होतांच त्या पुनः निर्दोष झाल्या ( १८–२७ ).

**सर्ग ३४— पृ० १८०–१८४**

कुशनाभाने पुत्रप्राप्तीसाठी पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्याला गाधि नांवाचा पुत्र झाला. गाधीचा मुलगा विश्वामित्र होय (१–९). कुशिकवंशाचें वर्णन (१०–२३).

**सर्ग ३५— पृ० १८४–१८७**

दुसऱ्या दिवशीं ते सर्व शोणानदीवरून पुढे चालले. जान्हवीच्याजवळ पोचले. गंगा नदीचें वर्णन (१–२२).

**सर्ग ३६— पृ० १८८—१९२**

शंकराचा विवाह झाला. उमेचा पृथ्वीला शाप. शंकर हिमालयांत तपस्या करतात (१–२८).

**सर्ग ३७— पृ० १९२—१९६**

स्कंदाचा जन्म (कार्तिकेय-जन्मकथा) (१–३२).

**सर्ग ३८— पृ० १९७—२००**

सगराची कथा. सगर अश्वमेध करतो. (१–२५).

**सर्ग ३९— पृ० २००—२०४**

यज्ञीय अश्वाचें हरण केलें जातें. सगराचे पुत्र अश्व शोधावयास जातात. ते पृथ्वी खणून टाकतात (१–२६).

**सर्ग ४०— पृ० २०४—२०८**

सगर-पुत्र अश्व धुंडीत असतां कपिल ऋषि तप करीत होते, तेथे पोचले. त्यांनी कपिलीची निर्भर्त्सना केली. तेव्हा कपिलाने त्यांचें हुंकारानेच जाळून भस्म केलें (१–३०).

**सर्ग ४१— पृ० २०९–२१२**

आपले पुत्र अश्व घेऊन परत आले नाहीत, असें पाहून सगराने आपल्या अंशुमान नामक नातवास सांगितलें की, तूं जा व अश्व शोधून आण. त्याने आपले पितर जळून पडल्याचें पाहिलें. त्यांची उत्तरक्रिया करण्यासाठी तेथे त्यास पाणी मिळालें नाही. तेथे त्यास गरुड भेटला, त्याने त्यास सांगितलें की,

' गंगा येथे आण व त्या जलाने पितरांना तृप्त कर. ' हें ऐकून अंशुमानाने अश्व घरीं आणला व सगराचा याग समाप्त झाला. सगर स्वर्गास गेला. पुष्कळ विचार करूनही गंगा आणण्याची युक्ति कोणासहि या वेळीं सापडली नाही ( १–२७ ).

**सर्ग ४२— पृ० २१३–२१६**

अंशुमानाला दिलीप हा पुत्र झाला. या दोघांनीहि गंगा आणण्याचा यत्न केला; पण तें त्यांस साधलें नाही. दिलीपाला भगीरथ पुत्र झाला. याने फार मोठी तपस्या करून ब्रह्मदेवांकडून वर मिळविला. त्यांनी सांगितलें की, श्रीशंकरांना प्रसन्न करून घ्यावें ( १–२५ ).

**सर्ग ४३— पृ० २१७–२२२**

भगीरथराजाने श्रीशंकरांना प्रसन्न करून घेतलें. त्यांनी गंगेला मस्तकीं धारण करण्याचें मान्य केलें. त्याप्रमाणे स्वर्गांतून गंगा भूतलावर आली. गंगेने जन्हूचा यज्ञमंडप बुडविला. तेव्हा रागावून त्याने सर्व गंगाजल प्राशन केलें. नंतर देवादिकांनी जन्हूची स्तुति केली, तेव्हा त्याने ती पुढे आपल्या कानावाटें बाहेर सोडली, म्हणून तिला जान्हवी असें म्हणूं लागले ( १–४२ ).

**सर्ग ४४— पृ० २२३–२२६**

जेथे सगर--पुत्र जळून पडले होते, तेथे गंगा गेली व त्यांनी त्याचें भस्म भिजविलें, तेव्हा ते सर्व स्वर्गास गेले. याप्रमाणे भगीरथाने आणल्यामुळे हिला भागीरथी असें म्हणतात. याप्रमाणे गंगेचें आख्यान रामाला विश्वामित्रांनी सांगितलें.

**सर्ग ४५— पृ० २२६–२३२**

दुसऱ्या दिवशीं हे सर्व गंगा तरून पुढे निघाले, ते विशाला नगरीला पोंचले. देव–दानवांनी समुद्राचें मंथन केल्यानंतर आपसांत युद्ध होऊन त्यांत दैत्यांचा वध देवांनी केला ( १–४५ ).

**सर्ग ४६— पृ० २३३–२३६**

इन्द्रघातक पुत्र उत्पन्न करण्यासाठी दिति तप करते. तेव्हा कपटाने इन्द्र तिची सेवा करितो. एक वेळ दुपारीं ती बिछान्यावर उलटी निजली आहे, असें

पाहून ही या वेळीं अपवित्र आहे, असें जाणून इन्द्राने तिच्या गर्भाचे सात तुकडे केले. तो रडूं लागला असतां, त्यास ' रडूं नको ' असें इन्द्राने म्हटलें. दितिही ' मारूं नको ' असें त्यास म्हणली ( १–२३ ).

## सर्ग ४७— पृ० २३६—२४०

याप्रमाणे मरुत् जन्मास आले. इन्द्राने दितीची सेवा या विशाला नगरीमध्येच केली. इक्ष्वाकुचा पुत्र विशाल होता. त्याने ही स्थापिली, म्हणून हिला विशाला म्हणतात. याचा वंश. या वंशांतील सुमतिराजा सध्या राज्य करीत आहे (८१–२२).

## सर्ग— ४८ पृ० २४१— २४५

राजा वसुमतीने रामलक्ष्मणांविषयीं विश्वामित्राला माहिती विचारली. विश्वामित्राने त्यांची सर्व माहिती त्यास सांगितली. तेव्हा त्याने त्यांचा मोठा आदरसत्कार केला. तेथे ते सर्व एक रात्र राहिले व दुसऱ्या दिवशीं मिथिला नगरीजवळ असलेल्या जुनाट आश्रमाजवळ पोंचले ( १–१३ ). गौतम व अहल्येची कथा. अहल्येशीं इन्द्र कपटवेषाने येऊन व्यभिचार करतो. गौतमाचा शाप. इन्द्राचे वृषण गळून पडतात ( १४-३३ ).

## सर्ग— ४९ पृ० २४६— ३५१

इन्द्राला मेषाचे वृषण काढून बसवतात. इकडे गौतमाच्या आश्रमांत रामलक्ष्मण प्रवेश करतात. तेथे तप करीत असलेली अहल्या त्यांस दिसते. ती त्यांचें आदरातिथ्य करते. नंतर गौतम तिचा स्वीकार करतात ( १–२३ ).

## सर्ग— ५० पृ० २५१—२५५

विश्वामित्र रामलक्ष्मणांसह जनकराजाच्या यज्ञमण्डपाच्या मार्गाने चालले. यज्ञाची फार मोठी गडबड चालू होती. कोठे उतरावें, असें रामाने विचारल्यावर विश्वामित्रांनी एकान्त जागा पाहून उतरण्याचें ठरविलें ( १–५ ). विश्वामित्र आल्याचें समजतांच जनकराजा त्यांस सामोरा आला व त्याने त्यांचा मोठा सत्कार केला. जनकाने रामलक्ष्मणांची माहिती विचारली, ती सर्व विश्वामित्राने सांगितली ( ६-२५ ).

❀

**सर्ग ५१— पृ० २५५—२५९**

जनकाच्या पुरोहित शतानंदाने विश्वामित्रांस आपली माता अहल्या हिच्याविषयी प्रश्न विचारले ( १—५ ). विश्वामित्रांनी सांगितलें की, गौतमांनी अहल्येचा स्वीकार केला आहे. तें ऐकून शतानंदास आनंद झाला ( ६—१२ ). विश्वामित्राची कथा. विश्वामित्र राजा वसिष्ठाश्रमांत येतो ( १३—२९ ).

**सर्ग ५२— पृ० २५९—२६२**

वसिष्ठ ऋषि विश्वामित्र राजाचें त्याच्या सर्व सेनेसह थाटाचें आदरातिथ्य करतात ( १—२४ ).

**सर्ग ५३— पृ० २६३—२७०**

विश्वामित्र राजा आदरातिथ्याने संतुष्ट झाला. कामधेनूच्या प्रभावाने असें थाटाचें आदरातिथ्य वसिष्ठ ऋषि करूं शकतो, हें जाणून विश्वामित्राच्या मनांत ही कामधेनु आपणांकडे असावी, असा विचार आला. त्याने ती वसिष्ठाकडे मागितली; पण वसिष्ठाने दिली नाही ( १—२५ ).

**सर्ग ५४— पृ० २६६— २७०**

राजा विश्वामित्राने रागाऊन आपल्या सैनिकांस आज्ञा केली की, या गाईला येथून न्या. सैनिक तिला हाणमार करून नेऊं लागले. तेव्हा तिने वसिष्ठांना विचारलें व त्यांच्याकडून आज्ञा होतांच त्या गाईने आपल्या रक्षणासाठी सैन्य पाठवलें; पण विश्वामित्राच्या सैन्याने या गाईच्या रक्षकांचा मोड केला ( १—२४ ).

**सर्ग ५५— पृ० २७०—२७४**

कामधेनूने पुनः सैनिक पाठवले. त्यांनी विश्वामित्राचें सैन्य उध्वस्त करून टाकलें. तेव्हा विश्वामित्राचे १०० पुत्र वसिष्ठावर चालून आले. त्यांचाही नाश झाला. तेव्हा राजा विश्वामित्र लज्जित होऊन तप करून अधिक सामर्थ्य मिळविण्यासाठी हिमालयामध्ये निघून गेला. त्यांनी महादेवास प्रसन्न केलें व पुष्कळ अस्त्रें मिळविलीं व पुनः त्याने वसिष्ठाच्या आश्रमावर चाल केली. तेव्हा वसिष्ठच स्वतः आपला ब्रह्मदण्ड उभारून त्याचा प्रतिकार करण्यास पुढे झाले (१—२८).

विश्वामित्राने आपलीं सर्व अस्त्रें वसिष्ठावर सोडलीं; पण त्या सर्वांचा प्रतिकार वसिष्ठाने ब्राह्मतेजानेच केला. तेव्हा विश्वामित्र खजिल झाला व म्हणाला, 'क्षात्रतेज क्षुद्र आहे. ब्राह्मतेजच श्रेष्ठ आहे.' असें म्हणून तो ब्राह्मण बनण्यासाठी प्रचण्ड तप करण्याच्या इच्छेने निघाला ( १–२४ ).



विश्वामित्र राजा आपल्या राज्याचा त्याग करून पत्नीसह दक्षिण दिशेस जाऊन तप करूं लागला. बरेंच तप झाल्यावर ब्रह्मदेव प्रसन्न झाले व त्यांनी त्यांस " राजर्षि ' म्हटलें. राजर्षित्वाची विश्वामित्रास लाज वाटली व तो पुनः ब्राह्मण होण्यासाठी अधिक तप करूं लागला( १–१० ). इकडे त्रिशंकु राजा यज्ञ करून सदेह स्वर्गास जाण्याची इच्छा करूं लागला. कुलगुरु वसिष्ठांनी त्यास सांगितलें की, असें होणें अशक्य आहे. तेव्हा तो वसिष्ठपुत्रांजवळ गेला ( ११–२२ ).



वसिष्ठपुत्रांनी त्याची निर्भत्सना केली व कुलगुरूची अवज्ञा केल्याबद्दल त्यांनी त्रिशंकूला शाप दिला. तेव्हा तो विश्वामित्राजवळ आला व त्रिशंकूने झालेला वृत्तांत विश्वामित्रास सांगून आपणांस सहाय्य करा, असें त्यास विनाविलें ( १–२४ ).



विश्वामित्राने त्यास सदेह स्वर्गास पाठवण्याचें आश्वासन दिलें व त्यासाठी यज्ञास प्रारंभही केला. विश्वामित्राने सर्व ऋषींस बोलाविलें; पण वसिष्ठ आणि वसिष्ठपुत्र तेवढे आले नाहीत. बाकीचे सर्व आले. वसिष्ठपुत्रांनी मात्र या यागाची फार निंदा केली. यासाठी विश्वामित्राने त्यांस शापिलें ( १–२३ ).



विश्वामित्राने यज्ञास प्रारंभ केला, सर्व देवांस बोलाविलें, पण देव आले नाहीत. तरी विश्वामित्राने त्रिशंकूला सदेह स्वर्गास पाठवून दिला ( १–१६ ). इन्द्राने त्रिशंकूस खाली ढकलून दिला. तेव्हा तो खाली पडूं लागला. विश्वामित्र त्यास आपल्या तपःसामर्थ्याने वर पाठवी व इंद्र खाली ढकली. या कारणाने त्रिशंकु

मध्येच लोंबकळत राहिला. या कारणाने विश्वामित्राने तपःसामर्थ्याने दुसरें तारका-मण्डळ निर्माण केलें (१७–२४).

## सर्ग ६१– पृ० २९४–२९८

या धाडसामुळे विश्वामित्राचें तप संपलें व त्यास फार वाईट वाटलें. तेव्हा तो पुनः पश्चिमेकडे जाऊन पुष्करतीर्थावर तप करूं लागला ( १–५ ). अंबरीष राजा यज्ञ करीत होता. त्याचा पशु इंद्राने पळविला. तेव्हा त्याने पुष्कळ शोध केला; पण पशु सापडेना; तेव्हा ऋचीक ऋषींना पुष्कळ धन देऊन, त्याच्या मधल्या शुन–शेप नांवाच्या मुलास राजाने विकत घेतलें ( ६–२४ ).

## सर्ग ६२– पृ० २९८–३०२

त्या मुलाला घेऊन अंबरीष राजा चालला असतां, त्याचा मुक्काम पुष्करतीर्थावर झाला. तेथेच विश्वामित्र तप करीत होता. त्यास शुनःशेप शरण गेला व जीवरक्षण कसें करावें ती युक्ति सांगा, असें तो विश्वामित्रास म्हणाला. विश्वामित्राने आपल्या मुलांस याच्याबद्दल बळी जाण्यास सांगितलें; पण ते तयार झाले नाहीत. म्हणून त्याने स्वपुत्रांसही शापलें; पुढे विश्वामित्राने शुनःशेपास कांहीं मंत्र शिकविले व यांच्या जपाने मरण टळेल, असेंही सांगितलें ( १–२८ ).

## सर्ग ६३– पृ० ३०३–३०७

पुष्करतीर्थावर विश्वामित्राने तप केलें. ब्रह्मदेव प्रसन्न झाले. त्यांनी त्यास ‘ ऋषि ’ म्हटलें. तेवढ्याने संतुष्ट न होऊन विश्वामित्राने पुनः तप केलें. त्यानंतर तेथे मेनका आली. तिला पाहून विश्वामित्र मोहित झाला व तिच्याबरोबर १० वर्षें राहिला ( १–१२ ). आपली चूक लक्ष्यांत येतांच तिला सोडून तो उत्तर पर्वतावर गेला व तप करूं लागला. त्याने ब्रह्मदेव संतुष्ट होऊन त्यांनी त्यास ‘ महर्षि ’ म्हटलें. तेव्हा विश्वामित्राने विचारलें की, मी ब्रह्मर्षि नाहीं काय ? तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले की, अजून तूं जितेंद्रिय नसल्याने ब्रह्मर्षि झाला नाहीस ( १३–२१ ). तेव्हा विश्वामित्र पुनः तप करूं लागला ( २२–२६ ).

## सर्ग ६४– पृ० ३०७–३१०

इन्द्राने विश्वामित्राजवळ रंभा पाठवली. रंभा त्याजवळ आली, पण तो मोहित

झाला नाहीं व तिला रागानें शापिलें; पण क्रोध आल्यामुळें त्याच्या तपामध्यें विघ्न झालें. तेव्हां तो पुनः तप करावयास लागला. ( १–२१ )

## सर्ग ६५— पृ० ३१०–३१६

नंतर विश्वामित्र पूर्वेच्या बाजूस जाऊन तप करूं लागला. त्यानें मौन धारण केलें. तप फार झालें, असें पाहून देव व ऋषि ब्रह्मदेवास म्हणाले कीं, आता याचें तप फार झालें, यासाठीं याचें जें इष्ट असेल तें यास द्यावें. तेव्हां ब्रह्मदेवानें त्यास ‘ **ब्रह्मर्षि** ’ म्हटलें. तें ऐकून विश्वामित्र म्हणाला कीं, मला वसिष्ठांनीं ‘ ब्राह्मण ’ म्हणावें. तेव्हां सर्व देवांच्या विनंतीप्रमाणें वसिष्ठांनींहि विश्वामित्राला ‘ ब्रह्मर्षि ’ म्हटलें ( १--२९ ). हा वृत्तांत ऐकून जनकादिकांस फार आनंद झाला ( ३०–४० ).

## सर्ग ६६— पृ० ३१६–३२०

दुसऱ्या दिवशीं विश्वामित्र जनक राजास म्हणाले कीं, तुमच्याकडचें शिव-धनुष्य या रामलक्ष्मणांस दाखवा. तेव्हां जनक म्हणाला कीं दक्षयज्ञविध्वंसाच्या वेळीं घेतलेलें हें शिवधनुष्य आहे, तें श्रीशंकरांनीं आमच्या पूर्वजांकडे ठेवलें होतें, तें हें आहे. मला यज्ञभूमी नांगरीत असतां ही सीता नामक कन्या भूमीमध्यें सापडली. जो हें धनुष्य सज्ज करील, त्यास ती द्यावयाची, अशी माझी प्रतिज्ञा होती. पुष्कळ राजांनीं सीतेला मागणी घातली; पण कोणासहि हें धनुष्य सज्ज करतां न आल्यामुळें मीं कोणालाच सीता दिली नाहीं. तेव्हां सर्व राजांनीं मिथि-लेस वेढा दिला. एक वर्ष झालें. पुढें देवांच्या चतुरंगबलाच्या मदतीनें मीं राजांचा मोड केला व मिथिलेचा वेढा उठवला ( १–२६ ).

## सर्ग ६७— पृ० ३२१—३२५

‘ रामाला धनुष्य दाखव, ’ असें विश्वामित्र जनकास म्हणाले. तेव्हां धनुष्याची पेटी आणून तें धनुष्य रामास दाखवलें. रामानें तें सहज उचललें व प्रत्यंचा चढवून कानापर्यंत ओढली, तों तें मोडलें. हें पाहून जनकराजास रामाच्या परा-क्रमाबद्दल खात्री वाटली व त्यास सीता देण्याचें त्यानें ठरवलें ( १–२५ ) आणि आपल्या मंत्र्यांना दशरथराजाला आणण्यासाठीं सत्वर पाठवलें ( २६–२८ ).

**सर्ग ६८— पृ० ३२५—३२७**

जनकाच्या मंत्र्यांनी दशरथ राजाला निमंत्रण दिलें व दशरथ राजा आपल्या सर्व परिवारासह पुरोहितादिकांसह मिथिला नगरीस येण्यास तयार झाला ( १–१९ ).

**सर्ग ६९— पृ० ३२८—३३०**

दुसऱ्या दिवशीं चतुरंगसेनेसह दशरथ राजा अयोध्येहून निघाला व चार दिवसांनी तो मिथिला नगरीस येऊन पोचला. जनकानें त्याचें उचित स्वागत केलें ( १–१० ) व दशरथास म्हणाला की, तुमच्या रामानें शिवधनुष्य सज्ज केलें, यासाठीं आमची सीता त्यास द्यावयाची आहे. विवाहकार्य उर्ईयीक व्हावें ( ११–१८ ).

**सर्ग ७०— पृ० ३३१—३३७**

यज्ञमण्डपामध्ये दोनही राजे जमल्यावर प्रथम वसिष्ठानें दशरथाच्या पूर्वजांचीं नांवें सांगितलीं ( १–४५ ).

**सर्ग ७१— पृ० ३३७—३४०**

जनकानेहि स्वतः आपल्या कुलाची वंशावळ सांगितली ( १–२० ). वंशावळ सांगितल्यानंतर वाग्दान झालें. गोदान, नांदीश्राद्ध आदि कृत्येंहि करावयाचें ठरलें ( २१–२४ ).

**सर्ग ७२— पृ० ३४१—३४४**

विवाहपूर्व करण्याचीं सर्व धर्मकृत्यें दशरथानें त्या दिवशीं केलीं ( १—२४ ).

**सर्ग ७३— पृ० ३४५—३५०**

युधाजित–भरताचा मामा केकयदेशाहून अयोध्येस आला व तेथून मिथिलेस आला व दशरथास भेटला; व आजोबांनी नातवांस, भरत–शत्रुघ्नांस, भेटण्याच्या इच्छेनें बोलावलें आहे, असें सांगितलें ( १—४ ). नंतर त्याच दिवशीं राम–लक्ष्मण–भरत–शत्रुघ्नांचे विवाह झाले ( ५—४० ).

**सर्ग ७४— पृ० ३५०—३५४**

विवाहकार्य होतांच दुसऱ्या दिवशीं यज्ञमंडपांतूनच विश्वामित्र उत्तर पर्वता-

वर गेले. जनक राजा आपल्या राजधानींत आला व दशरथ अयोध्येस सपरिवार येण्यास निघाला. वाटेंत अपशकुन होऊं लागले. इतक्यांत वावटळ सुटली त्यानंतर परशुराम पुढे येऊन उभे राहिले ( १–२० ).

वसिष्ठादि मुनि आपसामध्ये विचार करूं लागले कीं, हा परशुराम तर या क्षत्रियाचा येथे घात तर नाहीं ना करणार ? असा विचार करून ते पुढे झाले व त्यांनी परशुरामाची पूजा केली. ती घेऊन परशुराम रामचन्द्राला म्हणाला ( २१—२४ ).

**सर्ग ७५— पृ० ३५४—३५८**

'हे रामचन्द्रा ! मी ऐकलें की, तूं शिवधनुष्याचा भंग केलास. आता हें वैष्णव धनुष्य हातांत घे व यावर बाण चढीव. मग मी तुझ्याबरोबर द्वन्द्वयुद्ध करीन ( १—४ ). हें ऐकून दशरथ घाबरला व परशुरामाची हात जोडून प्रार्थना करूं लागला. दशरथाच्या भाषणाकडे मुळींच लक्ष्य न देतां परशुरामाने दोनही धनुष्यांचा वृत्तांत सांगितला. शिवधनुष्य निर्जीव झालें होतें; पण हें वैष्णव-धनुष्य सुदृढ आहे, म्हणून आधीं याला बाण तर लाव ( ५—२९ ).

**सर्ग ७६— पृ० ३५९— ३६२**

परशुरामाचें भाषण ऐकून दाशरथी राम म्हणाला कीं, 'हे ब्राह्मणा, आज माझा पराक्रम पहा !' असें म्हणून त्याने वैष्णवधनुष्य हातांत घेतलें व त्यावर बाणहि चढवला. नंतर क्रोधयुक्त श्रीराम त्यास म्हणाला की, 'तूं ब्राह्मण आहेस, म्हणून मी तुझ्यावर हा प्राणघातक बाण सोडीत नाहीं; पण तुझ्या तपाने प्राप्त झालेल्या लोकांवर हा सोडतों.' याप्रमाणे परशुरामाने श्रीरामचन्द्राचा पराक्रम पाहिला. त्यानंतर संक्षेपाने आपल्या कार्याविषयी चार शब्द सांगितले व 'तुझें कल्याण होवो,' असा आशीर्वाद देऊन महेन्द्रपर्वतावर जाण्यास निघाला ( १–२२ ). तेव्हा दिशा स्वच्छ झाल्या, रामाने परशुरामाची पूजा केली, नंतर परशुरामाने रामाला प्रदक्षिणा केली व आपल्या मार्गाने चालूं लागला ( २३–२४ ).

**टिप्पणी— ३६३—३६४**

**सर्ग ७७— पृ० ३६४—३६८**

श्रीरामचन्द्रांनीं तें वैष्णव धनुष्य वरुणाच्या हातात दिलें व दशरथाची

स्वारी अयोध्येस यण्यास निघाली ( १–४ ). अयोध्या ध्वजपताकांनी सजवली होती. त्या नगरीमध्ये सपरिवार दशरथाने प्रवेश केला. गृहप्रवेशानंतर कौसल्यादि राण्यांनी सीतादि सुनांचा मोठा सत्कार केला व देवतांच्या पूजा–अर्चा केल्या ( ५–१४ ). थोडे दिवस गेल्यानंतर राजा दशरथाने भरताला बोलाऊन आणलें व म्हटलें की, ' तुमच्या आजोबांनी तुम्हांस बोलावलें आहे व त्यासाठी तुमचे मामा आलेले आहेत. म्हणून त्यांबरोबर तुम्ही जावें. ' भरतशत्रुघ्नांनी सर्वांचा निरोप घेतला व ते केकय देशाला गेले ( १५—२० ). इकडे श्रीरामचन्द्र राज्यांतील कामकाज पाहूं लागले. लोकांची त्यांच्यावर प्रीति बसली. श्रीराम व सीता हीं आनंदाने राहूं लागली ( २१–२९ ).

( २ )

# वाल्मीकि-रामायण बालकाण्ड-निरीक्षणाची विषयसूची.

## दशरथाची चिन्ता ४३५

एकपत्नीव्रत आणि अनेक स्त्रिया करण्याची चाल ( ४३६ ), अश्वमेधयज्ञ ( ४३८ ), तीनशे राजे ( ४३८ ).

## पायसाची वाटणी ४४३

## आदर्श पुरुष ४४६

आत्मिक गुण ( ४४६ ), सर्वसाधारण गुण—संयमी, नीतिमान्, धर्मज्ञता (४४७), राष्ट्रीय वृत्ति, शत्रुनिर्दलन ( ४४९ ); वैयक्तिक गुण—शूर वीर (४५०), वाणी, सुदृढांगत्व ( ४५१ ), शरीरसौंदर्य ( ४५२ ).

## श्रीरामाचें ब्रह्मचर्य ४५३

## दिनचर्या ४६१

पहिला दिवस ( ४६४ ), देशहिताचें ध्येय, तिसरा दिवस ( ४६६ ), अस्त्रविद्या ( ४६८ ), अस्त्रें व त्यांचे उपसंहार, अस्त्रें स्त्रियांनी निर्माण केलीं ( ४७३ ).

## वानरांची नवी पिढी ४७४

वानरांची नवी पिढी शिकवून कशी तयार केली ( ४७८ ), राहण्याचें स्थान, वज्रदेही वानर, गति (४७८), वानरांची बुद्धि, शक्ति, शौर्य, युद्धकौशल्य (४७९), निरनिराळीं रूपें घेण्यांतील कौशल्य, उत्साह ( ४८० ).

## हें कशासाठी ? ४८१

## सिद्धाश्रम ४८४

## वामनावताराचा संदेश ४८५

बलीची पहिली स्वारी ( ४८४ ), बलीची दुसरी स्वारी ( ४८५ ), पुरुषांचे विचार, स्त्रियांचा जळफळाट ( ४८७ ), स्त्रियांची इच्छा ( ४८८ ), ईश्वरी साक्षात्कार ( ४८९ ), वामनाची बिकट कामगिरी ( ४९० ), वामनाची पूर्व-तयारी ( ४९१ ), आणीबाणीचा प्रसंग ( ४९२ ), बलीवर कुरघोडी ( ४९३ ), वामनावताराचा संदेश ( ४९५ ), कामदहनाची कथा ( ४९६ ), ताटिकावध,

मन्थरावध, मृगुपत्नीवध (४९७), सुबाहुवध, ब्रह्मपुत्र कुश (४९८), विश्वामित्राचे पूर्वज (४९९), देवसेनानी कार्तिकेय, गंगावतरण (५००), समुद्रमन्थन (५०२).

## अहल्येची कथा ५०३

अहल्येची कथा (५०४) शतपथब्राह्मण, षड्विंश-ब्राह्मणांतील कथा ५०७), कथाभाग (५०९), देवांचें कार्य (५१०), मैत्रेयी अहल्या (५१२), वेदांतील जार, संधीसाठी जार (वृद्ध), जलांचा जार (५१३), यज्ञाचा जार (५१४), शत्रूचे किल्ले फोडणारा जार (५१४), जार (वृद्ध) जार सूर्य, जार स्तुत्य इन्द्र (५१७), उषांचा जार (५१९), जार पतीची परिचर्या करणारी सती स्त्री (५२१), बहिणीचा जार (५२३), कन्यांचा जार (५२८), जार (व्यभिचारी) (५३१), प्रजामारकाला वधदण्ड (५३६), अहल्येचा अर्थ (५३७), अहल्येची उत्पत्ति (५४४), रामायण-बालकाण्डामधील अहल्याकथा (५४५), इन्द्राचे वृषण गळून पडलें (५४६), लिंगपुराण (५४६), सुरकार्य (५५०), रामायण-उत्तरकाण्डांतील अहल्येची कथा (५५१), गणेशपुराणोक्त अहल्येची कथा (५५३), कथेचा विचार (५५६), ब्रह्मपुराणांतील अहल्याकथा (५५७), पद्मपुराणांतील अहल्याकथा (५६०), स्कंदपुराण, अध्यात्मरामायण (५६२), आनन्द-रामायण (५६४), अहल्येच्या कथांचें विश्लेषण (५६५), समजून कीं न समजून (५६६), वाकडें पाऊल कां पडावें (५६८), इन्द्राचें पाप (५६९), अहल्येचा शाप (५७१), गौतम अहल्येसाठी तप करतो, ही कथा खरी कीं काल्पनिक ? (५७२)

## विश्वामित्राची कथा ५७४

## त्रिशंकूची कथा ५७७

विश्वामित्र-मेनका (५७९), शुनःशेपाच्या कथेचा विचार (५७९), हरिश्चन्द्राचा नरमेध (५८०), क्षत्रियांची संस्कृति (५८७), ब्राह्मणी संस्कृति, विश्वात्म्याचा आत्मयज्ञ (५८८), या गोष्टींतील गूढ (५८९), बहुपत्नीत्वाची हानि (५९०).

( ३ )

श्री० पं० **विष्णु दामोदरशास्त्री पण्डित तोफखाने** यांच्या लेखांची सूची-



हे लेख यांचे आहेत व बाकीचे **पं० श्री० दा० सातवळेकर** यांचे आहेत.



# आभार-प्रदर्शन

या बालकाण्डांतील श्रीरामपंचायतनाचें तिरंगी चित्र गीताप्रेस, गोरखपुर यांचेकडून आलें असून, गंगावतरणाचें चित्र चित्रशाळेकडून छापून घेतलें आहे. बाकीचीं सर्व चित्रें श्री० बा० सं० सावंत, चित्रकार, पुणें यांनी आपुलकीच्या भावनेनें काढलीं आहेत. याकरितां त्यांचे फार आभार आहेत.

'संपादक'

(१) श्रीरामपंचायतन ( गीताप्रेस, गोरखपुर )
(२) गंगावतरण (राजा रविवर्मा )
(३) रामायणगायन ( श्री. बा. सं. सावंत, पुणें )
(४) नारद रामकथा सांगतात. ( ,, ,, ,, )
(५) क्रौंचवध ( ,, ,, ,, )
(६) पायसाची प्राप्ति ( ,, ,, ,, )
(७) विश्वामित्र रामाला मागतो ( ,, ,, ,, )
(८) ताटिकेचा वध ( ,, ,, ,, )
(९) अस्त्रविद्येचें शिक्षण ( ,, ,, ,, )
(१०) मारीच-सुबाहूंचा वध ( ,, ,, ,, )
(११) दशरथाचा अश्वमेध ( ,, ,, ,, )
(१२) राक्षसांचें व वानरांचें राज्य ( ,, ,, ,, )



श्रीरामपञ्चायतन

THE GITA PRESS, GORAKHPUR.

श्रीमहामुनि–वाल्मीकि–प्रणीतं

# श्री रा मा य ण म्।

## बाल–काण्डम्।

॥ॐ॥ तपःस्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदां वरम्।
नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुङ्गवम् १
को न्वस्मिन् सांप्रतं लोके गुणवान् कश्च वीर्यवान्।
धर्मज्ञश्च कृतज्ञश्च सत्यवाक्यो दृढव्रतः २
चारित्रेण च को युक्तः सर्वभूतेषु को हितः।
विद्वान् कः कः समर्थश्च कश्चैकप्रियदर्शनः ३

---

॥ॐ॥ रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे।
रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः॥ १॥
ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं। तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम्।
भृत्यार्तिहं प्रणतपाद्भवाब्धिपातं। वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम्॥२॥
त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सितराज्यलक्ष्मीं। धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम्।
मायामृगं दयितयेप्सितमन्वधावत्। वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम्॥३
कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम्।
आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम्॥ ४॥

स्वाध्याय करण्यांत तत्पर, शब्दब्रह्मतत्त्वज्ञान्यांमध्ये श्रेष्ठ आणि मुनींमध्ये वरिष्ठ अशा नारदांना वाल्मीकिमुनींनी प्रश्न केला की, " हे ( महर्षे! ) या वेळीं ह्या भूलोकावर गुणसंपन्न असा कोण आहे बरें? तसेंच वीर्यवान्, धर्मांचें रहस्य जाणणारा, कृतज्ञ, सत्यवचनी, धर्माकरिता स्वीकारलेल्या व्रताचा आपत्कालींही त्याग न करणारा, सदाचरणसंपन्न, प्राणिमात्रांच्या हिताविषयी तत्पर, विद्वान्, समर्थ,

आत्मवान् को जितक्रोधो द्युतिमान् कोऽनसूयकः ।
कस्य बिभ्यति देवाश्च जातरोषस्य संयुगे ४
एतदिच्छाम्यहं श्रोतुं परं कौतूहलं हि मे ।
महर्षे त्वं समर्थोऽसि ज्ञातुमेवंविधं नरम् ५
श्रुत्वा चैतत् त्रिलोकज्ञो वाल्मीकेर्नारदो वचः ।
श्रूयतामिति चामन्त्र्य प्रहृष्टो वाक्यमब्रवीत् ६
बहवो दुर्लभाश्चैव ये त्वया कीर्तिता गुणाः ।
मुने वक्ष्याम्यहं बुद्ध्वा तैर्युक्तः श्रूयतां नरः ७
इक्ष्वाकुवंशप्रभवो रामो नाम जनैः श्रुतः ।
नियतात्मा महावीर्यो द्युतिमान् धृतिमान् वशी ८
बुद्धिमान् नीतिमान् वाग्मी श्रीमाञ्छत्रुनिबर्हणः ।
विपुलांसो महाबाहुः कम्बुग्रीवो महाहनुः ९

---

दर्शन झालें असतां लोकांना अत्यंत आनंद देणारा, मनोनिग्रही, क्रोधादिकांचें संयमन करणारा, तेजस्वी, परोत्कर्षाविषयी मत्सर न धरणारा आणि युद्धकालीं क्रुद्ध झाला असतां देवांनाही भीति उत्पन्न करणारा असा कोण आहे, हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे; इतकेंच नव्हे, परंतु तें श्रवण करण्याविषयी मला पराकाष्ठेची उत्सुकता आहे आणि हे महर्षे ! आपणही अशा प्रकारचा पुरुष कोण आहे, हें जाणण्यास समर्थ आहांत. " ( १–५ )

हें वाल्मीकिमुनीचें भाषण श्रवण करून तिन्ही लोकांतील वृत्तांत जाणणारे नारदमुनि आनंदित झाले आणि " ऐकावें " असें म्हणून, सावधान होण्याविषयी सुचवून, ते म्हणाले, " तुम्ही विचारलेले गुण बहुत असून दुर्लभच आहेत; तथापि हे मुने ! त्या गुणांनी संपन्न कोण आहे, ह्याचें स्मरण करून मी सांगतों, तें ऐका. ( ६–७ )

इक्ष्वाकुवंशांत जन्मलेला आणि **राम** या नांवानें प्रसिद्ध असलेला असा एक पुरुष लोकांमध्ये प्रसिद्ध आहे. तो आत्मसंयमी, महावीर्यवान्, तेजस्वी, धैर्यवान्, जितेंद्रिय, बुद्धिमान्, नीतिज्ञ, वक्ता, वैभवशाली आणि शत्रुनाशक आहे व उन्नत-स्कंध, महाबाहु, शंखासारखा कंठ असलेला, मांसल हनुवटी, विशाल वक्षःस्थल,

महोरस्को महेष्वासो गूढजत्रुररिन्दमः ।
आजानुबाहुः सुशिराः सुललाटः सुविक्रमः  १०
समः समविभक्ताङ्गः स्निग्धवर्णः प्रतापवान् ।
पीनवक्षा विशालाक्षो लक्ष्मीवाञ्छुभलक्षणः  ११
धर्मज्ञः सत्यसंधश्च प्रजानां च हिते रतः ।
यशस्वी ज्ञानसम्पन्नः शुचिर्वश्यः समाधिमान्  १२
प्रजापतिसमः श्रीमान् धाता रिपुनिषूदनः ।
रक्षिता जीवलोकस्य धर्मस्य परिरक्षिता  १३
रक्षिता स्वस्य धर्मस्य स्वजनस्य च रक्षिता ।
वेदवेदाङ्गतत्त्वज्ञो धनुर्वेदे च निष्ठितः  १४
सर्वशास्त्रार्थतत्त्वज्ञः स्मृतिमान् प्रतिभानवान् ।
सर्वलोकप्रियः साधुरदीनात्मा विचक्षणः  १५
सर्वदाभिगतः सद्भिः समुद्र इव सिन्धुभिः ।

मोठें धनुष्य, अदृश्य स्कंधसंधि, आजानुबाहु, उत्कृष्ट मस्तक, उत्तम ललाट आणि प्रशस्त गति यांनी तो शत्रुविजयी वीर संपन्न आहे आणि त्याचप्रमाणे तो प्रतापी व लक्ष्मीवान् असून, प्रमाणांकित देह, परस्परांशीं समान आणि परस्परांपासून भिन्न असे नेत्रप्रभृति अवयव, स्निग्ध वर्ण, पुष्ट व उन्नत असें वक्षःस्थल आणि विशाल नेत्र यांनी युक्त आहे आणि म्हणून तो शुभ लक्षणांनी संपन्न आहे. तसाच तो धर्मज्ञ, सत्यप्रतिज्ञ, प्रजाजनांच्या हिताविषयी तत्पर, यशस्वी, ज्ञानसंपन्न आणि पवित्र व विनयी असून, समबुद्धीने युक्त आहे. त्याचप्रमाणे तो ब्रह्मदेवासमान असून ऐश्वर्यसंपन्न, प्रजापालक व शत्रुनाशक आहे आणि धर्माचा रक्षक असून, प्राणिसमूहाचें उत्तम पालन करणारा आहे. इतकेंच नव्हे, परंतु विशेषेंकरून स्वधर्म आणि स्वजन यांचें तो रक्षण करणारा असून, वेद आणि वेदांगें यांचें तत्त्व जाणणारा व धनुर्वेदामध्ये प्रवीण असा आहे. त्याचप्रमाणे स्मृति आणि समयस्फूर्ति यांनी तो युक्त असून, सर्व शास्त्रांचें अर्थतत्त्व जाणणारा, सर्व लोकांना हितावह, सौम्य, उदार आणि सर्व कर्मांमध्ये कुशल आहे. तसाच तो श्रेष्ठ व सर्वांशीं समभावानें वागणारा असल्यामुळे सर्वदा लोकांना त्याचें दर्शन

*

आर्यः सर्वसमश्चैव सदैव प्रियदर्शनः १६
स च सर्वगुणोपेतः कौसल्यानन्दवर्धनः ।
समुद्र इव गाम्भीर्ये धैर्येण हिमवानिव १७
विष्णुना सदृशो वीर्ये सोमवत् प्रियदर्शनः ।
कालाग्निसदृशः क्रोधे क्षमया पृथिवीसमः १८
धनदेन समस्त्यागे सत्ये धर्म इवापरः ।
तमेवं गुणसंपन्नं रामं सत्यपराक्रमम् १९
ज्येष्ठं ज्येष्ठगुणैर्युक्तं प्रियं दशरथः सुतम् ।
प्रकृतीनां हितैर्युक्तं प्रकृतिप्रियकाम्यया २०
यौवराज्येन संयोक्तुमैच्छत् प्रीत्या महीपतिः ।
तस्याभिषेकसंभारान् दृष्ट्वा भार्याथ कैकयी २१
पूर्वं दत्तवरा देवी वरमेनमयाचत ।
विवासनं च रामस्य भरतस्याभिषेचनम् २२

---

प्रिय असतें आणि म्हणूनच नद्या ज्याप्रमाणे समुद्राकडे येत असतात, त्याचप्रमाणे सर्व कालीं सज्जन त्याच्या सन्निध जात असतात. ( ८–१६ )

कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणारा तो राम सर्वगुणसंपन्न आहे; गंभीरपणामध्ये तो समुद्रासारखा आहे; धैर्यांत हिमालयपर्वताप्रमाणे आहे; वीर्यासंबंधाने विष्णूंशीं बरोबरी करणारा आहे; चन्द्राप्रमाणे त्याचें दर्शन सर्वांना प्रिय आहे; क्रोधामध्ये प्रलयकालच्या अग्नीशीं त्याचें साम्य आहे; क्षमेने तो पृथ्वीची बरोबरी करणारा आहे; धनाचा व्यय करण्याविषयी तो कुबेरासमान आहे आणि सत्य वचनासंबंधाने तर तो दुसरा मूर्तिमान् धर्मच आहे. ह्याप्रमाणे बहुगुणसंपन्न, अमोघपराक्रमी, श्रेष्ठ गुणांनी युक्त आणि प्रजाजनांना हितावह असलेलीं कृत्यें करण्याविषयी तत्पर अशा ज्येष्ठ व प्रिय पुत्र रामाला—प्रजाजनांचा मनोरथ परिपूर्ण करण्याकरिता—दशरथ भूपतीने यौवराज्याचा अभिषेक करण्याचें आनंदाने मनामध्ये आणिलें; परन्तु त्याच्या अभिषेकाला अवश्य असलेलें साहित्य जुळविलेलें अवलोकन करून पूर्वी ( इंद्राचें सहाय्य करण्याकरिता दैत्यांशीं युद्धप्रसंग प्राप्त झाला असतां, त्या युद्धांत दशरथाचे प्राण वाचविल्याबद्दल ) जिला वर

स सत्यवचनाद्राजा धर्मपाशेन संयतः ।
विवासयामास सुतं रामं दशरथः प्रियम् २३
स जगाम वनं वीरः प्रतिज्ञामनुपालयन् ।
पितुर्वचननिर्देशात् कैकेय्याः प्रियकारणात् २४
तं व्रजन्तं प्रियो भ्राता लक्ष्मणोऽनुजगाम ह ।
स्नेहाद्विनयसंपन्नः सुमित्रानन्दवर्धनः २५
भ्रातरं दयितो भ्रातुः सौभ्रात्रमनुदर्शयन् ।
रामस्य दयिता भार्या नित्यं प्राणसमा हिता २६
जनकस्य कुले जाता देवमायेव निर्मिता ।
सर्वलक्षणसंपन्ना नारीणामुत्तमा वधूः २७
सीताप्यनुगता रामं शशिनं रोहिणी यथा ।
पौरैरनुगतो दूरं पित्रा दशरथेन च २८

देण्याचें आश्वासन मिळालें होतें, त्या कैकेयीनामक भार्येने रामाला वनवास आणि भरताला राज्याभिषेक, असा वर त्या दशरथराजापाशी मागितला ! ( १७–२२ )

तेव्हा सत्यवचनी असल्यामुळे धर्मपाशानें बद्ध होऊन त्या दशरथराजानें आपल्या प्रिय पुत्र रामाला वनामध्ये पाठविलें आणि तो वीर रामही पित्यानें कैकेयीला वर देण्याविषयी केलेली प्रतिज्ञा सत्य करण्याकरिता आणि कैकयीचाही मनोरथ पूर्ण करण्याकरिता वनामध्ये गेला. तेव्हा विनयसंपन्न, सुमित्रेच्या आनंद वृद्धिंगत करणारा, रामाचे ठिकाणीं स्वाभाविकच प्रेम करणारा, रामाला प्रिय असणारा भ्राता लक्ष्मण आपला बंधु राम जाऊं लागला असतां ( पित्याची आज्ञा नसतांही ) केवळ बंधुप्रेमामुळेच त्याच्या मागोमाग वनामध्ये गेला. त्याचप्रमाणे जनकाच्या कुलामध्ये उत्पन्न झालेली, देवमायेप्रमाणे निर्माण झालेली, सर्व लक्षणांनी संपन्न असलेली, स्त्रियांमध्ये उत्कृष्ट असलेली आणि रामाला प्राणांसमान प्रिय असून, त्याचें हित करण्याविषयी नित्य तत्पर असलेली ती रामाची भार्या सीता हि, चंद्राच्या मागोमाग जाणाऱ्या रोहिणीप्रमाणे, रामाच्या बरोबर गेली. राम वनांत जाऊं लागला असतां नगरवासी जन आणि पिता दशरथ, हे दूरपर्यंत त्याच्या मागोमाग गेले. ( २३–२८ )

श्रृङ्गवेरपुरे सूतं गङ्गाकूले व्यसर्जयत् ।
गुहमासाद्य धर्मात्मा निषादाधिपतिं प्रियम् २९
गुहेन सहितो रामो लक्ष्मणेन च सीतया ।
ते वनेन वनं गत्वा नदीस्तीर्त्वा बहूदकाः ३०
चित्रकूटमनु प्राप्य भरद्वाजस्य शासनात् ।
रम्यमावसथं कृत्वा रममाणा वने त्रयः ३१
देवगन्धर्वसंकाशास्तत्र ते न्यवसन् सुखम् ।
चित्रकूटं गते रामे पुत्रशोकातुरस्तथा ३२
राजा दशरथः स्वर्गं जगाम विलपन् सुतम् ।
गते तु तस्मिन् भरतो वसिष्ठप्रमुखैर्द्विजैः ३३
नियुज्यमानो राज्याय नैच्छद्राज्यं महाबलः ।
स जगाम वनं वीरो रामपादप्रसादकः ३४
गत्वा तु स महात्मानं रामं सत्यपराक्रमम् ।

नंतर, श्रृंगवेर पुरामध्ये इष्ट अशा गुहसंज्ञक निषादाधिपतीची भेट झाल्यावर रामाने ( वनवासांत पोंचविण्याकरिता रथ घेऊन आलेल्या ) सारथ्याला गंगातीरीं सोडिलें. ( २९ )

नंतर गुह, लक्ष्मण व सीता यांसहवर्तमान राम वनामध्ये चालला. पुढे ते तिघेहि या वनांतून त्या वनांत जात असतां, अगाध जलाने युक्त असलेल्या नद्या तरून पुढे चालले आणि नंतर भरद्वाजमुनींच्या आज्ञेवरून चित्रकूट पर्वताला पोंचल्यावर वनामध्ये आनंदाने विहार करणारे ते देवगंधर्वांसारखे असलेले तिघेहि ( म्हणजे राम, सीता आणि लक्ष्मण ) रम्य पर्णशाला करून त्या ठिकाणीं सुखाने राहिले. राम चित्रकूट पर्वतावर गेला, तों इकडे पुत्रशोकाने व्याकुल झालेला दशरथ राजा, पुत्राकरिता विलाप करीत करीत, स्वर्गलोकीं गेला. ह्याप्रमाणे तो दशरथ परलोकीं गेल्यानंतर वसिष्ठप्रभृति द्विज भरताला राज्याचा स्वीकार करण्याविषयी सांगूं लागले; परंतु महाबलाढ्य ( असल्यामुळे राज्य करण्यास समर्थ ) असूनहि राज्याची इच्छा न धरितां, रामचरणांचा प्रसाद प्राप्त करून घेण्यास तो वीर भरत वनामध्ये गेला. ( २९–३४ )

अयाचद् भ्रातरं राममार्यभावपुरस्कृतः ३५
त्वमेव राजा धर्मज्ञ इति रामं वचोऽब्रवीत् ।
रामोऽपि परमोदारः सुमुखः सुमहायशाः ३६
न चैच्छत् पितुरादेशाद्राज्यं रामो महाबलः ।
पादुके चास्य राज्याय न्यासं दत्त्वा पुनः पुनः ३७
निवर्तयामास ततो भरतं भरताग्रजः ।
स काममनवाप्यैव रामपादावुपस्पृशन् ३८
नन्दिग्रामेऽकरोद्राज्यं रामागमनकाङ्क्षया ।
गते तु भरते श्रीमान् सत्यसंधो जितेन्द्रियः ३९
रामस्तु पुनरालक्ष्य नागरस्य जनस्य च ।
तत्रागमनमेकाग्रो दण्डकान् प्रविवेश ह ४०

नम्र वेषाने महात्म्या अमोघपराक्रमी रामासमीप गेल्यानंतर त्याने ( वनांतून परत येण्याविषयी ) भ्रात्या रामाची श्रेष्ठ विचाराने प्रेरित होऊन प्रार्थना केली. " आणि तूंच राजा आहेस व धर्मज्ञ ( असल्यामुळे, सर्व गुणांनी श्रेष्ठ असा ज्येष्ठ भ्राता असतांना कनिष्ठाला राज्याचा अधिकार नाही, हेंही तूं जाणतच ) आहेस " असेंहि तो म्हणाला; परन्तु प्रसन्न मुख, अपार यश आणि प्रचंड बल यांनी संपन्न असलेला राम, जरी ( याचकाची हवी ती इच्छा तृप्त करण्यासारखा ) पराकाष्ठेचा उदार होता, तरी पित्याच्या आज्ञेमुळे ( भरताच्या प्रार्थनेप्रमाणे ) त्याने राज्याचा स्वीकार करण्याचें मनांत न आणतां, वारंवार वनांतून निवृत्त होण्याविषयी याचना करीत असलेल्या भरताला राज्यरक्षणाचें सामर्थ्य यावें, एतदर्थ ठेव म्हणून आपल्या पादुका दिल्या. ( ३५-३७ )

नंतर, भरताहून ज्येष्ठ असलेल्या त्या रामाने भरताला तेथून परत फिरविलें. याप्रमाणे आपला मनोरथ पूर्ण न होतांच तो भरत रामचरणीं प्रणाम करून परत फिरला आणि ( चौदा वर्षेपर्यंत ) रामाच्या आगमनाची वाट पहात पहात त्याने नंदिग्रामामध्ये राहून राज्य केलें. असो. भरत गेल्यानंतर ( चित्रकूटपर्वत फार दूर नसल्यामुळे कदाचित् ) नगरवासी जन आणि भरत ह्यांचें आगमन पुनरपि इकडे होण्याचा संभव आहे, असें समजून तो सत्यवचनी, जितेंद्रिय व

प्रविश्य तु महारण्यं रामो राजीवलोचनः ।
विराधं राक्षसं हत्वा शरभङ्गं ददर्श ह ४१
सुतीक्ष्णं चाप्यगस्त्यं च अगस्त्यभ्रातरं तथा ।
अगस्त्यवचनाच्चैव जग्राहैन्द्रं शरासनम् ४२
खड्गं च परमप्रीतस्तूणी चाक्षयसायकौ ।
वसतस्तस्य रामस्य वने वनचरैः सह ४३
ऋषयोऽभ्यागमन् सर्वे वधायासुररक्षसाम् ।
स तेषां प्रतिशुश्राव राक्षसानां तदा वने ४४
प्रतिज्ञातश्च रामेण वधः संयति रक्षसाम् ।
ऋषीणामग्निकल्पानां दण्डकारण्यवासिनाम् ४५
तेन तत्रैव वसता जनस्थाननिवासिनी ।
विरूपिता शूर्पणखा राक्षसी कामरूपिणी ४६

वैभवशाली राम दंडकारण्यामध्ये मोठ्या सावधपणाने प्रविष्ट झाला. ( ३८–४० )

त्या महावनामध्ये प्रविष्ट झाल्यानंतर कमलनयन रामाने विराध राक्षसाचा वध केला; नंतर शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्यभ्राता इध्मवाह ऋषि आणि अगस्त्य ह्या मुनींची भेट घेतली. नंतर इन्द्राने वरुणापासून अगस्त्यमुनींपाशी आणून ठेविलेलें वैष्णव धनुष्य, खड्ग आणि अक्षय बाणांनी भरलेले भाते ह्यांचा अगस्त्य-मुनींच्या आज्ञेवरून रामाने मोठ्या आनंदाने स्वीकार केला. ह्याप्रमाणे तो राम वनचरांसहवर्तमान वनामध्ये वास्तव्य करूं लागला असतां, असुर आणि राक्षस यांच्या वधाविषयीं विनंती करण्याकरिता सर्व ऋषि त्याचे समीप आले व त्या रामानेही त्या वनामधील राक्षसांचा वध करण्याविषयी त्या ऋषींना वचन दिलें. सारांश, दंडकारण्यनिवासी अग्नितुल्य तेजस्वी ऋषींचे संनिध रामाने युद्धामध्ये राक्षसांचा वध करण्याची प्रतिज्ञा केली. ( ४१–४५ )

पुढे त्या दंडकारण्यदेशामध्ये रहात असतांना जनस्थानांत× वास्तव्य कर-णारी कामरूपिणी शूर्पणखा राक्षसी ( कर्ण व नासिका ह्यांचा छेद करून ) त्याने

× दण्डकारण्यांत जनस्थान नांवाचें प्रसिद्ध ठिकाण आहे, तेथे रावणाने आपल्या सैन्याची छावणी ठेवली होती. पंचवटी जनस्थानांतच आहे.

ततः शूर्पणखावाक्यादुद्युक्तान् सर्वराक्षसान् ।
खरं त्रिशिरसं चैव दूषणं चैव राक्षसम् ४७
निजघान रणे रामस्तेषां चैव पदानुगान् ।
वने तस्मिन् निवसता जनस्थाननिवासिनाम् ४८
रक्षसां निहतान्यासन् सहस्राणि चतुर्दश ।
ततो ज्ञातिवधं श्रुत्वा रावणः क्रोधमूर्च्छितः ४९
सहायं वरयामास मारीचं नाम राक्षसम् ।
वार्यमाणः सुबहुशो मारीचेन स रावणः ५०
न विरोधो बलवता क्षमो रावण तेन ते ।
अनादृत्य तु तद्वाक्यं रावणः कालचोदितः ५१
जगाम सहमारीचस्तस्याश्रमपदं तदा ।
तेन मायाविना दूरमपवाह्य नृपात्मजौ ५२
जहार भार्यां रामस्य गृध्रं हत्वा जटायुषम् ।
गृध्रं च निहतं दृष्ट्वा हृतां श्रुत्वा च मैथिलीम् ५३

---

विरूप केली. तदनंतर शूर्पणखेच्या सांगण्यावरून युद्धार्थ युक्त झालेल्या सर्व जन-स्थाननिवासी राक्षसांचा, खर, त्रिशिरस् व दूषण ह्या राक्षसांचा आणि त्यांच्या अनुयायांचा संग्रामामध्ये रामाने वध केला. सारांश, त्या वनामध्ये वास्तव्य कर-णाऱ्या रामाने जनस्थाननिवासी चौदा हजार राक्षससैन्याचा वध केला. तेव्हा त्या स्वजातीयांचा वध झाल्याचें श्रवण करून रावण क्रोधाने अगदी व्याप्त झाला. ( ४६-४९ )

रावण मारीच नामक राक्षसाला सीताहरणार्थ आपणांला सहाय्य होण्याविषयी विनंती करूं लागला. तेव्हा " हे रावणा ! त्या बलवानाशीं विरोध धरणें तुला योग्य व हितकारक होणार नाही. " असें सांगून मारीच राक्षस वारंवार त्याचा निषेध करीत असतांनाही काळाची प्रेरणा झाल्यामुळे त्याच्या सांगण्याचा अनादर करून तो रावण मारीचासहवर्तमान रामाच्या आश्रमस्थानाला गेला. नंतर त्या मायावी मारीच राक्षसाच्या सहाय्याने राजकुमार राम-लक्ष्मणांना आश्रमांतून दूर नेववून आणि जटायु गृध्राचा वध करून त्याने रामाची भार्या हरण केली. तदनंतर

राघवः शोकसंतप्तो विललापाकुलेन्द्रियः ।
ततस्तेनैव शोकेन गृध्रं दग्ध्वा जटायुषम् ५४
मार्गमाणो वने सीतां राक्षसं संददर्श ह ।
कबन्धं नाम रूपेण विकृतं घोरदर्शनम् ५५
तं निहत्य महाबाहुर्ददाह स्वर्गतश्च सः ।
स चास्य कथयामास शबरीं धर्मचारिणीम् ५६
श्रमणां धर्मनिपुणामभिगच्छेति राघव ।
सोऽभ्यगच्छन् महातेजाः शबरीं शत्रुसूदनः ५७
शबर्या पूजितः सम्यग्रामो दशरथात्मजः ।
पम्पातीरे हनुमता संगतो वानरेण ह ५८
हनुमद्वचनाच्चैव सुग्रीवेण समागतः ।
सुग्रीवाय च तत् सर्वं शंसद्रामो महाबलः ५९
आदितस्तद्यथावृत्तं सीतायाश्च विशेषतः ।

---

मरणोन्मुख होऊन पडलेल्या गृध्र जटायूला अवलोकन करून आणि सीता हरण करून नेल्याचें त्याच्या मुखांतून श्रवण करून रघुवंशज राम शोकानें संतप्त झाला आणि अंतःकरण शोकाकुल झाल्यामुळे विलाप करूं लागला. तदनंतर, त्या शोकानें व्याप्त असतांनाच जटायु गृध्राचें त्यानें दहन केलें. ( ५०–५४ )

आणि वनामध्यें सीतेला तो शोधूं लागला; तों शरिरानें विद्रूप आणि दिसण्यांतही भयंकर असा कबंधनामक राक्षस त्याचे दृष्टीस पडला. पुढे महापराक्रमी रामानें कबंधाचा वध केल्यावर तो स्वर्गास गेला व जातां जातां, " हे राघवा ! धर्मानें वागणाऱ्या आणि धर्मज्ञ अशा शबरीनामक तापसीची तूं भेट घे " असें त्यानें त्याला सांगितलें. तेव्हा तो महातेजस्वी शत्रुनाशक राम शबरीची भेट घेण्याकरिता गेला. ( ५५–५७ )

पुढे शबरीनें उत्तम प्रकारें पूजन केल्यानंतर तो दशरथपुत्र राम पंपासरोवराचे तीरीं गेला असतां हनुमान् वानराची व त्याची भेट झाली आणि ( नंतर कबंधाप्रमाणे ) हनुमानानेही सांगितल्यावरून सुग्रीवाची भेट घेतल्यावर बलाढ्य रामानें त्या सुग्रीवाला तें सर्व कांही कथन केलें. सारांश, जन्मापासून जसें घडलें होतें,

सुग्रीवश्चापि तत् सर्वं श्रुत्वा रामस्य वानरः ६०
चकार सख्यं रामेण प्रीतश्चैवाग्निसाक्षिकम् ।
ततो वानरराजेन वैरानुकथनं प्रति ६१
रामायावेदितं सर्वं प्रणयाद् दुःखितेन च ।
प्रतिज्ञातं च रामेण तदा वालिवधं प्रति ६२
वालिनश्च बलं तत्र कथयामास वानरः ।
सुग्रीवः शङ्कितश्चासीन्नित्यं वीर्येण राघवे ६३
राघवप्रत्ययार्थं तु दुन्दुभेः कायमुत्तमम् ।
दर्शयामास सुग्रीवो महापर्वतसंनिभम् ६४
उत्स्मयित्वा महाबाहुः प्रेक्ष्य चास्थि महाबलः ।
पादाङ्गुष्ठेन चिक्षेप संपूर्णं दशयोजनम् ६५
बिभेद च पुनः शालान् सप्तैकेन महेषुणा ।
गिरिं रसातलं चैव जनयन् प्रत्ययं तदा ६६

तसें वर्तमान आणि विशेषतः सीतेसंबंधानें जें वर्तमान घडलें होतें, तें सर्व रामानें सुग्रीवाला सांगितलें. तेव्हा रामाचा तो सर्व वृत्तांत श्रवण करून सुग्रीव वानर प्रसन्न झाला व त्यानें प्रत्यक्ष अग्नीलाच साक्षी ठेवून रामाशीं सख्य केलें; तदनंतर ( वालीशीं पडलेल्या ) वैरासंबंधानें प्रश्नाचें सर्व उत्तर त्या दुःखित सुग्रीवानें रामाला मन मोकळें करून सांगितलें असतां, त्याच वेळीं रामानें वालीचा वध करण्याविषयी प्रतिज्ञा केली. तेव्हा त्या ( ऋष्यमूकपर्वताचे ) ठिकाणीं वालीचें बल किती, हें सुग्रीवानें रामाला सांगितलें. रघुवंशज रामाचे ठिकाणीं वालीसारखें वीर्य आहे किंवा नाही, ह्याविषयी सुग्रीवाला नेहमी शंका येत असल्यामुळे रामा-( च्या बला ) ची प्रतीति पाहण्याकरिता मोठ्या पर्वतासमान असलेलें दुंदुभीनामक दैत्याचें ( वालीनें फेकून दिलेलें ) प्रचंड शरीर त्यानें रामाला दाखविलें. तेव्हा महापराक्रमी व महाबलाढ्य रामानें तो अस्थिपंजर अवलोकन करून हास्यपूर्वक पादांगुष्ठानेंच पक्कीं दहा योजनें (म्हणजे २५ कोसपर्यंत) उडवून दिला. (५८-६५)

पुनरपि स्वबलाविषयी सुग्रीवाचा विश्वास बसण्याकरिता रामानें एकच मोठा बाण सोडला व त्याच्या योगानें सात तालवृक्ष, त्यांच्या समीप असलेला

ततः प्रीतमनास्तेन विश्वस्तः स महाकपिः ।
किष्किन्धां रामसहितो जगाम च गुहां तदा ६७
ततोऽगर्जद्धरिवरः सुग्रीवो हेमपिङ्गलः ।
तेन नादेन महता निर्जगाम हरीश्वरः ६८
अनुमान्य तदा तारां सुग्रीवेण समागतः ।
निजघान च तत्रैनं शरेणैकेन राघवः ६९
ततः सुग्रीववचनाद्धत्वा वालिनमाहवे ।
सुग्रीवमेव तद्राज्ये राघवः प्रत्यपादयत् ७०
स च सर्वान् समानीय वानरान् वानरर्षभः ।
दिशः प्रस्थापयामास दिदृक्षुर्जनकात्मजाम् ७१
ततो गृध्रस्य वचनात् संपातेर्हनुमान् बली ।
शतयोजनविस्तीर्णं पुप्लुवे लवणार्णवम् ७२
तत्र लङ्कां समासाद्य पुरीं रावणपालिताम् ।

---

एक पर्वत आणि ( भूलोकाखाली असलेल्या सप्त पाताललोकांपैकी वरच्या पांचांसहवर्तमान सहावें ) रसातल भेदून दाखविलें. नंतर त्या कृत्यामुळे त्या महावानराला त्याच्या बलाविषयी विश्वास आला व तो रामासहवर्तमान किष्किंधानगरीस व नंतर ( त्या नगरीसमीप असलेल्या ) गुहेमध्ये गेला. ( ६६–६७ )

किष्किंधानगरीला गेल्यावर सुवर्णाप्रमाणे पिंगट वर्णाने युक्त असलेल्या त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाने गर्जना केली; तेव्हा तो महा ध्वनि श्रवण करून वानरराज वाली बाहेर निघाला आणि निघतांना तारेची समजूत घालून ( मूकानुमति मिळवून ) सुग्रीवाशीं येऊन भिडला. तेव्हा युद्धामध्ये त्या वालीचा वध रामाने एका बाणाने केला. सारांश, किष्किंधानगरीला गेल्यानंतर सुग्रीवाच्या सांगण्यावरून युद्धामध्ये रामाने वालीचा वध केला आणि वालीच्या राज्यावर त्याने सुग्रीवाचीच स्थापना केली. तेव्हा त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाने सर्व वानर एकत्र जमविले आणि जनकात्मजा सीतेचा शोध लावण्याकरिता त्यांना सर्व दिशांस पाठविलें. ( ६८–७१ )

तेव्हा ( त्या लंकेमध्ये सीता दीन होऊन वास्तव्य करीत आहे, असें ) संपाति नामक गृध्रपक्ष्याने सांगितल्यावरून बलाढ्य हनुमानाने शंभर योजनें विस्तीर्ण

दद‍र्श सीतां ध्यायन्तीमशोकवनिकां गताम् ७३
निवेदयित्वाभिज्ञानं प्रवृत्तिं विनिवेद्य च ।
समाश्वास्य च वैदेहीं मर्दयामास तोरणम् ७४
पञ्च सेनाग्रगान् हत्वा सप्त मन्त्रिसुतानपि ।
शूरमक्षं च निष्पिष्य ग्रहणं समुपागमत् ७५
अस्त्रेणोन्मुक्तमात्मानं ज्ञात्वा पैतामहाद्वरात् ।
मर्षयन् राक्षसान् वीरो यन्त्रिणस्तान् यदृच्छया ७६
ततो दग्ध्वा पुरीं लङ्कामृते सीतां च मैथिलीम् ।
रामाय प्रियमाख्यातुं पुनरायान्महाकपिः ७७
सोऽभिगम्य महात्मानं कृत्वा रामं प्रदक्षिणम् ।
न्यवेदयदमेयात्मा दृष्टा सीतेति तत्त्वतः ७८
ततः सुग्रीवसहितो गत्वा तीरं महोदधेः ।

---

असलेल्या क्षारसमुद्राचें उल्लंघन केलें आणि रावणाने रक्षण केलेल्या लंकानगरीला गेल्यानंतर अशोकवनामध्ये रामाचें ध्यान करीत बसलेली सीता त्या ठिकाणीं त्याने अवलोकन केली. नंतर रामाने दिलेली खूण सीतेला देऊन, सुग्रीवाशीं रामाचें सख्य झाल्याचें वगैरे वर्तमान तिला कळवून आणि तिला धीर देऊन हनुमानाने तेथील वेशीचा नाश केला आणि पांच सेनापति व सात मंत्रिपुत्र ह्यांचा वध करून व त्याचप्रमाणे अक्षनामक शूर रावणपुत्राचा चेंदामेंदा करून हनुमान् आपण होऊन इंद्रजिताने टाकलेल्या ब्रह्मास्त्ररूप पाशाचे आधीन झाला. ब्रह्मदेवाच्या वराने अस्त्रापासून आपली सुटका झाल्याचें जाणूनहि ( ती गोष्ट आपणांस बंधन करून नेत असलेल्या राक्षसांच्या दृष्टोत्पत्तीस न येऊं देतां, राक्षसांकडून अनेक प्रकारें होत असलेला उपमर्द सहन करीत, तो वीर हनुमान् कांहीं दुसऱ्याच कार्याच्या उद्देशाने त्या राक्षसांबरोबर रावणासमीप गेला. ) ( ७२–७६ )

तदनंतर मिथिलाधिपति जनक राजाची कन्या सीता ज्या ठिकाणीं बसली होती, तें ठिकाण वर्ज करून रावणाची लंका नगरी दग्ध केल्यावर रामाला प्रिय वर्तमान कथन करण्याकरिता पुनरपि तो महाकपि हनुमान् रामासमीप गेला आणि महात्म्या रामासमीप गेल्यावर त्यास उजवें घेऊन महात्म्या हनुमानाने, “ सीता

समुद्रं क्षोभयामास शरैरादित्यसंनिभैः ७९
दर्शयामास चात्मानं समुद्रः सरितां पतिः ।
समुद्रवचनाच्चैव नलं सेतुमकारयत् ८०
तेन गत्वा पुरीं लङ्कां हत्वा रावणमाहवे ।
रामः सीतामनुप्राप्य परां व्रीडामुपागमत् ८१
तामुवाच ततो रामः परुषं जनसंसदि ।
अमृष्यमाणा सा सीता विवेश ज्वलनं सती ८२
ततोऽग्निवचनात् सीतां ज्ञात्वा विगतकल्मषाम् ।
कर्मणा तेन महता त्रैलोक्यं सचराचरम् ८३
सदेवर्षिगणं तुष्टं राघवस्य महात्मनः ।
बभौ रामः संप्रहृष्टः पूजितः सर्वदैवतैः ८४
अभिषिच्य च लङ्कायां राक्षसेन्द्रं विभीषणम् ।
कृतकृत्यस्तदा रामो विज्वरः प्रमुमोद ह ८५

भेटली " एवढेंच सार रामाला निवेदन केलें. असो. पुढे सुग्रीवासहवर्तमान महासागराचे तीरीं गेल्यावर सूर्यासारख्या तेजस्वी बाणांनी रामाने समुद्र क्षुब्ध करून टाकला. तेंव्हा नद्यांच्या अधिपति समुद्राने रामाला दर्शन दिलें. तेंव्हा त्या समुद्राच्या सांगण्यावरूनच रामाने नलाकडून सेतु बांधविला आणि त्या सेतूने लंकानगरीला जाऊन व त्या ठिकाणीं युद्धामध्ये रावणाचा वध करून रामाने सीता प्राप्त करून घेतली. परंतु ( राक्षसाच्या घरीं पुष्कळच दिवस राहिलेल्या सीतेचा पुनरपि रामाने स्वीकार केला, असा लोकापवाद आपणांवर येण्याचा संभव आहे, असें मनांत आल्याकारणाने ) तो अतिशय लज्जित झाला. ( ७७–८१ )

नंतर जनसमुदायामध्ये सीतेला उद्देशून रामाने फार कठोर भाषण केलें. तें सहन न झाल्यामुळे साध्वी सीता अग्नीमध्ये प्रविष्ट झाली. तदनंतर सीता निष्कलंक आहे, असें अग्नीच्या वचनावरून समजून आल्यावर रामाने तिचा स्वीकार केला. त्या महत् कृत्याच्या योगाने देवगण, ऋषिसमुदाय आणि चराचर प्राणी ह्यांसहवर्तमान सर्व त्रैलोक्य महात्म्या रघुवंशज रामावर संतुष्ट झाले आणि संतोष दाखविण्यानेच सर्व देवतांनी मान दिलेला तो राम आनंदित झाला. नंतर लंके-

देवताभ्यो वरं प्राप्य समुत्थाप्य च वानरान् ।
अयोध्यां प्रस्थितो रामः पुष्पकेण सुहृद्वृतः ८६
भरद्वाजाश्रमं गत्वा रामः सत्यपराक्रमः ।
भरतस्यान्तिके रामो हनूमन्तं व्यसर्जयत् ८७
पुनराख्यायिकां जल्पन् सुग्रीवसहितस्तदा ।
पुष्पकं तत् समारुह्य नन्दिग्रामं ययौ तदा ८८
नन्दिग्रामे जटां हित्वा भ्रातृभिः सहितोऽनघः ।
रामः सीतामनुप्राप्य राज्यं पुनरवाप्तवान् ८९
प्रहृष्टमुदितो लोकस्तुष्टः पुष्टः सुधार्मिकः ।
निरामयो ह्यरोगश्च दुर्भिक्षभयवर्जितः ९०
न पुत्रमरणं केचिद् द्रक्ष्यन्ति पुरुषाः क्वचित् ।
नार्यश्चाविधवा नित्यं भविष्यन्ति पतिव्रताः ९१
न चाग्निजं भयं किंचिन्नाप्सु मज्जन्ति जन्तवः ।

---

मध्ये राक्षसाधिपति बिभीषणाला अभिषेक करून, राम कृतकृत्य झाला आणि निश्चिंत झाल्यामुळे आनंदित होऊं लागला. ( ८२-८५ )

( युद्धांत पडलेले वानर झोपेंतून उठल्याप्रमाणे जिवंत होऊन उठोत, असा ) वर देवतांपासून प्राप्त झाल्यानंतर वानरांना उठवून सुहृज्जनांनी परिवेष्टित असलेला राम पुष्पक विमानामध्ये बसून अयोध्यानगरीकडे निघाला आणि भरद्वाजमुनींच्या आश्रमाला गेल्यानंतर अमोघपराक्रमी रामाने भरताकडे हनुमानाला पुढे पाठविलें. नंतर सुग्रीवादिकांसहवर्तमान पुनरपि पूर्व वृत्तांतासंबंधाने भाषण करणारा तो राम त्याच पुष्पक विमानामध्ये आरूढ होऊन नंदिग्रामीं गेला आणि त्याने नंदिग्रामामध्ये जटा काढून टाकल्या. नंतर भ्रात्यांसहवर्तमान त्या रामाला पुनरपि सीता व राज्य यांची प्राप्ति झाली. ( ८६-८९ )

राम राज्य करीत असतांना लोक हर्ष व आनंद ह्यांनी युक्त, संतुष्ट, पुष्ट, मानसिक दुःख व शारीरिक व्याधि ह्यांपासून अलिप्त, दुर्भिक्षभयरहित आणि अत्यंत धर्मनिष्ठ असे होतील; पुरुषांना कोठेही पुत्रमरण पाहण्याची पाळी येणार नाही; स्त्रिया नेहमी पतिव्रता व वैधव्यरहित होतील; अग्नीपासून यत्किंचितही

न वातजं भयं किंचिन्नापि ज्वरकृतं तथा १२
न चापि क्षुद्भयं तत्र न तस्करभयं तथा ।
नगराणि च राष्ट्राणि धनधान्ययुतानि च १३
नित्यं प्रमुदिताः सर्वे यथा कृतयुगे तथा ।
अश्वमेधशतैरिष्ट्वा तथा बहुसुवर्णकैः १४
गवां कोट्ययुतं दत्त्वा विद्वद्भ्यो विधिपूर्वकम् ।
असङ्ख्येयं धनं दत्त्वा ब्राह्मणेभ्यो महायशाः १५
राजवंशाञ्छतगुणान् स्थापयिष्यति राघवः ।
चातुर्वर्ण्यं च लोकेऽस्मिन् स्वे स्वे धर्मे नियोक्ष्यति १६
दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च ।
रामो राज्यमुपासित्वा ब्रह्मलोकं प्रयास्यति १७
इदं पवित्रं पापघ्नं पुण्यं वेदैश्च संमितम् ।
यः पठेद्रामचरितं सर्वपापैः प्रमुच्यते १८
एतदाख्यानमायुष्यं पठन् रामायणं नरः ।

---

भय उत्पन्न होणार नाही; उदकामध्ये बुडून प्राणी मरणार नाहींत; झंझावाताचें भय होणार नाही; तसेंच वात, ज्वर, क्षुधा आणि चोर ह्यांपासून भय उत्पन्न होणार नाही; नगरें व राष्ट्रें धनधान्यांनी संपन्न होतील. ( ९०–९३ )

कृतयुगाप्रमाणे सर्व लोक नित्य आनंदित राहतील; विपुल सुवर्णरूप दक्षिणांनी युक्त असे शेकडो अश्वमेध करून, विद्वान् ब्राह्मणांना विधिपूर्वक एक निखर्व गाई दान देऊन आणि इतरही असंख्य धन ब्राह्मणांना अर्पण करून महायशस्वी रघुवंशज राम अनेक गुणांची वृद्धि होईल, अशा रीतीने राजवंशाची स्थापना करील; ह्या भूलोकांतील चारी वर्णांना आपआपल्या धर्माचे ठिकाणीं नियुक्त करील आणि अकरा हजार वर्षे राज्य करून तो राम ब्रह्मलोकाप्रत गमन करील. ( ९४—९७ )

### रामायण-पठणाचें फल.

पवित्र, पापनाशक, पुण्यकारक आणि म्हणूनच वेदतुल्य असलेलें हें रामचारित्र जो पठण करितो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. सारांश, आयुर्वर्धक असलेलें

सपुत्रपौत्रः सगणः प्रेत्य स्वर्गे महीयते ९९
पठन् द्विजो वागृषभत्वमीयात् स्यात् क्षत्रियो भूमिपतित्वमीयात् ।
वणिग्जनः पण्यफलत्वमीयाज्जनश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात् १००

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥

द्वितीयः सर्गः ।

नारदस्य तु तद्वाक्यं श्रुत्वा वाक्यविशारदः ।
पूजयामास धर्मात्मा सहशिष्यो महामुनिम् १
यथावत् पूजितस्तेन देवर्षिर्नारदस्तथा ।
आपृच्छ्यैवाभ्यनुज्ञातः स जगाम विहायसम् २
स मुहूर्तं गते तस्मिन् देवलोकं मुनिस्तदा ।
जगाम तमसातीरं जाह्नव्यास्त्वविदूरतः ३
स तु तीरं समासाद्य तमसाया मुनिस्तदा ।
शिष्यमाह स्थितं पार्श्वे दृष्ट्वा तीर्थमकर्दमम् ४

हें रामायणरूप आख्यान पठण करणारा पुरुष अनेक पुत्रपौत्र व गणगोत यांसह युक्त होऊन मेल्यानंतर स्वर्गामध्यें महत्त्वाचें स्थान प्राप्त करून आनंदांत राहतो. ब्राह्मण जर हें रामायण पठण करील, तर तो शब्दब्रह्मामध्ये निष्णात होईल; क्षत्रिय पठण करील तर त्याला पृथ्वीचें आधिपत्य प्राप्त होईल; वैश्य पठण करील, तर त्याला व्यापारामध्ये मोठा लाभ होईल आणि श्रवण करणारे शूद्रप्रभृति लोकही महत्त्वास चढतील. (९७-१००) याप्रमाणे महर्षि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

नारदमुनींचें तें भाषण श्रवण करून, संभाषणामध्ये निष्णात व शिष्यगणांसह-वर्तमान असलेल्या धर्मात्म्या वाल्मीकिमुनींनी महामुनि नारदांचें पूजन केलें आणि त्या वाल्मीकिमुनींनी यथाविधि पूजन केल्यानंतर देवर्षि नारदमुनींनी त्यांना निरोप मागितला व जाण्याला आज्ञा मिळाल्यावर ते नारदमुनि आकाश-मार्गानें चालते झाले. ते नारदमुनि देवलोकीं गेल्यानंतर क्षणभर आश्रमामध्यें बसून वाल्मीकि महामुनि जान्हवीचे समीप असलेल्या तमसानदीच्या तीरीं गेले आणि त्या नदीच्या तीरीं गेल्यानंतर तें निर्मल तीर्थ अवलोकन करून समीप

अकर्दममिदं तीर्थं भरद्वाज निशामय ।
रमणीयं प्रसन्नाम्बु सन्मनुष्यमनो यथा ५
न्यस्यतां कलशस्तात दीयतां वल्कलं मम ।
इदमेवावगाहिष्ये तमसातीर्थमुत्तमम् ६
एवमुक्तो भरद्वाजो वाल्मीकेन महात्मना ।
प्रायच्छत मुनेस्तस्य वल्कलं नियतो गुरोः ७
स शिष्यहस्तादादाय वल्कलं नियतेन्द्रियः ।
विचचार ह पश्यंस्तत्सर्वतो विपुलं वनम् ८
तस्याभ्याशे तु मिथुनं चरन्तमनपायिनम् ।
ददर्श भगवांस्तत्र क्रौञ्चयोश्चारुनिःस्वनम् ९
तस्मात्तु मिथुनादेकं पुमांसं पापनिश्चयः ।
जघान वैरनिलयो निषादस्तस्य पश्यतः १०
तं शोणितपरीताङ्गं चेष्टमानं महीतले ।

असलेल्या शिष्याला म्हणाले, " हे भरद्वाजा, कर्दमरहित असलेलें हें तीर्थ अवलोकन कर. अरे, सज्जनांच्या मनाप्रमाणे यांतील उदक स्वच्छ असल्यामुळे हें रमणीय आहे. यास्तव बा भरद्वाजा, कलश खाली ठेवून परिधान करण्याकरिता मला वल्कल दे. ( मध्यान्हकालाचें अतिक्रमण होत असल्यामुळे गंगातीरीं न जातां ) आता या उत्कृष्ट तमसा-तीर्थामध्येच मी स्नान करितों. ( ३--६ )

याप्रमाणे महात्म्या वाल्मीकिमुनींनी भरद्वाजाला सांगितलें असतां सेवेविषयी तत्पर असलेल्या त्या शिष्यानें आपल्या त्या गुरुस्वरूप वाल्मीकिमुनींना वल्कल दिलें. तेव्हा शिष्याच्या हातांतून वल्कल घेऊन, ते जितेंद्रिय वाल्मीकि स्नान-संध्येला योग्य असा प्रदेश पाहण्याकरिता सर्व बाजूंनी प्रचंड वन अवलोकन करीत करीत चालले असतां त्या वनासमीप आधिव्याधिरहित आणि म्हणूनच मधुर स्वरानें युक्त असें एक क्रौंचपक्ष्यांचें जोडपें संचार करीत असतां त्या भगवान् वाल्मीकिमुनींच्या दृष्टीस पडलें. तेव्हा ते मुनि अवलोकन करीत असतांनाही त्यांची परवा न करितां पापबुद्धि आणि म्हणूनच निष्कारण वैराचा आश्रय करणाऱ्या निषादानें त्या जोडप्यांपैकी एक जो नर होता, त्याचा वेध केला. ( ७--१० )

भार्या तु निहतं दृष्ट्वा रुराव करुणां गिरम् ११
वियुक्ता पतिना तेन द्विजेन सहचारिणा ।
ताम्रशीर्षेण मत्तेन पत्रिणा सहितेन वै १२
तथाविधं द्विजं दृष्ट्वा निषादेन निपातितम् ।
ऋषेर्धर्मात्मनस्तस्य कारुण्यं समपद्यत १३
ततः करुणवेदित्वादधर्मोऽयमिति द्विजः ।
निशाम्य रुदतीं क्रौञ्चीमिदं वचनमब्रवीत् १४
मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।
यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् १५
तस्येत्थं ब्रुवतश्चिन्ता बभूव हृदि वीक्षतः ।
शोकार्तेनास्य शकुनेः किमिदं व्याहृतं मया १६

इकडे निषादाने वेध केल्यामुळे सर्वांग रक्ताने भरून जाऊन भूतलावर तडफडत असलेल्या त्या आपल्या पतीला अवलोकन करून त्याची भार्या करुण स्वराने ओरडूं लागली; कारण, मस्तकीं आरक्तवर्ण तुऱ्याने युक्त, विषयोपभोगामध्ये गुंग झाल्यामुळे मत्त आणि म्हणूनच पसरलेल्या पंखांनी युक्त असा जो स्वतःशीं संगत झालेला व अहोरात्र आपल्याबरोबर असणारा आपला पति पक्षी, त्याचा तिला वियोग झालेला होता. असो. निषादाने पाडिलेला तो पक्षी तशा प्रकारें तडफडत असल्याचें अवलोकन करून त्या धर्मात्म्या वाल्मीकि ऋषींना करुणा आली आणि रोदन करीत असलेल्या क्रौंचपक्षिणीला अवलोकन करून, तिची दया आल्यामुळे "काममोहित झालेल्या पक्ष्याचा तूं वध करणें हा अधर्म आहे," असें समजून त्या द्विज वाल्मीकिमुनींनी हे "निषादा, ज्या अर्थी क्रौंचपक्ष्यांच्या जोडप्यापैकी काममोहित झालेल्या एका पक्ष्याचा तूं वध केला आहेस, त्या अर्थी तुझे पाय फारशीं वर्षे भुईला लागणार नाहीत." अशा आशयाचें "**मा निषाद, प्रतिष्ठां त्वमगमः०**" हें पद्य उच्चारिलें. ( ११–१५ )

अशीं अक्षरें तोंडाबाहेर निघालीं नाहीत, तोंच "ह्या पक्ष्याच्या शोकानें पीडित झाल्यामुळे मी हें काय भाषण केलें," म्हणून विचार करूं लागलेल्या त्या मुनींच्या अंतःकरणांत चिंता उत्पन्न झाली आणि ( तपश्चर्येचा विघात करणारा

*

चिन्तयन्स महाप्राज्ञश्चकार मतिमान्मतिम् ।
शिष्यं चैवाब्रवीद्वाक्यमिदं स मुनिपुङ्गवः १७
पादबद्धोऽक्षरसमस्तन्त्रीलयसमन्वितः ।
शोकार्तस्य प्रवृत्तो मे श्लोको भवतु नाऽन्यथा १८
शिष्यस्तु तस्य ब्रुवतो मुनेर्वाक्यमनुत्तमम् ।
प्रतिजग्राह संतुष्टस्तस्य तुष्टोऽभवन्मुनिः १९
सोऽभिषेकं ततः कृत्वा तीर्थे तस्मिन्यथाविधि ।
तमेवं चिन्तयन्नर्थमुपावर्तत वै मुनिः २०
भरद्वाजस्ततः शिष्यो विनीतः श्रुतवान् गुरोः ।
कलशं पूर्णमादाय पृष्ठतोऽनुजगाम ह २१
स प्रविश्याश्रमपदं शिष्येण सहधर्मवित् ।
उपविष्टः कथाश्चान्याश्चकार ध्यानमास्थितः २२
आजगाम ततो ब्रह्मा लोककर्ता स्वयंप्रभुः ।

---

शाप तोंडांतून गेला, हें आपल्या हातून चांगलें कृत्य झालें नाही, असें ) चिंतन करितां करितां त्या महाबुद्धिमान् व विचारी मुनिश्रेष्ठ वाल्मीकींच्या अंतःकरणामध्ये एक विचार आला आणि " चरणबद्ध, अक्षरांनी सम ( म्हणजे छंदःशास्त्रोक्त अक्षररचनादोषरहित ) आणि वीणा लावून वाद्यांसहवर्तमान गाण्यास योग्य असा जो श्लोक शोकाकुल झालेल्या माझ्या तोंडांतून (सहज ) बाहेर पडला, तो अकीर्तिरूप न होतां कीर्तिरूपच होवो," असें त्यांनी शिष्याला सांगितलें. तेव्हा संभाषण करणाऱ्या त्या मुनींच्या उत्कृष्ट वाक्याला शिष्याने मान डोलविली व तें पाहून वाल्मीकिमुनीही त्या शिष्यावर संतुष्ट झाले. ( १६–१९ )

असो. तदनंतर तमसा–तीर्थाचे ठिकाणीं यथाविधि स्नान करून त्याच गोष्टीचें चिंतन करीत करीत वाल्मीकीमुनि परत फिरले असतां विनयसंपन्न आणि बहुश्रुत असा तो भरद्वाज नामक शिष्यही भरलेला कलश घेऊन गुरूंच्या पाठोपाठ निघाला. परत फिरल्यावर ते धर्मवेत्ते वाल्मीकिमुनि शिष्यांसहवर्तमान आश्रमामध्ये प्रविष्ट झाले आणि आसनावर बसून मनामध्ये तो शापविषयक श्लोक घोळत असतांनाच दुसऱ्या गोष्टी ते सांगूं लागले. ( २०–२२ )

चतुर्मुखो महातेजा द्रष्टुं तं मुनिपुङ्गवम् २३
वाल्मीकिरथ तं दृष्ट्वा सहसोत्थाय वाग्यतः।
प्राञ्जलिः प्रयतो भूत्वा तस्थौ परमविस्मितः २४
पूजयामास तं देवं पाद्यार्घ्यासनवन्दनैः।
प्रणम्य विधिवच्चैनं पृष्ट्वा चैव निरामयम् २५
अथोपविश्य भगवानासने परमार्चिते।
वाल्मीकये च ऋषये संदिदेशासनं ततः।
ब्रह्मणा समनुज्ञातः सोऽप्युपाविशदासने २६
उपविष्टे तदा तस्मिन्साक्षाल्लोकपितामहे।
तद्गतेनैव मनसा वाल्मीकिर्ध्यानमास्थितः २७
पापात्मना कृतं कष्टं वैरग्रहणबुद्धिना।
यत्तादृशं चारुरवं क्रौञ्चं हन्यादकारणात् २८
शोचन्नेव पुनः क्रौञ्चीमुपश्लोकमिमं जगौ।

---

इतक्यांत स्वतःसिद्ध आणि म्हणूनच पृथिव्यादि लोक निर्माण करणारे महातेजस्वी चतुर्मुख ब्रह्मदेव त्या मुनिश्रेष्ठांना भेटण्याकरिता आले. तेव्हा त्यांना अवलोकन केल्याबरोबर मौन धारण करून वाल्मीकिमुनि एकाएकी आसनावरून उठले आणि हात जोडून, अत्यंत नम्र होऊन व पराकाष्ठेचे विस्मयचकित होऊन उभे राहिले. नंतर आरोग्यप्रश्नपूर्वक प्रणाम करून पाद्य, अर्घ्य, आसन आणि वंदन यांच्या योगाने वाल्मीकिमुनींनी त्या ब्रह्मदेवांचें पूजन केलें. तदनंतर अत्यंत सत्कारपूर्वक अर्पण केलेल्या आसनावर भगवान् ब्रह्मदेव बसले व बसल्यानंतर वाल्मीकिमुनींनाही त्यांनी आसनावर बसण्याला अनुज्ञा दिली व ह्याप्रमाणे ते प्रत्यक्ष लोकपितामह ब्रह्मदेव बसल्यानंतर ब्रह्मदेवांनी अनुज्ञा दिलेले वाल्मीकिमुनीही आसनावर बसले. तदनंतर त्या क्रौंचपक्ष्याकडेच मन लागलें असतांना वाल्मीकिमुनि चिंताक्रांत झाले. (२३-२७)

आणि वैरयुक्त बुद्धीने युक्त असलेल्या दुरात्म्या निषादाने—तशा प्रकारच्या मंजुळ स्वराने संपन्न असलेल्या क्रौंचपक्ष्याचा निष्कारण वध केला— हें वाईट केलें, म्हणून त्या अवशिष्ट राहिलेल्या क्रौंचपक्षिणीला उद्देशून शोक करितां करितां

पुनरन्तर्गतमना भूत्वा शोकपरायणः २९
तमुवाच ततो ब्रह्मा प्रहसन्मुनिपुङ्गवम् ।
श्लोक एवास्त्वयं बद्धो नात्र कार्या विचारणा ३०
मच्छन्दादेव ते ब्रह्मन्प्रवृत्तेयं सरस्वती ।
रामस्य चरितं कृत्स्नं कुरु त्वमृषिसत्तम ३१
धर्मात्मनो भगवतो लोके रामस्य धीमतः ।
वृत्तं कथय धीरस्य यथा ते नारदाच्छुतम् ३२
रहस्यं च प्रकाशं च यद्वृत्तं तस्य धीमतः ।
रामस्य सहसौमित्रे राक्षसानां च सर्वशः ३३
वैदेह्याश्चैव यद्वृत्तं प्रकाशं यदि वा रहः ।
तच्चाप्यविदितं सर्वं विदितं ते भविष्यति ३४
न ते वागनृता काव्ये काचिदत्र भविष्यति ।
कुरु रामकथां पुण्यां श्लोकबद्धां मनोरमाम् ३५
यावत्स्थास्यन्ति गिरयः सरितश्च महीतले ।

ब्रह्मदेवासमीपच (**मा निषाद०**)हा श्लोक त्यांनी उच्चारिला आणि पुनरपि श्लोकाच्या अर्थाकडेच लक्ष लावून, ते शोकाकुल होऊन बसले. तेव्हा त्या मुनिश्रेष्ठ वाल्मीकींना ब्रह्मदेव हंसत हंसत म्हणाले, " हा तूं प्रथित केलेला श्लोक यशोरूपच होईलः याविषयी संशय घेण्याचें प्रयोजन नाही; कारण, हे ब्रह्मन्, माझ्या इच्छेनेच तुझ्या ठिकाणीं ही सरस्वती प्रवृत्त झाली आहे. करिता हे ऋषिश्रेष्ठा, तूं रामाचें संपूर्ण चरित्र वर्णन कर; कारण, जगतामध्ये तोच मनोहर असून, विचारी, धर्मात्मा व भगवान् असा तोच आहे. यास्तव नारदापासून श्रवण केल्याप्रमाणे तूं त्या धीर वीर रामाचें वृत्त कथन कर. (२८–३२)

लक्ष्मणासहवर्तमान तो विचारी राम, सर्व राक्षस आणि विदेहदेशाधिपतीची कन्या सीता यांचें प्रसिद्ध अथवा अप्रसिद्ध असें जें कांही चरित्र होईल, तें इतरांना जरी विदित नसलें, तरी तुला विदित होईल. यासंबंधाने तुझी वाणी यत्किंचितही असत्य होणार नाही. तस्मात्, मनोहर व पुण्यदायक अशी श्लोकबद्ध रामकथा तूं वर्णन कर. जोंपर्यंत पर्वत व नद्या भूतलावर राहतील, तोंपर्यंत रामायणकथा

तावद्रामायणकथा लोकेषु प्रचरिष्यति ३६
यावद्रामस्य च कथा त्वत्कृता प्रचरिष्यति ।
तावदूर्ध्वमधश्च त्वं मल्लोकेषु निवत्स्यसि ३७
इत्युक्त्वा भगवान्ब्रह्मा तत्रैवान्तरधीयत ।
ततः सशिष्यो भगवान्मुनिर्विस्मयमाययौ ३८
तस्य शिष्यास्ततः सर्वे जगुः श्लोकमिमं पुनः ।
मुहुर्मुहुः प्रीयमाणाः प्राहुश्च भृशविस्मिताः ३९
समाक्षरैश्चतुर्भिर्यः पादैर्गीतो महर्षिणा ।
सोनुव्याहरणाद् भूयः शोकः श्लोकत्वमागतः ४०
तस्य बुद्धिरियं जाता महर्षेर्भावितात्मनः ।
कृत्स्नं रामायणं काव्यमीदृशैः करवाण्यहम् ४१
उदारवृत्तार्थपदैर्मनोरमैस्तदास्य रामस्य चकार कीर्तिमान् ।
समाक्षरैः श्लोकशतैर्यशस्विनो यशस्करं काव्यमुदारदर्शनः ४२

लोकांमध्ये प्रचारांत राहील आणि जोंपर्यंत तूं ग्रथित केलेली ही रामकथा लोकांमध्ये प्रचलित राहील, तोंपर्यंत तूंही मी निर्माण केलेल्या सर्व लोकांमध्ये ( तुझ्या इच्छेनुरूप ) खाली–वर सर्वत्र अप्रतिहत ( कोठेही अडथळा न होतां संचार करीत, माझ्यासह सत्य लोकांत वास करशील. (३३-३७)

यांप्रमाणे सांगून भगवान् ब्रह्मदेव तेथेच अंतर्धान पावले असतां शिष्यांसहवर्तमान भगवान् वाल्मीकिमुनींना आश्चर्य वाटलें. तदनंतर वारंवार आनंदित होत असलेल्या त्या मुनींच्या सर्व शिष्यांनी ( **मा निषाद०** ) हा श्लोक पुनरपि म्हटला आणि अत्यंत विस्मित होऊन, ते पुनःपुनः म्हणाले, “ सारख्या अक्षरांनी युक्त अशा चार चरणांमध्ये जो गाइला, तो अत्यंत शोकोत्पत्तीनंतर गाइल्यामुळे विपुल झालेला शोकच श्लोकत्व पावला आणि, ” अशा प्रकारच्या श्लोकांनी आपण संपूर्ण रामायण–काव्य ग्रथित करावें, ही त्या शुद्धांतःकरणाने युक्त असलेल्या महर्षीला इच्छा झाली आहे. ( ३८-४१ )

असो. ब्रह्मदेवाची आज्ञा झाल्यानंतर उदारचरितरूप अर्थाचीं बोधक पदें आणि सम अक्षरें ज्यांमध्ये आहेत, अशा शेकडो मनोहर श्लोकांच्या योगानें उदार-

तदुपगतसमाससंधियोगं सममधुरोपनतार्थवाक्यबद्धम् ।
रघुवरचरितं मुनिप्रणीतं दशशिरसश्च वधं निशामयध्वम् ४३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वितीयः सर्गः ॥२॥ [१४३]

तृतीयः सर्गः ।

श्रुत्वा वस्तु समग्रं तद्धर्मार्थसहितं हितम् ।
व्यक्तमन्वेषते भूयो यद्वृत्तं तस्य धीमतः १
उपस्पृश्योदकं सम्यङ्मुनिः स्थित्वा कृताञ्जलिः ।
प्राचीनाग्रेषु दर्भेषु धर्मेणान्वेषते गतिम् २
रामलक्ष्मणसीताभी राज्ञा दशरथेन च ।
सभार्येण सराष्ट्रेण यत्प्राप्तं तत्र तत्त्वतः ३
हसितं भाषितं चैव गतिर्यावच्च चेष्टितम् ।
तत्सर्वं धर्मवीर्येण यथावत्संप्रपश्यति ४

बुद्धि व कीर्तिमान् वाल्मीकिमुनींनी या यशस्वी रामाची कीर्ति वृद्धिंगत करणारें असें काव्य ग्रथित केलें आहे. करिता, समास व संधि यांची योजना ज्यामध्यें यथाशास्त्र केलेली आहे व न्यूनाधिक्यदोषरहित, माधुर्यगुणप्रधान आणि प्रसाद-गुणानें संपन्न अशा अर्थांचा बोध करणाऱ्या वाक्यांनी जें ग्रथित केलें आहे, असें वाल्मीकिमहर्षिप्रणित रघुकुलश्रेष्ठ रामचरितरूप व दशाननवधरूप काव्य तुम्ही श्रवण करा. ( ४२–४३ )

याप्रमाणे महर्षिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी दुसरा सर्ग समाप्त झाला. ॥ २ ॥

धर्म, अर्थ व काम यांनी युक्त व हितावह असें संपूर्ण चरित्र नारदांपासून वाल्मीकिमुनींनी श्रवण केलें आणि नंतर तें प्रसिद्ध करण्याकरिता ते मुनि उद्युक्त झाले. तदनंतर यथाविधि आचमन करून व हात जोडून वाल्मीकिमुनि पूर्वाग्र दर्भांवर बसले असतां योगधर्मामुळे श्रीरामचरित्राचें ज्ञान त्यांना होऊं लागलें. राम, लक्ष्मण, सीता, राजा दशरथ, त्याच्या भार्या आणि त्याच्या राष्ट्रांतील लोक यांच्यासंबंधाचें जें खरें वृत्त म्हणजे त्यांचें हास्य, भाषण, गमन व इतरही यच्चयावत् आचरण हें सर्व योगरूपधर्मबलानें अगदी यथावत् वाल्मीकिमुनींनी

स्त्रीतृतीयेन च तथा यत्प्राप्तं चरता वने ।
सत्यसंधेन रामेण तत्सर्वं चान्ववैक्षत ५
ततः पश्यति धर्मात्मा तत्सर्वं योगमास्थितः ।
पुरा यत्तत्र निर्वृत्तं पाणावामलकं यथा ६
तत्सर्वं तत्त्वतो दृष्ट्वा धर्मेण स महामतिः ।
अभिरामस्य रामस्य तत्सर्वं कर्तुमुद्यतः ७
कामार्थगुणसंयुक्तं धर्मार्थगुणविस्तरम् ।
समुद्रमिव रत्नाढ्यं सर्वश्रुतिमनोहरम् ८
स यथा कथितं पूर्वं नारदेन महात्मना ।
रघुवंशस्य चरितं चकार भगवान्मुनिः ९
जन्म रामस्य सुमहद्वीर्यं सर्वानुकूलताम् ।
लोकस्य प्रियतां क्षान्तिं सौम्यतां सत्यशीलताम् १०

अवलोकन केलें. त्याचप्रमाणे दुसरा लक्ष्मण व तिसरी सीता यांसहवर्तमान वनामध्ये संचार करीत असलेल्या सत्यवचनी रामाचें जें चरित्र तेंहीं सर्व वाल्मीकिमुनींच्या ध्यानांत आलें. ( १-५ )

त्यानन्तर जें कांहीं वर्तमान तेथे ( वनवासांत असतांना ) घडून आलें, तें सर्वयोगारूढ असलेला तो धर्मात्मा वाल्मीकिमुनि, करतलामलकवत् म्हणजे तळहातावर असलेल्या आवळ्याप्रमाणे, पूर्णपणें प्रत्यक्ष पाहता झाला. आणि सौंदर्यसंपन्न रामाचें तें सर्व चरित्र याप्रमाणे योगरूप धर्माच्या योगानें महामति वाल्मीकिमुनींनी यथार्थ अवलोकन केल्यावर कामरूप पुरुषार्थफलानें युक्त आणि धर्मार्थरूप पुरुषार्थफलानें विस्तृत ( म्हणजे धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाचें प्रतिपादक व प्रापक ), समुद्राप्रमाणे रत्नांनी भरलेलें व म्हणूनच कोणाच्याही कानाला मधुर लागणारें अशा प्रकारचें त्या सर्व चरित्रासंबंधानें एक काव्य करण्यास ते उद्युक्त झाले आणि महात्म्या नारदांनी पूर्वीं सांगितल्याप्रमाणे भगवान् वाल्मीकिमुनींनी रघुवंशामध्ये अवतीर्ण झालेल्या रामाचें चरित्र ग्रथित केलें. ( ६-९ )

सारांश, रामाची उत्पत्ति, प्रचंड पराक्रम, सर्वांशीं अनुकूल वर्तन, लोकप्रियता, सहनशीलता, सौम्यपणा, सत्यनिष्ठता, विश्वामित्रमुनींसहवर्तमान जातेवेळीं झालेल्या

नाना चित्राः कथाश्चान्या विश्वामित्रसहायने ।
जानक्याश्च विवाहं च धनुषश्च विभेदनम् ॥ ११
रामरामविवादं च गुणान् दाशरथेस्तथा ।
तथाभिषेकं रामस्य कैकेय्या दुष्टभावताम् ॥ १२
विघातं चाभिषेकस्य रामस्य च विवासनम् ।
राज्ञः शोकं विलापं च परलोकस्य चाश्रयम् ॥ १३
प्रकृतीनां विषादं च प्रकृतीनां विसर्जनम् ।
निषादाधिपसंवादं सूतोपावर्तनं तथा ॥ १४
गङ्गायाश्चापि संतारं भरद्वाजस्य दर्शनम् ।
भरद्वाजाभ्यनुज्ञानाच्चित्रकूटस्य दर्शनम् ॥ १५
वास्तुकर्मनिवेशं च भरतागमनं तथा ।
प्रसादनं च रामस्य पितुश्च सलिलक्रियाम् ॥ १६
पादुकाग्र्याभिषेकं च नन्दिग्रामनिवासनम् ।
दण्डकारण्यगमनं विराधस्य वधं तथा ॥ १७
दर्शनं शरभङ्गस्य सुतीक्ष्णेन समागमम् ।
अनसूयासमास्यां च अङ्गरागस्य चार्पणम् ॥ १८

---

आश्चर्यकारक गोष्टी व इतर कथा, जानकीचा विवाह, धनुर्भंग, रामपरशुराम-संवाद, दाशरथि रामाचे गुण, रामाभिषेक, कैकेयीचा दुष्टपणा, अभिषेक ह्मणून पाडणें, रामाला वनामध्यें पाठविणें, दशरथ राजाचा शोक व विलाप आणि त्यानें केलेला परलोकाचा आश्रय, प्रजाजनांना झालेलें दुःख, त्यांचें अयोध्येप्रत परतणें, गुहनामक निषादराजाशीं झालेला संवाद, सुमंत्रनामक सारथ्याला परत पाठविणें, गंगा तरून जाणें, भरद्वाजमुनींचें दर्शन, त्यांच्या सम्मतीनें चित्रकूटपर्वताचें दर्शन; ( १०–१५ )

त्या पर्वतावर गृह निर्माण करून राहणें, भरताचें आगमन, भरताचें रामाला प्रसन्न करून घेणें, पित्या दशरथाची उदकक्रिया, रामाच्या श्रेष्ठ पादुकांना भरतानें केलेला राज्याभिषेक; नंदिग्रामामध्यें वास्तव्य, दंडकारण्यामध्यें रामाचें गमन, विराधराक्षसाचा वध, शरभंगदर्शन, सुतीक्ष्णाशीं समागम, अनुसूयेचें सीतेला उटणें

दर्शनं चाप्यगस्त्यस्य धनुषो ग्रहणं तथा ।
शूर्पणख्याश्च संवादं विरूपकरणं तथा १९
वधं खरत्रिशिरसोरुत्थानं रावणस्य च ।
मारीचस्य वधं चैव वैदेह्या हरणं तथा २०
राघवस्य विलापं च गृध्रराजनिबर्हणम् ।
कबन्धदर्शनं चैव पम्पायाश्चापि दर्शनम् २१
शबरीदर्शनं चैव फलमूलाशनं तथा ।
प्रलापं चैव पम्पायां हनुमद्दर्शनं तथा २२
ऋष्यमूकस्य गमनं सुग्रीवेण समागमम् ।
प्रत्ययोत्पादनं सख्यं वालिसुग्रीवविग्रहम् २३
वालिप्रमथनं चैव सुग्रीवप्रतिपादनम् ।
ताराविलापं समयं वर्षरात्रनिवासनम् २४
कोपं राघवसिंहस्य बलानामुपसंग्रहम् ।
दिशः प्रस्थापनं चैव पृथिव्याश्च निवेदनम् २५
अङ्गुलीयकदानं च ऋक्षस्य बिलदर्शनम् ।

---

देणें, अगस्त्यमुनींचें दर्शन, त्यांच्यापासून धनुष्याची प्राप्ति, शूर्पणखेशीं संवाद व तिला विद्रूप करणें, खर आणि त्रिशिरस् यांचा वध, रावणाचें उत्थान, मारीच राक्षसाचा वध, सीताहरण. ( १६-२० )

रामविलाप, गृध्रराज जटायूचा वध, कबंधदर्शन, पंपासरोवराचें दर्शन, शबरीची भेट, तेथे फलमूलभक्षण, पंपासरोवरावर शोक, हनुमानाची भेट, ऋष्यमूक-पर्वताप्रत गमन, सुग्रीवाची भेट, स्वसामर्थ्याविषयी रामाचें सुग्रीवाचे ठिकाणीं विश्वास उत्पन्न करणें, त्याच्याशीं सख्य, वालि आणि सुग्रीव यांचें युद्ध, वालीचा वध, सुग्रीवाला राज्यावर बसविणें, तारेचा विलाप, पर्जन्यकाल संपेपर्यंत मी या प्रस्रवण पर्वतावर वास्तव्य करीन, म्हणून रामानें सुग्रीवाशीं केलेला संकेत व त्याप्रमाणे पर्जन्यकाल संपेपर्यंत त्याचें प्रस्रवण पर्वतावर वास्तव्य, रघुवंशजश्रेष्ठ रामाचा कोप, सेनासंग्रह, वानरांना चोहोकडे पाठविणें व त्यांना पृथ्वीवरील स्थलें सांगणें. ( २१-२५ )

प्रायोपवेशनं चैव संपातेश्चापि दर्शनम् २६
पर्वतारोहणं चैव सागरस्यापि लङ्घनम् ।
समुद्रवचनाच्चैव मैनाकस्य च दर्शनम् २७
राक्षसीतर्जनं चैव च्छायाग्राहस्य दर्शनम् ।
सिंहिकायाश्च निधनं लङ्कामलयदर्शनम् २८
रात्रौ लङ्काप्रवेशं च एकस्यापि विचिन्तनम् ।
आपानभूमिगमनमवरोधस्य दर्शनम् २९
दर्शनं रावणस्यापि पुष्पकस्य च दर्शनम् ।
अशोकवनिकायानं सीतायाश्चापि दर्शनम् ३०
अभिज्ञानप्रदानं च सीतायाश्चापि भाषणम् ।
राक्षसीतर्जनं चैव त्रिजटास्वप्नदर्शनम् ३१
मणिप्रदानं सीताया वृक्षभङ्गं तथैव च ।
राक्षसीविद्रवं चैव किंकराणां निबर्हणम् ३२
ग्रहणं वायुसूनोश्च लङ्कादाहाभिगर्जनम् ।
प्रतिप्लवनमेवाथ मधूनां हरणं तथा ३३

रामाचें हनुमानाला अंगठी देणें, ऋक्षबिलदर्शन, वानराचें प्रायोपवेशन ( म्हणजे कांहीएक न खातां समुद्रासमीप वास्तव्य ), संपातीची भेट, हनुमानाचें महेंद्र-पर्वतावर आरोहण, समुद्राचें उल्लंघन, समुद्राच्या सांगण्यावरून मैनाक पर्वताचें दर्शन, सुरसानामक नागमातेनें राक्षसीचें रूप धारण करून हनुमानाला दाखविलेली भीति, छायेनें आकर्षण करण्यास प्रवृत्त झालेल्या सिंहिका राक्षसीचें हनुमानाला झालेलें दर्शन, त्याच्याकडून तिला आलेलें मरण, लंका आणि मलय पर्वत यांचें हनुमानाला झालेलें दर्शन, रात्रीं लंकेमध्ये त्याचा प्रवेश, एकटा असतांना त्याचा आपल्याशींच चाललेला विचार, पानभूमीप्रत गमन, अंतःपुरदर्शन, रावणदर्शन पुष्पकविमानदर्शन, अशोकवनामध्यें गमन, त्या ठिकाणीं सीतेचें दर्शन.(२५--३०)

रामानें दिलेली खूण सीतेला देणें, तिच्याशीं संभाषण, राक्षसींनी सीतेला दाखविलेलें भय, त्रिजटानामक राक्षसीला पडलेलें स्वप्न, खुणेकरिता हनुमानापाशी सीतेनें केलेलें रत्नप्रदान, वृक्षभंग, राक्षसींची धावाधाव. रावणसेवकांचा वध,

राघवाश्वासनं चैव मणिनिर्यातनं तथा ।
संगमं च समुद्रेण नलसेतोश्च बन्धनम् ३४
प्रतारं च समुद्रस्य रात्रौ लङ्कावरोधनम् ।
बिभीषणेन संसर्गं वधोपायनिवेदनम् ३५
कुम्भकर्णस्य निधनं मेघनादनिबर्हणम् ।
रावणस्य विनाशं च सीतावाप्तिमरेः पुरे ३६
बिभीषणाभिषेकं च पुष्पकस्य च दर्शनम् ।
अयोध्यायाश्च गमनं भरद्वाजसमागमम् ३७
प्रेषणं वायुपुत्रस्य भरतेन समागमम् ३८
रामाभिषेकाभ्युदयं सर्वसैन्यविसर्जनम् ।
स्वराष्ट्ररञ्जनं चैव वैदेह्याश्च विसर्जनम् ३९
अनागतं च यत्किंचिद्रामस्य वसुधातले ।
तच्चकारोत्तरे काव्ये वाल्मीकिर्भगवानृषिः ४०

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे तृतीयः सर्गः ॥३॥ [१८३]

---

रावणसेवकांचें मारुतीला धरणें, लंका–दहन झाल्यामुळे तेथील रहिवाशांची रडारड, पुनरपि समुद्रोल्लंघन, मधुहरण, रामाला आसन, सीतेने दिलेलें रत्न रामाला अर्पण करणें, समुद्राशीं समागम, नलकृत सेतुबंधन, सेनेचें समुद्र तरून जाणें, रात्रीं लंकेला वेढा देणें, बिभीषणाची भेट, वधोपायकथन. ( ३१–३५ )

कुंभकर्णाचें मरण, मेघनादाचा वध, रावणाचा वध, रावणरूप शत्रूच्या नगरामध्ये सीतेची प्राप्ति, बिभीषणाचा राज्याभिषेक, पुष्पकविमानदर्शन, अयोध्येकडे गमन, भरद्वाज मुनींचा समागम, मारुतीला पुढे पाठविणें, भरतभेट, रामाभिषेकोत्सव, सर्व सैन्याला जाण्याची अनुज्ञा देणें, स्वराष्ट्राला आनंदित करणें व सीतेचा त्याग करणें, हें आणि याशिवाय भूतलावर जें कांही रामचरित्र व्हावयाचें होतें, तें सर्व भगवान् वाल्मीकि मुनींनी सर्वांहून विशिष्ट असें जें उत्तरकांड त्यांत ग्रथित केलें. ( ३६–४० )

याप्रमाणे वाल्मीकीय रामायणाच्या बालकांडापैकी तिसरा सर्ग समाप्त झाला. ॥३॥

चतुर्थः सर्गः ।

प्राप्तराज्यस्य रामस्य वाल्मीकिर्भगवानृषिः ।
चकार चरितं कृत्स्नं विचित्रपदमर्थवत् १
चतुर्विंशत्सहस्राणि श्लोकानामुक्तवानृषिः ।
तथा सर्गशतान्पञ्च षट्काण्डानि तथोत्तरम् २
कृत्वा तु तन्महाप्राज्ञः सभविष्यसहोत्तरम् ।
चिन्तयामास को न्वेतत्प्रयुञ्जीयादिति प्रभुः ३
तस्य चिन्तयमानस्य महर्षेर्भावितात्मनः ।
अगृहीतां ततः पादौ मुनिवेषौ कुशीलवौ ४
कुशीलवौ तु धर्मज्ञौ राजपुत्रौ यशस्विनौ ।
भ्रातरौ स्वरसंपन्नौ ददर्शाश्रमवासिनौ ५
स तु मेधाविनौ दृष्ट्वा वेदेषु परिनिष्ठितौ ।
वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः ६
काव्यं रामायणं कृत्स्नं सीतायाश्चरितं महत् ।
पौलस्त्यवधमित्येवं चकार चरितव्रतः ७

आश्चर्यकारक शब्दांनी युक्त आणि अर्थानें भरलेलें असें भगवान् वाल्मीकिमुनींनी राज्यावर आलेल्या रामाचें संपूर्ण चरित्र प्रतिपादन करणारें काव्य केलें. त्या काव्यामध्यें वाल्मीकि मुनींनी चोवीस हजार श्लोक ग्रथित करून त्यांचे पांचशें सर्ग, सहा कांडें आणि त्याचप्रमाणें सातवें उत्तर कांड असे विभाग केले; आणि महाबुद्धिमान् वाल्मीकिमुनींनी भविष्य आणि उत्तरकांड यासहवर्तमान तें काव्य ग्रथित केल्यावर "हें पठण करून सभेमध्यें सभ्यांच्या कानांवर घालण्यास कोण समर्थ आहे," म्हणून ते चिंतन करूं लागले. ( १–३ )

शुद्धांतःकरणानें युक्त असलेले महर्षि वाल्मीकि याप्रमाणें त्याचें चिंतन करीत आहेत, तोंच मुनिवेष धारण करणाऱ्या कुश–लवांनी "आम्ही गायन करूं," असें म्हणून त्यांचे पाय धरिले असतां धर्मज्ञ, यशस्वी, मधुर स्वरानें युक्त, बुद्धिमान् आणि वेदपारंगत असे ते आश्रमवासी राजपुत्र कुश–लव असल्याचें अवलोकन करून समर्थ वाल्मीकि मुनींनी वेदाचें रहस्य प्रकट होण्याकरिता त्यांना हें

पाठ्ये गेये च मधुरं प्रमाणैस्त्रिभिरन्वितम् ।
जातिभिः सप्तभिर्युक्तं तन्त्रीलयसमन्वितम् ८
रसैः शृङ्गारकरुणहास्यरौद्रभयानकैः ।
वीरादिभी रसैर्युक्तं काव्यमेतदगायताम् ९
तौ तु गान्धर्वतत्त्वज्ञौ स्थानमूर्च्छनकोविदौ ।
भ्रातरौ स्वरसंपन्नौ गन्धर्वाविव रूपिणौ १०
रूपलक्षणसंपन्नौ मधुरस्वरभाषिणौ ।
बिम्बादिवोत्थितौ बिम्बौ रामदेहात्तथापरौ ११
तौ राजपुत्रौ कार्त्स्न्येन धर्म्यमाख्यानमुत्तमम् ।
वाचोविधेयं तत्सर्वं कृत्वा काव्यमनिन्दितौ १२
ऋषीणां च द्विजातीनां साधूनां च समागमे ।
यथोपदेशं तत्त्वज्ञौ जगतुस्तौ समाहितौ ।
महात्मानौ महाभागौ सर्वलक्षणलक्षितौ १३

रामायणकाव्य पढविलें. सारांश, संपूर्ण रामचरित्र व सीताचरित्र प्रतिपादन करणारें असें पौलस्त्यवध या नांवाचें मोठें काव्य तपोनिष्ठ वाल्मीकिमुनींनी केलें. ( ४–७ )

पठण व गायन होऊं लागलें असतां, मधुर लागणारें, द्रुत, मध्य व विलंबित हीं तीन प्रमाणें, सप्तस्वर, ततुंवाद्यांचा मेळ आणि त्याचप्रमाणे शृंगार, करुण, हास्य, रौद्र, भयानक, वीर इत्यादि रसांनी युक्त असलेलें हें काव्य त्यांनी गाइलें. सारांश, संगीतशास्त्रतत्त्वज्ञ, स्थान × व मूर्च्छना * यामध्यें निपुण, स्वरमाधुर्यसंपन्न, गंधर्वांप्रमाणे रूपवान्, देहस्थ शुभ लक्षणांनी युक्त, मधुर वाणीने भाषण करणारे (आणि सूर्यादिकांच्या बिंबापासून निघणाऱ्या प्रतिबिंबाप्रमाणे) साक्षात् रामदेहापासून उत्पन्न झालेले प्रतिरामदेहच कीं काय, असे ते निर्दोष व तत्त्ववेत्ते राजपुत्र धर्माला अनुसरून असलेलें तें उत्कृष्ट काव्य सर्व तोंडपाठ करून ऋषि, द्विज आणि भगवद्भक्त यांच्या समाजामध्ये सावधानचित्तपूर्वक पढविल्याप्रमाणे गाऊं लागले. ( ८–१३ )

× हृदयग्रंथि व कपोलफलक यांमध्ये असलेल्या प्राणसंचाराच्या जागेला स्थान असें म्हणतात. * ज्या गीतामध्ये स्वर पूर्ण असतात, त्याला मूर्छना असें म्हणतात.

तौ कदाचित्समेतानामृषीणां भावितात्मनाम् ।
मध्येसभं समीपस्थाविदं काव्यमगायताम् १४
तच्छ्रुत्वा मुनयः सर्वे बाष्पपर्याकुलेक्षणाः ।
साधु साध्विति तावूचुः परं विस्मयमागताः १५
ते प्रीतमनसः सर्वे मुनयो धर्मवत्सलाः ।
प्रशशंसुः प्रशस्तव्यौ गायमानौ कुशीलवौ १६
अहो गीतस्य माधुर्यं श्लोकानां च विशेषतः ।
चिरनिर्वृत्तमप्येतत्प्रत्यक्षमिव दर्शितम् १७
प्रविश्य तावुभौ सुष्ठु तथा भावमगायताम् ।
सहितौ मधुरं रक्तं सम्पन्नं स्वरसम्पदा १८
एवं प्रशस्यमानौ तौ तपःश्लाघ्यैर्महर्षिभिः ।
संरक्ततमत्यर्थं मधुरं तावगायताम् १९
प्रीतः कश्चिन्मुनिस्ताभ्यां संस्थितः कलशं ददौ ।

एकदा शुद्धांतःकरणाने युक्त अशा एकत्र जमलेल्या ऋषींच्या सभेमध्ये ऋषींसमीप बसून ते सर्वलक्षणसंपन्न महात्मे व महाभाग्यवान् कुश-लव हें काव्य गाऊं लागले. तेव्हा तें श्रवण करितांक्षणीं सर्व मुनींचे नेत्र अश्रूंनी भरून आले आणि अत्यंत विस्मित होऊन, " शाबास, शाबास " असें ते त्यांना म्हणाले. तात्पर्य, अंतःकरणामध्ये प्रसन्न झालेल्या त्या सर्व धर्मनिष्ठ मुनींनी " काय हो, हें गायन मधुर आहे ! आणि विशेषेंकरून श्लोक तरी किती हो मधुर आहेत ! अहो, या गोष्टी घडून आज पुष्कळ दिवस झाले आहेत, तरी त्या जणु प्रत्यक्ष घडतच आहेत, असें यांनी दर्शविलें ! अहो, सभेमध्ये बरोबर प्रविष्ट झालेल्या या उभयतांनी सप्तस्वरांमध्ये गाण्यास योग्य व मधुर असें या काव्याचें इतक्या कांही मजेने गायन केलें आहे की, त्यांतील अभिप्राय श्रोत्यांच्या अंतःकरणांत ठसून, त्यांचें अंतःकरण तन्मय होऊन गेलें आहे." अशा रीतीने प्रशंसेस पात्र असलेल्या कुशलवांची गातांना स्तुति केली. ( १४-१८ )

याप्रमाणे तपाच्या योगाने स्तुतीस पात्र झालेले महर्षि त्यांची प्रशंसा करूं लागले असतां, त्यांनी अत्यंत मधुर असें फारच खुलवून गायन केलें. तेव्हा तेथे



राजसभेमध्ये कुश लव रामायणाचें गायन करीत आहेत. (वा. रा. बा. ४)

**प्रसन्नो वल्कलं कश्चिद्ददौ ताभ्यां महायशाः २०**
**अन्यः कृष्णाजिनमदाद्यज्ञसूत्रं तथापरः ।**
**कश्चित्कमण्डलुं प्रादान्मौञ्जीमन्यो महामुनिः २१**
**बृसीमन्यस्तदा प्रादात्कौपीनमपरो मुनिः ।**
**ताभ्यां ददौ तदा हृष्टः कुठारमपरो मुनिः २२**
**काषायमपरो वस्त्रं चीरमन्यो ददौ मुनिः ।**
**जटाबन्धनमन्यस्तु काष्ठरज्जुं मुदान्वितः २३**
**यज्ञभाण्डमृषिः कश्चित्काष्ठभारं तथापरः ।**
**औदुम्बरीं बृसीमन्यः स्वस्ति केचित्तदाऽवदन् २४**
**आयुष्यमपरे प्राहुर्मुदा तत्र महर्षयः ।**
**ददुश्चैवं वरान्सर्वे मुनयः सत्यवादिनः २५**

बसलेल्या एका मुनीनें संतुष्ट होऊन त्यांना आपला कलश अर्पण केला; दुसऱ्या एका महाकीर्तिमान् मुनीनें प्रसन्न होऊन आपलें वल्कलच त्यांना देऊन टाकिलें; एकानें कृष्णाजिन दिलें; एकानें यज्ञोपवीत अर्पण केलें; कोणी कमंडलु दिला; दुसऱ्या एका महर्षीनीं मौंजी देऊन टाकिली; एकानें आपलें आसनच दिलें; दुसऱ्या एका मुनीनें आपली लंगोटीच त्यांना देऊन टाकिली; एका मुनीनें आनंदित होऊन आपली कुऱ्हाडच त्यांना दिली; कोणी एकानें आपली छाटीच दिली; दुसऱ्या एका मुनीनें आपणांपाशीं असलेलें फडकेंच त्यांना देऊन टाकिलें; एकानें आपलें जटाबंधन दिलें; दुसऱ्या एकानें आनंदित होऊन आपलीं काष्ठें आणण्याची दोरी त्यांना दिली. ( १९-२३ )

एका ऋषीनें आपलीं यज्ञपात्रेंच त्यांना अर्पण केलीं; एकानें आपल्यापाशीं असलेलें काष्ठांचें ओझेंच त्यांना दिलें आणि एकानें आपला बसावयाचा उंबराचा पाटच त्यांना देऊन टाकिला. ज्यांच्यापाशीं त्या सभेंतल्या सभेंत देण्याला कांहीं नव्हतें, त्यांनीं "कल्याण, कल्याण" म्हणून नुसते आशीर्वादच दिले आणि तशाच प्रकारच्या दुसऱ्या कांहीं अकिंचन महर्षींनीं "तुम्हांला दीर्घायुष्य प्राप्त होवो," म्हणून मोठ्या आनंदानें त्यांना सांगितलें. सारांश, ज्यांची वाणी कधींही असत्य होणारी नाहीं, अशा सर्व मुनींनीं याप्रमाणें त्यांना वर दिले आणि पुनरपि

आश्चर्यमिदमाख्यानं मुनिना संप्रकीर्तितम् ।
परं कवीनामाधारं समाप्तं च यथाक्रमम् २६
अभिगीतमिदं गीतं सर्वगीतिषु कोविदौ ।
आयुष्यं पुष्टिजननं सर्वश्रुतिमनोहरम् २७
प्रशस्यमानौ सर्वत्र कदाचित्तत्र गायकौ ।
रथ्यासु राजमार्गेषु ददर्श भरताग्रजः २८
स्ववेश्म चानीय ततो भ्रातरौ स कुशीलवौ ।
पूजयामास पूजार्हौ रामः शत्रुनिबर्हणः २९
आसीनः काञ्चने दिव्ये स च सिंहासने प्रभुः ।
उपोपविष्टैः सचिवैर्भ्रातृभिश्च समन्वितः ३०
दृष्ट्वा तु रूपसंपन्नौ विनीतौ भ्रातरावुभौ ।
उवाच लक्ष्मणं रामः शत्रुघ्नं भरतं तथा ३१

ते त्यांना म्हणाले, "हे कुमार हो, तुम्ही सर्व प्रकारच्या गायनामध्ये निपुण आहांत; वाल्मीकिमुनींनी केलेलें हें आख्यान आश्चर्यकारक असून, कवींना सर्वोत्कृष्ट आधार होण्याजोगें आहे. त्याचप्रमाणे गायनाला योग्य असेंच हें आख्यान आहे; तुम्हीही याचें चांगलें गायन करून क्रमानें समाप्त केलें आहे व हें आख्यान कोणीही ऐकिलें असतां, त्याला मनोहर लागणारें असून, आयुर्वर्धक व अभ्युदयकारक असें आहे" (२४–२७).

याप्रमाणे लहानमोठ्या रस्त्यांतून सर्व ठिकाणीं अयोध्येमध्ये ज्यांची प्रशंसा होत आहे, अशा त्या गायकांना भरताग्रज रामानें अवलोकन केलें आणि पूजेला पात्र असलेल्या त्या भ्रात्या कुशलवांना आपल्या घरीं आणून शत्रुनाशक रामानें त्यांचें पूजनही केलें. नंतर समीप बसलेल्या मंत्र्यांनी व भ्रात्यांनी युक्त असलेला तो प्रभु राम सुवर्णमय अशा दिव्य सिंहासनावर बसला असतांना नम्र व रूपवान् अशा त्या उभयतां भ्रात्यांना अवलोकन करून, "देवांप्रमाणे तेजस्वी असलेल्या या उभयतांचें आश्चर्यकारक अर्थ व शब्द यांनी युक्त असलेलें हें आख्यान श्रवण करा," म्हणून लक्ष्मण, शत्रुघ्न व भरत यांना म्हणाला आणि तें गाण्याविषयीं त्यानें त्या गायकांना सांगितलें व त्यांनीही आपल्या बलाचें अतिक्रमण न होऊं

श्रूयतामेतदाख्यानमयोर्देववर्चसोः ।
विचित्रार्थपदं सम्यग्गायकौ समचोदयत् ३१
तौ चापि मधुरं रक्तं स्वचित्तायतनिःस्वनम् ।
तन्त्रीलयवदत्यर्थं विश्रुतार्थमगायताम् ३२
ह्लादयत्सर्वगात्राणि मनांसि हृदयानि च ।
श्रोत्राश्रयसुखं गेयं तद्बभौ जनसंसदि ३४
इमौ मुनी पार्थिवलक्षणान्वितौ कुशीलवौ चैव महातपस्विनौ ।
ममापि तद्भूतिकरं प्रचक्षते महानुभावं चरितं निबोधत ३५
ततस्तु तौ रामवचःप्रचोदितावगायतां मार्गविधानसंपदा ।
स चापि रामः परिषद्गतः शनैर्बुभूषयासक्तमना बभूव ३६
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४॥ [२१९]

देतां श्रोत्यांच्या चित्ताला आल्हाद होईल, अशा रीतीने—मधुर, प्रसादाने परिपूर्ण, तंतुवाद्यांशीं जुळण्यास योग्य आणि अत्यंत उत्तान अर्थाने युक्त, असें— तें आख्यान गाऊन दाखविलें. ( २८-३३ )

गायनाला विषयभूत असलेलें तें आख्यान त्या जनसमाजामध्ये लोकांच्या गात्रांवर रोमांच उठविणारें, मनाला आणि आत्म्याला आनंद देणारें व श्रवणेंद्रियाला सुखावह असें झालें. असो. गायन सुरू होण्याचे पूर्वी राम पुनरपि लक्ष्मणादिकांना म्हणाला, "राजचिन्हांनी युक्त असलेले हे महातपस्वी कुशलव मुनि ( शब्दार्थालंकारादिविषयक ) महावैभवाने संपन्न असलेलें चरित्र गात आहेत आणि हें काव्य व ह्याचें श्रवण माझ्याही अभ्युदयाला कारणीभूत होणारें आहे, म्हणून वृद्ध जन सांगत आहेत. करिता, आदरपूर्वक तुम्ही हें श्रवण करा." तदनंतर रामाच्या तोंडची आज्ञा झाल्यावर ते कुशलव मार्गसंज्ञक* गायनपद्धतीला उपयुक्त अशा सामग्रीने गायन करूं लागले असतां आपलें चरित्र चिरकाल रहावें, या इच्छेने सभेमध्ये असलेल्या रामाचेंही मन तें ( गायन ) श्रवण करण्याविषयी

* देशी आणि मार्गी असें दोन प्रकारचें गायन असतें. पैकी प्राकृत भाषेंतील गायनाला देशी असें म्हणतात व संस्कृत गायनाला मार्गी असें म्हणतात.

*

पञ्चमः सर्गः ।

सर्वापूर्वमियं येषामासीत्कृत्स्ना वसुंधरा ।
प्रजापतिमुपादाय नृपाणां जयशालिनाम् १
येषां स सगरो नाम सागरो येन खानितः ।
षष्टिपुत्रसहस्राणि यं यान्तं पर्यवारयन् २
इक्ष्वाकूणामिदं तेषां राज्ञां वंशे महात्मनाम् ।
महदुत्पन्नमाख्यानं रामायणमिति श्रुतम् ३
तदिदं वर्तयिष्यावः सर्वं निखिलमादितः ।
धर्मकामार्थसहितं श्रोतव्यमनसूयता ४
कोशलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान् ।
निविष्टः सरयूतीरे प्रभूतधनधान्यवान् ५
अयोध्या नाम नगरी तत्रासील्लोकविश्रुता ।
मनुना मानवेन्द्रेण या पुरी निर्मिता स्वयम् ६

---

आसक्त झालें. ( ३४–३६ )

याप्रमाणे महर्षिवाल्मीकिप्रणीत रामायणरूप आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चवथा सर्ग समाप्त झाला. ॥ ४ ॥

ऐहिक व आमुष्मिक असें सर्व प्रकारचें अपूर्व फल प्राप्त होण्याला साधन असलेली ही संपूर्ण पृथ्वी पूर्वी प्रजाधिपति वैवस्वत मनु आदिकरून होऊन गेलेल्या जयशाली राजांच्या ताब्यांत होती. सागर ज्याने खणला तो सगर हा त्यांच्या वंशामध्ये राजा होऊन गेला. तो स्वारीस निघाला असतां साठ हजार पुत्र त्याचेबरोबर जात असत. असो. त्या महात्म्या इक्ष्वाकुवंशज राजांच्या वंशासंबंधानें रामायण ह्या नांवानें प्रसिद्ध असलेलें मोठें आख्यान उत्पन्न झालेलें आहे व तेंच सर्वांगांनी परिपूर्ण असलेलें हें रामायण आम्ही अगदीं प्रथमपासून पूर्णपणें कथन करणार आहोंत. तें धर्म, काम व अर्थ यांसहवर्तमान मोक्षाला कारणीभूत होणारें असल्यामुळे निर्मत्सर पुरुषानें श्रवण करण्यास योग्य आहे. ( १–४ )

सरयू नदीचे तीरीं कोशल म्हणून धनधान्यानें अत्यंत समृद्ध असा एक मोठा देश आहे. त्यांतील लोक आनंदित आहेत व उत्तरोत्तर त्या देशाची अभिवृद्धि

आयता दश च द्वे च योजनानि महापुरी।
श्रीमती त्रीणि विस्तीर्णा सुविभक्तमहापथा ७
राजमार्गेण महता सुविभक्तेन शोभिता।
मुक्तपुष्पावकीर्णेन जलसिक्तेन नित्यशः ८
तां तु राजा दशरथो महाराष्ट्रविवर्धनः।
पुरीमावासयामास दिवि देवपतिर्यथा ९

होत आहे. त्या देशामध्ये मानवाधिपति मनूने स्वतः निर्माण केलेली अशी एक अयोध्या नांवाची जगद्विख्यात नगरी आहे. त्या मोठ्या नगरीची लांबी तीस+ कोस असून, रुंदी साडेसात कोस आहे आणि ती नगरी वैभवसंपन्न असून स्पष्ट, रेखीव अशा अतिशय रुंद मार्गांनी युक्त आहे. प्रत्यहीं उदक सिंचन करून ज्यांवर उमललेलीं फुलें उधळलीं जातात, अशा मोठ्या भव्य राजमार्गाने तिला शोभा आलेली आहे. स्वर्गामध्ये ज्याप्रमाणे देवाधिपति इंद्राने अमरावती नगरी वसविली, त्याप्रमाणे प्रचंड राष्ट्राचें पालनपोषण करणाऱ्या दशरथ राजाने त्या मनुनिर्मित नगरीमध्ये पूर्वीपेक्षा लोकवसती अधिकच वाढविली. ( ५--९ )

+ सामान्यतः १ योजन म्हणजे ४ कोस ( ८ मैल ) असें मानण्याचा प्रघात आहे; पण कोस व शेर यांचें प्रमाण असुकच एक, असें निश्चयात्मक ठरलेलें नाही. भिन्नभिन्न देशपरत्वें कोस व शेर यांचें मानही भिन्नभिन्न असल्याचें निदर्शनास येतें. अशा स्थितींत योजनाचें निश्चयात्मक असें एक मान कसें ठरवावयाचें ? या संबंधांत प्रख्यात आर्यज्योतिषी भास्कराचार्य यांचे गोलाध्यायांतील वचनाच्या आधाराने ' एक योजन म्हणजे पांच मैल ' हें प्रमाण निश्चित म्हणून ग्रहण केलें आहे.

भास्कराचार्य पृथ्वीचा परिघ योजनसंख्येमध्ये सांगतांना म्हणतात– '**ख्यातो योजनसंख्यया कुपरिधिः सप्तांगनन्दाब्धयः**' म्हणजे ४९६७ योजनें पृथ्वीचा परिघ आहे, असें भास्कराचार्यांचें मत आहे. आणि पाश्चात्य युरोपीय ज्योतिषीही पृथ्वीचा परिघ २५००० मैल आहे, असें म्हणतात. अर्थात् ४९६७ योजनें म्हणजे २५००० मैल झाले, तर एक योजन म्हणजे किती मैल होतील ?

**कपाटतोरणवतीं सुविभक्तान्तरापणाम् ।**
**सर्वयन्त्रायुधवतीमुषितां सर्वशिल्पिभिः १०**
**सूतमागधसंबाधां श्रीमतीमतुलप्रभाम् ।**
**उच्चाट्टालध्वजवतीं शतघ्नीशतसंकुलाम् ११**
**वधूनाटकसङ्घैश्च संयुक्तां सर्वतः पुरीम् ।**
**उद्यानाम्रवणोपेतां महतीं सालमेखलाम् १२**

त्या नगरीला ( सर्व बाजूंनी ) वेशी व कमानी आहेत; एकमेकांपासून चांगल्या नियमित अंतरांनी युक्त असे बाजार तिच्यामध्ये आहेत आणि सर्व प्रकारचीं यंत्रें व आयुधें यांनी ती युक्त असून, सर्व प्रकारच्या कारागिरांनी तिच्यामध्ये वास्तव्य केलेलें आहे. स्तुतिपाठक आणि भाट त्या भव्य नगरीमध्ये भरलेले आहेत; उंच उंच माड्या व ध्वज जिच्यामध्ये फडकत आहेत, अशी अतुल शोभेने युक्त असलेली ती नगरी शेकडो तोफांनी सज्ज आहे. स्त्रियांच्या नृत्यशाला त्या नगरीमध्ये

टीप ( पुढे चालू )

त्यास २५००० या संख्येस ४९६७ या संख्येने भागून उत्तर ५$\frac{१}{३०}$ येतें. म्हणजे, " एक योजन म्हणजे पांच मैल " हें मान ग्रहण करण्यास प्रत्यवाय नाही. ( कै० गुरुवर्य प्रिन्सिपाल गोविंद सदाशिव आपटे, एम्. ए., डी. एस्.सी., सुपरिंटेंडंट् उज्जयिनी वेधशाळा, यांचा हा निर्णय आहे. हे युरोपीय व आर्य या दोन्ही ज्योतिषशास्त्रांचे आचार्य होते. त्यांच्या या निर्णयानुसार १२ योजनें म्हणजे ३० कोस व ३ योजनें म्हणजे ७॥ कोस असें भाषान्तर वर दिलें आहे. )

( २ ) अमरकोषावरील 'रामाश्रमी टीकेचे' टीकाकार प्रसिद्ध भानुजी दीक्षित हे आपल्या टीकेंत '**गव्यूतिः स्त्री क्रोशयुगम्**' यावर टीका देतांना '**धन्वन्तरसहस्रन्तु क्रोशः**' असें देऊन पुनः '**धनुर्हस्तचतुष्टयम्**' असें देतात. म्हणजे ४ हातांचे एक धनुष्य व १००० धनुष्यांचा एक कोस, अर्थात् ४००० हातांचा १ कोस. ४००० हात म्हणजे ( २० इंचांचा १ हात जुन्या कोष्टकाप्रमाणे ) ६६६६$\frac{२}{३}$ फूट म्हणजे १$\frac{१}{४}$ मैल होतो. अर्थात् एक कोस म्हणजे १$\frac{१}{४}$ मैल व ४ कोस म्हणजे ५ मैल. अर्थात् 'एक योजन' म्हणजे ५ मैल होतात.

दुर्गगम्भीरपरिखां दुर्गामन्यैर्दुरासदाम् ।
वाजिवारणसंपूर्णां गोभिरुष्ट्रैः खरैस्तथा १३
सामन्तराजसङ्घैश्च बलिकर्मभिरावृताम् ।
नानादेशनिवासैश्च वणिग्भिरुपशोभिताम् १४
प्रासादै रत्नविकृतैः पर्वतैरिव शोभिताम् ।
कूटागारैश्च संपूर्णामिन्द्रस्येवामरावतीम् १५
× चित्रामष्टापदाकारां वरनारीगणायुताम् ।
सर्वरत्नसमाकीर्णां विमानगृहशोभिताम् १६

जिकडेतिकडे आहेत; बागा आणि आंबराया यांनी ती युक्त आहे आणि सभोवती त्या नगरीला तटबंदी आहे. ( १०–१२ )

किल्ले आणि अगाध खंदक यांनी ती युक्त असल्यामुळे स्वकीयांनाही प्रवेश करण्यास कठीण असून, शत्रूंना तर समीप जाण्यासही अशक्य आहे; अश्व व गज यांनी ती पूर्ण असून बैल, उंट, गर्दभ आणि कर देण्याकरिता आलेले मांडलिक राजांचे समुदाय यांनी गजबजलेली आहे; देशोदेशींच्या व्यापाऱ्यांनी तिला शोभा आलेली असून, रत्नखचित अशा पर्वतप्राय देवालयांनी, राजवाड्यांनी ती सुशोभित आहे आणि इंद्राच्या अमरावतीप्रमाणे स्त्रियांच्या क्रीडाभवनांनी ती परिपूर्ण आहे. जिच्यामधील घरांच्या भिंतीवर सोन्याच्या रंगाने अनेक प्रकारचीं चित्रें काढून जिला शोभा आणली आहे व जी उत्तम स्त्रीसमुदायांनी युक्त आहे आणि त्याचप्रमाणे सर्व रत्नांनी ती भरलेली असून, सात सात मजली घरांनी ती

× "**अष्टापद्कारां**" याचा अर्थ 'अष्टपैलू' असाही होतो; पण असा अर्थ केल्यास या पूर्वीच्या सातव्या श्लोकांतील वर्णनाशीं तो जुळत नाही. सातव्या श्लोकांत "शुद्ध लंब चतुष्कोण(१२×३)" असल्याचें वर्णन आहे; पण, "**अष्टापद**" हा शब्द सोन्याचा वाचक आहे. दारावर सोन्याचे पत्रे बसविणें व भिंतीवर सोन्याच्या वर्खाच्या, सोनेरी रंगाने अनेक प्रकारचीं चित्रें काढून भिंती सुशोभित करणें, ही चाल फार प्राचीन काळापासून उत्तर हिंदुस्थानांत व राजपुतान्यांत आहे. तिला अनुसरून हा अर्थ केला आहे.

या ठिकाणीं टीकाकार दोन मतें देत आहे. ( १ ) "**अष्टापदं सुवर्णं**

**गृहगाढामविच्छिद्रां समभूमौ निवेशिताम् ।**
**शालितण्डुलसंपूर्णामिक्षुकाण्डरसोदकाम्** १७
**दुन्दुभीभिर्मृदङ्गैश्च वीणाभिः पणवैस्तथा ।**
**नादितां भृशमत्यर्थं पृथिव्यां तामनुत्तमाम्** १८
**विमानमिव सिद्धानां तपसाधिगतं दिवि ।**
**सुनिवेशितवेश्मान्तां नरोत्तमसमावृताम्** १९
**ये च बाणैर्न विध्यन्ति विविक्तमपरापरम् ।**
**शब्दवेध्यं च विततं लघुहस्ता विशारदाः** २०

सुशोभित झालेली आहे. तिच्यामध्ये घरांची अगदी खेचाखेच झाली असून मोकळी जागा कोठेही राहिलेली नाही; सपाट भूमीवर तिची रचना केलेली आहे. शालि तंडुलांनी ती परिपूर्ण आहे आणि इक्षुरसासारख्या स्वादिष्ट उदकानें ती युक्त आहे; दुंदुभि, मृदंग, वीणे व नगारे यांनी ती एकसारखी नादित झालेली असते; तपश्चर्येनें स्वर्गामध्ये सिद्ध लोकांना प्राप्त झालेलें विमानच कीं काय, अशा प्रकारें ती नगरी सर्व पृथ्वीमध्ये अनुपम असून तिच्यांतील घरांच्या अंतस्थ व बाह्य प्रदेशांची रचनाही चांगली व्यवस्थित केलेली आहे आणि उत्तम पुरुषांच्या योगानें ती व्याप्त झालेली आहे. ( १३–१९ )

इतकेंच नव्हे, परंतु, मत्त होऊन अरण्यामध्ये गर्जना करणारे सिंह, व्याघ्र

टीप ( पुढे चालू )

**तज्जालेन कृतः आकारः अलंकारः यस्याः सा** ” इत्येके । व दुसरा– “ **द्यूत-फलकाकाराम्** ” इत्यन्ये । म्हणजे स्वतःचें मत असें कांहींच देत नाही. तेव्हा अष्टपैलू नसल्याचें एक कारण वर दिलेंच आहे व दुसरें असें आहे की, ‘ द्यूत-फलक ’ सम–अष्टभुज असतो आणि अयोध्या तर लंब चतुष्कोण असल्याचें वर्णन आहे. या कारणास्तव ‘ द्यूतफलकाकार ’ हा अर्थ संभवत नाही. बाकी राहिला पहिला अर्थ, ‘ **अष्टापद** ’ म्हणजे सुवर्ण हा प्रत्यक्ष व्यवहारास अनुसरून ग्रहण केला आहे. शिवाय, लंका, किष्किन्धा, मथुरा इत्यादि नगरींचीं तोरणें व कवाडें सोन्याच्या पत्र्यांनी मढविल्याचीं व सोन्याच्या पाण्यानें रंगविल्याचीं वर्णनें ग्रंथां-तून सर्वत्र आढळतात. यावरूनहि हाच अर्थ सिद्ध आहे.

सिंहव्याघ्रवराहाणां मत्तानां नदतां वने ।
हन्तारो निशितैः शस्त्रैर्बलाद्बाहुबलैरपि २१
तादृशानां सहस्रैस्तामभिपूर्णां महारथैः ।
पुरीमावासयामास राजा दशरथस्तदा २२
तामग्निमद्भिर्गुणवद्भिरावृतां द्विजोत्तमैर्वेदषडङ्गपारगैः ।
सहस्रदैः सत्यरतैर्महात्मभिर्महर्षिकल्पैर्ऋषिभिश्च केवलैः २३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चमः सर्गः ॥५॥ [२४२]

षष्ठः सर्गः ।

तस्यां पुर्यामयोध्यायां वेदवित्सर्वसंग्रहः ।
दीर्घदर्शी महातेजाः पौरजानपदप्रियः १
इक्ष्वाकूणामतिरथो यज्वा धर्मपरो वशी ।
महर्षिकल्पो राजर्षिस्त्रिषु लोकेषु विश्रुतः २

---

व वराह यांचा, तीक्ष्ण शस्त्रांनीच केवळ नव्हे तर बाहुबलाचें अवलंबन करून, स्वसामर्थ्यानेंच वध करण्यास समर्थ आणि धनुर्विद्येमध्यें निपुण असल्यामुळे शीघ्रवेधी—परंतु, जो सहायरहित झालेला आहे, पुढेमागें कोणी नसल्यामुळे जो अनाथ आहे, भीतीनें दडून बसल्यामुळे केवळ शब्दानुमानावरूनच ज्याला वेध होण्याचा संभव आहे आणि युद्धांतून जो पलायन करीत आहे, यांवर बाण न टाकणारे—अशा प्रकारचे जे हजारो महारथि त्यांच्या योगानें आधीच परिपूर्ण असलेली ती नगरी आहिताग्नि व वेदवेदांगपारंगत असे गुणवान् ब्राह्मण, सत्यनिष्ठ व आचरणानें महर्षींसारखे असून, याचकांना हजारांनी दान करणारे महात्मे, श्रेष्ठ श्रेष्ठ ऋषि यांचें वास्तव्य करवून, त्या नगरीमध्यें दशरथराजानें अधिक भर घातली. ( २०–२३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत रामायणरूप आदिकाव्यांतील बालकांडापैकी पांचवा सर्ग समाप्त झाला. ॥ ५ ॥

त्या अयोध्या नगरीमध्यें दशरथ नांवाचा राजा होऊन गेला. तो वेदवेत्ता, सर्व वस्तूंचा संग्रह करणारा, दूरदर्शी, महाप्रतापी, लोकप्रिय, इक्ष्वाकुवंशजांतील अतिरथि, यथाविधि यज्ञयाग केलेला, धर्मनिष्ठ, मनोनिग्रही, महर्षितुल्य, त्रैलोक्या-

बलवान्निहतामित्रो मित्रवान्विजितेन्द्रियः।
धनैश्च संचयैश्चान्यैः शक्रवैश्रवणोपमः ३
यथा मनुर्महातेजा लोकस्य परिरक्षिता।
तथा दशरथो राजा लोकस्य परिरक्षिता ४
तेन सत्याभिसंधेन त्रिवर्गमनुतिष्ठता।
पालिता सा पुरिश्रेष्ठा इन्द्रेणेवामरावती ५
तस्मिन्पुरवरे हृष्टा धर्मात्मानो बहुश्रुताः।
नरास्तुष्टा धनैः स्वैः स्वैरलुब्धाः सत्यवादिनः ६
नाल्पसंनिचयः कश्चिदासीत्तस्मिन्पुरोत्तमे।
कुटुम्बी यो ह्यसिद्धार्थो गवाश्वधनधान्यवान् ७
कामी वा न कदर्यो वा नृशंसः पुरुषः क्वचित्।
द्रष्टुं शक्यमयोध्यायां नाविद्वान्न च नास्तिकः ८
सर्वे नराश्च नार्यश्च धर्मशीलाः सुसंयताः।
मुदिताः शीलवृत्ताभ्यां महर्षय इवामलाः ९

मध्ये प्रख्यात असा राजर्षि, बलाढ्य, शत्रु नाहीसे केलेला, मित्रांनीं युक्त व जितेंद्रिय असून, द्रव्य व इतर धान्यादिसंचय यांच्यायोगानें तर इंद्र व कुबेर यांच्याशीं बरोबरी करणारा होता. तो दशरथ राजा महातेजस्वी मनूप्रमाणें लोकांचें सर्वस्वी रक्षण करीत असे. ( १–४ )

सारांश, इंद्रानें रक्षण केलेल्या अमरावतीनगरीप्रमाणें धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गांचें अवलंबन करणाऱ्या त्या सत्यवचनी दशरथराजानें त्या श्रेष्ठ नगरीचें रक्षण केलें होतें. त्या श्रेष्ठ राजधानींतील लोक आनंदित, धर्मनिष्ठ, बहुश्रुत, स्वतः-पाशीं असलेल्या द्रव्यावर संतुष्ट, निर्लोभी आणि सत्यवादी असे होते. अल्प-संचयी, ऐहिक व आमुष्मिक फल प्राप्त न झालेला आणि गाई, अश्व, वगैरे पशु व धनधान्य, यांची समृद्धि नसलेला असा एकही कुटुंबी गृहस्थ त्या श्रेष्ठ नगरीमध्यें नव्हता, आणि त्याचप्रमाणें विषयलंपट, दुष्ट, अविद्वान् अथवा नास्तिक असाही कोणी पुरुष अयोध्येमध्यें कोठेंही दृष्टीस पडणें शक्य नव्हतें; कारण तेथील सर्व पुरुष व स्त्रिया शील आणि आचरण यांच्या योगानें महर्षींप्रमाणें निर्मल

नाकुण्डली नामुकुटी नास्रग्वी नाल्पभोगवान् ।
नामृष्टो न नलिप्ताङ्गो नासुगन्धश्च विद्यते १०
नामृष्टभोजी नादाता नाप्यनङ्गदनिष्कधृक् ।
नाहस्ताभरणो वापि दृश्यते नाप्यनात्मवान् ११
नानाहिताग्निर्नायज्वा न क्षुद्रो वा न तस्करः ।
कश्चिदासीदयोध्यायां न चावृत्तो न संकरः १२
स्वकर्मनिरता नित्यं ब्राह्मणा विजितेन्द्रियाः ।
दानाध्ययनशीलाश्च संयताश्च प्रतिग्रहे १३
नास्तिको नानृती वापि न कश्चिदबहुश्रुतः ।
नासूयको न चाशक्तो नाविद्वान्विद्यते क्वचित् १४
नाषडङ्गविदत्रास्ति नाव्रतो नाबहुश्रुतः ।
न दीनः क्षिप्तचित्तो वा व्यथितो वापि कश्चन १५
कश्चिन्नरो वा नारी वा नाश्रीमान्नाप्यरूपवान् ।

असून, धर्मनिष्ट, उत्कृष्ट इंद्रियनिग्रही आणि आनंदित असत. कर्णकुंडलविरहित, मुकुटरहित, मालाहीन, घामट, चंदनाचीवगैरे उटी न लाविलेला, सुगंधरहित अथवा भोग्य वस्तु ज्याच्यापाशी कमी आहेत, असा एकही पुरुष तेथे नसे. (५-१०)

अस्वच्छ अन्न भक्षण करणारा, दातृत्वहीन, बाहुभूषणें आणि उरोभूषणें धारण न करणारा, हस्तभूषणरहित अथवा मनोनिग्रह न केलेला असा कोणीही त्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत नसे. अग्नि सिद्ध न ठेविलेला, सोमयाग न केलेला, क्षुद्र, चोर, सदाचरणरहित अथवा परस्त्रीशीं गमन करणारा असा कोणीही अयोध्येमध्ये नव्हता. तेथील ब्राह्मण जितेंद्रिय, दान व अध्ययन यांविषयी तत्पर, प्रतिग्रह करण्याविषयी संकोच धरणारे आणि नेहेमी स्वकर्मावर निष्ठा ठेवणारे असे होते. नास्तिक, असत्य भाषण करणारा, बहुश्रुत नसलेला, मत्सरी, अशक्त अथवा अविद्वान् असा कोणीही द्विज तेथे नसे. वेदाचीं सहा अंगें माहीत नसलेला, व्रतवैकल्यांचें अवलंबन न करणारा, थोडकें अध्ययन केलेला, दीन, अस्वस्थचित्त अथवा व्याधिग्रस्त असा कोणीही तेथे नव्हता. ( ११-१५ )

दरिद्री, कुरूप अथवा राजाचे ठिकाणीं भक्ति नसलेला असा कोणीही पुरुष

द्रष्टुं शक्यमयोध्यायां नापि राजन्यभक्तिमान् १६
वर्णेष्वग्र्यचतुर्थेषु देवतातिथिपूजकाः ।
कृतज्ञाश्च वदान्याश्च शूरा विक्रमसंयुताः १७
दीर्घायुषो नराः सर्वे धर्मं सत्यं च संश्रिताः ।
सहिताः पुत्रपौत्रैश्च नित्यं स्त्रीभिः पुरोत्तमे १८
क्षत्रं ब्रह्ममुखं चासीद्वैश्याः क्षत्रमनुव्रताः ।
शूद्राः स्वकर्मनिरतास्त्रीन्वर्णानुपचारिणः १९
सा तेनेक्ष्वाकुनाथेन पुरी सुपरिरक्षिता ।
यथा पुरस्तान्मनुना मानवेन्द्रेण धीमता २०
योधानामग्निकल्पानां पेशलानाममर्षिणाम् ।
संपूर्णा कृतविद्यानां गुहा केसरिणामिव २१
काम्बोजविषयैर्जातैर्बाल्हीकैश्च हयोत्तमैः ।
वनायुजैर्नदीजैश्च पूर्णा हरिहयोत्तमैः २२
विन्ध्यपर्वतजैर्मत्तैः पूर्णा हैमवतैरपि ।

अथवा स्त्री अयोध्येमध्ये दृष्टीं पडणें शक्य नव्हतें. ब्राह्मणप्रभृति चारी वर्णांतील लोक देव आणि अतिथि यांचें पूजन करणारे, कृतज्ञ, उदार, शूर आणि पराक्रमी असे होते. त्या श्रेष्ठ राजधानींतील सर्व लोक दीर्घायु असून, पुत्रपौत्र आणि स्त्रिया यांसहवर्तमान सर्वच धर्म व सत्य यांचा आश्रय करून राहणारे होते. क्षत्रिय ब्राह्मणांच्या आज्ञेंत असत, वैश्य क्षत्रियांना अनुसरून वागत आणि शूद्र स्वकर्माविषयी तत्पर असत; म्हणजे तीन वर्णांची सेवा करीत असत. अशा त्या नगरीचें, पूर्वी मानवाधिपति मनूने जसें रक्षण केलें होतें, तसेंच त्या बुद्धिमान् इक्ष्वाकुकुलाधिपाधि दशरथराजाने त्या नगरीचें संरक्षण केलें होतें. ( १५–२० )

तेजाने अग्नितुल्य, स्वभावाने सरळ, अपमान सहन न करणारे आणि शस्त्रास्त्रादि विद्येमध्ये प्रवीण, अशा योद्ध्यांनी भरलेली ती नगरी सिंहांची गुहाच कीं काय, अशी भासत असे. कांबोज, बाल्हीक, वनायुज आणि सिंधुनदासमीपचा प्रदेश या ठिकाणच्या उत्कृष्ट अश्वांनी ती नगरी परिपूर्ण होती व ते अश्व इंद्राच्या उच्चैःश्रवा नामक अश्वाप्रमाणे उत्तम होते. विंध्याद्रि व हिमालय या प्रदेशांत उत्पन्न

मदान्वितैरतिबलैर्मातङ्गैः पर्वतोपमैः २३
ऐरावतकुलीनैश्च महापद्मकुलैस्तथा ।
अञ्जनादपि निष्क्रान्तैर्वामनादपि च द्विपैः २४
भद्रैर्मन्द्रैर्मृगैश्चैव भद्रमन्द्रमृगैस्तथा ।
भद्रमन्द्रैर्भद्रमृगैर्मृगमन्द्रैश्च सा पुरी २५

---

झालेल्या आणि मदस्राव चालला असल्यामुळे मत्त असलेल्या अशा पर्वतप्राय अतिबलाढ्य गजांनी ती नगरी परिपूर्ण होती. ऐरावत, महापद्म, अंजन व वामन या दिग्गजांच्या कुलांत उत्पन्न झालेल्या गजांनीही ती नगरी भरलेली होती आणि भद्र, मंद्र, मृग, भद्रमंद्रमृग, भद्रमंद्र, भद्रमृग वं मृगमंद्र * अशा सर्वदा मत्त

---

* अथ गजलक्षणानि— **भद्रो-मन्द्रो-मृगो-मिश्रो गजो जात्या चतुर्विधः ।** गजांच्या चार मुख्य जाती आहेत:– भद्र–मन्द्र–मृग–व मिश्र. पैकी ( १ ) भद्र गजाचीं लक्षणें– **मध्वाभदन्तः सबलः समांगः वर्तुलाकृतिः । सुमुखोऽवयवश्रेष्ठः ज्ञेयो भद्रगजः सदा ॥ १ ॥** ज्याच्या दातांची कान्ति मधासारखी असत्ये, जो बलवान् असून ज्याचे सर्व अवयव सारखे प्रमाणबद्ध असतात, ज्याच्या शरिराची ठेवण एकंदरींत वर्तुलाकार असत्ये व ज्याचें मुख शोभिवन्त असून, सर्व अवयव भरदार, बळकट, रेखीव व पूर्ण ( अव्यंग ) असतात तो ' भद्रगज ' होय. ( २ ) मन्द्रगजाचीं लक्षणें– "**स्थूलकुक्षिः सिंहदक्च बृहत्त्वक् गलशुण्डकः । मध्यमावयवो दीर्घकायो मन्द्रगजः स्मृतः ॥ २ ॥** ज्याच्या कुशी अधिक फुगलेल्या असतात, ज्याचे डोळे सिंहासारखे रुबाबदार असतात, ज्याची कातडी अधिक जाड, मान अधिक भरीव व सोंड अधिक लांब असत्ये व ज्याचे अवयव मध्यम ( ज्याचा बांधा मध्यम ) असून, ज्याची लांबी शरिराच्या मानाने अधिक असत्ये, तो ' मन्द्र ' गज होय. ( ३ ) वामन–गजाचीं लक्षणें:– **तनु-दन्त-कण्ठ-कर्ण-शुण्डः स्थूलाक्ष एव हि । सुन्हस्वाधरमेढ्रस्तु वामनो मृगसंज्ञकः ॥ ३ ॥** ज्याचे दात आखूड असतात, मान आखूड असते, कान आखूड असतात, सोंडही आखूड असत्ये व डोळे तेवढे स्थूल असून, खालचा ओठ व मेढ्र ( शिश्न ) हीं

**नित्यमत्तैः सदा पूर्णा नागैरचलसंनिभैः ।**
**सा योजने द्वे च भूयः सत्यनामा प्रकाशते २६**

आणि पर्वतांसारख्या धिप्पाड गजांनीही ती नगरी नेहेमी गजबजलेली असे. व तिच्यामध्ये स्वतः दशरथ राजाचें मुख्य निवासस्थान जें होतें, त्याचा विस्तार

टीप (पुढे चालू)
आखूड असतात व जो ठेंगू असतो, तो " मृग " संज्ञक गज होय. ( ४ ) मिश्र-गजाचीं लक्षणें-- **एषां लक्ष्मैर्विमिलितो गजो मिश्र इतिः स्मृतः ॥ ४ ॥** हीं जीं वर तीन जातींच्या गजांचीं लक्षणें सांगितलीं, त्यापैकी कांही मिश्र लक्षणांनी युक्त असा जो गज त्याला " मिश्रगज " असें म्हणतात. ( ५ ) हत्तींच्या शरिराची प्रमाणें-- " **भिन्नं भिन्नं प्रमाणं तु त्रयाणामपि कीर्तितम् ।** या तीनही जातींच्या गजांच्या शरिरांची ( उंची, लांबी इत्यादींचीं ) प्रमाणें पृथक् पृथक् सांगितलीं आहेत, तीं अशीं- ( ६ ) भद्रगजाच्या शरिराचें प्रमाण-- **सप्तहस्तोन्नतिर्भद्रे ह्यष्टहस्तप्रदीर्घता । परिणाहो दशकरः उदरस्य भवेत् सदा ॥ ५ ॥** भद्रगजाची उंची सात हात, लांबी आठ हात व पोटाचा घेर दहा हात असतो. ( ७ ) मन्द्र व मृग गजांचें प्रमाण-- **प्रमाणं मन्द्रमृगयोः हस्तहीनं क्रमादथ । कथितं दैर्घ्यसाम्यन्तु मुनिभिर्भद्रमन्द्रयोः ॥६॥** मन्द्र व मृग या गजांच्या शरिराचें प्रमाण भद्रगजाच्यापेक्षा क्रमानें एक एक हातानें कमी असतें. म्हणजे मन्द्र गजाची उंची साडे सहा हात व मृग गजाची उंची साडे पांच हात असत्ये. आणि पोटाचा घेर--मन्द्रगजाचा नऊ हात व मृग गजाचा आठ हात असतो. मन्द्र गजाची मात्र लांबी भद्रगजाच्या लांबीएवढीच म्हणजे आठच हात असते व मृग गजाची लांबी सहा हात असते. ( ८ ) एकन्दरींत सर्वांत श्रेष्ठ गजाचें लक्षण-- " **बृहत् भ्रूगण्डफालस्तु धृतशीर्षगतिः सदा । गजः श्रेष्ठस्तु सर्वेषां शुभलक्षणसंयुतः ॥ ७ ॥** ज्याच्या भुवया, गाल व कपाळ हीं प्रशस्त व उंच असून, जो चालतांना नेहमी डोकें वर उचलून चालतो, तो गज सर्व गजांमध्ये शुभ लक्षणांनी युक्त व श्रेष्ठ असा गज समजावा. ॥ ८ ॥

तां पुरीं स महातेजा राजा दशरथो महान् ।
शशास शमितामित्रो नक्षत्राणीव चन्द्रमाः ॥ २७
तां सत्यनामां दृढतोरणार्गलां गृहैर्विचित्रैरुपशोभितां शिवाम् ।
पुरीमयोध्यां नृसहस्रसंकुलां शशास वै शक्रसमो महीपतिः २८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय अदिकाव्ये बालकाण्डे षष्ठः सर्गः ॥६॥ [२७०]

सप्तमः सर्गः ।

तस्यामात्या गुणैरासन्निक्ष्वाकोः सुमहात्मनः ।
मन्त्रज्ञाश्चेङ्गितज्ञाश्च नित्यं प्रियहिते रताः १
अष्टौ बभूवुर्वीरस्य तस्यामात्या यशस्विनः ।
शुचयश्चानुरक्ताश्च राजकृत्येषु नित्यशः २

---

दोन योजनें होता व तेथील बंदोबस्त वर वर्णन केल्याप्रमाणे गज व अश्व इत्यादिकांचे योगानें अत्यन्त कडेकोट असल्यामुळे, ती नगरी नांवाप्रमाणेच खरोखर अत्यन्त अजिंक्य झाली होती. आणि राजाच्या त्या निवासस्थानाच्या योगानें ( दशरथ राजा स्वतः तेथेंच रहात असल्याकारणानें ) तेवढ्या भागांत तिला अधिकच ( पराकाष्ठेची ) शोभा आली होती. ( २१-२६ )

असो. नक्षत्रलोकांवर अंमल करणारा चंद्रच कीं काय, असा तो शत्रु नाहींसे झालेला महातेजस्वी दशरथराजा त्या नगरीवर अधिकार चालवीत असे. सारांश, यथार्थ नाम धारण करणारी, बळकट कमानी व अडसर यांनी युक्त असलेली, चित्रविचित्र घरांनी सुशोभित झालेली आणि हजारो लोकांनी गजबजून गेलेली जी कल्याणकारक अयोध्यानगरी, तिचें गुणांनी इंद्रासमान असलेल्या दशरथभूपतीनें परिपालन केलें. ( २७--२८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायणरूप आदिकाव्यांतील बालकांडापैकी सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

त्या महात्म्या इक्ष्वाकुवंशज दशरथराजाचे अमात्य स्वकर्माला उपयोगी पडणाऱ्या अशा गुणांनी युक्त होते; म्हणजे कोणत्या वेळीं काय करावें, हें त्यांना चांगलें समजत असे; दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय ते ओळखीत असत आणि स्वतःला प्रिय जो दशरथ राजा त्याचें हित करण्याविषयीं ते तत्पर असत. त्या

धृष्टिर्जयन्तो विजयः सुराष्ट्रो राष्ट्रवर्धनः ।
अकोपो धर्मपालश्च सुमन्त्रश्चाष्टमोऽर्थवित् ३
ऋत्विजौ द्वावभिमतौ तस्यास्तामृषिसत्तमौ ।
वसिष्ठो वामदेवश्च मन्त्रिणश्च तथापरे ४
सुयज्ञोऽप्यथ जाबालिः काश्यपोऽप्यथ गौतमः ।
मार्कण्डेयस्तु दीर्घायुस्तथा कात्यायनो द्विजः ५
एतैर्ब्रह्मर्षिभिर्नित्यमृत्विजस्तस्य पौर्वकाः ।
विद्याविनीता ह्रीमन्तः कुशला नियतेन्द्रियाः ६
श्रीमन्तश्च महात्मानः शस्त्रज्ञा दृढविक्रमाः ।
कीर्तिमन्तः प्रणिहिता यथा वचनकारिणः ७
तेजःक्षमायशःप्राप्ताः स्मितपूर्वाभिभाषिणः ।
क्रोधात्कामार्थहेतोर्वा न ब्रूयुरनृतं वचः ८
तेषामविदितं किंचित्स्वेषु नास्ति परेषु वा ।
क्रियमाणं कृतं वापि चारेणापि चिकीर्षितम् ९

---

यशस्वी व वीर दशरथराजाचे अमात्य आठ असून ते आचरणाने शुद्ध व राजकार्याविषयी नित्य तत्पर असे असत. धृष्टि, जयंत, विजय, सुराष्ट्र, राष्ट्रवर्धन, अकोप, धर्मपाल आणि आठवा सुमंत्र हे ते अमात्य होत. ( १–३ )

ऋषिश्रेष्ठ वसिष्ठ व वामदेव हे दोन त्याचे मुख्य ऋत्विज होते व वरील अमात्यांशिवाय इतरहि त्याचे मंत्री होते. सुयज्ञ, जाबालि, काश्यप, गौतम, दीर्घायु मार्कंडेय आणि कात्यायन या ब्रह्मर्षींशीं त्याच्या परंपरागत ऋत्विजांचा नित्य समागम होत असे. त्या दशरथराजाचे अमात्य विद्या व विनय यांनी संपन्न, अब्रूची चाड बाळगणारे, राजकार्याविषयी कुशल, जितेंद्रिय, वैभवशाली, मनाचे मोठे, शस्त्रवेत्ते, अमोघपराक्रमी, कीर्तिमान्, दक्ष, राजाज्ञानुरूप वर्तन करणारे, तेज, कांति व यश यांनी युक्त, हास्यपूर्वक भाषण करणारे आणि काम, क्रोध अथवा द्रव्य ( लोभ ) यांना वश होऊन कधीही अनृत भाषण न करणारे असे होते. स्वकीयांकडे अथवा परकीयांकडे काय चाललें आहे, काय झालें आहे आणि काय उद्दिष्ट आहे, तें हेरांच्या योगानें त्यांना सर्व विदित असे. व्यवहारामध्ये ते

कुशला व्यवहारेषु सौहृदेषु परीक्षिताः ।
प्राप्तकालं यथादण्डं धारयेयुः सुतेष्वपि १०
कोशसंग्रहणे युक्ता बलस्य च परिग्रहे ।
अहितं चापि पुरुषं न हिंस्युरविदूषकम् ११
वीराश्च नियतोत्साहा राजशास्त्रमनुष्ठिताः ।
शुचीनां रक्षितारश्च नित्यं विषयवासिनाम् १२
ब्रह्मक्षत्रमहिंसन्तस्ते कोशं समपूरयन् ।
सुतीक्ष्णदण्डाः संप्रेक्ष्य पुरुषस्य बलाबलम् १३
शुचीनामेकबुद्धीनां सर्वेषां संप्रजानताम् ।
नासीत्पुरे वा राष्ट्रे वा मृषावादी नरः क्वचित् १४
क्वचिन्न दुष्टस्तत्रासीत् परदाररतिर्नरः ।
प्रशान्तं सर्वमेवासीद्राष्ट्रं पुरवरं च तत् १५
सुवाससः सुवेषाश्च ते च सर्वे शुचिव्रताः ।

निपुण होते, सौहृदाविषयी ते राजाच्या परीक्षेला उतरलेले होते आणि वेळ आली म्हणजे पुत्रांनाही यथायोग्य दंड करण्यास ते मागेपुढे पाहणारे नव्हते. कोश व सैन्य यांचा संग्रह करण्याविषयी ते तत्पर असत आणि अपराधी नसेल, तर शत्रूलाही धक्का लावीत नसत. ते दशरथराजाचे अमात्य शूर, उत्साहसंपन्न, नीतिशास्त्रानुसार वागणारे आणि आपल्या देशांत राहणाऱ्या सदाचरणी लोकांचें नित्य रक्षण करणारे असे होते. अपराध्याला चांगला कडक दंड करणारे जरी ते अमात्य होते, तरी अपराधी पुरुषाचें बलाबल पाहून दंड करीत असत आणि ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे प्रजेला उपद्रव न देतां द्रव्यभांडाराची भर करीत असत. आचरणाने शुद्ध व एकमताने वागणारे असे ते सर्व अमात्य राजधानींतील आणि राष्ट्रांतील वृत्तान्ताचा विचार करूं लागले असतां राष्ट्रांत अथवा राजधानींत कोणीही असत्यवादी पुरुष असल्याची हकीकत त्यांच्यांत निघत नसे. परस्त्रीविषयी आसक्त असा कोणीही दुष्ट पुरुष त्या ठिकाणीं नव्हता. राजधानी व सर्व राष्ट्र यांमध्ये जिकडेतिकडे शांतता होती (४–१५).

दशरथराजाचे ते सर्वही अमात्य सुन्दर वस्त्रें व उत्तम वेष धारण करणारे

हितार्थाश्च नरेन्द्रस्य जाग्रतो नयचक्षुषा १६
गुरोर्गुणगृहीताश्च प्रख्याताश्च पराक्रमैः ।
विदेशेष्वपि विज्ञाताः सर्वतो बुद्धिनिश्चयाः १७
अभितो गुणवन्तश्च न चासन् गुणवर्जिताः ।
संधिविग्रहतत्त्वज्ञाः प्रकृत्या संपदान्विताः १८
मन्त्रसंवरणे शक्ताः शक्ताः सूक्ष्मासु बुद्धिषु ।
नीतिशास्त्रविशेषज्ञाः सततं प्रियवादिनः १९
ईदृशैस्तैरमात्यैश्च राजा दशरथोऽनघः ।
उपपन्नो गुणोपेतैरन्वशासद्वसुंधराम् २०
अवेक्ष्यमाणश्चारेण प्रजा धर्मेण रक्षयन् ।
प्रजानां पालनं कुर्वन्नधर्मं परिवर्जयन् २१
विश्रुतस्त्रिषु लोकेषु वदान्यः सत्यसङ्गरः ।
स तत्र पुरुषव्याघ्रः शशास पृथिवीमिमाम् २२
नाध्यगच्छद्विशिष्टं वा तुल्यं वा शत्रुमात्मनः ।

असून आचरणानें सर्वही शुद्ध होते आणि राजाचें हित हाच एक उद्देश मनांत धरून नीतिरूप दृष्टीनें ते सारखे जागृत होते. गुरु व राजा यांना ते गुणवान् म्हणून अभिमत असत; स्वपराक्रमांनी ते प्रख्यात असत आणि कोणत्याही विषया-संबंधानें बुद्धीला संशय नसल्यामुळे परदेशांमध्यें त्यांची ख्याति असे. ते कधींही गुणरहित नसून, सर्वदा गुणवान् असत. संधि आणि विग्रह यांचें तत्त्व ते जाणीत असत आणि सात्त्विक, राजस व तामस अशा त्रिगुण–संपत्तीनें ते युक्त असत. सल्लामसलत अगदी गुप्त ठेवण्याविषयीं ते दक्ष असत, सूक्ष्म विचार करण्यास ते समर्थ असत, नीतिशास्त्रांतील विशेष गोष्टी त्यांना चांगल्या अवगत असत आणि ते नेहमी प्रिय भाषण करीत असत. अशा प्रकारच्या त्या गुणी अमात्यांनी युक्त असलेल्या निष्पाप दशरथराजानें पृथ्वीचें राज्य केलें. ( १६–२० )

त्रैलोक्यामध्यें विख्यात, उदार, सत्यवचनी, हेरांच्या योगानें चोहोंकडे दृष्टि देत असलेल्या त्या पुरुषश्रेष्ठ दशरथराजानें धर्मतः प्रजांचें रक्षण व्हावें, एतदर्थ म्हणजे अधर्मवर्जनपूर्वक प्रजापालन व्हावें, एतदर्थ या पृथ्वीचें राज्य केलें. स्वतःची

मित्रवान्नतसामन्तः प्रतापहतकण्टकः ।
स शशास जगद्राजा दिवि देवपतिर्यथा　　२३
तैर्मन्त्रिभिर्मन्त्रहिते निविष्टैर्वृतोऽनुरक्तैः कुशलैः समर्थैः ।
स पार्थिवो दीप्तिमवाप युक्तस्तेजोमयैर्गोभिरिवोदितोर्कः २४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तमः सर्गः ॥७॥[२९४]

अष्टम सर्गः ।

तस्य चैवंप्रभावस्य धर्मज्ञस्य महात्मनः ।
सुतार्थं तप्यमानस्य नासीद्वंशकरः सुतः　　१
चिन्तयानस्य तस्यैवं बुद्धिरासीन्महात्मनः ।
सुतार्थं वाजिमेधेन किमर्थं न यजाम्यहम्　　२

---

बरोबरी करणारा अथवा स्वतःपेक्षा अधिक असा एकही रिपु त्याच्या आढळण्यांत आला नाही. तो सुहृदांनी युक्त असे, मांडलिक राजे त्याला नमून असत. त्याच्या प्रतापामुळे सर्व प्रजापीडकांचा नायनाट झालेला असे, म्हणूनच स्वर्गामध्ये राज्य करणाऱ्या देवाधिपति इंद्राप्रमाणे तो राजा या जगताचें राज्य करीत असे व यामुळे तेजोमय किरणांनी युक्त असा उदय पावलेला सूर्यच कीं काय, अशा रीतीनें विचारसाध्य, हिताविषयी तत्पर, प्रभूविषयी अनुरक्त, राजकार्यनिपुण आणि तें पार पाडण्याविषयी समर्थ अशा मंत्र्यांनी परिवेष्टित असलेला तो राजा दैदीप्यमान दिसत असे. ( २१–२४ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकीप्रणीत श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी सातवा सर्ग समाप्त झाला. ॥ ७ ॥

याप्रमाणे प्रतापी, धर्मज्ञ आणि उदार अंतःकरणानें युक्त असा दशरथराजा पुत्राकरिता तपश्चर्या करीत असतांनाही त्याला वंश चालविणारा पुत्र प्राप्त झाला नाही. तेव्हा "पुत्रप्राप्तीकरिता मी अश्वमेधयाग कां करूं नये?" अशी गोष्ट विचार करितां करितां त्याच्या मनामध्ये आली आणि शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या

स निश्चितां मतिं कृत्वा यष्टव्यमिति बुद्धिमान् ।
मन्त्रिभिः सह धर्मात्मा सर्वैरपि कृतात्मभिः ३
ततोऽब्रवीन्महातेजाः सुमन्त्रं मन्त्रिसत्तमम् ।
शीघ्रमानय मे सर्वान् गुरूंस्तान्सपुरोहितान् ४
ततः सुमन्त्रस्त्वरितं गत्वा त्वरितविक्रमः ।
समानयत्स तान्सर्वान्समस्तान्वेदपारगान् ५
सुयज्ञं वामदेवं च जाबालिमथ काश्यपम् ।
पुरोहितं वसिष्ठं च ये चाप्यन्ये द्विजोत्तमाः ६
तान्पूजयित्वा धर्मात्मा राजा दशरथस्तदा ।
इदं धर्मार्थसहितं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् ७
मम लालप्यमानस्य सुतार्थं नास्ति वै सुखम् ।
तदर्थं हयमेधेन यक्ष्यामीति मतिर्मम ८
तदहं यष्टुमिच्छामि शास्त्रदृष्टेन कर्मणा ।
कथं प्राप्स्याम्यहं कामं बुद्धिरत्र विचिन्त्यताम् ९

सर्व मंत्र्यांसहवर्तमान त्या धर्मात्म्या व विचारी दशरथराजाने " अश्वमेध–याग करावा, " असा निश्चित विचार केला. ( १–३ )

नंतर " हे मंत्रिश्रेष्ठा, पुरोहितांसहवर्तमान त्या सर्व गुरूंना सत्वर माझ्याकडे घेऊन ये, " म्हणून सुमंत्र नामक अमात्याला त्या महातेजस्वी राजाने सांगितलें असतां शीघ्र गमन करणारा सुमंत्र सत्वर गेला आणि त्या सर्व गुरूंना व इतरही वेदपारंगत ब्राह्मणांना घेऊन आला. सुयज्ञ, वामदेव, जाबालि, काश्यप, पुरोहित वसिष्ठ आणि इतरही श्रेष्ठ द्विज तो बरोबर घेऊन आला. तेव्हा त्यांचें पूजन करून धर्मात्म्या दशरथराजाने धर्म व अर्थ यांना अनुलक्षून असलेलें हें स्पष्ट भाषण त्यांच्याशीं केलें. ( ४–७ )

" पुत्राकरिता शोक करीत असलेल्या मला सुख होत नाही. यास्तव पुत्र-प्राप्ति होण्याकरिता अश्वमेध–याग करावा, असा माझा विचार आहे व त्याप्रमाणे यथाशास्त्र अनुष्ठानाने याग शेवटास नेण्यास मी उत्सुकही झालों आहे. याकरिता कोणत्या प्रकाराने माझा मनोरथ सिद्धीस जाईल, याविषयी आपण कांही विचार

ततः साध्विति तद्वाक्यं ब्राह्मणाः प्रत्यपूजयन् ।
वसिष्ठप्रमुखाः सर्वे पार्थिवस्य मुखेरितम् १०
ऊचुश्च परमप्रीताः सर्वे दशरथं वचः ११
संभाराः संभ्रियन्तां ते तुरगश्च विमुच्यताम् ।
सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् १२
सर्वथा प्राप्स्यसे पुत्रानभिप्रेतांश्च पार्थिव ।
यस्य ते धार्मिकी बुद्धिरियं पुत्रार्थमागता १३
ततस्तुष्टोऽभवद्राजा श्रुत्वैतद् द्विजभाषितम् ।
अमात्यानब्रवीद्राजाहर्षव्याकुललोचनः १४
संभाराः संभ्रियन्तां मे गुरूणां वचनादिह ।
समर्थाधिष्ठितश्चाश्वः सोपाध्यायो विमुच्यताम् १५
सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् ।
शान्तयश्चापि वर्धन्तां यथाकल्पं यथाविधि १६
शक्यः प्राप्तुमयं यज्ञः सर्वेणापि महीक्षिता ।

---

करा." नंतर वसिष्ठप्रभृति सर्व ब्राह्मणांनी " उत्तम उत्तम " म्हणून राजाच्या मुखांतून निघालेल्या त्या भाषणाची प्रशंसा केली आणि अतिशय प्रसन्न होऊन ते सर्व ब्राह्मण दशरथाला म्हणाले. ( ८–११ )

" यज्ञाच्या साहित्याची जुळवाजुळव होऊं द्या व अश्व सोडून सरयूनदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार होऊं द्या. हे राजा, ज्या अर्थी पुत्रप्राप्तीकरिता हा धार्मिक विचार तुझ्या मनामध्ये आला आहे, त्या अर्थी तुला खरोखर मनाप्रमाणे पुत्र प्राप्त होतील." याप्रमाणे द्विजांचें भाषण श्रवण करून राजा संतुष्ट झाला आणि आनन्दाश्रूंनी डोळे भरून आले असतां आपल्या अमात्यांना म्हणाला, " गुरूंनी सांगितल्याप्रमाणे साहित्याची जुळवाजुळव होऊं द्यां. अश्व धरणाऱ्यांचा पराभव करण्यास समर्थ अशांच्या देखरेखीखाली व उपाध्याय बरोबर देऊन अश्व सुटूं द्या. सरयूनदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार होऊं द्या आणि सूत्रांत सांगितल्याप्रमाणे ( विघ्ननिवारणार्थ ) शांतिकर्मे यथाविधि होऊं द्या. ( १२–१६ )

"अहो, सर्वगुणसंपन्न जरी राजा झाला तरी त्याच्या हातून हा अश्वमेध–याग

नापराधो भवेत्कष्टो यद्यास्मिन्क्रतुसत्तमे १७
छिद्रं हि मृगयन्ते स्म विद्वांसो ब्रह्मराक्षसाः ।
विधिहीनस्य यज्ञस्य सद्यः कर्ता विनश्यति १८
तद्यथा विधिपूर्वं मे क्रतुरेष समाप्यते ।
तथा विधानं क्रियतां समर्थाः साधनेष्विति । १९
तथेति चाब्रुवन्सर्वे मन्त्रिणः प्रतिपूजिताः ।
पार्थिवेन्द्रस्य तद्वाक्यं यथापूर्वं निशम्य ते २०
तथा द्विजास्ते धर्मज्ञा वर्धयन्तो नृपोत्तमम् ।
अनुज्ञातास्ततः सर्वे पुनर्जग्मुर्यथागतम् २१
विसर्जयित्वा तान्विप्रान्सचिवानिदमब्रवीत् ।
ऋत्विग्भिरुपसंदिष्टो यथावत्क्रतुराप्यताम् २२
इत्युक्त्वा नृपशार्दूलः सचिवान्समुपस्थितान् ।
विसर्जयित्वा स्वं वेश्म प्रविवेश महामतिः २३

शेवटास जाणें शक्य आहे काय ? या श्रेष्ठ क्रतूच्या अनुष्ठानामध्ये जर मोठासा प्रमाद नच झाला, तर मात्र कदाचित् तो शेवटास जाण्याचा संभव आहे; कारण विद्वान् विद्वान् ब्रह्मराक्षस या क्रतूमध्ये कोठें न्यून पडेल, हें पहात असतात आणि त्यामुळे यज्ञानुष्ठान अविधि झालें असतां कर्त्याचा तत्काल नाश होतो. यास्तव हा माझा याग यथाविधि शेवटास जाईल, अशा रीतीनें तुम्ही यत्न करा; तुम्ही साधनें जुळविण्याविषयी समर्थ आहांत. " याप्रमाणे नृपश्रेष्ठ दशरथराजाचें तें भाषण श्रवण करून ते सर्व राजमान्य मंत्री "ठीक आहे," असें म्हणाले.(१७--२०)

तदनंतर त्या सर्व धर्मवेत्त्या ब्राह्मणांनी नृपश्रेष्ठ दशरथाला आशीर्वाद दिले आणि राजाची अनुज्ञा झाल्यावर ते सर्व पुनरपि आल्या मार्गानें चालते झाले. याप्रमाणे त्या विप्रांना जाण्याची अनुज्ञा दिल्यावर, " ऋत्विजांनी सांगितल्या-प्रमाणे याग यथाविधि शेवटास नेण्याच्या उद्योगाला लागा, " असें मंत्र्यांना त्या राजानें सांगितलें. समीप आलेल्या मंत्र्यांना याप्रमाणे सांगून व जाण्याची अनुज्ञा देऊन तो महाविचारी नृपश्रेष्ठ दशरथराजा आपल्या अंतःपुरामध्ये प्रविष्ट झाला.

ततः स गत्वा ताः पत्नीर्नरेन्द्रो हृदयंगमाः ।
उवाच दीक्षां विशत यक्ष्येऽहं सुतकारणात् २४
तासां तेनातिकान्तेन वचनेन सुवर्चसाम् ।
मुखपद्मान्यशोभन्त पद्मानीव हिमात्यये २५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टमः सर्गः ॥८॥ [२१९]

नवमः सर्गः ।

एतच्छ्रुत्वा रहः सूतो राजानमिदमब्रवीत् ।
श्रूयतां तत्पुरावृत्तं पुराणे च मया श्रुतम् १
ऋत्विग्भिरुपदिष्टोऽयं पुरावृत्तो मया श्रुतः २
सनत्कुमारो भगवान्पूर्वं कथितवान्कथाम् ।
ऋषीणां संनिधौ राजंस्तव पुत्रागमं प्रति ३
काश्यपस्य च पुत्रोऽस्ति विभाण्डक इति श्रुतः ।
ऋष्यशृङ्ग इति ख्यातस्तस्य पुत्रो भविष्यति ४

---

नंतर " मी पुत्रप्राप्तीकरिता अश्वमेध–याग करणार आहें, यास्तव तुम्ही यज्ञ-दीक्षा घ्या, " असें आपल्या प्रिय पत्नींना त्या दशरथराजानें सांगितलें. तेव्हा आधींच उत्तम कांतीनें युक्त असलेल्या त्या स्त्रियांचीं मुखकमलें त्या अत्यंत प्रिय भाषणाच्या योगानें शीत–काल संपल्यानंतर प्रफुल्लित होणाऱ्या कमलांप्रमाणें शोभूं लागलीं. ( २१–२५ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी आठवा सर्ग समाप्त झाला. ॥ ८ ॥

हें ऐकून दशरथराजाचा सारथी सुमन्त्र त्याला म्हणाला, " पुराणामध्ये मीं श्रवण केलेला तो पुरातन इतिहास आपण श्रवण करा. हा इतिहास ऋत्विजांनीं सांगितलेला मीं पूर्वी श्रवण केला आहे. हे राजा, भगवान् सनत्कुमार मुनींनीं ऋषींचे संनिध तुझ्या पुत्रप्राप्तीविषयी भविष्यद्विषयक कथा पूर्वीच सांगून ठेविली आहे. (सनत्कुमार सांगतात) काश्यपाचा पुत्र विभांडक म्हणून प्रसिद्ध आहे. त्याला ऋष्यशृंग या नांवानें प्रसिद्ध असा एक पुत्र होईल. ( १–४ )

स वने नित्यसंवृद्धो मुनिर्वनचरः सदा ।
नान्यं जानाति विप्रेन्द्रो नित्यं पित्रनुवर्तनात् ५
द्वैविध्यं ब्रह्मचर्यस्य भविष्यति महात्मनः ।
लोकेषु प्रथितं राजन्विप्रैश्च कथितं सदा ६
तस्यैवं वर्तमानस्य कालः समभिवर्तत ।
अग्निं शुश्रूषमाणस्य पितरं च यशस्विनम् ७
एतस्मिन्नेव काले तु रोमपादः प्रतापवान् ।
अङ्गेषु प्रथितो राजा भविष्यति महाबलः ८
तस्य व्यतिक्रमाद्राज्ञो भविष्यति सुदारुणा ।
अनावृष्टिः सुघोरा वै सर्वलोकभयावहा ९
अनावृष्ट्यां तु वृत्तायां राजा दुःखसमन्वितः ।
ब्राह्मणाञ्छ्रुतसंवृद्धान्समानीय प्रवक्ष्यति १०

"तो जन्मापासून वनांत वाढणारा असल्यामुळे वनामध्ये नित्य संचार करील आणि तो विप्रश्रेष्ठ मुनि नित्य पित्याच्या अनुरोधानें वर्तन करणारा असल्यामुळे (व " येथून तूं कोठेही जाऊं नकोस, " अशी पित्याची त्याला आज्ञा होणार असल्यामुळे वनावाचून ) तो दुसरें कांहीही जाणणार नाही. ( अजिनादि-धारणरूप मुख्य आणि ऋतुकालीं स्त्रीगमनरूप गौण असें ) दोन्ही प्रकारचें ब्रह्मचर्य त्या महात्म्या ऋष्यश्रृंग मुनीचें लोकांमध्ये प्रसिद्ध होईल आणि हे राजा, ब्राह्मण त्या ब्रह्मचर्याची नित्य प्रशंसा करतील. याप्रमाणे अग्नि व यशस्वी पिता यांची शुश्रूषा करून असणाऱ्या त्या ऋष्यश्रृंग मुनींचा बराच काल जाईल. असो. या ऋष्यश्रृंग मुनीच्याच वेळीं अंगदेशामध्ये रोमपाद म्हणून एक प्रतापी व महा-बलाढ्य असा राजा प्रसिद्धीस येईल आणि त्या राजाच्या हातून होणाऱ्या धर्मा-तिक्रमणामुळे सर्व लोकांना भयावह, दुःसह व अत्यंत घोर असें अवर्षण पडेल. (५–९)

"अशा प्रकारें अवर्षण पडलें असतां राजा दुःखी होईल आणि ज्ञानवृद्ध ब्राह्मणांना बोलावून आणून, " आपण लोकव्यवहारज्ञ असल्यामुळे या अनावृष्टीला कारणी-भूत असें जें माझें पापकर्म असेल, तें आपण जाणतच आहांत. याकरिता त्या

भवन्तः श्रुतकर्माणो लोकचारित्रवेदिनः ।
समादिशन्तु नियमं प्रायश्चित्तं यथा भवेत् ११
इत्युक्तास्ते ततो राज्ञा सर्वे ब्राह्मणसत्तमाः ।
वक्ष्यन्ति ते महीपालं ब्राह्मणा वेदपारगाः १२
विभाण्डकसुतं राजन्सर्वोपायैरिहानय ।
आनाय्य तु महीपाल ऋष्यशृङ्गं सुसत्कृतम् १३
विभाण्डकसुतं राजन्ब्राह्मणं वेदपारगम् ।
प्रयच्छ कन्यां शान्तां वै विधिना सुसमाहितः १४
तेषां तु वचनं श्रुत्वा राजा चिन्तां प्रपत्स्यते ।
केनोपायेन वै शक्यमिहानेतुं स वीर्यवान् १५
ततो राजा विनिश्चित्य सह मन्त्रिभिरात्मवान् ।
पुरोहितममात्यांश्च प्रेषयिष्यति सत्कृतान् १६
ते तु राज्ञो वचः श्रुत्वा व्यथितावनताननाः ।
न गच्छेम ऋषेर्भीता अनुनेष्यन्ति तं नृपम् १७

---

माझ्या पातकाची निष्कृति होईल, अशा रीतीनें आपण मला अनुष्ठान करण्यास सांगा," असें त्यांना म्हणेल व राजानें असें सांगितलें असतां ते सर्व श्रेष्ठ व वेदपारंगत ब्राह्मण त्या भूपालाला सांगतील की, "हे राजा, सर्व उपायांनी विभांडकपुत्राला इकडे आण आणि, हे भूपाला नृपा, अत्यंत सत्कारपूर्वक त्या ऋष्यशृंग नामक विभांडकपुत्र वेदपारंगत ब्राह्मणाला आणवून अतिशय प्रसन्न मनाने आपली कन्या शांता त्याला यथाविधि अर्पण कर." ( १०–१४ )

याप्रमाणे त्या ब्राह्मणांचें वचन श्रवण केल्यावर त्या जितेंद्रिय ऋष्यशृंगमुनींला कोणत्या उपायानें येथे आणणें शक्य आहे, असें तो राजा चिंतन करूं लागेल, आणि नंतर मंत्र्यांसहवर्तमान पक्का निश्चय करून त्या मुनीला आणण्याकरितां पुरोहित व अमात्य यांना तो सत्कारपूर्वक पाठवून देईल; परंतु राजाचें भाषण श्रवण केल्यावर ते अमात्यप्रभृति पंचाइतींत पडून आपल्या माना खालीं घालतील आणि विभांडक मुनीला भीत असल्यामुळे "आम्ही तिकडे जाणार नाहीं," असें सांगून आज्ञापालन न झाल्याबद्दल ते राजाची क्षमा मागतील. ( १५–१७ )

वक्ष्यन्ति चिन्तयित्वा ते तस्योपायांश्च तान्क्षमान् ।
आनेष्यामो वयं विप्रं न च दोषो भविष्यति १८
एवमङ्गाधिपेनैव गणिकाभिर्ऋषेः सुतः ।
आनीतोऽवर्षयद्देवः शान्ता चास्मै प्रदीयते १९
ऋष्यशृङ्गस्तु जामाता पुत्रांस्तव विधास्यति ।
सनत्कुमारकथितमेतावद्व्याहृतं मया २०
अथ हृष्टो दशरथः सुमन्त्रं प्रत्यभाषत ।
यथर्ष्यशृङ्गस्त्वानीतो येनोपायेन सोच्यताम् २१

इत्यार्षे श्रीरामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे नवमः सर्गः ॥९॥ [३४०]

दशमः सर्गः ।

सुमन्त्रश्चोदितो राज्ञा प्रोवाचेदं वचस्तदा ।
यथर्ष्यशृङ्गस्त्वानीतो येनोपायेन मन्त्रिभिः ।

---

" ऋष्यशृंग मुनीला आणण्याविषयी शक्य उपाय कोणते आहेत, याचा विचार करून शक्य ते उपाय ते अमात्यप्रभृति राजाला सांगतील आणि " ह्या उपायांनी आम्ही त्या विप्राला येथे आणूं. यांत चूक होणार नाही, असें राजाला म्हणतील." याप्रमाणे अंगदेशाधिपति रोमपाद राजानें गणिकांकडून त्या ऋषिपुत्राला आणविलें असतां पर्जन्यवृष्टि झाली आहे आणि रोमपाद राजानें त्या ऋष्यशृंग मुनीला आपली शांतानामक कन्याही अर्पण केली आहे. आता तो जामाता ऋष्यशृंग तुला पुत्र प्राप्त होण्याची तजवीज करील. असो. याप्रमाणे सनत्कुमारमुनींनी ऋषींच्या संनिध तुझ्या पुत्रप्राप्तीविषयी सांगून ठेविलेलें भविष्य मीं तुला कथन केलें आहे." या प्रकारें सुमंत्रनामक मंत्र्यानें सांगितलें असतां दशरथराजा आनंदित झाला आणि " जो उपाय योजून ऋष्यशृंगमुनीला रोमपाद राजानें आणिलें, त्याविषयींची हकीगत मला सांग, " असें त्याला म्हणाला.

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी नववा सर्ग समाप्त झाला. ॥ ९ ॥

या प्रकारें दशरथराजानें विचारलें असतां सुमंत्र मंत्री म्हणाला, " रोमपाद-

तन्मे निगदितं सर्वं शृणु मे मन्त्रिभिः सह १
रोमपादमुवाचेदं सहामात्यः पुरोहितः ।
उपायो निरपायोऽयमस्माभिरभिचिन्तितः २
ऋष्यशृङ्गो वनचरस्तपः स्वाध्यायसंयुतः ।
अनभिज्ञस्तु नारीणां विषयाणां सुखस्य च ३
इन्द्रियार्थैरभिमतैर्नरचित्तप्रमाथिभिः ।
पुरमानाययिष्यामः क्षिप्रं चाध्यवसीयताम् ४
गणिकास्तत्र गच्छन्तु रूपवत्यः स्वलंकृताः ।
प्रलोभ्य विविधोपायैरानेष्यन्तीह सत्कृताः ५
श्रुत्वा तथेति राजा च प्रत्युवाच पुरोहितम् ।
पुरोहितो मन्त्रिणश्च तदा चक्रुश्च ते तथा ६
वारमुख्यास्तु तच्छ्रुत्वा वनं प्रविविशुर्महत् ।
आश्रमस्याविदूरेऽस्मिन्यत्नं कुर्वन्ति दर्शने ७

राजाच्या मंत्र्यांनी ऋष्यशृंगमुनि कसा व कोणत्या उपयांनी आणिला, हें सर्व मी सांगितलें असतां तूं मंत्र्यांसहवर्तमान श्रवण कर. अमात्यांसहवर्तमान पुरोहित रोमपादराजाला म्हणाला, " हा निर्दोष उपाय आम्ही मनामध्ये आणिला आहे. तप व वेदाध्ययन यांनी युक्त असलेला ऋष्यशृंगमुनि केवल वनामध्ये संचार करणारा असल्यामुळे स्त्रीसंबंधी शब्दादि विषय आणि सुख यांची त्याला कांहीएक माहिती नाही. याकरिता पुरुषाच्या अंतःकरणाला मोह पाडणारे असे जे प्राणिमात्राला प्रिय असलेले विषय त्यांच्या योगाने आम्ही त्याला नगरामध्ये आणवूं. यास्तव आम्ही सांगतों, तें करण्याचा सत्वर यत्न होऊं द्या. उत्तम उत्तम अलंकार घातलेल्या सुंदर सुंदर वेश्या त्या ठिकाणीं जाऊं द्या; कारण त्यांना सत्कारपूर्वक तिकडे पाठविलें असतां नाना प्रकारच्या उपायांनी त्याचे ठिकाणीं लोभ उत्पन्न करून, त्या त्या मुनीला येथे घेऊन येतील." ( १–५ )

याप्रमाणे पुरोहिताचें भाषण श्रवण केल्यावर " ठीक आहे, " म्हणून राजाने त्याला प्रत्युत्तर दिलें असतां पुरोहित व मंत्री यांनी राजाच्या अनुज्ञेप्रमाणे केलें. तदनंतर मंत्र्यांचें म्हणणें ऐकून घेऊन, मुख्य मुख्य वेश्या त्या महावनामध्ये प्रविष्ट

ऋषेः पुत्रस्य धीरस्य नित्यमाश्रमवासिनः।
पितुः स नित्यसंतुष्टो नातिचक्राम चाश्रमात् ८
न तेन जन्मप्रभृति दृष्टपूर्वं तपस्विना।
स्त्री वा पुमान्वा यच्चान्यत्सत्त्वं नगरराष्ट्रजम् ९
ततः कदाचित्तं देशमाजगाम यदृच्छया।
विभाण्डकसुतस्तत्र ताश्चापश्यद्वराङ्गनाः १०
ताश्चित्रवेषाः प्रमदा गायन्त्यो मधुरस्वरम्।
ऋषिपुत्रमुपागम्य सर्वा वचनमब्रुवन् ११
कस्त्वं किं वर्तसे ब्रह्मञ्ज्ञातुमिच्छामहे वयम्।
एकस्त्वं विजने दूरे वने चरसि शंस नः १२
अदृष्टरूपास्तास्तेन काम्यरूपा वने स्त्रियः।
हार्दात्तस्य मतिर्जाता आख्यातुं पितरं स्वकम् १३

---

झाल्या आणि त्या या शेजारच्या वनामध्ये विभांडकमुनींच्या आश्रमाचे संनिध उभ्या राहून, त्या आश्रमामध्ये नित्य वास्तव्य करीत असलेल्या त्या ज्ञानी ऋषिपुत्राचें दर्शन घेण्याविषयी यत्न करूं लागल्या; परंतु पित्याच्या लालनादिकांमुळे नित्य संतुष्ट असलेला ऋषिपुत्र ऋष्यशृंग आश्रमांतून बाहेर आला नाही. स्त्री, पित्यावाचून इतर पुरुष आणि नगरांत व राष्ट्रांत असणारे इतर प्राणी यांपैकी त्या तपस्वी ऋषिपुत्राने जन्मापासून कांहीच अवलोकन केलेलें नव्हतें. ( ६–९ )

असो. असें होतां होतां ज्या ठिकाणीं त्या वेश्या होत्या, त्या ठिकाणीं एकदा तो विभांडकमुनींचा पुत्र ऋष्यशृंग सहज आला आणि तेथे त्याने त्या उत्कृष्ट स्त्रिया अवलोकन केल्या. तेव्हा आश्चर्यकारक वेष धारण करून मधुर स्वराने गायन करीत असलेल्या त्या सर्व तरुण वेश्या ऋषिपुत्रासमीप गेल्या आणि "तूं कोण ? काय करीत असतोस ? आणि एकटा असतांना ग्रामापासून दूर असलेल्या या निर्जन वनामध्ये तूं कशाकरिता संचार करीत आहेस ? हें जाणण्याची आमची इच्छा आहे. यास्तव, हे ब्रह्मन्, तें तूं आम्हांला कथन कर," असें त्याला विचारूं लागल्या. ( १०–१२ )

पूर्वी अशा प्रकारच्या स्त्रिया वनामध्ये त्याच्या दृष्टीस पडल्या नव्हत्या

पिता विभाण्डकोऽस्माकं तस्याहं सुत औरसः ।
ऋष्यशृङ्ग इति ख्यातं नाम कर्म च मे भुवि　　१४
इहाश्रमपदोऽस्माकं समीपे शुभदर्शनाः ।
करिष्ये वोऽत्र पूजां वै सर्वेषां विधिपूर्वकम्　　१५
ऋषिपुत्रवचः श्रुत्वा सर्वासां मतिरास वै ।
तदाश्रमपदं द्रष्टुं जग्मुः सर्वास्ततोऽङ्गनाः　　१६
गतानां तु ततः पूजामृषिपुत्रश्चकार ह ।
इदमर्घ्यमिदं पाद्यमिदं मूलं फलं च नः　　१७
प्रतिगृह्य तु तां पूजां सर्वा एव समुत्सुकाः ।
ऋषेर्भीताश्च शीघ्रं तु गमनाय मतिं दधुः　　१८
अस्माकमपि मुख्यानि फलानीमानि हे द्विज ।
गृहाण विप्र भद्रं ते भक्षयस्व च मा चिरम्　　१९

आणि त्या स्त्रियांनीही मोहक रूपें धारण केलेलीं होतीं. म्हणून त्यांचे ठिकाणीं त्या ऋषिपुत्राचें प्रेम उत्पन्न झालें आणि त्यामुळे आपला पिता कोण, हें त्यांना सांगण्याची त्याला इच्छा झाली असतां तो म्हणाला, " आमचा पिता विभांडक असून, त्याचा मी औरस पुत्र आहें व ऋष्यशृंग हें माझें नांव आणि तपोरूप कर्म पृथ्वीमध्ये प्रसिद्ध आहे. हे शुभदर्शन जन हो, येथे समीपच आमचा आश्रम आहे. करिता, तुम्हां सर्वांचें मी या ठिकाणीं यथाविधि पूजन करतों. " ( १३-१५ )

याप्रमाणे ऋषिपुत्राचें म्हणणें ऐकून घेतल्यावर तो आश्रम अवलोकन करण्याविषयी त्या सर्वांनाच इच्छा झाली आणि तेथून त्या सर्व स्त्रिया तो आश्रम अवलोकन करण्याकरिता चालूं लागल्या. नंतर त्या आश्रमाला गेल्या असतां " हें अर्घ्य, हें पाद्य आणि हीं आमचीं फळेंमुळें तुम्ही स्वीकारा, " असें म्हणून ऋषिपुत्राने त्यांचें पूजन केलें. तेव्हा मोठ्या उत्सुकतेने त्या पूजेचा सर्व स्त्रियांनी स्वीकार केला आणि विभांडकमुनींना भीत असल्यामुळे तेथून सत्वर गमन करण्याचें मनामध्ये आणून त्या म्हणाल्या, " हे द्विज, आमचेपाशीही हीं उत्तम फळें आहेत. त्यांचा हे विप्रा, तूं स्वीकार कर आणि विलंब न करितां तूं तीं भक्षण कर; म्हणजे तुझें कल्याण होईल. " याप्रमाणे सांगितल्यानंतर हर्षयुक्त झालेल्या सर्व वेश्यांनी

ततस्तास्तं समालिङ्ग्य सर्वा हर्षसमन्विताः ।
मोदकान्प्रददुस्तस्मै भक्ष्यांश्च विविधाञ्छुभान् २०
तानि चास्वाद्य तेजस्वी फलानीति स मन्यते ।
अनास्वादितपूर्वाणि वने नित्यनिवासिनाम् २१
आपृच्छय च तदा विप्रं व्रतचर्यां निवेद्य च ।
गच्छन्ति स्मापदेशात्ता भीतास्तस्य पितुः स्त्रियः २२
गतासु तासु सर्वासु काश्यपस्यात्मजो द्विजः ।
अस्वस्थहृदयश्चासीद् दुःखाच्च परिवर्तते २३
ततोऽपरेद्युस्तं देशमाजगाम स वीर्यवान् ।
विभाण्डकसुतः श्रीमान्मनसा चिन्तयन्मुहुः २४
मनोज्ञा यत्र ता दृष्टा वारमुख्याः स्वलंकृताः ।
दृष्ट्वैव च ततो विप्रमायान्तं हृष्टमानसाः २५
उपसृत्य ततः सर्वास्तास्तमूचुरिदं वचः ।

त्याला आलिंगन दिलें आणि मोदक व इतरही नाना प्रकारचे शुभ भक्ष्य पदार्थ त्याला अर्पण केले. ( १६–२० )

तेव्हा त्यांनी दिलेलीं तीं फळें भक्षण केल्यावर वनामध्यें नित्य वास्तव्य करणाऱ्यांनी पूर्वी या फळांचा कधींही आस्वाद घेतलेला नाही, असें त्या तेजस्वी ऋष्यशृंगमुनीला वाटलें. नंतर त्या ऋष्यशृंगाचा निरोप घेऊन त्याच्या पित्याला भीत असलेल्या त्या स्त्रियांनी " आम्हांला कांही व्रत कर्तव्य आहे, " असें त्याला ( खोटेंच ) सांगितलें आणि त्या मिषानें त्या तेथून निघून गेल्या. याप्रमाणे त्या सर्व स्त्रिया निघून गेल्या असतां, त्या काश्यपपुत्र द्विज ऋष्यशृंगाचें अंतःकरण अस्वस्थ झालें आणि दुःखामुळे तो इकडेतिकडे फेऱ्या घालूं लागला. (२१-२३)

तदनंतर तो वैभवशाली व वीर्यवान् विभांडकपुत्र ऋष्यशृंग वारंवार मनामध्यें त्या स्त्रियांविषयी चिंतन करीत करीत दुसऱ्या दिवशीं त्या ठिकाणीं आला असतां, त्या उत्कृष्ट व मनोहर वेश्या उत्तम प्रकारें भूषित झालेल्या त्या ठिकाणीं त्याच्या दृष्टीस पडल्या. तो विप्र ऋष्यशृंग इकडे येत आहे, असें आढळून आल्याबरोबर त्या स्त्रियांच्या अंतःकरणाला आनंद झाला आणि जवळ जाऊन त्या सर्व त्याला

एह्याश्रमपदं सौम्य अस्माकमिति चाब्रुवन् २६
चित्राण्यत्र बहूनि स्युर्मूलानि च फलानि च ।
तत्राप्येष विशेषेण विधिर्हि भविता ध्रुवम् २७
श्रुत्वा तु वचनं तासां सर्वासां हृदयंगमम् ।
गमनाय मतिं चक्रे तं च निन्युस्तथा स्त्रियः २८
तत्र चानीयमाने तु विप्रे तस्मिन्महात्मनि ।
ववर्ष सहसा देवो जगत्प्रह्लादयंस्तदा २९
वर्षेणैवागतं विप्रं तापसं स नराधिपः ।
प्रत्युद्गम्य मुनिं प्राह शिरसा च महीं गतः ३०
अर्घ्यं च प्रददौ तस्मै न्यायतः सुसमाहितः ।
वव्रे प्रसादं विप्रेन्द्रान्मा विप्रं मन्युराविशेत् ३१
अन्तःपुरं प्रवेश्यास्मै कन्यां दत्त्वा यथाविधि ।
शान्तां शान्तेन मनसा राजा हर्षमवाप सः ३२

म्हणाल्या, " हे सौम्या, तूं आमच्या आश्रमाला चल. अरे, या ठिकाणीं जरी मुळें व फळें पुष्कळ असलीं, तरी त्या आमच्या आश्रमांत तर हें सर्व निःसंशय अधिक आहे. ( सारांश, या ठिकाणापेक्षा आमच्या आश्रमामध्ये तुला अधिक फळें व मुळें मिळतील. ) " (२४-२७)

याप्रमाणे अंतःकरणाला रुचणारें त्यांचें भाषण श्रवण करून त्या विप्रानेहि त्यांच्याबरोबर जाण्याचें मनामध्ये आणिलें व त्याच्या इच्छेप्रमाणे त्या स्त्रियाहि त्याला तिकडे घेऊन गेल्या. अंगदेशाकडे त्या स्त्रिया त्या महात्म्या विप्राला आणूं लागल्या असतां, एकदम पर्जन्यवृष्टि होऊन, जगताला आनंद झाला. इकडे आपल्याबरोबरच पर्जन्यवृष्टि घेऊन आलेल्या त्या विप्राला तो ( अंगदेशाधिपति रोमपाद ) राजा नम्र होऊन सामोरा गेला आणि नंतर त्याने त्याला साष्टांग नमस्कार घातला. इतकेंच नव्हे परंतु अगदी स्वस्थचित्त होऊन, त्याने त्याचें यथाविधि पूजन केलें आणि " कोप होऊं नये, एवढी कृपा व्हावी, " असें त्या श्रेष्ठ विप्रापाशी त्याने मागणें मागितलें. तदनंतर त्याला अंतःपुरांत नेऊन स्वस्थांतःकरणपूर्वक राजाने आपली कन्या शांता यथाविधि अर्पण केली आणि त्यामुळे त्या राजाला आनंद

**एवं स न्यवसत्तत्र सर्वकामैः सुपूजितः ।**
**ऋष्यशृङ्गो महातेजाः शान्तया सह भार्यया ३३**

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बाल-काण्डे दशमः सर्गः १०[३७३]

एकादशः सर्गः ।

**भूय एव हि राजेन्द्र शृणु मे वचनं हितम् ।**
**यथा स देवप्रवरः कथयामास बुद्धिमान् १**
**इक्ष्वाकूणां कुले जातो भविष्यति सुधार्मिकः ।**
**नाम्ना दशरथो राजा श्रीमान्सत्यप्रतिश्रवः २**
**अङ्गराजेन सख्यं च तस्य राज्ञो भविष्यति ।**
**कन्या चास्य महाभागा शान्ता नाम भविष्यति ३**
**पुत्रस्त्वङ्गस्य राज्ञस्तु रोमपाद इति श्रुतः ।**
**तं स राजा दशरथो गमिष्यति महायशाः ४**

---

झाला.असो. याप्रमाणे सर्व इच्छा परिपूर्ण करून उत्तम प्रकारें मानमान्यतेने रहात असलेला तो महातेजस्वी ऋष्यशृंग शांतानामक भार्येसहवर्तमान त्या ठिकाणीं राहिला. ( २८-३३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी दहावा सर्ग समाप्त झाला. ॥ १० ॥

" हे राजाधिराज दशरथा, त्या बुद्धिमान् सुरश्रेष्ठ सनत्कुमारांनी जें कथन केलें, तें हितकारक भाषण माझ्यापासून तूं पुनरपि श्रवण कर. ( सनत्कुमार म्हणाले, ) इक्ष्वाकुवंशजांच्या कुलामध्ये अत्यंत धार्मिक, वैभवशाली आणि सत्यप्रतिज्ञ असा दशरथ म्हणून राजा उत्पन्न होईल व त्या दशरथाचें अंगराजाशीं सख्य होईल. [ हा अंगराज-अंग नांवाच्या राजाचा रोमपाद या नांवाने विख्यात असा जो पुत्र भविष्यकाळीं अंगदेशाचा राजा होणार आहे, तो होय.] त्या रोमपाद राजाला शांता म्हणून एक महाभाग्यवती कन्या होईल व त्या रोमपादाकडे तो महाकीर्तिमान् दशरथराजा जाईल. ( १-४ )



नारदमुनि वाल्मीकीला रामकथा सांगत आहेत. । (सर्ग १ श्लो० ६)

अनपत्योऽस्मि धर्मात्मञ्छान्ताभर्ता मम क्रतुम् ।
आहरेत त्वयाज्ञप्तः संतानार्थं कुलस्य च ५
श्रुत्वा राज्ञोऽथ तद्वाक्यं मनसा च विचिन्त्य च ।
प्रदास्यते पुत्रवन्तं शान्ताभर्तारमात्मवान् ६
प्रतिगृह्य च तं विप्रं स राजा विगतज्वरः ।
आहरिष्यति तं यज्ञं प्रहृष्टेनान्तरात्मना ७
तं च राजा दशरथो यशस्कामः कृताञ्जलिः ।
ऋष्यशृङ्गं द्विजश्रेष्ठं वरयिष्यति धर्मवित् ८
यज्ञार्थं प्रसवार्थं च स्वर्गार्थं च नरेश्वरः ।
लभते च स तं कामं द्विजमुख्याद्विशांपतिः ९
पुत्राश्चास्य भविष्यन्ति चत्वारोऽमितविक्रमाः ।
वंशप्रतिष्ठानकराः सर्वभूतेषु विश्रुताः १०
एवं स देवप्रवरः पूर्वं कथितवान्कथाम् ।
सनत्कुमारो भगवान्पुरा देवयुगे प्रभुः ११

" हे धर्मात्म्या अंगराजा ! मी निपुत्रिक आहें; यास्तव, शांतेच्या भर्त्यानें माझ्या कुलाच्या संतानाकरिता तुझ्या अनुज्ञेने माझ्या यज्ञाचें अनुष्ठान करावें " ( असें त्याला म्हणेल ). याप्रमाणे दशरथराजाचें बोलणें ऐकून घेऊन व त्याविषयी मनामध्ये विचार करून, विचारी अंगराजा शांतेच्या पुत्रवान् भर्त्याला त्याचे स्वाधीन करील. नंतर त्याचा स्वीकार करून तो दशरथराजा निश्चिंत होईल आणि प्रसन्न मनाने तो पुत्रकामेष्टिरूप याग करील. प्रथमतः तो कीर्तीची इच्छा करणारा धर्मज्ञ दशरथराजा हात जोडून संतान आणि स्वर्ग यांची प्राप्ति व्हावी, एतदर्थ पुत्रकामेष्टिरूप यज्ञ करण्याविषयी त्या द्विजश्रेष्ठ ऋष्यशृंगाला अध्वर्यु म्हणून वरील आणि तदनंतर त्या द्विजश्रेष्ठाच्या योगाने त्या प्रजाधिपति दशरथराजाचा तो मनोरथ सिद्धीस जाईल. ( ५-९ )

सारांश, (तो पुत्रकामेष्टिरूप यज्ञ केल्यानंतर) सर्व प्राण्यांमध्ये विख्यात व वंशाची अविच्छिन्नता कायम राखणारे असे अतुलपराक्रमी चार पुत्र त्या दशरथाला होतील. याप्रमाणे पूर्वीच्या सत्ययुगामध्ये भगवान् सुरश्रेष्ठ सनत्कुमार प्रभूंनी हा

स त्वं पुरुषशार्दूल समानय सुसत्कृतम् ।
स्वयमेव महाराज गत्वा सबलवाहनः १२
सुमन्त्रस्य वचः श्रुत्वा हृष्टो दशरथोऽभवत् ।
अनुमान्य वसिष्ठं च सूतवाक्यं निशाम्य च १३
सान्तःपुरः सहामात्यः प्रययौ यत्र स द्विजः ।
वनानि सरितश्चैव व्यतिक्रम्य शनैः शनैः १४
अभिचक्राम तं देशं यत्र वै मुनिपुङ्गवः ।
आसाद्य तं द्विजश्रेष्ठं रोमपादसमीपगम् १५
ऋषिपुत्रं ददर्शाथो दीप्यमानमिवानलम् ।
ततो राजा यथान्यायं पूजां चक्रे विशेषतः १६
सखित्वात्तस्य वै राज्ञः प्रहृष्टेनान्तरात्मना ।
रोमपादेन चाख्यातमृषिपुत्राय धीमते १७
सख्यं संबन्धकं चैव तदा तं प्रत्यपूजयत् ।
एवं सुसत्कृतस्तेन सहोषित्वा नरर्षभः १८

---

वृत्तांत कथन करून ठेवलेला आहे. करिता, हे पुरुषश्रेष्ठा महाराजा, तो तूं सैन्य व वाहनें यांसहवर्तमान स्वतः जा आणि उत्कृष्ट सत्कारपूर्वक त्या ऋष्यशृंगमुनीला घेऊन ये. ( १०–१३ )

हें सुमंत्रनामक मंत्र्याचें भाषण श्रवण करून, दशरथ आनंदित झाला आणि वसिष्ठांना तें त्या सूतजातीय मंत्र्याचें म्हणणें कळवून व ऋष्यशृंगमुनीला आणण्या-विषयी त्यांची अनुमति घेऊन, अंतःपुर आणि अमात्य यांसहवर्तमान जिकडे तो द्विज होता, तिकडे जाण्याकरिता निघाला व वनें आणि नद्या यांचें हळूहळू उल्लंघन करून, जेथे तो मुनीश्रेष्ठ ऋष्यशृंग होता, त्या रोमपादराजाच्या राष्ट्रा-मध्ये गेला आणि त्या प्रदेशाला गेल्यावर अग्नीप्रमाणे देदीप्यमान असा तो द्विज-श्रेष्ठ ऋषिपुत्र रोमपादराजाचे समीप असलेला त्यानें अवलोकन केला. तदनंतर, त्या अंगराजाशीं मैत्री असल्यामुळे प्रसन्न मनानें दशरथराजानें त्याचें अत्यादर-पूर्वक यथाविधि पूजन केलें; तेव्हा, त्या बुद्धिमान ऋषिपुत्राला रोमपादराजानें असलेलें आपलें सख्य व संबंध हीं सांगितलीं असतां त्या ऋषिपुत्रानें त्याचा उलट

सप्ताष्टदिवसान्राजा राजानमिदमब्रवीत्।
शान्ता तव सुता राजन्सह भर्त्रा विशांपते १९
मदीयं नगरं यातु कार्यं हि महदुद्यतम्।
तथेति राजा संश्रुत्य गमनं तस्य धीमतः २०
उवाच वचनं विप्रं गच्छ त्वं सह भार्यया।
ऋषिपुत्रः प्रतिश्रुत्य तथेत्याह नृपं तदा २१
स नृपेणाभ्यनुज्ञातः प्रययौ सह भार्यया।
तावन्योन्याञ्जलिं कृत्वा स्नेहात्संश्लिष्य चोरसा २२
ननन्दतुर्दशरथो रोमपादश्च वीर्यवान्।
ततः सुहृदमापृच्छ्य प्रस्थितो रघुनन्दनः २३
पौरेषु प्रेषयामास दूतान्वै शीघ्रगामिनः।
क्रियतां नगरं सर्वं क्षिप्रमेव स्वलंकृतम् २४

---

सत्कार केला. याप्रमाणे अत्यंत मानमान्यतेने तो पुरुषश्रेष्ठ दशरथराजा त्या अंगराजासहवर्तमान सात आठ दिवस राहून, " हे राजा, हे प्रजाधिपते, तुझी कन्या शांता भर्त्यासहवर्तमान माझ्या नगराला येऊं दे; माझें मोठें कार्य उपस्थित झालें आहे, " असें अंगराजाला म्हणाला. (१८–२०)

तेव्हा, त्या बुद्धिमान् ऋषिपुत्राच्या गमनाविषयी दशरथाला वचन देऊन त्या रोमपादराजाने, " तूं भार्येसहवर्तमान (दशरथराजाबरोबर) जा, " असें त्या विप्राला सांगितलें असतां ऋषिपुत्रानेही तें ऐकून घेतल्यावर " ठीक आहे", म्हणून राजाला सांगितलें, आणि राजाने अनुज्ञा दिल्यावर तो भार्येसहवर्तमान दशरथाबरोबर जाण्याकरिता निघाला. त्या वेळीं एकमेकांना नमस्कार करून व स्नेहामुळे एकमेकांची कडकडून भेट घेऊन, वीर्यवान् रोमपाद आणि दशरथ हे दोघेही आनंदित झाले. तदनंतर, आपल्या सुहृदाचा निरोप घेऊन, रघुनंदन दशरथ राजा निघाला. (२१–२३)

आणि " सर्व नगर सत्वर सुशोभित करा, जिकडेतिकडे धूप लावा, सडा टाकून झाडून काढा आणि पताकांनी तें अलंकृत करा, " असा निरोप सांगून सत्वर गमन करणारे दूत त्याने नगरवासी जनांकडे पाठवून दिले. तदनंतर,

धूपितं सिक्तसंमृष्टं पताकाभिरलंकृतम् ।
ततः प्रहृष्टाः पौरास्ते श्रुत्वा राजानमागतम् २५
तथा चक्रुश्च तत्सर्वं राज्ञा यत्प्रेषितं तदा ।
ततः स्वलंकृतं राजा नगरं प्रविवेश ह २६
शङ्खदुन्दुभिनिर्ह्रादैः पुरस्कृत्वा द्विजर्षभम् ।
ततः प्रमुदिताः सर्वे दृष्ट्वा वै नागरा द्विजम् २७
प्रवेश्यमानं सत्कृत्य नरेन्द्रेणेन्द्रकर्मणा ।
यथा दिवि सुरेन्द्रेण सहस्राक्षेण काश्यपम् २८
अन्तःपुरं प्रवेश्यैनं पूजां कृत्वा च शास्त्रतः ।
कृतकृत्यं तदात्मानं मेने तस्योपवाहनात् २९
अन्तःपुराणि सर्वाणि शान्तां दृष्ट्वा तथागताम् ।
सह भर्त्रा विशालाक्षीं प्रीत्यानन्दमुपागमन् ३०
पूज्यमाना तु ताभिः सा राज्ञा चैव विशेषतः ।

( राजाचा निरोप कळल्यावर ) ते सर्व नगरवासी लोक ( दशरथराजा ऋष्य-शृंगाला घेऊन आला आहे, असें ऐकल्याबरोबर ) आनंदित झाले व राजाच्या निरोपाप्रमाणे तें सर्व त्यांनी केलें. नंतर शंख, दुंदुभि इत्यादि वाद्यांच्या घोषां-सहवर्तमान द्विजश्रेष्ठ ऋष्यशृंगाला पुढे घालून दशरथराजा आपल्या सुशोभित केलेल्या नगरामध्ये प्रविष्ट झाला. तदनंतर, देवराज इंद्र वामनाला स्वर्गामध्ये घेऊन येत आहे, असें अवलोकन केल्याबरोबर ज्याप्रमाणे स्वर्गवासी देव आनं-दित झाले होते, त्याप्रमाणे इंद्रतुल्य दशरथराजा, सत्कारपूर्वक ऋष्यशृंगनामक द्विजाला नगरामध्ये घेऊन येत आहे असें अवलोकन करून सर्व नगरवासी जन आनंदित झाले. ( २३–२८ )

नंतर ऋष्यशृंगाला अंतःपुरांत नेऊन, त्याचें यथाशास्त्र पूजन केल्यावर दशर-थराजाने ऋषिपुत्र ऋष्यशृंगाला स्वतःचे संनिध आणिल्याबद्दल आपणांला कृत-कृत्य मानिलें. असो. विशाल नेत्रांनी युक्त असलेली शांता ही आपल्या भर्त्यासह आनंदाने आल्याचें अवलोकन करून दशरथराजाच्या सर्व अंतःपुरांतील स्त्रियांना आनंद झाला आणि स्त्रियांकडून व विशेषतः राजाकडून जिचा आदर-

उवास तत्र सुखिता कंचित्कालं सहद्विजा      ३१

इत्यार्षे श्रीरामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकादशः सर्गः॥ ११॥ [४०४]

द्वादशः सर्गः ।

ततः काले बहुतिथे कस्मिंश्चित्सुमनोहरे ।
वसन्ते समनुप्राप्ते राज्ञो यष्टुं मनोऽभवत्      १
ततः प्रणम्य शिरसा तं विप्रं देववर्णिनम् ।
यज्ञाय वरयामास संतानार्थं कुलस्य च      २
तथेति च स राजानमुवाच वसुधाधिपम् ।
संभाराः संभ्रियन्तां ते तुरगश्च विमुच्यताम्      ३
सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् ।
ततोऽब्रवीन्नृपो वाक्यं ब्राह्मणान्वेदपारगान्      ४
सुमन्त्रावाहय क्षिप्रमृत्विजो ब्रह्मवादिनः ।
सुयज्ञं वामदेवं च जाबालिमथ काश्यपम्      ५
पुरोहितं वसिष्ठं च ये चान्ये द्विजसत्तमाः ।

---

सत्कार होत आहे, अशी ती शांता आपल्या भर्त्यासह कांही दिवसपर्यंत त्या ठिकाणीं सुखाने राहिली. ( २९-३१ )

याप्रमाणे श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी अकरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ११ ॥

या गोष्टीला बरेच दिवस झाल्यानन्तर एकदा अत्यंत मनोहर असा वसंतसमय प्राप्त झाला असतां पुत्रकामेष्टिरूप याग करण्याचें दशरथराजाच्या मनामध्ये आलें व मनांत आल्यानंतर कुलसंतान व्हावें, एतदर्थ याग करण्याकरिता देवांसारख्या तेजस्वी असलेल्या त्या ऋष्यशृंगविप्राला मस्तकाने प्रणाम करून याग शेवटास नेण्याविषयी राजाने त्याची प्रार्थना केली असतां " ठीक आहे, " असें सांगून तो त्या पृथ्वीपति दशरथराजाला म्हणाला, " यज्ञाच्या सामग्रीची जुळवाजुळव करा, अश्व सोडा आणि सरयूनदीच्या उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार करा " याप्रमाणे ऋष्यशृंगाने सांगितल्यानंतर दशरथराजा सुमंत्रनामक मंत्र्याला म्हणाला " हे सुमंत्रा, वेदपारंगत ब्राह्मणांना आणि वेदवेत्त्या ऋत्विजांना, सत्वर निमंत्रण

ततः सुमन्त्रस्त्वरितं गत्वा त्वरितविक्रमः ६
समानयत्स तान्सर्वान्समस्तान्वेदपारगान् ।
तान्पूजयित्वा धर्मात्मा राजा दशरथस्तदा ७
धर्मार्थसहितं युक्तं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् ।
मम तातप्यमानस्य पुत्रार्थं नास्ति वै सुखम् ८
पुत्रार्थं हयमेधेन यक्ष्यामीति मतिर्मम ।
तदहं यष्टुमिच्छामि हयमेधेन कर्मणा ९
ऋषिपुत्रप्रभावेण कामान्प्राप्स्यामि चाप्यहम् ।
ततः साध्विति तद्वाक्यं ब्राह्मणाः प्रत्यपूजयन् १०
वसिष्ठप्रमुखाः सर्वे पार्थिवस्य मुखाच्युतम् ।
ऋष्यशृङ्गपुरोगाश्च प्रत्यूचुर्नृपतिं तदा ११
संभाराः संभ्रियन्तां ते तुरगश्च विमुच्यताम् ।
सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् १२

कर. सारांश, सुयज्ञ, वामदेव, जाबालि, काश्यप, पुरोहित वसिष्ठ व इतरही श्रेष्ठ द्विज यांना निमंत्रण कर. याप्रमाणे राजाची आज्ञा झाल्यानंतर शीघ्र गमन करणारा सुमंत्र त्वरित गेला. ( १-६ )

नंतर त्या सर्व वेदपारंगत ब्राह्मणांना घेऊन आला. तेव्हा, त्यांचें पूजन करून, धर्मात्म्या दशरथराजाने धर्म व अर्थ यांना अनुसरून असलेलें असें योग्य व स्पष्ट भाषण त्यांच्याशीं केलें. (त्या वसिष्ठप्रभृति ब्राह्मणांना तो दशरथ राजा म्हणाला.) पुत्राकरिता तळमळत असलेल्या मला सुख होत नाही, यास्तव, पुत्रप्राप्ति होण्याकरिता अश्वमेधयाग करण्याचा माझा विचार आहे. तात्पर्य, अश्वमेधाचें अनुष्ठान करण्याची माझी इच्छा आहे. ( ७-९ )

ऋष्यशृंगनामक ऋषिपुत्राच्या प्रभावाने माझे मनोरथ पूर्ण होणार आहेत. याप्रमाणे राजाने भाषण केल्यानंतर वसिष्ठप्रभृति सर्व ब्राह्मणांनी " उत्तम उत्तम ! " म्हणून राजाच्या मुखांतून निघालेल्या त्या भाषणाची प्रशंसा केली. तदनंतर ऋष्यशृंगप्रभृति ऋत्विजांनी त्या राजाला प्रत्युत्तर केलें. ( ते म्हणाले अश्वमेध ) " यज्ञाच्या साहित्याची जुळवाजुळव होऊं द्या व अश्व सोडून सरयू-

सर्वथा प्राप्स्यसे पुत्रांश्चतुरोऽमितविक्रमान् ।
यस्य ते धार्मिकी बुद्धिरियं पुत्रार्थमागता १३
ततः प्रीतोऽभवद्राजा श्रुत्वा तु द्विजभाषितम् ।
अमात्यानब्रवीद्राजा हर्षेणेदं शुभाक्षरम् १४
गुरूणां वचनाच्छीघ्रं संभाराः संभ्रियन्तु मे ।
समर्थाधिष्ठितश्चाश्वः सोपाध्यायो विमुच्यताम् १५
सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् ।
शान्तयश्चाभिवर्धन्तां यथाकल्पं यथाविधि १६
शक्यः कर्तुमयं यज्ञः सर्वेणापि महीक्षिता ।
नापराधो भवेत्कष्टो यद्यस्मिन्क्रतुसत्तमे १७
छिद्रं हि मृगयन्त्येते विद्वांसो ब्रह्मराक्षसाः ।
विधिहीनस्य यज्ञस्य सद्यः कर्ता विनश्यति १८
तद्यथा विधिपूर्वं मे क्रतुरेष समाप्यते ।

नदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार होऊं द्या. हे राजा, ज्या अर्थी पुत्रप्राप्तीकरितां हा धार्मिक विचार तुझ्या मनामध्ये आला आहे, त्या अर्थी तुला अतुल, पराक्रमी, असे चार पुत्र निःसंशय प्राप्त होतील." (१०-१३)

याप्रमाणे द्विजांचें भाषण श्रवण करून दशरथराजा संतुष्ट झाला आणि शुभ शब्दांनी भरलेलें असें हें भाषण अमात्यांशीं करूं लागला. ( दशरथराजा म्हणाला, हे अमात्य हो, ) गुरूंनी सांगितल्याप्रमाणे ( अश्वमेधक्रतूच्या ) साहित्याची जुळवाजुळव करा, अश्व धरणाऱ्यांचा पराभव करण्यास समर्थ अशांच्या देखरेखीखाली व उपाध्याय बरोबर देऊन अश्व सोडा, सरयूनदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार करा आणि सूत्रांत सांगितल्याप्रमाणे ( विघ्ननिवारणार्थ ) शांतिकर्मे यथाविधि होऊं द्या. अहो, सर्वगुणसंपन्न जरी राजा झाला, तरी त्याच्या हातून हा अश्वमेधयाग शेवटास जाणें शक्य आहे काय ? या श्रेष्ठ क्रतूच्या अनुष्ठानामध्ये जर मोठासा प्रमाद नच झाला, तर मात्र तो शेवटास जाण्याचा संभव आहे; कारण विद्वान् विद्वान् ब्रह्मराक्षस या क्रतूमध्ये कोठे न्यून पडेल, हें पहात असतात आणि त्यामुळे यज्ञानुष्ठान अविधि झालें असतां याग करणाऱ्यांचा तत्काल नाश

तथा विधानं क्रियतां समर्थाः करणेष्विह १९
तथेति च ततः सर्वे मन्त्रिणः प्रत्यपूजयन् ।
पार्थिवेन्द्रस्य तद्वाक्यं यथाज्ञसमकुर्वत २०
ततो द्विजास्ते धर्मज्ञमस्तुवन्पार्थिवर्षभम् ।
अनुज्ञातास्ततः सर्वे पुनर्जग्मुर्यथागतम् २१
गतानां तेषु विप्रेषु मन्त्रिणस्तान्नराधिपः ।
विसर्जयित्वा स्वं वेश्म प्रविवेश महामतिः २२

इत्यार्षे श्रीरामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वादशः सर्गः ॥१२॥[४२६]

त्रयोदशः सर्गः ।

पुनः प्राप्ते वसन्ते तु पूर्णः संवत्सरोऽभवत् ।
प्रसवार्थं ततो यष्टुं हयमेधेन वीर्यवान् १
अभिवाद्य वसिष्ठं च न्यायतः प्रतिपूज्य च ।
अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं प्रसवार्थं द्विजोत्तमम् २

---

होतो. यास्तव, हा माझा याग यथाविधि शेवटास जाईल, अशा रीतीनें तुम्ही यत्न करा; या यज्ञाला अवश्य असलेलीं साधनें जुळविण्याविषयी तुम्ही समर्थ आहांत. ( १४–१९ )

याप्रमाणे नृपश्रेष्ठ दशरथराजाने आज्ञा केल्यानंतर राजाधिराजाच्या त्या भाषणाची सर्व मंत्र्यांनी प्रशंसा केली आणि त्याच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी सर्व तयारी केली. तदनंतर त्या ब्राह्मणांनीही त्या धर्मज्ञ नृपश्रेष्ठ दशरथाची स्तुति केली आणि त्याची अनुज्ञा घेऊन ते सर्व पुनरपि आल्या मार्गाने चालते झाले व ते विप्र गेल्यानंतर त्या मंत्र्यांना निरोप देऊन तो महाविचारी दशरथराजाही आपल्या अंत:पुरामध्ये प्रविष्ट झाला. ( २०–२२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकीप्रणीत श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी बारावा सर्ग समाप्त झाला. ॥ १२ ॥

वसंतामध्ये अश्व सोडिल्यानंतर पुनरपि वसंतऋतु प्राप्त झाला असतां संवत्सर पूर्ण झाला. तेव्हा, तो वीर्यवान् दशरथराजा संतानप्राप्त्यर्थ अश्वमेध यागाची दीक्षा घेण्याकरिता वसिष्ठांकडे गेला आणि अभिवंदनपूर्वक प्रथमतः यथाविधि

यज्ञो मे क्रियतां ब्रह्मन्यथोक्तं मुनिपुङ्गव ।
यथा न विघ्नाः क्रियन्ते यज्ञाङ्गेषु विधीयताम् ३
भवान्स्निग्धः सुहृन्मह्यं गुरुश्च परमो महान् ।
वोढव्यो भवता चैव भारो यज्ञस्य चोद्यतः ४
तथेति च स राजानमब्रवीद् द्विजसत्तमः ।
करिष्ये सर्वमेवैतद्भवता यत्समर्थितम् ५
ततोऽब्रवीद् द्विजान्वृद्धान्यज्ञकर्मसु निष्ठितान् ।
स्थापत्ये निष्ठितांश्चैव वृद्धान्परमधार्मिकान् ६
कर्मान्तिकाञ्छिल्पकारान्वर्धकीन्खनकानपि ।
गणकाञ्छिल्पिनश्चैव तथैव नटनर्तकान् ७
तथा शुचीञ्छास्त्रविदः पुरुषान्सुबहुश्रुतान् ।
यज्ञकर्म समीहन्तां भवन्तो राजशासनात् ८
इष्टका बहुसाहस्रीः शीघ्रमानीयतामिति ।
उपकार्याः क्रियन्तां च राज्ञो बहुगुणान्विताः ९

---

पूजन करून संतानाकरिता त्या द्विजश्रेष्ठ वसिष्ठमुनींना विनयाने म्हणाला, "हे ब्रह्मन्, माझा याग आपण यथाशास्त्र शेवटास न्या आणि हे मुनिश्रेष्ठ, यज्ञांगांमध्ये ब्रह्म-राक्षसप्रभृति विघ्नें आणणार नाहीत, अशा रीतीनें आपण तें अनुष्ठान पार पाडण्याची तजवीज ठेवा. स्नेहयुक्त असे माझे सुहृद् आपणच असून, मुख्य गुरुही आपणच आहांत. करिता हें हातीं घेतलेलें यज्ञाचें ओझें शेवटास नेण्याचा भार आपल्याच शिरावर आहे. यावर ते द्विजश्रेष्ठ वसिष्ठमुनि म्हणाले, "ठीक आहे; तुझ्या प्रार्थनेप्रमाणे मी हें सर्व कांही करीन" ( १–५ )

तदनंतर यज्ञानुष्ठानामध्ये प्रवीण असे वृद्ध–वृद्ध द्विज, कलाकौशल्याच्या कामामध्ये निपुण आणि अत्यंत धार्मिक असे वृद्ध–वृद्ध शिल्पी व निरवानिरव करणारे मजूर, सुतार, खणणारे, ज्योतिषी, कारागीर आणि त्याचप्रमाणे सूत्रधार, नृत्य करणारे व तसेच चांगले बहुश्रुत, शास्त्रज्ञ व आचरणांनी शुद्ध असे लोक यांना ते म्हणाले "तुम्ही राजाच्या आज्ञेवरून यज्ञानुष्ठान पार पाडण्याची तजवीज ठेवा. पुष्कळ हजार विटा प्रथम आणा, बहुगुणसंपन्न असे राजवाडे तयार करा.(६–९)

ब्राह्मणावसथाश्चैव कर्तव्याः शतशः शुभाः ।
भक्ष्यान्नपानैर्बहुभिः समुपेताः सुनिष्ठिताः १०
तथा पौरजनस्यापि कर्तव्याश्च सुविस्तराः ।
आगतानां सुदूराच्च पार्थिवानां पृथक्पृथक् ११
वाजिवारणशालाश्च तथा शय्यागृहाणि च ।
भटानां महदावासा वैदेशिकनिवासिनाम् १२
आवासा बहुभक्ष्या वै सर्वकामैरुपस्थिताः ।
तथा पौरजनस्यापि जनस्य बहुशोभनम् १३
दातव्यमन्नं विधिवत्सत्कृत्य न तु लीलया ।
सर्वे वर्णा यथा पूजां प्राप्नुवन्ति सुसत्कृताः १४
न चावज्ञा प्रयोक्तव्या कामक्रोधवशादपि ।
यज्ञकर्मसु येऽव्यग्राः पुरुषाः शिल्पिनस्तथा १५
तेषामपि विशेषेण पूजा कार्या यथाक्रमम् ।
ये स्युः संपूजिताः सर्वे वसुभिर्भोजनेन च १६

---

त्याचप्रमाणे अनेक प्रकारच्या भक्ष्य, भोज्य व पेय पदार्थांनी युक्त आणि (पर्जन्याला वगैरे न जुमानण्यासारखीं) बळकट अशीं ब्राह्मणाकरिता शेकडो शुभ वसतिस्थानें तयार करा व नगरवासी जनांना राहण्याकरिताही चांगलीं विस्तृत घरें तयार करा. फार लांबून आलेल्या राजांकरिता पृथक् पृथक् अश्वशाला, गजशाला आणि शय्यागृहें तयार ठेवा. मोठमोठ्या लोकांना राहण्याला योग्य अशीं वसतिस्थानें तयार करा आणि परदेशांतील योद्ध्यांकरिता सर्व भोग्य वस्तूंनी संपन्न आणि विपुल भक्ष्य पदार्थांनी युक्त अशीं वसतिस्थानें तयार ठेवा आणि नगरवासी जन व इतर सामान्य लोक यांचींही वसतिस्थानें उत्तम प्रकारें बनवा. (१०–१३)

अनादर न करितां म्हणजे सर्व वर्णांच्या लोकांची सत्कारपूर्वक मानमान्यता होईल, अशा रीतीने आदरपूर्वक यथाविधि अन्नदान करा. काम आणि क्रोध यांचे तावडींत सांपडण्यासारिखा जरी प्रसंग असला, तरी कोणाचीही अवज्ञा होता उपयोगी नाही. यज्ञकर्मामध्ये जे पुरुष गढून गेलेले असतील, त्यांचीच केवळ

यथा सर्वं सुविहितं न किंचित्परिहीयते ।
यथा भवन्तः कुर्वन्तु प्रीतियुक्तेन चेतसा १७
ततः सर्वे समागम्य वसिष्ठमिदमब्रुवन् ।
यथेष्टं तत्सुविहितं न किंचित्परिहीयते १८
यथोक्तं तत्करिष्यामो न किंचित्परिहास्यते ।
ततः सुमन्त्रमाहूय वसिष्ठो वाक्यमब्रवीत् १९
निमन्त्रयस्व नृपतीन्पृथिव्यां ये च धार्मिकाः ।
ब्राह्मणान्क्षत्रियान्वैश्याञ्छूद्रां×श्चैव सहस्रशः २०
समानयस्व सत्कृत्य सर्वदेशेषु मानवान् ।
मिथिलाधिपतिं शूरं जनकं सत्यवादिनम् २१
तमानय महाभागं स्वयमेव सुसत्कृतम् ।
पूर्वं संबन्धिनं ज्ञात्वा ततः पूर्वं ब्रवीमि ते २२

नव्हे; परंतु, शिल्पी लोकांचीही योग्यतेच्या क्रमाला अनुसरून विशेषेंकरून मानमान्यता राहिली पाहिजे. धन आणि भोजन यांच्या योगानें सर्वांची मानमान्यता राहील, अशारीतीनें आनंदयुक्त अंतःकरणानें तुम्ही सर्व तजवीज ठेवा; म्हणजे सर्व यथास्थित होऊन कशाचीही उणीव पडणार नाही." ( १४–१७ )

याप्रमाणे वसिष्ठांनी सांगितल्यानंतर सर्वजण त्यांचे समीप येऊन म्हणाले "आपण जसें मनामध्ये आणिलें आहे, तसें सर्व यथास्थित होईल; कांही कमी पडणार नाही. सारांश, आपल्या आज्ञेप्रमाणे आम्ही तें सर्व करूं; कांही न्यून पडणार नाही." याप्रमाणे त्यांनी सांगितल्यानंतर वसिष्ठांनी सुमंत्राला हाक मारून सांगितलें, "पृथ्वीमध्यें जे कोणी धार्मिक राजे असतील, त्यांना निमंत्रण कर. हजारो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे सर्व देशांतील लोक सत्कारपूर्वक ( यज्ञसमारंभाकरिता बोलावून ) आण. शूर आणि सत्यवादी असा जो महाभाग्यवान् मिथिलाधिपति जनक त्याला उत्तम सत्कारपूर्वक तूं स्वतः घेऊन ये. तो संबंधी होणार आहे, असें पूर्वींच मला समजून आलें असल्यामुळे त्याला निमंत्रण

× श्लोक २०– या वर्णनावरून, अशा मोठमोठ्या धार्मिक समारंभांत ब्राह्मणांप्रमाणेच शूद्रांनांही आदरपूर्वक आमंत्रण असे. शूद्र समाजबाह्य मानले जात नसत.

तथा काशिपतिं स्निग्धं सततं प्रियवादिनम् ।
सद्वृत्तं देवसंकाशं स्वयमेवानयस्व ह २३
तथा केकयराजानं वृद्धं परमधार्मिकम् ।
श्वशुरं राजसिंहस्य सपुत्रं तमिहानय २४
अङ्गेश्वरं महेष्वासं रोमपादं सुसत्कृतम् ।
वयस्यं राजसिंहस्य सपुत्रं तमिहानय २५
तथा कोसलराजानं भानुमन्तं सुसत्कृतम् ।
मागधाधिपतिं शूरं सर्वशास्त्रविशारदम् २६
प्राप्तिज्ञं परमोदारं सत्कृतं पुरुषर्षभम् ।
राज्ञः शासनमादाय चोदयस्व नृपर्षभान् २७
प्राचीनान्सिन्धुसौवीरान्सौराष्ट्रेयांश्च पार्थिवान् ।
दाक्षिणात्यान्नरेन्द्रांश्च समस्तानानयस्व ह २८
सन्ति स्निग्धाश्च ये चान्ये राजानः पृथिवीतले ।
तानानय यथा क्षिप्रं सानुगान्सहबान्धवान् २९

करण्याविषयी मी तुला प्रथम सांगत आहें. (१८-२२)

त्याचप्रमाणे आपणांविषयी प्रेम धरणारा प्रियवादी आणि सदाचरणी असा जो देवासारिखा तेजस्वी काशिराजा त्याला तूं स्वतःच घेऊन ये. त्याचप्रमाणे अत्यंत धार्मिक व वृद्ध असा जो नृपश्रेष्ठ दशरथाचा श्वशुर केकयराजा त्याला पुत्रासहवर्तमान तूं येथे घेऊन ये. तसाच नृपश्रेष्ठ दशरथाचा मित्र जो महाधनुर्धारी अंगदेशाधिपति रोमपाद त्याला पुत्रांसह वर्तमान चांगल्या सत्काराने तूं येथे आण. तसेंच कोशलदेशाधिपति भानुमानाला सत्कारपूर्वक घेऊन ये आणि त्याचप्रमाणे शूर, सर्व शास्त्रांमध्ये निपुण, समय जाणणारा आणि अत्यंत उदार अशा पुरुषश्रेष्ठ मगध राजालाहि घेऊन ये व राजाची आज्ञा घेऊन इतरही नृपश्रेष्ठांना इकडे येण्याविषयी प्रेरणा कर. ( २३-२७ )

पूर्व देशांतील, दक्षिण देशांतील आणि त्याचप्रमाणे सिंधु, सौवीर व सौराष्ट्र या देशांतील सर्व राजांना तूं घेऊन ये. त्याचप्रमाणे दशरथाशीं प्रेमाने वागणारे जे आणखी राजे भूतलावर असतील, त्यांना सेवक आणि बांधव यांसहवर्तमान

एतान्दूतैर्महाभागैरानयस्व नृपाज्ञया ३०
वसिष्ठवाक्यं तच्छ्रुत्वा सुमन्त्रस्त्वरितं तदा ।
व्यादिशत्पुरुषांस्तत्र राज्ञामानयने शुभान् ३१
स्वयमेव हि धर्मात्मा प्रयातो मुनिशासनात् ।
सुमन्त्रस्त्वरितो भूत्वा समानेतुं महामतिः ३२
ते च कर्मान्तिकाः सर्वे वसिष्ठाय महर्षये ।
सव निवेदयन्ति स्म यज्ञे यदुपकल्पितम् ३३
ततः प्रीतो द्विजश्रेष्ठस्तान्सर्वान्मुनिरब्रवीत् ।
अवज्ञया न दातव्यं कस्यचिल्लीलयापि वा ३४
अवज्ञया कृतं हन्याद्दातारं नात्र संशयः ।
ततः कैश्चिदहोरात्रैरुपयाता महीक्षितः ३५
बहूनि रत्नान्यादाय राज्ञो दशरथस्य ह ।
ततो वसिष्ठः सुप्रीतो राजानमिदमब्रवीत् ३६
उपयाता नरव्याघ्र राजानस्तव शासनात् ।

तूं जसे सत्वर आणतां येईल तसें आण. सारांश, यांना मोठ्या योग्यतेचे दूत पाठवून राजाच्या आज्ञेने तू घेऊन ये " ( २८-३० )

तें वसिष्ठांचें भाषण श्रवण करून सुमंत्राने राजांना आणण्याकरिता ( आचरणाने ) पवित्र अशा पुरुषांना सत्वर आज्ञा केली आणि वसिष्ठमुनींच्या आज्ञेप्रमाणे तो धर्मात्मा महाविचारी सुमंत्र ( कांहीं राजांना आणण्याकरिता ) सत्वर स्वतः गेला. नंतर ते सर्व काम करणारे लोक वसिष्ठ महर्षींकडे आले व यज्ञासंबंधाने जें कांहीं साहित्य जुळविण्यास त्यांना सांगितलें होतें, तें जुळविलें, म्हणून त्यांनी त्यांना निवेदन केलें, तेव्हा ते द्विजश्रेष्ठ वसिष्ठ मुनि संतुष्ट, होऊन त्या सर्वांना म्हणाले, " अनादर करून अथवा अश्रद्धेने कोणाला तुम्ही कांहीं देऊं नका; ( हें मी आणखी एकदा सांगून ठेवितों ) कारण, अवज्ञेने केलेलें दान दात्याचा नाश करितें, यांत संशय नाहीं. " यानंतर बोलाविलेले राजे कांहीं दिवसांनी पुष्कळ रत्नें बरोबर घेऊन दशरथ राजाकडे आले असतां, वसिष्ठ सुप्रसन्न होऊन, राजाला म्हणाले. ( ३१-३६ )

मयापि सत्कृताः सर्वे यथार्हं राजसत्तम ३७
याज्ञियं च कृतं सर्वं पुरुषैः सुसमाहितैः ।
निर्यातु च भवान्यष्टुं यज्ञायतनमन्तिकात् ३८
सर्वकामैरुपहृतैरुपेतं वै समन्ततः ।
द्रष्टुमर्हसि राजेन्द्र मनसेव विनिर्मितम् ३९
तथा वसिष्ठवचनादृष्यशृङ्गस्य चोभयोः ।
दिवसे शुभनक्षत्रे निर्यातो जगतीपतिः ४०
ततो वसिष्ठप्रमुखाः सर्व एव द्विजोत्तमाः ।
ऋष्यशृङ्गं पुरस्कृत्य यज्ञकर्मारभंस्तदा ४१
यज्ञवाटं गताः सर्वे यथाशास्त्रं यथाविधि ।
श्रीमांश्च सह पत्नीभी राजा दीक्षामुपाविशत् ४२

इत्यार्षे श्रीरामायणे आदिकाव्ये बालकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥१३॥ [४६८]

चतुर्दशः सर्गः ।

अथ संवत्सरे पूर्णे तस्मिन्प्राप्ते तुरङ्गमे ।

---

हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या आज्ञेवरून राजे आले आहेत, व हे राजाधिराज, योग्यतेनुरुप, मी सर्वांचा सत्कारही केला आहे. आपआपल्या कामांविषयी अतिशय दक्ष असलेल्या लोकांनी यज्ञाला लागणाऱ्या सर्व पदार्थांची सिद्धता ठेविली आहे. यास्तव यजन करण्याकरिता तूं यज्ञभूमीसमीप जा आणि इष्ट पदार्थांनी ( अत्यंत सत्वर ) युक्त झालेली आणि म्हणूनच मनाच्या योगानेच निर्माण केल्यासारखी असलेली यज्ञभूमि, हे राजाधिराज तूं चोहोंबाजूंनी अवलोकन कर." तदनंतर वसिष्ठ आणि ऋष्यशृंग या उभयतांनी सांगितल्यावरून शुभ नक्षत्रांनी युक्त अशा दिवशीं भूपति दशरथ ( यज्ञभूमीकडे जाण्याकरिता ) निघाला. तेव्हा वासिष्ठप्रभृति सर्व द्विजश्रेष्ठ ऋष्यशृंगाला पुढे करून यज्ञमंडपामध्ये गेले आणि त्या सर्वांनी सूत्र आणि शास्त्र यांना अनुसरून यज्ञकर्माला आरंभ केला असतां, पत्न्यांसहवर्तमान त्या वैभवशाली राजाने यज्ञदीक्षा घेतली. ( ३७-४२ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीरामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

सरय्वाश्चोत्तरे तीरे राज्ञो यज्ञोऽभ्यवर्तत　　१
ऋष्यशृङ्गं पुरस्कृत्य कर्म चक्रुर्द्विजर्षभाः ।
अश्वमेधे महायज्ञे राज्ञोऽस्य सुमहात्मनः　　२
कर्म कुर्वन्ति विधिवद्याजका वेदपारगाः ।
यथाविधि यथान्यायं परिक्रामन्ति शास्त्रतः　　३
प्रवर्ग्यं शास्त्रतः कृत्वा तथैवोपसदं द्विजाः ।
चक्रुश्च विधिवत्सर्वमधिकं कर्म शास्त्रतः　　४
अभिपूज्य तदा हृष्टाः सर्वे चक्रुर्यथाविधि ।
प्रातःसवनपूर्वाणि कर्माणि मुनिपुङ्गवाः　　५
ऐन्द्रश्च विधिवद्दत्तो राजा चाभिषुतोऽनघः ।
मध्यंदिनं च सवनं प्रावर्तत यथाक्रमम्　　६
तृतीयसवनं चैव राज्ञोऽस्य सुमहात्मनः ।
चक्रुस्ते शास्त्रतो दृष्ट्वा यथा ब्राह्मणपुङ्गवाः　　७

---

तदनंतर संवत्सर पूर्ण होऊन तो सोडिलेला अश्व पुनरपि प्राप्त झाला असतां, सरयू नदीचे उत्तर तीरीं दशरथ राजाच्या यज्ञाला आरंभ झाला. त्या महात्म्या दशरथ राजाच्या यज्ञाच्या अश्वमेधनामक महाक्रतूमध्ये ऋष्यशृंग मुनींना मुख्य आर्त्विज्य देऊन, (म्हणजे ब्रह्मत्व देऊन) द्विजश्रेष्ठांनी अनुष्ठान केलें. वेदपारंगत याजक यज्ञाचें अनुष्ठान यथाविधि करूं लागले आणि श्रुति ( पूर्वमीमांसारूप ) न्याय आणि शास्त्र यांना अनुसरून आपआपलें अनुष्ठान करण्याविषयी ते प्रवृत्त झाले. प्रवर्ग्य, उपसद इष्टि आणि इतरही जें कांही अधिक सांगितलेलें होतें, तें सर्व कर्म, शास्त्र आणि श्रुति यांचें अतिक्रमण न करितां, ब्राह्मणांनी केलें. ( १-४ )

ज्या ज्या कर्माची जी जी देवता, तिचें तिचें पूजन करून आनंदित झालेल्या श्रेष्ठ मुनींनी प्रातःसवनप्रभृति सर्व कर्मे यथाविधि केलीं. इन्द्रदेवतेला उद्देशून यथाविधि हविर्भाग दिला; पवित्र सोमवल्ली कुटून तिचा रस काढिला आणि नंतर क्रमाला अनुसरून माध्यंदिनसवन ( या नांवाचें अनुष्ठान ) सुरू झालें व तें झाल्यावर त्या राजाच्या अश्वमेधासंबंधी तृतीय सवनसंज्ञक कर्महीं श्रेष्ठ ब्राह्मणांनी

आह्वयांचक्रिरे तत्र शक्रादीन्विबुधोत्तमान् ।
ऋष्यशृङ्गादयो मन्त्रैः शिक्षाक्षरसमन्वितैः ८
गीतीभिर्मधुरैः स्निग्धैर्मन्त्राह्वानैर्यथार्हतः ।
होतारो ददुरावाह्य हविर्भागान्दिवौकसाम् ९
न चाहुतमभूत्तत्र स्खलितं वा न किंचन ।
दृश्यते ब्रह्मवत्सर्वं क्षेमयुक्तं हि चक्रिरे १०
न तेष्वहःसु श्रान्तो वा क्षुधितो वा न दृश्यते ।
नाविद्वान्ब्राह्मणः कश्चिन्नाशतानुचरस्तथा ११
ब्राह्मणा भुञ्जते नित्यं नाथवन्तश्च भुञ्जते । ×
तापसा भुञ्जते चापि श्रमणाश्चैव भुञ्जते १२
वृद्धाश्च व्याधिताश्चैव स्त्रीबालाश्च तथैव च ।
अनिशं भुञ्जमानानां न तृप्तिरुपलभ्यते १३

---

शास्त्रांत अवलोकन करून यथाविधि केलें. शिक्षेनुरूप वर्णोच्चाराने युक्त असलेल्या मंत्रांच्या योगाने त्या क्रतूमध्ये ऋष्यशृंग ज्यांत मुख्य आहेत, अशा ऋत्विजांनी इंद्रप्रभृति श्रेष्ठ देवांचें आवाहन केलें. मधुर सामें आणि भक्तियुक्त समंत्रक आह्वानें यांच्या योगाने आवाहनपूर्वक होत्यांनी ज्याच्यात्याच्या मानाप्रमाणे देवांना हविर्भाग दिले. त्या क्रतूमध्ये प्रमाद अथवा अविधि हवन यत्किंचित्‌ही न होतां ऋत्विजांनी तें सर्व अनुष्ठान समंत्रक व निर्विघ्नपणें तडीस नेलें. ( ५-१० )

तें अनुष्ठान जितकें दिवस चाललें होतें, तितक्या दिवसांत त्या यज्ञमंडपामध्ये श्रांत, क्षुधित, अविद्वान् आणि शंभर खटपटी ज्याच्या हाताखाली नाहीत, असा कोणीही ब्राह्मण दृष्टोत्पत्तीस आला नाही. ब्राह्मण (म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र), तापस आणि श्रमण ( म्हणजे संन्यासी ) हे त्या ठिकाणीं भोजन करीत असत. वृद्ध, व्याधिग्रस्त, स्त्रिया व बालक हे एकसारिखे भोजन करीत असतांनाही ( यजमान दशरथ राजाला त्यांना भोजन घालणें ) पुरेंसें झालें नाही. अन्न या

---

× ब्राह्मणासारखेच शूद्रांनाही आदरपूर्वक भोजन घातले जात असे. अन्नदाना-संबंधांत ब्राह्मण, ब्राह्मणेतर किंवा शूद्र असा भेद केव्हांही बाळगला जात नसे.

दीयतां दीयतामन्नं वासांसि विविधानि च ।
इति संचोदितास्तत्र तथा चक्रुरनेकशः १४
अन्नकूटाश्च दृश्यन्ते बहवः पर्वतोपमाः ।
दिवसे दिवसे तत्र सिद्धस्य विधिवत्तदा १५
नानादेशादनुप्राप्ताः पुरुषाः स्त्रीगणास्तथा ।
अन्नपानैः सुविहितास्तस्मिन्यज्ञे महात्मनः १६
अन्नं हि विधिवत्स्वादु प्रशंसन्ति द्विजर्षभाः ।
'अहो तृप्ताः स्म' 'भद्रं त' इति शुश्राव राघवः १७
स्वलंकृताश्च पुरुषा ब्राह्मणान्पर्यवेशयन् ।
उपासन्ते च तानन्ये सुमृष्टमणिकुण्डलाः १८
कर्मान्तरे तदा विप्रा हेतुवादान्बहूनपि ।
प्राहुः सुवाग्मिनो धीराः परस्परजिगीषया १९
दिवसे दिवसे तत्र संस्तरे कुशला द्विजाः ।

आणि नानाप्रकारचीं वस्त्रें देऊन टाका, अशी आज्ञा अनेक वेळा त्या यज्ञमंडपामध्ये अधिकारी पुरुषांना होत असे व ते त्याप्रमाणे करीत असत. पाकशास्त्रांत सांगितल्याप्रमाणे तयार केलेल्या अन्नाचे पर्वतासारिखे असंख्य ढीग प्रत्यहीं त्या ठिकाणीं दृष्टी पडत असत; आणि देशोदेशींहून आलेले पुरुष आणि स्त्रीसमुदाय यांची त्या महात्म्या दशरथाच्या यज्ञामध्ये अन्नपानांच्या योगानें उत्तम प्रकारची व्यवस्था ठेविली जात असे. ( ११–१६ )

पाकशास्त्रांत सांगितल्याप्रमाणे तयार केलेल्या मिष्ट अन्नाची द्विजश्रेष्ठ प्रशंसा करीत असत आणि त्यामुळे " हे राजा, आम्ही तृप्त झालों; तुझें कल्याण असो, " असें रघुवंशज दशरथाच्या कानी येत असे. उत्तम उत्तम भूषणें धारण केलेले पुरुष ब्राह्मणांना वाढीत असत आणि अत्यंत उज्ज्वल रत्नकुंडल धारण केलेले असे इतर लोक त्यांचा समाचार घेत असत. एका कर्माची समाप्ति होऊन दुसऱ्या कर्माचा आरंभ होईपर्यंत असणाऱ्या मधल्या वेळांत एकमेकांना जिंकण्याच्या इच्छेनें मोठमोठ्या विद्वान् वक्त्यांचे हेतुपुरःसर अनेक प्रकारचे वाद चालत असत. त्या यज्ञामध्ये अनुष्ठानविषयी निपुण असलेले ब्राह्मण यथाशास्त्र ( प्रेषप्रभृति )

सर्वकर्माणि चक्रुस्ते यथाशास्त्रं प्रचोदिताः २०
नाषडङ्गविदत्रासीन्नाव्रतो नाबहुश्रुतः ।
सदस्यास्तस्य वै राज्ञो नावादकुशलो द्विजः २१
प्राप्ते यूपोच्छ्रये तस्मिन्षड्बैल्वाः खादिरास्तथा ।
तावन्तो बिल्वसहिताः पर्णिनश्च तथापरे २२
श्लेष्मातकमयो दिष्टो देवदारुमयस्तथा ।
द्वावेव तत्र विहितौ बाहुव्यस्तपरिग्रहौ २३
कारिताः सर्व एवैते शास्त्रज्ञैर्यज्ञकोविदैः ।
शोभार्थं तस्य यज्ञस्य कांचनालंकृताभवन् २४
एकविंशतियूपास्ते एकविंशत्यरत्नयः ।
वासोभिरेकविंशद्भिरेकैकं समलंकृताः २५
विन्यस्ता विधिवत्सर्वैः शिल्पिभिः सुकृता दृढाः ।
अष्टास्रयः सर्व एव श्लक्ष्णरूपसमान्विताः २६

प्रेरणा झाली असतां प्रत्यही सर्व कर्मे करीत असत. ( १७–२० )

त्या राजाच्या यज्ञमंडपामध्ये ( अनुष्ठान पाहणारे ) जे सदस्य होते, त्यांत ( शिक्षाप्रभृति ) षडंगांचें ज्ञान नसणारा, व्रतस्थ न राहणारा, बहुश्रुत नसणारा आणि त्याचप्रमाणे वादामध्ये कुशल नसणारा असा कोणीही ब्राह्मण नव्हता. यूप उभारण्याचा समय प्राप्त झाला असतां सहा बेलाचे, सहा खैराचे आणि एकेका बेलाच्या यूपासमीप एकेक असे सहा पळसाचे यूप त्या ठिकाणीं आणिले होते. यूपांमध्ये श्लेष्मातक वृक्षाचा एक यूप होता; परंतु, देवदारु वृक्षाचा यूप केवळ एकच नसून वेंगेत बसण्यासारिखे स्थूल असे दोन यूप होते. हे सर्व यूप यज्ञानुष्ठानामध्ये निष्णात अशा शिल्पशास्त्रवेत्त्यांकडून करविलेले होते आणि त्या क्रतूला शोभा येण्याकरिता त्यांना सुवर्णाचे अलंकार घातलेले होते. एकवीस एकवीस हात लांब असलेले ते यूप एकवीस एकवीस वस्त्रांनी एक एक याप्रमाणे अलंकृत केलेले होते. ( २१–२५ )

त्या सर्वच यूपांची ठेवण मनोहर असून ते सर्व अष्टकोणाकृति होते व शिल्पी लोकांनी ते चांगले व मजबूत तयार केलेले होते. असो. त्यांची यथाविधि स्थापना

आच्छादितास्ते वासोभिः पुष्पैर्गन्धैश्च पूजिताः ।
सप्तर्षयो दीप्तिमन्तो विराजन्ते यथा दिवि २७
इष्टकाश्च यथान्यायं कारिताश्च प्रमाणतः ।
चितोऽग्निर्ब्राह्मणैस्तत्र कुशलैः शिल्पकर्मणि २८
स चित्यो राजसिंहस्य संचितः कुशलैर्द्विजैः ।
गरुडो रुक्मपक्षो वै त्रिगुणोऽष्टादशात्मकः २९
नियुक्तास्तत्र पशवस्तत्तदुद्दिश्य दैवतम् ।
उरगाः पक्षिणश्चैव यथाशास्त्रं प्रचोदिताः ३०
शामित्रे तु हयस्तत्र तथा जलचराश्च ये ।
ऋषिभिः सर्वमेवैतन्नियुक्तं शास्त्रतस्तदा ३१
पशूनां त्रिशतं तत्र यूपेषु नियतं तदा ।
अश्वरत्नोत्तमं तत्र राज्ञो दशरथस्य ह ३२

करून वस्त्रांच्या योगानें त्यांचें आच्छादन व गंधपुष्पांनी पूजन झालें असतां स्वर्गामध्यें शोभत असलेल्या देदीप्यमान सप्तर्षींप्रमाणे ते शोभूं लागले. कल्पसूत्रांत सांगितल्याप्रमाणे प्रमाणाला अनुसरून इष्टका ( म्हणजे विटा ) तयार करविल्या होत्या आणि त्यांच्या योगानें शिल्पकर्मामध्यें कुशल ब्राह्मणांनी अग्नीला आधार-भूत असें स्थान रचून तयार केलें होतें. नृपश्रेष्ठ दशरथ राजाचा, शिल्पकर्मा-मध्यें निष्णात असलेल्या ब्राह्मणांनी तयार केलेला तो त्रिगुणित व अष्टादशात्मक चयन सुवर्णपक्षांनी युक्त अशा गरुडपक्ष्याच्या आकृतीसारिखा झाला. त्या त्या देवतेच्या उद्देशानें त्या ठिकाणीं पशु बांधून ठेविले होते व विधीनें सांगितल्या-प्रमाणे सर्प व पक्षी यांचीही त्या ठिकाणीं यथाशास्त्र योजना केलेली होती. (२६-३०)

इतकेंच नव्हे परंतु, शामित्रसंज्ञक कर्माकरिता ( म्हणजे मारणें, फाडणें इत्यादि कामांकरिता ) अश्व आणि त्याचप्रमाणे विहित असलेले जलचर प्राणी त्या ठिकाणीं योजून ठेविले होते. सारांश, ऋषींनी शास्त्राच्या अनुरोधानें हें सर्व योजून ठेविलें होतें. दशरथराजाच्या त्या यज्ञमंडपामध्यें यूपांचे ठिकाणीं तीनशे पशु बांधून ठेविले होते आणि त्याचप्रमाणे उत्कृष्ट अश्वांमध्येही उत्कृष्ट असा अश्वही बांधून ठेविला होता. नंतर कौसल्येनें त्या मंडपामध्यें त्या अश्वाभोवती प्रदक्षिणा

कौसल्या तं हयं तत्र परिचर्य समन्ततः ।
कृपाणैर्विशशासैनं त्रिभिः परमया मुदा ३३
पतत्रिणा तदा सार्धं सुस्थितेन च चेतसा ।
अवसद्रजनीमेकां कौसल्या धर्मकाम्यया ३४
होताध्वर्युस्तथोद्गाता हयेन समयोजयन् ।
महिष्या परिवृक्त्याथ वावातामपरां तथा ३५
पतत्रिणस्तस्य वपामुद्धृत्य नियतेन्द्रियः ।
ऋत्विक्परमसंपन्नः श्रपयामास शास्त्रतः ३६
धूमगन्धं वपायास्तु जिघ्रति स्म नराधिपः ।
यथाकालं यथान्यायं निर्णुदन्पापमात्मनः ३७
हयस्य यानि चाङ्गानि तानि सर्वाणि ब्राह्मणाः ।
अग्नौ प्रास्यन्ति विधिवत्समस्ताः षोडशर्त्विजः ३८

केली, अतिशय आनंदाने तीन तलवारींनी त्याला फाडलें आणि नंतर धर्मकामना मनामध्ये आणून स्वस्थांतःकरणपूर्वक त्या गरुडासारख्या वेगवान् अश्वासमीप त्या कौसल्येने एक रात्र रक्षणार्थ वास्तव्य केलें. × होता, अध्वर्यु आणि उद्गाता यांनी महिषी म्हणजे राजाची पट्टराणी कौसल्या, परिवृक्ती म्हणजे राजाची दुसरी राणी सुमित्रा, आणि वावाता म्हणजे राजाची तिसरी राणी कैकयी, यांचें त्या अश्वासन्निध ( रक्षणार्थ ) वास्तव्य करविलें. ( ३१–३५ )

नन्तर त्या अश्वाची वपा ( अर्थात् चंद्रनामक मेद ) काढून प्रयोगचातुर्याने संपन्न अशा एका जितेंद्रिय ऋत्विजाने ती यथाशास्त्र शिजविण्यास आरंभ केला असतां स्वतःच्या पापाचें निरसन करण्याकरिता त्या दशरथ राजाने योग्य कालीं यथाविधि वपेचा धूमगंध घेतला. नंतर अश्वाचीं जीं हवनीय अंगें, त्या सर्वांचें त्या

× भाषान्तर श्लोक ३४ व ३५ मध्ये यद्यपि राजाच्या स्वजातीच्या पट्टराणीला ‘ महिषी, ’ दुसऱ्या वैश्यजातीच्या राणीला ‘ परिवृक्ति ’ व तिसऱ्या शूद्रजातीच्या राणीला ‘ वावाता ’ अशी संज्ञा आहे; तथापि या ठिकाणीं दशरथ राजाच्या तीघीही राण्या क्षत्रिय जातीच्याच असल्याकारणाने कौसल्या महिषी, सुमित्रा परिवृक्ति व कैकयी वावाता असा अर्थ केला आहे.

प्लक्षशाखासु यज्ञानामन्येषां क्रियते हविः ।
अश्वमेधस्य यज्ञस्य वैतसो भाग इष्यते ३९
त्र्यहोऽश्वमेधः संख्यातः कल्पसूत्रेण ब्राह्मणैः ।
चतुष्टोममहस्तस्य प्रथमं परिकल्पितम् ४०
उक्थ्यं द्वितीयं संख्यातमतिरात्रं तथोत्तरम् ।
कारितास्तत्र बहवो विहिताः शास्त्रदर्शनात् ४१
ज्योतिष्टोमायुषी चैवमतिरात्रौ च निर्मितौ ।
अभिजिद्विश्वजिच्चैवमाप्तोर्यामौ महाक्रतुः ४२
प्राचीं होत्रे ददौ राजा दिशं स्वकुलवर्धनः ।
अध्वर्यवे प्रतीचीं तु ब्रह्मणे दक्षिणां दिशम् ४३
उद्गात्रे तु तथोदीचीं दक्षिणैषा विनिर्मिता ।
अश्वमेधे महायज्ञे स्वयंभूविहिते पुरा ४४
क्रतुं समाप्य तु तदा न्यायतः पुरुषर्षभः ।

---

संपूर्ण सोळाही ऋत्विज ब्राह्मणांनी यथाविधि अग्नीमध्ये हवन केलें. असो. इतर यज्ञामध्ये प्लक्षवृक्षाच्या शाखांवर पाशुक हवि ठेवून अवदान देत असतात; परंतु अश्वमेधयज्ञामध्ये हविर्भाग वेतस वृक्षाच्या शाखेवर ठेवून द्यावा लागतो. कल्पसूत्रामध्ये आणि ब्राह्मणांमध्ये अश्वमेधाला त्र्यह ( म्हणजे तीन सवनीय दिवसांनी युक्त ) असें म्हटलें आहे; तिहींपैकी अग्निष्टोम हा त्यांतील प्रथम दिवस ठरविलेला आहे. ( ३६-४० )

उक्थ्य क्रतु हा दुसरा दिवस सांगितला आहे आणि त्याचप्रमाणे अतिरात्र हा तिसरा दिवस उक्त आहे व शास्त्रांत दृष्ट असल्यामुळे आणखीही पुष्कळ क्रतु विहित म्हणून उक्त आहेत. ज्योतिष्टोम, आयुष्टोम, दोन अतिरात्र, दोन अप्तोर्याम, अभिजित् आणि विश्वजित् या अश्वमेधामध्ये विहित असलेल्या महाक्रतूंचें अनुष्ठान झालें. नंतर आपलें कुल वृद्धिंगत करणाऱ्या दशरथ राजानें होत्याला पूर्व दिशा दक्षिणा म्हणून दिली, अध्वर्यूला पश्चिम दिशा दिली, ब्रह्मयाला दक्षिण दिशा अर्पण केली आणि उत्तर दिशा उद्गात्याचे स्वाधीन केली; कारण, ब्रह्मदेवानें पूर्वी उत्पन्न केलेल्या अश्वमेध महाक्रतूला ( कल्पसूत्रामध्ये ) ही दक्षिणा विहित आहे.

ऋत्विग्भ्यो हि ददौ राजा धरां तां कुलवर्धनः ४५
एवं दत्वा प्रहृष्टोऽभूच्छ्रीमानिक्ष्वाकुनन्दनः।
ऋत्विजस्त्वब्रुवन्सर्वे राजानं गतकिल्बिषम् ४६
भवानेव महीं कृत्स्नामेको रक्षितुमर्हति।
न भूम्या कार्यमस्माकं न हि शक्ताः स्म पालने ४७
रताः स्वाध्यायकरणे वयं नित्यं हि भूमिप।
निष्क्रयं किंचिदेवेह प्रयच्छतु भवानिति ४८
मणिरत्नं सुवर्णं वा गावो यद्वा समुद्यतम्।
तत्प्रयच्छ नृपश्रेष्ठ धरण्या न प्रयोजनम् ४९
एवमुक्तो नरपतिर्ब्राह्मणैर्वेदपारगैः।
गवां शतसहस्राणि दश तेभ्यो ददौ नृपः ५०
दशकोटिं सुवर्णस्य रजतस्य चतुर्गुणम् ५१
ऋत्विजस्तु ततः सर्वे प्रददुः सहिता वसु।
ऋष्यशृङ्गाय मुनये वसिष्ठाय च धीमते ५२

---

याप्रमाणे तो क्रतु यथाविधि समाप्त करून कुल वृद्धिंगत करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ दशरथ राजानें ती पृथ्वी ऋत्विजांना अर्पण केली. ( ४१–४५ )

याप्रमाणे पृथ्वी अर्पण केल्यावर तो वैभवशाली इक्ष्वाकुवंशज दशरथ राजा आनंदित झाला. तेव्हा त्या पापरहित झालेल्या राजाला सर्व ऋत्विज म्हणाले, " संपूर्ण पृथ्वीचें रक्षण करण्यास तूंच एक योग्य आहेस; आम्ही पालन करण्यास समर्थ नाहीं आणि म्हणूनच पृथ्वीशीं आम्हांला कांही कर्तव्य नाही. हे भूपाला, वेदाध्ययन करण्याविषयी ( मात्र ) आम्ही नेहमी तत्पर असतों. करिता, या पृथ्वीबद्दल कांहीतरी निष्क्रय तूं दे म्हणजे झालें. एखादें उत्कृष्ट रत्न, सुवर्ण, गाई अथवा जें कांही तुझ्यापाशीं देण्यासारिखें असेल, तें आम्हांला दे. हे नृपश्रेष्ठा, पृथ्वीचें आम्हांला कारण नाही. " याप्रमाणे वेदपारंगत ब्राह्मणांनी त्या राजाला सांगितलें असतां, दहा लक्ष गाई राजानें त्यांना दिल्या. ( ४६–५० )

दहा कोटिभार सुवर्ण दिलें आणि चाळीस कोट रुपयेही त्यानें त्यांना दिलें. तेव्हा सर्व ऋत्विजांनी एकत्र जमून तें द्रव्य बुद्धिमान् वसिष्ठ व ऋष्यशृंगमुनि यांच्याकडे

ततस्ते न्यायतः कृत्वा प्रविभागं द्विजोत्तमाः ।
सुप्रीतमनसः सर्वे प्रत्यूचुर्मुदिता भृशम् ५३
ततः प्रसर्पकेभ्यस्तु हिरण्यं सुसमाहितः ।
जाम्बूनदं कोटिसङ्ख्यं ब्राह्मणेभ्यो ददौ तदा ५४
दरिद्राय द्विजायाथ हस्ताभरणमुत्तमम् ।
कस्मैचिद्याचमानाय ददौ राघवनन्दनः ५५
ततः प्रीतेषु विधिवद् द्विजेषु द्विजवत्सलः ।
प्रणाममकरोत्तेषां हर्षव्याकुलितेन्द्रियः ५६
तस्याशिषोऽथ विविधा ब्राह्मणैः समुदाहृताः ।
उदारस्य नृवीरस्य धरण्यां पतितस्य च ५७
ततः प्रीतमना राजा प्राप्य यज्ञमनुत्तमम् ।
पापापहं स्वर्नयनं दुस्तरं पार्थिवर्षभैः ५८
ततोऽब्रवीदृष्यश्रृङ्गं राजा दशरथस्तदा ।
कुलस्य वर्धनं तत्तु कर्तुमर्हसि सुव्रत ५९

नेलें आणि नंतर त्याची यथान्याय वाटणी करून ते सर्वही द्विजश्रेष्ठ अंतःकरणामध्ये अत्यंत प्रसन्न झाले आणि " आम्ही पराकाष्ठेचे आनंदित झालों आहोंत, " असें त्यांनी राजाला सांगितलें. तदनंतर तेथे आलेल्या इतरही ब्राह्मणांना दशरथ राजानें अत्यंत स्वस्थांतःकरणपूर्वक उत्तम कांतीनें युक्त असें एक कोटिभार सुवर्ण दिलें. आणि कोणी एक दरिद्री ब्राह्मण याचना करूं लागला असतां त्या रघुवंशज दशरथानें आपलें उत्कृष्ट हस्तभूषणच त्याला अर्पण केलें. ( ५१–५५ )

तदनंतर ब्राह्मण प्रसन्न झाले असतां त्या द्विजवत्सल दशरथराजाचें अंतःकरण हर्षानें अगदी व्याकुल झालें आणि त्यानें त्या ब्राह्मणाला यथाविधि प्रणाम केला. तेव्हा धरणीवर पडलेल्या त्या उदार पुरुषवीराला ब्राह्मणांनी नाना प्रकारचे आशीर्वाद दिले. याप्रमाणे श्रेष्ठ श्रेष्ठ राजांच्या हातूनही पार पडण्यास कठीण असा तो पापनाशक व स्वर्गदायक उत्कृष्ट क्रतु संपूर्ण झाल्यावर राजाचें मन प्रसन्न झालें. आणि नंतर, " हे सदाचरणसंपन्न, आपण आता कुलवृद्धीला कारणीभूत होणारें जें कर्म तें करा, " म्हणून त्या दशरथराजानें ऋष्यश्रृंगमुनींची प्रार्थना केली

तथेति च स राजानमुवाच द्विजसत्तमः ।
भविष्यन्ति सुता राजंश्चत्वारस्ते कुलोद्वहाः ६०
स तस्य वाक्यं मधुरं निशम्य प्रणम्य तस्मै प्रयतो नृपेन्द्रः ।
जगाम हर्षं परमं महात्मा तमृष्यशृङ्गं पुनरप्युवाच ६१

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुर्दशः सर्गः १४ (५२९)

पञ्चदशः सर्गः ।

मेधावी तु ततो ध्यात्वा स किंचिदिदमुत्तरम् ।
लब्धसंज्ञस्ततस्तं तु वेदज्ञो नृपमब्रवीत् १
इष्टिं तेऽहं करिष्यामि पुत्रीयां पुत्रकारणात् ।
अथर्वशिरसि प्रोक्तैर्मन्त्रैः सिद्धां विधानतः २
ततः प्राक्रमदिष्टिं तां पुत्रीयां पुत्रकारणात् ।
जुहावाग्नौ च तेजस्वी मन्त्रदृष्टेन कर्मणा ३
ततो देवाः स गन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः ।

---

असतां, " हे राजा, ठीक आहे. कुल चालविणारे चार पुत्र तुला होतील ! " म्हणून त्या द्विजश्रेष्ठ ऋष्यशृंगमुनींनी राजाला सांगितलें, तेव्हा त्या मुनींचें तें मधुर भाषण श्रवण करून त्या राजाधिराज दशरथाने त्यांना प्रणाम केला आणि पराकाष्ठेचा हर्ष त्याला प्राप्त होऊन त्या महात्म्याने पुनरपि ( पुत्रप्राप्तीविषयी ) त्या ऋष्यशृंग-मुनींची प्रार्थना केली. ( ५५-६१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी चौदावा सर्ग समाप्त झाला. ॥ १४ ॥

याप्रमाणें दशरथ राजाने प्रार्थना केल्यावर त्या बुद्धिमान् वेदवेत्त्या ऋष्यशृंग मुनींनी समाधि लावून किंचित् विचार केला व समाधि उतरल्यावर ते त्या राजाला म्हणाले, " अथर्ववेदोक्त मंत्राच्या योगाने मी तुजकडून पुत्रप्राप्ति होण्या-करिता कल्पसूत्रामध्ये प्रसिद्ध असलेली पुत्रप्राप्तिसाधनभूत इष्टि करवीन " याप्र-माणे राजाला सांगितल्यानंतर पुत्राकरिता ती पुत्रप्राप्तिसाधनभूत इष्टि करण्याचा त्या तेजस्वी ऋष्यशृंगमुनींनी उपक्रम केला आणि समंत्रक कर्म करून अग्नीमध्ये हवन केलें. तेव्हा गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षि प्रेमपूर्वक यथाविधि

भावप्रतिग्रहार्थं वै समवेता यथाविधि ४
ताः समेत्य यथान्यायं तस्मिन्सदसि देवताः ।
अब्रुवँल्लोककर्तारं ब्रह्माणं वचनं ततः ५
भगवंस्त्वत्प्रसादेन रावणो नाम राक्षसः ।
सर्वान्नो बाधते वीर्याच्छासितुं तं न शक्नुमः ६
त्वया तस्मै वरो दत्तः प्रीतेन भगवंस्तदा ।
मानयन्तश्च तं नित्यं सर्वं तस्य क्षमामहे ७
उद्वेजयति लोकांस्त्रीनुच्छ्रितान्द्वेष्टि दुर्मतिः ।
शक्रं त्रिदशराजानं प्रधर्षयितुमिच्छति ८
ऋषीन्यक्षान्सगन्धर्वान्ब्राह्मणानसुरांस्तथा ।
अतिक्रामति दुर्धर्षो वरदानेन मोहितः ९
नैनं सूर्यः प्रतपति पार्श्वे वाति न मारुतः ।
चलोर्मिमाली तं दृष्ट्वा समुद्रोऽपि न कम्पते १०

प्रतिग्रह करण्याकरिता तेथे एकत्र जुळले आणि त्या यज्ञमंडपामध्ये यथायोग्य रीतीने ( अंतर्धानशक्तीच्या योगाने इतरांच्या दृष्टी न पडता ) एकत्र जुळल्या-वर जगत्स्रष्ट्या ब्रह्मदेवाला ते म्हणाले. ( १–५ )

" भगवन्, आपल्या प्रसादाने रावणनामक राक्षस ( उन्मत्त होऊन ) आपल्या स्वतःच्या सामर्थ्याने आम्हां सर्वांना पीडा देत आहे. आम्ही त्याचें शासन कर-ण्यास समर्थ नाहीं. हे भगवन्, आपण प्रसन्न होऊन त्याला वर दिला. तेव्हा-पासून आपल्या वचनाला मान देऊन आम्ही नेहमी त्याचें सर्व कांही सहन करीत आहोंत. तो दुर्मति त्रैलोक्याला त्रास देत असून, स्वतःपेक्षा संपत्तीने वगैरे अधिक असलेल्यांचा द्वेष करीत आहे; इतकेंच नव्हे, परंतु स्वर्गाधिपति इंद्रालाही जिंक-ण्याची तो इच्छा करीत आहे. आपलें वरदान झाल्यामुळे त्याला कसलाही सुमार राहिला नाही आणि त्यामुळे कोणाच्याही हातून पराभव पावण्यास शक्य नस-लेला राक्षस, ऋषि, गंधर्वांसहवर्तमान यक्ष, ब्राह्मण आणि असुर यांचें अति-क्रमण करीत आहे. सूर्य याला ताप देत नाही, वायु त्याचे समीप जोराने वहात नाही आणि चंचल तरंगसमुदायांनी युक्त असलेला समुद्रही त्याला पाहून क्षुब्ध

तन्महन्नो भयं तस्माद्राक्षसाद्धोरदर्शनात् ।
वधार्थं तस्य भगवन्नुपायं कर्तुमर्हसि ११
एवमुक्तः सुरैः सर्वैश्चिन्तयित्वा ततोऽब्रवीत् ।
हन्तायं विदितस्तस्य वधोपायो दुरात्मनः १२
तेन गन्धर्वयक्षाणां देवतानां च रक्षसाम् ।
अवध्योऽस्मीति वागुक्ता तथेत्युक्तं च तन्मया १३
नाकीर्तयदवज्ञानात्तद्रक्षो मानुषांस्तदा ।
तस्मात्स मानुषाद्वध्यो मृत्युर्नान्योऽस्य विद्यते १४
एतच्छ्रुत्वा प्रियं वाक्यं ब्रह्मणा समुदाहृतम् ।
देवा महर्षयः सर्वे प्रहृष्टास्तेऽभवंस्तदा १५
एतस्मिन्नन्तरे विष्णुरुपयातो महाद्युतिः ।
शङ्खचक्रगदापाणिः पीतवासा जगत्पतिः ।
वैनतेयं समारुह्य भास्करस्तोयदं यथा १६

होत नाही. ( ६–१० )

यामुळे त्या दिसण्यांतही भयंकर असलेल्या राक्षसापासून आम्हांला मोठें भय उत्पन्न झालें आहे. करिता, हे भगवन्, त्याच्या वधाचा उपाय आपण योजा. ”

याप्रमाणे सर्व देवांनी प्रार्थना केली असतां ( क्षणभर ) विचार केल्यानंतर ब्रह्मदेव त्यांना म्हणाले, “ अरे हो ! त्या दुरात्म्याचा वध होण्याला हा एक उपाय सुचला आहे. ” “ गंधर्व, यक्ष, देव आणि राक्षस यांना मी अवध्य असावें, ” असा त्याने वर मागितला असतां मीं “ ठीक आहे, ” म्हणून त्याला म्हटलें आहे. मनुष्यांची त्याला मुळीच पर्वा नसल्यामुळे त्याने त्या वेळीं मनुष्यांचा उल्लेख केला नाही. तस्मात्, मनुष्यांपासूनच त्याचा वध होणे शक्य आहे; याला मारणारा दुसरा कोणी नाही. ” याप्रमाणे ब्रह्मदेवांनी सांगितलेले प्रिय भाषण श्रवण करून, ते सर्व देव आणि महर्षि आनंदित झाले. ( ११–१५ )

इतक्यांत पीतांबरधारी आणि महातेजस्वी जगदीश विष्णु उज्ज्वल सुवर्णानी युक्त अशीं बाहुभूषणें व शंख, चक्र, गदा ( हीं आयुधें ) धारण करून मेघांवर आरोहण करणाऱ्या सूर्याप्रमाणेच कीं काय गरुडावर आरूढ होऊन त्या ठिकाणी

तप्तहाटककेयूरो वन्द्यमानः सुरोत्तमैः ।
ब्रह्मणा च समागत्य तत्र तस्थौ समाहितः १७
तमब्रुवन्सुराः सर्वे समभिष्टूय संनताः ।
त्वां नियोक्ष्यामहे विष्णो लोकानां हितकाम्यया १८
राज्ञो दशरथस्य त्वमयोध्याधिपतेर्विभो ।
धर्मज्ञस्य वदान्यस्य महर्षिसमतेजसः १९
अस्य भार्यासु तिसृषु ह्रीश्रीकीर्त्युपमासु च ।
विष्णो पुत्रत्वमागच्छ कृत्वात्मानं चतुर्विधम् २०
तत्र त्वं मानुषो भूत्वा प्रवृद्धं लोककण्टकम् ।
अवध्यं दैवतैर्विष्णो समरे जहि रावणम् २१
स हि देवान्सगन्धर्वान्सिद्धांश्च ऋषिसत्तमान् ।
राक्षसो रावणो मूर्खो वीर्योद्रेकेण बाधते २२
ऋषयश्च ततस्तेन गन्धर्वाप्सरसस्तथा ।
क्रीडन्तो नन्दनवने रौद्रेण विनिपातिताः २३

आले; ते आले असतां ब्रह्मदेवासह सर्व सुरश्रेष्ठांनी त्यांना वंदन केलें व ते त्या ठिकाणीं येऊन बसले असतां, किंचित् स्वस्थता प्राप्त झाल्यावर सर्व देव प्रणामपूर्वक स्तुति करून त्यांना म्हणाले, " हे विष्णो, लोकांच्या हितांची इच्छा धरून आम्ही आपली एका कार्याकडे योजना करणार आहोंत. हे सर्वव्यापी विष्णो, धर्मवेत्ता, उदार आणि महर्षीप्रमाणे तेजस्वी अशा या अयोध्याधिपति दशरथ राजाच्या अनुक्रमें ऱ्ही, श्री आणि कीर्ति यांप्रमाणे असलेल्या तीन भार्यां-चे ठिकाणीं स्वतःचे चार अंश करून आपण पुत्ररूपाने अवतीर्ण व्हा. (१६-२०)

सारांश, हे विष्णो, आपण मनुष्यरूपाने त्या ठिकाणीं अवतीर्ण होऊन देवांना अवध्य आणि म्हणूनच ( मदाने ) चढून गेलेल्या या लोककंटक रावणाचा समरांगणामध्ये वध करा. तो मूर्ख राक्षस रावण वीर्याचा गर्व झाल्यामुळे गंधर्वासह-वर्तमान देव, सिद्ध आणि श्रेष्ठ ऋषि यांना पीडा देत आहे. त्या भयंकर राक्षसाने नंदनवनामध्ये क्रीडा करीत असलेल्या गंधर्वांसहवर्तमान अप्सरांचा आणि ऋषींचा अगदी पाडाव करून टाकिला आहे. करिता, त्याचा वध व्हावा या उद्देशाने

वधार्थं वयमायातास्तस्य वै मुनिभिः सह ।
सिद्धगन्धर्वयक्षाश्च ततस्त्वां शरणं गताः २४
त्वं गतिः परमा देव सर्वेषां नः परंतप ।
वधाय देवशत्रूणां नृणां लोके मनः कुरु २५
एवं स्तुतस्तु देवेशो विष्णुस्त्रिदशपुङ्गवः ।
पितामहपुरोगांस्तान्सर्वलोकनमस्कृतः २६
अब्रवीत्त्रिदशान्सर्वान्समेतान्धर्मसंहितान् ।
भयं त्यजत भद्रं वो हितार्थं युधि रावणम् २७
सपुत्रपौत्रं सामात्यं समन्त्रिज्ञातिबान्धवम् ।
हत्वा क्रूरं दुराधर्षं देवर्षीणां भयावहम् २८
दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च ।
वत्स्यामि मानुषे लोके पालयन्पृथिवीमिमाम् २९
एवं दत्त्वा वरं देवो देवानां विष्णुरात्मवान् ।
मानुष्ये चिन्तयामास जन्मभूमिमथात्मनः ३०

मुनींसहवर्तमान आम्ही आणि त्याचप्रमाणे सिद्ध, गंधर्व व यक्ष असे आपणांला शरण आलों आहोंत. हे महातेजस्वी देवा, आम्हां सर्वांचा मुख्य आधार आपणच आहांत. करिता देवशत्रूंचा वध करण्यास्तव आपण मनुष्यलोकामध्ये अवतीर्ण होण्याचें मनांत आणा." ( २१–२५ )

याप्रमाणे सुरश्रेष्ठ देवाधिपति विष्णूंची देवांनी स्तुति केली असतां ते सर्वलोकवंद्य विष्णु त्या यमधर्मासहर्तमान जुळलेल्या ब्रह्मदेवप्रभृति सर्व देवांना म्हणाले, "तुमचें कल्याण असो; तुम्ही भय सोडा. देव आणि ऋषि यांना भयावह आणि जिंकण्यास कठीण अशा त्या क्रूर रावणाचा–पुत्र, पौत्र, अमात्य, मंत्री आणि ज्ञातिबांधव यांसहवर्तमान, तुमच्या कल्याणाकरिता—संग्रामामध्यें वध करून, या पृथ्वीचें परिपालन करीत मी अकरा हजार वर्षें मनुष्यलोकामध्ये वास्तव्य करीन." ( २६–२९ )

याप्रमाणे देवांना वर देऊन त्या जितेंद्रिय देवाधिदेव विष्णूंनी देवांनी सांगितल्याप्रमाणे आपणांला अनुरूप अशी जन्मभूमि मनुष्यलोकांमध्ये दशरथ राजा-

ततः पद्मपलाशाक्षः कृत्वात्मानं चतुर्विधम्।
पितरं रोचयामास तदा दशरथं नृपम् ३१
ततो देवर्षिगन्धर्वाः सरुद्राः साप्सरोगणाः।
स्तुतिभिर्दिव्यरूपाभिस्तुष्टुवुर्मधुसूदनम् ३२
तमुद्धतं रावणमुग्रतेजसं प्रवृद्धदर्पं त्रिदशेश्वरद्विषम्।
विरावणं साधुतपस्विकण्टकं तपस्विनामुद्धर तं भयावहम् ३३
तमेव हत्वा सबलं सबान्धवं विरावणं रावणमुग्रपौरुषम्।
स्वर्लोकमागच्छ गतज्वरश्चिरं सुरेन्द्रगुप्तं गतदोषकल्मषम् ३४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चदशः सर्गः १५ (५६३)

च्या भार्याच आहेत, असा मनामध्ये विचार केला आणि नंतर आपले चार अंश करून त्या कमलनयन विष्णूंनी पिता होण्यास दशरथ राजा योग्य आहे, असें ठरविलें. तेव्हा रुद्रगण आणि अप्सरांचे समुदाय यांसहवर्तमान देव, ऋषि आणि गंधर्व हे दिव्य स्तुतींनी मधुसूदनाला संतुष्ट करूं लागले की, "(हे देवाधिदेवा) सज्जनांना व तपस्व्यांना नुसता भयावहच नव्हे; परंतु कंटकाप्रमाणे असून त्रैलोक्याला त्रास देणारा असा जो उग्र तेजाने आणि पराकाष्ठेच्या गर्वाने युक्त असलेला सुरद्वेष्टा मदमत्त रावण त्याचा समूळ नाश कर आणि हे सुरेश्वरा, भयंकर सामर्थ्याने युक्त असलेल्या त्या त्रैलोक्यपीडक रावणाचा सैन्य व बांधव यांसहवर्तमान वध केल्यानंतर निश्चिंत होऊन स्वतःच्या योगाने चिरकाल, सुरक्षित आणि रागादिदोषरूप कल्मषाने रहित अशा स्वर्गलोकाप्रत परत ये." (३०-३४)*

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥१५॥.

* बालकांड सर्ग १५, श्लोक ५ पासून सर्गसमाप्तीपर्यंत जें वर्णन आलें आहे, त्यावरून (व उत्तर काण्ड. सर्ग १३, श्लोक ३३ वरून) पाहतां, रावणाचें हे सार्वराष्ट्रीय संकट नष्ट करण्यासंबंधांत सर्व देव व ऋषि यांचा विचार बऱ्याच कालापासून चालू होता, हें स्पष्टतया दिसून येत आहे व हें संकट पूर्णपणें नष्ट करण्याला 'रावणाचा वध होणें' हाच एकमेव अद्वितीय उपाय आहे, या गोष्टीचाही त्यांना निश्चय होऊन चुकला होता. परन्तु या त्यांच्या विचाराला चालना

टीप ( पुढे चालू )

देण्याला योग्य अवसर प्राप्त झाला नव्हता. तो दशरथाच्या या यज्ञाच्या प्रसंगानें अनायासें प्राप्त झाला. तो असाः—

या यज्ञाच्या निमित्तानें, दशरथराजाच्या येथें भरतखंडांतले बहुतेक सर्व राजे, महाराजे, ऋषि, महर्षि व ब्रह्मादिक सर्व देव एकत्र झाले होते. या कारणास्तव हा बहुत काळापासून घोळत असलेला प्रश्न निकालास लावण्यास हाच समय अत्यंत योग्य असा होता; कारण पुढे जमलेले सर्व राजे, महाराजे, ऋषि, महर्षि, ब्रह्मर्षि आणि ब्रह्मादि सर्व देव आपापल्या ठिकाणीं निघून गेल्यावर, फिरून सर्वांस एकत्र करणें अत्यन्त कठिण, किंबहुना, अशक्यच होतें. म्हणून याचवेळीं या प्रश्नास चालना देऊन तो निकालास लावून टाकला, तो येणेंप्रमाणे—

ऋषींनी व देवांनी ब्रह्मदेवांकरवीं विष्णूला भीड घालून, दशरथाच्या ( मुख्य राणीचे ) उदरीं रावणवधार्थ— रामरूपानें जन्म घेण्याविषयीं अभिवचन घेतलें. अर्थात् रावणवधार्थच रामाचा अवतार घडवून आणला गेला, हें निश्चित आहे.

आणि ज्याअर्थीं, रावणवधार्थच रामाचा अवतार घडवून आणला गेला होता, त्याअर्थीं राम वनवासाला गेले नसते व रावणाकडून सीतेचा अपहारही झाला नसता, तरीदेखील रामरावणयुद्ध टळलें नसतेंच ! श्रीराम वनांतून सुग्रीवाचें सैन्य घेऊन लंकेवर गेले, ते तसे न जातां, अयोध्येहूनच स्वतःचें सैन्य घेऊन गेले असते, येवढेंच काय तें !

" सीतेचा अपहार " हें कांहीं रामरावणयुद्धाचें मुख्य कारण नव्हे; रावणासारख्याशीं युद्धाचा प्रसंग घडून यावयाचा होता आणि पूर्वींचे सर्व राजे व नामांकित क्षत्रियवीर हे रावणाच्या धाकानें इतके गलित धैर्य झाले होते कीं, रावणाचें नांव ऐकलें की पुरे ! तोंडांत घालावयास घेतलेला घास हातांतूनच खालीं गळून पडावयाचा, मग त्याच्यासमोर युद्धाला उभें राहण्याची वार्ताच कशाला ! ( अशी स्थिति प्राप्त झाली होती ) म्हणून, अगदी मुख्य पुढाऱ्यापासून तों अगदी शेवटच्या शिपायापर्यंत नवी सृष्टि उत्पन्न करण्याचा अति दूरदर्शी असा हा उपक्रम केला गेला आहे. इच्छेनुरूप पाहिजे तसा पुत्र उत्पन्न करून घेतां येणें आयुर्वेदानुसार शक्य आहे—

षोडशः सर्गः ।

ततो नारायणो विष्णुर्नियुक्तः सुरसत्तमैः ।
जानन्नपि सुरानेवं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् १
उपायः को वधे तस्य राक्षसाधिपतेः सुराः ।
यमहं तं समास्थाय निहन्यामृषिकण्टकम् २
एवमुक्ताः सुराः सर्वे प्रत्यूचुर्विष्णुमव्ययम् ।
मानुषं रूपमास्थाय रावणं जहि संयुगे ३
स हि तेपे तपस्तीव्रं दीर्घकालमरिन्दमः ।
येन तुष्टोऽभवद्ब्रह्मा लोककृल्लोकपूर्वजः ४
संतुष्टः प्रददौ तस्मै राक्षसाय वरं प्रभुः ।

याप्रमाणे सुरश्रेष्ठांनी प्रार्थना केल्यानंतर सर्वव्यापी नारायण स्वतः जाणीत असूनही देवांना सौम्य शब्दांनी असें विचारूं लागला की, "हे देवहो, त्या राक्षसाधिपतीच्या वधाचा उपाय कोणता? (तो मला कथन करा) म्हणजे मी त्याचें अवलंबन करून ऋषींना त्रास देणाऱ्या त्या राक्षसाचा वध करीन." (१–२)

याप्रमाणे विचारिल्यावर सर्व देव त्या अविनाशी विष्णूला म्हणाले " मनुष्य जन्म घेऊन संग्रामामध्ये आपण रावणाचा वध करा. त्या शत्रुदमन करणाऱ्या रावणाने पूर्वी पुष्कळ वेळपर्यंत तीव्र तपश्चर्या केली. तेव्हा लोकांचा मूळ उत्पादक ब्रह्मदेव संतुष्ट झाला. आणि संतुष्ट झाल्यावर त्या प्रभूने " मनुष्यावांचून इतर

टीप ( पुढे चालू )

इच्छेतां यादृशं पुत्रं तद्रूपचरितांश्च तौ ।
चिन्तयातां जनपदान् तदाचार परिच्छदान् ॥ १ ॥

( वाग्भट अष्टांगहृदय शारीर–स्थान अध्याय १ ला. )

" रावणाचे अत्याचार फार वाढले, हें कानीं आल्यावरून केवळ बंधुप्रेमास्तव सावधानतेची सूचना म्हणून कुबेराने रावणाकडे दूताहातीं निरोप धाडला होता तो असा " **तदधर्मिष्ठसंयोगात् निवर्त कुलदूषणात् । चिन्त्यते हि वधोपायः सर्षिसंघैः सुरैस्तव ॥** " ( रामायण उत्तर कांड. सर्ग १३, श्लोक ३२, ३३ )

नानाविधेभ्यो भूतेभ्यो भयं नान्यत्र मानुषात् ५
अवज्ञाताः पुरा तेन वरदाने हि मानवाः ।
एवं पितामहात्तस्माद्वरदानेन गर्वितः ६
उत्सादयति लोकांस्त्रीन्स्त्रियश्चाप्युपकर्षति ।
तस्मात्तस्य वधो दृष्टो मानुषेभ्यः परंतप ७
इत्येतद्वचनं श्रुत्वा सुराणां विष्णुरात्मवान् ।
पितरं रोचयामास तदा दशरथं नृपम् ८
स चाप्यपुत्रो नृपतिस्तस्मिन्काले महाद्युतिः ।
अयजत्पुत्रियामिष्टिं पुत्रेप्सुररिसूदनः ९
स कृत्वा निश्चयं विष्णुरामन्त्र्य च पितामहम् ।
अन्तर्धानं गतो देवैः पूज्यमानो महर्षिभिः १०
ततो वै यजमानस्य पावकादतुलप्रभम् ।
प्रादुर्भूतं महद्भूतं महावीर्यं महाबलम् ११
कृष्णं रक्ताम्बरधरं रक्तास्यं दुन्दुभिस्वनम् ।

---

कोणत्याही प्राण्यापासून तुला भीति नाही." असा त्या राक्षसाला वर दिला. कारण, त्या राक्षसाने वरप्रदानसमयीं मनुष्यांची गणनाच केली नव्हती. याप्रमाणे त्या ब्रह्मदेवापासून वर प्राप्त झाल्यामुळे तो गर्विष्ट झाला आहे आणि सर्व त्रैलोक्य उच्छिन्न करीत असून लोकांच्या स्त्रियाही तो ओढून नेऊं लागला आहे. तस्मात्, हे शत्रुतापना, मनुष्यापासूनच त्याचा वध होणार, हें निश्चित आहे. ( ३–७ )

याप्रमाणे हें देवांचें भाषण श्रवण केल्यावर दशरथ राजा पिता होण्याला योग्य आहे असें जितेंद्रिय विष्णूंनी मनामध्ये आणिलें. त्या वेळीं त्या महातेजस्वी दशरथ राजालाही पुत्र नव्हता आणि पुत्रप्राप्ति होण्याकरिता तो शत्रुनाशक पुत्र-साधनभूत यागही करीत होता. असो. याप्रमाणे अवतार घेण्याविषयी निश्चय करून व ब्रह्मदेवाला विचारून ( सुरश्रेष्ठ ) विष्णु, देव आणि ऋषि स्तवन करीत असतांनाच अंतर्धान पावले. ( ८–१० )

तदनंतर पुत्रकामेष्टिनामक याग करीत असलेल्या दशरथराजाच्या अग्नींतून एक महापुरुष निघाला. तो कांतीने अनुपम होता, त्याचें वीर्य मोठें होतें आणि

स्निग्धहर्यक्षतनुजश्मश्रुप्रवरमूर्धजम् १२
शुभलक्षणसंपन्नं दिव्याभरणभूषितम् ।
शैलशृङ्गसमुत्सेधं दृप्तशार्दूलविक्रमम् १३
दिवाकरसमाकारं दीप्तानलशिखोपमम् ।
तप्तजाम्बूनदमयीं राजतान्तपरिच्छदाम् १४
दिव्यपायससंपूर्णां पात्रीं पत्नीमिव प्रियाम् ।
प्रगृह्य विपुलां दोर्भ्यां स्वयं मायामयीमिव १५
समवेक्ष्याब्रवीद्वाक्यमिदं दशरथं नृपम् ।
प्राजापत्यं नरं विद्धि मामिहाभ्यागतं नृप १६
ततः परं तदा राजा प्रत्युवाच कृताञ्जलिः ।
भगवन्स्वागतं तेऽस्तु किमहं करवाणि ते १७
अथो पुनरिदं वाक्यं प्राजापत्यो नरोऽब्रवीत् ।
राजन्नर्चयता देवानद्य प्राप्तमिदं त्वया १८

बलही प्रचंड होतें. कृष्णवर्णानें तो युक्त होता, आरक्तवर्ण वस्त्र त्यानें परिधान केलेलें होतें, त्याचें मुख आरक्तवर्ण होतें, स्वर दुंदुभीसारखा ( गंभीर ) होता, शरिरावरील लव मुखावरील श्मश्रु आणि मस्तकावरील केश हे सिंहाच्या केसाप्रमाणे तुळतुळीत होते. शुभ लक्षणांनी तो संपन्न होता, दिव्य भूषणांनी तो भूषित झालेला होता, पर्वतशिखराप्रमाणे तो उंच होता आणि त्याची चालण्याची ढब मत्त व्याघ्राप्रमाणे होती. सूर्याप्रमाणे त्याची प्रभा होती, प्रदीप्त अग्नीच्या ज्वालेप्रमाणे त्याचें स्वरूप उग्र होतें आणि रुप्याचें झांकण घातलेली एक मोठी दिव्यपायसप्रपूरित सुवर्णमय स्थाली, मायारूप प्रिय पत्नीच कीं काय अशी त्यानें स्वतः आपल्या हातामध्ये घेतली होती. ( ११–१५ )

अशाप्रकारें पायस घेऊन अग्नींतून निघालेला तो पुरुष यज्ञमंडपामध्ये दृष्टि फिरवून दशरथ राजाला म्हणाला "हे राजा, प्रजाधिपति विष्णूने पाठविलेला पुरुष मी येथे आलों आहें असें तूं समज" याप्रमाणे त्या पुरुषानें सांगितल्यानंतर "भगवान्, आपलें स्वागत असो. मी आपलें काय ( प्रिय ) करावें ?" म्हणून दशरथ राजानें हात जोडून विचारलें असतां तो प्रजापतीकडून आलेला पुरुष

इदं तु नृपशार्दूल पायसं देवनिर्मितम् ।
प्रजाकरं गृहाण त्वं धन्यमारोग्यवर्धनम् १९
भार्याणामनुरूपाणामश्नीतेति प्रयच्छ वै ।
तासु त्वं लप्स्यसे पुत्रान्यदर्थं यजसे नृप २०
तथेति नृपतिः प्रीतः शिरसा प्रतिगृह्य ताम् ।
पात्रीं देवान्नसंपूर्णां देवदत्तां हिरण्मयीम् २१
अभिवाद्य च तद्भूतमद्भुतं प्रियदर्शनम् ।
मुदा परमया युक्तश्चकाराभिप्रदक्षिणम् २२
ततो दशरथः प्राप्य पायसं देवनिर्मितम् ।
बभूव परमप्रीतः प्राप्य वित्तमिवाधनः २३
ततस्तदद्भुतप्रख्यं भूतं परमभास्वरम् ।
संवर्तयित्वा तत्कर्म तत्रैवान्तरधीयत २४
हर्षरश्मिभिरुद्योतं तस्यान्तःपुरमाबभौ ।
शारदस्याभिरामस्य चन्द्रस्येव नभोऽशुभिः २५

---

पुनरपि राजाला असें म्हणाला कीं "हे राजा, देवांचें आर्चन करीत असल्यामुळे आज तुला हें प्राप्त झालें आहे. हे नृपश्रेष्ठा, धनदायक, आरोग्यवर्धक आणि संतानकारक असें हें देवनिर्मित पायस तूं गृहण कर आणि "भक्षण करा" असें सांगून तूं आपल्या प्रिय पत्नींना तें अर्पण कर. म्हणजे, हे राजा, ज्याकरिता तूं याग करीत आहेस ते पुत्र तुला त्या पत्नींचे ठिकाणीं प्राप्त होतील" (१६-२०)

ह्यावर "ठीक आहे" असें म्हणून प्रसन्न झालेल्या दशरथ राजानें देवनिर्मित अन्नानें भरलेली ती देवदत्त सुवर्णमय स्थाली शिरसा मान्य करून आश्चर्यकारक आणि मनोहर स्वरूपानें युक्त अशा त्या पुरुषाला अभिवंदन केलें आणि पराकाष्ठेच्या आनंदानें युक्त होऊन त्यानें त्याला प्रदक्षिणाही केली. तदनंतर संपत्ति प्राप्त झाली असतां ज्याप्रमाणें दरिद्री पुरुषाला पराकाष्ठेचा आनंद होतो त्याप्रमाणे तें देवनिर्मित पायस प्राप्त झालें असतां दशरथ राजा पराकाष्ठेचा आनंदित झाला. ह्यानंतर अद्भुत स्वरूपानें युक्त असलेला तो अत्यंत उज्ज्वल पुरुष तें पायस देण्याचें कार्य संपूर्ण झाल्यावर तेथेंच अंतर्धान पावला. ( २१-२४ )

सोऽन्तःपुरं प्रविश्यैव कौसल्यामिदमब्रवीत् ।
पायसं प्रतिगृह्णीष्व पुत्रीयं त्विदमात्मनः २६
कौसल्यायै नरपतिः पायसार्धं ददौ तदा ।
अर्धादर्धं ददौ चापि सुमित्रायै नराधिपः २७
कैकेय्यै चावशिष्टार्धं ददौ पुत्रार्थकारणात् ।
प्रददौ चावशिष्टार्धं पायसस्यामृतोपमम् २८
अनुचिन्त्य सुमित्रायै पुनरेव महामतिः ।
एवं तासां ददौ राजा भार्याणां पायसं पृथक् २९
ताश्चैवं पायसं प्राप्य नरेन्द्रस्योत्तमस्त्रियः ।
संमानं मेनिरे सर्वाः प्रहर्षोदितचेतसः ३०

असो. ह्याप्रमाणे ( पायस प्राप्त झालें असतां ) शरदृतूंतील मनोहर चंद्राच्या किरणांनी ज्याप्रमाणे आकाश प्रकाशित होतें त्याप्रमाणें दशरथ राजाच्या अंतःपुरांतील स्त्रिया हर्षजन्य मुखकांतीच्या योगाने चमकूं लागल्या. अंतःपुरांत प्रविष्ठ झाल्याबरोबर तो दशरथ राजा " स्वतःला पुत्रप्राप्ति करून देणारें हें पायस तूं ग्रहण कर!" असें कौसल्येला म्हणाला आणि त्या दशरथराजानें संपूर्ण पायसापैकी अर्धा भाग कौसल्येला दिला. बाकी राहिलेल्या पायसापैकी अर्धा ( म्हणजे एकचतुर्थांश भाग ) सुमित्रेला दिला आणि राहिलेल्या ( एकचतुर्थांश ) भागापैकी अर्धा ( म्हणजे एकअष्टमांश भाग ) कैकेयीला दिला व त्यापैकी बाकीचा राहिलेला एकअष्टमांश भाग सुमित्रेला दिला. ( म्हणजे, कौसल्येला आठ अंश, सुमित्रेला सहा अंश व कैकेयीला दोनचअंश, अशी वाटणी झाली. )* याप्रकारें पायस प्राप्त झाल्यावर दशरथराजाच्या त्या सर्व तीनही उत्कृष्ट स्त्रियांचें अंतःकरण हर्षानें प्रफुल्लित झालें आणि आपला संमान झाला, असें त्यांना वाटलें. ( २५-३० )

* श्लोक २७,२८ व २९ यांचा अर्थ टीकाकारांच्या मतानुसार थोडासा भिन्न आहे. पूर्वीचे भाषांतरकार जो अर्थ करीत आहेत, तो टीकाकाराला धरून आहे; पण टीकाकार आपली टीका कशाच्या आधारावर देत आहेत, तें लक्ष्यांत येत नाही, टीकाकारांचा अर्थ असा आहे. " भूपतीनें संपूर्ण पायसांतील अर्धे पायस कौसल्येला दिलें व नंतर कौसल्येला दिलेल्या पायसांतील चवथा हिस्सा

*

ततस्तु ताः प्राश्य तमुत्तमस्त्रियो महीपतेरुत्तमपायसं पृथक् ।
हुताशनादित्यसमानतेजसोऽचिरेण गर्भान्प्रतिपेदिरे तदा ३१
ततस्तु राजा प्रतिवीक्ष्य ताः स्त्रियः प्ररूढगर्भाः प्रतिलब्धमानसः ।
बभूव हृष्टस्त्रिदिवे यथा हरिः सुरेन्द्रसिद्धर्षिगणाभिपूजितः ३२
इत्यार्षे श्रीरामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षोडशः सर्गः ॥१६॥ (५९५)

सप्तदशः सर्गः ।

पुत्रत्वं तु गते विष्णौ राज्ञस्तस्य महात्मनः ।
उवाच देवताः सर्वाः स्वयंभूर्भगवानिदम् १
सत्यसंधस्य वीरस्य सर्वेषां नो हितैषिणः ।

---

तदनंतर दशरथभूपतीच्या त्या उत्कृष्ट स्त्रियांनी तें उत्कृष्ट पायस वेगळें वेगळें प्राशन केलें आणि अग्नि व सूर्य याप्रमाणे तेजस्वी गर्भ त्यांना प्राप्त झाले. तदनंतर ज्यांचे गर्भ वृद्धिंगत झाले आहेत, अशा त्या आपल्या स्त्रियांना अवलोकन करून राजाचें अंतःकरण स्वस्थ झालें आणि स्वर्गामध्ये देवराज इंद्र, सिद्ध आणि ऋषिगण यांनी पूजित असलेल्या श्रीहरीप्रमाणे त्या राजाला आनंद झाला. ( ३१–३२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी सोळावा सर्ग समाप्त झाला. ॥ १६ ॥

याप्रमाणे विष्णूंनी त्या महात्म्या दशरथराजाचें पुत्रत्व स्वीकारिलें असतां भगवान् ब्रह्मदेव सर्व देवतांना असें म्हणाले. " सत्यप्रतिज्ञ आणि वीर असा जो

---

टीप ( पुढे चालू )
त्या भूपतीने तिच्याकडून सुमित्रेला देवविला. तदनंतर प्रथम संपूर्ण पायसांतील अर्धे कौसल्येला दिल्यावर जें अर्धे पायस अवशिष्ट राहिलें होतें, तें त्याने पुत्रप्राप्तीकरिता कैकेयीला दिलें आणि कैकेयीला दिलेल्या अर्ध्या पायसांतील अमृतोपम असा चतुर्थांश भाग त्या महामति दशरथराजाने विचार करून पुनरपि सुमित्रेलाच देवविला. तात्पर्य, ( कौसल्येला तीनअष्टमांश, कैकेयीला तीनअष्टमांश आणि सुमित्रेला दोनअष्टमांश ) याप्रमाणे दशरथराजाने त्या भार्यांना वेगळें वेगळें पायस दिलें. "

विष्णोः सहायान्बलिनः सृजध्वं कामरूपिणः २
मायाविदश्च शूरांश्च वायुवेगसमाञ्जवे ।
नयज्ञान्बुद्धिसंपन्नान्विष्णुतुल्यपराक्रमान् ३
असंहार्यानुपायज्ञान्दिव्यसंहननान्वितान् ।
सर्वास्त्रगुणसंपन्नानमृतप्राशनानिव ४
अप्सरःसु च मुख्यासु गन्धर्वीणां तनूषु च ।
यक्षपन्नगकन्यासु ऋक्षविद्याधरीषु च ५
किंनरीणां च गात्रेषु वानरीणां तनूषु च ।
सृजध्वं हरिरूपेण पुत्रांस्तुल्यपराक्रमान् ६
पूर्वमेव मया सृष्टो जाम्बवानृक्षपुंगवः ।
जृम्भमाणस्य सहसा मम वक्त्रादजायत ७
ते तथोक्ता भगवता तत्प्रतिश्रुत्य शासनम् ।
जनयामासुरेवं ते पुत्रान्वानररूपिणः ८
ऋषयश्च महात्मानः सिद्धविद्याधरोरगाः ।

आपणां सर्वांचें हित इच्छिणारा विष्णु त्याला यथेष्ट रूप धारण करणारे व बलाढ्य असे सहाय्यकर्ते तुम्ही उत्पन्न करा. ते सहाय्यकर्ते राक्षसी माया जाणणारे, शूर, वेगामध्ये वायूच्या वेगाची बरोबरी करणारे, नीतिशास्त्रवेत्ते, बुद्धिमान्, विष्णूसारखे पराक्रमी, शत्रूंना अवध्य, सामादि उपाय जाणणारे, देवांप्रमाणे दिव्य शरिराने युक्त व प्रयोग, उपसंहार इत्यादि अस्त्रासंबंधाने सर्व गुणांनी संपन्न असे असावेत. ( १-४ )

सारांश, मुख्य मुख्य अप्सरा, गंधर्वपत्न्या, यक्ष आणि नाग यांच्या कन्या, ऋक्ष आणि विद्याधर यांच्या स्त्रिया किन्नरांच्या स्त्रिया आणि वानरस्त्रिया यांचे ठिकाणीं हरिरूपाने तुम्ही एकसारखे पराक्रमी पुत्र उत्पन्न करा. अस्वलांमध्ये श्रेष्ठ असा जांबवान् मीं पूर्वी उत्पन्न केलेला आहे; कारण मी जांभई देऊं लागलों असतां एकाएकी तो माझ्या मुखांतून उत्पन्न झाला आहे. ” याप्रमाणे भगवान् ब्रह्मदेवांनी सांगितल्यावर त्या देवांनी त्यांची आज्ञा मान्य करण्याविषयी वचन दिलें आणि त्याप्रमाणे त्यांनी वानररूपी पुत्र उत्पन्न केले. ( ५-८ )

चारणाश्च सुतान्वीरान्ससृजुर्वनचारिणः ९
वानरेन्द्रं महेन्द्राभमिन्द्रो वालिनमात्मजम् ।
सुग्रीवं जनयामास तपनस्तपतांवरः १०
बृहस्पतिस्त्वजनयत्तारं नाम महाकपिम् ।
सर्ववानरमुख्यानां बुद्धिमन्तमनुत्तमम् ११
धनदस्य सुतः श्रीमान्वानरो गन्धमादनः ।
विश्वकर्मा त्वजनयन्नलं नाम महाकपिम् १२
पावकस्य सुतः श्रीमान्नीलोऽग्निसदृशप्रभः ।
तेजसा यशसा वीर्यादत्यरिच्यत वीर्यवान् १३
रूपद्रविणसंपन्नावश्विनौ रूपसंमतौ ।
मैन्दं च द्विविदं चैव जनयामासतुः स्वयम् १४
वरुणो जनयामास सुषेणं नाम वानरम् ।
शरभं जनयामास पर्जन्यस्तु महाबलः १५
मारुतस्यौरसः श्रीमान्हनुमान्नाम वानरः ।

महात्मे ऋषि, सिद्ध, विद्याधर, उरग आणि चारण यांनी वनामध्ये संचार करणारे असे वीर ( वानर ) पुत्र उत्पन्न केले. दिसण्यांत इन्द्रासारिखा आणि वानरांचा अधिपति असा वाली नांवाचा पुत्र इंद्राने उत्पन्न केला आणि तेजस्व्यांमध्ये श्रेष्ठ असलेल्या सूर्याने सुग्रीवनामक पुत्र उत्पन्न केला. बृहस्पतीने तारनामक महान् वानर उत्पन्न केला; तो सर्व श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांमध्ये अनुपम बुद्धिमान् होता. गंधमादनसंज्ञक वैभवशाली वानर कुबेराचा पुत्र असून, विश्वकर्म्याने नलनामक श्रेष्ठ वानर उत्पन्न केला. अग्नीसारखा तेजस्वी असलेला वैभवशाली नील अग्नीचा पुत्र असून, त्या वीर्यवान् नीलाने तेज, कीर्ति आणि वीर्य यांमध्यें अग्नीलाही मागे सारिलें. सौंदर्यरूपसंपत्तीने युक्त आणि रूपवान् म्हणून सर्व लोकांना संमत अशा अश्विनीकुमारांनी मैंद व द्विविद या वानरांना उत्पन्न केलें. ( ९–१४ )

वरुणाने सुषेण नामक वानराला उत्पन्न केला आणि महाबलाढ्य पर्जन्याने शरभाला जन्म दिला. सर्व मुख्य मुख्य वानरांमध्ये बुद्धिमान् आणि बलाढ्य,

वज्रसंहननोपेतो वैनतेयसमो जवे १६
सर्ववानरमुख्येषु बुद्धिमान्बलवानपि १७
ते सृष्टा बहुसाहस्रा दशग्रीववधोद्यताः ।
अप्रमेयबला वीरा विक्रान्ताः कामरूपिणः १८
ते गजाचलसंकाशा वपुष्मन्तो महाबलाः ।
ऋक्षवानरगोपुच्छाः क्षिप्रमेवाभिजज्ञिरे १९
यस्य देवस्य यद्रूपं वेषो यश्च पराक्रमः ।
अजायत समं तेन तस्य तस्य पृथक्पृथक् २०

वेगामध्ये गरुडाची बरोबरी करणारा, कांतिमान् आणि वज्रदेही असा हनुमान् म्हणून प्रसिद्ध असलेला वानर वायूचा औरस पुत्र होय. असो. अतुल बलाने युक्त अत्यंत पराक्रमी, इच्छेस येईल तो वेश धारण करणारे आणि रावणाच्या वधाविषयी नेहमी तयार, असे ते हजारो वानर-वीर उत्पन्न झाले. सारांश, ऋक्ष, वानर आणि गोपुच्छ ह्या योनींचें अवलंबन करून गज व पर्वत यांप्रमाणे धिप्पाड व महाबलाढ्य असे ते देवपुत्र ब्रह्मदेवाची अनुज्ञा झाल्यावर सत्वर जन्मास आले. ( १५-१९ )

ज्या देवाचें जसें रूप, जशी अंगकाठी व जसा पराक्रम तसा त्या देवासारखाच पण त्या त्या देवापासून पृथक् पृथक् पुत्र उत्पन्न झाला.* देवांपेक्षाही पराक्रमामध्ये

* श्लोक २० टिप्पणी—ज्या ज्या देवाच्या अंशापासून जो जो वानरवीर उत्पन्न झाला, तो तो रूपाने, शरिराच्या आकृतीने व पराक्रमाने अगदी त्या त्या देवासारखाच झाला, असें महर्षि म्हणत आहेत; पण ज्या अर्थी वर वर्णन केलेल्या इन्द्र, सूर्य, बृहस्पति, अश्विनीकुमार प्रभृति कोणत्याही देवाला पुच्छ असल्याचें वर्णन ग्रन्थान्तरीं आढळत नाही, त्या अर्थी त्या देवांच्याच अंशापासून उत्पन्न झालेल्या आणि शरिराची आकृतीही त्या देवासारखीच असलेल्या त्या वानरांस पुच्छ कोठून आलें ? अर्थात् या वानरांस अंगचें पुच्छ नाही. पुढे ग्रन्थांत पुच्छ असल्याचीं जीं वर्णनें आलीं आहेत, तीं लाक्षणिक आहेत. त्यांच्या शरिराची आकृतीही सामान्य वानरांच्या शरिराच्या आकृतीसारखी नाहीं. तात्पर्य, वाल्मिकीने वर्णन केलेले वानर हे समजले जातात, तसे पशु वानर नसून,

मध्यमागम्य तोयस्य तस्य शब्दस्य निश्चयम् ५
ज्ञातुकामो महातेजाः सह रामः कनीयसा ।
अथ रामः सरिन्मध्ये पप्रच्छ मुनिपुङ्गवम् ६
वारिणो भिद्यमानस्य किमयं तुमुलो ध्वनिः ।
राघवस्य वचः श्रुत्वा कौतूहलसमन्वितम् ७
कथयामास धर्मात्मा तस्य शब्दस्य निश्चयम् ।
कैलासपर्वते राम मनसा निर्मितं परम् ।
ब्रह्मणा नरशार्दूल तेनेदं मानसं सरः ८
तस्मात्सुस्राव सरसः सायोध्यामुपगूहते ।
सरःप्रवृत्ता सरयूः पुण्या ब्रह्मसरश्च्युता ९
तस्यायमतुलः शब्दो जाह्नवीमभिवर्तते ।
वारिसंक्षोभजो राम प्रणामं नियतः कुरु १०

---

मध्यभागीं आल्यावर जलक्षोभाने वृद्धिंगत झालेला असा एक ध्वनि रामाचे कानीं आला असतां, तो ध्वनि कोणाचा आहे, हें निश्चायाने जाणण्याची महातेजस्वी रामाला कनिष्ठ भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान इच्छा झाली. (१–५)

तेव्हा, " नावेच्या योगाने दुभंग होत असलेल्या उदकामध्ये हा प्रचंड ध्वनि होत आहे, हें काय ? " म्हणून रामाने मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना प्रश्न केला असतां उत्कंठेने युक्त असें त्या रघुवंशज रामाचें भाषण श्रवण करून धर्मात्म्या विश्वामित्रमुनींनी तो शब्द कशाचा, हें यथातथ्यपणें रामाला सांगण्यास आरंभ केला. (ते म्हणाले), हे पुरुषश्रेष्ठा रामा, कैलासपर्वतावर ब्रह्मदेवाने मनाच्या योगाने एक उत्कृष्ट सरोवर निर्माण केलें व तें मनानेच निर्माण केलें असल्यामुळे मानस याच नांवाने प्रसिद्ध झालें. त्या सरोवरापासून जी नदी निघाली, तीही अयोध्येसमीप वहात आहे. सारांश, सरोवरापासून निघाल्यामुळे (म्हणजे ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या सरोवरापासून निघाल्यामुळे) ही पवित्र नदी सरयू या नांवाने प्रसिद्ध झाली. त्या नदीचा हा अतुल ध्वनि जान्हवीच्या ध्वनीशीं संयुक्त होत आहे व तो उदकाच्या क्षोभामुळे होत आहे. हे रामा, तिला तूं शुद्ध मनाने प्रणाम कर. (६–१०)

ताभ्यां तु तावुभौ कृत्वा प्रणाममतिधार्मिकौ ।
तीरं दक्षिणमासाद्य जग्मतुर्लघुविक्रमौ ११
स वनं घोरसंकाशं दृष्ट्वा नरवरात्मजः ।
अविप्रहतमैक्ष्वाकः पप्रच्छ मुनिपुङ्गवम् १२
अहो वनमिदं दुर्गं झिल्लिकागणसंयुतम् ।
भैरवैः श्वापदैः कीर्णं शकुन्तैर्दारुणारवैः १३
नानाप्रकारैः शकुनैर्वाश्यद्भिर्भैरवस्वनैः ।
सिंहव्याघ्रवराहैश्च वारणैश्चापि शोभितम् १४
धवाश्वकर्णककुभैर्बिल्वतिन्दुकपाटलैः ।
संकीर्णं बदरीभिश्च किं न्विदं दारुणं वनम् १५
तमुवाच महातेजा विश्वामित्रो महामुनिः ।

याप्रमाणे विश्वामित्रमुनींनी सांगितलें असतां अत्यंत धार्मिक अशा त्या उभयतां रामलक्ष्मणांनी त्यांना म्हणजे गंगा आणि सरयू यांना प्रणाम केला आणि दक्षिण-तीराला आल्यावर लवकर लवकर पाऊल उचलून ते जाऊं लागले. जातां जातां त्या पुरुषश्रेष्ठ दशरथनंदन इक्ष्वाकुवंशज रामाने मनुष्यप्राण्याचा संचार नसल्यामुळे पाऊलवाटदेखील नसलेलें आणि दिसण्यांत भयंकर असें वन अवलोकन करून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना प्रश्न केला. "कायहो हें गहन वन! " हें झिल् झिल् शब्द करणाऱ्या कीटकांच्या समुदायांनी युक्त असून, भयंकर श्वापदें यांत जिकडेतिकडे पसरलेलीं आहेत; त्याचप्रमाणे दारुण शब्द करणारे भासपक्षी, कुत्सित शब्द करणारे नाना प्रकारचे इतर पक्षी आणि अति भयंकर शब्द करणारे असे सिंह, व्याघ्र, वराह व गज यांच्या योगाने तें युक्त असून, धव, अश्वकर्ण, ककुभ, बिल्व, तिंदुक, पाटल आणि बदरी या वृक्षांनी तें गजबजलेलें आहे. खरोखर हें वन इतकें भयंकर होण्याचें कायहो कारण असावें? ( ११-१५ )

याप्रमाणे रामाने प्रश्न केला असतां महातेजस्वी विश्वामित्र महामुनि त्याला

* श्लोक १४ " **वाश्यद्भिः** कुत्सितं शब्दायमानैः " म्हणजे अपशकुनसूचक ओंगळ शब्द करणारे, अशांनी. हा अर्थ गोविंदराज यांनी दिला आहे. ( २ ) शोभितं = युक्त ( तिलक )

श्रूयतां वत्स काकुत्स्थ यस्यैतद्दारुणं वनम् १६
एतौ जनपदौ स्फीतौ पूर्वमास्तां नरोत्तम ।
मलदाश्च करूषाश्च देवनिर्माणनिर्मितौ × १७
पुरा वृत्रवधे राम मलेन समभिप्लुतम् ।
क्षुधा चैव सहस्राक्षं ब्रह्महत्या समाविशत् १८
तमिन्द्रं मलिनं देवा ऋषयश्च तपोधनाः ।
कलशैः स्नापयामासुर्मलं चास्य प्रमोचयन् १९
इह भूम्यां मलं दत्वा देवाः कारूषमेव च ।
शरीरजं महेन्द्रस्य ततो हर्षं प्रपेदिरे २०
निर्मलो निष्करूषश्च शुद्ध इन्द्रो यथाभवत् ।
ततो देशस्य सुप्रीतो वरं प्रादादनुत्तमम् २१
इमौ जनपदौ स्फीतौ ख्यातिं लोके गमिष्यतः ।
मलदाश्च करूषाश्च ममाङ्गमलधारिणौ २२

म्हणाले, " ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हे भयंकर वन कोणाचें आहे तें ऐक, हे पुरुषश्रेष्ठा, मलद आणि करूष हे देवलोकासारखे समृद्ध व सुन्दर असे निर्माण झालेले दोन देश पूर्वी मोठे समृद्ध होते. हे रामा, पूर्वी वृत्रासुरवधसमयीं अशुद्ध आचरण आणि क्षुधा यांनी इंद्र व्याप्त झाल्यामुळे ब्रह्महत्या त्याच्या मागे लागली. तेव्हा त्या मलिन इंद्राला देव आणि तपोधनऋषि यांनी ( गंगाजलाने भरलेल्या ) कलशांच्या योगाने स्नान घालून त्याचा मल काढून टाकिला. सारांश या भूमीचे ठिकाणी देवांनी महेंद्राच्या शरिरांतील मल व त्याचा बुभुक्षितपणा टाकून दिला; तेव्हां त्यांना आनंद झाला. ( १६–२० )

आणि मल व बुभुक्षितपणा यांनी इंद्र वियुक्त झाल्यामुळे (ब्रह्महत्येपासून) पूर्वी-प्रमाणे शुद्ध झाला. तदनंतर इंद्र त्या प्रदेशावर फारच संतुष्ट झाला आणि "माझ्या शरिराचा मल व माझी क्षुधा धारण करणारे हे प्रदेश मलद व करूष या नांवाने प्रसिद्ध होऊन, नेहमी समृद्ध होतील आणि पृथ्वीमध्ये यांची मोठी ख्याति होईल." असा त्याने त्यांना अत्युत्कृष्ट वर दिला. तेव्हा विचारी इंद्राने

× 'देवनिर्माणनिर्मितौ' म्हणजे 'देवलोकसमसंस्थानौ' ( गोविन्दराजः )

साधु साध्विति तं देवाः पाकशासनमब्रुवन् ।
देशस्य पूजां तां दृष्ट्वा कृतां शक्रेण धीमता २३
एतौ जनपदौ स्फीतौ दीर्घकालमरिंदम ।
मलदाश्च करूषाश्च मुदिता धनधान्यतः २४
कस्यचित्त्वथ कालस्य यक्षिणी कामरूपिणी ।
बलं नागसहस्रस्य धारयन्ती तदा ह्यभूत् २५
ताटका नाम भद्रं ते भार्या सुन्दस्य धीमतः ।
मारीचो राक्षसः पुत्रो यस्याः शक्रपराक्रमः २६
वृत्तबाहुर्महाशीर्षो विपुलास्यतनुर्महान् ।
राक्षसो भैरवाकारो नित्यं त्रासयते प्रजाः २७
इमौ जनपदौ नित्यं विनाशयति राघव ।
मलदांश्च करूषांश्च ताटका दुष्टचारिणी २८
सेयं पन्थानमावृत्य वसत्यत्यर्धयोजने ।
अत एव च गन्तव्यं ताटकाया वनं यतः २९

केलेला तो देशाचा संमान अवलोकन केल्यावर " उत्तम उत्तम " म्हणून देवांनी इंद्राला अनुमोदन दिलें. सारांश, हे शत्रुदमना रामा, हे समृद्ध देश मलद व करूष पुष्कळ काळ लोटेपर्यंत धनधान्यांनी संपन्न होते. पुढे कांही काल लोटल्यानंतर स्वेच्छेप्रमाणे रूप धारण करणारी एक यक्षिणी उत्पन्न झाली. हे रामा, तुझें कल्याण असो. ती यक्षिणी सहस्र गजांचें बल धारण करणारी असून, सुंदाची भार्या आहे व तिचें नांव ताटका असें असून इंद्रतुल्यपराक्रमी मारीचनामक राक्षस तिचा पुत्र आहे. (२१–२६)

त्या धिप्पाड राक्षसाचे बाहु गर्गरीत असून, मस्तक, मुख व शरीर हीं प्रचंड आहेत आणि त्याची मुद्राही भयंकर असून, तो राक्षस प्रजाजनांना नित्य त्रास देत आहे. हे रघुवंशजा रामा, दुराचरण करणारी ती ताटका या मलद व करूष देशांची नेहमी नासाडी करीत असते. ती येथून अर्ध्या योजनापेक्षा आधिक अन्तरावर रहात आहे व तिने ही वाट आडवून धरली आहे. करितां, ज्या अर्थी आपणांला ताटकेच्या वनामध्ये जावयाचेंच आहे, त्या अर्थी बाहुबलाचें अवलंबन

स्वबाहुबलमाश्रित्य जहीमां दुष्टचारिणीम् ।
मन्नियोगादिमं देशं कुरु निष्कण्टकं पुनः ३०
न हि कश्चिदिमं देशं शक्तो ह्यागन्तुमीदृशम् ।
यक्षिण्या घोरया राम उत्सादितमसह्यया ३१
एतत्ते सर्वमाख्यातं यथैतद्दारुणं वनम् ।
यक्ष्या चोत्सादितं सर्वमद्यापि न निवर्तते ३२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुर्विंशः सर्गः २४ [८४३]

पञ्चविंशः सर्गः ।

अथ तस्याप्रमेयस्य मुनेर्वचनमुत्तमम् ।
श्रुत्वा पुरुषशार्दूलः प्रत्युवाच शुभां गिरम् १
अल्पवीर्या यदा यक्षी श्रूयते मुनिपुङ्गव ।
कथं नागसहस्रस्य धारयत्यबला बलम् २
इत्युक्तं वचनं श्रुत्वा राघवस्यामितौजसः ।
हर्षयञ्श्लक्ष्णया वाचा सलक्ष्मणमरिंदमम् ३

---

करून तूं या दुराचारिणीचा माझ्या आज्ञेने वध कर आणि पुनरपि हा प्रदेश निष्कंटक करून सोड; कारण, हे रामा, असह्य अशा घोर यक्षिणीने उच्छिन्न करून टाकिलेल्या या अशा प्रकारच्या प्रदेशामध्ये कोणीही येण्यास समर्थ नाही. असो. हें वन दारुण कसें झालें, हें सर्व मी तुला सांगितलें. यक्षिणीने हें जें सर्व उध्वस्त करून टाकलें आहे, तें अद्यापही पूर्वस्थितीवर येत नाही. ( २७–३२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मिकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी चोविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २४ ॥

ज्यांचा प्रभाव अतर्क्य आहे अशा त्या विश्वामित्रमुनींचें उत्कृष्ट भाषण श्रवण करून, पुरुषश्रेष्ठ राम शुभ वाणीने त्यांना पुनरपि विचारूं लागला की, "हे मुनिश्रेष्ठा, पुराणादिकांमध्ये यक्षजाति वीर्याने अल्प असल्याचें श्रुत आहे. तेव्हा त्या जातींतील अबला सहस्र गजांचें बल कसें धारण करीत आहे ?" ( १–२ )

याप्रमाणे अपरिमित सामर्थ्यवान् रघुवंशज रामाने प्रश्न केला असतां मधुर वाणीने लक्ष्मणासहवर्तमान त्या शत्रुदमन रामाला आनंदित करीत, विश्वामित्र

विश्वामित्रोऽब्रवीद्वाक्यं श‍ृणु येन बलोत्कटा ।
वरदानकृतं वीर्यं धारयत्यबला बलम् ४
पूर्वमासीन्महायक्षः सुकेतुर्नाम वीर्यवान् ।
अनपत्यः शुभाचारः स च तेपे महत्तपः ५
पितामहस्तु सुप्रीतस्तस्य यक्षपतेस्तदा ।
कन्यारत्नं ददौ राम ताटकां नाम नामतः ६
ददौ नागसहस्रस्य बलं चास्याः पितामहः ।
न त्वेव पुत्रं यक्षाय ददौ चासौ महायशाः ७
तां तु बालां विवर्धन्तीं रूपयौवनशालिनीम् ।
जम्भपुत्राय सुन्दाय ददौ भार्यां यशस्विनीम् ८
कस्यचित्त्वथ कालस्य यक्षी पुत्रं व्यजायत ।
मारीचं नाम दुर्धर्षं यः शापाद्राक्षसोऽभवत् ९
सुन्दे तु निहते राम अगस्त्यमृषिसत्तमम् ।
ताटका सह पुत्रेण प्रधर्षयितुमिच्छति १०

---

म्हणाले " ती यक्षिणी बलाढ्य कशी झाली, तें ऐक. ही अबला वरप्रदानामुळे असलेलें बल व वीर्य धारण करीत आहे. पूर्वी सुकेतु म्हणून सदाचारसंपन्न व वीर्यवान् असा एक मोठा यक्ष होऊन गेला; त्याला अपत्य नव्हतें. पुढे त्या सदाचरणसंपन्न यक्षाने अपत्यप्राप्तीकरितां मोठी तपश्चर्या केली. तेव्हा ब्रह्मदेवाने अतिशय संतुष्ट होऊन त्या यक्षाधिपतीला, हे रामा, नांवाने ताटका म्हणून प्रसिद्ध असलेलें एक कन्यारत्न दिलें आणि या कन्येला ब्रह्मदेवाने सहस्र गजांचें बल दिलें; परंतु पुत्र दिला तर तो प्रजांना अत्यन्त पीडाकारक होईल, या विचाराने त्या महाकीर्तिमान् ब्रह्मदेवाने त्या यक्षाला पुत्र कांही दिला नाही. ती बाला वाढीस लागून सौंदर्य व यौवन यांनी शोभूं लागली असतां, जंभपुत्र सुंदाला त्या यक्षाने ती यशस्विनी भार्या म्हणून दिली. या गोष्टीला कांही दिवस लोटल्यानंतर त्या ताटकानामक यक्षिणीला अजिंक्य असा एक मारीचनामक पुत्र झाला व तो पुढे शापामुळे राक्षस बनला. ( ३–९ )

हे रामा, ( अगस्त्य मुनींनी शाप दिल्यामुळे ) सुंदाचा वध झाल्यावर ती

भक्षार्थं जातसंरम्भा गर्जन्ती साभ्यधावत ।
आपतन्तीं तु तां दृष्ट्वा अगस्त्यो भगवानृषिः ११
राक्षसत्वं भजस्वेति मारीचं व्याजहार सः ।
अगस्त्यः परमामर्षस्ताटकामपि शप्तवान् १२
पुरुषादी महायक्षी विकृता विकृतानना ।
इदं रूपं विहायाशु दारुणं रूपमस्तु ते १३
सैषा शापकृतामर्षात् ताटका क्रोधमूर्च्छिता ।
देशमुत्सादयत्येनमगस्त्याचरितं शुभम् १४
एनां राघव दुर्वृत्तां यक्षीं परमदारुणाम् ।
गोब्राह्मणहितार्थाय जहि दुष्टपराक्रमाम् १५
न ह्येनां शापसंसृष्टां कश्चिदुत्सहते पुमान् ।
निहन्तुं त्रिषु लोकेषु त्वामृते रघुनन्दन १६

ताटका, ऋषिश्रेष्ठ अगस्त्य मुनींवर आक्रमण करण्याचा पुत्रासहवर्तमान विचार करूं लागली आणि आपल्या पतीचा वध याने केला म्हणून अत्यन्त क्रुद्ध होऊन गर्जना करीत करीत त्यांना भक्षण करण्याच्या उद्देशाने त्यांच्याकडे धावली. तेव्हा ती पुत्रासहवर्तमान आपल्याकडे चाल करून येत आहे, असें पाहून भगवान् अगस्त्यऋषींनी "राक्षस हो," म्हणून तिच्या मारीचनामक पुत्राला शाप दिला. इतकेंच नव्हे परंतु, त्या अत्यंत क्रुद्ध झालेल्या अगस्त्यमुनींनी " हें तुझें रूप नाहीसें होऊन तुला सत्वर घोर रूप प्राप्त होईल आणि तूं महायक्षिणी शरिराने व चेहऱ्याने अक्राळविक्राळ होऊन माणसांना खाणारी ( राक्षसी ) होशील. " असा त्या ताटकेलाही शाप दिला. ( १०–१३ )

तीही शापामुळे क्रुद्ध झालेली ताटका क्रोधामुळे अगदी बेफाम झाली आहे आणि अगस्त्यमुनींचें तप करण्याचें स्थान असलेला हा पवित्र देश उध्वस्त करीत आहे. यास्तव, हे रघुवंशज रामा, अत्यंत भयंकर, दुराचारीणी आणि अनर्थावह पराक्रमाने युक्त अशा या यक्षिणीचा, गोब्राह्मणांच्या हिताकरितां तूं वध कर. हे रघुनंदना, शापग्रस्त झालेल्या या ताटकेचा वध करण्यास त्रैलोक्यामध्ये तुझ्यावाचून इतर कोणत्याही पुरुषाचें सामर्थ्य नाही. ( १४–१६ )

न हि ते स्त्रीवधकृते घृणा कार्या नरोत्तम ।
चातुर्वर्ण्यहितार्थं हि कर्तव्यं राजसूनुना १७
नृशंसमनृशंसं वा प्रजारक्षणकारणात् ।
पातकं वा सदोषं वा कर्तव्यं रक्षता सदा १८
राज्यभारनियुक्तानामेष धर्मः सनातनः ।
अधर्म्यां जहि काकुत्स्थ धर्मो ह्यस्यां न विद्यते १९
श्रूयते हि पुरा शक्रो विरोचनसुतां नृप ।
पृथिवीं हन्तुमिच्छन्तीं मन्थरामभ्यसूदयत् २०
विष्णुना च पुरा राम भृगुपत्नी पतिव्रता ।
अनिन्द्रं लोकमिच्छन्ती काव्यमाता निषूदिता २१
एतैश्चान्यैश्च बहुभी राजपुत्रैर्महात्मभिः ।
अधर्मसहिता नार्यो हताः पुरुषसत्तमैः २२
तस्मादेनां घृणां त्यक्त्वा जहि मच्छासनान्नृप २३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चविंशः सर्गः २५ [८६६]

---

हे पुरुषश्रेष्ठा, स्त्रीवध करावा लागत आहे, म्हणून तूं मनामध्ये दया आणूं नकोस; कारण चारी वर्णांचें हित करण्याकरितां आणि प्रजारक्षण करण्याकरिता जें कांही करणें अवश्य असेल तें, बरें असो, वा वाईट असो, पातकावह असो किंवा सदोष असो, प्रजेच्या रक्षणाची जबाबदारी अंगावर घेणाऱ्या राजपुत्रानें केलेंच पाहिजे; कारण राज्यभार ज्यांच्यावर सोपविलेला आहे, त्यांचा हा सनातन धर्मच आहे. करितां, ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, या ताटकेचा वध कर. हिचे ठिकाणीं धर्म कसला तो मुळीच नाहीं. ( १७–१९ )

हे राजपुत्रा, पूर्वी विरोचन दैत्याची कन्या मंथरा पृथ्वीचा नाश करण्याची इच्छा करूं लागली असतां इंद्रानें तिचा वध केल्याचें प्रसिद्धच आहे आणि त्याचप्रमाणे, हे रामा, स्वर्गलोकांतून इन्द्रालाच नाहीसा करण्याची इच्छा करणारी जी महापतिव्रता भृगुमहर्षीची पत्नी व दैत्यगुरु शुक्राचार्यांची माता तिचा विष्णूने वध केल्याचेंही ऐकण्यांत आहे. सारांश, यांनी आणि इतरही महात्म्या अनेक पुरुषश्रेष्ठ राजपुत्रांनी अधर्मनिष्ठ स्त्रियांचा वध केला आहे. तस्मात्, हे

षड्विंशः सर्गः ।

मुनेर्वचनमक्लीबं श्रुत्वा नरवरात्मजः ।
राघवः प्राञ्जलिर्भूत्वा प्रत्युवाच दृढव्रतः १
पितुर्वचननिर्देशात्पितुर्वचनगौरवात् ।
वचनं कौशिकस्येति कर्तव्यमविशङ्कया २
अनुशिष्टोऽस्म्ययोध्यायां गुरुमध्ये महात्मना ।
पित्रा दशरथेनाहं नावज्ञेयं हि तद्वचः ३
सोऽहं पितुर्वचः श्रुत्वा शासनाद्ब्रह्मवादिनः ।
करिष्यामि न संदेहस्ताटकावधमुत्तमम् ४
गोब्राह्मणहितार्थाय देशस्य च हिताय च ।
तव चैवाप्रमेयस्य वचनं कर्तुमुद्यतः ५
एवमुक्त्वा धनुर्मध्ये बद्ध्वा मुष्टिमरिंदमः ।

---

राजपुत्रा, तूं दया सोडून देऊन माझ्या आज्ञेनें हिचा वध कर. ( २०–२३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पंचविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २५ ॥

याप्रमाणे विश्वामित्रमुनींचें शौर्ययुक्त भाषण श्रवण करून निर्मल आचरणानें युक्त असा जो पुरुषश्रेष्ठ दशरथपुत्र रघुवंशज राम तो हात जोडून म्हणाला, " विश्वामित्रमुनींची आज्ञा कांहीएक शंका न घेतां पाळावी, " अशी पित्याची प्रत्यक्ष आज्ञा झाली आहे आणि पित्याचें वचन मला अत्यंत प्रमाणभूत आहे. अहो, " विश्वामित्रमुनींच्या भाषणाची अवज्ञा करूं नको, " अशी महात्म्या पित्या दशरथानें अयोध्येत असतांना ( वसिष्ठवामदेवप्रभृति ) गुरुजनांमध्यें मला आज्ञा केली आहे. तेव्हां मी पित्याची आज्ञा शिरसामान्य करून ब्रह्मवेत्त्याच्या आज्ञेनें उत्कृष्ट धर्माला कारणीभूत होणारा ताटकेचा वध मनामध्यें कांहीएक संदेश न आणितां करीन. तात्पर्य, गोब्राह्मणांच्या हिताकरितां आणि देशाच्या कल्याणाकरितां अतर्क्य प्रभावानें युक्त जे आपण त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास मी तयार आहें. " ( १–५ )

असें बोलून शत्रुदमन रामानें धनुष्याच्या मध्यभागीं मूठ वळून ध्वनीनें दश-



दशरथाला पायसाची प्राप्ति होते. ( बा. १६-१९ )

ज्याघोषमकरोत्तीव्रं दिशः शब्देन नादयन् ६
तेन शब्देन वित्रस्तास्ताटकावनवासिनः ।
ताटका च सुसंक्रुद्धा तेन शब्देन मोहिता ७
तं शब्दमभिनिध्याय राक्षसी क्रोधमूर्च्छिता ।
श्रुत्वा चाभ्यद्रवत्क्रुद्धा यत्र शब्दो विनिःसृतः ८
तां दृष्ट्वा राघवः क्रुद्धां विकृतां विकृताननाम् ।
प्रमाणेनातिवृद्धां च लक्ष्मणं सोऽभ्यभाषत ९
पश्य लक्ष्मण यक्षिण्या भैरवं दारुणं वपुः ।
भिद्येरन्दर्शनादस्या भीरूणां हृदयानि च १०
एतां पश्य दुराधर्षां मायाबलसमन्विताम् ।
विनिवृत्तां करोम्यद्य हृतकर्णाग्रनासिकाम् ११
न ह्येनामुत्सहे हन्तुं स्त्रीस्वभावेन रक्षिताम् ।
वीर्यं चास्या गतिं चैव हन्यामिति हि मे मतिः १२

---

दिशा नादित करीत करीत प्रत्यंचेचा प्रचंड टणत्कार केला. त्या टणत्काराने ताटकेच्या वनांत राहणारे सर्व प्राणी भयभीत, कावरेबावरे झाले आणि त्या शब्दाने व्याकुळ होऊन ताटकाही अतिशयच क्रुद्ध झाली. तो ध्वनि श्रवण करितांक्षणी ती क्रुद्ध राक्षसी क्रोधाने अगदी भानरहित झाली आणि जिकडून तो ध्वनि आला होता, त्या प्रदेशाला अनुलक्षून ती धावत चालली. तेन्हा शरिराने व चेहेऱ्याने ही अक्राळविक्राळ असून, प्रमाणाने फारच प्रचंड असलेल्या त्या क्रुद्ध राक्षसीला अवलोकन करून तो रघुवंशज राम लक्ष्मणाला म्हणाला. " हे लक्ष्मणा, या यक्षिणीचें घोर आणि भयंकर असें रूप अवलोकन कर. अरे, हिला पाहून भित्र्या लोकांचीं तर असूदेच, परंतु शूरांचींही हृदयें फुटून जातील. ( ६–१० )

अरे पहा. मायाबलाने युक्त आणि म्हणूनच जिंकण्याला अशक्य अशा या यक्षिणीचे कान व नाक कापून घेऊन मी हिला आज परावृत्त करितों. स्त्रीस्वभावाने ही रक्षित असल्यामुळे ( अर्थात् स्त्रियांचा वध करणें उचित नाही; म्हणून ही स्त्रीजाति या दृष्टीनेच वधापासून सुरक्षित असल्यामुळे ) मला हिचा वध करणें प्रशस्त वाटत नाही. करितां, हातपाय तोडून हिची गति आणि सामर्थ्य

एवं ब्रुवाणे रामे तु ताटका क्रोधमूर्च्छिता ।
उद्यम्य बाहुं गर्जन्ती राममेवाभ्यधावत १३
विश्वामित्रस्तु ब्रह्मर्षिर्हुंकारेणाभिभर्त्स्य ताम् ।
स्वस्ति राघवयोरस्तु जयं चैवाभ्यभाषत १४
उद्धुन्वाना रजो घोरं ताटका राघवावुभौ ।
रजोमेघेन महता मुहूर्तं सा व्यमोहयत् १५
ततो मायां समास्थाय शिलावर्षेण राघवौ ।
अवाकिरत्सुमहता ततश्चुक्रोध राघवः १६
शिलावर्षं महत्तस्याः शरवर्षेण राघवः ।
प्रतिवार्योपधावन्त्याः करौ चिच्छेद पत्रिभिः १७
ततश्छिन्नभुजां श्रान्तामभ्याशे परिगर्जतीम् ।
सौमित्रिरकरोत्क्रोधाद्धृतकर्णाग्रनासिकाम् १८
कामरूपधरा सा तु कृत्वा रूपाण्यनेकशः ।

---

यांचा नाश करावा, असा माझा विचार आहे." याप्रमाणे राम बोलूं लागला असतां ताटका क्रोधानें अगदी भानरहित झाली आणि गर्जना करीत करीत हात उगारून थेट रामाकडे धावली. तेव्हा विश्वामित्र ब्रह्मर्षींनी हुंकारानेच तिची निर्भर्त्सना करून, "रघुवंशजाचा जय असो व यांचें कल्याण होवो," असें म्हटलें. (११–१४)

इतक्यांत भयानक अशी धूळ उडवीत उडवीत ती ताटका उभयतां रघुवंशजांवर चालून गेली आणि धूलिपटलरूप प्रचंड मेघांच्या योगानें क्षणभर तिनें त्या रामलक्ष्मणांला अगदी गोंधळून टाकिलें. तदनंतर मायेचें अवलंबन करून, त्या उभयता रामलक्ष्मणांवर भयंकर पाषाणवृष्टि करावयास आरंभ केला असतां रघुवंशज राम क्रुद्ध झाला. ( १५–१६ )

नंतर बाणवृष्टीच्या योगानें रामानें तिच्या त्या भयंकर पाषाणवृष्टीचें निवारण केलें आणि ती आपणांकडे धावून येऊं लागली असतां बाणांच्या योगानें तिचे हातही तोडून टाकिले. तेव्हा ती हाततुटकी व थकलीभागलेली ताटका जवळच गर्जना करीत आहे, असें पाहून सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रागारागानें तिचे कान व नाक कापून टाकले. तदनंतर इच्छेप्रमाणे रूप धारण करण्यास समर्थ असलेली

अन्तर्धानं गता यक्षी मोहयन्ती स्वमायया ।
अश्मवर्षं विमुञ्चन्ती भैरवं विचचार सा १९
ततस्तावश्मवर्षेण कीर्यमाणौ समन्ततः ।
दृष्ट्वा गाधिसुतः श्रीमानिदं वचनमब्रवीत् २०
अलं ते घृणया राम पापैषा दुष्टचारिणी ।
यज्ञविघ्नकरी यक्षी पुरा वर्धेत मायया २१
वध्यतां तावदेवैषा पुरा संध्या प्रवर्तते ।
रक्षांसि संध्याकाले तु दुर्धर्षाणि भवन्ति हि २२
इत्युक्तः स तु तां यक्षीमश्मवृष्ट्याभिवर्षिणीम् ।
दर्शयञ्छब्दवेधित्वं तां रुरोध स सायकैः २३
सा रुद्धा बाणजालेन मायाबलसमन्विता ।
अभिदुद्राव काकुत्स्थं लक्ष्मणं च विनेदुषी २४
तामापतन्तीं वेगेन विक्रान्तामशनीमिव ।

---

ती यक्षिणी नाना प्रकारचीं रूपें धारण करून अदृश्य झाली आणि आपल्या मायेनें रामलक्ष्मणांना मोह पाडण्याच्या हेतूनें भयंकर पाषाणवृष्टि करीत करीत ती इतस्ततः संचार करूं लागली. तेव्हा त्या रामलक्ष्मणांवर चोहोंकडून भयंकर पाषाणवृष्टि होत आहे, असें अवलोकन करून वैभवशाली गाधिपुत्र विश्वामित्र मुनि म्हणाले. ( १७-२० )

" हे रामा, आता तुझी दया पुरे. दुराचारिणी व पापी अशी यज्ञविघ्न करणारी यक्षिणी मायेनें प्रबळ झाली नाही, तोंच– म्हणजे संध्यासमय झाला नाही, तोंच–हिचा वध केला पाहिजे; कारण संध्यासमय झाला असतां राक्षस जिंकण्याला फार जड जातात." याप्रमाणे विश्वामित्रमुनींनी सांगितलें असतां शब्दवेधित्व दर्शविणाऱ्या त्या रामाने पाषाणवृष्टि करीत असणाऱ्या त्या यक्षिणीला बाणांनी जखडून टाकिलें. तेव्हा बाणसमुदायानें जखडून गेलेली व मायाबलानें युक्त असलेली ती यक्षिणी आपलें रूप प्रकट करून गर्जना करीत करीत ककुत्स्थकुलोत्पन्न राम आणि लक्ष्मण यांच्या अंगावर धावून जाऊं लागली. (२१-२४)

तेव्हा विद्युल्लतेप्रमाणें वेगावेगाने ती पराक्रमी यक्षिणी चाल करून येत आहे,

*

शरेणोरसि विव्याध पपात च ममार च २५
तां हतां भीमसंकाशां दृष्ट्वा सुरपतिस्तदा।
साधु साध्विति काकुत्स्थं सुराश्चाप्यभिपूजयन् २६
उवाच परमप्रीतः सहस्राक्षः पुरंदरः।
सुराश्च सर्वे संहृष्टा विश्वामित्रमथाब्रुवन् २७
मुने कौशिक भद्रं ते सेन्द्राः सर्वे मरुद्गणाः।
तोषिताः कर्मणानेन स्नेहं दर्शय राघवे २८
प्रजापतेः कृशाश्वस्य पुत्रान्सत्यपराक्रमान्।
तपोबलभृतो ब्रह्मन्राघवाय निवेदय २९
पात्रभूतश्च ते ब्रह्मँस्तवानुगमने रतः।
कर्तव्यं सुमहत्कर्म सुराणां राजसूनुना ३०
एवमुक्त्वा सुराः सर्वे जग्मुर्हृष्टा विहायसम्।
विश्वामित्रं पूजयन्तस्ततः सन्ध्या प्रवर्तते ३१
ततो मुनिवरः प्रीतस्ताटकावधतोषितः।

---

तोंच रामाने तिच्या वक्षस्थलावर बाण मारिला व ती बाणाने विद्ध होतांक्षणीं भूमीवर पडून मरण पावली. याप्रमाणे त्या उग्ररूपी यक्षिणीचा वध झाल्याचें अवलोकन करून, इंद्र व इतर देव " उत्तम उत्तम " म्हणून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची प्रशंसा करूं लागले. नंतर अत्यंत प्रसन्न झालेला असा सहस्राक्ष इंद्र आणि आनंदित झालेले सर्व देव विश्वामित्रमुनींना म्हणाले, " हे कौशिकमुने, तुझें कल्याण असो. सर्व देवगण इंद्रासहवर्तमान तुझ्या या कृत्याने संतुष्ट झाले आहेत. तूं आता रघुकुलोत्पन्न रामाचे ठिकाणीं आपला हा आप्तशिष्य आहे, या भावनेने प्रेमपूर्वक अनुग्रह कर. हे ब्रह्मन्, प्रजापति कृशाश्वाचे तपःसामर्थ्याने युक्त असलेले अमोघपराक्रमी पुत्र तूं रघुवंशज रामाला अर्पण कर. हे ब्रह्मन्, तुझी शुश्रूषा करण्याविषयी तत्पर असलेला राम तुझ्या दानाला पात्र आहे आणि त्या राजकुमाराला देवांचें फारच मोठें कार्य कर्तव्य आहे. " ( २५–३० )

याप्रमाणे विश्वामित्रांना सांगून त्यांची प्रशंसा करीत करीत सर्व देव आकाशमार्गें गमन करते झाले व इतक्यांत संध्यासमयही प्राप्त झाला. देव गेल्यानंतर ताट-

मूर्ध्नि राममुपाघ्राय इदं वचनमब्रवीत् ३२
इहाद्य रजनीं राम वसाम शुभदर्शन ।
श्वःप्रभाते गमिष्यामस्तदाश्रमपदं मम ३३
विश्वामित्रवचः श्रुत्वा हृष्टो दशरथात्मजः ।
उवास रजनीं तत्र ताटकाया वने सुखम् ३४
मुक्तशापं वनं तच्च तस्मिन्नेव तदाहनि ।
रमणीयं विबभ्राज यथा चैत्ररथं वनम् ३५
निहत्य तां यक्षसुतां स रामः प्रशस्यमानः सुरसिद्धसंघैः ।
उवास तस्मिन्मुनिना सहैव प्रभातवेलां प्रतिबोध्यमानः ३६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षड्विंशः सर्गः ।२६। [९०२]

सप्तविंशः सर्गः ।

अथ तां रजनीमुष्य विश्वामित्रो महायशाः ।
प्रहस्य राघवं वाक्यमुवाच मधुरस्वरम् १
परितुष्टोऽस्मि भद्रं ते राजपुत्र महायशः ।

केच्या वधाने संतुष्ट झालेले मुनिश्रेष्ठ विश्वामित्र रामाचें मस्तकीं अवघ्राण करून म्हणाले, " हे शुभदर्शना रामा, आजची रात्र आपण येथेच काढूं आणि उद्या उजाडल्यावर त्या माझ्या आश्रमाला जाऊं. " याप्रमाणे विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण करून दशरथपुत्र आनंदित झाला आणि ती रात्र ताटकेच्या वनामध्ये त्याने सुखाने घालविली. तेव्हा उपद्रवरहित झालेलें तें वन इंद्राच्या चैत्ररथ-वनाप्रमाणे रमणीय होऊन त्याच दिवशीं शोभूं लागलें. सारांश, त्या ताटकानामक यक्षकन्येचा रामाने वध केला असतां, देवगण आणि सिद्धसमुदाय त्याची प्रशंसा करूं लागले आणि प्रभातसमय प्राप्त झाला असतां, विश्वामित्रमुनि ज्याला जागा करीत असत, तो राम त्या वनामध्ये त्या मुनीसहवर्तमान राहिला. ( ३१-३६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी सव्विसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २६ ॥

त्या रात्रीं त्या ठिकाणीं वास्तव्य केल्यानंतर महाकीर्तिमान् विश्वामित्रमुनि हास्यपूर्वक मधुर स्वराने युक्त असें भाषण रघुवंशज रामाशीं करूं लागले की,

प्रीत्या परमया युक्तो ददाम्यस्त्राणि सर्वशः २
देवासुरगणान्वापि सगन्धर्वोरगान्भुवि ।
यैरमित्रान्प्रसह्याजो वशीकृत्य जयिष्यसि ३
तानि दिव्यानि भद्रं ते ददाम्यस्त्राणि सर्वशः ।
दण्डचक्रं महद्दिव्यं तव दास्यामि राघव ४
धर्मचक्रं ततो वीर कालचक्रं तथैव च ।
विष्णुचक्रं तथात्युग्रमैन्द्रं चक्रं तथैव च ५
वज्रमस्त्रं नरश्रेष्ठ शैवं शूलवतं तथा ।
अस्त्रं ब्रह्मशिरश्चैव ऐषीकमपि राघव ६
ददामि ते महाबाहो ब्राह्ममस्त्रमनुत्तमम् ।
गदे द्वे चैव काकुत्स्थ मोदकी शिखरी शुभे ७
प्रदीप्ते नरशार्दूल प्रयच्छामि नृपात्मज ।
धर्मपाशमहं राम कालपाशं तथैव च ८
वारुणं पाशमस्त्रं च ददाम्यहमनुत्तमम् ।
अशनी द्वे प्रयच्छामि शुष्कार्द्रे रघुनन्दन ९

" हे महायशस्वी राजपुत्रा, तुझें कल्याण असो; मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें आणि अत्यंत प्रसन्न होऊन तुला मी सर्व अस्त्रें देत आहें. त्या अस्त्रांच्या सहाय्यानें तूं पृथ्वीवरील गंधर्व आणि उरग यांसहवर्तमान शत्रुभूत देवदैत्यगणांना संग्रामामध्यें जेरीस आणून जिंकशील. हे रघुवंशजा रामा, तुझें कल्याण असो. मी तीं सर्व दिव्य अस्त्रें व त्याचप्रमाणे दिव्य असें मोठें दंडचक्र तुला देईन. तसेंच हे वीरा, धर्मचक्र, कालचक्र, विष्णुचक्र आणि अत्यंत उग्र असें इंद्रचक्र मी तुला देतों. ( १–५ )

हे पुरुषश्रेष्ठा रघुवंशजा रामा, वज्रास्त्र, शैवास्त्र, शूलवतनामक अस्त्र, ब्रह्मशिरोनामक अस्त्र आणि ऐषीकास्त्र मी तुला देईन. हे महापराक्रमी रामा, अनुपम असें ब्रह्मास्त्र मी तुला देतों आणि त्याचप्रमाणे हे ककुस्थकुलोत्पन्ना, मोदकी आणि शिखरी या दोन उज्ज्वल गदा व हे पुरुषश्रेष्ठा राजपुत्रा रामा, धर्मपाश आणि कालपाश मी तुला देतों. हे रघुनंदना, वारुणपाश हें अनुपम अस्त्र आणि

ददामि चास्त्रं पैनाकमस्त्रं नारायणं तथा ।
आग्नेयमस्त्रं दयितं शिखरं नाम नामतः  १०
वायव्यं प्रथमं नाम ददामि तव चानघ ।
अस्त्रं हयशिरो नाम क्रौञ्चमस्त्रं तथैव च  ११
शक्तिद्वयं च काकुत्स्थ ददामि तव राघव ।
कङ्कालं मुसलं घोरं कापालमथ किङ्किणीम्  १२
वधार्थं रक्षसां यानि ददाम्येतानि सर्वशः ।
वैद्याधरं महास्त्रं च नन्दनं नाम नामतः  १३
असिरत्नं महाबाहो ददामि नृवरात्मज ।
गान्धर्वमस्त्रं दयितं मोहनं नाम नामतः  १४
प्रस्वापनं प्रशमनं दद्मि सौम्यं च राघव ।
वर्षणं शोषणं चैव संतापनविलापने  १५
मादनं चैव दुर्धर्षं कन्दर्पदयितं तथा ।
गान्धर्वमस्त्रं दयितं मानवं नाम नामतः  १६
पैशाचमस्त्रं दयितं मोहनं नाम नामतः ।

---

शुष्क व आर्द्र अशीं दोन अशनीसंज्ञक अस्त्रें मी तुला देईन. ( ६-९ )

पैनाकास्त्र, नारायणास्त्र, अग्नीला प्रिय आणि शिखर या नांवानें प्रसिद्ध असें आग्नेयास्त्र व मुख्य वायव्यास्त्र हे निष्पापा, मी तुला देतों. हयशिरोनामक अस्त्र, क्रौंचास्त्र आणि हे ककुत्स्थकुलोत्पन्ना राघवा, दोन शक्ति मी तुला देतों. कंकाल, मुसल, उग्र असें कापाल, किंकिणी इत्यादि राक्षसांचा वध करण्यास समर्थ असलेलीं हीं सर्व अस्त्रें मी तुला देतों. नंदन या नांवानें प्रसिद्ध असलेलें मोठें वैद्याधरास्त्र, हे महापराक्रमी राजपुत्रा, उत्कृष्ट खड्ग, मोहन या नांवानें प्रसिद्ध व गंधर्वांना प्रिय असें गांधर्वास्त्र, प्रस्वापन, प्रशमन, सौम्य, वर्षण, शोषण, संतापन व विलापन हीं अस्त्रें, हे रघुवंशजा रामा, मी तुला देतों. ( १०-१५ )

मदनाला प्रिय आणि सहन करण्यास फारच अशक्य असें मादननामक अस्त्र, मानव या नांवानें प्रसिद्ध आणि गंधर्वांना प्रिय असें गांधर्वास्त्र आणि मोहन या नांवानें प्रसिद्ध व पिशाचांना प्रिय असें पैशाच अस्त्र, हे, पुरुषश्रेष्ठा महा-

प्रतीच्छ नरशार्दूल राजपुत्र महायशः १७
तामसं नरशार्दूल सौमनं च महाबलम् ।
संवर्तं चैव दुर्धर्षं मौसलं च नृपात्मज १८
सत्यमस्त्रं महाबाहो तथा मायामयं परम् ।
सौरं तेजःप्रभं नाम परतेजोऽपकर्षणम् १९
सोमास्त्रं शिशिरं नाम त्वाष्ट्रमस्त्रं सुदारुणम् ।
दारुणं च भगस्यापि शीतेषुमथ मानदम् २०
एतान्राम महाबाहो कामरूपान्महाबलान् ।
गृहाण परमोदारान्क्षिप्रमेव नृपात्मज २१
स्थितस्तु प्राङ्मुखो भूत्वा शुचिर्मुनिवरस्तदा ।
ददौ रामाय सुप्रीतो मन्त्रग्राममनुत्तमम् २२
सर्वसंग्रहणं येषां दैवतैरपि दुर्लभम् ।
तान्यस्त्राणि तदा विप्रो राघवाय न्यवेदयत् २३
जपतस्तु मुनेस्तस्य विश्वामित्रस्य धीमतः ।
उपतस्थुर्महार्हाणि सर्वाण्यस्त्राणि राघवम् २४

---

यशस्वी राजपुत्रा, तूं घे. हे पुरुषश्रेष्ठा राजपुत्रा, तामस, महाबलाढ्य सौमन, दुःसह असें संवर्त, मौसल, सत्यसंज्ञक अस्त्र, हे महापराक्रमी रामा, मायामय असें एक दुसरें अस्त्र, शत्रुतेजोनाशक असें तेजःप्रभसंज्ञक सूर्याचें अस्त्र, चंद्राचें शिशिर-नामक अस्त्र, अत्यंत भयंकर असें त्वाष्ट्र अस्त्र आणि शत्रूंचा पराजय करणारें असें भगदेवाचें भयंकर शीतेषुनामक अस्त्र तूं ग्रहण कर. हे महापराक्रमी राज-पुत्रा, यथेष्टरूप धारण करणारे असे हे महाबलाढ्य व अत्यंत उदार अस्त्ररूपी कृशाश्वपुत्र तूं सत्वर घे." ( १६–२१ )

याप्रमाणे सांगितल्यावर ते मुनिश्रेष्ठ विश्वामित्र प्राङ्मुख झाले आणि अत्यंत प्रसन्न होऊन त्यांनी रामाला अत्युत्कृष्ट असा अस्त्रविषयक मंत्रसमुदाय ( उपदेश-रूपाने ) अर्पण केला. तात्पर्य, ज्यांचा सर्व प्रकारचा संग्रह देवांनाही दुर्लभ आहे तीं अस्त्रें त्या विप्र विश्वामित्रांनी रघुवंशज रामाला त्या वेळीं अर्पण केलीं. सारांश, ते बुद्धिमान् विश्वामित्रमुनि त्या अस्त्रविषयक मंत्रांचा जप करूं लागले

ऊचुश्च मुदिता रामं सर्वे प्राञ्जलयस्तदा ।
इमे च परमोदार किंकरास्तव राघव २५
यद्यदिच्छसि भद्रं ते तत्सर्वं करवाम वै ।
ततो रामः प्रसन्नात्मा तैरित्युक्तो महाबलैः २६
प्रतिगृह्य च काकुत्स्थः समालभ्य च पाणिना ।
मानसा * मे भविष्यध्वमिति तान्यभ्यचोदयत् २७
ततः प्रीतमना रामो विश्वामित्रं महामुनिम् ।
अभिवाद्य महातेजा गमनायोपचक्रमे २८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि काव्ये बालकाण्डे सप्तविंशः सर्गः २७ [९३०]

---

असतां सर्व अमूल्य अस्त्रें रघुवंशज रामासमीप मूर्तिमंत येऊन उभीं राहिलीं. नंतर मूर्तिमान् येऊन उभे राहिलेले ते सर्व अस्त्ररूप कृशाश्वपुत्र हात जोडून आनंदाने त्याला म्हणाले, "हे अत्यंत उदार राघवा, हे आम्हीं तुझे दास आलों आहोंत तुझें कल्याण असो. तूं जें जें मनामध्ये आणशील तें तें सर्व आम्ही शेवटास नेऊं". याप्रमाणे त्या महाबलाढ्य कृशाश्वपुत्रांनी रामाला सांगितलें असतां त्याचें मन प्रसन्न झालें आणि हाताने स्पर्श करून त्यांचा स्वीकार केल्यावर, "तुम्ही स्मरण केल्याबरोबर तत्काल येऊन उपस्थित होत जावें." अशी त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाने त्यांना आज्ञा केली. तदनंतर मनामध्ये प्रसन्न झालेला महातेजस्वी राम महामुनि विश्वामित्रांना अभिवंदन करून पुढें जाण्यास उद्युक्त झाला. ( २२–२८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २७ ॥

---

* श्लोक २७. "मानसा मे भविष्यद्ध्वम्" यांत "मानसाः मनोऽनुसारिणाः चिन्तामात्रे उपस्थिताः इति यावत् ।" म्हणजे स्मरण केल्याबरोबर प्राप्त व्हा हा गोविन्दराज यांचा अर्थ आहे. भू=प्राप्त होणें या अर्थी धातु आहे. ( २ ) मानसाः- सदा मनसि स्थिताः" हा तिलक टीकाकाराचा अर्थ आहे, पण यापेक्षा गोविन्दराजाचा अधिक सरस असल्याकारणाने भाषान्तरांत तो गोविंदराजाचा अर्थ घेतला आहे.

अष्टाविंशः सर्गः ।

प्रतिगृह्य ततोऽस्त्राणि प्रहृष्टवदनः शुचिः ।
गच्छन्नेव च काकुत्स्थो विश्वामित्रमथाब्रवीत् १
गृहीतास्त्रोऽस्मि भगवन्दुराधर्षः सुरैरपि ।
अस्त्राणां त्वहमिच्छामि संहारान्मुनिपुङ्गव २
एवं ब्रुवति काकुत्स्थे विश्वामित्रो महातपाः ।
संहारान्व्याजहाराथ धृतिमान्सुव्रतः शुचिः ३
सत्यवन्तं सत्यकीर्तिं धृष्टं रभसमेव च ।
प्रतिहारतरं नाम पराङ्मुखमवाङ्मुखम् ४
लक्ष्यालक्ष्याविमौ चैव दृढनाभसुनाभकौ ।
दशाक्षशतवक्त्रौ च दशशीर्षशतोदरौ ५
पद्मनाभमहानाभौ दुन्दुनाभस्वनाभकौ ।
ज्योतिषं शकुनं चैव नैरास्यविमलावुभौ ६
यौगन्धरविनिद्रौ च दैत्यप्रमथनौ तथा ७
शुचिबाहुर्महाबाहुर्निष्कलिर्विरुचस्तथा ।
सार्चिमाली धृतिमाली वृत्तिमान्रुचिरस्तथा ८

---

तदनंतर अस्त्रांचा स्वीकार केल्यावर प्रसन्न मुद्रेने युक्त व शुचिर्भूत असलेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम जातां जातांच विश्वामित्रमुनींना म्हणाला, " हे भगवन्, मी अस्त्रांचा स्वीकार केला आहे व त्यामुळे मी आता देवांनाही अजिंक्य झालों आहें, परंतु हे मुनिश्रेष्ठ, अस्त्रांचा उपसंहार कसा करावा, हें जाणण्याची मला इच्छा आहे. याप्रमाणे ककुत्स्थकुलोत्पन्न राम बोलूं लागला असतां धैर्यवान्, सदाचरणसंपन्न आणि शुचिर्भूत अशा महातपस्वी विश्वामित्रमुनींनी अस्त्रांचे उपसंहार रामाला सांगितले. ( आणि नंतर त्याला ते म्हणाले )( १–३ )

" सत्यवान्, सत्यकीर्ति, धृष्ट, रभस, प्रतिहारतर, पराङ्मुख, अवाङ्मुख, हे लक्ष्य आणि अलक्ष्य, दृढनाभ, वसुनाभ, दशाक्ष व शतवक्त्र, दशशीर्ष व शतोदर, पद्मनाभ व महानाभ, दुंदुनाभ व स्वनाभ, ज्योतिष, शकुन, उभयतां नैरास्य व विमल, दैत्यनाशक, योगंधर व विनिद्र ( हे अस्त्ररूप कृशाश्वपुत्र मी तुला देत

पित्र्यः सौमनसश्चैव विधूतमकरावुभौ ।
परवीरं रतिं चैव धनधान्यौ च राघव ९
कामरूपं कामरुचिं मोहमावरणं तथा ।
जृम्भकं सर्पनाथं च पन्थानवरुणौ तथा १०
कृशाश्वतनयान्राम भास्वरान्कामरूपिणः ।
प्रतीच्छ मम भद्रं ते पात्रभूतोऽसि राघव ११
बाढमित्येव काकुत्स्थः प्रहृष्टेनान्तरात्मना ।
दिव्यभास्वरदेहाश्च मूर्तिमन्तः सुखप्रदाः १२
केचिदङ्गारसदृशाः केचिद्धूमोपमास्तथा ।
चन्द्रार्कसदृशाः केचित्प्रह्वाञ्जलिपुटास्तथा १३
रामं प्राञ्जलयो भूत्वाब्रुवन्मधुरभाषिणः ।
इमे स्म नरशार्दूल शाधि किं करवाम ते १४
गम्यतामिति तानाह यथेष्टं रघुनन्दनः ।

---

असून, ) शुचिबाहु, महाबाहु, निष्कली, विरुच, सार्चिमाली, वृत्तिमान्, रुचिर, पित्र्य, सौमनस, आणि हे राघवा, उभयतां विधूत व मकर हे मी तुला देतों. शिवाय परवीर, रति, धन व धान्य, कामरूप, कामरुचि, मोह, आवरण, जृंभक, सर्पनाथ आणि पंथान व वरुण हे यथेष्ट रूप धारण करणारे व तेजोमय असलेले अस्त्ररूप कृशाश्वपुत्र तूं घे. हे राघवा, तूं माझ्या दानाला पात्र आहेस; तुझें कल्याण असो. " ( ४-११ )

याप्रमाणे विश्वामित्रमुनींनी सांगितलें असतां " होय, " एवढेंच म्हणून ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें प्रसन्न मनानें त्यांचा स्वीकार केला; तेव्हां दिव्य आणि उज्ज्वल देहानें युक्त व सुखप्रद असे ते अस्त्ररूप कृशाश्वपुत्र मूर्तिमान् तेथें आले. सारांश, कांहीं अग्नीसारिखे, कांहीं धूमसदृश आणि कांहीं चंद्रसूर्याप्रमाणे तेजस्वी असे नम्र होऊन व हात जोडून तेथें उभे राहिले आणि याप्रमाणे हात जोडून उभे राहिल्यावर ते मधुर भाषण करणारे अस्त्ररूप कृशाश्वपुत्र रामाला म्हणाले हे पुरुषश्रेष्ठा, हे आम्ही आलों आहोंत. आम्ही आपलें काय करावें, त्याची आपण आज्ञा करा. याप्रमाणे त्यांनी प्रार्थना केली असतां " आपण

मानसाः कार्यकालेषु साहाय्यं मे करिष्यथ १५
अथ ते राममामन्त्र्य कृत्वा चापि प्रदक्षिणम् ।
एवमस्त्विति काकुत्स्थमुक्त्वा जग्मुर्यथागतम् १६
स च तान्राघवो ज्ञात्वा विश्वामित्रं महामुनिम् ।
गच्छन्नेवाथ मधुरं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् १७
किमेतन्मेघसंकाशं पर्वतस्याविदूरतः ।
वृक्षखण्डमितो भाति परं कौतूहलं हि मे १८
दर्शनीयं मृगाकीर्णं मनोहरमतीव च ।
नानाप्रकारैः शकुनैर्वल्गुभाषैरलंकृतम् १९
निःसृताः स्म मुनिश्रेष्ठ कान्ताराद्रोमहर्षणात् ।
अनया त्ववगच्छामि देशस्य सुखवत्तया २०
सर्वं मे शंस भगवन्कस्याश्रमपदं त्विदम् ।

( आता ) सांप्रत यथेष्ट गमन करा आणि कार्यसमय प्राप्त झाला असतां, माझ्या मनामध्ये मंत्ररूपाने उपस्थित होऊन आपण मला सहाय्य करा. " ( १२–१५ )

याप्रमाणे रामाने त्यांना सांगितल्यावर " ठीक आहे, " असें म्हणून त्यांनी रामाचा निरोप घेतला आणि त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला प्रदक्षिणा करून ते आल्या वाटेने चालते झाले. याप्रमाणे अस्त्रांचें ज्ञान झाल्यानंतर रघुवंशज राम जातां जातांच महामुनिविश्वामित्रांना मधुर आणि मृदु अशा वाणीने प्रश्न करूं लागला ( की, भगवन् ) पर्वतापासून दूर नसलेला हा मेघतुल्य वृक्षसमूह मला दिसत आहे, तो का आश्रमसंबंधी आहे किंवा वनसंबंधी आहे, हें आपण मला सांगा. त्याविषयी माझ्या मनामध्ये पराकाष्ठेची उत्सुकता उत्पन्न झाली आहे. ( १६–१८ )

हा वृक्षसमुदाय दिसण्यांत उत्तम असून मनोहर आहे. मृगांनी हा व्याप्त झालेला आहे आणि मधुर शब्द करणाऱ्या नाना प्रकारच्या पक्ष्यांनी याला शोभा आणिलेली आहे. हे मुनिश्रेष्ठ, आपण आता शरिरावर काटा आणणाऱ्या अशा भयंकर वनमार्गांतून बाहेर पडलों आहोंत आणि या प्रदेशाच्या सुखीपणावरून हें आश्रमस्थान असावें, असें मला वाटत आहे. करितां, हे भगवन् ! हें कोणाचें

संप्राप्ता यत्र ते पापा ब्रह्मघ्ना दुष्टचारिणः　　२१
तव यज्ञस्य विघ्नाय दुरात्मानो महामुने ।
भगवँस्तस्य को देशः सा यत्र तव याज्ञिकी　　२२
रक्षितव्या क्रिया ब्रह्मन्मया वध्याश्च राक्षसाः ।
एतत्सर्वं मुनिश्रेष्ठ श्रोतुमिच्छाम्यहं प्रभो　　२३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टाविंशः सर्गः २८ [९५३]

एकोनत्रिंशः सर्गः ।

अथ तस्याप्रमेयस्य × वचनं परिपृच्छतः ।
विश्वामित्रो महातेजा व्याख्यातुमुपचक्रमे　　१
इह राम महाबाहो विष्णुर्देवनमस्कृतः ।
वर्षाणि सुबहूनीह तथा युगशतानि च　　२
तपश्चरणयोगार्थमुवास सुमहातपाः ।

---

आश्रमस्थान आहे, हें सर्व आपण मला सांगा. ज्या ठिकाणीं ते ब्रह्मघातकी, दुराचारी, पापी आणि दुरात्मे राक्षस आपल्या यज्ञाला विघ्न करण्यास प्रवृत्त झाले आहेत आणि ज्या ठिकाणीं आपल्या त्या यज्ञकर्माचें संरक्षण व राक्षसांचा वध मला कर्तव्य आहे. त्या आपल्या आश्रमाचा प्रदेश कोणता तो, हे महामुने, आपण मला सांगा. हे ब्रह्मन्, हे मुनिश्रेष्ठ, हे प्रभो, हें सर्व श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. ( १९-२३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-काण्डापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २८ ॥

नंतर प्रश्न विचारणाऱ्या त्या अतर्क्य वैभव आहे, अशा रामाचें भाषण श्रवण करून महातेजस्वी विश्वामित्रमुनि विचारलेल्या प्रश्नांचें उत्तर देऊं लागले. ( ते म्हणाले ) " हे महापराक्रमी रामा, देवांना वंद्य अशा अत्यंत महातपस्वी विष्णूने ( तपश्चर्येकडे लोकांची प्रवृत्ति व्हावी, एतदर्थ ) तपश्चर्या करण्याकरितां पुष्कळ वर्षेंच नव्हे, परंतु शेकडो युगें या ठिकाणी वास्तव्य केलेलें आहे. हे रामा,

---

× श्लोक १. सर्ग २९– अप्रमेयस्य अचिंत्यवैभवस्य । इति गोविन्दराजः । ज्याचें वैभव कल्पनेंत येऊं शकत नाही असा.

एष पूर्वाश्रमो राम वामनस्य महात्मनः ३
सिद्धाश्रम इति ख्यातः सिद्धो ह्यत्र महातपाः ।
एतस्मिन्नेव काले तु राजा वैरोचनिर्बलिः ४
निर्जित्य दैवतगणान्सेन्द्रान्सहमरुद्गणान् ।
कारयामास तद्राज्यं त्रिषु लोकेषु विश्रुतः ।
यज्ञं चकार सुमहानसुरेन्द्रो महाबलः ५
बलेस्तु यजमानस्य देवाः साग्निपुरोगमाः ।
समागम्य स्वयं चैव विष्णुमूचुरिहाश्रमे ६
बलिर्वैरोचनिर्विष्णो यजते यज्ञमुत्तमम् ।
असमाप्तव्रते तस्मिन्स्वकार्यमभिपद्यताम् ७
ये चैनमभिवर्तन्ते याचितार इतस्ततः ।
यच्च यत्र यथावच्च सर्वं तेभ्यः प्रयच्छति ८
स त्वं सुरहितार्थाय मायायोगमुपाश्रितः ।
वामनत्वं गतो विष्णो कुरु कल्याणमुत्तमम् ९

वामन अवतार घेण्यापूर्वी तपश्चर्या करण्याकरितां महात्म्या विष्णूने या आश्रमाचा स्वीकार केला होता व महातपस्वी विष्णु या ठिकाणीं तपानें सिद्ध झाल्यामुळे सिद्धाश्रम म्हणून हा आश्रम प्रसिद्ध आहे. या आश्रमांत विष्णु तपश्चर्या करीत असतांनाच इंद्र आणि मरुद्गण यांसहवर्तमान देवगणांना जिंकून विरोचनपुत्र बलिराजानें, तें इंद्रादिकांचें राज्य स्वतः करण्यास आरंभ केला व त्रैलोक्यामध्ये विख्यात असलेल्या त्या महाबलाढ्य व अतिप्रचंड दैत्यराजानें एक यज्ञही केला. ( १–५ )

परंतु, बलि यज्ञ करीत असतांना अग्निप्रभृति देव या आश्रमामध्ये स्वतः विष्णूकडे आले आणि म्हणाले, " हे विष्णो, विरोचनपुत्र बलि उत्तम यज्ञ करीत आहे. करितां, तें व्रत संपूर्ण होण्यापूर्वी आपण आपलें कार्य साधून घ्यावें. इकडल्या-तिकडल्या प्रदेशांतून तेथें जाऊन जे याचक त्याच्यापाशीं जें जें मागण्याकरितां जातात, तें तें सर्व तो त्यांना यथायोग्य रीतीनें अर्पण करितो. यास्तव, हे विष्णो, देवहिताकरितां मायेचें अवलंबन करून आपण वामनत्व स्वीकारा आणि आमचें

एतस्मिन्नन्तरे राम कश्यपोऽग्निसमप्रभः ।
आदित्या सहितो राम दीप्यमान इवौजसा १०
देवीसहायो भगवान्दिव्यं वर्षसहस्रकम् ।
व्रतं समाप्य वरदं तुष्टाव मधुसूदनम् ११
तपोमयं तपोराशिं तपोमूर्तिं तपात्मकम् ।
तपसा त्वां सुतप्तेन पश्यामि पुरुषोत्तमम् १२
शरीरे तव पश्यामि जगत्सर्वमिदं प्रभो ।
त्वमनादिरनिर्देश्यस्त्वामहं शरणं गतः १३
तमुवाच हरिः प्रीतः कश्यपं धूतकल्मषम् ।
वरं वरय भद्रं ते वरार्होऽसि मतो मम १४
तच्छ्रुत्वा वचनं तस्य मारीचः कश्यपोऽब्रवीत् ।
आदित्या देवतानां च मम चैवानुयाचितम् १५
वरं वरद सुप्रीतो दातुमर्हसि सुव्रत ।
पुत्रत्वं गच्छ भगवन्नादित्या मम चानघ १६

---

चांगलें कल्याण करा. ” ( ६–९ )

हे रामा, हें यांचें भाषण चाललें आहे, तोंच अग्नितुल्य प्रभेनें युक्त आणि म्हणूनच तेजानें देदीप्यमान अशा भगवान् काश्यपमुनींनी अदितीसहवर्तमान सहस्र दिव्य वर्षेपर्यंत चालविलेली तपश्चर्या समाप्त केली आणि देवीसहवर्तमान ते वरप्रद मधुसूदनाची स्तुति करूं लागले की, “ हे प्रभो, तपोमय, तपोराशि, तपोमूर्ति व ज्ञानस्वरूप अशा तुज पुरुषश्रेष्ठाला मी आचरिलेल्या तपाच्या योगानें अवलोकन करीत आहें. हे प्रभो, तुझ्या शरिराचे ठिकाणीं मी हें सर्व जगत् अवलोकन करीत आहें. तूं अनादि असून अतर्क्य आहेस. मी तुला शरण आलों आहें. ( १०–१३ )

याप्रमाणे स्तुति झाल्यावर “ वर माग; तुझें कल्याण असो; तूं वराला योग्य आहेस, असें मी समजतों, ” म्हणून श्रीहरींनी प्रसन्न होऊन पापक्षालन झालेल्या कश्यपमुनींना सांगितलें असतां ते मरीचिमुनि म्हणाले, “ हे वरप्रद, अदिति, देवता आणि मी यांनी प्रार्थित असा वर आपण प्रसन्न होऊन मला द्या. सारांश,

भ्राता भव यवीयाँस्त्वं शक्रस्यासुरसूदन ।
शोकार्तानां तु देवानां साहाय्यं कर्तुमर्हसि १७
अयं सिद्धाश्रमो नाम प्रसादात्ते भविष्यति ।
सिद्धे कर्मणि देवेश उत्तिष्ठ भगवन्नितः १८
अथ विष्णुर्महातेजा अदित्यां समजायत ।
वामनं रूपमास्थाय वैरोचनिमुपागतम् १९
त्रीन्पदानथ भिक्षित्वा प्रतिगृह्य च मेदिनीम् ।
आक्रम्य लोकाँल्लोकार्थी सर्वलोकहिते रतः २०
महेन्द्राय पुनः प्रादान्नियम्य बलिमोजसा ।
त्रैलोक्यं स महातेजाश्चक्रे शक्रवशं पुनः २१
तेनैव पूर्वमाक्रान्त आश्रमः श्रमनाशनः ।
मयापि भक्त्या तस्यैव वामनस्योपभुज्यते २२

हे सुव्रत, हे भगवन्, हे निष्पाप, माझे व अदितीचे आपण पुत्र व्हा, हे दैत्य-नाशक, आपण इंद्राचे कनिष्ठ बंधु व्हा आणि शोकाकुल झालेल्या देवांना सहाय्य करा. आपल्या प्रसादाने हा प्रदेश सिद्धाश्रम म्हणून प्रसिद्ध होईल. हे भगवन्, ही तपश्चर्या संपूर्ण झाली आहे. करितां, हे देवाधिदेव, आता देवकार्याकरितां आपण येथून उठा. " ( १४–१८ )

याप्रमाणे काश्यपमुनींनी प्रार्थना केली असतां महातेजस्वी विष्णु आदितीचे ठिकाणीं जन्मास आले आणि वामनरूप धारण करून ते विरोचनपुत्र बलीकडे गेले. नंतर त्रैलोक्य व्यापण्याची इच्छा धरून सर्व लोकांच्या हितविषयी तत्पर असलेल्या विष्णूंनी बलीपाशी त्रिपाद भूमीची भिक्षा मागितली, त्याप्रमाणे त्या भूमीचा प्रतिग्रह केला आणि तीन पदांनी तिन्ही लोक व्याप्त करून व आपल्या सामर्थ्याने बलीचा निग्रह करून पुनरपि त्यांनी तें त्रैलोक्य महेंद्राला अर्पण केलें. सारांश, त्या महातेजस्वी विष्णूंनी पुनरपि त्रैलोक्य इंद्राधीन करून टाकिलें. असो. या श्रमपरिहार करणाऱ्या आश्रमामध्ये पूर्वी त्या वामनावतार धारण करणाऱ्या ईश्वरानेच वास्तव्य केलें होतें आणि मीही त्या वामनाच्याच प्रसादाने या आश्रमाचा उपभोग घेत आहें. विघ्न करणारे राक्षस या आश्रमामध्ये येत असतात.

एनमाश्रममायान्ति राक्षसा विघ्नकारिणः ।
अत्र ते पुरुषव्याघ्र हन्तव्या दुष्टचारिणः    २३
अद्य गच्छामहे राम सिद्धाश्रममनुत्तमम् ।
तदाश्रमपदं तात तवाप्येतद्यथा मम    २४
इत्युक्त्वा परमप्रीतो गृह्य रामं सलक्ष्मणम् ।
प्रविशन्नाश्रमपदं व्यरोचत महामुनिः    २५
शशीव गतनीहारः पुनर्वसुसमन्वितः    २६
तं दृष्ट्वा मुनयः सर्वे सिद्धाश्रमनिवासिनः ।
उत्पत्योत्पत्य सहसा विश्वामित्रमपूजयन्    २७
यथार्हं चक्रिरे पूजां विश्वामित्राय धीमते ।
तथैव राजपुत्राभ्यामकुर्वन्नतिथिक्रियाम्    २८
मुहूर्तमथ विश्रान्तौ राजपुत्रावरिन्दमौ ।
प्राञ्जली मुनिशार्दूलमूचतू रघुनन्दनौ    २९
अद्यैव दीक्षां प्रविश भद्रं ते मुनिपुङ्गव ।

---

करितां, हे पुरुषश्रेष्ठा, त्या दुराचारी राक्षसांचा या ठिकाणीं वध करणें योग्य आहे. ( १९-२३ )

हे रामा, आज आपण त्या सर्वोत्कृष्ट सिद्धाश्रमाला जाऊं. बा रामा, हें आश्रमस्थान जसें माझें आहे, तसें तुझेंही आहे. याप्रमाणे अत्यंत प्रसन्न झालेले महामुनि विश्वामित्र लक्ष्मणासहवर्तमान रामाला घेऊन त्या आश्रमामध्ये प्रविष्ट होऊं लागले असतां पुनर्वसुसंज्ञक दोन ताऱ्यांनी युक्त असलेला अभ्ररहित चंद्रमा ज्याप्रमाणे शोभूं लागतो, त्याप्रमाणे ते शोभूं लागले. त्यांना अवलोकन केल्याबरोबर सिद्धाश्रमनिवासी सर्व मुनींनी एकदम उठून विश्वामित्रांचें पूजन केलें. ( २४-२७ )

प्रथमतः विवेकी विश्वामित्रमुनींचें त्यांनी यथायोग्य पूजन केलें आणि नंतर त्याचप्रमाणे त्या राजपुत्रांचेंही त्यांनी आदरातिथ्य केलें. असो. आश्रमांत गेल्यावर एक मुहूर्तभर विश्रांति घेतल्यानंतर ते रघुनंदन शत्रुनाशक राजपुत्र हात जोडून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हणाले, " हे मुनिश्रेष्ठ, आपलें देव बरें करो, आपण

सिद्धाश्रमोऽयं सिद्धः स्यात्सत्यमस्तु वचस्तव ३०
एवमुक्तो महातेजा विश्वामित्रो महानृषिः ।
प्रविवेश तदा दीक्षां नियतो नियतेन्द्रियः ३१
कुमाराविव तां रात्रिमुषित्वा सुसमाहितौ ।
प्रभातकाले चोत्थाय पूर्वां संध्यामुपास्य च ३२
प्रशुची परमं जाप्यं समाप्य नियमेन च ।
हुताग्निहोत्रमासीनं विश्वामित्रमवन्दताम् ३३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकोनत्रिंशः सर्गः२९[९८६]

त्रिंशः सर्गः ।

अथ तौ देशकालज्ञौ राजपुत्रावरिन्दमौ ।
देशे काले च वाक्यज्ञावब्रूतां कौशिकं वचः १
भगवञ्छ्रोतुमिच्छावो यस्मिन्काले निशाचरौ ।
संरक्षणीयौ तौ ब्रूहि नातिवर्तेत तत्क्षणम् २

---

आजच दीक्षा घ्या. आपला यज्ञ सिद्ध होऊन म्हणजे शेवटास जाऊन या आश्रमाचें सिद्धाश्रम हें नांव अन्वर्थक होवो आणि त्या दुराचारी राक्षसांचा येथेच वध करणेविषयी आपलें वचन खरें होवो. " याप्रमाणे रामाने प्रार्थना केली असतां मन व इंद्रियें यांचा निग्रह केलेला आहे ज्याने, अशा त्या महातेजस्वी विश्वामित्रमुनींनी त्या वेळीं यज्ञदीक्षा घेतली. असो. शिवपुत्र दोन स्कंदच कीं काय असे शोभत असलेले ते राजकुमार स्वस्थांतःकरणपूर्वक त्या रात्रीं त्या सिद्धाश्रमामध्ये राहिले आणि प्रभातकालीं उठल्यानंतर अतिशयच शुचि असलेल्या त्या राजकुमारांनी प्रातःसंध्या करून आणि नियमाने कर्तव्य जो उत्कृष्ट जप, तोही समाप्त करून, होम देऊन बसलेल्या विश्वामित्रमुनींना वंदन केलें ( २८-३३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी एकोणतिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ २९ ॥

याप्रमाणे वंदन केल्यानंतर देश व काल जाणणारे आणि संभाषणामध्ये निपुण असलेले शत्रुनाशक राजपुत्र योग्य स्थळीं आणि योग्य वेळीं विश्वामित्रमुनींना म्हणाले, " भगवन्, यज्ञसंरक्षण करण्याकरितां त्या निशाचरांचें निवारण केव्हा

एवं ब्रुवाणौ काकुत्स्थौ त्वरमाणौ युयुत्सया ।
सर्वे ते मुनयः प्रीताः प्रशशंसुर्नृपात्मजौ ३
अद्यप्रभृति षड्रात्रं रक्षतां राघवौ युवाम् ।
दीक्षां गतो ह्येष मुनिर्मौनित्वं च गमिष्यति ४
तौ तु तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रौ यशस्विनौ ।
अनिद्रं षडहोरात्रं तपोवनमरक्षताम् ५
उपासाञ्चक्रतुर्वीरौ यत्तौ परमधन्विनौ ।
ररक्षतुर्मुनिवरं विश्वामित्रमरिन्दमम् ६
अथ काले गते तस्मिन्षष्ठेऽहनि तथागते ।
सौमित्रिमब्रवीद्रामो यत्तो भव समाहितः ७
रामस्यैवं ब्रुवाणस्य त्वरितस्य युयुत्सया ।
प्रजज्वाल ततो वेदिः सोपाध्यायपुरोहिता ८
सदर्भचमसस्रुक्का ससमित्कुसुमोच्चया ।

---

केलें पाहिजे, तें आपण सांगा म्हणजे ती वेळ टळणार नाही. " याप्रमाणे ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मण युद्धाच्या उत्कंठेने आज्ञा करण्याविषयी विश्वामित्रमुनींना त्वरा करूं लागले असतां, त्या सिद्धाश्रमांतील ते सर्व मुनि प्रसन्न झाले आणि ( प्रशंसापूर्वक ) त्या राजकुमारांना म्हणाले, " हे रघुकुलोत्पन्न राजपुत्रहो, आजपासून सहा दिवसपर्यंत तुम्ही रक्षण करा. या मुनींनी यज्ञदीक्षा घेतली असल्यामुळे हे तेथपर्यंत मौन धारण करतील. ( याकरितां, तुमच्या प्रश्नाचें उत्तर आम्हीं दिलें आहे ) " ( १-४ )

याप्रमाणे त्या मुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्या यशस्वी राजपुत्रांनी निद्रा न घेतां सहा दिवसरात्र एकसारिखें त्या तपोवनाचें रक्षण केलें. ते श्रेष्ठ धनुर्धारी राजपुत्र सज्ज झाले आणि समीप राहून त्यांनी शत्रुनाशक मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांच्या यज्ञाचें रक्षण करूं लागले. असें चाललें असतां तो सहावा दिवस उजाडल्यावर " तूं सावधपणाने तयार रहा, " म्हणून लक्ष्मणाला रामांनी सांगितलें. याप्रमाणे युद्धाविषयी उत्सुक झालेला राम लक्ष्मणाला सांगत असतांना व ब्रह्मा, उपद्रष्टा आणि इतरही ऋत्विज विश्वामित्रऋषि यांसहवर्तमान येऊन आपआपल्या स्थानीं

*

विश्वामित्रेण सहिता वेदिर्जज्वाल सर्त्विजा ९
मन्त्रवच्च यथान्यायं यज्ञोऽसौ संप्रवर्तते ।
आकाशे च महाञ्छब्दः प्रादुरासीद्भयानकः १०
आवार्य गगनं मेघो यथा प्रावृषि दृश्यते ।
तथा मायां विकुर्वाणौ राक्षसावभ्यधावताम् ११
मारीचश्च सुबाहुश्च तयोरनुचरास्तथा ।
आगम्य भीमसंकाशा रुधिरौघानवासृजन् १२
तां तेन रुधिरौघेण वेदीं वीक्ष्य समुक्षिताम् ।
सहसाभिद्रुतो रामस्तानपश्यत्ततो दिवि १३
तावापतन्तौ सहसा दृष्ट्वा राजीवलोचनः ।
लक्ष्मणं त्वभिसंप्रेक्ष्य रामो वचनमब्रवीत् १४
पश्य लक्ष्मण दुर्वृत्तान्राक्षसान्पिशिताशनान् ।
मानवास्त्रसमाधूताननिलेन यथा घनान् १५

---

बसले असतां, दर्भ, चमस व स्रुचा आणि समिधा व पुष्पें यांच्या राशींनी संपन्न असलेल्या त्या वेदीमधून अग्नीच्या ज्वाला प्रकट होऊं लागल्या आणि त्या यज्ञाचें अनुष्ठान समंत्रक व यथाविधि चालू झालें, तोंच आकाशामध्ये मोठा भयंकर शब्द होऊं लागला आणि आकाश व्याप्त करून ज्याप्रमाणे वर्षाकालीं मेघ मोठी गर्जना करितांना दृष्टीस पडतात, त्याप्रमाणे माया प्रकट करणारे ते राक्षस तेथे धावून आले. ( ५–११ )

मारीच, सुबाहु आणि त्यांचे अनुयायी अशा त्या भयंकर राक्षसांनी तेथे येऊन रक्ताची वृष्टि करण्यास आरंभ केला. तेव्हा, त्या रक्तप्रवाहाने सिंचित झालेली ती वेदि अवलोकन केल्याबरोबर राम एकाएकी यज्ञशालेच्याभोवती धावूं लागला तों आकाशामध्ये ते राक्षस त्याच्या दृष्टीस पडले. त्या राक्षसांपैकी मारीच आणि सुबाहु हे उभयतां एकदम आपल्या अंगावर धावून येत आहेत, असें अवलोकन करून कमलनयन राम लक्ष्मणाकडे पाहून म्हणाला, " हे लक्ष्मणा, पहा ! वायूच्या योगाने ज्याप्रमाणे मेघ उडून जातात, त्याप्रमाणे या मांसभक्षक दुराचारी राक्षसांना मी मानवास्त्राच्या योगाने निःसंशय उडवून लावितों. अशा दुर्बलांचा वध

करिष्यामि न संदेहो नोत्सहे हन्तुमीदृशान् ।
इत्युक्त्वा वचनं रामश्चापे संधाय वेगवान् १६
मानवं परमोदारमस्त्रं परमभास्वरम् ।
चिक्षेप परमक्रुद्धो मारीचोरसि राघवः १७
स तेन परमास्त्रेण मानवेन समाहतः ।
संपूर्णं योजनशतं क्षिप्तः सागरसंप्लवे १८
विचेतनं विघूर्णन्तं शीतेषुबलपीडितम् ।
निरस्तं दृश्य मारीचं रामो लक्ष्मणमब्रवीत् १९
पश्य लक्ष्मण शीतेषुं मानवं मनुसंहितम् ।
मोहयित्वा नयत्येनं न च प्राणैर्वियुज्यते २०
इमानपि वधिष्यामि निर्घृणान्दुष्टचारिणः ।
राक्षसान्पापकर्मस्थान्यज्ञघ्नान्रुधिराशनान् २१
इत्युक्त्वा लक्ष्मणं चाशु लाघवं दर्शयन्निव ।
विगृह्य सुमहच्चास्त्रमाग्नेयं रघुनन्दनः २२

---

करण्याला माझें मन घेत नाही." याप्रमाणे लक्ष्मणाला सांगून त्या वेगवान् रामानें धनुष्याला बाण लाविला. ( १२–१६ )

आणि अत्यंत श्रेष्ठ व अत्यंत उज्ज्वल अशा मानवास्त्राचें अभिमंत्रण करून, तो बाण त्या अत्यंत क्रुद्ध झालेल्या रघुवंशज रामानें मारीच राक्षसाच्या वक्षः-स्थलावर टाकिला. तेव्हा त्या श्रेष्ठ मानवास्त्राच्या योगानें ताडित झालेला तो राक्षस समुद्रामध्यें पुरीं शंभर योजनें लांबपर्यंत फेकला गेला. याप्रमाणें शीतेषु-संज्ञक मानवास्त्राच्या बलानें पीडित झाल्यामुळें मूर्छित झालेला तो मारीच राक्षस समुद्रांत फेकला जाऊन, तडफडत आहे, असें अवलोकन करून लक्ष्मणाला राम म्हणाला, " हे लक्ष्मणा, पहा ! मनूनें प्रथम योजिलेलें हें शीतेषुसंज्ञक मानवास्त्र याला मोह पाडून लांब नेत आहे; परंतु, हें याचे प्राण घेत नाही. असो. या दुराचारी, पापकर्मांविषयी रत, यज्ञघातकी आणि रक्तप्राशन करून असणाऱ्या निर्दय अशा इतर राक्षसांचाही आता मी वध करितों." ( १७–२१ )

याप्रमाणें लक्ष्मणाला बोलून आपलें हस्तलाघव दर्शवीतच कीं काय रघुनंदन

सुबाहुरसि चिक्षेप स विद्धः प्रापतद्भुवि ।
शेषान्वायव्यमादाय निजघान महायशाः २३
राघवः परमोदारो मुनीनां मुदमावहन् ।
स हत्वा राक्षसान्सर्वान्यज्ञघ्नान्रघुनन्दनः २४
ऋषिभिः पूजितस्तत्र यथेन्द्रो विजये पुरा ।
अथ यज्ञे समाप्ते तु विश्वामित्रो महामुनिः २५
निरीतिका दिशो दृष्ट्वा काकुत्स्थमिदमब्रवीत् ।
कृतार्थोऽस्मि महाबाहो कृतं गुरुवचस्त्वया २६
सिद्धाश्रममिदं सत्यं कृतं वीर महायशः ।
स हि रामं प्रशस्यैवं ताभ्यां संध्यामुपागमत् २७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिंशः सर्गः ।३०।[१०१३]

एकत्रिंशः सर्गः ।

अथ तां रजनीं तत्र कृतार्थौ रामलक्ष्मणौ ।

---

रामानें अतिशय प्रचंड असें आग्नेयास्त्र सत्वर घेऊन, सुबाहुनामक राक्षसाच्या वक्षःस्थलावर फेकलें असतां, त्या अस्त्रानें ताडित झालेला तो राक्षस भूमीवर पडला. असो. नंतर अत्यंत उदार अशा त्या महायशस्वी रघुवंशज रामानें वायव्यास्त्र घेऊन इतर राक्षसांचा वध केला असतां त्या सिद्धाश्रमनिवासी मुनींना आनंद झाला. याप्रमाणें रघुनंदन रामानें त्या सर्व यज्ञघातकी राक्षसांचा वध केला असतां, विजयसमयीं पूर्वी ऋषींनीं ज्याप्रमाणें इंद्राचें पूजन केलें, त्याप्रमाणें त्या सिद्धाश्रमनिवासी मुनींनी त्याचें पूजन केलें. असो. नंतर यज्ञ समाप्त झाल्यावर महामुनि विश्वामित्र सर्व प्रदेश पीडारहित झाल्याचें अवलोकन करून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला म्हणाले, " हे महाबाहो, माझा मनोरथ सिद्धीस गेला. गुरूंचें म्हणणें तूं शेवटास नेलेंस आणि हे महायशस्वी वीरा, या आश्रमाचेंही तूं सिद्धाश्रम हें नांव सत्य करून दाखविलेंस. " याप्रमाणें रामाची प्रशंसा केल्यावर ते विश्वामित्रमुनि त्यांच्यासहवर्तमान संध्यावंदन करूं लागले. ( २२–२७ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी तिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३० ॥

ऊषतुर्मुदितौ वीरौ प्रहृष्टेनान्तरात्मना १
प्रभातायां तु शर्वर्यां कृतपौर्वाह्णिकक्रियौ ।
विश्वामित्रमृषींश्चान्यान्सहितावभिजग्मतुः २
अभिवाद्य मुनिश्रेष्ठं ज्वलन्तमिव पावकम् ।
ऊचतुः परमोदारं वाक्यं मधुरभाषिणौ ३
इमौ स्म मुनिशार्दूल किंकरौ समुपागतौ ।
आज्ञापय मुनिश्रेष्ठ शासनं करवाव किम् ४
एवमुक्ते तयोर्वाक्ये सर्व एव महर्षयः ।
विश्वामित्रं पुरस्कृत्य रामं वचनमब्रुवन् ५
मैथिलस्य नरश्रेष्ठ जनकस्य भविष्यति ।
यज्ञः परमधर्मिष्ठस्तत्र यास्यामहे वयम् ६
त्वं चैव नरशार्दूल सहास्माभिर्गमिष्यसि ।
अद्भुतं च धनूरत्नं तत्र त्वं द्रष्टुमर्हसि ७
तद्धि पूर्वं नरश्रेष्ठ दत्तं सदसि दैवतैः ।

---

संध्यावंदन झाल्यानंतर ज्याच्या मनांतील उद्देश शेवटास गेला आहे, असे ते आनंदित झालेले वीर रामलक्ष्मण त्या रात्रीं सुप्रसन्न अंतःकरणाने त्या आश्रमामध्ये राहिले आणि रात्र उजाडल्यार पूर्वाण्हसंबंधीं स्नानसंध्या आटोपून ते उभयतां, विश्वामित्र आणि इतरही ऋषि यांच्यासमीप गेले. नंतर अग्नीप्रमाणे देदीप्यमान असलेल्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना अभिवंदन करून ते मधुर भाषण करणारे रामलक्ष्मण अत्यंत उदात्त वाणींने विश्वामित्रमुनींना म्हणाले. ( १-३ )

"हे मुनिश्रेष्ठ, हे आम्ही किंकर आपलेसमीप आलों आहोंत. आता हे मुनिश्रेष्ठ, आम्ही आपलें आणखी काय कार्य करावयाचें त्याची आज्ञा व्हावी." याप्रमाणे त्यांनी भाषण केलें असतां विश्वामित्रांना पुढाकार देऊन ते ऋषि रामाला म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठा, मैथिलाधिपति जनक राजाच्या घरीं अत्यंत धर्मयुक्त असा यज्ञ होणार असून, तिकडे आम्ही जाणार आहोंत. यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, तूंही आम्हांसहवर्तमान तेथे चल आणि तें अद्भुत श्रेष्ठ धनुष्य त्या ठिकाणीं तूं अवलोकन कर. हे पुरुषश्रेष्ठा रामा, देवरातनामक जो पूर्वीचा जनक राजा

अप्रमेयबलं घोरं मखे परमभास्वरम् ८
नास्य देवा न गन्धर्वा नासुरा न च राक्षसाः ।
कर्तुमारोपणं शक्ता न कथंचन मानुषाः ९
धनुषस्तस्य वीर्यं हि जिज्ञासन्तो महीक्षितः ।
न शेकुरारोपयितुं राजपुत्रा महाबलाः १०
तद्धनुर्नरशार्दूल मैथिलस्य महात्मनः ।
तत्र द्रक्ष्यसि काकुत्स्थ यज्ञं च परमाद्भुतम् ११
तद्धि यज्ञफलं तेन मैथिलेनोत्तमं धनुः ।
याचितं नरशार्दूल सुनाभं सर्वदैवतैः १२
आयागभूतं नृपतेस्तस्य वेश्मनि राघव ।
अर्चितं विविधैर्गन्धैर्धूपैश्चागुरुगन्धिभिः १३
एवमुक्त्वा मुनिवरः प्रस्थानमकरोत्तदा ।

होता त्याचा यज्ञ सुरू असतांना अत्यंत उज्ज्वल आणि अतर्क्य सामर्थ्यानें युक्त असें तें घोर धनुष्य देवांनी यज्ञमंडपामध्ये त्याला दिलेलें आहे. देव, गंधर्व, दैत्य आणि राक्षस यांपैकी कोणीही त्या धनुष्याला प्रत्यंचा चढविण्यास समर्थ नाहीत; मग मानव तर सर्व प्रकारें समर्थ नाहीतच नाहीत. महाबलाढ्य राजपुत्रांनी व राजांनी त्या धनुष्याचें वीर्य जाणण्याकरितां त्याला प्रत्यंचा चढविण्याची खटपट केली; परंतु ते समर्थ झाले नाहीत. ( ४–१० )

हे पुरुषश्रेष्ठा ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या महात्म्या मैथलाधिपतीचें तें धनुष्य आणि अत्यंत अद्भुत यज्ञ तूं अवलोकन करशील. यज्ञामध्ये देव प्रसन्न झाले असतां त्या मैथिलाधिपतीने यज्ञाचें फल म्हणून तें उत्कृष्ट धनुष्य त्यांचेपाशी मागितलें व त्याप्रमाणे शंकरासहवर्तमान सर्व देवांनी तें सुनाभ ( म्हणजे उत्कृष्ट प्रकारच्या मुष्टिबंधनस्थानाने युक्त असलेलें ) धनुष्य त्याला अर्पण केलें. तेव्हा पासून हे रघुवंशजा रामा, त्या राजाच्या गृहामध्ये त्या यज्ञदेवतांच्या स्थानीं असलेल्या धनुष्याचें, नाना प्रकारचीं गंधें आणि अगुरुगंधांनी युक्त असलेले धूप, यांच्यायोगाने पूजन होत असतें. ( ११–१३ )

याप्रमाणे रामाला सांगितल्यावर मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांनी ककुत्स्थकुलोत्पन्न

सर्षिसंघः स काकुत्स्थ आमन्त्र्य वनदेवताः १४
स्वस्ति वोऽस्तु गमिष्यामि सिद्धः सिद्धाश्रमादहम् ।
उत्तरे जाह्नवीतीरे हिमवन्तं शिलोच्चयम् १५
इत्युक्त्वा मुनिशार्दूलः कौशिकः स तपोधनः ।
उत्तरां दिशमुद्दिश्य प्रस्थातुमुपचक्रमे १६
तं व्रजन्तं मुनिवरमन्वगादनुसारिणाम् ।
शकटीशतमात्रं तु प्रयाणे ब्रह्मवादिनाम् १७
मृगपक्षिगणाश्चैव सिद्धाश्रमनिवासिनः ।
अनुजग्मुर्महात्मानो विश्वामित्रं तपोधनम् ।
निवर्तयामास ततः सर्षिसंघः स पक्षिणः १८
ते गत्वा दूरमध्वानं लम्बमाने दिवाकरे ।
वासं चक्रुर्मुनिगणाः शोणाकूले समाहिताः १९
तेऽस्तंगते दिनकरे स्नात्वा हुतहुताशनाः ।

---

रामलक्ष्मण आणि ऋषिसमुदाय यांसहवर्तमान, वनदेवतांचा निरोप घेऊन प्रयाण केलें. " तुमचें कल्याण असो. माझा मनोरथ सिद्धीस गेला आहे आणि मी आता या सिद्धाश्रमांतून निघून जान्हवीच्या उत्तर तीरीं असलेल्या हिमालयपर्वतावर जात आहे, " असें वनदेवतांना सांगून ते कुशिकवंशज तपोधन विश्वामित्र मुनिश्रेष्ठ उत्तर दिशेला जाण्याच्या उद्देशानें चालूं लागले. याप्रमाणे ते मुनिश्रेष्ठ विश्वामित्र जाऊं लागले असतां, त्यांचे अनुयायी जे इतर ब्रह्मवेत्ते मुनि त्यांच्या यज्ञपात्रांनी वगैरे भरलेले शंभर गाडे त्यांच्या मागोमाग गेले. ( म्हणजे, अग्निहोत्राचे वगैरे शंभर गाडे सामान बरोबर घेऊन विश्वामित्रानुयायी ब्रह्मवेत्ते मुनि त्यांच्या मागोमाग गेले ). इतकेंच नव्हे, तर त्या सिद्धाश्रमांत राहणारे मृग व पक्षी यांचे समुदायही त्या महात्म्या सिद्धाश्रमनिवासी मुनींबरोबर तपोधन विश्वामित्रमुनींच्या मागोमाग गेले, परंतु ऋषिसमुदायासहवर्तमान जात असलेल्या विश्वामित्र मुनींनी त्या मृगपक्षिगणांना परत फिरविलें. ( १४–१८ )

असो. बराच रस्ता चालून गेल्यावर सूर्य कलला असतां त्या मुनिगणांनी स्वस्थपणें शोणानामक नदीच्या तीरीं वास्तव्य केलें. नंतर सूर्यास्त होऊं लागला

विश्वामित्रं पुरस्कृत्य निषेदुरमितौजसः २०
रामोऽपि सहसौमित्रिर्मुनींस्तानभिपूज्य च ।
अग्रतो निषसादाथ विश्वामित्रस्य धीमतः २१
अथ रामो महातेजा विश्वामित्रं तपोधनम् ।
पप्रच्छ मुनिशार्दूलं कौतूहलसमन्वितम् २२
भगवन्को न्वयं देशः समृद्धवनशोभितः ।
श्रोतुमिच्छामि भद्रं ते वक्तुमर्हसि तत्त्वतः २३
नोदितो रामवाक्येन कथयामास सुव्रतः ।
तस्य देशस्य निखिलमृषिमध्ये महातपाः २४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकत्रिंशः सर्गः ३१[१०३७]

द्वात्रिंशः सर्गः ।

ब्रह्मयोनिर्महानासीत्कुशो नाम महातपाः ।
अक्लिष्टव्रतधर्मज्ञः सज्जनप्रतिपूजकः १

---

असतां, त्या मुनींनी स्नान केलें आणि अग्निहोत्रहोम आटोपल्यावर विश्वामित्र-मुनींना अग्रणीत्व देऊन ते अपरिमित तेजस्वी मुनि तेथे बसले. तेव्हा लक्ष्मणा-सहवर्तमान रामही त्या मुनींना अभिनंदन करून विवेकी विश्वामित्रमुनींच्या-समोर बसला. ( १९-२१ )

याप्रमाणे सर्वजण बसल्यानंतर मुनिश्रेष्ठ तपोधन विश्वामित्रांना महातेजस्वी रामाने " हे भगवन्, समृद्ध वनाने शोभित असलेला हा प्रदेश कोणता ? तें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. ' हे मुनिश्रेष्ठ, आपलें देव बरें करो; या-विषयीचा यथार्थ वृत्तान्त आपण मला कथन करा, " असा प्रश्न केला व याप्रमाणे रामाने प्रार्थना केली असतां त्या सदाचरणसंपन्न महातपस्वी विश्वामित्रमुनींनी त्या ऋषीसमुदायामध्ये त्या देशासंबंधी सर्व कांही कथन केलें. ( २२-२४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी एकतिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३१ ॥

सज्जनांना मान देणारा, निर्मल तपश्चर्या करणारा आणि धर्मवेत्ता असा एक कुश म्हणून मोठा ब्रह्मपुत्र फार प्राचीनकाळीं होऊन गेला. त्या महात्म्याने क्षात्र-

**स महात्मा कुलीनायां युक्तायां सुमहाबलान् ।**
**वैदर्भ्यां जनयामास चतुरः सदृशान्सुतान्  २**
**कुशाम्बं कुशनाभं च असूर्तरजसं वसुम् ।**
**दीप्तियुक्तान्महोत्साहान्क्षत्रधर्मचिकीर्षया ×  ३**

धर्म वृद्धिंगत होण्याची इच्छा धरून कुलिन आणि आचरणाने शुद्ध अशा विदर्भ-राजाच्या कन्येचे ठिकाणीं फारच मोठे बलिष्ठ, देदीप्यमान आणि मोठे उत्साही असे कुशांब, कुशनाभ, असूर्तरजस आणि वसु या नांवाचे आपणांसारिखे चार

+ बालकाण्ड सर्ग ३२ श्लोक ३ – क्षात्रधर्माची वृद्धि करावयाची म्हणजे, क्षत्रिय जातीची सर्व प्रकारांनी ( संख्येने, शिक्षणाने इ० सर्व दिशांनी ) उन्नति करावयाची. अर्थात्, ज्या क्षात्रियकुलांमधून उपनयनादि वैदिक संस्कार लुप्त-झाले असतील, त्या कुलांमधून ते योग्य प्रायश्चित्तपूर्वक पुनः चालू करून, क्षत्रिय जातीची समृद्धि केली पाहिजे व ती जात जिवंत ठेविली पाहिजे. क्षात्रिय जाति जिवन्त राहिली, तरच राष्ट्र जिवन्त राहील. यास्तव कोणत्याही प्रसंगीं क्षात्रिय जातीचा ऱ्हास होऊं न देतां, तिला आपल्या धर्माचें योग्य शिक्षण देऊन, राष्ट्राच्या रक्षणकार्याला समर्थ करणें हें ब्राह्मणांचें आद्य कर्तव्य आहे. याच कारणास्तव, ऋषीने ही क्षत्रिय प्रजा उत्पन्न केली.

क्षत्रियप्रजा उत्पन्न केली म्हणजे काय केलें ? तर आपल्या मुलांस ब्रह्मकर्म करावयास न लावतां, क्षत्रियांचें म्हणजे प्रजेचें पालन करण्याचें काम करण्या-कडे त्यांची योजना केली. कारण—

**प्रजापतिर्हि वैश्याय सृष्ट्वा परिददे पशून् ।**
**ब्राह्मणाय च राज्ञे च सर्वाः परिददे प्रजाः ॥** मनुः ( ९।३२७ )

म्हणजे, प्रजापतीने पशु उत्पन्न करून, ते पालनार्थ वैश्याच्या स्वाधीन केले. आणि प्रजा उत्पन्न करून त्या सर्व ( रक्षणार्थ ) ब्राह्मणाच्या व क्षत्रियाच्या स्वाधीन केल्या. अर्थात्, आपलें कर्तव्य म्हणूनच ऋषीने राष्ट्राचें पालन करण्यास योग्य असे पुत्र उत्पन्न करून त्यांचे स्वाधीन हें काम केलें.

या अध्यायांतील श्लोक ९ पर्यंतच्या उल्लेखावरून असें दिसतें की, त्या कालीं त्या प्रदेशांत निबिड अरण्य असावें व त्यामधून संचार करणाऱ्या प्रवाशी लोकांना

**तानुवाच कुशः पुत्रान्धर्मिष्ठान्सत्यवादिनः ।**
**क्रियतां पालनं पुत्रा धर्मं प्राप्स्यथ पुष्कलम्** ४
**कुशस्य वचनं श्रुत्वा चत्वारो लोकसत्तमाः ।**
**निवेशं चक्रिरे सर्वे पुराणां नृवरास्तदा** ५

पुत्र उत्पन्न केले. पुढे त्या धर्मिष्ठ व सत्यवचनी पुत्रांना " हे पुत्रहो, प्रजापालन करा; म्हणजे तुम्हांला मोठें पुण्य लागेल, " असें तो कुश म्हणाला असतां, त्याचें भाषण श्रवण करून त्या पुरुषश्रेष्ठ व लोकोत्तर अशा सर्व चारही पुत्रांनी नगरें बसविलीं. ( १–५ )

टिप्पणी ( पुढें चालू )

लुटारू लोकांपासून व हिंस्र पशूंपासून, अत्यंत त्रास होत असावा. तो नाहीसा करून, मनुष्यांचा संचार निर्भयपणें व सुखानें व्हावा, या हेतूने ऋषीनें, आपल्या पुत्रांकडून योग्य अशा चार ठिकाणीं वसाहती करवून, प्रजांचें पालन करण्याविषयी त्यांस आज्ञा केली. ( त्या कारणाने हा प्रदेश इतका समृद्ध आहे, असें विश्वामित्राने रामास सांगितलें. )

प्रजांच्या पालनाची व रक्षणाची फार मोठी जबाबदारी प्रजापतीने ब्राह्मणावर सोपविली आहे. ती त्याने क्षत्रियाकडून रक्षण करवून व वैश्यांकडून कृषि–गोरक्षण–वाणिज्यादि करवून, पार पाडावयाची आहे. मनु महर्षि म्हणतात—

**क्षत्रियं चैव वैश्यं च ब्राह्मणो वृत्तिकर्शितौ ।**
**बिभृयादानृशंस्येन स्वानि कर्माणि कारयन् ॥** ( मनुः० ८।४११ )

म्हणजे, क्षत्रिय व वैश्य हे जर बेकारीमुळे उपाशी मरत असले, तर ब्राह्मणाने त्यांजकडून आपआपलीं कामें करवून घ्यावींत व आपले कडून त्यांचा योगक्षेम चालवावा. म्हणजे वैश्यास आपले कडून भांडवल देऊन त्याजकडून व्यापार करवावयाचा व क्षत्रियास आपले कडून पगार देऊन त्याजकडून रक्षणाचें काम करवून घ्यावयाचें. संपत्तिमान् व समर्थ असून, जो ब्राह्मण असें करणार नाही, तो धर्मशास्त्रानुसार दण्डनीय होईल. अर्थात् ही जबाबदारी संपत्तिमान् व समर्थ अशाच ब्राह्मणावर आहे. गरीब व असमर्थ अशा ब्राह्मणावर नाही, हें स्पष्ट आहे.

कुशाम्बस्तु महातेजाः कौशाम्बीमकरोत्पुरीम् ।
कुशनाभस्तु धर्मात्मा पुरं चक्रे महोदयम् ६
असूर्तरजसो नाम धर्मारण्यं महामतिः ।
चक्रे पुरवरं राजा वसुर्नाम गिरिव्रजम् ७
एषा वसुमती नाम वसोस्तस्य महात्मनः ।
एते शैलवराः पञ्च प्रकाशन्ते समन्ततः ८
सुमागधी नदी रम्या मागधान्विश्रुता ययौ ।
पञ्चानां शैलमुख्यानां मध्ये मालेव शोभते ९
सैषा हि मागधी राम वसोस्तस्य महात्मनः ।
पूर्वाभिचरिता राम सुक्षेत्रा सस्यमालिनी १०
कुशनाभस्तु राजर्षिः कन्याशतमनुत्तमम् ।
जनयामास धर्मात्मा घृताच्यां रघुनन्दन ११
तास्तु यौवनशालिन्यो रूपवत्यः स्वलंकृताः ।
उद्यानभूमिमागम्य प्रावृषीव शतह्रदाः १२

---

महातेजस्वी कुशांबाने कौशांबी नगरी वसविली; धर्मात्म्या कुशनाभाने महोदयनामक नगराची स्थापना केली; महामति असूर्तरजसाने धर्मारण्य वसविलें आणि वसुराजाने गिरिव्रजनामक श्रेष्ठ नगर स्थापिलें. तें जें गिरिव्रजनामक नगर तीच त्या महात्म्या वसुराजाची (सांप्रत) वसुमति म्हणून प्रसिद्ध असलेली नगरी होय. या नगरीच्या आसमंतात्भागीं हे पांच श्रेष्ठ पर्वत शोभत आहेत आणि सुमागधी म्हणून प्रसिद्ध असलेली जी रम्य नदी मगधदेशामध्ये वहात गेलेली आहे, ती या पांच श्रेष्ठ पर्वतांमध्ये मालेप्रमाणे शोभत आहे. हे रामा, ती ही त्या महात्म्या वसुराजाची मागधी ( म्हणून प्रसिद्ध असलेली शोणा ) नदी होय. ही नदी पूर्वेकडे वहात जाणारी आहे. हिच्या दोन्ही तीरांवरील प्रदेश चांगला सुपीक आहे व त्यामुळे हिच्या तीरांवर धान्याची समृद्धि आहे. ( ६-१० )

हे रघुनंदना, धर्मात्म्या कुशनाभ राजर्षीला सर्वोत्कृष्ट अशा शंभर कन्या घृताचीनामक अप्सरेच्या ठिकाणीं झाल्या. पर्जन्यकालीं मेघमंडलांतून बाहेर पडणाऱ्या प्रतिविद्युल्लताच कीं काय, अशा त्या रूपवती व उत्तम प्रकारचे अलंकार

गायन्त्यो नृत्यमानाश्च वादयन्त्यस्तु राघव ।
आमोदं परमं जग्मुर्वराभरणभूषिताः १३
अथ ताश्चारुसर्वाङ्ग्यो रूपेणाप्रतिमा भुवि ।
उद्यानभूमिमागम्य तारा इव घनान्तरे १४
ताः सर्वा गुणसंपन्ना रूपयौवनसंयुताः ।
दृष्ट्वा सर्वात्मको वायुरिदं वचनमब्रवीत् १५
अहं वः कामये सर्वा भार्या मम भविष्यथ ।
मानुषस्त्यज्यतां भावो दीर्घमायुरवाप्स्यथ १६
चलं हि यौवनं नित्यं मानुषेषु विशेषतः ।
अक्षयं यौवनं प्राप्ता अमर्यश्च भविष्यथ १७
तस्य तद्वचनं श्रुत्वा वायोरक्लिष्टकर्मणः ।
अपहास्य ततो वाक्यं कन्याशतमथाब्रवीत् १८
अन्तश्चरसि भूतानां सर्वेषां सुरसत्तम ।

---

धारण केलेल्या तरुण कन्या एकदा उपवनामध्ये गेल्या आणि उत्तम प्रकारच्या आभरणांनी भूषित होऊन गायन, नृत्य व वादन करितां करितां, हे रघुवंशजा रामा, त्या पराकाष्ठेच्या आनंदांत निमग्न झाल्या. सारांश, प्रत्येक अवयव सुंदर असल्यामुळे पृथ्वीमध्ये रूपाने अप्रतिम असलेल्या त्या कन्या उपवनामध्ये आल्या असतां, मेघामध्ये असलेल्या चांदण्यांप्रमाणे चमकूं लागल्या. तेव्हा सौंदर्य आणि यौवन यांनी युक्त असलेल्या त्या गुणसंपन्न सर्व कन्यांना अवलोकन करून सर्वात्मक वायु त्यांना म्हणाला. ( ११–१५ )

"तुम्हांवर माझें मन गेलें आहे. करितां, तुम्ही सर्वजणी माझ्या भार्या व्हा, म्हणजे मनुष्यत्वाचा त्याग होऊन तुम्हांला दीर्घ आयुष्य प्राप्त होईल. विशेषतः मनुष्यांमध्ये यौवन हें नेहमी अगदी चंचलच असतें. तस्मात्, तुम्ही अक्षय यौवन प्राप्त करून घेऊन अमर व्हा." याप्रमाणे त्या महापराक्रमी वायूचें भाषण श्रवण केल्यावर त्याच्या भाषणाचा उपहास करून, त्या शंभर कन्या त्याला म्हणाल्या, "हे सुरश्रेष्ठा, तूं प्राणिमात्रांमध्ये संचार करणारा आहेस आणि आम्ही सर्वही तुझा प्रभाव जाणणाऱ्या आहोंत. तस्मात्, तूं उगीच आमची अवहेलना

प्रभावज्ञाश्च ते सर्वाः किमर्थमवमन्यसे　१९
कुशनाभसुता देव समस्ताः सुरसत्तम ।
स्थानाच्च्यावयितुं देवं रक्षामस्तु तपो वयम्　२०
मा भूत्स कालो दुर्मेधः पितरं सत्यवादिनम् ।
अवमन्य स्वधर्मेण स्वयंवरमुपास्महे　× २१
पिता हि प्रभुरस्माकं दैवतं परमं च सः ।
यस्य नो दास्यति पिता स नो भर्ता भविष्यति　२२
तासां तु वचनं श्रुत्वा हरिः परमकोपनः ।
प्रविश्य सर्वगात्राणि बभञ्ज भगवान्प्रभुः　२३

कशाकरिता करीत आहेस ? हे देवा, आम्ही कुशनाभाच्या कन्या आहोंत आणि हे सुरश्रेष्ठा, ( आमचा उपमर्द करण्यास प्रवृत्त झालेल्या तुझ्यासारिख्या ) देवालाही देवत्वापासून च्युत करण्यास आम्ही समर्थ आहोंत; परंतु, आम्ही तपाचें रक्षण करीत आहोंत. ( शाप दिला असतां तपाचा क्षय होईल म्हणून आम्ही ती गोष्ट मनांत आणीत नाहीं. ( १६-२० )

हे दुर्बद्धे, सत्यवादी पित्याचा अवमान करून, ( प्रबल विषयवासनेच्या अधीन होऊन ) स्वेच्छेनें पति वरण्यास आम्ही प्रवृत्त व्हावें, असा प्रसंग आमच्यावर कधीही न येवो. अरे, पिता हा आमचा प्रभु असून, आमचें परम दैवतही तोच आहे. यास्तव, ज्या पुरुषाला आमचा पिता आम्हांला देईल, तो आमचा भर्ता होईल. " हें त्या कन्यांचें भाषण श्रवण करून भगवान् समर्थ वायु पराकाष्ठेचा क्रुद्ध झाला आणि त्या कन्यांच्या सर्व गात्रांमध्ये प्रविष्ट होऊन, त्यानें त्यांना

×( श्लोक २१-२२ ) प्रत्यक्ष देवत्व व अमरत्व ' अनायासें प्राप्त होत असतां त्याच्या लोभांत न पडतां, केवल कुलमर्यादा रक्षण करण्यास्तव, पिता ज्याला देईल, त्यालाच आनंदानें वरावयाचें, पित्याचे आज्ञेवाचून विवाह करावयाचा नाही, म्हणून वायुदेवासारख्याचीदेखील मागणी झिडकारून लावणाऱ्या या आर्यकन्यकांचें उदारण-आपल्या प्रेमविषयक गोष्टींत आपल्या मातापित्यांचा काय संबंध आहे ? असें मानणाऱ्या व स्वयंनिर्णयाच्या तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्या वर्तमान कालीन विश्वविद्यालयीन सुशिक्षित आर्यकन्यकांनी विचार करण्यासारखें आहे.

ताः कन्या वायुना भग्ना विविशुर्नृपतेर्गृहम् ।
प्रविश्य च सुसम्भ्रान्ताः सलज्जाः साश्रुलोचनाः २४
स च ता दयिता भग्नाः कन्याः परमशोभनाः ।
दृष्ट्वा दीनास्तदा राजा संभ्रान्त इदमब्रवीत् २५
किमिदं कथ्यतां पुत्र्यः को धर्ममवमन्यते ।
कुब्जाः केन कृताः सर्वाश्चेष्टन्त्यो नाभिभाषथ २६
एवं राजा विनिःश्वस्य समाधिं संदधे ततः २७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ३२[१०६४]

त्रयस्त्रिंशः सर्गः ।

तस्य तद्वचनं श्रुत्वा कुशनाभस्य धीमतः ।
शिरोभिश्चरणौ स्पृष्ट्वा कन्याशतमभाषत १
वायुः सर्वात्मको राजन्प्रधर्षयितुमिच्छति ।
अशुभं मार्गमास्थाय न धर्मं प्रत्यवेक्षते २

---

मोडून टाकिल्या. याप्रमाणे वायूच्या योगाने अंगभंग झालेल्या त्या कन्या राजाच्या घरांत प्रविष्ट झाल्या आणि प्रविष्ट झाल्यावर मनामध्ये अतिशयच गोंधळून गेलेल्या त्या कन्या लज्जित होऊन, डोळयामध्य अश्रु आणूं लागल्या असतां स्वतःला प्रिय आणि फारच सुंदर अशा त्या कन्या भग्न व म्हणूनच दीन झालेल्या अवलोकन केल्याबरोबर राजा गोंधळून जाऊन त्यांना म्हणाला. ( २१-२५ )

" मुलींनो, हें काय तें सांगा. धर्माचें अतिक्रमण कोण बरें करीत आहे ? ( तें मला कळूं द्या. ) तुम्हां सर्वांना कुबड्या कोणी करून टाकिल्या व तुम्ही विवळत असून, माझ्याशीं कां भाषण करीत नाही ? ( हें मला सांगा ). " याप्रमाणे त्यांना विचारून व दुःखाचा सुस्कारा टाकून, त्यांचें उत्तर ऐकण्याकरितां राजा एकाग्रचित्त करून बसला. ( २६-२७ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

त्या विचारी कुशनाभाचें तें भाषण श्रवण केल्यावर, त्याच्या चरणीं मस्तक ठेऊन त्या शंभर कन्या त्याला म्हणाल्या, " हे राजा, सर्वात्मकवायु, पापमार्गाचें

पितृमत्यः स्म भद्रं ते स्वच्छन्देन वयं स्थिताः ।
पितरं नो वृणीष्व त्वं यदि नो दास्यते तव ३
तेन पापानुबन्धेन वचनं न प्रतीच्छता ।
एवं ब्रुवन्त्यः सर्वाः स्म वायुनाभिहता भृशम् ४
तासां तु वचनं श्रुत्वा राजा परमधार्मिकः ।
प्रत्युवाच महातेजाः कन्याशतमनुत्तमम् ५
क्षान्तं क्षमावतां पुत्र्यः कर्तव्यं सुमहत्कृतम् ।
ऐकमत्यमुपागम्य कुलं चावेक्षितं मम ६
अलंकारो हि नारीणां क्षमा तु पुरुषस्य वा ।
दुष्करं तच्च वः क्षान्तं त्रिदशेषु विशेषतः ७
यादृशी वः क्षमा पुत्र्यः सर्वासामविशेषतः ।
क्षमा दानं क्षमा सत्यं क्षमा यज्ञाश्च पुत्रिकाः ८
क्षमा यशः क्षमा धर्मः क्षमायां विष्ठितं जगत् ।

अवलंबन करून, आम्हांवर बलात्कार करण्याची इच्छा करीत आहे; तो धर्माकडे लक्ष्य देत नाही. तुझें कल्याण असो. आम्ही पित्याच्या आधीन आहोंत; पतीचा स्वीकार करण्याविषयीं आम्ही स्वतंत्र नाही. करिता, तूं आमची पित्यापाशीं मागणी कर आणि तो जर आम्हांला तुला अर्पण करील, तर आम्ही तुझ्या होऊं, असें आम्ही सर्वही त्याला सांगत असतांना आमच्या सांगण्याची पर्वा न करणाऱ्या त्या पापबुद्धि वायूने आम्हांवर पराकाष्ठेचा घाला घातला." (१–४)

हें त्यांचें भाषण श्रवण करून, तो महातेजस्वी महाधार्मिक राजा आपल्या उत्कृष्ट शंभर कन्यांना म्हणाला, "मुलींनो, क्षमाशीलांना योग्य जी क्षमा, ती तुम्ही एकमत करून केलीत आणि माझ्या कुलाकडे दृष्टि दिलीत, हें तुम्ही फारच मोठें कृत्य केलेंत. स्त्रियांना आणि त्याचप्रमाणे पुरुषांनाही क्षमा हें भूषण आहे आणि विशेषतः देवांचे ठिकाणीं तुम्ही क्षमा दाखविलीत, हें तर तुम्ही फारच दुष्कर कर्म केलें आहे. हे मुलींनो, जशी तुमचे ठिकाणीं क्षमा आहे, तशीच सर्वांचे ठिकाणीं असो; कारण हे कन्यांनो, दान, सत्य, यज्ञ, यश व धर्म या सर्वांचा अंतर्भाव क्षमेंतच होत असून, क्षमाच या जगताला मुख्य आधार आहे!" हे ककुत्स्थ-

विसृज्य कन्याः काकुत्स्थ राजा त्रिदशविक्रमः ९
मन्त्रज्ञो मन्त्रयामास प्रदानं सह मन्त्रिभिः।
देशे काले च कर्तव्यं सदृशे प्रतिपादनम् १०
एतस्मिन्नेव काले तु चूली नाम महाद्युतिः।
ऊर्ध्वरेताः शुभाचारो ब्राह्मं तप उपागमत् ११
तपस्यन्तमृषिं तत्र गन्धर्वी पर्युपासते।
सोमदा नाम भद्रं ते ऊर्मिलातनया तदा १२
सा च तं प्रणता भूत्वा शुश्रूषणपरायणा।
उवास काले धर्मिष्ठा तस्यास्तुष्टोऽभवद् गुरुः १३
स च तां कालयोगेन प्रोवाच रघुनन्दन।
परितुष्टोऽस्मि भद्रं ते किं करोमि तव प्रियम् १४
परितुष्टं मुनिं ज्ञात्वा गन्धर्वी मधुरस्वरम्।
उवाच परमप्रीता वाक्यज्ञा वाक्यकोविदम् १५
लक्ष्म्या समुदितो ब्राह्म्या ब्रह्मभूतो महातपाः।

कुलोत्पन्ना रामा, याप्रमाणे त्या कन्यांची समजूत करून व त्यांना निरोप देऊन, तो देवतुल्यपराक्रमी व मसलती राजा योग्य ठिकाणीं, योग्य वेळीं आणि योग्य वराला आपल्या कन्या देण्याविषयी मंत्र्यांसहवर्तमान विचार करूं लागला. (५–१०)

याच वेळीं महातेजस्वी, ऊर्ध्वरेते आणि सदाचरणसंपन्न असे एक चूलिनामक महर्षि ब्रह्मप्राप्तीविषयक तपश्चर्या करीत होते आणि तुझें देव बरें करो, हे रामा, ऊर्मिलेची कन्या सोमदानामक गंधर्वी आपणांवर अनुग्रह होण्याविषयी त्या तपश्चर्या करणाऱ्या ऋषींची सेवा करीत होती. सारांश, नम्रतापूर्वक सेवेमध्ये तत्पर राहून ती धर्मनिष्ठ गंधर्वी ऋषिसंनिध राहिली असतां ते महर्षि गुरु त्या वेळीं तिच्यावर संतुष्ट झाले आणि हे रघुनंदना, तिचें कल्याण होण्याची वेळ आल्यामुळे ते तिला म्हणाले, "तुझें कल्याण असो. मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. तुझें कोणतें प्रिय करूं, तें मला सांग." याप्रमाणे ते मुनि संतुष्ट झाले आहेत, असें जाणून दुसऱ्याशीं संभाषण कसें करावें, हें जाणत असलेली ती गंधर्वी पराकाष्ठेची आनंदित होऊन संभाषणवेत्त्या ऋषींना मधुर वाणीने म्हणाली, "हे

ब्राह्मेण तपसा युक्तं पुत्रमिच्छामि धार्मिकम् १६
अपतिश्चास्मि भद्रं ते भार्या चास्मि न कस्यचित् ।
ब्राह्मेणोपगतायाश्च दातुमर्हसि मे सुतम् १७
तस्याः प्रसन्नो ब्रह्मर्षिर्ददौ ब्राह्ममनुत्तमम् ।
ब्रह्मदत्त इति ख्यातं मानसं चूलिनः सुतम् १८
स राजा ब्रह्मदत्तस्तु पुरीमध्यवसत्तदा ।
काम्पिल्यां परया लक्ष्म्या देवराजो यथा दिवम् १९
स बुद्धिं कृतवान् राजा कुशनाभः सुधार्मिकः ।
ब्रह्मदत्ताय काकुत्स्थ दातुं कन्याशतं तदा २०
तमाहूय महातेजा ब्रह्मदत्तं महीपतिः ।
ददौ कन्याशतं राजा सुप्रीतेनान्तरात्मना २१
यथाक्रमं तदा पाणिं जग्राह रघुनन्दन ।
ब्रह्मदत्तो महीपालस्तासां देवपतिर्यथा २२

---

महातपस्वी, आपण आपल्या ब्रह्मतेजाच्या योगानें युक्त होऊन, केवळ ब्रह्मरूप बनलेले आहांत. तस्मात्, ब्रह्मतपानें युक्त असा धार्मिक पुत्र होण्याची मला इच्छा आहे. हे मुने, तुमचें देव बरें करो. मी कुमारी आहें व तशीच पुढेही राहणार आहें, मी कोणाचीही भार्या होणार नाहीं. करितां, आपणांपाशी शरण आलेल्या मला ब्रह्मसंबंधी उपायानें आपण एक पुत्र प्राप्त करून द्यावा." (११-१७)

याप्रमाणे तिनें प्रार्थना केली असतां, त्या चूली ब्रह्मर्षींनी प्रसन्न होऊन अनुपम अशा ब्रह्मविषयक तपःसामर्थ्यानें ब्रह्मदत्त म्हणून प्रसिद्ध असलेला एक मानस पुत्र तिला दिला. तेव्हा तो ब्रह्मदत्त राजा देवराज इंद्र ज्याप्रमाणें स्वर्गामध्यें राहतो, त्याप्रमाणें पराकाष्ठेच्या शोभेनें युक्त अशा कांपिल्या नगरीमध्यें राहूं लागला. असो. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, इकडे त्या अत्यंत धार्मिक कुशनाभ राजानें आपल्या शंभर कन्या ब्रह्मदत्ताला देण्याचें मनामध्यें आणिलें आणि त्याप्रमाणें त्या ब्रह्मदत्ताला बोलावून आणून सुप्रसन्न अंतःकरणानें महातेजस्वी व पृथ्वीपति अशा कुशनाभ राजानें त्या शंभर कन्या त्याला अर्पण केल्या. तेव्हा, हे रघुनंदना रामा, त्या इंद्रतुल्य ब्रह्मदत्त भूपालानें अनुक्रमानें त्या कन्यांचें पाणि-

स्पृष्टमात्रे तदा पाणौ विकुब्जा विगतज्वराः ।
युक्तं परमया लक्ष्म्या बभौ कन्याशतं तदा २३
स दृष्ट्वा वायुना मुक्ताः कुशनाभो महीपतिः ।
बभूव परमप्रीतो हर्षं लेभे पुनः पुनः २४
कृतोद्वाहं तु राजानं ब्रह्मदत्तं महीपतिम् ।
सदारं प्रेषयामास सोपाध्यायगणं तदा २५
सोमदापि सुतं दृष्ट्वा पुत्रस्य सदृशीं क्रियाम् ।
यथान्यायं च गन्धर्वी स्नुषास्ताः प्रत्यनन्दत २६
स्पृष्ट्वा स्पृष्ट्वा च ताः कन्याः कुशनाभं प्रशस्य च २७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ३३ [१०९१]

चतुस्त्रिंशः सर्गः ।

कृतोद्वाहे गते तस्मिन्ब्रह्मदत्ते च राघव ।
अपुत्रः पुत्रलाभाय पौत्रीमिष्टिमकल्पयत् १

---

ग्रहण केलें. (१८-२२)

त्या कन्यांच्या हाताला राजाचा स्पर्श होतांक्षणींच कुबडेपणा नाहीसा होऊन, त्या शंभरही कन्या निश्चिंत झाल्या आणि पराकाष्ठेच्या सौंदर्याने युक्त होऊन झळकूं लागल्या. तेव्हा वायूने सोडिलेल्या त्या कन्या अवलोकन करून कुशनाभ भूपति पराकाष्ठेचा आनंदित झाला आणि वारंवार त्याला हर्ष होऊं लागला. तदनंतर विवाह झाल्यावर पृथ्वीपति ब्रह्मदत्त राजाला उपाध्यायगणांसहवर्तमान कुशनाभ राजाने आपल्या नगरीप्रत सपत्नीक पाठवून दिलें. तेव्हा आपला पुत्र व त्याला योग्य अशा स्त्रिया प्राप्त झाल्याचें अवलोकन करून, त्या सोमदा गंधर्वीने फिरून फिरून त्या कन्यांचे अंगावरून हात फिरवून व कुशनाभाची प्रशंसा करून, त्या स्नुषांचें यथायोग्य रीतीने अभिनंदन केलें. (२३-२७)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकाण्डापैकी तेहतिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३३ ॥

हे रघुवंशजा रामा, विवाह करून तो ब्रह्मदत्त गेल्यावर त्या निपुत्रिक कुशनाभराजाने पुत्रप्राप्तीकरिता पुत्रकामेष्टि याग करण्याचें मनांमध्ये आणिलें. पुढे तो

इष्ट्यां तु वर्तमानायां कुशनाभं महीपतिम् ।
उवाच परमोदारः कुशो ब्रह्मसुतस्तदा २
पुत्रस्ते सदृशः पुत्र भविष्यति सुधार्मिकः ।
गाधिं प्राप्स्यसि तेन त्वं कीर्तिं लोके च शाश्वतीम् ३
एवमुक्त्वा कुशो राम कुशनाभं महीपतिम् ।
जगामाकाशमाविश्य ब्रह्मलोकं सनातनम् ४
कस्यचित्त्वथ कालस्य कुशनाभस्य धीमतः ।
जज्ञे परमधर्मिष्ठो गाधिरित्येव नामतः ५
स पिता मम काकुत्स्थ गाधिः परमधार्मिकः ।
कुशवंशप्रसूतोऽस्मि कौशिको रघुनन्दन ६
पूर्वजा भगिनी चापि मम राघव सुव्रता ।
नाम्ना सत्यवती नाम ऋचीके प्रतिपादिता ७
सशरीरा गता स्वर्गं भर्तारमनुवर्तिनी ।
कौशिकी परमोदारा प्रवृत्ता च महानदी ८

याग सुरू झाल्यावर कुशनाभ भूपतीला अत्यंत उदार असा कुशनामक ब्रह्मपुत्र म्हणाला, " मुला, अत्यंत धार्मिक आणि तुला योग्य असा पुत्र प्राप्त होईल. गाधिनामक पुत्र तुला प्राप्त होईल आणि त्याच्या योगाने तुझी अक्षय कीर्ति राहील. " याप्रमाणे हे रामा, कुशनाभ भूपतीला सांगितल्यावर आकाशामध्ये प्रविष्ट होऊन तो कुश सनातन ब्रह्मलोकाला चालता झाला. पुढे या गोष्टीला कांही दिवस लोटल्यावर अत्यंत धर्मनिष्ठ असा गाधिनामक पुत्र विचारी कुशनाभाला झाला. ( १-५ )

हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तो परम धार्मिक गाधी माझा पिता होय. हे रघुनंदना, कुशाच्या वंशामध्ये उत्पन्न झालों असल्यामुळे मी कौशिक आहें. हे राघवा, उत्तम आचरणाने युक्त अशी एक माझी सत्यवतीनामक ज्येष्ठ भगिनी असून, ती ऋचीकाला दिलेली होती. सर्वस्वी भर्त्याच्या मताप्रमाणे वागणारी ती भगिनी देहासहवर्तमान स्वर्गाला गेली. तेव्हा फारच भव्य अशी ही कौशिकीनामक महानदी तिच्या रूपाने या पृथ्वीवर प्राप्त झाली. सारांश, दिव्य, पवित्र

दिव्या पुण्योदका रम्या हिमवन्तमुपाश्रिता ।
लोकस्य हितकार्यार्थं प्रवृत्ता भगिनी मम ९
ततोऽहं हिमवत्पार्श्वे वसामि नियतः सुखम् ।
भगिन्यां स्नेहसंयुक्तः कौशिक्यां रघुनन्दन १०
सा तु सत्यवती पुण्या सत्ये धर्मे प्रतिष्ठिता ।
पतिव्रता महाभागा कौशिकी सरितां वरा ११
अहं हि नियमाद्राम हित्वा तां समुपागतः ।
सिद्धाश्रममनुप्राप्तः सिद्धोऽस्मि तव तेजसा १२
एषा राम ममोत्पत्तिः स्वस्य वंशस्य कीर्तिता ।
देशस्य हि महाबाहो यन्मां त्वं परिपृच्छसि १३
गतोऽर्धरात्रः काकुत्स्थ कथाः कथयतो मम ।
निद्रामभ्येहि भद्रं ते मा भूद्विघ्नोऽध्वनीह नः × १४

---

उदकाने युक्त आणि रमणीय अशी माझी भगिनी हिमालयाचें अवलंबन करून लोकांचें हित करण्याकरिता प्रवृत्त झालेली आहे. ( ६–९ )

असो. हे रघुनंदना, भगिनीचे ठिकाणीं माझें फारच प्रेम असल्यामुळे हिमालयावर कौशिकी नदीचे संनिध मी नित्य सुखाने रहात असतों. नद्यांमध्ये श्रेष्ठ असलेली ही कौशिकी माझी सत्यवती नामक भगिनी असून ती पतिव्रता, महाभाग्यवती, पवित्र आणि सत्यधर्माचें अवलंबन करून राहणारी आहे. हे रामा, मी कांही सिद्धीच्या उद्देशाने तिला टाकून आलों आहें, म्हणजे या सिद्धाश्रमाप्रत प्राप्त झालों आहे आणि तुझ्या तेजाच्या योगाने ती माझी कार्यसिद्धीही झालेली आहे. हे रामा, ही मी आपली व माझ्या वंशाची उत्पत्ति तुला कथन केली आणि हे महापराक्रमी रामा, या देशाचा जो इतिहास तूं मला विचारला होतास, तोही मी तुला कथन केला. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, मी गोष्टी सांगतां सांगतां मध्यरात्र व्हावयास आली. करिता आता तूं झोप घे; तुझें कल्याण असो. आपल्या

---

× श्लोक १४ 'अर्ध–रात्रः' म्हणजे अर्ध्या रात्रीपेक्षा कांही कमी. "दीड प्रहर रात्र उलटून गेली," असा विश्वामित्रांच्या म्हणण्याचा आशय दिसत आहे. यास्तव "मध्यरात्र होऊन गेली," हा अर्थ बरोबर नाही !

निष्पन्दास्तरवः सर्वे निलीना मृगपक्षिणः ।
नैशेन तमसा व्याप्ता दिशश्च रघुनन्दन　　१५
शनैर्विसृज्यते संध्या नभो नेत्रैरिवावृतम् ।
नक्षत्रतारागहनं ज्योतिभिरवभासते　　१६
उत्तिष्ठते च शीतांशुः शशी लोकतमोनुदः ।
ह्लादयन्प्राणिनां लोके मनांसि प्रभया स्वया　　१७
नैशानि सर्वभूतानि प्रचरन्ति ततस्ततः ।
यक्षराक्षससङ्घाश्च रौद्राश्च पिशिताशनाः　　१८
एवमुक्त्वा महातेजा विरराम महामुनिः ।
साधु साध्विति ते सर्वे मुनयो ह्यभ्यपूजयन्　　१९
कुशिकानामयं वंशो महान्धर्मपरः सदा ।
ब्रह्मोपमा महात्मानः कुशवंश्या नरोत्तमाः　　२०
विशेषेण भवानेव विश्वामित्र महायशः ।

---

पुढील मार्गांत येथे ( जाग्रण झाल्यामुळे ) विघ्न न येवो. हे रघुनंदना, सर्व वृक्षांचीं पानेंही अगदीं हलेनाशीं झालीं आहेत; सर्व पशुपक्षी निद्रेमध्ये लीन होऊन गेले आहेत आणि सर्व दिशा रात्रीच्या अंधकाराने व्याप्त झाल्या आहेत (१०–१५)

( दीड प्रहर रात्र उलटून गेल्याकारणाने ) तर सायंसंध्येचा गौणकालही टळून गेला आहे. नक्षत्रें आणि तारका यांनी भरलेलें आकाश ज्योतींच्या योगाने नेत्रांनी आच्छादित झाल्यसारखें भासत आहे. जगतांतील अंधकार नाहीसा करणारा हा शीत किरणांनी युक्त असलेला चंद्र स्वतःच्या प्रभेने जगतांतील प्राण्यांच्या मनाला आल्हाद देत देत उदय पावत आहे आणि घोर व मांसभक्षक असे यक्ष-राक्षसांचे समुदाय आणि इतरही सर्व प्रकारचे निशाचर प्राणि इकडून तिकडे व तिकडून इकडे संचार करीत आहेत. याप्रमाणे बोलून ते महातेजस्वी महर्षि विश्वामित्र स्तब्ध राहिले असतां "फार उत्तम" असें म्हणून सर्वही मुनींनी त्यांची प्रशंसा केली. आणि ते म्हणाले, "हा कुशिकांचा वंश नेहमीच मोठा धर्मनिष्ठ आहे. कुशवंशामध्ये उत्पन्न झालेले सर्वही पुरुष पुरुषश्रेष्ठ, महात्मे व व ब्रह्मतुल्य आहेत आणि हे महायशस्वी विश्वामित्रमुने, विशेषतः आपण तर

कौशिकी सरितां श्रेष्टा कुलोद्योतकरी तव २१
मुदितैर्मुनिशार्दूलैः प्रशस्तः कुशिकात्मजः ।
निद्रामुपागमच्छ्रीमानस्तं गत इवांशुमान् २२
रामोऽपि सह सौमित्रिः किंचिदागतविस्मयः ।
प्रशस्य मुनिशार्दूलं निद्रां समुपसेवते २३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ३४ [१११४]

पञ्चत्रिंश सर्गः ।

उपास्य रात्रिशेषं तु शोणाकूले महर्षिभिः ।
निशायां सुप्रभातायां विश्वामित्रोऽभ्यभाषत १
सुप्रभाता निशा राम पूर्वा सन्ध्या प्रवर्तते ।
उत्तिष्ठोत्तिष्ठ भद्रं ते गमनायाभिरोचय २
तच्छ्रुत्वा वचनं तस्य कृतपूर्वाह्णिकक्रियः ।
गमनं रोचयामास वाक्यं चेदमुवाच ह ३
अयं शोणः शुभजलोऽगाधः पुलिनमण्डितः ।

---

तसेच असून, नद्यांमध्ये श्रेष्ठ असलेली ही कौशिकी आपल्या कुलाचा उद्धार करणारी आहे." (१६–२१)

यांप्रमाणे आनंदित झालेल्या ऋषिश्रेष्ठांनी प्रशंसा केली असतां अस्तंगत झालेल्या सूर्याप्रमाणे कुशिकनंदन विश्वामित्रमहर्षि झोपी गेले व किंचित् आश्चर्यचकित झालेल्या रामानेही लक्ष्मणासहवर्तमान मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांची प्रशंसा करून, निद्रेचा स्वीकार केला. (२२–२३)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी चौतीसावा सर्ग समाप्त झाला ॥३४॥

अवशिष्ट राहिलेली रात्र महर्षींसहवर्तमान शोणानदीचे तीरीं घालवून, ती रात्र उजाडल्यावर विश्वामित्र म्हणाले, " हे रामा, रात्र उजाडली. अरे, पूर्वेकडे तांबडें फुटलें. कल्याण असो. ऊठ ऊठ आणि आता पुढे जाण्याचें मनांत आण." याप्रमाणे त्यांचें भाषण श्रवण केल्यावर प्रातःकालचें आन्हिक आटोपून रामाने पुढे जाण्याचें मनांत आणून त्यांना विचारिलें, " पवित्र जलाने युक्त व

कतरेण पथा ब्रह्मन्संतरिष्यामहे वयम् ४
एवमुक्तस्तु रामेण विश्वामित्रोऽब्रवीदिदम्।
एष पन्था मयोद्दिष्टो येन यान्ति महर्षयः ५
ते गत्वा दूरमध्वानं गतेऽर्धदिवसे तदा।
जाह्नवीं सरितां श्रेष्ठां ददृशुर्मुनिसेविताम् ६
तां दृष्ट्वा पुण्यसलिलां हंससारससेविताम्।
बभूवुर्मुनयः सर्वे मुदिताः सहराघवाः ७
तस्यास्तीरे तदा सर्वे चक्रुर्वासपरिग्रहम्।
ततः स्नात्वा यथान्यायं संतर्प्य पितृदेवताः ८
हुत्वा चैवाग्निहोत्राणि प्राश्य चामृतवद्धविः।
विविशुर्जाह्नवीतीरे शुभा मुदितमानसाः ९
विश्वामित्रं महात्मानं परिवार्य समन्ततः।
विष्ठिताश्च यथान्यायं राघवौ च यथार्हतः।

---

वालुकेने भूषित असा हा अगाध शोणनद आहे. यास्तव, हे ब्रह्मन्, आता आपण कोणत्या मार्गाने यांतून तरून जावें ?" याप्रमाणे रामाने प्रश्न केला असतां "या मार्गाने जाण्याचें मीं मनामध्ये योजिलें आहे; कारण, महर्षि याच मार्गाने जात असतात." असें विश्वामित्रांनी त्याला सांगितलें. ( १-५ )

तेव्हा लांबपर्यंत रस्ता चालून जाऊन दोन प्रहर दिवस आला असतां मुनींनी सेवित आणि नद्यांमध्ये श्रेष्ठ अशी जान्हवी त्यांनी अवलोकन केली व हंस आणि सारसपक्षी यांनी आश्रित व पवित्र जलाने युक्त अशी ती जान्हवी अवलोकन केल्याबरोबर रघुवंशज रामलक्ष्मणांसहवर्तमान सर्व मुनि आनंदित झाले. पुढे तिचे तीरीं सडासंमार्जन वगैरे करून वास्तव्य करण्याची तजवीज केल्यानंतर स्नान करून, पितरांचें व देवांचें यथाविधि संतर्पण करून; अग्निहोत्र, होम देऊन व ( पंचयज्ञावशिष्ट आणि म्हणूनच ) अमृततुल्य असें अन्न भक्षण करून ते सर्वही पवित्र मुनि प्रसन्न अंतःकरणाने जान्हवीच्या तीरीं राहिले. नंतर महात्म्या विश्वामित्रमुनींच्या आसमंतात्भागीं गराडा घालून ते सर्व मुनि व रघुवंशज रामलक्ष्मण आपआपल्या योग्यतेप्रमाणे यथान्याय बसले असतां प्रसन्न अंतः-

संप्रहृष्टमना रामो विश्वामित्रमथाब्रवीत् १०
भगवञ्छ्रोतुमिच्छामि गङ्गां त्रिपथगां नदीम् ।
त्रैलोक्यं कथमाक्रम्य गता नदनदीपतिम् ११
चोदितो रामवाक्येन विश्वामित्रो महामुनिः ।
वृद्धिं जन्म च गङ्गाया वक्तुमेवोपचक्रमे १२
शैलेन्द्रो हिमवान्नाम धातूनामाकरो महान् ।
तस्य कन्याद्वयं राम रूपेणाप्रतिमं भुवि १३
या मेरुदुहिता राम तयोर्माता सुमध्यमा ।
नाम्ना मेना मनोज्ञा वै पत्नी हिमवतः प्रिया १४
तस्यां गङ्गेयमभवज्ज्येष्ठा हिमवतः सुता ।
उमा नाम द्वितीयाभूत्कन्या तस्यैव राघव १५
अथ ज्येष्ठां सुराः सर्वे देवकार्यचिकीर्षया ।
शैलेन्द्रं वरयामासुर्गङ्गां त्रिपथगां नदीम् १६
ददौ धर्मेण हिमवांस्तनयां लोकपावनीम् ।

करणाने युक्त झालेला राम विश्वामित्रांना विचारूं लागला. ( ६–१० )

"हे भगवन्, तीन मार्गांनी गमन करणारी ही गंगानदी त्रैलोक्य व्यापून सागराकडे कशी गेली, हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे." याप्रमाणे महामुनि विश्वामित्र रामाच्या भाषणाने प्रेरित झाले असतां गंगेची उत्पत्ति व वृद्धि कथन करण्याचाच त्यांनी उपक्रम केला. (ते म्हणाले ) हे रामा, धातूंची मोठी खाणच असलेला जो हिमालय नांवाचा पर्वतराज त्याला, पृथ्वीमध्ये रूपाने अप्रतिम अशा दोन कन्या आहेत. हे रामा, मेना म्हणून जी अत्यंत सुंदर व मनोहर अशी मेरुपर्वताची कन्या ती, हिमालयाची प्रिय पत्नी असून, त्यांची माता होय. त्या मेनेचे ठिकाणीं हिमालयाची ज्येष्ठ कन्या गंगा उत्पन्न झाली आणि, हे रघुवंशजा रामा, उमा म्हणून दुसरी एक कन्या त्या हिमालयाचीच होय. पुढे देवकार्य सिद्धीस नेण्याकरितां सर्व देवांनी मिळून तीन मार्गांनी जाणारी जी गंगानदी ज्येष्ठ कन्या, तिची पर्वतराज हिमालयापाशी मागणी केली असतां हिमालयपर्वताने त्रैलोक्याचें हित व्हावें, एतदर्थ स्वेच्छेस येईल त्या मार्गाने गमन

स्वच्छन्दपथगां गङ्गां त्रैलोक्यहितकाम्यया १७
प्रतिगृह्य त्रिलोकार्थं त्रिलोकहितकांक्षिणः ।
गङ्गामादाय तेऽगच्छन्कृतार्थेनान्तरात्मना १८
या चान्या शैलदुहिता कन्यासीद्रघुनन्दन ।
उग्रं सुव्रतमास्थाय तपस्तेपे तपोधना १९
उग्रेण तपसा युक्तां ददौ शैलवरः सुताम् ।
रुद्रायाप्रतिरूपाय उमां लोकनमस्कृताम् २०
एते ते शैलराजस्य सुते लोकनमस्कृते ।
गङ्गा च सरितां श्रेष्ठा उमा देवी च राघव २१
एतत्ते सर्वमाख्यातं यथा त्रिपथगामिनी ।
खं गता प्रथमं तात गतिं गतिमतां वर ।
सुरलोकं समारूढा विपापा जलवाहिनी २२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः ३५[११३६]

---

करणारी, आपली जगताला पावन करणारी गंगानामक कन्या धर्माने देवांना दिली. (११-१७)

तेव्हा त्रैलोक्याचें हित करण्याची इच्छा धरून असलेले ते देव त्रैलोक्याच्या हिताकरितां त्या गंगेचा स्वीकार करून मनामध्ये कृतकृत्य झाले आणि तिला घेऊन गेले. हे रघुनंदना रामा, दुसरी जी पर्वताची तपस्वी कन्या होती, ती कडकडींत नियमाचें अवलंबन करून तपश्चर्या करीत होती व जगद्वंद्य तपस्वी कन्या उमा अतुल अशा रुद्राला पर्वतराज हिमालयाने अर्पण केली. हे रघुवंशजा रामा, नद्यांमध्ये श्रेष्ठ असलेली गंगा आणि उमा देवी या पर्वतराज हिमालयाच्या जगद्वंद्य कन्या मीं तुला कथन केल्या. सारांश, हे गतिमानांमध्ये श्रेष्ठ रामा, हें मीं तुला सर्व कथन केलें. आतां, गंगा त्रिपथगामिनी कशी म्हणशील तर, बा रामा, विपापा व जलवाहिनी अशी ती गंगा प्रथम आकाशमार्गाला जाऊन, नंतर देवलोकीं आरूढ झाली. ( १८-२२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पस्तिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३५ ॥

षड्त्रिंशः सर्गः ।

उक्तवाक्ये मुनौ तस्मिन्नुभौ राघवलक्ष्मणौ ।
प्रतिनन्द्य कथां वीरावूचतुर्मुनिपुङ्गवम् १
धर्मयुक्तमिदं ब्रह्मन्कथितं परमं त्वया ।
दुहितुः शैलराजस्य ज्येष्ठाया वक्तुमर्हसि २
विस्तरं विस्तरज्ञोऽसि दिव्यं मानुषसंभवम् ।
त्रीन्पथो हेतुना केन प्लावयेल्लोकपावनी ३
कथं गङ्गा त्रिपथगा विश्रुता सरिदुत्तमा ।
त्रिषु लोकेषु धर्मज्ञ कर्मभिः कैः समन्विता ४
तथा ब्रुवति काकुत्स्थे विश्वामित्रस्तपोधनः ।
निखिलेन कथां सर्वामृषिमध्ये न्यवेदयत् ५
पुरा राम कृतोद्वाहः शितिकण्ठो महातपाः ।
दृष्ट्वा च भगवान्देवीं मैथुनायोपचक्रमे ६
तस्य संक्रीडमानस्य महादेवस्य धीमतः ।
शितिकण्ठस्य देवस्य दिव्यं वर्षशतं गतम् ७

---

याप्रमाणे विश्वामित्रमुनींनी प्रश्नाचें उत्तर दिलें असतां उभयतां वीर रामलक्ष्मण त्या कथेचें अभिनंदन करून, मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हणाले "ब्रह्मन्, अत्यंत धर्मयुक्त असें हें वृत्त आपण कथन केलेंत. आता पर्वतराजाच्या ज्येष्ठ कन्येचें, देवलोक व मनुष्यलोक एतत्संबंधी, चरित्र सविस्तर कथन करा; आपण सविस्तर वृत्त जाणणारे आहांत. हे धर्मज्ञ, ही लोकपावनी गंगा कोणत्या कारणामुळे तीन मार्ग व्याप्त करूं लागली ? तशीच ही श्रेष्ठ नदी त्रिपथगा म्हणून कशी विख्यात झाली आणि त्रैलोक्यामध्ये हिचीं कर्मे तरी काय काय आहेत ?" ( १-४ )

याप्रमाणे ककुत्स्थकुलोत्पन्न राम विचारूं लागला असतां तपोधन विश्वामित्र ती सर्व कथा ऋषींमध्ये संपूर्णपणें निवेदन करूं लागले की, "हे रामा, पूर्वी महातपस्वी भगवान् शंकर विवाह झाल्यानंतर उमादेवीला अवलोकन करून तिच्याशीं समागम करण्यास प्रवृत्त झाले आणि त्या देवाधिदेव, विचारी व शितिकंठ

न चापि तनयो राम तस्यामासीत्परंतप ।
सर्वे देवाः समुद्विग्नाः पितामहपुरोगमाः ८
यदिहोत्पद्यते भूतं कस्तत्प्रतिसहिष्यति ।
अभिगम्य सुराः सर्वे प्रणिपत्येदमब्रुवन् ९
देव देव महादेव लोकस्यास्य हिते रत ।
सुराणां प्रणिपातेन प्रसादं कर्तुमर्हसि १०
न लोका धारयिष्यन्ति तव तेजः सुरोत्तम ।
ब्राह्मेण तपसा युक्तो देव्या सह तपश्चर ११
त्रैलोक्यहितकामार्थं तेजस्तेजसि धारय ।
रक्ष सर्वानिमाँल्लोकान्नालोकं कर्तुमर्हसि १२
देवतानां वचः श्रुत्वा सर्वलोकमहेश्वरः ।
बाढमित्यब्रवीत्सर्वान्पुनश्चेदमुवाच ह १३
धारयिष्याम्यहं तेजस्तेजसैव सहोमया ।
त्रिदशाः पृथिवी चैव निर्वाणमधिगच्छतु १४

---

अशा महादेवाची रतिक्रीडा चालली असतां शंभर दिव्य वर्षे लोटलीं; तथापि, हे शत्रुतापना रामा, त्या उमादेवीचे ठिकाणीं पुत्रोत्पत्ति (प्रकट) झाली नाही. तेव्हा ब्रह्मदेवप्रभृति सर्व देव, "या संयोगापासून जो प्राणि उत्पन्न होईल, त्याला कोण सहन करील ?" म्हणून उद्विग्न झाले आणि ते सर्वजण शंकराकडे येऊन प्रणामपूर्वक म्हणाले. (५–९)

"हे देवाधिदेव महादेवा, आपण या जगताचें हित करण्याविषयी तत्पर आहांत. करिता, प्रणिपात करीत असलेल्या या देवांवर आपण कृपा करा. हे सुरश्रेष्ठ, आपलें तेज धारण करण्यास लोक समर्थ होणार नाहीत; कारण, आपण ब्राह्म तपाने युक्त आहांत आणि उमादेवीसहवर्तमान तप करणारे आहांत. करिता, त्रैलोक्याचें हित करण्याची इच्छा धरून आपण आपलें तेज तेजाच्याच योगाने धारण करा आणि या सर्व लोकांचें रक्षण करा. आपण हें जगत् जनशून्य करूं नका." याप्रमाणे देवतांचें भाषण श्रवण केल्यावर "ठीक आहे" असें म्हणून ते सर्वलोकाधिपति शंकर पुनरपि त्यांना म्हणाले. "मी तेजाच्याच योगाने उमे-

यदिदं क्षुभितं स्थानान्मम तेजो ह्यनुत्तमम्।
धारयिष्यति कस्तन्मे ब्रुवन्तु सुरसत्तमाः। १५
एवमुक्तास्ततो देवाः प्रत्यूचुर्वृषभध्वजम्।
यत्तेजः क्षुभितं ह्यद्य तद्धरा धारयिष्यति १६
एवमुक्तः सुरपतिः प्रमुमोच महाबलः।
तेजसा पृथिवी येन व्याप्ता सगिरिकानना १७
ततो देवाः पुनरिदमूचुश्चापि हुताशनम्।
आविश त्वं महातेजो रौद्रं वायुसमन्वितः १८
तदग्निना पुनर्व्याप्तं सञ्जातं श्वेतपर्वतम्।
दिव्यं शरवणं चैव पावकादित्यसंनिभम् १९
यत्र जातो महातेजाः कार्तिकेयोऽग्निसंभवः।
अथोमां च शिवं चैव देवाः सर्षिगणास्तथा २०
पूजयामासुरत्यर्थं सुप्रीतमनसस्तदा।

सहवर्तमान तेज धारण करीन. यास्तव, देव आणि पृथ्वी यांना सुख होवो; परंतु, हे सुरश्रेष्ठ, स्वस्थानापासून जें हें माझें अनुपम तेज क्षुभित झालें आहे, तें कोण धारण करील ? हें आपण मला सांगा. " (१०–१५)

याप्रमाणे शंकरांनी सांगितलें असतां, " जें तेज क्षुभित झालें आहे तें आज पृथ्वी धारण करील, " असें देवांनी त्या वृषभध्वजाला उत्तर दिलें. याप्रमाणे देवांनी सांगितलें असतां देवाधिपति महाबलाढ्य शंकराने आपलें तेज सोडिलें. तेव्हा त्या तेजाच्या योगानें पर्वत व वनें यांसहवर्तमान सर्व पृथ्वी व्याप्त झाली. तदनंतर " हे महातेजस्वि अग्ने, वायूसहवर्तमान तूं या रुद्रसंबंधी तेजामध्ये प्रविष्ट हो, " म्हणून देवांनी पुनरपि अग्नीला सांगितलें असतां अग्नीने व्याप्त झालेलें तें तेज श्वेतपर्वतरूप बनलें आणि श्वेतपर्वतरूप बनलेलें तें तेज ज्या प्रदेशामध्ये प्रविष्ट झालें त्या प्रदेशांत अग्नि आणि सूर्य यांसारखें तेजस्वी असें एक शरांचें दिव्य वन झालें व त्या ठिकाणीं अग्निसंभव महातेजस्वी कार्तिकेय उत्पन्न झाला. ऋषिगणांसहवर्तमान सर्व देवांचीं मनें अत्यंत सुप्रसन्न झालीं व त्यांनी उमा आणि शिव यांची अतिशयच प्रशंसा केली. तेव्हा, हे रामा, पार्वती देवांशीं रागारागानें

अथ शैलसुता राम त्रिदशानिदमब्रवीत् २१
समन्युरशपत्सर्वान्क्रोधसंरक्तलोचना ।
यस्मान्निवारिता चाहं संगता पुत्रकाम्यया २२
अपत्यं स्वेषु दारेषु नोत्पादयितुमर्हथ ।
अद्यप्रभति युष्माकमप्रजाः सन्तु पत्नयः २३
एवमुक्त्वा सुरान्सर्वाञ्शशाप पृथिवीमपि ।
अवने नैकरूपा त्वं बहुभार्या भविष्यसि २४
न च पुत्रकृतां प्रीतिं मत्क्रोधकलुषीकृता ।
प्राप्स्यसे त्वं सुदुर्मेधो मम पुत्रमनिच्छती २५
तान्सर्वान्पीडितान्दृष्ट्वा सुरान्सुरपतिस्तदा ।
गमनायोपचक्राम दिशं वरुणपालिताम् २६
स गत्वा तप आतिष्ठत्पार्श्वे तस्योत्तरे गिरेः ।
हिमवत्प्रभवे शृङ्गे सहदेव्या महेश्वरः २७

बोलली इतकेंच नव्हे परंतु क्रोधाच्या योगाने जिचें नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत, अशा त्या पार्वतीने सर्व देवांना असा शाप दिला की, "पुत्रप्राप्तीच्या इच्छेने मी पतीशीं संगत झालें असतां, ज्या अर्थी तुम्ही मला समागमापासून निवृत्त केलें, त्या अर्थीं तुम्हांला आपल्या स्त्रियांचे ठिकाणीं अपत्योत्पत्ति होणार नाही. आजपासून तुमच्या स्त्रिया संतानरहित होतील." (१६-२३)

याप्रमाणे सर्व देवांना शैलपुत्री उमादेवीनें परमक्रोधित होऊन शाप देऊन तिनें पृथ्वीलाही असा शाप दिला की, "हे पृथ्वि, तुझें एकच स्वरूप कायम राहणार नाही; तूं पुष्कळांची भार्या होशील. हे दुर्मति पृथ्वी, ज्या अर्थीं मला पुत्र नसावा, अशी तूं इच्छा केलीस, त्या अर्थीं माझ्या क्रोधाने कलुषित झालेल्या तुला पुत्रसुख प्राप्त होणार नाही." याप्रमाणे पार्वतीचा शाप झाल्यामुळे ते सर्व देव दुःखित झालेले अवलोकन करून देवाधिपति महेश्वर वरुणरक्षित पश्चिमदिशेकडे जाण्याकरिता निघाले आणि त्या हिमालयपर्वताच्या उत्तर प्रदेशावर जाऊन हिमवत्प्रभवनामक शिखराचे ठिकाणीं देवीपार्वतीसहवर्तमान ते महेश्वर तपश्चर्या करूं लागले. असो. हे रामा, पार्वतीसंबंधाने ही सविस्तर हकीकत

एष ते विस्तरो राम शैलपुत्र्या निवेदितः ।
गङ्गायाः प्रभवं चैव शृणु मे सहलक्ष्मण २८

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षड्त्रिंशः सर्गः ३६[११६४]

सप्तत्रिंशः सर्गः ।

तप्यमाने तदा देवे सेन्द्राः साग्निपुरोगमाः ।
सेनापतिमभीप्सन्तः पितामहमुपागमन् १
ततोऽब्रुवन्सुराः सर्वे भगवन्तं पितामहम् ।
प्रणिपत्य सुरा राम सेन्द्राः साग्निपुरोगमाः २
येन सेनापतिर्देव दत्तो भगवता पुरा ।
स तपः परमास्थाय तप्यते स्म सहोमया ३
यदत्रानन्तरं कार्यं लोकानां हितकाम्यया ।
संविधत्स्व विधानज्ञ त्वं हि नः परमा गतिः ४
देवतानां वचः श्रुत्वा सर्वलोकपितामहः ।
सान्त्वयन्मधुरैर्वाक्यैस्त्रिदशानिदमब्रवीत् ५
शैलपुत्र्या यदुक्तं तन्न प्रजाः स्वासु पत्निषु ।

---

मी तुला कथन केली. आता, हे लक्ष्मणासहवर्तमान रामा, तूं माझ्यापासून गंगेची उत्पत्ति श्रवण कर. ( २४–२८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३६ ॥

देवाधिदेव शंकर तपश्चर्या करूं लागले असतां अग्निप्रभृति देव इंद्रासहवर्तमान सेनापति प्राप्त होण्याच्या इच्छेनें ब्रह्मदेवाकडे गेले आणि नंतर ते सर्व अग्निप्रभृति देव इंद्रासहवर्तमान प्रणाम करून भगवान् ब्रह्मदेवाला म्हणाले, " हे देवा, ज्या भगवानानें पूर्वी आम्हांला ( बीजरूपानें ) सेनापति दिला, तो भगवान् उत्कृष्ट मौन धारण करून तपश्चर्या करीत आहे. तेव्हां अशा प्रसंगीं जें काय कर्तव्य असेल, तें हे विधानज्ञ, आपण लोकांचें हित करण्याची इच्छा धरून करा; आपणच आमचा उत्कृष्ट आधार आहांत. याप्रमाणे देवतांचें भाषण श्रवण केल्यावर सर्व लोकांचा पितामह ब्रह्मदेव सांत्वन करीत करीत मधुर वाक्यांनी देवांना म्हणाला. (१–५)



विश्वामित्र रामलक्ष्मणांना यज्ञरक्षणासाठी मागतात. (बाल. १९-९)

तस्या वचनमक्लिष्टं सत्यमेव न संशयः ६
इयमाकाशगङ्गा च यस्यां पुत्रं हुताशनः ।
जनयिष्यति देवानां सेनापतिमरिन्दमम् ७
ज्येष्ठा शैलेन्द्रदुहिता मानयिष्यति तं सुतम् ।
उमायास्तद्बहुमतं भविष्यति न संशयः ८
तच्छ्रुत्वा वचनं तस्य कृतार्था रघुनन्दन ।
प्रणिपत्य सुराः सर्वे पितामहमपूजयन् ९
ते गत्वा परमं राम कैलासं धातुमण्डितम् ।
अग्निं नियोजयामासुः पुत्रार्थं सर्वदेवताः १०
देवकार्यमिदं देव समाधत्स्व हुताशन ।
शैलपुत्र्यां महातेजो गङ्गायां तेज उत्सृज ११
देवतानां प्रतिज्ञाय गङ्गामभ्येत्य पावकः ।
गर्भं धारय वै देवि देवतानामिदं प्रियम् १२
इत्येतद्वचनं श्रुत्वा दिव्यं रूपमधारयत् ।

स्वपत्नींचे ठिकाणीं तुम्हांला संतान प्राप्त होणार नाही, असें जें पर्वतकन्येनें म्हटलें आहे, तें तिचें वचन अमोघ असल्यामुळे सत्य होणारच आहे यांत संशय नाही. असो. ही आकाशगंगा आहे व हिचे ठिकाणीं शत्रूंचें दमन करणारा असा देवसेनापति पुत्र अग्नि उत्पन्न करील; पर्वतराजाची ज्येष्ठ कन्या स्वतःच्या अपत्या-प्रमाणे त्या पुत्राला मान देईल आणि उमेलाही अगदी संमत होईल याविषयी संशय नाही.'' याप्रमाणे तें ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण करून देव कृतकृत्य झाले आणि, हे रघुनंदना रामा, प्रणिपातपूर्वक त्या सर्व देवांनी ब्रह्मदेवाचें स्तवन केलें. हे रामा, नंतर धातूंनी भूषित अशा सर्वोत्कृष्ट कैलासपर्वतावर जाऊन पुत्रोत्पत्ती-करिता त्या सर्व देवतांनी अग्नीची प्रार्थना केली. ( ६-१० )

'' हें देवकार्य आहे यास्तव, हे महातेजस्वी हुताशना, पर्वतकन्यका जी गंगा तिचे ठिकाणीं तूं शंकराचें तेज नेऊन स्थापन कर. नंतर सांगितलेलें कार्य कर-ण्याविषयी देवांना वचन देऊन अग्नि गंगेसमीप आला आणि म्हणाला, '' हे देवि, तूं गर्भ धारण कर. हें देवतांना प्रिय आहे.'' अशा प्रकारचें हें अग्नीचें भाषण

स तस्या महिमां दृष्ट्वा समन्तादवशीर्यत १३
समन्ततस्तदा देवीमभ्यषिञ्चत पावकः ।
सर्वस्रोतांसि पूर्णानि गङ्गाया रघुनन्दन १४
तमुवाच ततो गङ्गा सर्वदेवपुरोगमम् ।
अशक्ता धारणे देव तेजस्तव समुद्धतम् १५
दह्यमानाग्निना तेन संप्रव्यथितचेतना ।
अथाब्रवीदिदं गङ्गां सर्वदेवहुताशनः १६
इह हैमवते पार्श्वे गर्भोऽयं संनिवेश्यताम् ।
श्रुत्वा त्वग्निवचो गङ्गा तं गर्भमतिभास्वरम् १७
उत्ससर्ज महातेजाः स्रोतोभ्यो हि तदानघ ।
यदस्या निर्गतं तस्मात्तप्तजाम्बूनदप्रभम् १८
काञ्चनं धरणीं प्राप्तं हिरण्यमतुलप्रभम् ।

---

श्रवण करून गंगेने दिव्यरूप धारण केलें. तेव्हा तिचें तें सौंदर्य, वैभव अवलोकन केल्याबरोबर तो ( अग्नीचे ठायीं असलेला पारदरूप शिवतेजोराशि ) आसमंतातूभागीं उचंबळून पडला. तेव्हा अग्नीने चोहोंकडून गंगादेवीला ( त्या शिववीर्यरूप पारदाने ) अभिषेक केला, ( म्हणजे गंगेच्या आसमंतातूभागीं अग्नीने तो पारद सिञ्चन केला ) असतां, हे रघुनंदना रामा, गंगेचे सर्व ओघ त्याने भरून गेले. नंतर त्या सर्व देवाग्रणी अग्नीला गंगा म्हणाली " हे देवा, तूं स्थापन केलेलें हें अत्यंत उग्र तेज धारण करण्यास मी समर्थ नाहीं. ( ११–१५ )

त्या तेजोरूप अग्नीच्या योगाने माझ्या शरिराचा अगदी भडका होत असल्यामुळे मला फारच मूर्च्छा येऊं लागली आहे " यावर सर्व देवांच्या उद्देशाने हवन केलेल्या द्रव्याचें भक्षण करणारा अग्नि " या हिमालयाच्या पार्श्वभागीं हा गर्भ ठेव, " म्हणून गंगेला म्हणाला असतां त्याचें भाषण श्रवण करून तो अत्यंत उज्ज्वल गर्भ हे निष्पापा, त्या महातेजस्वी गंगेने आपल्या प्रवाहापासून हिमालयावर नेऊन ठेविला. गंगेपासून निघालेलें तें तेज तावलेल्या सुवर्णासारिखें होतें आणि म्हणून ज्या भूप्रदेशावर तें ठेविलें गेलें, तो भूप्रदेश अतुल कांतीने युक्त अशा सुवर्णाचा बनला व त्याला लागून असलेला भूप्रदेश रौप्यमय झाला व त्याच्या

ताम्रं कार्ष्णायसं चैव तैक्ष्ण्यादेवाभिजायत　१९
मलं तस्याभवत्तत्र त्रपु सीसकमेव च ।
तदेतद्धरणीं प्राप्य नानाधातुरवर्धत　२०
निक्षिप्तमात्रे गर्भे तु तेजोभिरभिरञ्जितम् ।
सर्वं पर्वतसंनद्धं सौवर्णमभवद्वनम्　२१
जातरूपमिति ख्यातं तदाप्रभृति राघव ।
सुवर्णं पुरुषव्याघ्र हुताशनसमप्रभम्　२२
तं कुमारं ततो जातं सेन्द्राः सहमरुद्गणाः ।
क्षीरसंभावनार्थाय कृत्तिकाः समयोजयन्　२३
ताः क्षीरं जातमात्रस्य कृत्वा समयमुत्तमम् ।
ददुः पुत्रोऽयमस्माकं सर्वासामिति निश्चिताः　२४
ततस्तु देवताः सर्वाः कार्तिकेय इति ब्रुवन् ।
पुत्रस्त्रैलोक्यविख्यातो भविष्यति न संशयः　२५
तेषां तद्वचनं श्रुत्वा स्कन्नं गर्भपरिस्रवे ।

पलीकडे असलेला कांही भूप्रदेश त्या तेजाच्या तीक्ष्णपणामुळे ताम्र व लोह बनून राहिला व त्या गर्भाचा मल कथिल व शिसें बनला आणि याप्रमाणे भूमीवर प्राप्त झालेलें तें तेज अनेक धातूंच्या रूपान वृद्धिंगत झालें. ( १९–२० )

गर्भ हिमालयावर ठेवितांक्षणीं त्याच्या तेजाच्या योगाने रंजित झालेलें तें पर्वत-संबंधी वन सर्व सुवर्णाचें झालें. हें पुरुषश्रेष्ठा राघवा, तेव्हापासून अग्नीसारखे तेजो-रूप असलेलें सुवर्ण जातरूप म्हणून प्रख्यात झालें. तदनंतर रुद्रतेजापासून उत्पन्न झालेल्या त्या कुमाराला दुग्धपान मिळावें एतदर्थ मरुद्गण व इंद्र यांसहवर्तमान सर्व देवांनी कृत्तिकांची योजना केली. तेव्हा हा आमचा सर्वांचा पुत्र होईल, असा उत्कृष्ट निश्चय करून घेऊन व त्याप्रमाणे आपल्या मनाचा निर्णय ठरवून, कृत्ति-कांनी तो कुमार उत्पन्न होतांक्षणी त्याला दुग्धपान दिलें. तदनंतर " हा तुमचा पुत्र कार्तिकेय म्हणून त्रैलोक्यामध्ये विख्यात होईल, यांत संशय नाही, " म्हणून सर्व देवता त्यांना म्हणाल्या. ( २१–२५ )

शिवपार्वतीपासून प्रथम स्कन्न म्हणजे च्युत झालेल्या आणि गंगेच्या गर्भा-

*

स्नापयन्परया लक्ष्म्या दीप्यमानं यथानलम् २६
स्कन्द इत्यब्रुवन्देवाः स्कन्नं गर्भपरिस्रवे ।
कार्तिकेयं महाबाहुं काकुत्स्थ ज्वलनोपमम् २७
प्रादुर्भूतं ततः क्षीरं कृत्तिकानामनुत्तमम् ।
षण्णां षडाननो भूत्वा जग्राह स्तनजं पयः २८
गृहीत्वा क्षीरमेकाह्ना सुकुमारवपुस्तदा ।
अजयत्स्वेन वीर्येण दैत्यसैन्यगणान्विभुः २९
सुरसेनागणपतिमभ्यषिञ्चन्महाद्युतिम् ।
ततस्तममराः सर्वे समेत्याग्निपुरोगमाः ३०
एष ते राम गङ्गाया विस्तरोऽभिहितो मया ।
कुमारसंभवश्चैव धन्यः पुण्यस्तथैव च ३१
भक्तश्च यः कार्तिकेये काकुत्स्थ भुवि मानवः ।
आयुष्मान्पुत्रपौत्रैश्च स्कन्दसालोक्यतां व्रजेत् ३२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ३७ [११९६]

---

पासून स्राव झाल्यावर पराकाष्ठेच्या कांतीने अग्नीप्रमाणे देदीप्यमान असलेल्या त्या गर्भाला कृत्तिकांनी त्या देवतांचें भाषण श्रवण केल्यावर स्नान घातलें आणि हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, शिवपार्वतीच्या शरिरापासून स्कन्न म्हणजे च्युत होऊन, नन्तर, गंगेच्या गर्भातून स्राव झाल्यानन्तर जन्मास आला असल्यामुळे ( म्हणजे सावयव झाला असल्यामुळे ) देवांनी स्कंद असें त्याचें नांव ठेविलें. ( २६–२७ )

असो. नंतर कृत्तिकांचे ठिकाणीं उत्कृष्ट दुग्धाचा प्रादुर्भाव झाला असतां सहा मुखांनी युक्त होऊन त्या कुमाराने त्या सहाही कृत्तिकांचें स्तनपान केलें व एक दिवस स्तनपान केल्यानेच सुकुमार शरिराने युक्त असलेल्याही त्या कार्तिकेयाने स्वतःच्या वीर्याच्या योगाने दैत्यसेनासमुदाय जिंकून टाकिले. तेव्हा अग्निप्रभृति सर्व देवांनी एकत्र होऊन, त्या महातेजस्वी कार्तिकेयाला देवसेनापति या नात्याने अभिषेक केला. असो. हे रामा, धनदायक व पुण्यकारक असा कुमारजन्म आणि गंगेसंबंधी सविस्तर वृत्त हें मी तुला कथन केलें. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, या

अष्टत्रिंशः सर्गः ।

तां कथां कौशिको रामे निवेद्य मधुराक्षराम् ।
पुनरेवापरं वाक्यं काकुत्स्थमिदमब्रवीत् १
अयोध्याधिपतिर्वीर पूर्वमासीन्नराधिपः ।
सगरो नाम धर्मात्मा प्रजाकामः स चाप्रजः २
वैदर्भदुहिता राम केशिनी नाम नामतः ।
ज्येष्ठा सगरपत्नी सा धर्मिष्ठा सत्यवादिनी ३
अरिष्टनेमेर्दुहिता सुपर्णभगिनी तु सा ।
द्वितीया सगरस्यासीत्पत्नी सुमतिसंज्ञिता ४
ताभ्यां सह महाराजः पत्नीभ्यां तप्तवाँस्तपः ।
हिमवन्तं समासाद्य भृगुप्रस्रवणे गिरौ ५
अथ वर्षशते पूर्णे तपसाराधितो मुनिः ।
सगराय वरं प्रादाद्भृगुः सत्यवतां वरः ६

---

भूतलावर जो मानव कार्तिकेयाविषयी भक्ति धारण करितो तो चिरायु होऊन पुत्र पौत्रांसहवर्तमान स्कंदलोकीं जातो.

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी सदातिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

याप्रमाणे ती कथा कुशिकवंशज विश्वामित्रांनी मधुर शब्दांनी रामाला कथन केल्यावर ते पुनरपि त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला म्हणाले, " हे वीरा, सगर म्हणून पूर्वी एक अयोध्याधिपति धर्मात्मा राजा होऊन गेला. तो संतानरहित असल्यामुळे संतानप्राप्तीविषयी उत्सुक होता, हे रामा, विदर्भराजाची केशिनी म्हणून एक कन्या होती, ती धर्मिष्ठ व सत्यवचनी असून, सगराची ज्येष्ठ पत्नी होय. अरिष्टनेमीची कन्या आणि सुपर्णाची भगिनी अशी सुमति म्हणून सगराची दुसरी पत्नी होती. त्या पत्नीसहवर्तमान हिमालयासन्निध भृगुप्रस्रवणपर्वतावर त्या महाराजाने तपश्चर्या केली. ( १-५ )

नंतर शंभर वर्षे पूर्ण झाल्यावर त्या तपश्चर्येच्या योगाने भृगुमुनि संतुष्ट झाले आणि सत्य भाषण करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ असलेल्या भृगु महर्षींनी सगराला असा

अपत्यलाभः सुमहान्भविष्यति तवानघ ।
कीर्तिं चाप्रतिमां लोके प्राप्स्यसे पुरुषर्षभ ७
एका जनयिता तात पुत्रं वंशकरं तव ।
षष्टिं पुत्रसहस्राणि अपरा जनयिष्यति ८
भाषमाणं नरव्याघ्रं राजपुत्र्यौ प्रसाद्य तम् ।
ऊचतुः परमप्रीते कृताञ्जलिपुटे तदा ९
एकः कस्याः सुतो ब्रह्मन्का बहूञ्जनयिष्यति ।
श्रोतुमिच्छावहे ब्रह्मन्सत्यमस्तु वचस्तव १०
तयोस्तद्वचनं श्रुत्वा भृगुः परमधार्मिकः ।
उवाच परमां वाणीं स्वच्छन्दोऽत्र विधीयताम् ११
एको वंशकरो वास्तु बहवो वा महाबलाः ।
कीर्तिमन्तो महोत्साहाः का वा कं वरमिच्छति १२
मुनेस्तु वचनं श्रुत्वा केशिनी रघुनन्दन ।
पुत्रं वंशकरं राम जग्राह नृपसंनिधौ १३

वर दिला की, " हे निष्पापा, तुला मोठा अपत्यलाभ होईल आणि हे पुरुषश्रेष्ठा लोकांमध्ये तुझी अप्रतिम कीर्ति होईल. बा सगरा, तुझ्या एका पत्नीला वंश चालविणारा पुत्र होईल आणि दुसऱ्या पत्नीचे ठिकाणी साठ हजार पुत्र उत्पन्न होतील " याप्रमाणे ते पुरुषश्रेष्ठ भृगुमहर्षि सांगू लागले असतां त्यांना प्रसन्न करून घेऊन स्वतः अत्यंत संतुष्ट झालेल्या राजकन्यांनी हात जोडून " हे ब्रह्मन्, एक पुत्र कोणाला होईल आणि पुष्कळ कोणाला होतील हें ऐकण्याची आमची इच्छा आहे; हे ब्रह्मन्, आपले भाषण सत्य होवो " असें विचारिलें असतां त्यांचें भाषण श्रवण करून अत्यंत धार्मिक भृगु उत्कृष्ट वाणीने त्यांना म्हणाले " याविषयी तुमची इच्छा काय आहे ती कळूं द्या वंश चालविणारा पुत्र पाहिजे असल्यास एकच होईल आणि कीर्तिमान् व मोठे उत्साही व महाबलाढ्य असे पुष्कळ पुत्रही होतील. तेव्हा कोणता वर कोणाला पाहिजे ते समजूं द्या. ( ६–१२ )

याप्रमाणे मुनीचें भाषण श्रवण केल्यावर हे रघुनंदना रामा, केशिनीने वंश चालविणारा असा एकच पुत्र राजाचे संनिध मागून घेतला आणि सुपर्णभगिनी

षष्टिं पुत्रसहस्राणि सुपर्णभगिनी तदा।
महोत्साहान्कीर्तिमतो जग्राह सुमतिः सुतान् १४
प्रदक्षिणमृषिं कृत्वा शिरसाभिप्रणम्य तम् ।
जगाम स्वपुरं राजा सभार्यो रघुनन्दन १५
अथ काले गते तस्य ज्येष्ठा पुत्रं व्यजायत ।
असमञ्ज इति ख्यातं केशिनी सगरात्मजम् १६
सुमतिस्तु नरव्याघ्र गर्भतुम्बं व्यजायत ।
षष्टिः पुत्रसहस्राणि तुम्बभेदाद्विनिःसृता १७
घृतपूर्णेषु कुम्भेषु धात्र्यस्तान्समवर्धयन् ।
कालेन महता सर्वे यौवनं प्रतिपेदिरे १८
अथ दीर्घेण कालेन रूपयौवनशालिनः ।
षष्टिः पुत्रसहस्राणि सगरस्याभवँस्तदा १९
स च ज्येष्ठो नरश्रेष्ठः सगरस्यात्मसंभवः ।
बालान्गृहीत्वा तु जले सरय्वा रघुनन्दन २०
प्रक्षिप्य प्राहसं नित्यं मज्जतस्तान्निरीक्ष्य वै २१

---

सुमतीने मोठे उत्साही व किर्तिमान् असे साठ हजार पुत्र मागून घेतले. नंतर, हे रघुनंदना, त्या मुनींना प्रदक्षिणा करून व मस्तकाने प्रणाम करून तो सगर-राजा भार्यासहवर्तमान आपल्या नगराला परत गेला. पुढे कांही काल लोटल्या-वर ज्येष्ठ पत्नी केशिनी तिला राजापासून असमंज नावाचा पुत्र झाला हे पुरुष श्रेष्ठा रामा, सुमतीला एक गर्भतुंब झाला व तो तुंब फुटून त्यांतून साठ हजार पुत्र बाहेर निघाले. ( १३–१७ )

घृताने भरलेल्या कुंभाचे ठिकाणीं दायींनी ते वाढविले व पुष्कळ काल लोट-ल्यानंतर ते सर्व यौवनावस्थेमध्ये आले. असो. याप्रमाणे उत्पत्तीनंतर पुष्कळ काळ लोटल्यावर रूप व यौवन यांनी ते सगराचे साठ हजार पुत्र युक्त झाले. हे रघुनंदना, सगराचा तो पुरुषश्रेष्ठ ज्येष्ठ पुत्र असमंज त्या बालकांना घेऊन जाऊन सरयूनदीच्या उदकांत नेहमीं टाकीत असे आणि ते गटांगळ्या खाऊं लागले असतां त्यांच्याकडे पाहून हंसत असे याप्रमाणे सज्जनांना पीडा देणारा तो दुरा-

एवं पापसमाचारः सज्जनप्रतिबाधकः ।
पौराणामहिते युक्तः पित्रा निर्वासितः पुरात् २२
तस्य पुत्रोंऽशुमान्नाम असमञ्जस्य वीर्यवान् ।
संमतः सर्वलोकस्य सर्वस्यापि प्रियंवदः २३
ततः कालेन महता मतिः समभिजायत ।
सगरस्य नरश्रेष्ठ यजेयमिति निश्चिता २४
स कृत्वा निश्चयं राजा सोपाध्यायगणस्तदा ।
यज्ञकर्मणि वेदज्ञो यष्टुं समुपचक्रमे २५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ३८ [१२२१]

एकोनचत्वारिंशः सर्गः ।

विश्वामित्रवचः श्रुत्वा कथान्ते रघुनन्दनः ।
उवाच परमप्रीतो मुनिं दीप्तमिवानलम् १
श्रोतुमिच्छामि भद्रं ते विस्तरेण कथामिमाम् ।
पूर्वजो मे कथं ब्रह्मन्यज्ञं वै समुपाहरत् २

---

चारी पुत्र नगरवासी जनाचें अहित करण्याविषयी तत्पर राहूं लागला असतां पित्याने त्याला नगरातून घालवून दिले. त्या असमंजाचा अंशुमान् म्हणून एक वीर्यवान् पुत्र होता; तो सर्व लोकांना संमत असून सर्वांशी प्रिय भाषण करणारा असे. असो. तदनंतर बराच काल लोटल्यावर, हे पुरुषश्रेष्ठा रामा, " आपण अश्वमेधनामक याग करावा " असा दृढ विचार सगराच्या मनामध्ये आला आणि यज्ञानुष्ठानाविषयी उपाध्यायगणांसहवर्तमान निश्चय करून तो वेदवेत्ता राजा यज्ञाच्या उपक्रमाला लागला "

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणनामक आदिकाव्यातील बालकांडापैकी अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३८ ॥

याप्रमाणे विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण केल्यावर कथा चालतां चालतां अत्यंत संतुष्ट झालेला रघुनंदन राम अग्नीप्रमाणे देदीप्यमान असलेल्या विश्वामित्रमुनींना म्हणाला, " आपलें देव बरें करो. हे ब्रह्मन्, माझ्या पूर्वजानें कसा यज्ञ केला ही कथा सविस्तर श्रवण करण्याची माझी इच्छा आहे " याप्रमाणे रामाचें

तस्य तद्वचनं श्रुत्वा कौतूहलसमन्वितः ।
विश्वामित्रस्तु काकुत्स्थमुवाच प्रहसन्निव ३
श्रूयतां विस्तरो राम सगरस्य महात्मनः ।
शंकरश्वशुरो नाम्ना हिमवानिति विश्रुतः ४
विन्ध्यपर्वतमासाद्य निरीक्षेते परस्परम् ।
तयोर्मध्ये समभवद्यज्ञः स पुरुषोत्तम ५
स हि देशो नरव्याघ्र प्रशस्तो यज्ञकर्मणि ।
तस्याश्वचर्यां काकुत्स्थ दृढधन्वा महारथः ६
अंशुमानकरोत्तात सगरस्य मते स्थितः ।
तस्य पर्वणि तं यज्ञं यजमानस्य वासवः ७
राक्षसीं तनुमास्थाय यज्ञियाश्वमपाहरत् ।
ह्रियमाणे तु काकुत्स्थ तस्मिन्नश्वे महात्मनः ८
उपाध्यायगणाः सर्वे यजमानमथाब्रुवन् ।
अयं पर्वणि वेगेन यज्ञियाश्वोऽपनीयते ९

म्हणणें ऐकून सांगण्याविषयी उत्सुक झालेले विश्वामित्र मुनि हसत हसत ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला म्हणाले "हे रामा, महात्म्या सगराच्या यज्ञाविषयी सविस्तर वर्तमान तूं श्रवण कर. हिमवान् या नांवाने प्रसिद्ध असलेला शंकराचा श्वशुर आणि विंध्यपर्वत हे उंचीमध्ये जवळजवळ एकमेकांची बरोबरी करणारे असून, ( दोहोंमध्ये मोठासा पर्वत नसल्यामुळे ) एकमेकांकडे जसे कांही पहात असतात. त्या पर्वतांमध्ये, हे पुरुषोत्तमा रामा, तो यज्ञ झाला. ( १–५ )

कारण, हे पुरुषश्रेष्ठा, तो प्रदेश यज्ञकर्माला प्रशस्त आहे. असो. बा काकुत्स्था रामा, महाधनुर्धारी व महारथी असा जो सगराच्या मताने वागणारा ( त्याचा पौत्र ) अंशुमान् हा त्या यज्ञसंबंधी अश्वाचें रक्षण करीत होता. याप्रमाणे सगराचा तो यज्ञ चालला असतां पर्व-दिवशीं इंद्राने राक्षसरूप धारण करून, त्या यज्ञसंबंधी अश्वाचा अपहार केला. तेव्हा हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या अश्वाचा अपहार झाला असतां ते महात्मे सर्व उपाध्यायगण यजमानाला म्हणाले, " पर्वसमयींच या यज्ञसंबंधी अश्वाचा अकस्मात् अपहार होत आहे. यास्तव, हे

हर्तारं जहि काकुत्स्थ हयश्चैवोपनीयताम् ।
यज्ञच्छिद्रं भवत्येतत्सर्वेषामशिवाय नः १०
तत्तथा क्रियतां राजन्यज्ञोऽच्छिद्रः कृतो भवेत् ।
सोपाध्यायवचः श्रुत्वा तस्मिन्सदसि पार्थिवः ११
षष्टिं पुत्रसहस्राणि वाक्यमेतदुवाच ह ।
गतिं पुत्रा न पश्यामि रक्षसां पुरुषर्षभाः १२
मन्त्रपूतैर्महाभागैरास्थितोऽपि महाक्रतुः ।
तद्गच्छथ विचिन्वध्वं पुत्रका भद्रमस्तु वः १३
समुद्रमालिनीं सर्वां पृथिवीमनुगच्छत ।
एकैकं योजनं पुत्रा विस्तारमभिगच्छत १४
यावत्तुरगसंदर्शस्तावत्खनत मेदिनीम् ।
तमेव हयहर्तारं मार्गमाणा ममाज्ञया १५
दीक्षितः पौत्रसहितः सोपाध्यायगणस्त्वहम् ।
इह स्थास्यामि भद्रं वो यावत्तुरगदर्शनम् १६

ककुत्स्थकुलोत्पन्ना सगरा, या अपहार करणाऱ्यांचा वध करून, तूं आपला अश्व परत आण; कारण यज्ञामध्ये आम्हां सर्वांच्या अकल्याणाला कारणीभूत होणारें असें हें विघ्न होत आहे. ( ६–१० )

यास्तव, हे राजा, यज्ञ निर्विघ्नपणें पार पडेल अशी तजवीज कर. ” याप्रमाणे उपाध्यायांचें भाषण श्रवण केल्यावर त्या यज्ञमंडपामध्ये तो राजा आपल्या साठ हजार पुत्रांना म्हणाला, “ हे पुरुषश्रेष्ठ पुत्रहो, राक्षसांच्या मायेनें जर हें विघ्न प्राप्त होईल, तर मंत्रपूत अशा मोठमोठ्या ऋत्विजांनी हा महाक्रतु युक्त असतांनाही आपली धडगत होईल, असें मला वाटत नाही. तस्मात्, हे पुत्रहो, तुम्ही जा आणि अश्व शोधून आणा; तुमचें कल्याण असो. एकेक जण एक एक योजन-पर्यंत लांब जा आणि अशा रीतीनें ही सर्व समुद्रवलयांकित पृथ्वी हुडकून काढा. इतकेंच नव्हे, परंतु ( भूमीवर जर अश्व उपलब्ध न होईल, तर ) माझ्या आज्ञेनें तुम्ही अश्व दृष्टीं पडेपर्यंत पृथ्वी खणून काढा. यज्ञदीक्षा घेतलेला असा मी पौत्र आणि उपाध्यायगण यासहवर्तमान, अश्व दृष्टीं पडेपर्यंत येथेच थांबून राहीन.

ते सर्वे हृष्टमनसो राजपुत्रा महाबलाः ।
जग्मुर्महीतलं राम पितुर्वचनयन्त्रिताः १७
योजनायामविस्तारमेकैको धरणीतलम् ।
बिभिदुः पुरुषव्याघ्रा वज्रस्पर्शसमैर्भुजैः १८
शूलैरशनिकल्पैश्च हलैश्चापि सुदारुणैः ।
भिद्यमाना वसुमती ननाद रघुनन्दन १९
नागानां वध्यमानानामसुराणां च राघव ।
राक्षसानां दुराधर्ष सत्त्वानां निनदोऽभवत् २०
योजनानां सहस्राणि षष्टिं तु रघुनन्दन ।
बिभिदुर्धरणीं राम रसातलमनुत्तमम् २१
एवं पर्वतसंबाधं जम्बूद्वीपं नृपात्मजाः
खनन्तो नृपशार्दूल सर्वतः परिचक्रमुः २२
ततो देवाः सगन्धर्वाः सासुराः सहपन्नगाः ।
संभ्रान्तमनसः सर्वे पितामहमुपागमन् २३

---

तुमचें कल्याण असो." ( ११-१६ )

यात्रमाणे पित्याची आज्ञा झाल्यावर त्या महाबलाढ्य राजपुत्रांच्या मनाला उल्हास प्राप्त झाला आणि हे रामा, पित्याच्या आज्ञेने बद्ध झालेले ते राजपुत्र भूतलावर गेले. एक एक योजन लांबपर्यंत एक एक जण भूतलाचे ठिकाणीं हिंडल्यावर ते पुरुषश्रेष्ठ स्पर्शाविषयी वज्रासमान असलेल्या आपल्या बाहूंच्या योगाने आणि अत्यंत भयंकर नांगर व वज्रप्राय शूल यांच्या योगाने पृथ्वी खणूं लागले असतां, हे रघुनंदना रामा, खणली जात असतां ती पृथ्वी गर्जना करूं लागली. हे रघुवंशजा रामा, राक्षस, नाग, असुर इत्यादि प्राण्यांचा वध होऊं लागला असतां ते भयंकर गर्जना करूं लागले. ( १७-२० )

हे रघुनंदना रामा, साठ हजार योजनेंपर्यंत त्यांनी अनुपम रसातल खणून काढिलें आणि याप्रमाणे खणतां खणतां, हे श्रेष्ठ राजकुमारा, पर्वतांनी गजबजलेल्या जंबुद्वीपाभोवती सर्व बाजूंनी ते राजपुत्र हिंडूं लागले. तेव्हा गंधर्व, असुर व पन्नग यांसहवर्तमान सर्व देव मनामध्ये अगदी घाबरून जाऊन ब्रह्मदेवाकडे

ते प्रसाद्य महात्मानं विषण्णवदनास्तदा ।
ऊचुः परमसंत्रस्ताः पितामहमिदं वचः २४
भगवन्पृथिवी सर्वा खन्यते सगरात्मजैः ।
बहवश्च महात्मानो वध्यन्ते जलचारिणः २५
अयं यज्ञहरोऽस्माकमनेनाश्वो पनीयते ।
इति ते सर्वभूतानि हिंसन्ति सगरात्मजाः २६

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकोनचत्वारिंशः सर्गः ३९ [१२४७]

चत्वारिंशः सर्गः ।

देवतानां वचः श्रुत्वा भगवान्वै पितामहः ।
प्रत्युवाच सुसंत्रस्तान्कृतान्तबलमोहितान् १
यस्येयं वसुधा कृत्स्ना वासुदेवस्य धीमतः ।
महिषी माधवस्यैषा स एव भगवान्प्रभुः २
कापिलं रूपमास्थाय धारयत्यनिशं धराम् ।
तस्य कोपाग्निना दग्धा भविष्यन्ति नृपात्मजाः ३

गेले आणि त्या महात्म्या ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतल्यावर पराकाष्ठेचे त्रस्त व खिन्नवदन झालेले ते देव त्याला म्हणाले, " हे भगवन्, सगराचे पुत्र सर्व पृथ्वी खणून काढीत आहेत आणि पुष्कळ महात्म्यांचा व जलचर प्राण्यांचा ते वध करीत आहेत. हाच आमचा यज्ञविघातक आहे व यानेच आमचा अश्व नेला आहे, असें समजून ते सगरपुत्र सर्व प्राण्यांची हिंसा करींत आहेत. ( २१-२६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३९ ॥

याप्रमाणे देवतांचें भाषण श्रवण केल्यावर सर्व लोकांचा नाश ज्यांनी आरंभला आहे, त्या सगरसुतांच्या सैन्यांनी अत्यंत त्रास दिल्यामुळे किंकर्तव्यतामूढ झालेल्या त्या देवांना भगवान् ब्रह्मदेव म्हणाले, "ज्या विवेकी व समर्थ अशा वासुदेव ( जगदात्मा ) माधवाची ही संपूर्ण वसुन्धरा ( पृथ्वी ) मुख्य भार्या आहे, तो भगवान् कपिलरूपाचें अवलंबन करून सर्वदा पृथ्वी धारण करीत आहे. तेव्हा त्याच्या क्रोधाग्नीने ते राजपुत्र दग्ध होऊन जातील; कारण पृथ्वीचा भेद हा प्रतिकल्पा-

पृथिव्याश्चापि निर्भेदो दृष्ट एव सनातनः ।
सगरस्य च पुत्राणां विनाशो दीर्घदर्शिनाम् ४
पितामहवचः श्रुत्वा त्रयस्त्रिंशदरिंदमाः ।
देवाः परमसंहृष्टाः पुनर्जग्मुर्यथागतम् ५
सगरस्य च पुत्राणां प्रादुरासीन्महास्वनः ।
पृथिव्यां भिद्यमानायां निर्घातसमनिःस्वनः ६
ततो भित्त्वा महीं सर्वां कृत्वा चापि प्रदक्षिणम् ।
सहिताः सागराः सर्वे पितरं वाक्यमब्रुवन् ७
परिक्रान्ता मही सर्वा सत्त्ववन्तश्च सूदिताः ।
देवदानवरक्षांसि पिशाचोरगपन्नगाः ८
न च पश्यामहेऽश्वं ते अश्वहर्तारमेव च ।
किं करिष्याम भद्रं ते बुद्धिरत्र विचार्यताम् ९

मध्ये ठरलेलाच आहे; आणि त्या अविचारी सगरपुत्रांचाही नाश ( त्यांचेच कर्माने ) निश्चित आहे, यास्तव त्यांचेविषयीही चिन्ता करण्याची आवश्यकता नाही. " याप्रमाणे ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण केल्यावर शत्रुदमन करणारे तेहतीस ( कोटि )ही देव पराकाष्ठेचे आनंदित झाले आणि आल्या वाटेने परत गेले.(१–५)

असो. सगराच्या पुत्रांकडून पृथ्वी खणली जाऊं लागली असतां निर्घात× ध्वनीसारखा मोठा ध्वनि होऊं लागला. तदनंतर सर्व पृथ्वी खणून आणि तिला प्रदक्षिणाही करून परत आल्यावर ते सर्व सगरपुत्र एकत्र जुळून आपल्या पित्याला म्हणाले, " आम्ही सर्व पृथ्वी धुंडिली आणि बलाढ्य असे देव, दानव, राक्षस, पिशाच, उरग व पन्नग यांचाही नाश केला; परंतु आपला अश्व अथवा त्या अश्वाला नेणारा आमच्या कोठे आढळांत आला नाही. आपलें देव बरें करो. आता आम्ही काय करावें ? याविषयी आपण आता कांहीतरी उपाय मनांत आणा. " ( ६–९ )

× " वायुना निहतो वायुर्गगनाच्च पतत्यधः । प्रचंडघोरनिर्घोषो निर्घात इति कथ्यते ॥ " वाऱ्यावर वारा आपटून आकाशांतून खाली आला असतां, जो प्रचंड व भयंकर नाद होतो, त्याला **'निर्घात'** असें म्हणतात.

तेषां तद्वचनं श्रुत्वा पुत्राणां राजसत्तमः ।
समन्युरब्रवीद्वाक्यं सगरो रघुनन्दन १०
भूयः खनत भद्रं वो विभेद्य वसुधातलम् ।
अश्वहर्तारमासाद्य कृतार्थाश्च निवर्तत ११
पितुर्वचनमासाद्य सगरस्य महात्मनः ।
षष्टिः पुनः सहस्राणि रसातलमभिद्रवन् १२
खन्यमाने ततस्तस्मिन्ददृशुः पर्वतोपमम् ।
दिशागजं विरूपाक्षं धारयन्तं महीतलम् १३
सपर्वतवनां कृत्स्नां पृथिवीं रघुनन्दन ।
धारयामास शिरसा विरूपाक्षो महागजः १४
यदा पर्वणि काकुत्स्थ विश्रामार्थं महागजः ।
खेदाच्चालयते शीर्षं भूमिकम्पस्तदा भवेत् १५
ते तं प्रदक्षिणं कृत्वा दिशापालं महागजम् ।
मानयन्तो हि ते राम जग्मुर्भित्त्वा रसातलम् १६
ततः पूर्वां दिशं भित्त्वा दक्षिणां बिभिदुः पुनः ।

याप्रमाणे पुत्रांचें भाषण श्रवण केल्यावर, हे रघुनंदना रामा, तो नृपश्रेष्ठ सगर क्रोधयुक्त होऊन म्हणाला. " तुमचें कल्याण असो. तुम्ही पुनरपि खणा आणि भूतलाचा भेद करून व अश्वाचा अपहार करणाऱ्याला गाठून कार्य झाल्यावर परत या. " ही महात्म्या सगरनामक पित्याची आज्ञा मान्य करून, ते साठ हजार पुत्र रसातलावर धावले आणि तें रसातल खणूं लागल्यावर उग्र नेत्रांनी युक्त असा एक पर्वतप्राय दिग्गज महीतल धारण करीत असलेला त्यांनी अवलोकन केला. सारांश, हे रघुनंदना, उग्र नेत्रांनी युक्त असलेल्या त्या महागजानें पर्वत व वनें यांसहवर्तमान संपूर्ण पृथ्वी मस्तकीं धारण केली होती. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, आळस जाऊन श्रमपरिहार होण्याकरिता ज्यां वेळीं तो महागज मस्तक हालवीत असतो, त्या वेळीं भूकंप होत असतो. ( १०–१५ )

हे रामा, त्या दिक्पाल महागजाचा मान राखण्याकरिता त्यांनी त्याला प्रदक्षिणा केली आणि नंतर ते रसातलाचा भेद करून आंत गेले. याप्रमाणे पूर्व दिशेस

दक्षिणस्यामपि दिशि ददृशुस्ते महागजम् १७
महापद्मं महात्मानं सुमहत्पर्वतोपमम् ।
शिरसा धारयन्तं गां विस्मयं जग्मुरुत्तमम् १८
ते तं प्रदक्षिणं कृत्वा सगरस्य महात्मनः ।
षष्टिः पुत्रसहस्राणि पश्चिमां बिभिदुर्दिशम् १९
पश्चिमायामपि दिशि महान्तमचलोपमम् ।
दिशागजं सौमनसं ददृशुस्ते महाबलाः २०
ते तं प्रदक्षिणं कृत्वा पृष्ट्वा चापि निरामयम् ।
खनन्तः समुपाक्रान्ता दिशं सोमवतीं तदा २१
उत्तरस्यां रघुश्रेष्ठ ददृशुर्हिमपाण्डुरम् ।
भद्रं भद्रेण वपुषा धारयन्तं महीमिमाम् २२
समालभ्य ततः सर्वे कृत्वा चैनं प्रदक्षिणम् ।
षष्टिः पुत्रसहस्राणि बिभिदुर्वसुधातलम् २३
ततः प्रागुत्तरां गत्वा सागराः प्रथितां दिशम् ।
रोषादभ्यखनन्सर्वे पृथिवीं सगरात्मजाः २४

पृथ्वी खणून दक्षिण दिशा खणिली असतां दक्षिण दिशेसही त्यांनी एक महागज अवलोकन केला. त्या महात्म्या महापद्मनामक गजाचें शरीर प्रचंड पर्वतासारखें असून तो मस्तकानें पृथ्वी धारण करीत होता. तेव्हा त्याला अवलोकन केल्यावर त्या सगरपुत्रांना फारच विस्मय झाला. असो. महात्म्या सगराचे साठ हजार पुत्र त्याला प्रदक्षिणा करून पश्चिम दिशेस खणावयास लागले. नंतर पश्चिम दिशेसही पर्वतप्राय असा एक सौमननामक दिक्पाल महागज त्या महाबलाढ्य सगरपुत्रांनी अवलोकन केला. त्यांनी प्रदक्षिणापूर्वक त्याला "बरें आहे ना?" म्हणून विचारिलें आणि उत्तर दिशा खणण्याकरितां ते चालले. ( १६-२१ )

नंतर, हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, उत्तर दिशेसही स्वतः बर्फासारिखा शुभ्रवर्ण असलेला भद्रनामक गज कल्याणकारक शरिरानें युक्त असूनही पृथ्वी धारण करीत असलेला त्यांनी पाहिला. तेव्हा सर्वांनी त्याला स्पर्श करून प्रदक्षिणा घातली आणि नंतर ते साठ हजार सगरपुत्र पृथ्वीचें खनन करूं लागले. तदनंतर

ते तु सर्वे महात्मानो भीमवेगा महाबलाः ।
ददृशुः कपिलं तत्र वासुदेवं सनातनम् २५
हयं च तस्य देवस्य चरन्तमविदूरतः ।
प्रहर्षमतुलं प्राप्ताः सर्वे ते रघुनन्दन २६
ते तं यज्ञहनं ज्ञात्वा क्रोधपर्याकुलेक्षणाः ।
खनित्रलाङ्गलधरा नानावृक्षशिलाधराः ।
अभ्यधावन्त संक्रुद्धास्तिष्ठ तिष्ठेति चाब्रुवन् २७
अस्माकं त्वं हि तुरगं यज्ञियं हृतवानसि ।
दुर्मेधस्त्वं हि संप्राप्तान्विद्धि नः सगरात्मजान् २८
श्रुत्वा तद्वचनं तेषां कपिलो रघुनन्दन ।
रोषेण महताविष्टो हुंकारमकरोत्तदा २९
ततस्तेनाप्रमेयेण कपिलेन महात्मना ।
भस्मराशीकृताः सर्वे काकुत्स्थ सगरात्मजाः ३०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चत्वारिंशः सर्गः । ४० [१२७७]

ते सगरपुत्र प्रसिद्ध ईशान्य दिशेस गेले आणि सर्वही रागारागाने पृथ्वी खणूं लागले. तेव्हा भयंकर वेग व प्रचंड बल धारण करणाऱ्या त्या महात्म्या सगरपुत्रांनी '**कपिल**' रूप धारण करून बसलेल्या सनातन वासुदेवाला अवलोकन केलें. ( २२–२५ )

नंतर त्या देवाच्या समीपच चरत असलेला अश्वही त्यांनी पाहिला; व हे रघुनंदना, अश्व दृष्टीं पडतांक्षणीं त्यांना पराकाष्ठेचा आनंद झाला. तदनंतर तो कपिलच यज्ञविघात करणारा आहे, असें समजून कुदळी, नांगर आणि अनेक प्रकारचे वृक्ष व पाषाण धारण करणारे ते सगरपुत्र क्रुद्ध झाले आणि " थांब थांब " असें म्हणून त्याच्या अंगावर धावले व " आमचा यज्ञिय अश्व तूंच हरण केला आहेस, परंतु हे दुर्बुद्धे, आम्ही हे सगरपुत्र येथे आलों आहों, हें तूं समजून ठेव, " असें त्याला पुनरपि म्हणाले, हे रघुनंदना, त्यांचें भाषण श्रवण करून, तो कपिल फारच क्रुद्ध झाला व त्याने रागारागाने नुसतें हुँः केलें व त्या-बरोबर, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या महात्म्या अतर्क्य कपिलाने ते सर्वही

एकचत्वारिंशः सर्गः ।

पुत्रांश्चिरगताञ्ज्ञात्वा सगरो रघुनन्दन ।
नप्तारमब्रवीद्राजा दीप्यमानं स्वतेजसा  १
शूरश्च कृतविद्यश्च पूर्वैस्तुल्योऽसि तेजसा ।
पितॄणां गतिमन्विच्छ येन चाश्वोऽपवाहितः  २
अन्तर्भौमानि सत्त्वानि वीर्यवन्ति महान्ति च ।
तेषां तु प्रतिघातार्थं सासिं गृह्णीष्व कार्मुकम्  ३
अभिवाद्याभिवाद्याँस्त्वं हत्वा विघ्नकरानपि ।
सिद्धार्थः संनिवर्तस्व मम यज्ञस्य पारगः  ४
एवमुक्तोंऽशुमान्सम्यक्सगरेण महात्मना ।
धनुरादाय खड्गं च जगाम लघुविक्रमः  ५
स खातं पितृभिर्मार्गमन्तर्भौमं महात्मभिः ।
प्रापद्यत नरश्रेष्ठ तेन राज्ञाभिचोदितः  ६

---

सगरपुत्र भस्मराशि बनवून सोडिले. ( २६–३० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-काण्डापैकी चाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३३ ॥

हे रघुनंदना, पुत्रांना जाऊन फार दिवस झाले, असें समजून आल्यावर सगर राजा स्वतःच्या तेजाने देदीप्यमान असलेल्या आपल्या नातवाला म्हणाला, " तूं शूर व विद्वान् असून तेजाने आपल्या पूर्वजांची बरोबरी करणारा आहेस. करिता, पितरांचा आणि अश्व नेणाराचा तूं शोध लाव. पृथ्वीमध्ये असणारे प्राणी मोठे व वीर्यवान् असतात. तस्मात्, त्यांचा घात करण्याकरिता तूं खड्गासहवर्तमान धनुष्य घे. वंद्य असतील त्यांना अभिनंदन कर, विघ्न करणाऱ्यांचा वध कर, आणि माझा यज्ञ शेवटास नेण्याला समर्थ असलेला असा तूं कार्य सिद्ध करून परत ये. " ( १–४ )

याप्रमाणे, महात्म्या सगराने, उत्तम प्रकाराने अंशुमानाला सांगितलें असतां धनुष्य व खड्ग घेऊन तो सत्वर चालता झाला व हे पुरुषश्रेष्ठा रामा, त्या सगर राजाची आज्ञा झालेला तो अंशुमान् महात्म्या पितरांनी भूमीमध्ये खणून

देवदानवरक्षोभिः पिशाचपतगोरगैः ।
पूज्यमानं महातेजा दिशागजमपश्यत ७
स तं प्रदक्षिणं कृत्वा पृष्ट्वा चैव निरामयम् ।
पितॄन्स परिपप्रच्छ वाजिहर्तारमेव च ८
दिशागजस्तु तच्छ्रुत्वा प्रत्युवाच महामतिः ।
असमञ्ज कृतार्थस्त्वं सहाश्वः शीघ्रमेष्यसि ९
तस्य तद्वचनं श्रुत्वा सर्वानेव दिशागजान् ।
यथाक्रमं यथान्यायं प्रष्टुं समुपचक्रमे १०
तैश्च सर्वैर्दिशापालैर्वाक्यज्ञैर्वाक्यकोविदैः ।
पूजितः सहयश्चैवागन्तासीत्यभिचोदितः ११
तेषां तद्वचनं श्रुत्वा जगाम लघुविक्रमः ।
भस्मराशीकृता यत्र पितरस्तस्य सागराः १२
स दुःखवशमापन्नस्त्वसमञ्जसुतस्तदा ।
चुक्रोश परमार्तस्तु वधात्तेषां सुदुःखितः १३

ठेविलेल्या मार्गाशीं आला असतां त्या महातेजस्वी अंशुमानानें देव, दानव, राक्षस, पिशाच, पक्षी व उरग ज्यांचें पूजन करीत आहेत, असा दिग्गज अवलोकन केला. तेव्हा त्याला प्रदक्षिणा करून कुशल प्रश्न केल्यावर, पितर व अश्व नेणारा यांविषयीं त्यानें त्या दिग्गजाला विचारलें असतां तो महाविचारी दिग्गज त्याला म्हणाला, " हे असमंजसपुत्रा, तूं कार्यसिद्धि होऊन अश्वासहवर्तमान सत्वर परत येशील. " ( ५–९ )

याप्रमाणे त्याचें भाषण श्रवण केल्यावर सर्वही दिग्गजांना त्यानें क्रमाक्रमानें यथान्याय हाच प्रश्न केला असतां, भाषणतत्त्वज्ञ व योग्य भाषण करण्यास समर्थ अशा सर्वही गजांनी त्याचा आदर–सन्मान केला आणि " अश्वासहवर्तमान तूं सत्वर परत येशील " म्हणून त्याला सांगितलें. तेव्हा त्यांचें तें भाषण श्रवण केल्यावर ज्या ठिकाणीं त्याचें पितर कपिलांनी भस्मराशि करून टाकिले होते, त्या ठिकाणीं तो शीघ्रगति अंशुमान् आला आणि त्या पितरांचा वध झाल्याचें समजून आल्यामुळे पराकाष्ठेचा व्याकूल व अत्यंत दुःखित झालेला तो असमंजस-

यज्ञियं च हयं तत्र चरन्तमविदूरतः ।
ददर्श पुरुषव्याघ्रो दुःखशोकसमन्वितः १४
स तेषां राजपुत्राणां कर्तुकामो जलक्रियाम् ।
स जलार्थी महातेजा न चापश्यज्जलाशयम् १५
विसार्य निपुणां दृष्टिं ततोऽपश्यत्खगाधिपम् ।
पितॄणां मातुलं राम सुपर्णमनिलोपमम् १६
स चैनमब्रवीद्वाक्यं वैनतेयो महाबलः ।
मा शुचः पुरुषव्याघ्र वधोऽयं लोकसंमतः १७
कपिलेनाप्रमेयेण दग्धा हीमे महाबलाः ।
सलिलं नार्हसे प्राज्ञ दातुमेषां हि लौकिकम् १८
गङ्गा हिमवतो ज्येष्ठा दुहिता पुरुषर्षभ ।
तस्यां कुरु महाबाहो पितॄणां सलिलक्रियाम् १९
भस्मराशीकृतानेतान्प्लावयेल्लोकपावनी २०

पुत्र अगदी दुःखाधीन होऊन शोक करूं लागला. तों इतक्यांत समीपच तो यज्ञिय अश्व संचार करीत आहे, असें दुःख व शोक ह्यांनी व्याप्त झालेल्या त्या पुरुषश्रेष्ठ अंशुमानाच्या दृष्टीं पडलें. (१०–१४)

नंतर, त्या राजपुत्रांची उदकक्रिया करण्याचा त्याने विचार केला. परंतु, तो महातेजस्वी अंशुमान् उदकाची इच्छा करीत असतांना त्याला कोठे जलाशय दिसेना. तेव्हा दूरचा पदार्थ अवलोकन करण्यास समर्थ अशी आपली दृष्टि त्याने चोहोंकडे फेंकिली असतां, हे रामा, वेगाने वायुतुल्य असलेला पित्यांचा मातुल गरुड त्याने पाहिला. नंतर तो महाबलाढ्य गरुड त्याला म्हणाला "हे पुरुषश्रेष्ठा, तूं शोक करू नकोस; हा तुझ्या पितरांचा वध लोकांच्या हिताला कारणीभूत होणारा आहे. अचिंत्यशक्तिमान् कपिलाने या महाबलाढ्य सगरपुत्रांना दग्ध केलें आहे. यास्तव, हे प्राज्ञ, तूं यांना नुसतें सामान्य उदक देऊं नकोस. हे पुरुषश्रेष्ठा, हिमालयाची ज्येष्ठ कन्या जी गंगा तिचे ठिकाणीं, हे महापराक्रमी अंशुमाना, तूं पितरांची उदकक्रिया कर. (१५–१९)

ती लोकपावनी गंगा, भस्मराशि करून टाकिलेल्या या सगरपुत्रांना पावन

*

तया क्लिन्नमिदं भस्म गङ्गया लोककान्तया ।
षष्टिं पुत्रसहस्राणि स्वर्गलोकं गमिष्यति २१
निर्गच्छाश्वं महाभाग संगृह्य पुरुषर्षभ ।
यज्ञं पैतामहं वीर निर्वर्तयितुमर्हसि २२
सुपर्णवचनं श्रुत्वा सोंऽशुमानतिवीर्यवान् ।
त्वरितं हयमादाय पुनरायान्महातपाः २३
ततो राजानमासाद्य दीक्षितं रघुनन्दन ।
न्यवेदयद्यथावृत्तं सुपर्णवचनं तथा २४
तच्छ्रुत्वा घोरसंकाशं वाक्यमंशुमतो नृपाः ।
यज्ञं निर्वर्तयामास यथाकल्पं यथाविधि २५
स्वपुरं त्वगमच्छ्रीमानिष्टयज्ञो महीपतिः ।
गङ्गायाश्चागमे राजा निश्चयं नाध्यगच्छत २६
अगत्वा निश्चयं राजा कालेन महता महान् ।
त्रिंशद्वर्षसहस्राणि राज्यं कृत्वा दिवं गतः २७

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकचत्वारिंशः सर्गः । ४१ [१२०४]

---

करील. सारांश, त्या गंगेने हें भस्म भिजलें म्हणजे साठ हजार सगरपुत्रांना तें स्वर्गलोकी पोहोचवील. यास्तव, हे महाभाग्यवान् पुरुषश्रेष्ठा, हा अश्व घेऊन तूं परत जा, आणि आपल्या आजाचा अश्वमेध–याग तूं शेवटास ने. ” हें गरुडाचें भाषण श्रवण केल्यावर तो महावीर्यवान् व महातपस्वी अंशुमान् अश्व घेऊन सत्वर परत गेला. नंतर, हे रघुनंदना, यज्ञदीक्षा घेतलेल्या राजाजवळ जाऊन त्याने तें झालेलें वर्तमान व गरुडाचें म्हणणें त्याला निवेदन केलें. ती भयंकर वार्ता अंशुमानापासून श्रवण केल्यावर, सगरराजाने सूत्राला अनुसरून तो याग यथाविधि शेवटास नेला. ( २०–२५ )

असो. यज्ञ आटोपल्यावर तो वैभवशाली भूपति आपल्या नगराला आला; परंतु, ( पुत्रांच्या उद्धाराला कारणीभूत होणारी ) गंगा येण्याला खात्रीचा उपाय कोणता, याविषयी त्याचा निश्चय झाला नाही. तेव्हा खात्रीलायक उपाय कोणता याचा निर्णय न होतां बराच काळ लोटल्यावर, म्हणजे तीस हजार वर्षें राज्य

द्विचत्वारिंशः सर्गः ।

कालधर्मं गते राम सगरे प्रकृतीजनाः ।
राजानं रोचयामासुरंशुमन्तं सुधार्मिकम् १
स राजा सुमहानासीदंशुमान्रघुनन्दन ।
तस्य पुत्रो महानासीद्दिलीप इति विश्रुतः २
तस्मै राज्यं समादिश्य दिलीपे रघुनन्दन ।
हिमवच्छिखरे रम्ये तपस्तेपे सुदारुणम् ३
+ द्वात्रिंशच्च सहस्राणि वर्षाणि सुमहायशाः ।
तपोवनगतो राजा स्वर्गं लेभे तपोधनः ४
दिलीपस्तु महातेजाः श्रुत्वा पैतामहं वधम् ।
दुःखोपहतया बुद्ध्या निश्चयं नाध्यगच्छत ५

केल्यावर, तो महात्मा सगर राजा स्वर्गास गेला. ( २६–२७ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४१ ॥

हे रामा, सगर मरण पावल्यावर अमात्यवर्ग अत्यंत धार्मिक अशा अंशु-मानालाच राजा समजूं लागले. हे रघुनंदना, तो अंशुमान् राजा फारच मोठा होता व त्यालाही दिलीप म्हणून प्रसिद्ध असलेला मोठा पुत्र झाला. हे रघुनंदना, त्या दिलीपाला राज्य देऊन तो अंशुमान् हिमालयपर्वताच्या रम्य शिखरावर दारुण तपश्चर्या करूं लागला व याप्रमाणे तपश्चर्या चालली असतांना बत्तीस हजार वर्षे लोटल्यावर तपोधन व तपोवनस्थ असा तो फारच मोठा कीर्तिमान् राजा स्वर्गास गेला. असो. पितामहांचा वध झाल्याचें ऐकिल्यावर दिलीप राजाचें मन दुःखाकुल झालें व यामुळे अमुकच उपाय केला असतां गंगा येईल याचा त्याला निश्चय होईना. ( १–५ )

+ "द्वात्रिंशत् शतसाहस्रम्" याचा अर्थ बत्तीसशे हजार असा होतो. बत्तीस हजार असा होत नाही. गोविन्दराजीय प्रतीमध्ये "द्वात्रिंशच्च सहस्राणि" असा पाठ आहे व तो अर्थालाही जुळत आहे; यास्तव गोविन्दराजीय प्रतीला अनुसरून मुळांत शुद्धीकरण केलें आहे.

कथं गङ्गावतरणं कथं तेषां जलक्रिया ।
तारयेयं कथं चैतानिति चिन्तापरोऽभवत् ६
तस्य चिन्तयतो नित्यं धर्मेण विदितात्मनः ।
पुत्रो भगीरथो नाम जज्ञे परमधार्मिकः ७
दिलीपस्तु महातेजा यज्ञैर्बहुभिरिष्टवान् ।
त्रिंशद्वर्षसहस्राणि राजा राज्यमकारयत् ८
अगत्वा निश्चयं राजा तेषामुद्धरणं प्रति ।
व्याधिना नरशार्दूलः कालधर्ममुपेयिवान् ९
इन्द्रलोकं गतो राजा स्वार्जितेनैव कर्मणा ।
राज्ये भगीरथं पुत्रमभिषिच्य नरर्षभः १०
भगीरथस्तु राजर्षिर्धार्मिको रघुनन्दन ।
अनपत्यो महाराजः प्रजाकामः स च प्रजाः ११
मन्त्रिष्वाधाय तद्राज्यं गङ्गावतरणे रतः ।
तपो दीर्घं समातिष्ठद्गोकर्णे रघुनन्दन १२

---

तेव्हा " गंगेचें खाली आगमन कसें होईल, त्या पितामहांची उदकक्रिया गंगोदकानें कशी होईल आणि आपल्या हातून त्यांचा उद्धार कसा होईल," याविषयीं तो चिंताग्रस्त झाला. पुढे धर्मानें प्रसिद्धीस आलेला तो दिलीप राजा, तसाच चिंताक्रांत असतांना त्याला भगीरथ म्हणून एक अत्यंत धार्मिक पुत्र झाला. महातेजस्वी दिलीपराजानें पुष्कळ यज्ञ केले आणि तीस हजार वर्षेंपर्यंत त्यानें राज्य केलें. परंतु, हे पुरुषश्रेष्ठा रामा, पितामहांचा उद्धार करण्यांला गंगेला आणण्याविषयी खात्रीचा उपाय इतक्या कालामध्येंही त्याला सुचला नाही. तेव्हा तशाच स्थितींत शेवटीं तो व्याधींच्या योगानें मरण पावला. सारांश, भगीरथ नामक पुत्राला राज्यावर बसवून तो पुरुषश्रेष्ठ दीलीप राजा स्वतः केलेल्याच कर्मांच्या योगानें इंद्रलोकीं गेला. ( ६–१० )

पुढे, हे रघुनंदना, संतानाची इच्छा करणाऱ्या त्या निपुत्रिक व धर्मनिष्ठ महाराज भगीरथ राजर्षीनें आपली प्रजा व राज्य हीं मंत्र्यांचे स्वाधीन केलीं व गंगेला आणण्याविषयी उत्सुक होऊन, हे रघुनंदना, गोकर्णामध्यें त्यानें दीर्घ

ऊर्ध्वबाहुः पञ्चतपा मासाहारो जितेन्द्रियः ।
तस्य वर्षसहस्राणि घोरे तपसि तिष्ठतः　　१३
अतीतानि महाबाहो तस्य राज्ञो महात्मनः ।
सुप्रीतो भगवान्ब्रह्मा प्रजानां प्रभुरीश्वरः　　१४
ततः सुरगणैः सार्धमुपागम्य पितामहः ।
भगीरथं महात्मानं तप्यमानमथाब्रवीत्　　१५
भगीरथ महाराज प्रीतस्तेऽहं जनाधिप ।
तपसा च सुतप्तेन वरं वरय सुव्रत　　१६
तमुवाच महातेजाः सर्वलोकपितामहम् ।
भगीरथो महाबाहुः कृताञ्जलिपुटः स्थितः　　१७
यदि मे भगवान्प्रीतो यद्यस्ति तपसः फलम् ।
सगरस्यात्मजाः सर्वे मत्तः सलिलमाप्नुयुः　　१८
गङ्गायाः सलिलक्लिन्ने भस्मन्येषां महात्मनाम् ।
स्वर्गं गच्छेयुरत्यन्तं सर्वे च प्रपितामहाः　　१९

---

तपश्चर्येला आरंभ केला. पंचाग्निसाधन करून एक महिन्याने आहार करणारा तो जितेंद्रिय भगीरथ वर हात करून तपश्चर्या करूं लागला व तशा प्रकारची घोर तपश्चर्या त्या महात्म्या राजाची चालली असतां, हे महापराक्रमी रामा, हजारो वर्षें लोटलीं. तेव्हा प्रजाधिपति व समर्थ असे भगवान् ब्रह्मदेव फारच संतुष्ट झाले, आणि देवगणासहवर्तमान संनिध येऊन तप करीत असलेल्या त्या महात्म्या भगीरथाला म्हणाले. ( ११–१५ )

"हे प्रजाधिपते भगीरथ महाराजा, उत्कृष्ट प्रकारें आचरिलेल्या तपाच्या योगाने मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहे. हे सदाचरणसंपन्न, तूं वर माग." यावर महातेजस्वी व महापराक्रमी भगीरथ हात जोडून उभा राहिला आणि त्या सर्व लोकांच्या पूर्वजाला म्हणाला "भगवान् जर माझ्यावर प्रसन्न झाले असतील, माझ्या तपाचें जर कांहीं फल मला प्राप्त व्हावयाचें असेल तर सर्व सगरपुत्रांची माझे हातून उदकक्रिया व्हावी. या महात्म्यांचें भस्म गंगोदकामध्ये भिजलें म्हणजे त्या सर्व प्रपितामहांना अक्षय्य स्वर्गप्राप्ति होईल. हे देवा, आमचें कुल उच्छिन्न

देव याचे ह संतत्यै नावसीदेत्कुलं च नः।
इक्ष्वाकूणां कुले देव एष मेऽस्तु वरः परः २०
उक्तवाक्यं तु राजानं सर्वलोकपितामहः।
प्रत्युवाच शुभां वाणीं मधुरां मधुराक्षराम् २१
मनोरथो महानेष भगीरथ महारथ।
एवं भवतु भद्रं ते इक्ष्वाकुकुलवर्धन २२
इयं हैमवती ज्येष्ठा गङ्गा हिमवतः सुता।
तां वै धारयितुं राजन्हरस्तत्र नियुज्यताम् २३
गङ्गायाः पतनं राजन्पृथिवी न सहिष्यते।
तां वै धारयितुं राजन्नान्यं पश्यामि शूलिनः २४
तमेव मुक्त्वा राजानं गङ्गां चाभाष्य लोककृत्।
जगाम त्रिदिवं देवैः सर्वैः सह मरुद्गणैः २५

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः। ४२ [१३२९]

होऊं नये, एतदर्थ मी संतानाचीही याचना करीत आहे. करिता, हे देवा, इक्ष्वाकुवंशजांच्या कुलामध्ये उत्पन्न झालेल्या मला हा दुसरा एक वर आपणांपासून प्राप्त व्हावा." ( १६–२० )

याप्रमाणे राजा बोलला असतां मधुर शब्द व मधुर स्वर यांनी युक्त असलेल्या शुभवाणीचें अवलंबन करून सर्वलोकपूर्वज ब्रह्मदेव म्हणाले, "हे महारथी, ही तुझी इच्छा मोठी आहे; हे इक्ष्वाकुकुलवर्धना, तुझ्या म्हणण्याप्रमाणे होईल; तुझें कल्याण असो. हे राजा, हिमालयपर्वताची ज्येष्ठ कन्या ही जी हैमवती गंगा तिला धारण करण्याकरिता शंकराची प्रार्थना × केली पाहिजे. हे राजा, पृथ्वीला गंगापात सहन होणार नाही आणि, हे भूपते, त्या गंगेला धारण करणारा शूलपाणि शंकरावाचून मला तर दुसरा कोणी दिसत नाही." याप्रमाणे त्या भगीरथ राजाला सांगून व गंगेलाही ( त्याच्यावर योग्य कालीं अनुग्रह करण्यास ) सांगून ब्रह्मदेव मरुद्गणांसह सर्व देवांबरोबर स्वर्गाला गेले. ( २१–२५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-

× नियुज्यताम्= प्रार्थ्यताम् इति गोविन्दराजः।

त्रिचत्वारिंशः सर्गः ।

देवदेवे गते तस्मिन्सोऽङ्गुष्ठाग्रनिपीडिताम् ।
कृत्वा वसुमतीं राम वत्सरं समुपासत  १
अथ संवत्सरे पूर्णे सर्वलोकनमस्कृतः ।
उमापतिः पशुपती राजानमिदमब्रवीत्  २
प्रीतस्तेऽहं नरश्रेष्ठ करिष्यामि तव प्रियम् ।
शिरसा धारयिष्यामि शैलराजसुतामहम्  ३
ततो हैमवती ज्येष्ठा सर्वलोकनमस्कृता ।
तदा सातिमहद्रूपं कृत्वा वेगं च दुःसहम्  ४
आकाशादपतद्राम शिवे शिवशिरस्युत ।
अचिन्तयच्च सा देवी गङ्गा परमदुर्धरा  ५
विशाम्यहं हि पातालं स्रोतसा गृह्य शंकरम् ।
तस्यावलेपनं ज्ञात्वा क्रुद्धस्तु भगवान्हरः  ६
तिरोभावयितुं बुद्धिं चक्रे त्रिनयनस्तदा ।
सा तस्मिन्पतिता पुण्या पुण्ये रुद्रस्य मूर्धनि  ७

---

कांडापैकी बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

हे रामा, ते देवाधिदेव ब्रह्मदेव गेल्यानंतर, केवल एका अंगुष्ठाग्रावर उभें राहून भगीरथाने एक वर्षभर तपश्चर्या केली. तेव्हा संवत्सर पूर्ण झाल्यावर सर्वलोकवंदित उमाकांत पशुपति राजाला म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठ, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. तुझा मनोरथ मी सिद्धीस नेईन. सारांश, मी पर्वतकन्या गंगा मस्तकीं धारण करीन. " याप्रमाणे शंकरांनी सांगितल्यावर ती हिमालयाची ज्येष्ठ कन्या सर्वलोकवंदित गंगा फारच मोठें रूप व दुःसह वेग धारण करून हे रामा, कल्याणरूप अशा शिवमस्तकार पडली आणि धारण करण्यास फारच कठीण असलेली ती गंगा " प्रवाहाने मी शंकराला ओढून नेऊन पातालामध्ये प्रवेश करीन, " असें मनामध्ये आणूं लागली असतां तिला गर्व झाल्याचें जाणून भगवान् त्रिनयन शंकर क्रुद्ध झाले. ( १–६ )

आणि तिला जटामंडलांतच गडप करून ठेऊन, तिचा गर्व हरण करण्याचें

हिमवत्प्रतिमे राम जटामण्डलगह्वरे ।
सा कथंचिन्महीं गन्तुं नाशक्नोद्यत्नमास्थिता ८
नैव सा निर्गमं लेभे जटामण्डलमन्ततः ।
तत्रैवाबभ्रमद्देवी संवत्सरगणान्बहून् ९
तामपश्यत्पुनस्तत्र तपः परममास्थितः ।
स तेन तोषितश्चासीदत्यन्तं रघुनन्दन १०
विससर्ज ततो गङ्गां हरो बिन्दुसरः प्रति ।
तस्यां विसृज्यमानायां सप्त स्रोतांसि जज्ञिरे ११
ह्लादिनी पावनी चैव नलिनी च तथैव च ।
तिस्रः प्राचीं दिशं जग्मुर्गङ्गाः शिवजलाः शुभाः १२
सुचक्षुश्चैव सीता च सिन्धुश्चैव महानदी ।
तिस्रश्चैता दिशं जग्मुः प्रतीचीं तु दिशं शुभाः १३
सप्तमी चान्वगात्तासां भगीरथरथं तदा १४
भगीरथोऽपि राजर्षिर्दिव्यं स्यन्दनमास्थितः ।

---

त्यांनी मनांत आणिलें. असो. हे रामा, जटामंडलामुळे आंत शिरण्यास कठीण असलेल्या आणि आकाराने हिमालयाप्रमाणे असलेल्या त्या पवित्र शिवमस्तकावर ती गंगा पडली असतां यत्न करूनही तिला बाहेर पृथ्वीवर येण्यास मार्ग सापडला नाही. याप्रमाणे बाहेर पडण्यास मार्गच जेव्हा सापडेना तेव्हा ती गंगा देवी पुष्कळ संवत्सरसमुदाय लोटेपर्यंत त्या जटामंडलांतच भ्रमण करीत होती. पुढे उत्कृष्ट तपश्चर्या करणाऱ्या भगीरथाने तिला त्या ठिकाणीं अवलोकन केलें. हे रघुनंदना, तपाच्या योगाने त्या भगीरथाने शंकराला अत्यंत संतुष्ट केलें असतां शंकराने ती गंगा बिंदुसरोवरामध्ये सोडली. तेव्हा, सोडतां सोडतां तिचे सात प्रवाह झाले. ( ६–११ )

पैकी ह्लादिनी, पावनी व नलिनी अशा तीन पवित्र उदकाने युक्त असलेल्या शुभ गंगा पूर्व दिशेला गेल्या. सुचक्षु, सीता व महानदी सिंधु या तीन शुभ गंगा पश्चिम दिशेला गेल्या व त्यांपैकी सातवी भगीरथाच्या रथाचे मागोमाग गेली. सारांश, महातेजस्वी भगीरथ राजर्षि दिव्य रथावर आरूढ होऊन पुढे जाऊं

प्रायादग्रे महातेजा गङ्गा तं चाप्यनुव्रजत् १५
गगनाच्छंकरशिरस्ततो धरणिमागता।
असर्पत जलं तत्र तीव्रशब्दपुरस्कृतम् १६
मत्स्यकच्छपसङ्घैश्च शिशुमारगणैस्तथा।
पतद्भिः पतितैश्चैव व्यरोचत वसुंधरा १७
ततो देवर्षिगन्धर्वा यक्षसिद्धगणास्तथा।
व्यलोकयन्त ते तत्र गगनाद्गां गतां तदा १८
विमानैर्नगराकारैर्हयैर्गजवरैस्तदा।
पारिप्लवगताश्चापि देवतास्तत्र विष्ठिताः १९
तदद्भुतमिमं लोके गङ्गावतरमुत्तमम्।
दिदृक्षवो देवगणाः समीयुरमितौजसः २०
संपतद्भिः सुरगणैस्तेषां चाभरणौजसा।
शतादित्यमिवाभाति गगनं गततोयदम् २१
शिशुमारोरगगणैर्मीनैरपि च चञ्चलैः।

लागला असतां गंगाही त्याच्या मागोमाग जाऊं लागली. प्रथमतः आकाशापासून ती गंगा शिवमस्तकीं पडली, तेथून पृथ्वीवर आली आणि नंतर प्रचंड ध्वनीनें युक्त असें तें गंगोदक भगीरथाच्या मागोमाग जाऊं लागलें. गंगेबरोबर पृथ्वीवर पडणाऱ्या व पडलेल्या शिशुमारसंज्ञक जलचर समुदायांनी आणि मत्स्य व कच्छ यांच्या समुदायांनी पृथ्वी सुशोभित दिसूं लागली. ( १२-१७ )

तेव्हा, देव, ऋषि व गंधर्व आणि यक्ष व सिद्ध यांचे गण काय आहे म्हणून पाहूं लागले असतां, आकाशांतून पृथ्वीवर आलेली गंगा त्यांनी अवलोकन केली. नगरासारखीं विमानें, अश्व आणि उत्कृष्ट गज यांवर आरूढ होऊन आणि पारिप्लवसंज्ञक यानांत बसून देव त्या ठिकाणीं आले होते. कारण, स्वर्गापासून पृथ्वीवर उत्तम प्रकारें गंगा अवतीर्ण झाली, हें लोकामध्यें पराकाष्ठेचें आश्चर्य झालें होतें व तें अवलोकन करण्याकरिता अपरिमित सामर्थ्यवान् देवगण एकत्र होऊन तेथें आले होते. त्या ठिकाणीं लोटत असलेल्या त्या देवगणांच्या योगानें आणि त्यांच्या भूषणांच्या तेजानें मेघनिर्मुक्त आकाश शेकडो सूर्यांनी भरल्यासारिखें

विद्युद्भिरिव विक्षिप्तैराकाशमभवत्तदा २२
पाण्डुरैः सलिलोत्पीडैः कीर्यमाणैः सहस्रधा ।
शारदाभ्रैरिवाकीर्णं गगनं हंससंप्लवैः २३
क्वचिद्द्रुततरं याति कुटिलं क्वचिदायतम् ।
विनतं क्वचिदुद्धूतं क्वचिद्याति शनैः शनैः २४
सलिलेनैव सलिलं क्वचिदभ्याहतं पुनः ।
मुहुरूर्ध्वपथं गत्वा पपात वसुधां पुनः २५
तच्छंकरशिरोभ्रष्टं भ्रष्टं भूमितले पुनः ।
व्यरोचत तदा तोयं निर्मलं गतकल्मषम् २६
तत्रर्षिगणगन्धर्वा वसुधातलवासिनः ।
भवाङ्गपतितं तोयं पवित्रमिति पस्पृशुः २७
शापात्प्रपतिता ये च गगनाद्वसुधातलम् ।
कृत्वा तत्राभिषेकं ते बभूवुर्गतकल्मषाः २८

---

दिसत होतें. शिशुमार आणि सर्प यांचे समुदाय व चंचल मत्स्य हे विद्युल्लते-प्रमाणे चोहोंकडे पसरले असून त्यांच्या योगानें आकाश व्याप्त झालें होतें व वायूच्या वगैरे योगानें हजारो प्रकारांनीं उसळत असलेल्या श्वेतवर्ण जलफेनांच्या योगानें आकाश शरदृतूंतील अभ्रांनीं अथवा हंसपक्ष्यांच्या समुदायांनीं व्याप्त झाल्यासारखें दिसत होतें. ( १८–२३ )

कांहीं ठिकाणाहून तें गंगोदक सत्वर जात होतें, कांहीं ठिकाणीं वक्र होऊन वहात होतें, कांहीं ठिकाणीं विस्तृत झालें होतें, कांहीं ठिकाणीं संकुचित झालेलें दिसत होतें, कांहीं ठिकाणीं उसळत होतें व कोठें हळूहळू चाललें होतें. कोठें उदकावर उदक आपटून पुष्कळ उंच उडत असे व पुनरपि भूमीवर पडत असे. असो. तें शिवमस्तकीं पडलेलें गंगाजल पुनरपि भूतलावर पडलें असतां निर्मळ व निष्कल्मष असल्यामुळें शोभूं लागलें. तेव्हां भूतलावर राहणाऱ्या ऋषिगणांनीं व गंधर्वांनीं शिवशरिरापासून पडलेलें तें उदक पवित्र आहे, असें समजून त्यामध्यें स्नान केलें. शापामुळें जे स्वर्गापासून भ्रष्ट होऊन भूतलावर पडले होते ते त्या गंगाजलामध्यें स्नान करून निष्पाप झाले. ( २४–२८ )

धूतपापाः पुनस्तेन तोयेनाथ शुभान्विताः ।
पुनराकाशमाविश्य स्वाँल्लोकान्प्रतिपेदिरे २९
मुमुदे मुदितो लोकस्तेन तोयेन भास्वता ।
कृताभिषेको गङ्गायां बभूव गतकल्मषः ३०
भगीरथो हि राजर्षिर्दिव्यं स्यन्दनमास्थितः ।
प्रायादग्रे महाराजस्तं गङ्गा पृष्ठतोऽन्वगात् ३१
देवाः सर्षिगणाः सर्वे दैत्यदानवराक्षसाः ।
गन्धर्वयक्षप्रवराः सकिंनरमहोरगाः ३२
सर्पाश्चाप्सरसो राम भगीरथरथानुगाः ।
गङ्गामन्वगमन्प्रीताः सर्वे जलचराश्च ये ३३
यतो भगीरथो राजा ततो गङ्गा यशस्विनी ।
जगाम सरितां श्रेष्ठा सर्वपापप्रणाशिनी ३४
ततो हि यजमानस्य जह्नोरद्भुतकर्मणः ।
गङ्गा संप्लावयामास यज्ञवाटं महात्मनः ३५
तस्यावलेपनं ज्ञात्वा क्रुद्धो जह्नुश्च राघव ।

---

इतकेंच नव्हे परंतु, पापक्षालन झालेले लोक त्या जलाच्या योगाने पुण्यवान् झाले आणि पुनरपि स्वर्गारोहण करून आपआपल्या स्थानाप्रत गेले. त्या उज्ज्वल उदकाच्या योगाने लोकांना मोठा आनंद झाला व ते आनंदित झालेले लोक गंगेमध्ये स्नान करून पापरहित झाले. असो. महाराज भगीरथ राजर्षि दिव्य रथावर आरूढ होऊन पुढे चालला असतां गंगा त्याच्या मागोमाग गेली. इतकेंच नव्हे परंतु, ऋषिगणांसहवर्तमान सर्व देव, दैत्य, दानव, राक्षस, मुख्य मुख्य गंधर्व, यक्ष, किन्नर, महोरग, सर्प आणि अप्सरा ह्यांनीही, हे रामा, भगीरथाच्या रथामागून गमन केलें व सर्व जलचर प्राणी आनंदित होऊन गंगेबरोबर गेले. जिकडे भगीरथ राजा गेला, तिकडे नद्यांमध्ये श्रेष्ठ आणि सर्वपापनाशक अशी यशस्विनी गंगा गेली. जातां जातां यज्ञयाग करीत बसलेल्या अद्भुत पराक्रमी महात्म्या जन्हूचा यज्ञमंडप गंगेने बुडविला. ( २९-३५ )

तेंव्हा, हे रघुवंशजा रामा, तिला गर्व झाला आहे, असें जाणून जन्हु क्रुद्ध

अपिबत्तु जलं सर्वं गङ्गायाः परमाद्भुतम् ३६
ततो देवाः सगन्धर्वा ऋषयश्च सुविस्मिताः ।
पूजयन्ति महात्मानं जह्नुं पुरुषसत्तमम् ३७
गङ्गां चापि नयन्ति स्म दुहितृत्वे महात्मनः ।
ततस्तुष्टो महातेजाः श्रोत्राभ्यामसृजत्प्रभुः ३८
तस्माज्जह्नुसुता गङ्गा प्रोच्यते जाह्नवीति च ।
जगाम च पुनर्गङ्गा भगीरथरथानुगा ३९
सागरं चापि संप्राप्ता सा सरित्प्रवरा तदा ।
रसातलमुपागच्छत्सिद्ध्यर्थं तस्य कर्मणः ४०
भगीरथोऽपि राजर्षिर्गङ्गामादाय यत्नतः ।
पितामहान्भस्मकृतानपश्यद्गतचेतनः ४१
अथ तद्भस्मनां राशिं गङ्गासलिलमुत्तमम् ।
प्लावयत्पूतपाप्मानः स्वर्गं प्राप्ता रघूत्तम ४२

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ।४३।[१३७१]

झाला आणि त्यानें तें सर्वही गंगाजल प्राशन करून टाकिलें. तें एक मोठें आश्चर्यच झालें. असा प्रकार झाल्यावर देव, गंधर्व आणि ऋषि विस्मित होऊन महात्म्या पुरुषश्रेष्ठ जन्हूची स्तुति करूं लागले आणि कन्या या नात्यानें गंगेचा स्वीकार करण्याविषयीं त्यांनी त्या महात्म्याची विनंती केली. तेव्हा तो महातेजस्वी समर्थ जन्हु संतुष्ट झाला व त्यानें आपल्या कानावाटें गंगेला सोडून दिलें. ( ३६–३८ )

यामुळे गंगेला जन्हुसुता व जान्हवी असें म्हणू लागलें. जन्हूपासून सुटल्यावर गंगा पुनरपि भगीरथाच्या रथाचे मागोमाग जाऊं लागली असतां ती श्रेष्ठ नदी सागराला ( म्हणजे सगरांनी केलेल्या कूपाला ) जाऊन पोचून त्या भगीरथाचें वंशोद्धाररूप कर्म सफल होण्याकरिता रसातलाला गेली. याप्रमाणे यत्नानें गंगेला घेऊन रसातलाप्रत गेल्यावर भगीरथ राजर्षीनें भस्मीभूत होऊन पडलेले आपले पितामह अवलोकन केले व ते अवलोकन करिताक्षणीं त्याला कांहीं सुचेनासें झालें. नंतर त्या भस्मराशीवर गंगाजलाचें सिंचन केलें असतां, हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, तें भस्म होऊन पडलेले भगीरथाचे पितामह निष्पाप होऊन

चतुश्चत्वारिंशः सर्गः ।

स गत्वा सागरं राजा गङ्गयानुगतस्तदा ।
प्रविवेश तलं भूमेर्यत्र ते भस्मसात्कृताः १
भस्मन्यथाप्लुते राम गङ्गायाः सलिलेन वै ।
सर्वलोकप्रभुर्ब्रह्मा राजानमिदमब्रवीत् २
तारिता नरशार्दूल दिवं याताश्च देववत् ।
षष्टिः पुत्रसहस्राणि सगरस्य महात्मनः ३
सागरस्य जलं लोके यावत्स्थास्यति पार्थिव ।
सगरस्यात्मजाः सर्वे दिवि स्थास्यन्ति देववत् ४
इयं च दुहिता ज्येष्ठा तव गङ्गा भविष्यति ।
त्वत्कृतेन च नाम्नाथ लोके स्थास्यति विश्रुता ५
गङ्गा त्रिपथगा नाम दिव्या भागीरथीति च ।
त्रीन्पथो भावयन्तीति तस्मात्त्रिपथगा स्मृता ६

---

स्वर्गाप्रत गेले. ( ३९-४२ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला.

ज्याच्या मागोमाग गंगा येत आहे असा तो भगीरथ राजा सगरपुत्रांनी खणून ठेविलेल्या खड्ड्यापाशीं गेल्यावर, भूतलामध्ये ज्या ठिकाणीं ते सगरपुत्र भस्मीभूत होऊन पडले होते, त्या ठिकाणीं प्रविष्ट झाला. पुढे, हे रामा, गंगाजलाच्या योगाने तें भस्म सिंचित झालें असतां सर्वलोकाधिपति ब्रह्मदेव भगीरथ राजाला म्हणाला " हे पुरुषश्रेष्ठा, या महात्म्या सगराच्या साठ हजार पुत्रांचा तूं उद्धार केलास आणि यामुळे ते देवांप्रमाणे स्वर्गास गेले. हे राजा, जोंपर्यंत जगतामध्ये सागराचें उदक कायम राहील तोंपर्यंत सर्व सगरपुत्र स्वर्गामध्ये देवांप्रमाणे राहतील. ही गंगा तुझी ज्येष्ठ कन्या होईल आणि तूं ठेविलेल्या नांवांनी म्हणजे त्रिपथगा, दिव्या, भागीरथी या नांवांनी ही गंगा जगतामध्ये विख्यात होऊन राहील. तीन मार्ग हीं व्यापणारी असल्यामुळे हिला त्रिपथगा असें म्हणतात. ( १-६ )

पितामहानां सर्वेषां त्वमत्र मनुजाधिप ।
कुरुष्व सलिलं राजन्प्रतिज्ञामपवर्जय ७
पूर्वकेण हि ते राजंस्तेनातियशसा तदा ।
धर्मिणां प्रवरेणाथ नैष प्राप्तो मनोरथः ८
तथैवांशुमता वत्स लोकेऽप्रतिमतेजसा ।
गङ्गा प्रार्थयता नेतुं प्रतिज्ञा नापवर्जिता ९
राजर्षिणा गुणवता महर्षिसमतेजसा ।
मत्तुल्यतपसा चैव क्षत्रधर्मस्थितेन च १०
दिलीपेन महाभाग तव पित्रातितेजसा ।
पुनर्न शकिता नेतुं गङ्गां प्रार्थयतानघ ११
सा त्वया समतिक्रान्ता प्रतिज्ञा पुरुषर्षभ ।
प्राप्तोऽसि परमं लोके यशः परमसंमतम् १२
तच्च गङ्गावतरणं त्वया कृतमरिन्दम ।
अनेन च भवान्प्राप्तो धर्मस्यायतनं महत् १३

---

हे प्रजाधिपते भगीरथ राजा, आपल्या सर्व पितामहांची तूं या ठिकाणीं उदकक्रिया करून आपली प्रतिज्ञा शेवटास ने. हे राजा, तुझा पूर्वज सगर अत्यंत कीर्तिमान् व धर्मनिष्ठांमध्ये श्रेष्ठ असतांनाही त्याचा हा मनोरथ सिद्धीस गेला नाही. त्याचप्रमाणे, हे वत्सा, जगतामध्ये अंशुमान् अप्रतिम तेजस्वी होता व गंगा आणण्याविषयी तो उत्सुकही होता. परंतु, त्यालाही आपली प्रतिज्ञा शेवटास नेतां आली नाही. तेजानें महर्षींची व तपानें माझी बरोबरी करणारा व अगदी क्षत्रधर्माप्रमाणे वागणारा असा जो तुझा अतितेजस्वी व गुणवान् पिता राजर्षि दिलीप तोही गंगा आणण्याची इच्छा करीत होता. परंतु, हे महाभाग्यवान निष्पाप भगीरथा, तो समर्थ झाला नाही. सारांश, हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या पूर्वजांना जी प्रतिज्ञा शेवटास नेतां आली नाही, ती तूं शेवटास नेलीस आणि म्हणूनच जगतामध्ये सर्वलोकसंमत असें उत्कृष्ट यश तूं प्राप्त करून घेतलेस. ( ७–१२ )

हे शत्रूदमना, तें गंगावतरण तूं शेवटास नेलेस आणि यामुळे धर्मानें प्राप्त होणारें एक मोठें ( ब्रह्मलोकरूप ) स्थानच तूं प्राप्त करून घेतलेस. हे पुरुषश्रेष्ठा,

प्लावयस्व त्वमात्मानं नरोत्तम सदोचिते ।
सलिले पुरुषश्रेष्ठ शुचिः पुण्यफलो भव १४
पितामहानां सर्वेषां कुरुष्व सलिलक्रियाम् ।
स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामि स्वं लोकं गम्यतां नृप १५
इत्येवमुक्त्वा देवेशः सर्वलोकपितामहः ।
यथागतं तथागच्छद्देवलोकं महायशाः १६
भगीरथस्तु राजर्षिः कृत्वा सलिलमुत्तमम् ।
यथाक्रमं यथान्यायं सागराणां महायशाः १७
कृतोदकः शुची राजा स्वपुरं प्रविवेश ह ।
समृद्धार्थो नरश्रेष्ठ स्वराज्यं प्रशशास ह १८
प्रमुमोद च लोकस्तं नृपमासाद्य राघव ।
नष्टशोकः समृद्धार्थो बभूव विगतज्वरः १९
एष ते राम गङ्गाया विस्तरोऽभिहितो मया ।
स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते सन्ध्याकालोऽतिवर्तते २०

सर्वकाल स्नानाला योग्य अशा या गंगाजलामध्ये तूं स्नान कर आणि शुचिर्भूत होऊन पुण्यफलाचा वाटेकरी हो व आपल्या सर्व पितामहांची उदकक्रिया उरकून घे. तुझें कल्याण असो. मी आपल्या लोकाप्रत जातों आणि हे राजा, तूंही जलक्रिया आटोपून आपल्या नगराला परत जा. " ( १३–१५ )

याप्रमाणे भगीरथ राजाला सांगितल्यावर सर्वलोकपूर्वज, महायशस्वी, सुराधिपति ब्रह्मदेव आल्या मार्गानें देवलोकीं परत गेले. इकडे महायशस्वी भगीरथ राजर्षिही सगरपुत्रांची अनुक्रमाने यथाविधि उत्तम प्रकारें जलक्रिया करून आणि उदकक्रिया केल्यावर पुनरपि स्नानाने शुचि होऊन, आपल्या नगरामध्ये प्रविष्ट झाला आणि हे पुरुषश्रेष्ठा रामा, याप्रमाणे कृतकृत्य होऊन तो आपलें राज्य करूं लागला. हे रघुवंशजा रामा, तो राजा प्राप्त झाल्यामुळे लोकही आनंदित झाले आणि शोकरहित व चिंतारहित होऊन ते धनसमृद्ध बनले. हे रामा, हें मी गंगेचें आख्यान तुला सविस्तर कथन केलें. तुझें कल्याण असो. आता संध्यावंदनाच्या कालाचें अतिक्रमण होत आहे. ( १६–२० )

धन्यं यशस्यमायुष्यं पुत्र्यं स्वर्ग्यमथापि च ।
यः श्रावयति विप्रेषु क्षत्रियेष्वितरेषु च २१
प्रीयन्ते पितरस्तस्य प्रीयन्ते दैवतानि च ।
इदमाख्यानमायुष्यं गङ्गावतरणं शुभम् २२
यः शृणोति च काकुत्स्थ सर्वान्कामानवाप्नुयात् ।
सर्वे पापाः प्रणश्यन्ति आयुः कीर्तिश्च वर्धते २३

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः। ४४ [१३९४]

पञ्चचत्वारिंशः सर्गः ।

विश्वामित्रवचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः ।
विस्मयं परमं गत्वा विश्वामित्रमथाब्रवीत् १
अत्यद्भुतमिदं ब्रह्मन्कथितं परमं त्वया ।
गङ्गावतरणं पुण्यं सागरस्यापि पूरणम् २
क्षणभूतेव नौ रात्रिः संवृत्तेयं परन्तप ।
इमां चिन्तयतः सर्वां निखिलेन कथां तव ३

---

धनदायक, यशस्कर, आयुर्वर्धक, पुत्रदायक आणि स्वर्गप्रापक असें हें आख्यान जो ब्राह्मणांना, क्षत्रियांना अथवा वैश्यांना व शूद्रांना कथन करितो, त्याच्यावर देव आणि पितर प्रसन्न होतात. हें गंगावतरणरूप शुभ व आयुर्वर्धक आख्यान जो श्रवण करतो, त्याच्या सर्व कामना परिपूर्ण होतात आणि हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्याचीं सर्व पातकें नष्ट होऊन तो चिरायु आणि महाकीर्तिमान् होतो. ( २१-२३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४४ ॥

विश्वामित्र मुनींचें भाषण श्रवण करून, रघुवंशज राम लक्ष्मणासहवर्तमान अत्यंत विस्मित झाला आणि म्हणाला, " हे ब्रह्मन्, सगरपुत्रांनी खणून ठेविलेल्या कूपाचेंही पूरण ज्यानें केलें, असें हें पवित्र गंगावतरण अत्यंत आश्चर्यावह असलेलें आपण उत्कृष्ट प्रकारें कथन केलेंत. आपण सविस्तर सांगितलेल्या या सर्व कथेच्या चिंतनामध्ये, हे शत्रुतापन मुने, आम्हांला ही सर्व रात्र एका क्षणासारखी झाली.

तस्य सा शर्वरी सर्वा मम सौमित्रिणा सह ।
जगाम चिन्तयानस्य विश्वामित्र कथां शुभाम् ४
ततः प्रभाते विमले विश्वामित्रं तपोधनम् ।
उवाच राघवो वाक्यं कृताह्निकमरिन्दमः ५
गता भगवती रात्रिः श्रोतव्यं परमाद्भुतम् ।
तराम सरितां श्रेष्ठां पुण्यां त्रिपथगां नदीम् ६
नौरेषा हि सुखास्तीर्णा ऋषीणां पुण्यकर्मणाम् ।
भगवन्तमिह प्राप्तं ज्ञात्वा त्वरितमागता ७
तस्य तद्वचनं श्रुत्वा राघवस्य महात्मनः ।
संतारं कारयामास सर्षिसङ्घस्य कौशिकः ८
उत्तरं तीरमासाद्य संपूज्यर्षिगणं ततः ।
गङ्गाकूले निविष्टास्ते विशालां ददृशुः पुरीम् ९
ततो मुनिवरस्तूर्णं जगाम सहराघवः ।
विशालां नगरीं रम्यां दिव्यां स्वर्गोपमां तदा १०

सारांश, हे विश्वामित्र मुने, लक्ष्मणासहवर्तमान मी त्या शुभ कथेचें चिंतन करीत असतां, सर्वही रात्र निघून गेली." नंतर चांगलें उजाडल्यावर स्नानसंध्या आटोपून बसलेल्या विश्वामित्र मुनींना शत्रुदमन करणारा रघुवंशज राम म्हणाला- ( १-५ )

"अत्यंत अद्भुत आख्यान श्रवण करण्यास सापडल्य मुळें पूज्य झालेली ती रात्र निघून गेली. आता आपण नद्यांमध्ये श्रेष्ठ व पवित्र असलेली ही त्रिपथगा मिनी तरून जाऊं. आपण येथे आला आहां, असें समजून उत्कृष्ट आस्तरणांनी युक्त असलेली ही पुण्यवान् महर्षींची नौका सत्वर इकडे आली आहे." याप्रमाणे महात्म्या रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर कुशिकवंशज विश्वामित्र मुनि ऋषिगणांसहवर्तमान गंगा तरून गेले. नंतर उत्तर तीरावर येऊन तेथील ऋषि-गणांचें पूजन केल्यावर ते गंगातीरीं राहिले असतां विशाला नामक नगरी त्यांनी अवलोकन केली. तेव्हा मुनिश्रेष्ठ विश्वामित्र रामलक्ष्मणांसहवर्तमान सत्वर त्या दिव्य, रम्य व स्वर्गतुल्य विशाला नगरीमध्ये गेले. नंतर बुद्धिमान् राम हात

*

अथ रामो महाप्राज्ञो विश्वामित्रं महामुनिम् ।
पप्रच्छ प्राञ्जलिर्भूत्वा विशालामुत्तमां पुरीम् ११
कतमो राजवंशोऽयं विशालायां महामुने ।
श्रोतुमिच्छामि भद्रं ते परं कौतूहलं हि मे १२
तस्य तद्वचनं श्रुत्वा रामस्य मुनिपुङ्गवः ।
आख्यातुं तत्समारेभे विशालायाः पुरातनम् १३
श्रूयतां राम शक्रस्य कथां कथयतः श्रुताम् ।
अस्मिन्देशे हि यद्वृत्तं शृणु तत्त्वेन राघव १४
पूर्वं कृतयुगे राम दितेः पुत्रा महाबलाः ।
अदितेश्च महाभागा वीर्यवन्तः सुधार्मिकाः १५
ततस्तेषां नरव्याघ्र बुद्धिरासीन्महात्मनाम् ।
अमरा विजराश्चैव कथं स्यामो निरामयाः १६
तेषां चिन्तयतां तत्र बुद्धिरासीद्विपश्चिताम् ।
क्षीरोदमथनं कृत्वा रसं प्राप्स्याम तत्र वै १७

---

जोडून त्या उत्कृष्ट विशालानगरीसंबंधाने महर्षि विश्वामित्रांना विचारूं लागला– ( ६–११ )

"हे महामुने, विशाला नगरीमध्ये हा कोणत्या राजाचा वंश आहे, हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. आपलें देव बरें करो. याविषयी मला पराकाष्ठेची उत्सुकता आहे." हें त्या रामाचें भाषण श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ विश्वामित्र विशाला नगरीविषयी पुरातन वृत्तान्त सांगूं लागले. (ते म्हणाले) "हे रामा, इंद्र कथन करीत असतांना मी ऐकलेली ही कथा तूं श्रवण कर. हे राघवा, या देशांत काय वर्तमान घडलें, हें तूं खरें खरें ऐकून घे. हे रामा, पूर्वी कृतयुगामध्ये दितीचे पुत्र महाबलाढ्य असून अदितीचेही पुत्र महाभाग्यवान्, वीर्यवान् व परम धार्मिक होते. एकदा हे पुरुषश्रेष्ठा, 'आपण निरोगी व अजरामर कसे होऊं?' म्हणून त्या महात्म्यांच्या मनामध्ये विचार उत्पन्न झाला. ( १२–१६ )

तेव्हा विचार करतां करतां 'क्षीरसागराचें मंथन करून अमृतरूप रस प्राप्त करून घ्यावा,' असें त्या बुद्धिमानांना सुचलें असतां त्यांनी समुद्रमंथनाचा निश्चय

ततो निश्चित्य मथनं योक्त्रं कृत्वा च वासुकिम् ।
मन्थानं मन्दरं कृत्वा ममन्थुरमितौजसः    १८
अथ वर्षसहस्रेण योक्त्रसर्पशिरांसि च ।
वमन्तोऽतिविषं तत्र ददंशुर्दशनैः शिलाः    १९
उत्पपाताग्निसंकाशं हालाहलमहाविषम् ।
तेन दग्धं जगत्सर्वं सदेवासुरमानुषम्    २०
अथ देवा महादेवं शंकरं शरणार्थिनः ।
जग्मुः पशुपतिं रुद्रं त्राहि त्राहीति तुष्टुवुः    २१
एवमुक्तस्ततो देवैर्देवदेवेश्वरः प्रभुः ।
प्रादुरासीत्ततोऽत्रैव शङ्खचक्रधरो हरिः    २२
उवाचैनं स्मितं कृत्वा रुद्रं शूलधरं हरिः ।
दैवतैर्मथ्यमाने तु यत्पूर्वं समुपस्थितम्    २३
तत्त्वदीयं सुरश्रेष्ठ सुराणामग्रतो हि यत् ।
अग्रपूजामिह स्थित्वा गृहाणेदं विषं प्रभो    २४

केला आणि वासुकीची दोरी करून व मंदर पर्वताची रवी करून त्या अत्यंत पराक्रमी देवदैत्यांनी समुद्रमंथनाला आरंभ केला. मंथन सुरू होऊन हजार वर्षे झाल्यावर रज्जुरूप बनलेल्या वासुकीच्या मुखांतून भयंकर विष बाहेर पडूं लागलें व दंतांच्या योगानें त्या सर्पाच्या मस्तकांनी शिलांना दंशही केले. पाषाणांना दंश झाल्यावर अग्नीसारखें जाज्वल्य हालाहल महाविष उत्पन्न झालें असतां देव, दैत्य व दानव यांसहवर्तमान सर्व जगत् त्याच्या योगानें दग्ध होऊं लागलें. तेव्हा कल्याण करणाऱ्या सुरश्रेष्ठ पशुपति रुद्राला देव शरण गेले आणि "त्राहि त्राहि" असें म्हणून त्यांनी त्याला संतुष्ट केलें. (१७-२१)

याप्रमाणे देवांनी देवदेवेश्वर प्रभु शंकराची स्तुति केली असतां शंख व चक्र धारण करणारे श्रीहरिही त्या ठिकाणीं प्रकट झाले. नंतर हास्यपूर्वक शूलपाणि रुद्राला श्रीहरि म्हणाले, "हे सुरश्रेष्ठ, देव मंथन करीत असतांना जें प्रथम उत्पन्न झालें, तें आपलें आहे; कारण आपण देवांमध्ये श्रेष्ठ आहां. याकरिता हे प्रभो, येथे राहून आपण अग्रपूजेचा म्हणजे विषाचा स्वीकार करा." याप्रमाणे बोलून

इत्युक्त्वा च सुरश्रेष्ठस्तत्रैवान्तरधीयत ।
देवतानां भयं दृष्ट्वा श्रुत्वा वाक्यं तु शार्ङ्गिणः २५
हालाहलं विषं घोरं संजग्राहामृतोपमम् ।
देवान्विसृज्य देवेशो जगाम भगवान्हरः २६
ततो देवासुराः सर्वे ममन्थू रघुनन्दन ।
प्रविवेशाथ पातालं मन्थानः पर्वतोत्तमः २७
ततो देवाः सगन्धर्वास्तुष्टुवुर्मधुसूदनम् ।
त्वं गतिः सर्वभूतानां विशेषेण दिवौकसाम् २८
पालयास्मान्महाबाहो गिरिमुद्धर्तुमर्हसि ।
इति श्रुत्वा हृषीकेशः कामठं रूपमास्थितः २९
पर्वतं पृष्ठतः कृत्वा शिश्ये तत्रोदधौ हरिः
पर्वताग्रं तु लोकात्मा हस्तेनाक्रम्य केशवः ३०
देवानां मध्यतः स्थित्वा ममन्थ पुरुषोत्तमः ।
अथ वर्षसहस्रेण आयुर्वेदमयः पुमान् ३१
उदतिष्ठत्सुधर्मात्मा सदण्डः सकमण्डलुः ।

---

सुरश्रेष्ठ विष्णु तेथेच अदृश्य झाले; तेव्हा देवतांचें भय पाहून व विष्णूंचें भाषण श्रवण करून, शंकरांनी अमृताप्रमाणे हालाहलसंज्ञक घोर विषाचा स्वीकार केला व नंतर देवांचा निरोप घेऊन ते देवाधिपति भगवान् हर तेथून निघून गेले. तदनंतर, हे रघुनंदना, सर्व देवदैत्य मंथन करूं लागले असतां, तो श्रेष्ठ पर्वतरूप मंथा पातालामध्ये प्रविष्ट झाला. ( २२–२७ )

“ तेव्हा तूं सर्व प्राण्यांचा आणि विशेषतः देवांचा आधार आहेस, यास्तव हे महापराक्रमी विष्णो, तूं हा खाली खचलेला पर्वत वर काढ आणि आमचें रक्षण कर. ” म्हणून गंधर्वांसहवर्तमान देवांनी मधुसूदनाचें स्तवन केलें असतां, तें श्रवण करून हृषीकेशाने कूर्मरूप धारण केलें. नंतर पर्वत पाठीवर घेऊन त्या श्रीहरीने त्या महासागरामध्ये शयन केलें; इतकेंच नव्हे, तर पर्वताचें अग्र हाताने धरून, तो जगदात्मा पुरुषश्रेष्ठ केशव देवांमध्ये उभा राहून, समुद्राचें मंथन करूं लागला. तदनंतर एक हजार वर्षांनी अत्यंत धर्मात्मा असा धन्वंतरि-

अथ धन्वन्तरिर्नाम अप्सराश्च सुवर्चसः　३२
अप्सु निर्मथनादेव रसात्तस्माद्वरस्त्रियः ।
उत्पेतुर्मनुजश्रेष्ठ तस्मादप्सरसोऽभवन्　३३
षष्टिः कोट्योऽभवँस्तासामप्सराणां सुवर्चसाम् ।
असंख्येयास्तु काकुत्स्थ यास्तासां परिचारिकाः ३४
न ताः स्म प्रतिगृह्णन्ति सर्वे ते देवदानवाः ।
अप्रतिग्रहणादेव ता वै साधारणाः स्मृताः　३५
वरुणस्य ततः कन्या वारुणी रघुनन्दन ।
उत्पपात महाभागा मार्गमाणा परिग्रहम्　३६
दितेः पुत्रा न तां राम जगृहुर्वरुणात्मजाम् ।
अदितेस्तु सुता वीर जगृहुस्तामनिन्दिताम्　३७
असुरास्तेन दैतेयाः सुरास्तेनादितेः सुताः ।
हृष्टाः प्रमुदिताश्चासन्वारुणीग्रहणात्सुराः　३८

---

नामक आयुर्वेदमय पुरुष दंडकमंडलूसहवर्तमान समुद्रांतून उत्पन्न झाला व अत्यंत तेजस्वी अशा अप्सराही त्यांतूनच निघाल्या. ( २८-३२ )

हे पुरुषश्रेष्ठा रामा, अपांचें ( म्हणजे जलाचें ) मंथन चाललें असतां त्या रसापासून ज्या अर्थी त्या उत्कृष्ट स्त्रिया निघाल्या, त्या अर्थी त्यांना अप्सरा ही संज्ञा प्राप्त झाली. त्या अति तेजस्वी अप्सरा मुख्य मुख्य मिळून साठ कोटि होत्या व हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्यांच्या परिचारिका ज्या गौण अप्सरा उत्पन्न झाल्या, त्यांची तर गणना करणेंही अशक्य आहे. असो. समुद्रमंथन करणाऱ्या त्या देवदानवांपैकी कोणीही त्यांचा स्वीकार केला नाही. तेव्हा स्वीकार न केल्यामुळेच त्या सर्वसाधारण झाल्या. नंतर रघुनंदना रामा, वरुणाची कन्या महाभाग्यवती वारुणी अर्थात् ( सुरा ) शुद्धोदक ही उत्पन्न झाली आणि आपला परिग्रह करणारा कोणी आहे कीं नाही, हें शोधूं लागली. ( ३३-३६ )

हे रामा, दितीच्या पुत्रांनी त्या वरुणकन्येचा स्वीकार केला नाही; परंतु हे वीरा, अदितीच्या पुत्रांनी म्हणजे देवांनी त्या अनिंदित वरुणकन्येचा स्वीकार केला. तेव्हा सुरेचा परिग्रह न केल्यामुळे दितीचे पुत्र असुर झाले, तिचा स्वीकार

उच्चैःश्रवा हयश्रेष्ठो मणिरत्नं च कौस्तुभम् ।
उदतिष्ठन्नरश्रेष्ठ तथैवामृतमुत्तमम् ३९
अथ तस्य कृते राम महानासीत्कुलक्षयः ।
अदितेस्तु ततः पुत्रा दितिपुत्रानयोधयन् ४०
एकतामगमन्सर्वे असुरा राक्षसैः सह ।
युद्धमासीन्महाघोरं वीर त्रैलोक्यमोहनम् ४१
यदा क्षयं गतं सर्वं तदा विष्णुर्महाबलः ।
अमृतं सोऽहरत्तूर्णं मायामास्थाय मोहिनीम् ४२
ये गताभिमुखं विष्णुमक्षरं पुरुषोत्तमम् ।
संपिष्टास्ते तदा युद्धे विष्णुना प्रभविष्णुना ४३
अदितेरात्मजा वीरा दितेः पुत्रान्निजघ्निरे ।
अस्मिन्घोरे महायुद्धे दैतेयादित्ययोर्भृशम् ४४
निहत्य दितिपुत्रांस्तु राज्यं प्राप्य पुरन्दरः ।
शशास मुदितो लोकान्सर्षिसङ्घान्सचारणान् ४५

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ४५ [१४३९]

केल्यामुळे अदितीचे पुत्र सुर झाले व त्या वरुणकन्येचा स्वीकार केल्यामुळे सुर हर्ष व आनंद यांनीही युक्त झाले. हे पुरुषश्रेष्ठा, नंतर श्रेष्ठ अश्व उच्चैःश्रवा, उत्तम रत्न कौस्तुभ आणि उत्कृष्ट अमृत त्यांतून निघालें. तेव्हा हे रामा, त्या अमृताकरिता देव व असुर यांचा जवळजवळ मोठा कुलक्षयच झाला. अदितीचे पुत्र दितीच्या पुत्रांशीं युद्ध करूं लागले, तेव्हा सर्वही असुरांनी ऐक्य केलें व हे वीरा, त्रैलोक्याला मोह पाडणारें असें त्यांच्यामध्ये महाघोर युद्ध झालें. ( ३७-४१ )

नंतर युद्ध होतां होतां त्या उभयतांचाही जेव्हा प्रायः सर्वस्वीं क्षय झाला, तेव्हा मायेने मोहिनीचें रूप धारण करून महाबलाढ्य विष्णूंनी तें अमृत सत्वर हरण केलें. अचल अशा पुरुषश्रेष्ठ विष्णूचे अंगावर जे धावून गेले, त्या सर्वांचें त्या महाप्रभावी विष्णूने युद्धामध्ये अगदी पीठ करून टाकलें. देवदैत्यांच्या या अत्यंत घोर महायुद्धामध्ये अदितीच्या वीर पुत्रांनी दितिपुत्रांचा वध केला व याप्रमाणे दितिपुत्रांचा वध करून राज्य मिळविल्यावर इंद्राने आनंदित होऊन

षट्चत्वारिंशः सर्गः ।

हतेषु तेषु पुत्रेषु दितिः परमदुःखिता ।
मारीचं कश्यपं नाम भर्तारमिदमब्रवीत् १
हतपुत्रास्मि भगवँस्तव पुत्रैर्महात्मभिः ।
शक्रहन्तारमिच्छामि पुत्रं दीर्घतपोर्जितम् २
साहं तपश्चरिष्यामि गर्भं मे दातुमर्हसि ।
ईश्वरं शक्रहन्तारं त्वमनुज्ञातुमर्हसि ३
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा मारीचः कश्यपस्तदा ।
प्रत्युवाच महातेजा दितिं परमदुःखिताम् ४
एवं भवतु भद्रं ते शुचिर्भव तपोधने ।
जनयिष्यसि पुत्रं त्वं शक्रहन्तारमाहवे ५
पूर्णे वर्षसहस्रे तु शुचिर्यदि भविष्यसि ।
पुत्रं त्रैलोक्यहन्तारं मत्तस्त्वं जनयिष्यसि ६

ऋषिगण व चारण यांसहवर्तमान लोकांचें परिपालन केलें. ( ४२-४५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४५ ॥

त्या पुत्रांचा वध झाला असतां दिति अत्यंत दुःखित होऊन, मरीचिपुत्र कश्यप नामक भर्त्याला म्हणाली, " हे भगवन्, आपल्या महापराक्रमी पुत्रांनी माझ्या पुत्रांचा वध केला. यास्तव, दीर्घ तपश्चर्येच्या योगानें आपणांपासून इंद्रघातक पुत्र प्राप्त करून घेण्याची माझी इच्छा आहे. करितां मी तपश्चर्या करीन; आपण मला गर्भ द्या. सारांश, इंद्रघातक असा त्रैलोक्याधिपति पुत्र तपश्चर्येनें प्राप्त करून घेण्याविषयी आपण मला अनुज्ञा द्या. " हें तिचें भाषण श्रवण केल्यावर अत्यंत दुःखित झालेल्या त्या दितीला महातेजस्वी मरीचिपुत्र कश्यप म्हणाले, " असें होवो. हे तपोधने, तुझें कल्याण असो. तूं शुचिर्भूत रहा; म्हणजे संग्रामामध्ये इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल. ( १-५ )

" सहस्र संवत्सर पूर्ण होईपर्यंत जर तूं शुचिर्भूत राहशील, तर माझ्यापासून त्रैलोक्याधिपति इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल. " याप्रमाणे बोलून

एवमुक्त्वा महातेजाः पाणिना संममार्ज ताम् ।
तामालभ्य ततः स्वस्ति इत्युक्त्वा तपसे ययौ ७
गते तस्मिन्नरश्रेष्ठ दितिः परमहर्षिता ।
कुशप्लवं समासाद्य तपस्तेपे सुदारुणम् ८
तपस्तस्यां हि कुर्वन्त्यां परिचर्यां चकार ह ।
सहस्राक्षो नरश्रेष्ठ परया गुणसंपदा ९
अग्निं कुशान्काष्ठमपः फलं मूलं तथैव च ।
न्यवेदयत्सहस्राक्षो यच्चान्यदपि काङ्क्षितम् १०
गात्रसंवाहनैश्चैव श्रमापनयनैस्तथा ।
शक्रः सर्वेषु कालेषु दितिं परिचचार ह ११
पूर्णे वर्षसहस्रे सा दशोने रघुनन्दन ।
दितिः परमसंहृष्टा सहस्राक्षमथाब्रवीत् १२
तपश्चरन्त्या वर्षाणि दश वीर्यवतां वर ।
अवशिष्टानि भद्रं ते भ्रातरं द्रक्ष्यसे ततः १३
यमहं त्वत्कृते पुत्र तमाधास्ये जयोत्सुकम् ।

---

महातेजस्वी कश्यपांनी तिच्या अंगावरून हात फिरविला आणि नंतर तिच्याशीं समागम केल्यावर " कल्याण असो," असें म्हणून ते तपश्चर्येकरिता निघून गेले. हे पुरुषश्रेष्ठा रामा, ते कश्यपमुनि गेल्यावर दितीला अत्यंत हर्ष झाला व कुशप्लवसंज्ञक तपोवनामध्ये जाऊन तिनें फारच उग्र तपश्चर्येला आरंभ केला. हे पुरुषश्रेष्ठा रामा, ती तपश्चर्या करूं लागली असतां, इन्द्रानें फारच उत्कृष्ट रीतीनें तिची सेवा चालविली. अग्नि, कुश, काष्ठें, उदक, फळें, मुळें आणि इतरही जें कांहीं तिला हवें असेल, तें इंद्रानें दिलें. इतकेंच नव्हे तर श्रमपरिहार होण्याकरिता हातपाय वगैरे चेपूनही इंद्र सर्व काल दितीची सेवा करूं लागला. ( ६–११ )

असें होतां होतां हे रघुनंदना, दहा कमी हजार वर्षें पूर्ण झाल्यावर दिति अत्यंत हर्षयुक्त होऊन इंद्राला म्हणाली, " हे वीर्यवानांमध्ये श्रेष्ठ इंद्रा, माझ्या तपश्चर्येची आता दहा वर्षें उरलीं आहेत. तुझें कल्याण असो. हीं दहा वर्षें लोटल्यावर तूं भ्रात्याला अवलोकन करशील. हे पुत्रा, तुझ्या नाशाकरिता म्हणून जो

त्रैलोक्यविजयं पुत्र सह भोक्ष्यसि विज्वरः　१४
याचितेन सुरश्रेष्ठ पित्रा तव महात्मना ।
वरो वर्षसहस्रान्ते मम दत्तः सुतं प्रति　१५
इत्युक्त्वा च दितिस्तत्र प्राप्ते मध्यन्दिनेश्वरे ।
निद्रयापहृता देवी पादौ कृत्वाथ शीर्षतः　१६
दृष्ट्वा तामशुचिं शक्रः पादयोः कृतमूर्धजाम् ।
शिरःस्थाने कृतौ पादौ जहास च मुमोद च　१७
तस्याः शरीरविवरं प्रविवेश पुरन्दरः ।
गर्भं च सप्तधा राम चिच्छेद परमात्मवान्　१८
भिद्यमानस्ततो गर्भो वज्रेण शतपर्वणा ।
रुरोद सुस्वरं राम ततो दितिरबुध्यत　१९
मा रुदो मा रुदश्चेति गर्भं शक्रोऽभ्यभाषत ।
बिभेद च महातेजा रुदन्तमपि वासवः　२०

---

पुत्र मी मागून घेतला, तो तसा न करिता मी तुला जय देण्याविषयी उत्सुक असाच पुत्र उत्पन्न करीन आणि हे पुत्रा, त्या आपल्या भ्रात्यासहवर्तमान तूं त्रैलोक्यविजयजन्य सुखाचा निश्चिंत होऊन उपभोग घेशील. हे सुरश्रेष्ठा, तुझ्या पित्याची प्रार्थना केली असतां " हजार वर्षांनी तुला पुत्र होईल, " म्हणून त्या महात्म्याने मला पुत्रप्राप्तीसंबंधाने वर दिला आहे. " (१२–१५)

याप्रमाणे इंद्राला सांगितल्यावर सूर्य मध्याह्नीं आला असतां उशाकडे पाय करून ती दिति निद्रित झाली. तेव्हा पाय ठेवण्याच्या ठिकाणीं मस्तक ठेवल्यामुळे व मस्तक ठेवण्याचे ठिकाणीं पाय ठेवल्यामुळे अशुचि झालेल्या त्या दितीला अवलोकन करून इंद्राला हर्ष व आनंद झाला. तेव्हा हे रामा, फारच सावध असलेल्या त्या इंद्राने तिच्या शरिरामध्ये प्रविष्ट होऊन तिच्या गर्भाचे सात तुकडे केले; शेकडो धारांनी युक्त असलेल्या वज्राच्या योगाने तुकडे होऊं लागले असतां तो गर्भ सुस्वर रडूं लागला; तेव्हा हे रामा, दिति जागी झाली. (१६–१९).

नंतर " रडूं नको, रडूं नको, " असें गर्भाला उद्देशून इंद्र म्हणाला आणि तो रडत असतांनाही त्या महातेजस्वी इंद्राने त्याचे तुकडे केलेच. नंतर " मारूं नको,

न हन्तव्यं न हन्तव्यमित्येव दितिरब्रवीत् ।
निष्पपात ततः शक्रो मातुर्वचनगौरवात् २१
प्राञ्जलिर्वज्रसहितो दितिं शक्रोऽभ्यभाषत ।
अशुचिर्देवि सुप्तासि पादयोः कृतमूर्धजा २२
तदन्तरमहं लब्ध्वा शक्रहन्तारमाहवे ।
अभिन्दं सप्तधा देवि तन्मे त्वं क्षन्तुमर्हसि २३

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ४६ [१४६२]

सप्तचत्वारिंशः सर्गः ।

सप्तधा तु कृते गर्भे दितिः परमदुःखिता ।
सहस्राक्षं दुराधर्षं वाक्यं सानुनयाब्रवीत् १
ममापराधाद्गर्भोऽयं सप्तधा शकलीकृतः ।
नापराधो हि देवेश तवात्र बलसूदन २
प्रियं त्वत्कृतमिच्छामि मम गर्भविपर्यये ।
मरुतां सप्त सप्तानां स्थानपाला भवन्तु ते ३
वातस्कन्धा इमे सप्त चरन्तु दिवि पुत्रक ।

मारूं नको," असेंच एकसारखें दिति म्हणूं लागली असतां मातेच्या वचनाला मान देऊन, इंद्र लगेच बाहेर पडला आणि हात जोडून तो वज्रपाणि इंद्र तिला म्हणाला, " हे देवि, पाय ठेवण्याचे ठिकाणीं मस्तक ठेऊन निद्रित असल्यामुळे तूं अशुचि झालीस. तेव्हा, हें छिद्र पाहून मी संग्रामामध्ये इंद्राचा वध करणाऱ्या तुझ्या पुत्राचे सात तुकडे केले. तस्मात् याची तूं मला क्षमा कर." ( २०-२३ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी शेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥४६॥

गर्भाचे इंद्राने सात तुकडे केल्यावर दिति अत्यंत दुःखित झाली आणि सांत्वनपूर्वक अजिंक्य इंद्राला म्हणाली," हे देवाधिपते, हे बलदैत्यनाशका, माझ्या अपराधामुळे या गर्भाचे सात तुकडे झाले आहेत; यांत तुझा अपराध नाही. आता माझ्या गर्भाच्या नाशाकरिता तूं जें कृत्य केलेंस, तें उभयतांनाही प्रिय व्हावें, अशी माझी इच्छा आहे. करिता सात मरुद्गणांच्या स्थानांचे हे सात

मारुता इति विख्याता दिव्यरूपा ममात्मजाः ४
ब्रह्मलोकं चरत्वेक इन्द्रलोकं तथापरः ।
दिव्यवायुरिति ख्यातस्तृतीयोऽपि महायशाः ५
चत्वारस्तु सुरश्रेष्ठ दिशो वै तव शासनात् ।
संचरिष्यन्ति भद्रं ते कालेन हि ममात्मजाः ६
त्वत्कृतेनैव नाम्ना वै मारुता इति विश्रुताः ।
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा सहस्राक्षः पुरन्दरः ७
उवाच प्राञ्जलिर्वाक्यमितीदं बलसूदनः ।
सर्वमेतद्यथोक्तं ते भविष्यति न संशयः ८
विचरिष्यन्ति भद्रं ते देवरूपास्तवात्मजाः ।
एवं तौ निश्चयं कृत्वा मातापुत्रौ तपोवने ९
जग्मतुस्त्रिदिवं राम कृतार्थाविति नः श्रुतम् ।
एष देशः स काकुत्स्थ महेन्द्राध्युषितः पुरा १०

पुत्र रक्षण करणारे होवोत. हे पुत्रा, आकाशामध्ये जे सात वायुप्रवाह आहेत, त्यांचे ठिकाणीं मारुत म्हणून विख्यात असलेले हे माझे दिव्यरूपी पुत्र संचार करोत. हे महायशस्वी इंद्रा, माझ्या पुत्रांपैकी एक गण ब्रह्मलोकामध्ये संचार करो, दुसरा इंद्रलोकांत संचार करो, तिसरा दिव्य वायु म्हणून प्रसिद्ध असलेला स्वर्गामध्ये राहो आणि हे सुरश्रेष्ठा बाकीचे चार माझे पुत्रगण तुझ्या आज्ञेने चारी दिशांचे ठिकाणीं योग्य कालीं संचार करोत. तुझें कल्याण असो. ( १-६ )

( मा रुदः मा रुदः— म्हणजे रडूं नको, रडूं नको— असें ज्या अर्थी तूं म्हणाला आहेस, त्या अर्थी ) तूंच ठेविलेल्या नांवाने हे पुत्र मारुत म्हणून प्रसिद्ध होवोत." याप्रमाणे तिचें भाषण श्रवण केल्यावर सहस्रनयन बलदैत्य-नाशक इंद्र हात जोडून तिला म्हणाला, "तूं म्हटल्याप्रमाणे हें सर्व कांही होईल; यांत संशय नाही. तुझें कल्याण असो. तुझे देवरूप पुत्र तुझ्या म्हणण्याप्रमाणे संचार करतील." याप्रमाणे तपोवनामध्ये ठरवून तीं मायलेकरें हे रामा, कृतार्थ होऊन स्वर्गाला गेलीं, असें आमच्या ऐकण्यांत आहे. असो. हे काकुत्स्था, तोच हा देश असून, या ठिकाणीं पूर्वी महेंद्राने वास्तव्य केलें होतें. (७-१०)

( दितिं यत्र तपःसिद्धामेवं परिचचार सः ।
इक्ष्वाकोस्तु नरव्याघ्र पुत्रः परमधार्मिकः ११
अलम्बुषायामुत्पन्नो विशाल इति विश्रुतः ।
तेन चासीदिह स्थाने विशालेति पुरी कृता १२
विशालस्य सुतो राम हेमचन्द्रो महाबलः ।
सुचन्द्र इति विख्यातो हेमचन्द्रादनन्तरः १३
सुचन्द्रतनयो राम धूम्राश्व इति विश्रुतः ।
धूम्राश्वतनयश्चापि सृञ्जयः समपद्यत १४
सृञ्जयस्य सुतः श्रीमान्सहदेवः प्रतापवान् ।
कुशाश्वः सहदेवस्य पुत्रः परमधार्मिकः १५
कुशाश्वस्य महातेजाः सोमदत्तः प्रतापवान् ।
सोमदत्तस्य पुत्रस्तु काकुत्स्थ इति विश्रुतः १६
तस्य पुत्रो महातेजाः संप्रत्येष पुरीमिमाम् ।

तपश्चर्येच्या योगाने सिद्ध झालेल्या दितीची इंद्राने येणेप्रमाणे सेवा केली, ती याच ठिकाणीं. असो. ( हा प्रदेश कोणता, हें मी तुला सांगितलें; आता ही विशाला नगरी कोणी स्थापिली, तें सांगतों.) हे पुरुषश्रेष्ठा रामा, इक्ष्वाकूला अलंबुषेचे ठिकाणीं विशाल म्हणून प्रख्यात असलेला एक अत्यंत धार्मिक पुत्र झाला असून, त्याने या ठिकाणीं विशाला म्हणून नगरी स्थापन केली. हे रामा, विशालाला हेमचंद्र म्हणून एक महाबलाढ्य पुत्र झाला व पुढे त्या हेमचंद्रालाही सुचंद्र म्हणून विख्यात असलेला एक पुत्र झाला. हे रामा, धूम्राश्व म्हणून सुचंद्राचा पुत्र प्रसिद्ध आहे. त्या धूम्राश्वालाही सृंजय म्हणून एक पुत्र झाला. ( ११-१४ )

वैभवशाली व प्रतापी सहदेव हा सृंजयाचा पुत्र होय आणि अत्यंत धार्मिक कुशाश्व हा सहदेवाचा पुत्र होय. कुशाश्वाला महातेजस्वी व प्रतापी असा सोमदत्त म्हणून पुत्र झाला व त्या सोमदत्तालाही काकुत्स्थ म्हणून एक प्रख्यात पुत्र झाला. त्या काकुत्स्थाचा पुत्र हा महातेजस्वी सुमति सांप्रत या पुरीमध्ये वास्तव्य करीत आहे. हा फारच प्रख्यात असून, जिंकण्याला कठीण आहे. इक्ष्वाकूच्या

आवसत्परमप्रख्यः सुमतिर्नामदुर्जयः १७
इक्ष्वाकोस्तु प्रसादेन सर्वे वैशालिका नृपाः ।
दीर्घायुषो महात्मानो वीर्यवन्तः सुधार्मिकाः १८
इहाद्य रजनीमेकां सुखं स्वप्स्यामहे वयम् ।
श्वःप्रभाते नरश्रेष्ठ जनकं द्रष्टुमर्हसि १९
सुमतिस्तु महातेजा विश्वामित्रमुपागतम् ।
श्रुत्वा नरवरश्रेष्ठः प्रत्यागच्छन्महायशाः २०
पूजां च परमां कृत्वा सोपाध्यायः सबान्धवः ।
प्राञ्जलिः कुशलं पृष्ट्वा विश्वामित्रमथाब्रवीत् २१
धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे विषयं मुने ।
संप्राप्तो दर्शनं चैव नास्ति धन्यतरो मम २२

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ४७ [१४८४]

---

प्रसादाने विशाला नगरींतील सर्वही राजे दीर्घायुषी, महात्मे, वीर्यवान् व अत्यंत धार्मिक झालेले आहेत. असो. हे पुरुषश्रेष्ठा रामा, आज एक आपण या ठिकाणीं सुखाने शयन करूं. उद्या उजाडल्यावर तूं जनकाला अवलोकन करशील. याप्रमाणे उभयतांचें संभाषण चाललें असतां विश्वामित्रमुनि सांनिध आल्याचें श्रवण करून, तो महायशस्वी व महातेजस्वी नृपश्रेष्ठ सुमति त्यांना सामोरा आला. ( १५-२० )

आणि उपाध्याय व बांधव यांसहवर्तमान विश्वामित्रमुनींचें उत्कृष्ट प्रकारें पूजन करून कुशल प्रश्न केल्यावर तो हात जोडून विश्वामित्रांना म्हणाला, " हे मुने, मी धन्य आहें व माझ्यावर मोठाच अनुग्रह झालेला आहे; कारण माझ्या प्रदेशामध्ये आपण आलां आहां व मला आपल्या दर्शनाचाही लाभ झाला आहे. तस्मात्, माझ्यापेक्षा अधिक भाग्यवान् कोणीही नाही." × (२१-२२)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४७ ॥

---

× टीप– बालकण्ड सर्ग ४७, श्लोक २२ ( भाऊशास्त्री लेले यांचें भाषान्तर)

( टीप पुढे चालू )

**धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे विषयं मुने ।**
**संप्राप्तो दर्शनं चैव ' नास्ति धन्यतरो ' मम ॥ २१ ॥**

अर्थ– हे मुने, मी धन्य आहें व माझ्यावर मोठाच अनुग्रह झालेला आहे. कारण माझ्या प्रदेशामध्यें आपण आलां आहांत व मलाही आपल्या दर्शनाचा लाभ झाला आहे. तस्मात् " आपण माझ्यापेक्षा धन्य नाही. "

या श्लोकाच्या शेवटच्या चरणाचा " नासि धन्यतरो मम " हा पाठ चुकलेला आहे; पण लेले शास्त्रीबुवांनी तोच पाठ शुद्ध समजून, त्याला अनुसरून, " तस्मात् आपण माझ्यापेक्षा धन्य नाही. " असा अर्थ केला आहे. हा अर्थ नुसता चुकीचाच नव्हे, तर अत्यन्त हास्यास्पदही आहे; कारण जरी एखादा साधारण प्रतिष्ठित मनुष्य एखाद्या मोठ्या गृहस्थाच्या घरीं पाहुणा गेला, तर " आपल्या चरणस्पर्शानें माझें घर पवित्र झालें, आपल्या दर्शनाचा मला अलभ्य लाभ झाला," असें तो गृहस्थ त्यास मोठ्या विनयानें म्हणतो व आपल्यापेक्षा त्यास मोठेपणा देतो. मग, ( पूर्वी आपल्याचसारखा राजा असलेला ) विश्वामित्रासारखा महातपस्वी व ब्रह्मर्षि घरीं पाहुणा आला असतां, तो आपल्या घरीं आला, हा त्याचा आपल्यावर मोठा अनुग्रह झाला व त्याच्या दर्शनाचा आपणांस मोठा लाभ झाला, असें मानणाराच नव्हे, तर त्याला तें म्हणणारा सुमतीसारखा धर्मज्ञ व शिष्टाचार जाणणारा क्षत्रिय नरपति, त्याला ( विश्वामित्राला ) " आपण माझ्यापेक्षा धन्य नाही," असें म्हणेल, हें संभवनीय आहे काय ? मुळीच नाही !

वस्तुतः शुद्ध पाठ, " नास्ति धन्यतरो मम " असा आहे व त्याचा अर्थ– " माझ्यापेक्षा इतर कोणीही अधिक धन्य नाही, " असा आहे. म्हणजे " आपल्या दर्शनाचा लाभ झाल्याकारणानें, मी अत्यन्त धन्य झालों आहें, माझ्यापेक्षा इतर कोणीही " धन्यतर " म्हणजे अधिक भाग्यवान् नाही, " असा त्याच्या म्हणण्याचा खरा आशय आहे व त्याला अनुसरून मूळ श्लोक व भाषान्तर यांचें शुद्धीकरण केलें आहे.



ताटिका राक्षसीचा वध. ( बा. २६-२५ )

अष्टचत्वारिंशः सर्गः ।

पृष्ट्वा तु कुशलं तत्र परस्परसमागमे ।
कथान्ते सुमतिर्वाक्यं व्याजहार महामुनिम् १
इमौ कुमारौ भद्रं ते देवतुल्यपराक्रमौ ।
गजसिंहगती वीरौ शार्दूलवृषभोपमौ २
पद्मपत्रविशालाक्षौ खड्गतूणधनुर्धरौ ।
अश्विनाविव रूपेण समुपस्थितयौवनौ ३
यदृच्छयेव गां प्राप्तौ देवलोकादिवामरौ ।
कथं पद्भ्यामिह प्राप्तौ किमर्थं कस्य वा मुने ४
भूषयन्ताविमं देशं चन्द्रसूर्याविवाम्बरम् ।
परस्परेण सदृशौ प्रमाणेङ्गितचेष्टितैः ५
किमर्थं च नरश्रेष्ठौ संप्राप्तौ दुर्गमे पथि ।
वरायुधधरौ वीरौ श्रोतुमिच्छामि तत्त्वतः ६
तस्य तद्वचनं श्रुत्वा यथावृत्तं न्यवेदयत् ।

परस्परांची भेट झाल्यानंतर कुशलप्रश्न झाल्यावर संभाषण सुरू झालें असतां राजासुमति महामुनि विश्वामित्रांना म्हणाला, " आपलें देव बरें करो; हे पुत्र वीर, देवांसारखे पराक्रमी, गजाप्रमाणे धीर व सिंहाप्रमाणे अप्रतिहत गतीने युक्त असून, आकाराने अनुक्रमें व्याघ्र व वृषभ यांप्रमाणे दिसत आहेत. यांचे नेत्र कमलपत्राप्रमाणे विशाल असून, खड्ग, भाते व धनुष्य हीं यांनी धारण केलेलीं आहेत. रूपाने हे अश्विनीकुमारांप्रमाणे दिसत असून, यांना यौवनावस्था प्राप्त झाली आहे आणि प्रत्यक्ष देवच देवलोकापासून पृथ्वीवर प्राप्त झाल्याप्रमाणे हे दिसत आहेत. तेव्हा, या ठिकाणीं हे पायांनी कसे आले ? कशाकरिता आले? आणि हे मुने, हे कोणाचे पुत्र आहेत ? हें आपण मला सांगा. आकाशाला भूषित करणाऱ्या चंद्रसूर्यांप्रमाणे हे हा प्रदेश भूषित करीत आहेत आणि शरीर-मान, इंगित व चेष्टित यांच्या योगाने हे एकमेकांसारखे आहेत. तस्मात्, या दुर्गम मार्गामध्ये हे महाधनुर्धारी पुरुषश्रेष्ठ वीर कशाकरिता प्राप्त झाले आहेत ? हें खरें खरें ऐकण्याची माझी इच्छा आहे." ( १–६ )

विश्वामित्रवचः श्रुत्वा राजा परमविस्मितः ७
अतिथी परमं प्राप्तौ पुत्रौ दशरथस्य तौ ।
पूजयामास विधिवत्सत्कारार्हौ महाबलौ ८
ततः परमसत्कारं सुमतेः प्राप्य राघवौ ।
उष्य तत्र निशामेकां जग्मतुर्मिथिलां ततः ९
तां दृष्ट्वा मुनयः सर्वे जनकस्य पुरीं शुभाम् ।
साधु साध्विति शंसन्तो मिथिलां समपूजयन् १०
मिथिलोपवने तत्र आश्रमं दृश्य राघवः ।
पुराणं निर्जनं रम्यं पप्रच्छ मुनिपुङ्गवम् ११
इदमाश्रमसंकाशं किं न्विदं मुनिवर्जितम् ।
श्रोतुमिच्छामि भगवन्कस्यायं पूर्व आश्रमः १२
तच्छ्रुत्वा राघवेणोक्तं वाक्यं वाक्यविशारदः ।
प्रत्युवाच महातेजा विश्वामित्रो महामुनिः १३
हन्त ते कथयिष्यामि शृणु तत्त्वेन राघवः ।

---

हें त्या सुमति राजाचें भाषण श्रवण केल्यावर विश्वामित्रमुनींनी त्याला इत्थंभूत वर्तमान निवेदन केलें; तेव्हा विश्वामित्राचें भाषण श्रवण करून राजा पराकाष्ठेचा विस्मित झाला आणि अत्यंत सत्कारास पात्र अशा त्या अतिथि म्हणून प्राप्त झालेल्या महाबलाढ्य दशरथपुत्रांचें त्यानें यथाविधि आदरातिथ्य केलें. तदनंतर सुमतीनें केलेल्या त्या उत्कृष्ट प्रकारच्या आदरातिथ्याचा स्वीकार करून, एक रात्रभर ते रघुवंशज रामलक्ष्मण तेथेंच राहिले आणि नंतर मिथिला नगरीला निघाले. पुढे जनकाची ती शुभ नगरी अवलोकन केल्यावर "उत्तम उत्तम" म्हणून सर्व मुनींनी मिथिलेची प्रशंसा केली. तदनंतर मिथिला नगरीसमीप असलेल्या वनामध्यें जुनाट, निर्जन परंतु रम्य असा एक आश्रम अवलोकन करून, रघुवंशज राम मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हणाला, "मुनिरहित असें हें आश्रमासारखें काय दिसत आहे? हे भगवन्, हा पूर्वीचा कोणाचा आश्रम होता, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे." हें रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर संभाषण करण्यामध्यें प्रवीण असलेले महातेजस्वी विश्वामित्रमहामुनि म्हणाले. (७–१३)

यस्यैतदाश्रमपदं शप्तं कोपान्महात्मनः १४
गौतमस्य नरश्रेष्ठ पूर्वमासीन्महात्मनः ।
आश्रमो दिव्यसंकाशः सुरैरपि सुपूजितः १५
स चात्र तप आतिष्ठदहल्यासहितः पुरा ।
वर्षपूगान्यनेकानि राजपुत्र महायशाः १६
तस्यान्तरं विदित्वा च सहस्राक्षः शचीपतिः ।
मुनिवेषधरो भूत्वा अहल्यामिदमब्रवीत् १७
ऋतुकालं प्रतीक्षन्ते नार्थिनः सुसमाहिते ।
संगमं त्वहमिच्छामि त्वया सह सुमध्यमे १८
मुनिवेषं सहस्राक्षं विज्ञाय रघुनन्दन ।
मतिं चकार दुर्मेधा देवराजकुतूहलात् १९
अथाब्रवीत्सुरश्रेष्ठं कृतार्थेनान्तरात्मना ।

---

"हे रघुवंशजा रामा, कोणत्या महात्म्याच्या कोपामुळे या आश्रमाला शाप झाला आहे, तें मी तुला खरें खरें सांगतों; तूं श्रवण कर. हे पुरुषश्रेष्ठा रामा, स्वर्गांतील आश्रमाप्रमाणे असलेला व देवांनाही पूज्य असा हा आश्रम पूर्वी महात्म्या गौतममुनींचा होता. हे महायशस्वी राजकुमारा रामा, पूर्वी त्या गौतम-मुनींनी अहल्येसहवर्तमान या ठिकाणीं अनेक संवत्सरसमूहपर्यंत तपश्चर्या केली. एकदा गौतममुनि आश्रमांत नाहीत, अशी संधि पाहून सहस्रनयन शचीपति गौतम मुनींचा वेष घेऊन ( आश्रमांत आला आणि ) अहल्येला असें म्हणाला (१४-१७) हे अत्यंत सुंदरि, हे कृशोदरि, रतिसुखाची इच्छा करणारे लोक ऋतुकालाची वाट पहात नसतात. तुझ्याशीं समागम करावा, अशी माझी इच्छा आहे." हे रघुनंदना रामा, गौतममुनींचा वेष धारण करून आलेला हा सहस्राक्ष इन्द्र आहे, हें जाणूनही, प्रत्यक्ष देवराज इन्द्रही आपल्या सौंदर्यावर लुब्ध होऊन आला आहे, याचें तिला मोठें कौतुक वाटून व देवांच्या समागमाचें सुख कसें असतें, हें पहावें, म्हणून त्या दुर्मति स्त्रीने त्याच्याशीं रममाण होण्याचें मनांत आणिलें. ( समागम झाल्या ) नंतर प्रसन्न मनानें ती त्या सुरश्रेष्ठ इंद्राला म्हणाली, "हे प्रभो सुरश्रेष्ठा, मी कृतकृत्य झालें: आता आपण येथून सत्वर जा. आणि गौतम-

कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ गच्छ शीघ्रमितः प्रभो २०
आत्मानं मां च देवेश सर्वथा रक्ष गौतमात् ।
इन्द्रस्तु प्रहसन्वाक्यमहल्यामिदमब्रवीत् २१
सुश्रोणि परितुष्टोऽस्मि गमिष्यामि यथागतम् ।
एवं संगम्य तु तदा निश्चक्रामोटजात्ततः २२
ससंभ्रमात्त्वरन्राम शङ्कितो गौतमं प्रति ।
गौतमं स ददर्शाथ प्रविशन्तं महामुनिम् २३
देवदानवदुर्धर्षं तपोबलसमन्वितम् ।
तीर्थोदकपरिक्लिन्नं दीप्यमानमिवानलम् २४
गृहीतसामिधं तत्र सकुशं मुनिपुङ्गवम् ।
दृष्ट्वा सुरपतिस्त्रस्तो विषण्णवदनोऽभवत् २५
अथ दृष्ट्वा सहस्राक्षं मुनिवेषधरं मुनिः ।
दुर्वृत्तं वृत्तसंपन्नो रोषाद्वचनमब्रवीत् २६
मम रूपं समास्थाय कृतवानसि दुर्मते ।
अकर्तव्यमिदं यस्माद्विफलस्त्वं भविष्यसि २७

---

मुनीपासून आपण स्वतःचें व माझें सर्व प्रकारें रक्षण करा." यावर "हे सुंदरि, मी संतुष्ट झालों आहें; आता मी आल्या मार्गानें परत जातों" असें इंद्र हसत हसत अहल्येला म्हणाला आणि याप्रमाणें अहल्येशीं समागम केल्यावर तो त्या पर्णकुटिकेंतून बाहेर पडला. (१८–२२)

हे रामा, गौतममुनींची मनांत भीति बाळगून तो लगबगीनें जात आहे तोंच महामुनि गौतम आश्रमांत प्रविष्ट होतांना त्याच्या दृष्टी पडले. देवदैत्यानांही दुर्धर्ष, तपःसामर्थ्यानें युक्त आणि अग्नीप्रमाणें देदीप्यमान असे मुनिश्रेष्ठ गौतम तीर्थोदकामध्ये स्नान करून आणि समिधा व दर्भ घेऊन आल्याचें अवलोकन केल्याबरोबर भयभीत झालेल्या देवराज इंद्राचें मुख अगदी म्लान झालें. असो. आश्रमांत प्रविष्ट होतांना आपला वेष धारण करणाऱ्या दुराचारी इंद्राला पाहून सदाचारसंपन्न गौतममुनि क्रोधानें त्याला म्हणाले, "हे दुर्बुद्धे, माझा वेष धारण करून ज्या अर्थी तूं हें निंद्य कृत्य केलें आहेस त्या अर्थी

गौतमेनैवमुक्तस्य सरोषेण महात्मना ।
पेततुर्वृषणौ भूमौ सहस्राक्षस्य तत्क्षणात् २८
तथा शप्त्वा च वै शक्रं भार्यामपि च शप्तवान् ।
इह वर्षसहस्राणि बहूनि निवसिष्यसि २९
वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी ।
अदृश्या सर्वभूतानामाश्रमेऽस्मिन्वसिष्यसि ३०
यदा त्वेतद्वनं घोरं रामो दशरथात्मजः ।
आगमिष्यति दुर्धर्षस्तदा पूता भविष्यसि ३१
तस्यातिथ्येन दुर्वृत्ते लोभमोहविवर्जिता ।
मत्सकाशं मुदा युक्ता स्वं वपुर्धारयिष्यसि ३२
एवमुक्त्वा महातेजा गौतमो दुष्टचारिणीम् ।
इममाश्रममुत्सृज्य सिद्धचारणसेविते ।
हिमवच्छिखरे रम्ये तपस्तेपे महातपाः ३३

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ४८ [१५१७]

वृषणरहित होशील." (२३–२७)

याप्रमाणे अत्यंत क्रोधयुक्त झालेल्या महात्म्या गौतमांनी इंद्राला म्हटल्याबरोबर त्याचें वृषण तत्क्षणीं भूमीवर गळून पडलें. याप्रमाणे इंद्राला शाप दिल्यावर गौतममुनींनी आपल्या भार्येलाही शाप दिला की, "इतर कसल्याही प्रकारचा आहार न करिता केवळ वायुभक्षण करून व भस्मांत पडून राहून आपल्या कृतकर्माचा पश्चाताप करीत तूं हजारो वर्षें या ठिकाणींच वास्तव्य कर, व कोणत्याही प्राण्याच्या दृष्टीस न पडतां (कोणासही तोंड न दाखवितां,) तूं येथेच आश्रमामध्ये पडून रहा. दशरथपुत्र दुर्धर्ष राम जेव्हा या घोर वनांमध्ये येईल, तेव्हा हे दुराचारिणी, लोभमोहरहित बनलेली अशी तूं त्याच्या आदरातिथ्याने शुद्ध होशील आणि आनन्दाने माझ्या समीप प्राप्त झाली असतां पूर्ववत् सर्वांच्या दृष्टीस पडण्यायोग्य होशील. याप्रमाणे आपल्या दुराचारिणी भार्येला सांगितल्यावर ते महातेजस्वी व महातपस्वी गौतममुनी हा आश्रम सोडून सिद्धचारणांनी सेवित अशा हिमालयपर्वताच्या रम्य शिखरावर तपश्चर्या करूं लागले. (२८–३३)

एकोनपञ्चाशः सर्गः ।

**अफलस्तु ततः शक्रो देवानग्निपुरोगमान् ।**
**अब्रवीत्त्रस्तनयनः सिद्धगन्धर्वचारणान् ×** १
**कुर्वता तपसो विघ्नं गौतमस्य महात्मनः ।**

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४८ ॥

तदनंतर वृषणरहित झालेला इंद्र भयभीत अशा मुद्रेने सिद्ध, गंधर्व, चारण व अग्निप्रभृति देवांना म्हणाला, ''महात्म्या गौतमाच्या तपामध्यें विघ्न यावें, एतदर्थ

× टीप– बालकाण्ड सर्ग ४९ श्लोक १–९ पर्यन्तच्या वर्णनावरून, भारतीय आर्यांचें शस्त्रक्रियेचें ज्ञान किती उच्च कोटीला पोहोचलें होतें, हें ध्यानीं येईल—

इन्द्राचे अण्डकोश गौतमाच्या शापानें गळून पडले असतां, पितृदेवांनी त्याच्या अण्डकोशाचे जागीं मेषाचे अण्डकोश बसविले व त्यास पुनरपि पुरुषत्व प्राप्त करून दिलें.

वर्तमानकालींही, वानरादिकांच्या अण्डकोशांतील ग्रन्थी पुरुषाच्या अण्डकोशांत प्रविष्ट करून, त्याला पुनः पुरुषत्व व तारुण्य प्राप्त करून देण्याची क्रिया कांहीं डॉक्टर लोकांनी अगदि नवीन शोधून काढली आहे म्हणतात. त्यांनी ती नवीन शोधून काढली असेल, याबद्दल वाद नाहीं; पण, आपल्या भारतीय आर्यांना ही शस्त्रक्रिया फार प्राचीन कालीं अवगत होती, हें या इतिहासावरून सिद्ध आहे.

आधुनिक युरोपियन डॉक्टर लोक हे, पुरुषांचें अण्डकोश अस्तित्वांत असले, तरच त्यांत वानरादिक प्राण्याच्या अण्डकोशांतील ग्रन्थी प्रविष्ट करूं शकतात, पण मुळीं अण्डकोशच नसले तर काय करतात, तें अद्यापि प्रसिद्धीस आलें नाहीं.

इन्द्राचें मुळांत वृषणच गळून पडलें होतें. त्या ठिकाणी मेषाचें सबंध वृषणच उपटून बसविलें आहे. यावरून, भारतीय आर्यांचें शस्त्रक्रियेचें ज्ञान किती उच्च कोटीला पोहोचलें होतें, हें लक्ष्यांत येईल.

याहीपेक्षा उच्च कोटीच्या शस्त्रक्रियेचीं उदाहरणें ऋग्वेदांत व पुराणान्तरीं आढळतात. अर्थात् भारतीय आर्यांची शस्त्रक्रिया ऋग्वेदकालाइतकी जुनी आहे, हें निर्विवादपणें सिद्ध आहे.

क्रोधमुत्पाद्य हि मया सुरकार्यमिदं कृतम् २
अफलोऽस्मि कृतस्तेन क्रोधात्सा च निराकृता ।
शापमोक्षेण महता तपोऽस्यापहृतं मया ३
तन्मां सुरवराः सर्वे सर्षिसंघाः सचारणाः ।
सुरकार्यकरं यूयं सफलं कर्तुमर्हथ ४
शतक्रतोर्वचः श्रुत्वा देवाः साग्निपुरोगमाः ।
पितृदेवानुपेत्याहुः सर्वे सह मरुद्गणैः ५
अयं मेषः सवृषणः शक्रो ह्यवृषणः कृतः ।
मेषस्य वृषणौ गृह्य शक्रायाशु प्रयच्छत ६
अफलस्तु कृतो मेषः परां तुष्टिं प्रदास्यति ।
भवतां हर्षणार्थं च ये च दास्यन्ति मानवाः ७
अक्षयं हि फलं तेषां यूयं दास्यथ पुष्कलम् ।
अग्नेस्तु वचनं श्रुत्वा पितृदेवाः समागताः ८
उत्पाट्य मेषवृषणौ सहस्राक्षे न्यवेशयन् ।

---

त्याला क्रोध आणून मीं हें देवकार्य केलें आहे. ( नाहीं तर उग्र तपश्चर्येच्या योगानें त्यानें सर्व देव स्थानभ्रष्ट करून टाकिले असते. ) क्रोधामुळें त्यानें मला निष्फल करून टाकून तिचाही शापपूर्वक त्याग केला आहे व अशा रीतीनें त्याला मोठा शाप देण्याला लावून मीं त्याचें तप हरण केलें आहे. तस्मात्, ऋषिसमुदाय व चारण यांसहवर्तमान हे सर्व सुरश्रेष्ठ हो, मज देवकार्य करणाऱ्याला तुम्ही वृषणयुक्त करा. " याप्रमाणे इंद्राचें भाषण श्रवण केल्यावर अग्निप्रभृति सर्व देव मरुद्गणांसहवर्तमान ( कव्यवाहनप्रभृति ) पितृदेवांकडे जाऊन म्हणाले. ( १–५ )

" हा मेष वृषणयुक्त आहे आणि गौतमानें इंद्राला वृषणरहित केलें आहे. करिता, मेषाचें वृषण घेऊन तुम्ही सत्वर इंद्राला द्या. ( तुमचें हविर्द्रव्य म्हणून कल्पिलेल्या ) वृषणरहित मेषाच्या योगानें तुम्हांला पराकाष्ठेचा संतोष होईल. तुमच्या संतोषाकरिता जे मानव तुम्हांला वृषणरहित मेष अर्पण करतील त्यांनाही तुम्ही मोठें अक्षय फल द्या. " हें अग्नीचें भाषण श्रवण केल्यावर पितृदेव एकत्र जुळले व मेषाचें वृषण उपटून त्यांनी इंद्राचे ठिकाणीं लाविलें. तेव्हापासून, हे

तदाप्रभृति काकुत्स्थ पितृदेवाः समागताः ९
अफलान्भुञ्जते मेषान्फलैस्तेषामयोजयन् ।
इन्द्रस्तु मेषवृषणस्तदाप्रभृति राघव १०
गौतमस्य प्रभावेण तपसा च महात्मनः ।
तदागच्छ महातेज आश्रमं पुण्यकर्मणः ११
तारयैनां महाभागामहल्यां देवरूपिणीम् ।
विश्वामित्रवचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः × १२

ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, पितृदेव एकत्र होऊन वृषणरहित मेषांचा स्वीकार करीत असतात; कारण, त्यांचें वृषण काढून यांनी इंद्राला दिलें. हे राघवा, महात्म्या गौतमाच्या प्रभावाने व तपाने तेव्हापासून इंद्र मेषवृषण बनला. ( ६–१० )

करिता, " हे महातेजस्वी रामा, पुण्यकर्मी गौतमाच्या आश्रमामध्ये चल आणि देवरूप धारण करणाऱ्या या अहल्येचा उद्धार कर. " हें विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण केल्यावर रघुवंशज रामाने विश्वामित्रांना पुढे घालून, लक्ष्मणासहवर्तमान त्या आश्रमामध्ये प्रवेश केला व तपाच्या योगाने जिची प्रभा चोहोकडे फाकली

× टीप– सर्ग ४९, श्लोक १२ पासून १८ पर्यंत अहल्या गौतमशापाने शिळा होऊन पडली होती व श्रीरामाने त्या शिळेला पादस्पर्श केल्याबरोबर तिला पुनः पूर्ववत् मनुष्यरूप प्राप्त झालें, अशी सर्वत्र प्रसिद्धि आहे. पण या गोष्टीला वाल्मीकिरामायणामध्ये आधार नाही. ती मिथ्या आहे व श्रीरामचन्द्राच्या मर्यादापुरुषोत्तमत्वाच्या कीर्तीला बाध आणणारी आहे, हें पुढील विवेचनावरून ध्यानीं येईल–

सर्ग ४८, श्लोक २९ ते ३२ पर्यन्त गौतमाचें शापवचन आहे. त्यांत, " कोणाच्याही दृष्टीस न पडतां ( कोणासही मुख न दाखवितां ) या आश्रमामध्ये दाशरथी राम येथे येईपर्यन्त–तप–करीत रहा. " असा उल्लेख आहे. " शिळा होऊन पड, " असा उल्लेख मुळीच नाही. अर्थात् अहल्या शिळा झाली होती, हा प्रवाद खोटा आहे आणि ज्या अर्थी अहल्या शिळा झालीच नाही, त्या अर्थी " अहल्या शिळा झाली व त्या शिळेला श्रीरामाने पादस्पर्श केल्याबरोबर त्या शिळेची पुनः अहल्या झाली. " हा प्रवादही सुतरां खोटा आहे, हें या सर्गातील श्लोक १२

**विश्वामित्रं पुरस्कृत्य आश्रमं प्रविवेश ह ।**
**ददर्श च महाभागां तपसा द्योतितप्रभाम्** १३

आहे अशी आणि देव, दैत्य व मानव हे सर्वही मिळून आले असतांदेखील जिचें

( टीप पुढे चालू )

ते १८ पर्यंतमधील वाल्मीकि ऋषींचे उक्तीवरून सूर्यप्रकाशाइत कें स्पष्ट आहे.

विश्वामित्राच्या म्हणण्यावरून, श्रीराम लक्ष्मणासह, विश्वामित्राला पुढे घालून त्यांच्या मागोमाग आश्रमाकडे गेले व आश्रमाचे दारांत पाऊल ठेवल्याबरोबर आंतल्या अंगास समोर बसलेली अहल्या त्यांना दिसली. ती ( रामचन्द्र दारांतच असतांना ) कशी दिसली, याचें वर्णन श्लोक १३–१४–१५ व १६ यांमध्ये केलें आहे व याप्रमाणे ती दिसल्याबरोबर राम व लक्ष्मण यांनी जवळ जाऊन तिच्या पायावर आपलें मस्तक ठेवलें व तिनेही त्या दोघांही बंधूंना आदराने आपल्या- पाशी बसवून घेतलें, असा १८ व्या श्लोकांत स्पष्ट उल्लेख आहे. म्हणजे काय ? की आश्रमाच्या द्वारांत प्रवेश केल्याबरोबर प्रथम अहल्या राम व लक्ष्मण यांच्या दृष्टीस पडली व राम व लक्ष्मण यांनी प्रथम तिच्या पायावर डोकें ठेवलें, असा स्पष्ट उल्लेख आहे. " रामाने शिळेला पाय लावला व मग त्या शिळेची अहल्या झाली व तिने श्रीरामाच्या पायावर डोकें ठेवलें." हा प्रवाद वाल्मीकीच्या वर्णना- विरुद्ध असल्याकारणाने अगदीं खोटा आहे.

प्रभु रामचन्द्र हे ईश्वराचे अवतार. ईश्वराचे अवतार जे होतात ते धर्म व नीतीच्या मार्गावरून घसरलेल्या जनतेला धर्म व नीति यांचें शिक्षण देऊन, तिला पुनः त्या मार्गावर चालावयास लावण्यासाठी होतात व ते स्वतः आधी आचरण करून दाखवून जनतेला कित्ता घालून देतात. "**मर्त्यावतारो भुवि मर्त्यशिक्षणम् । रक्षोवधायैव न केवलं विभोः ।** (श्रीमद्भागवत । याच न्यायाने, श्रीरामचन्द्राचा- ही अवतार आम्हांला धर्म व नीतीचें शिक्षण देणेस्तव झाला. तेव्हा आता प्रश्न हा उत्पन्न होतो की, अहल्या ही प्रत्यक्ष ब्रह्मदेवाची मानसी कन्या आणि गौतमासारख्या ब्रह्मर्षीची पत्नी, ब्राह्मणस्त्री. ती केवढीही पातकी व पतित झाली असली, म्हणून, मर्यादापुरुषोत्तम, श्रौताचार संपन्न, क्षत्रियकुमार रामचन्द्र तिला पादस्पर्श करून स्वतः धर्माची मर्यादा उल्लंघन करील हें शक्य आहे काय ? केव्हांही शक्य नाहीं.

लोकैरपि समागम्य दुर्निरीक्ष्यां सुरासुरैः।
प्रयत्नान्निर्मितां धात्रा दिव्यां मायामयीमिव १४
धूमेनाभिपरीताङ्गीं दीप्तामग्निशिखामिव।
सतुषारावृतां साभ्रां पूर्णचन्द्रप्रभामिव १५
मध्येऽम्भसो दुराधर्षां दीप्तां सूर्यप्रभामिव।
सा हि गौतमवाक्येन दुर्निरीक्ष्या बभूव ह १६
त्रयाणामपि लोकानां यावद्रामस्य दर्शनम्।
शापस्यान्तमुपागम्य तेषां दर्शनमागता १७
राघवौ तु तदा तस्याः पादौ जगृहतुर्मुदा।
स्मरन्ती गौतमवचः प्रतिजग्राह सा हि तौ १८
पाद्यमर्घ्यं तथातिथ्यं चकार सुसमाहिता।
प्रतिजग्राह काकुत्स्थो विधिदृष्टेन कर्मणा १९
पुष्पवृष्टिर्महत्यासीद्देवदुन्दुभिनिःस्वनैः।
गन्धर्वाप्सरसां चैव महानासीत्समुत्सवः २०

---

दर्शन होणें दुर्घट होतें, अशी ती महा भाग्यवती अहल्या त्याने अवलोकन केली. जणू काय ब्रह्मदेवाने मोठ्या प्रयत्नाने निर्माण केलेली दिव्य मायाच, किंवा धूमाने व्याप्त असलेली प्रदीप्त अग्निज्वालाच, किंवा तुषारांनी व्याप्त व अभ्रयुक्त अशी पूर्णचन्द्राची प्रभाच, अथवा मेघामध्ये असलेली उज्ज्वल सूर्यप्रभाच कीं काय अशी ती दिसत होती. असो. गौतममुनींच्या आज्ञेनुसार रामदर्शन होईपर्यंत त्रैलोक्यामध्ये कोणाच्याही दृष्टीस ती पडली नाही. ती आता ( रामदर्शनाने ) शापमुक्त होण्याचा समय प्राप्त झाल्याकारणाने त्या तिघांच्या दृष्टीस पडली. ती दृष्टीस पडल्याबरोबर रघुवंशज रामलक्ष्मणांनी आनंदाने तिच्या पायावर मस्तक ठेवलें असतां, गौतममुनींच्या वचनाचें स्मरण येऊन, तिनेही त्यांना आदरपूर्वक आपल्याजवळ बसवून घेतलें आणि स्वस्थ अंतःकरणाने तिने यथाविधि पाद्य, अर्घ्य इत्यादींपूर्वक त्यांचें आतिथ्य केलें असतां, ककुत्स्थकुलोत्पन्न रामानेही ( लक्ष्मणासहवर्तमान ) त्याचा स्वीकार केला. ( ११–१९ )

तेव्हा देवदुदुंभीच्या गर्जनासहवर्तमान रामावर व अहल्येवर मोठी पुष्पवृष्टि

साधु साध्विति देवास्तामहल्यां समपूजयन् ।
तपोबलविशुद्धाङ्गीं गौतमस्य वशानुगाम् ॥ २१
गौतमोऽपि महातेजा अहल्यासहितः सुखी ।
रामं संपूज्य विधिवत्तपस्तेपे महातपाः ॥ २२
रामोऽपि परमां पूजां गौतमस्य महामुनेः ।
सकाशाद्विधिवत्प्राप्य जगाम मिथिलां ततः ॥ २३

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकोनपञ्चाशः सर्गः ४९ [१५४०]

पञ्चाशः सर्गः ।

ततः प्रागुत्तरां गत्वा रामः सौमित्रिणा सह ।
विश्वामित्रं पुरस्कृत्य यज्ञवाटमुपागमत् ॥ १
रामस्तु मुनिशार्दूलमुवाच सहलक्ष्मणः ।
साध्वी यज्ञसमृद्धिर्हि जनकस्य महात्मनः ॥ २
बहूनीह सहस्राणि नानादेशनिवासिनाम् ।
ब्राह्मणानां महाभाग वेदाध्ययनशालिनाम् ॥ ३
ऋषिवाटाश्च दृश्यन्ते शकटीशतसंकुलाः ।

---

झाली; गंधर्व व अप्सरा यामध्येंही मोठा उत्सव झाला आणि गौतममुनींच्या आज्ञेनुसार वागून तपोबलानें शरीरशुद्धि झालेल्या त्या अहल्येची " उत्तम, उत्तम " म्हणून देवांनी ही प्रशंसा केली. तदनंतर ते महातपस्वी व महातेजस्वी गौतममुनीं श्रीरामाचें यथाविधि पूजन करून बहुत आनंद पावले व अहल्ये-सहवर्तमान पुनः त्याच आश्रमांत तप करूं लागले. आणि रामही महामुनि गौतमांच्या उत्कृष्ट पूजेचा स्वीकार करून मिथिला नगरीस चालता झाला. २०-२३

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग, समाप्त झाला ॥ ४९ ॥

तदनंतर विश्वामित्रमुनींना पुढे करून लक्ष्मणासहवर्तमान राम गौतमाश्रमा-पासून ईशान्येस गेल्यावर यज्ञमण्डपाचे मार्गास लागला. आणि लक्ष्मणासहवर्तमान त्या मुनिश्रेष्ठांना म्हणाला, " महात्म्या जनकाची यज्ञसंपत्ती चांगलीच दिसत आहे. कारण, हे महाभाग्यवान् मुने, वेदाध्ययनाविषयी तत्पर असलेले देशो-

देशो विधीयतां ब्रह्मन्यत्र वत्स्यामहे वयम् ४
रामस्य वचनं श्रुत्वा विश्वामित्रो महामुनिः ।
निवासमकरोद्देशे विविक्ते सलिलान्विते ५
विश्वामित्रमनुप्राप्तं श्रुत्वा नृपवरस्तदा ।
शतानन्दं पुरस्कृत्य पुरोहितमनिन्दितः ६
ऋत्विजोऽपि महात्मानस्त्वर्घ्यमादाय सत्वरम् ।
प्रत्युज्जगाम सहसा विनयेन समन्वितः ७
विश्वामित्राय धर्मेण ददौ धर्मपुरस्कृतम् ।
प्रतिगृह्य तु तां पूजां जनकस्य महात्मनः ८
पप्रच्छ कुशलं राज्ञो यज्ञस्य च निरामयम् ।
स तांश्चाथ मुनीन्पृष्ट्वा सोपाध्यायपुरोधसः ९
यथार्हमृषिभिः सर्वैः समागच्छत्प्रहृष्टवत् ।
अथ राजा मुनिश्रेष्ठं कृताञ्जलिरभाषत १०
आसने भगवानास्तां सहैभिर्मुनिपुङ्गवैः ।

---

देशचे हजारो ब्राह्मण व शेकडों शकटांनी गजबजून गेलेलीं ऋषींचीं वसतिस्थानें या ठिकाणीं दिसत आहेत. करिता, हे ब्रह्मर्षे आता कोणती ती जागा ठरवा; म्हणजे आपण त्या ठिकाणीं उतरूं. " हें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर महामुनि विश्वामित्रांनी उदकानें युक्त व एकान्त अशा प्रदेशावर वास्तव्य करण्याचें ठरविलें. ( १–५ )

इकडे विश्वामित्र आल्याचें ऐकतांक्षणीं अनिंदित असा नृपश्रेष्ठ जनक शतानंदनामक पुरोहिताला व महात्म्या ऋत्विजांना पुढे करून, सत्वर पूजासाहित्य घेऊन आणि विनययुक्त होऊन एकदम त्यांना सामोरा गेला व धर्मबुद्धीने त्यानें तें पूजासाहित्य विश्वामित्रांना अर्पण केलें. तेव्हां महात्म्या जनकाच्या त्या पूजेचा स्वीकार करून स्वतः राजाविषयीं व यज्ञाविषयीं त्यांनी त्याला कुशल वर्तमान विचारिलें, नंतर उपाध्याय व पुरोहित यांसहवर्तमान ( जनकाबरोबर आलेल्या ) त्या सर्व मुनींना कुशलप्रश्न विचारल्यावर योग्यतेप्रमाणे सर्व ऋषींची विश्वामित्रांनी आनंदानें भेट घेतली. नंतर " भगवानांनी आसनावर बसावें, " म्हणून जनक राजानें हात जोडून

जनकस्य वचः श्रुत्वा निषसाद महामुनिः ११
पुरोधा ऋत्विजश्चैव राजा च सह मन्त्रिभिः ।
आसनेषु यथान्यायमुपविष्टाः समन्ततः १२
दृष्ट्वा स नृपतिस्तत्र विश्वामित्रमथाब्रवीत् ।
अद्य यज्ञसमृद्धिर्मे सफला दैवतैः कृता १३
अद्य यज्ञफलं प्राप्तं भगवद्दर्शनान्मया ।
धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे मुनिपुङ्गव १४
यज्ञोपसदने ब्रह्मन्प्राप्तोऽसि मुनिभिः सह ।
द्वादशाहं तु ब्रह्मर्षे दीक्षामाहुर्मनीषिणः १५
ततो भागार्थिनो देवान्द्रष्टुमर्हसि कौशिक ।
इत्युक्त्वा मुनिशार्दूलं प्रहृष्टवचनस्तदा १६
पुनस्तं परिपप्रच्छ प्राञ्जलिः प्रयतो नृपः ।
इमौ कुमारौ भद्रं ते देवतुल्यपराक्रमौ १७
गजतुल्यगती वीरौ शार्दूलवृषभोपमौ ।

---

मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांची प्रार्थना केली असतां राजाचें म्हणणें ऐकून महामुनि विश्वामित्र ( आसनावर ) बसले व ते बसल्यावर पुरोहित, ऋत्विज आणि मंत्र्यांसहवर्तमान जनक राजा हेही योग्यतेप्रमाणे त्यांच्याभोवती बसले. ( ६–१२ )

नंतर विश्वामित्रांकडे पाहून तो जनक राजा म्हणाला, " देवांनी आज माझ्या यज्ञसंपत्तीचें सार्थक केलें. आपल्या दर्शनानें आज मला यज्ञफल प्राप्त झालें. खरोखर मी धन्य असून, देवतांचा माझ्यावर अनुग्रह झालेला आहे; कारण हे मुनिश्रेष्ठ, माझ्या यज्ञमंडपामध्ये आज आपण मुनींसहवर्तमान प्राप्त झाला आहां. हे ब्रह्मर्षे, यज्ञदीक्षेचे बारा दिवस अवशिष्ट राहिले आहेत, असें विद्वान् ऋत्विज म्हणतात. तेव्हा हे कौशिकमुने, हविर्भागाची इच्छा करणारे देव आपण त्यानंतर ( या यज्ञामध्ये ) अवलोकन कराल." याप्रमाणे प्रसन्न मुद्रेने युक्त झालेल्या जनकराजाने मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हटलें. ( १३–१६ )

आणि नंतर हात जोडून त्या जितेंद्रिय राजाने पुनरपि त्यांना विचारलें, " आपलें देव बरें करो, हे पुत्र देवांसारिखे पराक्रमी वीर, गजाप्रमाणे धीर व

अश्विनाविव रूपेण समुपस्थितयौवनौ १८
यदृच्छयेव गां प्राप्तौ देवलोकादिवामरौ ।
कथं पद्भ्यामिह प्राप्तौ किमर्थं कस्य वा मुने १९
वरायुधधरौ वीरौ कस्य पुत्रौ महामुने ।
भूषयन्ताविमं देशं चन्द्रसूर्याविवाम्बरम् २०
परस्परस्य सदृशौ प्रमाणेङ्गितचेष्टितैः ।
काकपक्षधरौ वीरौ श्रोतुमिच्छामि तत्त्वतः २१
तस्य तद्वचनं श्रुत्वा जनकस्य महात्मनः ।
न्यवेदयदमेयात्मा पुत्रौ दशरथस्य तौ २२
सिद्धाश्रमनिवासं च राक्षसानां वधं तथा ।
तत्रागमनमव्यग्रं विशालायाश्च दर्शनम् २३
अहल्यादर्शनं चैव गौतमेन समागमम् ।
महाधनुषि जिज्ञासां कर्तुमागमनं तथा २४

सिंहाप्रमाणे अप्रतिहत–गतीने युक्त असून आकाराने अनुक्रमें व्याघ्र व वृषभ यांप्रमाणे दिसत आहेत. रूपाने हे अश्विनीकुमारांप्रमाणे दिसत असून, यांना यौवनावस्था प्राप्त झाली आहे आणि प्रत्यक्ष देवच देवलोकापासून पृथ्वीवर सहजासहजीं प्राप्त झाल्याप्रमाणे हे दिसत आहेत. तेव्हा या ठिकाणीं हे पायींपायींच कसे आले ? कशाकरिता आले ? आणि हे मुने, हे कोणाचे पुत्र आहेत ? हें आपण मला सांगा. ( १७–१९ )

आकाशाला शोभा आणणाऱ्या चंद्रसूर्यांप्रमाणे या प्रदेशाला शोभा आणणारे आणि उत्कृष्ट आयुधें धारण करणारे हे वीर पुत्र, हे महामुने, कोणाचे आहेत ? शरीरमान, इंगित व चेष्टित यांमध्ये एकमेकांसारिखे व मस्तकावर झुलपें असलेले असे जे हे वीर यांची खरी खरी हकीकत ऐकण्याची माझी इच्छा आहे.” हें त्या महात्म्या जनकराजाचें भाषण श्रवण केल्यावर महात्म्या विश्वामित्रमुनींनी त्या दशरथपुत्रांची हकीकत त्याला सांगितली आणि सिद्धाश्रमामध्ये वास्तव्य, राक्षसांचा वध, त्या ठिकाणीं निर्भयपणें जाणें, विशाला नगरीचें दर्शन, अहल्येचें दर्शन, गौतममुनींची भेट, महाधनुष्य पाहण्याविषयी रामाची इच्छा आणि तें सज-

एतत्सर्वं महातेजा जनकाय महात्मने ।
निवेद्य विरराामाथ विश्वामित्रो महामुनिः  २५

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चाशः सर्गः। ५० [१५६५]

एकपञ्चाशः सर्गः ।

तस्य तद्वचनं श्रुत्वा विश्वामित्रस्य धीमतः ।
हृष्टरोमा महातेजाः शतानन्दो महातपाः  १
गौतमस्य सुतो ज्येष्ठस्तपसा द्योतितप्रभः ।
रामसंदर्शनादेव परं विस्मयमागतः  २
एतौ निषण्णौ संप्रेक्ष्य शतानन्दो नृपात्मजौ ।
सुखासीनौ मुनिश्रेष्ठं विश्वामित्रमथाब्रवीत्  ३
अपि ते मुनिशार्दूल मम माता यशस्विनी ।
दर्शिता राजपुत्राय तपो दीर्घमुपागता  ४
अपि रामे महातेजा मम माता यशस्विनी ।
वन्यैरुपाहरत्पूजां पूजार्हे सर्वदेहिनाम्  ५
अपि रामाय कथितं यद्वृत्तं तत्पुरातनम् ।

---

करण्याकरिता त्याचें आगमन हें सर्व महात्म्या जनकाला सांगून, महातेजस्वी महर्षि विश्वामित्र स्वस्थ बसले. ( २०–२५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पन्नासावा सर्ग समाप्त झाला. ॥५०॥

विचारी विश्वामित्र मुनींचें तें भाषण श्रवण केल्यावर महातेजस्वी व महातपस्वी शतानंदाच्या शरिरावर रोमांच उठले. नंतर तपाच्या योगानें ज्याचें तेज पडलें आहे, असा तो गौतममुनींचा ज्येष्ठ पुत्र शतानंद रामाला अवलोकन केल्याबरोबरच पराकाष्ठेचा विस्मित झाला. आणि ते राजकुमार रामलक्ष्मण स्वस्थपणें आसनावर बसलेले पाहून, तो मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हणाला, हे मुनिश्रेष्ठ, दीर्घ तपश्चर्येचें अवलंबन करून राहिलेली माझी यशस्विनी माता आपण रामाला दाखविली ना ? सर्व प्राण्यांना पूज्य असलेल्या या रामाची माझ्या यशस्विनी व तेजस्वी मातेने वन्य पदार्थांनी पूजा केली ना ? ( १–५ )

मम मातुर्महातेजो देवेन दुरनुष्ठितम् ६
अपि कौशिक भद्रं ते गुरुणा मम संगता ।
मम माता मुनिश्रेष्ठ रामसंदर्शनादितः ७
अपि मे गुरुणा रामः पूजितः कुशिकात्मज ।
इहागतो महातेजाः पूजां प्राप्य महात्मनः ८
अपि शान्तेन मनसा गुरुर्मे कुशिकात्मज ।
इहागतेन रामेण पूजितेनाभिवादितः ९
तच्छ्रुत्वा वचनं तस्य विश्वामित्रो महामुनिः ।
प्रत्युवाच शतानन्दं वाक्यज्ञो वाक्यकोविदम् १०
नातिक्रान्तं मुनिश्रेष्ठ यत्कर्तव्यं कृतं मया ।
संगता मुनिना पत्नी भार्गवेणेव रेणुका ११
तच्छ्रुत्वा वचनं तस्य विश्वामित्रस्य धीमतः ।
शतानन्दो महातेजा रामं वचनमब्रवीत् १२
स्वागतं ते नरश्रेष्ठ दिष्ट्या प्राप्तोऽसि राघव ।

हे महातेजस्वी मुने, इंद्राशीं माझ्या मातेचें जें दुराचरण झालें, तें पूर्वीचें वृत्त आपण रामाला कथन केलें ना ? हे कुशिकवंशज मुनिश्रेष्ठ, आपलें देव बरें करो ! रामदर्शन झाल्यावर माझ्या मातेचा माझ्या पित्याशीं समागम झाला ना ? हे कुशिकनंदन मुने, माझ्या पित्यानें रामाचें पूजन केलें ना ? त्या महात्म्याच्या पूजेचा स्वीकार करून हा महातेजस्वी राम येथे आला आहे ना ? आणि त्याच-प्रमाणे हे कुशिकनंदन मुने, सत्कार होऊन येथे आलेल्या रामानें शांत मनानें माझ्या पित्याला अभिवंदन केलें ना ? " हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर संभाषणज्ञ महामुनि विश्वामित्र भाषणाचें मर्म जाणणाऱ्या शतानंदाला म्हणाले. ( ६–१० )

" हे मुनिश्रेष्ठा, मी कांही विसरलों नाहीं. जें करावयाचे होतें, तें मी ( सर्व ) केलें आणि भृगुवंशज जमदग्नीशीं संगत झालेल्या रेणुकेप्रमाणे गौतममुनींशीं त्यांच्या पत्नीचा समागम झाला. " हें त्या विचारी विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण करून महातेजस्वी शतानंद रामाला म्हणाला, " हे पुरुषश्रेष्ठा, तुझें स्वागत असो. हे रघुवंशजा रामा, पराजयरहित अशा विश्वामित्रमहर्षींना पुढे घालून तूं

विश्वामित्रं पुरस्कृत्य महर्षिमपराजितम् १३
अचिन्त्यकर्मा तपसा ब्रह्मर्षिरमितप्रभः
विश्वामित्रो महातेजा वेत्त्यनं परमां गतिम् १४
नास्ति धन्यतरो राम त्वत्तोऽन्यो भुवि कश्चन ।
गोप्ता कुशिकपुत्रस्ते येन तप्तं महत्तपः १५
श्रूयतां चाभिधास्यामि कौशिकस्य महात्मनः ।
यथाबलं यथातत्त्वं तन्मे निगदतः शृणु १६
राजासीदेष धर्मात्मा दीर्घकालमरिंदमः ।
धर्मज्ञः कृतविद्यश्च प्रजानां च हिते रतः १७
प्रजापतिसुतस्त्वासीत्कुशो नाम महीपतिः ।
कुशस्य पुत्रो बलवान्कुशनाभः सुधार्मिकः १८
कुशनाभसुतस्त्वासीद्गाधिरित्येव विश्रुतः ।
गाधेः पुत्रो महातेजा विश्वामित्रो महामुनिः १९
विश्वामित्रो महातेजाः पालयामास मेदिनीम् ।

प्राप्त झालास, हें खरोखर आमचें भाग्यच उदयास आलें. या महातेजस्वी विश्वामित्रमुनींचीं कर्में अचिंत्य असून, या ब्रह्मर्षीची प्रभा तपाच्या योगानें अपारिमित झालेली आहे आणि हे जगताचें पराकाष्ठेचें हित करणारे आहेत, असें मी जाणत आहें. ( ११–१४ )

हे रामा, मोठी तपश्चर्या केलेले कुशिकपुत्र विश्वामित्र ज्या अर्थी तुझें रक्षण करणारे आहेत, त्या अर्थी तुझ्याहून धन्य असा या भूतलावर दुसरा कोणीही नाही! ऐक, या महात्म्या कौशिक मुनींचें तपोबल कशा प्रकारचें आहे व यांना ब्रह्मर्षित्व कसें प्राप्त झालें, हें तुला आता सांगणार आहें. तें मी सांगत असतांना एकाग्रचित्तानें तूं श्रवण कर. धर्मात्मा, धर्मवेत्ता, विद्यासंपन्न आणि प्रजाहिताविषयी दक्ष व शत्रूंचें दमन करणारा असा हा दीर्घकालपर्यन्त राजा होता. प्रजापतीचा पुत्र कुश नांवाचा एक राजा होता. त्या कुशाला बलाढ्य व अत्यंत धार्मिक असा कुशनाभ नांवाचा पुत्र झाला व कुशनाभाला प्रख्यात गाधि नांवाचा पुत्र झाला आणि हा महातेजस्वी विश्वामित्र महामुनि त्या गाधीचा पुत्र होय.

बहुवर्षसहस्राणि राजा राज्यमकारयत् २०
कदाचित्तु महातेजा योजयित्वा वरूथिनीम् ।
अक्षौहिणीपरिवृतः परिचक्राम मेदिनीम् २१
नगराणि च राष्ट्राणि सरितश्च महागिरीन् ।
आश्रमान्क्रमशो राजा विचरन्नाजगाम ह २२
वसिष्ठस्याश्रमपदं नानापुष्पलताद्रुमम् ।
नानामृगगणाकीर्णं सिद्धचारणसेवितम् २३
देवदानवगन्धर्वैः किंनरैरुपशोभितम् ।
प्रशान्तहरिणाकीर्णं द्विजसंघनिषेवितम् २४
ब्रह्मर्षिगणसंकीर्णं देवर्षिगणसेवितम् ।
तपश्चरणसंसिद्धैरग्निकल्पैर्महात्मभिः २५
सततं संकुलं श्रीमद्ब्रह्मकल्पैर्महात्मभिः ।
अब्भक्षैर्वायुभक्षैश्च शीर्णपर्णाशनैस्तथा २६
फलमूलाशनैर्दान्तैर्जितदोषैर्जितेन्द्रियैः ।
ऋषिभिर्वालखिल्यैश्च जपहोमपरायणैः २७

---

या महातेजस्वी विश्वामित्र राजानें पुष्कळ हजार वर्षें पृथ्वीचें परिपालन करून राज्य चालविलें. ( १६-२० )

एकदा हा महातेजस्वी राजा सेना तयार करून व एक अक्षौहिणी सेना बरोबर घेऊन पृथ्वीपर्यटण करूं लागला असतां नगरें, राष्ट्रें, नद्या, मोठमोठे पर्वत आणि आश्रम यांवरून क्रमानें जातां जातां तो वसिष्ठमुनींच्या आश्रमामध्यें आला व नानाप्रकारच्या पुष्पवेली व वृक्ष यांनी, युक्त, अनेक प्रकारच्या मृग-समुदायांनी भरलेला, सिद्ध व चारण यांनी सेवित, देव, दानव, गंधर्व आणि किन्नर यांनी शोभित, शांत हरिणांनीं गजबजलेला, पक्षीसमुदायांनी आश्रय केलेला, ब्रह्मर्षिगणांनी भरलेला, देवर्षिसमुदायांनी सेवित, तपश्चर्येच्या योगानें सिद्ध झालेल्या अग्नितुल्य महात्म्यांनी आणि ब्रह्मतुल्य महात्म्यांनी नेहमी भरलेला, संपन्न, जलप्राशन, वायुभक्षण, गलितपत्रभक्षण अथवा फलमूलाशन करून राहिले-ल्या निर्दोष, दमपरायण, जितेंद्रिय व जपहोमाविषयी तत्पर अशा वालखिल्य ऋषीं-

अन्यैर्वैखानसैश्चैव समन्तादुपशोभितम् ।
वसिष्ठस्याश्रमपदं ब्रह्मलोकमिवापरम् २८
ददर्श जयतां श्रेष्ठो विश्वामित्रो महाबलः २९

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकपञ्चाशः सर्गः । ५१ [ १५९४ ]

द्विपञ्चाशः सर्गः ।

तं दृष्ट्वा परमप्रीतो विश्वामित्रो महाबलः ।
प्रणतो विनयाद्वीरो वसिष्ठं जपतां वरम् १
स्वागतं तव चेत्युक्तो वसिष्ठेन महात्मना ।
आसनं चास्य भगवान्वसिष्ठो व्यादिदेश ह २
उपविष्टाय च तदा विश्वामित्राय धीमते ।
यथान्यायं मुनिवरः फलमूलमुपाहरत् ३
प्रतिगृह्य तु तां पूजां वसिष्ठाद्राजसत्तमः ।
तपोऽग्निहोत्रशिष्येषु कुशलं पर्यपृच्छत ४
विश्वामित्रो महातेजा वनस्पतिगणे तदा ।

---

त्या योगाने आणि इतरही वैखानस महर्षींच्या योगाने आसमंतात् भागीं सुशोभित असलेला व ब्रह्मलोकाप्रमाणेच दिसत असलेला वसिष्ठ मुनींचा आश्रम विजयिश्रेष्ठ व महाबलाढ्य विश्वामित्र राजाने अवलोकन केला. ( २१-२९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी एकावन्नावा सर्ग संपूर्ण झाला ॥ ५१ ॥

तपोनिष्ठांमध्ये श्रेष्ठ असलेल्या त्या वसिष्ठमुनींना अवलोकन करून महाबलाढ्य व वीर असा विश्वामित्र राजा अत्यंत प्रसन्न झाला आणि विनयाने त्याने त्यांना प्रणाम केला. तेव्हा महात्म्या वसिष्ठमुनींनी " तुझें स्वागत असो " असें म्हणून त्याला आसन दाखवून त्यावर बसावयास सांगितलें. नंतर विचारी विश्वामित्र-राजा बसल्यावर मुनिश्रेष्ठ वसिष्ठांनी योग्यतेप्रमाणे त्याला फलमूलें अर्पण केलीं. वसिष्ठमुनींच्या त्या आदरातिथ्याचा स्वीकार केल्यावर त्या महातेजस्वी नृपश्रेष्ठ विश्वामित्राने त्यांना तप, अग्निहोत्र व शिष्यगण यांविषयी आणि त्याच-प्रमाणे आश्रमांतील वृक्षलतादि वनस्पतिगणांसंबन्धांतही कुशल प्रश्न विचारिले.

*

सर्वत्र कुशलं प्राह वसिष्ठो राजसत्तमम् ५
सुखोपविष्टं राजानं विश्वामित्रं महातपाः ।
पप्रच्छ जपतां श्रेष्ठो वसिष्ठो ब्रह्मणः सुतः ६
कच्चित्ते कुशलं राजन्कच्चिद्धर्मेण रञ्जयन् ।
प्रजाः पालयसे राजन्राजवृत्तेन धार्मिकः ७
कच्चित्ते संभृता भृत्याः कच्चित्तिष्ठन्ति शासने ।
कच्चित्ते विजिताः सर्वे रिपवो रिपुसूदन ८
कच्चिद्बलेषु कोशेषु मित्रेषु च परंतप ।
कुशलं ते नरव्याघ्र पुत्रपौत्रे तथानघ ९
सर्वत्र कुशलं राजा वसिष्ठं प्रत्युदाहरत् ।
विश्वामित्रो महातेजा वसिष्ठं विनयान्वितम् १०
कृत्वा तौ सुचिरं कालं धर्मिष्ठौ ताः कथास्तदा ।
मुदा परमया युक्तौ प्रीयेतां तौ परस्परम् ११
ततो वसिष्ठो भगवान्कथान्ते रघुनन्दन ।
विश्वामित्रमिदं वाक्यमुवाच प्रहसन्निव १२

तेव्हा वसिष्ठमुनींनी त्या श्रेष्ठ राजाला "सर्वत्र कुशल आहे" म्हणून सांगितलें. (१-५)

नंतर तपस्विश्रेष्ठ व महाव्रती ब्रह्मपुत्र वसिष्ठांनी स्वस्थ बसलेल्या विश्वामित्र-राजाला प्रश्न केला की, "हे राजा, तुझें कुशल आहे ना? हे धार्मिक राजा, राज-वर्तनाने प्रजेचें पालन करून धर्माने तूं त्यांचें रंजन करीत आहेस ना ? तुझ्या सेवकांना वेळेवर पगार मिळून ते तुझी आज्ञा पाळण्याविषयी तत्पर असतात ना ? हे शत्रुनाशका, तुझे सर्व रिपु जिंकलेले आहेत ना ? हे शत्रुतापना, निष्पापा, पुरुषश्रेष्ठा, सेना, कोश, मित्र व पुत्रपौत्रादि संतति हीं सर्व कुशल आहेत ना ?" याप्रमाणे प्रश्न झाल्यावर महातेजस्वी विश्वामित्र राजाने विनयसंपन्न अशा श्रेष्ठ वसिष्ठमुनींना " सर्वत्र कुशल आहे " असें सांगितलें. ( ६–१० )

इकडल्या तिकडल्या गोष्टी पुष्कळ वेळपर्यंत सांगून अत्यंत संतुष्ट झालेल्या त्या उभयता धर्मिष्ठांनी परस्पराला आनंदित केलें. तदनंतर, हे रघुनंदना रामा, गोष्टी चालतां चालतां भगवान् वसिष्ठमुनि हसत हसत विश्वामित्राला म्हणाले,

आतिथ्यं कर्तुमिच्छामि बलस्यास्य महाबल ।
तव चैवाप्रमेयस्य यथार्हं संप्रतीच्छ मे  १३
सत्क्रियां हि भवानेतां प्रतीच्छतु मया कृताम् ।
राजँस्त्वमतिथिश्रेष्ठः पूजनीयः प्रयत्नतः  १४
एवमुक्तो वसिष्ठेन विश्वामित्रो महामतिः । ×
कृतमित्यब्रवीद्राजा पूजावाक्येन मे त्वया  १५
फलमूलेन भगवन्विद्यते यत्तवाश्रमे ।
पाद्येनाचमनीयेन भगवद्दर्शनेन च  १६
सर्वथा च महाप्राज्ञ पूजार्हेण सुपूजितः ।
नमस्तेऽस्तु गमिष्यामि मैत्रेणेक्षस्व चक्षुषा  १७
एवं ब्रुवन्तं राजानं वसिष्ठः पुनरेव हि ।

---

हे महाबलाढ्य राजा, अपरिमित सामर्थ्याने युक्त असलेल्या तुझ्यासहवर्तमान या तुझ्या सैन्याचें यथायोग्य आतिथ्य करावें, अशी माझी इच्छा आहे. या करिता तूं त्या आतिथ्याचा स्वीकार कर. सारांश, हे राजा, तूं श्रेष्ठ अतिथि असल्यामुळे प्रयत्नपूर्वक तुझें आदरातिथ्य करणें योग्य आहे. यासाठी, मी करीत असलेल्या या सत्काराचा तूं स्वीकार कर. " ( ११–१४ )

याप्रमाणे वसिष्ठांनी म्हटलें असतां तो उदार अन्तःकरणाचा विश्वामित्र राजा वसिष्ठांना म्हणाला, " मी आदरातिथ्य करितों " या आपल्या म्हणण्यानेच माझा सत्कार झाला आहे. × शिवाय हे भगवन्, हे महाज्ञानवान् मुने, आपण आमच्यासारख्यांना सर्वथा पूजनीय असतां ( आपल्या आश्रमामध्ये असलेलीं फळें, मुळें, पाद्य आचमनीय व आपलें दर्शन यांचे योगाने ) उलट स्वतः आपणच माझें सर्वप्रकारें उत्कृष्ट आदरातिथ्य केलें (तेवढ्यानेच सर्व कांही पावलें.) आता मी आपणांस वन्दन करतों व आपला निरोप घेतों. मजवर आपली कृपादृष्टि असूं द्यावी. " याप्रमाणे विश्वामित्र राजा म्हणत असतांना धर्मात्म्या व

---

× " विश्वामित्रो महामुनिः " या ठिकाणीं " विश्वामित्रो महामतिः " असा पाठ पाहिजे. गोविन्दराजीय प्रतींतही " महामतिः " असाच पाठ आहे व तोच शुद्ध आहे; कारण विश्वामित्र तेव्हा " मुनि " बनलाच नव्हता.

न्यमन्त्रयत धर्मात्मा पुनः पुनरुदारधीः १८
बाढमित्येव गाधेयो वसिष्ठं प्रत्युवाच ह ।
यथाप्रियं भगवतस्तथास्तु मुनिपुङ्गव १९
एवमुक्तस्तथा तेन वसिष्ठो जपतां वरः ।
आजुहाव ततः प्रीतः कल्माषीं धूतकल्मषाम् २०
एह्येहि शबले क्षिप्रं शृणु चापि वचो मम २१
सबलस्यास्य राजर्षेः कर्तुं व्यवसितोऽस्म्यहम् ।
भोजनेन महार्हेण सत्कारं संविधत्स्व मे २२
यस्य यस्य यथाकामं षड्रसेष्वभिपूजितम् ।
तत्सर्वं कामधुग्दिव्ये अभिवर्ष कृते मम २३
रसेनान्नेन पानेन लेह्यचोष्येण संयुतम् ।
अन्नानां निचयं सर्वं सृजस्व शबले त्वर २४

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः । ५२ [१६१८]

---

उदारबुद्धि वसिष्ठमुनींनी पुनः पुनः अत्यन्त आग्रह करून त्याला ठेवून घेतलें. तेव्हा " ठीक आहे. मुनिश्रेष्ठ, आपली इच्छा असेल. त्याप्रमाणे होऊं द्या." असें गाधिपुत्र विश्वामित्र वसिष्ठांना म्हणाला. ( १५–१९ )

याप्रमाणे विश्वामित्राने म्हटल्यावर तपस्विश्रेष्ठ वसिष्ठांनी प्रसन्न होऊन किल्बिषरहित अशा आपल्या चित्रवर्णसंपन्न धेनूला हाक मारिली की, "हे शबले, सत्वर इकडे ये आणि मी सांगतों तें श्रवण कर. सैन्यासहवर्तमान या राजर्षीचा मोठ्या मौल्यवान् भोजनाने सत्कार करण्याचा मी निश्चय केला आहे. तो सिद्धीस नेण्याची तूं सत्वर व्यवस्था कर. सारांश, सहा रसांमध्ये ज्याला ज्याला जें जें प्रिय असेल तें तें, हे दिव्य कामधेनु, तूं माझ्याकरिता, ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणे उत्पन्न कर. तात्पर्य, हे शबले, सरस अन्न, पान, लेह्य आणि चोष्य यांसहवर्तमान अन्नांचा सर्व समुदाय तूं सत्वर उत्पन्न कर." ( १५–२४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५२ ॥

त्रिपञ्चाशः सर्गः ।

**एवमुक्ता वसिष्ठेन शबला शत्रुसूदन ।**
**विदधे कामधुकामान्यस्य यस्येप्सितं तथा** १
**इक्षून्मधूंस्तथा लाजान्मैरेयांश्च वरासवान् ।**
**पानानि च महार्हाणि भक्ष्यांश्चोच्चावचानपि** २
**उष्णाढ्यस्यौदनस्यात्र राशयः पर्वतोपमाः ।**
**मृष्टान्यन्नानि सूपांश्च दधिकुल्यास्तथैव च** ३
**नानास्वादुरसानां च खाण्डवानां तथैव च ।**
**भोजनानि सुपूर्णानि गौडानि च सहस्रशः** ४
**सर्वमासीत्सुसन्तुष्टं हृष्टपुष्टजनायुतम् ।**
**विश्वामित्रबलं राम वसिष्ठेन सुतर्पितम्** ५
**विश्वामित्रो हि राजर्षिर्हृष्टपुष्टस्तदाभवत् ।**
**सान्तःपुरवरो राजा सब्राह्मणपुरोहितः** ६
**सामात्यो मन्त्रिसहितः सभृत्यः पूजितस्तदा ।**
**युक्तः परमहर्षेण वसिष्ठमिदमब्रवीत्** ७

---

हे शत्रुनाशका रामा, याप्रमाणे वसिष्ठांनी शबलेला सांगितलें असतां ज्याला ज्याला जें जें प्रिय होतें, त्यात्याप्रमाणे सर्व इष्ट पदार्थ त्या कामधेनूने उत्पन्न केले. उसापासून आणि मधापासून होणारे पदार्थ, लाह्या, मैरेयसंज्ञक उत्कृष्ट आसवें, मोठमोठ्या किंमतींचीं पेयें आणि लहानमोठीं भक्ष्यें तिने उत्पन्न केलीं. ऊन ऊन भाताच्या त्या ठिकाणीं पर्वतप्राय राशि पडल्या आणि मिष्टान्नें, वरणें, दधिकुल्या ( म्हणजे दह्याचे पाट ), नाना प्रकारच्या स्वादुरसाने युक्त असलेल्या साखरेच्या पक्वान्नांनी भरलेलीं रुप्याचीं हजारो भोजनपात्रें तिने उत्पन्न केलीं. तेव्हा, हे रामा, त्या अन्नाच्या योगाने वसिष्ठांनी आकण्ठ तृप्त केलेलें विश्वामित्राचें सैन्य सर्व अत्यंत संतुष्ट झालें आणि त्यांतील लोक आनंदित व पुष्ट आहेत असें दिसूं लागलें. ( १—५ )

सारांश, ब्राह्मण, पुरोहित, अंतःपुरांतील स्त्रिया, अमात्य, मंत्री आणि सेवक यांसहवर्तमान विश्वामित्र राजर्षींचा सत्कार होऊन तो आनंदित व पुष्ट झाला

पूजितोऽहं त्वया ब्रह्मन्पूजार्हेण सुसत्कृतः ।
श्रूयतामभिधास्यामि वाक्यं वाक्यविशारद ८
गवां शतसहस्रेण दीयतां शबला मम ।
रत्नं हि भगवन्नेतद्रत्नहारी च पार्थिवः ।
तस्मान्मे शबलां देहि ममैषा धर्मतो द्विज ९
एवमुक्तस्तु भगवान्वसिष्ठो मुनिपुङ्गवः ।
विश्वामित्रेण धर्मात्मा प्रत्युवाच महीपतिम् १०
नाहं शतसहस्रेण नापि कोटिशतैर्गवाम् ।
राजन्दास्यामि शबलां राशिभी रजतस्य वा ११
न परित्यागमर्हेयं मत्सकाशादरिन्दम ।
शाश्वती शबला मह्यं कीर्तिरात्मवतो यथा १२
अस्यां हव्यं च कव्यं च प्राणयात्रा तथैव च ।
आयत्तमग्निहोत्रं च बलिहोमस्तथैव च १३
स्वाहाकारवषट्कारौ विद्याश्च विविधास्तथा ।

---

आणि पराकाष्ठेचा हर्षयुक्त होऊन वसिष्ठांना म्हणाला, " हे ब्रह्मन्, खरें म्हटलें असतां आपलें पूजन माझ्या हातून होणें योग्य असतांना, आपणच माझा उत्तम रीतीने सत्कार करून पूजन केलें आहे. या करितां, हे संभाषणज्ञ मुने, मी काय म्हणत आहें इकडे आपण लक्ष्य द्यावें. हे भगवन्, एक लक्ष गाई घेऊन आपण शबला मला द्यावी. कारण, रत्नें जवळ ठेवण्याची योग्यता राजाचीच आहे आणि हें रत्न आहे. तस्मात्, हे द्विज, आपण मला शबला द्या. धर्माने ही माझीच आहे." याप्रमाणे विश्वामित्र बोलला असतां मुनिश्रेष्ठ धर्मात्मे वसिष्ठ त्या भूपतीला म्हणाले. ( ६–१० )

" हे राजा, एक लक्ष गाईंची तर गोष्टच कशास हवी ? पण, शेकडो कोट गाई अथवा रुप्याच्या राशि घेऊनही मी शबला देणार नाहीं. हे शत्रुदमना, माझ्यापासून त्याग होण्यास ही योग्य नाही; कारण, आत्मवानाच्या कीर्तीप्रमाणे ही शबला नेहमी माझ्यापाशीच राहणारी आहे. माझें हव्यकव्य, उपजीविका, अग्निहोत्र, भूतबलि, होम, श्रौतस्मार्त कर्मे आणि नानाप्रकारच्या विद्या हीं सर्व,

नाहं ज्येष्ठं नरश्रेष्ठ विक्रीणीयां कथंचन ।
ऋचीकस्य वचः श्रुत्वा तेषां माता महात्मनाम् १६
उवाच नरशार्दूलमम्बरीषमिदं वचः ।
अविक्रेयं सुतं ज्येष्ठं भगवानाह भार्गवः १७
ममापि दयितं विद्धि कनिष्ठं शुनकं प्रभो ।
तस्मात्कनीयसं पुत्रं न दास्ये तव पार्थिव १८
प्रायेण हि नरश्रेष्ठ ज्येष्ठाः पितृषु वल्लभाः ।
मातृणां च कनीयांसस्तस्माद्रक्ष्ये कनीयसम् १९
उक्तवाक्ये मुनौ तस्मिन्मुनिपत्न्यां तथैव च ।
शुनःशेपः स्वयं राम मध्यमो वाक्यमब्रवीत् २०
पिता ज्येष्ठमविक्रेयं माता चाह कनीयसम् ।
विक्रेयं मध्यमं मन्ये राजपुत्र नयस्व माम् २१
अथ राजा महाबाहो वाक्यान्ते ब्रह्मवादिनः ।
हिरण्यस्य सुवर्णस्य कोटिभी रत्नराशिभिः २२

"हे पुरुषश्रेष्ठा, कांहीं झालें तरी मी ज्येष्ठ पुत्र विकणार नाहीं." हें ऋचीक मुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्या महात्म्या पुत्रांची माता पुरुषश्रेष्ठ अंबरीषाला म्हणाली," भगवान् भार्गव मुनींनी ज्येष्ठ पुत्र विकावयाचा नाही, म्हणून सांगितलें आणि हे प्रभो, हा कनिष्ठ पुत्र शुनक तर माझा आवडता आहे, असें तूं समज. तस्मात्, हे राजा, मी कनिष्ठ पुत्र तुला देणार नाहीं. हे पुरुषश्रेष्ठा प्रायः ज्येष्ठ पुत्र पित्यांना प्रिय असतात आणि कनिष्ठ पुत्र मातांना प्रिय असतात. तस्मात्, मी कनिष्ठ पुत्र राखून ठेवणार. " याप्रमाणे ऋचीक मुनींनी व त्यांच्या पत्नीने सांगितलें असतां, हे रामा, मधला पुत्र शुनःशेप स्वतःच म्हणाला, " ज्येष्ठ पुत्र विकावयाचा नाही, म्हणून पिता म्हणत आहे आणि कनिष्ठ पुत्र विकावयाचा नाही, म्हणून माता म्हणत आहे, यावरून मधला पुत्र विकण्याला हरकत नाही, असें मला वाटतें; करिता हे राजपुत्रा, तूं मला ने."( १६–२१ )

याप्रमाणे त्या ब्रह्मवेत्त्या शुनःशेपाने सांगितल्यावर, हे महापराक्रमी रामा, उत्तम प्रभेने युक्त असलेलें क्रोडोगणती सुवर्ण, रत्नांच्या राशि व एक लक्ष गाई

गवां शतसहस्रेण शुनःशेपं नरेश्वरः ।
गृहीत्वा परमप्रीतो जगाम रघुनन्दन २३
अम्बरीषस्तु राजर्षी रथमारोप्य सत्वरः ।
शुनःशेपं महातेजा जगामाशु महायशाः २४

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकषष्टितमः सर्गः ६१ [१८४६]

द्विषष्टितमः सर्गः ।

शुनःशेपं नरश्रेष्ठ गृहीत्वा तु महायशाः ।
व्यश्रमत्पुष्करे राजा मध्याह्ने रघुनन्दन १
तस्य विश्रममाणस्य शुनःशेपो महायशाः ।
पुष्करं ज्येष्ठमागम्य विश्वामित्रं ददर्श ह २
तप्यन्तमृषिभिः सार्धं मातुलं परमातुरः ।
विषण्णवदनो दीनस्तृष्णया च श्रमेण च ३
पपाताङ्के मुने राम वाक्यं चेदमुवाच ह ।
न मेऽस्ति माता न पिता ज्ञातयो बान्धवाः कुतः ४

---

शुनःशेपाकरिता अंबरीष राजाने ( ऋचीक मुनींना ) दिल्या आणि, हे रघुनंदना रामा, अत्यंत प्रसन्न झालेला तो राजा त्याला घेऊन गेला. सारांश, तो महातेजस्वी व महायशस्वी अंबरीष राजर्षि शुनःशेपाला रथावर घालून विलंब न करितां सत्वर चालता झाला. ( २२–२४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी एकसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६१ ॥

हे रघुनंदना पुरुषश्रेष्ठा रामा, शुनःशेपाला घेऊन निघालेल्या त्या महायशस्वी अंबरीष राजाने पुष्करतीर्थासमीप विश्रांति घेतली. तीर्थामध्ये श्रेष्ठ अशा पुष्कर तीर्थासमीप येऊन तो अंबरीष राजा विश्रांतीकरिता उतरूं लागला असतां अत्यंत दुःखित झालेल्या महायशस्वी शुनःशेपाने तेथे ऋषींसहवर्तमान तपश्चर्या करीत असलेल्या आपल्या मातुल विश्वामित्राला अवलोकन केलें आणि तृषेने व श्रमाने अगदी म्लानवदन होऊन दीन झालेला तो शुनःशेप हे रामा, विश्वामित्राच्या मांडीवर पडला आणि त्याला म्हणाला, “ हे मुने, मला माता नाही व पितादि

त्रातुमर्हसि मां सौम्य धर्मेण मुनिपुङ्गव ।
त्राता त्वं हि नरश्रेष्ठ सर्वेषां त्वं हि भावनः ५
राजा च कृतकार्यः स्यादहं दीर्घायुरव्ययः ।
स्वर्गलोकमुपाश्नीयां तपस्तप्त्वा ह्यनुत्तमम् ६
स मे नाथो ह्यनाथस्य भव भव्येन चेतसा ।
पितेव पुत्रं धर्मात्मंस्त्रातुमर्हसि किल्बिषात् ७
तस्य तद्वचनं श्रुत्वा विश्वामित्रो महातपाः ।
सान्त्वयित्वा बहुविधं पुत्रानिदमुवाच ह ८
यत्कृते पितरः पुत्राञ्जनयन्ति शुभार्थिनः ।
परलोकहितार्थाय तस्य कालोऽयमागतः ९
अयं मुनिसुतो बालो मत्तः शरणमिच्छति ।
अस्य जीवितमात्रेण प्रियं कुरुत पुत्रकाः १०
सर्वे सुकृतकर्माणः सर्वे धर्मपरायणाः ।
पशुभूता नरेन्द्रस्य तृप्तिमग्नेः प्रयच्छत ११

---

नाही; तेंव्हा नातेवाईक आणि बांधव कोठून असणार ? हे सौम्य, हे मुनिश्रेष्ठ, धर्माने आपण माझें रक्षण करा. हे पुरुषश्रेष्ठा, माझा रक्षक तूंच असून, शरण आलेल्या सर्वांचें पालन करणाराही तूंच आहेस. ( १-५ )

राजा कृतकृत्य व्हावा आणि मीही अक्षय्य दीर्घायु राहून व उत्कृष्ट तपश्चर्या करून स्वर्गलोकाप्रत जावें, यास्तव उदार अंतःकरणाने आपण मज अनाथाचें नाथ व्हा आणि हे धर्मनिष्ठ, पुत्राचें रक्षण करणाऱ्या पित्याप्रमाणे आपण माझें या संकटापासून रक्षण करा. " हें त्याचें भाषण श्रवण करून महातपस्वी विश्वामित्राने त्याचें नाना प्रकारें सांत्वन केलें आणि आपल्या पुत्रांना ते म्हणाले, "ज्याकरिता म्हणजे ज्या पारलौकिक हितसंपादनाकरिता शुभेच्छु पितर पुत्र उत्पन्न करीत असतात, त्याचा हाच काल प्राप्त झाला आहे. हा बालक ऋषिपुत्र माझ्या हातून रक्षणाची इच्छा करीत आहे. यास्तव, हे पुत्र हो, जीवदान देऊन तुम्ही याचा मनोरथ शेवटास न्या. ( ६-१० )

तुम्ही सर्वही सत्कर्म करणारे असून सर्वही धर्मनिष्ठ आहांत. तस्मात्, तुम्ही

नाथवाँश्च शुनःशेपो यज्ञश्चाविघ्नतो भवेत् ।
देवतास्तर्पिताश्च स्युर्मम चापि कृतं वचः १२
मुनेस्तद्वचनं श्रुत्वा मधुच्छन्दादयः सुताः ।
साभिमानं नरश्रेष्ठ सलीलमिदमब्रुवन् १३
कथमात्मसुतान्हित्वा त्रायसेऽन्यसुतं विभो ।
अकार्यमिव पश्यामः श्वमांसमिव भोजने १४
तेषां तद्वचनं श्रुत्वा पुत्राणां मुनिपुङ्गवः ।
क्रोधसंरक्तनयनो व्याहर्तुमुपचक्रमे १५
निःसाध्वसमिदं प्रोक्तं धर्मादपि विगर्हितम् ।
अतिक्रम्य तु मद्वाक्यं दारुणं रोमहर्षणम् १६
श्वमांसभोजिनः सर्वे वासिष्ठा इव जातिषु ।
पूर्णं वर्षसहस्रं तु पृथिव्यामनुवत्स्यथ १७
कृत्वा शापसमायुक्तान्पुत्रान्मुनिवरस्तदा ।
शुनःशेपमुवाचार्तं कृत्वा रक्षां निरामयम् १८

---

पशु बनून अंबरीष राजाचा अग्नि तृप्त करा. म्हणजे शुनःशेप सनाथ होईल, यज्ञ निर्विघ्नपणें पार पडेल, देवता तृप्त होतील आणि माझीही आज्ञा तुम्ही पाळल्याप्रमाणे होईल." हे पुरुषश्रेष्ठा रामा, हें विश्वामित्र मुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्याचे मधुच्छंदप्रभृति पुत्र अभिमानाने हसत हसत त्याला म्हणाले, "हे प्रभो, तूं आपल्या पुत्रांना बळी देऊन दुसऱ्याच्या पुत्राचें कसें रक्षण करीत आहेस ? हें तुझें करणें भोजनामध्ये श्वानाचें मांस स्वीकारिल्याप्रमाणे आम्हांला अयोग्य दिसत आहे." याप्रमाणे त्या पुत्रांचें भाषण श्रवण केल्यानंतर मुनिश्रेष्ठ विश्वामित्र क्रोधाने नेत्र आरक्तवर्ण करून त्यांना बोलूं लागला. ( ११–१५ )

"तुम्ही जें हें माझ्या आज्ञेचें उल्लंघन करून अंगावर काटा येण्यासारिखें भयंकर भाषण माझें भय न बाळगितां केलें आहे व धर्मदृष्टीनेही हें तुमचें भाषण निंद्य आहे. यास्तव, तुम्ही सर्व श्वानमांस भक्षण करून मुष्टिक जातीमध्ये रहाल आणि वसिष्ठपुत्रांप्रमाणे एक हजार वर्षें पूर्ण होईपर्यंत या पृथ्वीवर वास्तव्य कराल." याप्रमाणे पुत्रांना शाप दिल्यावर आणि सर्व दुःखनाशक रक्षामंत्राने त्या शुनः-

पवित्रपाशैराबद्धो रक्तमाल्यानुलेपनः ।
वैष्णवं यूपमासाद्य वाग्भिरग्निमुदाहर १९
इमे च गाथे द्वे दिव्ये गायेथा मुनिपुत्रक ।
अम्बरीषस्य यज्ञेऽस्मिंस्ततः सिद्धिमवाप्स्यसि २०
शुनःशेपो गृहीत्वा ते द्वे गाथे सुसमाहितः ।
त्वरया राजसिंहं तमम्बरीषमुवाच ह २१
राजसिंह महाबुद्धे शीघ्रं गच्छावहे वयम् ।
निवर्तयस्व राजेन्द्र दीक्षां च समुपाहर २२
तद्वाक्यमृषिपुत्रस्य श्रुत्वा हर्षसमन्वितः ।
जगाम नृपतिः शीघ्रं यज्ञवाटमतन्द्रितः २३
सदस्यानुमते राजन्पवित्रकृतलक्षणम् ।
पशुं रक्ताम्बरं कृत्वा यूपे तं समबन्धयत् २४
स बद्धो वाग्भिरग्र्याभिरभितुष्टाव वै सुरौ ।

शेपाचें रक्षण केल्यावर तो मुनिश्रेष्ठ विश्वामित्र त्या दुःखिताला म्हणाला, " दर्भरज्जूंनी बद्ध आणि रक्तपुष्पें व रक्तगंध यांनी युक्त होऊन, तूं विष्णुदैवत्य यूपापाशी आलास, म्हणजे या मंत्रांनी अग्नीचें स्तवन कर. हे ऋषिपुत्रा, या अंबरीषाच्या यज्ञामध्ये तूं हे दोन गाथामंत्र म्हण; म्हणजे तुझा मनोरथ निःसंशय पूर्ण होईल. " ( १६-२० )

याप्रमाणे विश्वामित्राने सांगितल्यावर स्वस्थचित्त होऊन शुनःशेपाने त्या दोन गाथामंत्रांचा स्वीकार केला आणि नंतर त्वरेने त्या नृपश्रेष्ठ अंबरीषापाशी येऊन तो म्हणाला, " हे महाबुद्धिवान् नृपश्रेष्ठा, आता आपण सत्वर जाऊं. हे राजेंद्रा, तूं यज्ञमंडपाकडे चल आणि यज्ञदीक्षा शेवटास ने. " हें त्या ऋषिपुत्राचें भाषण श्रवण केल्यावर अंबरीष राजाला आनंद झाला व तो अगदी दक्ष राहून सत्वर यज्ञमंडपाकडे गेला. तदनंतर सदस्यांच्या अनुमताने ज्याचे ठिकाणीं पवित्र अशा दर्भरज्जूंनी चिन्ह केलेलें आहे व ज्याला रक्त वस्त्रांनी वेष्टिलेलें आहे, अशा त्या शुनःशेपाला पशु बनवून अंबरीष राजाने यूपाशीं ( म्हणजे यज्ञस्तंभाशीं ) बांधिलें. तदनंतर यूपाशीं बद्ध झालेल्या त्या ऋषिपुत्र शुनःशेपाने इंद्र आणि विष्णु या

इन्द्रमिन्द्रानुजं चैव यथावन्मुनिपुत्रकः २५
ततः प्रीतः सहस्राक्षो रहस्यस्तुतितोषितः ।
दीर्घमायुस्तदा प्रादाच्छुनःशेपाय वासवः २६
स च राजा नरश्रेष्ठ यज्ञस्य च समाप्तवान् ।
फलं बहुगुणं राम सहस्राक्षप्रसादजम् २७
विश्वामित्रोऽपि धर्मात्मा भूयस्तेपे महातपः ।
पुष्करेषु नरश्रेष्ठ दश वर्षशतानि च २८

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ६२ । [१८७४]

देवांची उत्कृष्ट मंत्रांनी यथायोग्य स्तुति केली. तेव्हा गुह्य स्तुतीच्या योगाने इन्द्र संतुष्ट झाला व शुनःशेपावर प्रसन्न होऊन, त्या इंद्राने त्याला दीर्घायुष्य दिलें आणि हे पुरुषश्रेष्ठा रामा, इंद्राच्या कृपेने त्या अंबरीष राजालाही त्या यज्ञाचें फल पुष्कळ पटीने प्राप्त झालें. असो. तदनंतर हे पुरुषश्रेष्ठा रामा, महातपस्वी धर्मात्म्या विश्वामित्र मुनींनींही तेथेंच पुष्करतीर्थावर आणखी एक हजार वर्षेपर्यंत तपश्चर्या केली. ( २१–२८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडपैकी बासष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६२ ॥

टिप्पणी– (बा० ६२) यांत एका ब्राह्मणपुत्राचे प्राण वाचविण्यासाठी, आपले १०० पुत्र बळी देण्यास विश्वामित्र उद्युक्त झाला व त्याने त्या पुत्रांस त्या ब्राह्मण-पुत्राचेऐवजीं यज्ञांत बळी जाण्याची आज्ञा केली; पण त्या पुत्रांनी ती त्याची आज्ञा मानली नाही. म्हणून, त्यांस शाप देऊन नष्ट केलें आणि त्या ब्राह्मण-पुत्राला–इन्द्र व इन्द्रानुज ( विष्णु ) यांच्या स्तवनपर–दोन गाथा शिकवून, आपले प्राण वाचविण्याचा उपाय सांगितला आहे. त्याप्रमाणे त्या गाथांनी स्तवन करून तो ब्राह्मणपुत्र वाचला व त्यास दीर्घायुष्यही प्राप्त झालें. पुढे विश्वामित्रानेच त्याचा पुत्र म्हणून स्वीकार केला. असा कथाभाग आला आहे.

या कथानकावरून पाहतां विश्वामित्र व वसिष्ठ यांचें वैर कै० भारताचार्य नानासाहेब वैद्य आपल्या महाभारताच्या उपसंहारांत म्हणतात तसें जातीय स्वरूपाचें ( क्षत्रिय व ब्राह्मण यांच्यामधलें ) नव्हतें. तसें असतें, तर एका

त्रिषष्टितमः सर्गः ।

पूर्णे वर्षसहस्रे तु व्रतस्नातं महामुनिम् ।
अभ्यगच्छन्सुराः सर्वे तपःफलचिकीर्षवः १
अब्रवीत्सुमहातेजा ब्रह्मा सुरुचिरं वचः ।
ऋषिस्त्वमसि भद्रं ते स्वार्जितैः कर्मभिः शुभैः २
तमेवमुक्त्वा देवेशस्त्रिदिवं पुनरभ्यगात् ।
विश्वामित्रो महातेजा भूयस्तेपे महत्तपः ३
ततः कालेन महता मेनका परमाप्सरा ।
पुष्करेषु नरश्रेष्ठ स्नातुं समुपचक्रमे ४

---

पुष्करतीर्थाचे ठिकाणीं विश्वामित्राची पूर्ण हजार वर्षे तपश्चर्या झाल्यावर तपोव्रत समाप्त करून स्नान केलेल्या महामुनि विश्वामित्राकडे सर्व देव तपाचें फल देण्याकरिता आले. तेव्हा अत्यंत महातेजस्वी ब्रह्मदेव फारच मधुर वाणीनें विश्वामित्राला म्हणाले " स्वसंपादित अशा पुण्यकर्माच्या योगाने तूं ऋषि झाला आहेस; तुझें कल्याण असो." या प्रकारें त्याला सांगून सुराधिपति ब्रह्मदेव पुनरपि स्वर्गास गेल्यावर महातेजस्वी विश्वामित्राने पुनरपि मोठी तपश्चर्या आरंभिली. याप्रमाणे त्याची तपश्चर्या सुरू होऊन, बराच काल लोटल्यावर, हे पुरुषश्रेष्ठा रामा, मेनका नामक श्रेष्ठ अप्सरा पुष्करतीर्थावर येऊन स्नान करूं लागली. ( १-४ )

---

टिप्पणी– मागील पानावरून चालू.
ब्राह्मणपुत्राला वाचविण्यासाठी क्षत्रिय विश्वामित्र, आपले १०० पुत्र बळी देण्यास केव्हाही उद्युक्त झाला नसता. हें वैर केवळ वैय्यक्तिक स्वरूपाचें होतें व तेंही अल्पकालीन होतें. हें जेव्हा विश्वामित्र आपल्या यज्ञाच्या रक्षणार्थ रामलक्ष्मणांस मागण्यासाठी दशरथराजाकडे आला, व त्याचेपाशी रामलक्ष्मणांस मागूं लागला, पण, तो कांही रामलक्ष्मणांस विश्वामित्राचे स्वाधीन करीना; त्या वेळीं वसिष्ठानें विश्वामित्राच्या तपःसामर्थ्याची दरबारांत अत्यन्त प्रशंसा करून, दशरथ राजापाशी आपली भीड खर्चून व त्याचें मन वळवून, आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर, रामलक्ष्मणांस विश्वामित्राचे स्वाधीन करविलें, या कथानकावरून स्पष्ट आहे.

तां ददर्श महातेजा मेनकां कुशिकात्मजः ।
रूपेणाप्रतिमां तत्र विद्युतं जलदे यथा ५
कन्दर्पदर्पवशगो मुनिस्तामिदमब्रवीत् ।
अप्सरः स्वागतं तेऽस्तु वस चेह ममाश्रमे ६
अनुगृह्णीष्व भद्रं ते मदनेन विमोहितम् ।
इत्युक्ता सा वरारोहा तत्रावासमथाकरोत् ७
तपसो हि महाविघ्नो विश्वामित्रमुपागमत् ।
तस्यां वसन्त्यां वर्षाणि पञ्च पञ्च च राघव ८
विश्वामित्राश्रमे सौम्ये सुखेन व्यतिचक्रमुः ।
अथ काले गते तस्मिन्विश्वामित्रो महामुनिः ९
सव्रीड इव संवृत्तश्चिन्ताशोकपरायणः ।
बुद्धिर्मुनेः समुत्पन्ना सामर्षा रघुनन्दन १०
सर्वं सुराणां कर्मैतत्तपोऽपहरणं महत् ।
अहोरात्रापदेशेन गताः संवत्सरा दश ११

---

तेव्हा मेघांतील विद्युल्लताच कीं काय, अशा प्रकारें रूपाने अप्रतिम असलेल्या त्या मेनकेला महातेजस्वी कुशिकवंशज विश्वामित्राने अवलोकन केलें आणि मदनाच्या कचाट्यांत सापडून तो मुनि तिला म्हणाला, " हे अप्सरे, तुझें स्वागत असो; तूं येथे माझ्या आश्रमामध्ये रहा. तुझें कल्याण असो; मदनाने मोहित झालेल्या मजवर तूं अनुग्रह कर. " याप्रमाणे विश्वामित्राने सांगितलें असतां ती सुंदरी मेनका तेथे राहिली. ( ५-७ )

तें एक तपश्चर्येचें मोठें विघ्नच विश्वामित्राला प्राप्त झालें. हे रघुवंशजा रामा, विश्वामित्राच्या शांत आश्रमामध्ये ती वास्तव्य करूं लागली असतां, विश्वामित्राचीं दहा वर्षें सुखाने गेलीं. तेव्हा तिच्या समागमामध्ये तितका काल लोटल्यावर महामुनि विश्वामित्र चिंता व शोक यांनी अगदी व्याप्त होऊन लज्जित झाल्यासारखा झाला आणि हे रघुनंदना रामा, क्रुद्ध झालेल्या त्या मुनीच्या मनामध्ये असा विचार आला की, " हें सर्व तपोनाशक महाकर्म देवांचेंच आहे. अरे, काममोहाने मी ग्रस्त झाल्यामुळे दहा वर्षें एका दिवसाप्रमाणे निघून गेलीं, अरे,

कामोहाभिभूतस्य विघ्नोऽयं प्रत्युपस्थितः ।
स निःश्वसन्मुनिवरः पश्चात्तापेन दुःखितः १२
भीतामप्सरसं दृष्ट्वा वेपन्तीं प्राञ्जलिं स्थिताम् ।
मेनकां मधुरैर्वाक्यैर्विसृज्य कुशिकात्मजः १३
उत्तरं पर्वतं राम विश्वामित्रो जगाम ह ।
स कृत्वा नैष्ठिकीं बुद्धिं जेतुकामो महायशाः १४
कौशिकीतीरमासाद्य तपस्तेपे दुरासदम् ।
तस्य वर्षसहस्राणि घोरं तप उपासतः १५
उत्तरे पर्वते राम देवतानामभूद्भयम् ।
अमन्त्रयन्समागम्य सर्वे सर्षिगणाः सुराः १६
महर्षिशब्दं लभतां साध्वयं कुशिकात्मजः ।
देवतानां वचः श्रुत्वा सर्वलोकपितामहः १७
अब्रवीन्मधुरं वाक्यं विश्वामित्रं तपोधनम् ।
महर्षे स्वागतं वत्स तपसोग्रेण तोषितः १८

---

ही अप्सरा हें एक विघ्नच उपस्थित झालें आहे. याप्रमाणे उस्मारत असलेला तो मुनिश्रेष्ठ विश्वामित्र पश्चात्तापानें अतिशय दुःखित झाला आणि मेनका अप्सरा भयभीत होऊन कापत कापत हात जोडून उभी राहिली आहे, असें अवलोकन केल्यावर मधुर शब्दांनी तिला निरोप देऊन, तो कुशिकवंशज विश्वामित्र उत्तर-पर्वतावर तप करण्यासाठी चालता झाला. ( ८–१३ )

हे रामा, नंतर काम जिंकण्या करिता कडकडीत ब्रह्मचर्य पाळण्याविषयी निश्चय करून तो महायशस्वी विश्वामित्र कौशिकी नदीचे तीरीं जाऊन, इतरांना होण्यास अशक्य असें तप करूं लागला. याप्रमाणे तो हजारो वर्षें उत्तर पर्वतावर घोर तपश्चर्या करूं लागला असतां देवतांना भय उत्पन्न झालें आणि ऋषिगणांसह-वर्तमान त्या सर्व देवांनी एकत्र जुळून, " या कुशिकवंशजाला महर्षि ही पदवी खुशाल प्राप्त होवो, " म्हणून ठरविलें. तेव्हा देवांचें भाषण श्रवण करून, सर्व लोकांचे उत्पादक ब्रह्मदेव तपोधन विश्वामित्राला मधुर वाणीने म्हणाले, " हे महर्षे, तुझें स्वागत असो. हे वत्सा, तुझ्या उग्र तपश्चर्येनें मी संतुष्ट झालों आहें.

महत्त्वमृषिमुख्यत्वं ददामि तव कौशिक ।
ब्रह्मणस्तु वचः श्रुत्वा विश्वामित्रस्तपोधनः १९
प्राञ्जलिः प्रणतो भूत्वा प्रत्युवाच पितामहम् ।
ब्रह्मर्षिशब्दमतुलं स्वार्जितैः कर्मभिः शुभैः २०
यदि मे भगवान्नाह ततोऽहं विजितेन्द्रियः ।
तमुवाच ततो ब्रह्मा न तावत्त्वं जितेन्द्रियः २१
यतस्व मुनिशार्दूल इत्युक्त्वा त्रिदिवं गतः ।
विप्रस्थितेषु देवेषु विश्वामित्रो महामुनिः २२
ऊर्ध्वबाहुर्निरालम्बो वायुभक्षस्तपश्चरन् ।
घर्मे पञ्चतपा भूत्वा वर्षास्वाकाशसंश्रयः २३
शिशिरे सलिलेशायी रात्र्यहानि तपोधनः ।
एवं वर्षसहस्रं हि तपो घोरमुपागमत् २४

हे कुशिकवंशजा, मी तुला महत्त्व आणि ऋषिमुख्यत्व ( म्हणजे श्रेष्ठ महर्षि ) ही पदवी देतों " हें ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण केल्यावर तपोधन विश्वामित्राने हात जोडून ब्रह्मदेवाला प्रणाम केला आणि तो त्याला म्हणाला, " ज्या अर्थी स्वसंपादित पुण्यकर्मांच्या योगाने आपण मला ब्रह्मर्षि ही अनुपम पदवी प्राप्त झाली, असें म्हणत नाहीं, त्या अर्थीं मी जितेंद्रिय नाहीं कीं काय ? " याप्रमाणे विश्वामित्राने विचारिलें असतां ब्रह्मदेवांनी त्याला उत्तर दिलें, " तूं अद्यापि जितेंद्रिय बनला नाहीस." ( १४–२१ )

"हे मुनिश्रेष्ठा, जितेंद्रिय बनण्याचा तूं प्रयत्न कर." याप्रमाणे ब्रह्मदेवांनी सांगितल्यानंतर देव चालते झाले असतां महामुनि विश्वामित्र कशाचाही आधार न धरतां हात वर करून आणि वायु भक्षण करून तपश्चर्या करूं लागला. ग्रीष्मऋतूमध्ये पंचाग्निसाधन करून तो तपश्चर्या करूं लागला; पर्जन्यकालीं केवळ आकाशाचेंच अवलंबन करून ( म्हणजे वस्त्रप्रावरणाची पर्वा न करतां उघड्या जागेमध्ये बसून ) तो तपश्चर्या करूं लागला आणि शीतकालामध्ये तर रात्रंदिवस उदकांत पडून तो तपोधन विश्वामित्र तप करूं लागला. याप्रमाणे घोर तपश्चर्या करतां करतां एक हजार वर्षें लोटलीं, तरी तो महामुनि विश्वामित्र तप करीतच

तस्मिन्संतप्यमाने तु विश्वामित्रे महामुनौ ।
संतापः सुमहानासीत्सुराणां वासवस्य च  २५
रम्भामप्सरसं शक्रः सर्वैः सह मरुद्गणैः ।
उवाचात्महितं वाक्यमहितं कौशिकस्य च  २६

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ६३ [१९००]

चतुष्षष्टितमः सर्गः ।

सुरकार्यमिदं रम्भे कर्तव्यं सुमहत्त्वया ।
लोभनं कौशिकस्येह काममोहसमन्वितम्  १
तथोक्ता साप्सरा राम सहस्राक्षेण धीमता ।
व्रीडिता प्राञ्जलिर्वाक्यं प्रत्युवाच सुरेश्वरम्  २
अयं सुरपते घोरो विश्वामित्रो महामुनिः ।
क्रोधमुत्स्रक्ष्यते घोरं मयि देव न संशयः  ३
ततो हि मे भयं देव प्रसादं कर्तुमर्हसि ।
एवमुक्तस्तया राम सभयं भीतया तदा  ४

होता. तेव्हा देव व देवाधिपति इंद्र यांना अतिशय ताप झाला आणि सर्व मरुद्गणासहवर्तमान इंद्र कुशिकवंशज विश्वामित्राच्या अहिताचें आणि स्वतःच्या हिताचें असें भाषण रंभानामक अप्सरेशीं करूं लागला. ( २२—२६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकाण्डापैकी त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६३ ॥

( इंद्र म्हणतो )–" हे रंभे, कुशिकवंशज विश्वामित्राला लुब्ध करून विषयमोहानें युक्त करणें हें फारच मोठें देवकार्य तुला केलें पाहिजे. " हे रामा, याप्रमाणे बुद्धिमान् इंन्द्रानें अप्सरेला सांगितलें असतां ती लज्जित झाली आणि हात जोडून त्या देवराजाला म्हणाली," हे देवाधिपते, हा महामुनि विश्वामित्र भयंकर आहे. तेव्हा, हे देवा, हा आपला भयंकर क्रोध माझ्यावर सोडील ( सर्व राग माझ्याचवर काढील ), यास्तव मला ( आपण सांगतां हें कार्य करण्याला ) भय वाटत आहे. करिता हे देवा, आपण मजवर कृपा करावी. " हे रामा, याप्रमाणे त्या भयभीत झालेल्या रंभेनें भीत भीत इंद्राला सांगितलें

*

तामुवाच सहस्राक्षो वेपमानां कृताञ्जलिम् ।
मा भैषी रम्भे भद्रं ते कुरुष्व मम शासनम् ५
कोकिलो हृदयग्राही माधवे रुचिरद्रुमे ।
अहं कन्दर्पसहितः स्थास्यामि तव पार्श्वतः ६
त्वं हि रूपं बहुगुणं कृत्वा परमभास्वरम् ।
तमृषिं कौशिकं भद्रे भेदयस्व तपस्विनम् ७
सा श्रुत्वा वचनं तस्य कृत्वा रूपमनुत्तमम् ।
लोभयामास ललिता विश्वामित्रं शुचिस्मिता ८
कोकिलस्य तु शुश्राव वल्गु व्याहरतः स्वनम् ।
संप्रहृष्टेन मनसा स चैनामन्ववैक्षत ९
अथ तस्य च शब्देन गीतेनाप्रतिमेन च ।
दर्शनेन च रम्भाया मुनिः संदेहमागतः १०
सहस्राक्षस्य तत्सर्वं विज्ञाय मुनिपुङ्गवः ।
रम्भां क्रोधमाविष्टः शशाप कुशिकात्मजः ११

---

असतां भयभीत होऊन हात जोडून उभी राहिलेल्या त्या रंभेला इंद्र म्हणाला, " हे रंभे, तूं भिऊं नकोस; तुझें कल्याण असो. माझ्या आज्ञेने तूं ही गोष्ट कर. वृक्ष-सौंदर्ययुक्त अशा वसंत ऋतूमध्ये मनोहर कोकिलपक्ष्याचें रूप धारण करून मी मदनासहवर्तमान तुझ्या सन्निध तत्पर राहीन. तूं अत्यंत उज्ज्वल आणि बहुगुण-संपन्न असें रूप धारण कर आणि, हे कल्याणि, त्या कुशिकवंशज तपोनिष्ठ ऋषीला तपश्चर्येपासून च्युत कर. " ( १–७)

हें इंद्राचें भाषण श्रवण केल्यावर त्या सुहास्यवदना सुंदरी रंभेने अनुपम रूप धारण करून विश्वामित्राला मोहित केलें. प्रथमतः मंजुल शब्द करीत असलेल्या कोकिल पक्ष्याचा ध्वनि प्रसन्न अंतःकरणाने विश्वामित्राने श्रवण केला; तों इतक्यांत रंभाही त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हा, त्याच्या त्या ध्वनीने, अप्रतिम गायनाने आणि रंभेच्या दर्शनाने विश्वामित्र मुनीला ( हिला इंद्राने पाठविली आहे किंवा माझी तपश्चर्या भग्न करण्याकरिता ही आपण होऊनच आली आहे, असा ) संशय आला व नंतर तें सर्व इंद्राचें कृत्य आहे, असें समजून आल्यावर

यन्मां लोभयसे रम्भे कामक्रोधजयैषिणम् ।
दश वर्ष सहस्राणि शैली स्थास्यसि दुर्भगे १२
ब्राह्मणः सुमहातेजास्तपोबलसमन्वितः ।
उद्धरिष्यति रम्भे त्वां मत्क्रोधकलुषीकृताम् १३
एवमुक्त्वा महातेजा विश्वामित्रो महामुनिः ।
अशक्नुवन्धारयितुं कोपं सन्तापमात्मनः १४
तस्य शापेन महता रम्भा शैली तदाभवत् ।
वचः श्रुत्वा च कन्दर्पौ महर्षेः स च निर्गतः १५
कोपेन च महातेजास्तपोऽपहरणे कृते ।
इन्द्रियैरजितै राम न लेभे शान्तिमात्मनः १६
बभूवास्य मनश्चिन्ता तपोऽपहरणे कृते ।
नैवं क्रोधं गमिष्यामि न च वक्ष्ये कथंचन १७
अथ वा नोच्छ्वसिष्यामि संवत्सरशतान्यपि ।

कुशिकवंशज मुनिश्रेष्ठ विश्वामित्राने क्रुद्ध होऊन रंभेला शाप दिला की," हे रंभे, काम आणि क्रोध जिंकण्याची इच्छा करीत असलेल्या मला ज्या अर्थी तूं लुब्ध करीत आहेस, त्या अर्थी, हे दुर्भगे, दहा हजार वर्षेपर्यंत तूं दगडाची मूर्ति बनून राहशील आणि हे रंभे, माझ्या क्रोधाने ग्रस्त केलेल्या तुझा उद्धार तपःसामर्थ्याने युक्त आणि फारच महातेजस्वी असा एक ब्राह्मण करील. " ( ८-१३ )

याप्रमाणे महातेजस्वी महामुनि विश्वामित्राने रंभेला शाप दिल्यावर क्रोध जिंकण्यास आपण समर्थ झालों नाही, म्हणून त्याला पश्चात्ताप झाला. त्याच्या त्या प्रचंड शापाने रंभाही तत्काळ पाषाणाची होऊन पडली व त्या विश्वामित्र महर्षींचें शापरूप भाषण श्रवण केल्यावर मदनही तेथून चालता झाला. हे रामा, इंद्रिय-दमन झालें नसल्यामुळे त्याप्रमाणे क्रोधाच्या योगाने तपश्चर्येचा व्यय झाला असतां विश्वामित्राच्या मनाला स्वस्थता वाटेना. याप्रमाणे क्रोधाने तपश्चर्येचा नाश झाला असतां विश्वामित्राच्या मनामध्ये असा विचार आला की," अशा प्रकारें मी कधीही क्रोधयुक्त होणार नाहीं आणि आता कांही झालें तरी भाषणही करणार नाहीं; अथवा ( इतकी पंचाईत कशाला ) शेकडो वर्षे लोटेपर्यंत मी मुळी श्वासो-

अहं हि शोषयिष्यामि आत्मानं विजितेन्द्रियः १८
तावद्यावद्धि मे प्राप्तं ब्राह्मण्यं तपसार्जितम् ।
अनुच्छ्वसन्नभुञ्जानस्तिष्ठेयं शाश्वतीः समाः १९
न हि मे तप्यमानस्य क्षयं यास्यन्ति मूर्तयः २०
एवं वर्षसहस्रस्य दीक्षां स मुनिपुङ्गवः ।
चकाराप्रतिमां लोके प्रतिज्ञां रघुनन्दन २१

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः । ६४ [२१२१]

पञ्चषष्टितमः सर्गः ।

अथ हैमवतीं राम दिशं त्यक्त्वा महामुनिः ।
पूर्वां दिशमनुप्राप्य तपस्तेपे सुदारुणम् १
मौनं वर्षसहस्रस्य कृत्वा व्रतमनुत्तमम् ।
चकाराप्रतिमं राम तपः परमदुष्करम् २
पूर्णे वर्षसहस्रे तु काष्ठभूतं महामुनिम् ।

---

च्छ्वासच करणार नाहीं आणि अशा रीतीने जितेंद्रिय राहून मी आपला देह शुष्क करून टाकीन. ( १४–१८ )

तात्पर्य, तपःसंपादित असें ब्राह्मण्य प्राप्त होईपर्यंत मी श्वासोच्छ्वास व आहार न करतां अनंत वर्षें तप करीत राहीन. तपश्चर्या करीत असल्यामुळे माझे अवयव मुळीच क्षीण होणार नाहीत. हे रघुनंदना रामा! याप्रमाणे हजार वर्षेंपर्यंत तपश्चर्येची दीक्षा घेण्याविषयी त्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्राने जगतांत जिला तोड नाही अशी, प्रतिज्ञा केली. ( १९–२१ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी चौसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६४ ॥

हे रामा, नंतर महामुनि विश्वामित्राने उत्तर दिशा सोडून देऊन पूर्व दिशेचें अवलंबन केलें आणि त्या ठिकाणीं अत्यंत उग्र तपश्चर्येला आरंभ केला. हे रामा, प्रथमतः सहस्र संवत्सरपर्यंत सर्वोत्कृष्ट मौनव्रत पाळण्याचा संकल्प करून इतरांना अत्यंत दुष्कर असें अप्रतिम तप त्याने केलें व तपाला आरंभ होऊन सहस्र संवत्सर पूर्ण झाल्यानंतर काष्ठवत् झालेल्या त्या महामुनीवर पुष्कळ विघ्नांचा जरी

विघ्नैर्बहुभिराधूतं क्रोधो नान्तरमाविशत् ३
स कृत्वा निश्चयं राम तप आतिष्ठताव्ययम् ।
तस्य वर्षसहस्रस्य व्रते पूर्णे महाव्रतः ४
भोक्तुमारब्धवानन्नं तस्मिन्काले रघूत्तम ।
इन्द्रो द्विजातिर्भूत्वा तं सिद्धमन्नमयाचत ५
तस्मै दत्त्वा तदा सिद्धं सर्वं विप्राय निश्चितः ।
निःशेषितेऽन्ने भगवानभुक्त्वैव महातपाः ६
न किञ्चिदवदद्विप्रं मौनव्रतमुपास्थितः ।
तथैवासीत्पुनर्मौनमनुच्छ्वासं चकार ह ७
अथ वर्षसहस्रं च नोच्छ्वसन्मुनिपुङ्गवः ।
तस्यानुच्छ्वसमानस्य मूर्ध्नि धूमो व्यजायत ८
त्रैलोक्यं येन संभ्रान्तमातापितमिवाभवत् ।
ततो देवर्षिगन्धर्वाः पन्नगोरगराक्षसाः ९

मारा झाला, तरी त्याचे ठिकाणीं क्रोधाचा प्रवेश झाला नाही; कारण, हे रामा क्रोध जिंकण्याविषयीं निश्चय करून त्याने अमोघ तपश्चर्येला आरंभ केला होता. असो. हजार वर्षेपर्यंत संकल्प केलेल्या तपाचें अनुष्ठान पूर्ण झाल्यावर त्या महाव्रतस्थ विश्वामित्राने, हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, अन्न भक्षण करण्याचा उपक्रम केला; परंतु, ब्राह्मणरूप घेऊन आलेल्या इन्द्राने तें तयार झाललें अन्न आपणासाठीं मागितलें. ( १-५ )

तेंव्हा, क्रोधसंयमनाविषयीं निश्चय केलेल्या विश्वामित्राने तयार झालेलें तें सर्व अन्न ब्राह्मणाला दिलें आणि याप्रमाणे ब्राह्मणाला देऊन अन्न निःशेष झाल्यावर भोजन न करतांच राहिलेल्या महातपस्वी भगवान् विश्वामित्राने ब्राह्मणांला चकार शब्दही न बोलतां पुनरपि मौनव्रताचें अवलंबन केलें. सारांश, श्वासोच्छ्वास न सोडतां त्याने त्याचप्रमाणे मौन धारण करून पुनरपि तपश्चर्येला आरंभ केला. अशा प्रकारें एक सहस्र संवत्सरपर्यंत जेव्हां श्वासही न सोडतां मुनिश्रेष्ठ विश्वामित्राने तपश्चर्या चालविली, तेव्हां उच्छ्वासरहित असलेल्या त्या मुनीच्या मस्तकाचे ठिकाणीं धूम उत्पन्न झाला व त्या धूमाने सर्व त्रैलोक्य गोंधळून जाऊन संतप्त

मोहितास्तपसा तस्य तेजसा मन्दरश्मयः ।
कश्मलोपहताः सर्वे पितामहमथाब्रुवन् १०
बहुभिः कारणैर्देव विश्वामित्रो महामुनिः ।
लोभितः क्रोधितश्चैव तपसा चाभिवर्धते ११
न ह्यस्य वृजिनं किञ्चिद् दृश्यते सूक्ष्ममप्युत ।
न दीयते यदि त्वस्य मनसा यदभीप्सितम् १२
विनाशयति त्रैलोक्यं तपसा सचराचरम् ।
व्याकुलाश्च दिशः सर्वा न च किञ्चित्प्रकाशते १३
सागराः क्षुभिताः सर्वे विशीर्यन्ते च पर्वताः ।
प्रकम्पन्ते च वसुधा वायुर्वातीह संकुलः १४
ब्रह्मन्न प्रतिजानीमो नास्तिको जायते जनः ।
संमूढमिव त्रैलोक्यं संप्रक्षुभितमानसम् १५

---

झाल्यासारखें झालें. तेव्हा त्याच्या तपोरूप तेजाच्या योगाने तेजोहीन, मोहित व मूर्छित झालेले सर्व देव, ऋषि, गंधर्व, पन्नग, उरग व राक्षस ब्रह्मदेवाला याप्रमाणे म्हणाले- ( ६–१० )

" हे देव, अनेक प्रकारांनी महामुनि विश्वामित्राला लुब्ध व क्रुद्ध करण्याचा यत्न केला असतांनाही त्याची परवा न करतां तपाच्या योगाने त्याचें महात्म्य वाढतच आहे. त्याचे ठिकाणीं कामक्रोधादिविषयक असा कोणताही दोष सूक्ष्म-सुद्धा दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. तेव्हा याने मनांत इच्छिलेलें जर दिलें नाही, तर तपश्चर्येच्या योगाने स्थावरजंगमात्मक प्राण्यांसहवर्तमान हा त्रैलोक्याचा नाश करील. सांप्रत सर्व दिशा धुंद झाल्या असून, प्रकाश असा कोठेही नाही. सर्व समुद्र खवळून गेले आहेत; पर्वत ढासळून पडत आहेत; भूमि कंपित होत आहे व वायु अतिशय क्षुब्ध होऊन वहात आहे. ( ११–१४ )

हे ब्रह्मन्, आम्हांला या प्रसंगीं कांहीं सुचत नाही. जगत्क्षोभ होऊं लागल्या-मुळे लोक ( स्वधर्मानुष्ठानाचा त्याग करून ) नास्तिक बनत चालले आहेत. सारांश, त्रैलोक्यांतील प्राण्यांचीं मनें क्षुब्ध झालेलीं असून, ते अगदी गोंधळून गेले आहेत व त्या महर्षीच्या तेजाने सूर्यही निस्तेज झाला आहे. यास्तव, हे देव,

भास्करो निष्प्रभश्चैव महर्षेस्तस्य तेजसा।
बुद्धिं न कुरुते यावन्नाशे देव महामुनिः १६
तावत्प्रसाद्यो भगवन्नग्निरूपो महाद्युतिः।
कालाग्निना यथा पूर्वं त्रैलोक्यं दह्यतेऽखिलम् १७
देवराज्यं चिकीर्षेत दीयतामस्य यन्मनः।
ततः सुरगणाः सर्वे पितामहपुरोगमाः १८
विश्वामित्रं महात्मानं वाक्यं मधुरमब्रुवन्।
ब्रह्मर्षे स्वागतं तेऽस्तु तपसा स्म सुतोषिताः १९
ब्राह्मण्यं तपसोग्रेण प्राप्तवानसि कौशिक।
दीर्घमायुश्च ते ब्रह्मन्ददामि समरुद्गणः २०
स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते गच्छ सौम्य यथासुखम्।
पितामहवचः श्रुत्वा सर्वेषां त्रिदिवौकसाम् २१
कृत्वा प्रणामं मुदितो व्याजहार महामुनिः।

---

महामुनि विश्वामित्राने जगताचा नाश करण्याचें मनामध्ये आणलें नाही, तोंच, हे भगवन्, या अग्नितुल्य महातेजस्वी विश्वामित्राला प्रसन्न करून घ्यावा. पूर्वी युगान्तकाळीं ज्याप्रमाणे कालाग्नीच्या योगाने संपूर्ण त्रैलोक्याचा दाह होत होता त्याप्रमाणे सांप्रत सर्व त्रैलोक्याचा दाह होत आहे. यास्तव, देवराज्याची जरी याला इच्छा असली, तरीसुद्धा ती आपण पूर्ण करा. तात्पर्य, ज्याची याला इच्छा असेल, तें आपण याला द्या." याप्रमाणे देवांनी ब्रह्मदेवाची विनंती केल्यानंतर ब्रह्मदेवप्रभृति ते सर्वही देवगण महात्म्या विश्वामित्राला मधुर शब्दांनी म्हणाले, "हे ब्रह्मर्षे, तुझें स्वागत असो. तुझ्या तपाने आम्ही फारच संतुष्ट झालों आहों, हे कुशिवंशजा, उग्र तपाच्या योगाने तुला ब्राह्मण्य प्राप्त झालें आहे. हे ब्रह्मन्, मी ( ब्रह्मदेव ) मरुद्गणांसहवर्तमान तुला दीर्घ आयुष्य देतों. ( १५-२० )

हे सत्त्वगुणसंपन्न मुने, तुला सुखप्राप्ति होवो; तुझें कल्याण असो. तपश्चर्या समाप्त करून, तूं आता खुशाल पाहिजे तिकडे जा." याप्रमाणे सर्व देवांकरिता ब्रह्मदेवाने केलेलें भाषण श्रवण केल्यावर महामुनि विश्वामित्रांनी आनंदित होऊन, सर्व देवांना प्रणाम केला आणि ते त्यांना म्हणाले," ब्राह्मण्य आणि त्याचप्रमाणे

ब्राह्मण्यं यदि मे प्राप्तं दीर्घमायुस्तथैव च २२
ओङ्कारोऽथ वषट्कारो वेदाश्च वरयन्तु माम् ।
क्षत्रवेदविदां श्रेष्ठो ब्रह्मवेदविदामपि २३
ब्रह्मपुत्रो वसिष्ठो मामेवं वदतु देवताः ।
यद्येवं परमः कामः कृतो यन्तु सुरर्षभाः २४
ततः प्रसादितो देवैर्वसिष्ठो जपतां वरः ।
सख्यं चकार ब्रह्मर्षिरेवमस्त्विति चाब्रवीत् २५
ब्रह्मर्षिस्त्वं न संदेहः सर्वं संपद्यते तव ।
इत्युक्त्वा देवताश्चापि सर्वा जग्मुर्यथागतम् २६
विश्वामित्रोऽपि धर्मात्मा लब्ध्वा ब्राह्मण्यमुत्तमम् ।
पूजयामास ब्रह्मर्षिं वसिष्ठं जपतां वरम् २७
कृतकामो महीं सर्वां चचार तपसि स्थितः ।
एवं त्वनेन ब्राह्मण्यं प्राप्तं राम महात्मना २८

---

दीर्घ आयुष्य जर मला प्राप्त झालें असेल,तर ओंकार, वषट्कार आणि वेद मला वरोत. ( सारांश, अध्यापन, याजन वगैरे कर्में करण्याचा मला अधिकार येवो ) आणि धनुर्विद्या जाणणाऱ्यांमध्ये व ब्रह्मविद्या जाणणाऱ्यांमध्येही श्रेष्ठ असलेला ब्रह्मपुत्र वसिष्ठ मला याप्रमाणे 'ब्राह्मण' म्हणो. अशा प्रकारें माझा मुख्य मनोरथ जर सिद्धीस गेला असेल, तर हे सुरश्रेष्ठहो, आपण स्वस्थानीं जावें." याप्रमाणे विश्वामित्रांनी सांगितलें असतां त्यांना ब्रह्मर्षि म्हणण्याविषयी देवांनी तपस्विश्रेष्ठ वसिष्ठमुनींचें मन वळविलें; तेव्हा त्या ब्रह्मर्षि वसिष्ठांनीही " तुमच्या म्हणण्याप्रमाणे हा ब्रह्मर्षि असो," असें म्हणून विश्वामित्राशीं सख्य केलें. ( २१–२५ )

नंतर "तूं ब्रह्मर्षि झालास, यांत संशय नाही; ब्राह्मण्यप्राप्तीला जें कांही आवश्यक आहे, तें सर्व तुला प्राप्त झालें आहे," असें म्हणून सर्व देवही आल्यामार्गानें परत गेले. याप्रमाणे सर्वोत्कृष्ट ब्राह्मण्य प्राप्त झाल्यावर धर्मात्म्या विश्वामित्र मुनींनीही ( भगवानांनी मला ब्रह्मर्षित्व प्राप्त करून देऊन कृतार्थ केलें, असें म्हणून ) तपस्वीश्रेष्ठ वसिष्ठ ब्रह्मर्षींचें अन्तःकरणपूर्वक स्तवन करून आभार मानले आणि कृतकृत्य झालेले हे विश्वामित्र मुनि तपोनिष्ठ राहून सर्व पृथ्वीवर संचार करूं

एष राम मुनिश्रेष्ठ एष विग्रहवाँस्तपः ।
एष धर्मः परो नित्यं वीर्यस्यैष परायणम् २९
एवमुक्त्वा महातेजा विरराम द्विजोत्तमः ।
शतानन्दवचः श्रुत्वा रामलक्ष्मणसन्निधौ ३०
जनकः प्राञ्जलिर्वाक्यमुवाच कुशिकात्मजम् ।
धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे मुनिपुङ्गव ३१
यज्ञं काकुत्स्थसहितः प्राप्तवानसि कौशिक ।
पावितोऽहं त्वया ब्रह्मन्दर्शनेन महामुने ३२
गुणा बहुविधाः प्राप्तास्तव संदर्शनान्मया ।
विस्तरेण च वै ब्रह्मन्कीर्त्यमानं महत्तपः ३३
श्रुतं मया महातेजो रामेण च महात्मना ।
सदस्यैः प्राप्य च सदः श्रुतास्ते बहवो गुणाः । ३४
अप्रमेयं तपस्तुभ्यमप्रमेयं च ते बलम् ।
अप्रमेया गुणाश्चैव नित्यं ते कुशिकात्मज ३५

---

लागले. हे रामा, या महात्म्या विश्वामित्र मुनींनी अशा प्रकारें ब्राह्मण्य प्राप्त करून घेतलें. हे रामा, हे मुनींमध्ये श्रेष्ठ आहेत; हे मूर्तिमंत तप आहेत; हे उत्कृष्ट धर्मच आहेत आणि वीर्याचेंही हे नित्य स्थानच आहेत." ( २६-२९ )

याप्रमाणे सांगून तो महातेजस्वी द्विजश्रेष्ठ शतानंद स्वस्थ बसला. तेव्हा रामलक्ष्मणांसन्निध झालेलें तें शतानंदाचें भाषण श्रवण केल्यावर ( मिथिलाधिपति ) जनक राजा हात जोडून कुशिकवंशज विश्वामित्रांना म्हणाला," हे मुनिश्रेष्ठ, मी धन्य आहें. ज्या अर्थी ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांसहवर्तमान आपण येथें माझ्या यज्ञाप्रत आला आहां, त्या अर्थी, हे कुशिकवंशज, माझ्यावर आपला अनुग्रहच झाला आहे. हे ब्रह्मन्, हे महामुने, दर्शन देऊन आपण मला आज पवित्र केलें. आपल्या दर्शनापासून मला अनेक प्रकारें लाभ झाला आणि हे ब्रह्मन्, आपल्या महाघोर तपाची कीर्तीही शतानन्दाचे मुखानें सविस्तर श्रवण केली. हे महातेजस्वी मुने, मी, महात्मा राम आणि सदस्य यांनी यज्ञमंडपामध्ये येऊन आपले अनेक गुण श्रवण केले. हे कुशिकवंशज मुने, आपलें तप अमर्याद आहे; आपलें

तृप्तिराश्चर्यभूतानां कथानां नास्ति मे विभो ।
कर्मकालो मुनिश्रेष्ठ लम्बते रविमण्डलम् ३६
श्वःप्रभाते महातेजो द्रष्टुमर्हसि मां पुनः ।
स्वागतं जपतां श्रेष्ठ मामनुज्ञातुमर्हसि ३७
एवमुक्तो मुनिवरः प्रशस्य पुरुषर्षभम् ।
विससर्जाशु जनकं प्रीतं प्रीतमनास्तदा ३८
एवमुक्त्वा मुनिश्रेष्ठं वैदेहो मिथिलाधिपः ।
प्रदक्षिणं चकाराशु सोपाध्यायः सबान्धवः ३९
विश्वामित्रोऽपि धर्मात्मा सहरामः सलक्ष्मणः ।
स्ववासमभिचक्राम पूज्यमानो महात्मभिः ४०

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः । ६५ [ १९६१ ]

षट्षष्टितमः सर्गः ।

ततः प्रभाते विमले कृतकर्मा नराधिपः ।

---

सामर्थ्य अतर्क्य आहे आणि आपले गुणही सर्वदा असंख्य आहेत. ( २०-३५ )

हे प्रभो, आपल्या आश्चर्यावह गोष्टी ऐकणें मला कधीच पुरेंसें व्हावयाचें नाही; परंतु, हे मुनिश्रेष्ठ, आता कर्मकालाचें अतिक्रमण होईल; रविमंडल अस्ताचलाकडे कललें आहे. हे महातेजस्वी मुने, आपण उदईक प्रातःकाली माझी पुनरपि भेट घ्यावी; आपलें स्वागत असो. हे तपस्विश्रेष्ठ, मला आपण आता अनुज्ञा द्यावी." याप्रमाणे जनक राजानें प्रार्थना केली असतां मनामध्ये प्रसन्न झालेल्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांनी संतुष्ट झालेल्या जनकाची प्रशंसा करून त्या पुरुषश्रेष्ठाला सत्वर अनुज्ञा दिली. असो. वर सांगितल्याप्रमाणे मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांची प्रार्थना केल्यावर मिथिलाधिपति विदेहराज जनक, उपाध्याय आणि बांधव यांसहवर्तमान स्वतः मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना प्रदक्षिणा करून, सत्वर गमन करता झाला व मोठमोठे प्रशंसा करीत असतांना धर्मात्मे विश्वामित्रही रामलक्ष्मणांसहवर्तमान आपल्या वसतिस्थानाकडे गेले. ( ३६-४० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पासष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥६५॥

विश्वामित्रं महात्मानमाजुहाव सराघवम् १
तमर्चयित्वा धर्मात्मा शास्त्रदृष्टेन कर्मणा ।
राघवौ च महात्मानौ तदा वाक्यमुवाच ह २
भगवन्स्वागतं तेऽस्तु किं करोमि तवानघ ।
भवानाज्ञापयतु मामाज्ञाप्यो भवता ह्यहम् ३
एवमुक्तः स धर्मात्मा जनकेन महात्मना ।
प्रत्युवाच मुनिश्रेष्ठो वाक्यं वाक्यविशारदः ४
पुत्रौ दशरथस्येमौ क्षत्रियौ लोकविश्रुतौ ।
द्रष्टुकामौ धनुःश्रेष्ठं यदेतत्त्वयि तिष्ठति ५
एतद्दर्शय भद्रं ते कृतकामौ नृपात्मजौ ।
दर्शनादस्य धनुषो यथेष्टं प्रतियास्यतः ६
एवमुक्तस्तु जनकः प्रत्युवाच महामुनिम् ।
श्रूयतामस्य धनुषो यदर्थमिह तिष्ठति ७
देवरात इति ख्यातो निमेर्ज्येष्ठो महीपतिः ।

---

तदनंतर चांगलें उजाडल्यावर जनक राजाने स्नानसंध्या आटोपून महात्म्या विश्वामित्राला राघवासहवर्तमान बोलावून आणिलें आणि सशास्त्रविधीनें त्या मुनींचें व रघुवंशज रामलक्ष्मणांचें पूजन करून तो धर्मात्मा जनक राजा त्यांना म्हणाला, " हे भगवन्, आपलें स्वागत असो. हे निष्पाप, मी आपलें काय कार्य करावें ती आपण आज्ञा करावी; मी आपला आज्ञाधारक आहें. " याप्रमाणे महात्म्या जनकाने प्रार्थना केली असतां संभाषण करण्यामध्ये निपुण असे धर्मात्मे मुनिश्रेष्ठ विश्वामित्र म्हणाले " हे जगद्विख्यात क्षत्रिय आहेत; हे दशरथाचे पुत्र आहेत आणि तुझ्यापाशी असलेलें श्रेष्ठ धनुष्य पाहण्याची त्यांची इच्छा आहे. करिता तूं त्यांना तें दाखीव. त्या धनुष्याच्या दर्शनाने हे राजकुमार कृतकृत्य होतील आणि खुशाल परत जातील. तुझें कल्याण असो. " ( १-६ )

याप्रमाणे विश्वामित्रांनी जनकाला सांगितलें असतां, तो त्या महामुनींना म्हणाला, " या धनुष्याची हकीकत आपण श्रवण करावी आणि तें येथे कशाकरिता आहे, तेंही श्रवण करावें. देवरात म्हणून निमीचा ज्येष्ठ पुत्र राजा होऊन

न्यासोऽयं तस्य भगवन्हस्ते दत्तो महात्मनः ८
दक्षयज्ञवधे पूर्वं धनुरायम्य वीर्यवान् ।
विध्वस्य त्रिदशान्रोषात्सलीलमिदमब्रवीत् ९
यस्माद्भागार्थिनो भागान्नाकल्पयत मे सुराः ।
वराङ्गानि महार्हाणि धनुषा शातयामि वः १०
ततो विमनसः सर्वे देवा वै मुनिपुङ्गव ।
प्रसादयन्त देवेशं तेषां प्रीतोऽभवद्भवः ।
प्रीतियुक्तस्तु सर्वेषां ददौ तेषां महात्मनाम् ११
तदेतद्देवदेवस्य धनूरत्नं महात्मनः ।
न्यासभूतं तदा न्यस्तमस्माकं पूर्वजे विभौ १२
अथ मे कृषतः क्षेत्रं लाङ्गलादुत्थिता ततः ।
क्षेत्रं शोधयता लब्धा नाम्ना सीतेति विश्रुता १३
भूतलादुत्थिता सा तु व्यवर्धत ममात्मजा ।

गेला. हे भगवन्, त्या महात्म्याच्या हातामध्ये ही चापरूप ठेव दिलेली आहे. पूर्वी दक्षयज्ञविध्वंसमयीं वीर्यवान् रुद्र क्रोधाने हें धनुष्य आकर्ण ओढून केवळ लीलेने देवांची दाणादाण उडवून म्हणाला, ' हे देवहो, मी हविर्भाग इच्छित असतांनाही ज्या अर्थी तुम्ही मला यज्ञभाग दिला नाही, त्या अर्थी धनुष्याच्या योगाने मी तुमचीं महापूजा योग्य मस्तकें तोडून टाकितों. ' ( ७—१० )

याप्रमाणे रुद्र जेव्हा म्हणाला, तेव्हा हे मुनिश्रेष्ठ, सर्व देव अगदी दीन झाले आणि ते देवाधिदेव शंकराला प्रसन्न करून घेऊं लागले. तेव्हा शंकरही त्यांच्यावर प्रसन्न झाले आणि प्रसन्न होऊन त्या सर्व महात्म्यांना तें ( संहारार्थ धारण केलेलें ) धनुष्य त्यांनी देऊन टाकिलें. तें हें महात्म्या देवाधिदेव शंकराचें श्रेष्ठ धनुष्य आमच्या समर्थ पूर्वजांपाशी देवांनी ठेव म्हणून त्या वेळीं ठेविलें आहे. असो. मी ( अग्निचयनाकरिता ) क्षेत्र शुद्ध करण्याच्या उद्देशाने जमीन नांगरूं लागलों असतां नांगरांतून एक कन्या मला प्राप्त झाली व ती नांगरापासून निघाली, म्हणून सीता या नांवाने प्रसिद्ध झाली. ती यज्ञभूमीपासून उत्पन्न झालेली माझी कन्या वाढीला लागली. तेव्हा, वीर्यशुल्का ( म्हणजे हें त्र्यंबक चाप सज्ज

वीर्यशुल्केति मे कन्या स्थापितेऽयमयोनिजा  १४
भूतलादुत्थितां तां तु वर्धमानां ममात्मजाम् ।
वरयामासुरागत्य राजानो मुनिपुङ्गव  १५
तेषां वरयतां कन्यां सर्वेषां पृथिवीक्षिताम् ।
वीर्यशुल्केति भगवन्न ददामि सुतामहम्  १६
ततः सर्वे नृपतयः समेत्य मुनिपुङ्गव ।
मिथिलामभ्युपागम्य वीर्यं जिज्ञासवस्तदा  १७
तेषां जिज्ञासमानानां शैवं धनुरुपाहृतम् ।
न शेकुर्ग्रहणे तस्य धनुषस्तोलनेऽपि वा  १८
तेषां वीर्यवतां वीर्यमल्पं ज्ञात्वा महामुने ।
प्रत्याख्याता नृपतयस्तन्निबोध तपोधन  १९
ततः परमकोपेन राजानो मुनिपुङ्गव ।
अरुन्धन्मिथिलां सर्वे वीर्यसंदेहमागताः  २०

---

करण्याला समर्थ असें ज्याचें वीर्य असेल, त्यालाच ही द्यावयाची, असा पण करून मी ही अयोनिसंभव कन्या जतन करून ठेविली. ( ११–१४ )

पुढे भूतलापासून उत्पन्न झालेली माझी कन्या मोठी होऊं लागली असतां, हे मुनिश्रेष्ठ, राजांनी येऊन तिच्यासंबंधाने मागणी घातली; परंतु, नुसती मागणी घालणाऱ्या त्या सर्व राजांपैकी मी एकालाही आपली कन्या वीर्यशुल्का म्हणून ( म्हणजे हें त्र्यंबक चाप जो सज्ज करील त्यालाच ही द्यावयाची असा माझा पण असल्याकारणाने ) दिली नाही. तदनंतर, हे मुनिश्रेष्ठ, सर्व राजे आपआपल्या सामर्थ्याचा अदमास पाहण्याकरिता एकत्र जमून मिथिला नगरीप्रत आले. तेव्हा सामर्थ्याचा अदमास पाहूं इच्छिणाऱ्या त्या राजांच्यासमोर त्र्यंबकचाप आणून ठेविलें असतां, ते तें धनुष्य उचलण्यास किंवा तोलण्यास समर्थ झाले नाहीत. तेव्हा, हे महामुने, त्या वीर्यवानांचें वीर्य अल्प आहे, असें जाणून मी त्यांना नाकारिलें; परंतु, त्याचा परिणाम काय झाला तो, हे तपोधन, आपण ऐका. मी कन्या देण्याचें नाकारल्यावर, हे मुनिश्रेष्ठ, वीर्याविषयी संशय आलेल्या त्या सर्वही राजांनी मोठ्या रागाने मिथिला नगरी वेढून टाकिली आणि मी त्यांचा

आत्मानमवधूतं मे विज्ञाय नृपपुङ्गवाः ।
रोषेण महताविष्टाः पीडयन्मिथिलां पुरीम् २१
ततः संवत्सरे पूर्णे क्षयं यातानि सर्वशः ।
साधनानि मुनिश्रेष्ठ ततोऽहं भृशदुःखितः २२
ततो देवगणान्सर्वांस्तपसाहं प्रसादयम् ।
ददुश्च परमप्रीताश्चतुरङ्गबलं सुराः २३
ततो भग्ना नृपतयो हन्यमाना दिशो ययुः ।
अवीर्या वीर्यसंदिग्धाः सामात्याः पापकारिणः २४
तदेतन्मुनिशार्दूल धनुः परमभास्वरम् ।
रामलक्ष्मणयोश्चापि दर्शयिष्यामि सुव्रत २५
यद्यस्य धनुषो रामः कुर्यादारोपणं मुने ।
सुतामयोनिजां सीतां दद्यां दाशरथेरहम् २६

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥६६॥ [१९८७]

तिरस्कार केला, असें समजून अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या सर्वही श्रेष्ठ राजांनी मिथिला नगरीला पीडा दिली. ( १५-२१ )

तदनंतर वेढा पडून एक संपूर्ण वर्ष लोटल्यावर ( किल्ल्यामध्ये सर्व बाजूंनीं कोंडले गेल्याकारणाने ) सर्व प्रकारचीं साधनें संपून गेलीं, तेव्हा हे मुनिश्रेष्ठा, मी अत्यंत दुःखित झालों. नंतर सर्व देवगणांना तपश्चर्येच्या योगाने मी प्रसन्न केलें असतां अत्यंत प्रसन्न झालेल्या देवांनी मला चतुरंग सैन्य दिलें. तदनंतर माझ्या सैन्याचा मारा होऊं लागला असतां, स्वतःच्या वीर्याविषयी संदेह उत्पन्न झाला आहे ज्यांना असे, ते अल्पवीर्य पापी राजे मोड झाल्यामुळे अमात्यांसहवर्तमान वाट फुटेल तिकडे पळूं लागले. सारांश, हे महातेजस्वी मुनिश्रेष्ठा, (अशी ज्या धनुष्याची हकीकत आहे ) तें हें अत्यंत उज्ज्वल धनुष्य रामलक्ष्मणांनाही मी दाखवीन आणि हे मुने, राम जर हें धनुष्य सज्ज करील, तर अयोनिसंभव सीता मी या दशरथपुत्राला देईन. ” ( २२-२६ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी सहासष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६६ ॥

सप्तषष्टितमः सर्गः ।

जनकस्य वचः श्रुत्वा विश्वामित्रो महामुनिः ।
धनुर्दर्शय रामाय इति होवाच पार्थिवम् १
ततः स राजा जनकः सचिवान्व्यादिदेश ह ।
धनुरानीयतां दिव्यं गन्धमाल्यानुलेपितम् २
जनकेन समादिष्टाः सचिवाः प्राविशन्पुरम् ।
तद्धनुः पुरतः कृत्वा निर्जग्मुरमितौजसः ३
नृणां शतानि पञ्चाशद्व्यायतानां महात्मनाम् ।
मञ्जूषामष्टचक्रान्तां समूहुस्ते कथंचन ४
तामादाय सुमञ्जूषामायसीं यत्र तद्धनुः ।
सुरोपमं ते जनकमूचुर्नृपतिमान्त्रिणः ५
इदं धनुर्वरं राजन्पूजितं सर्वराजभिः ।
मिथिलाधिप राजेन्द्र दर्शनीयं यदीच्छसि ६
तेषां नृपो वचः श्रुत्वा कृताञ्जलिरभाषत ।
विश्वामित्रं महात्मानं तावुभौ रामलक्ष्मणौ ७

जनक राजाचें भाषण श्रवण केल्यावर महामुनि विश्वामित्रांनी "रामाला धनुष्य दाखीव," म्हणून राजाला सांगितलें. तदनंतर "गंध व पुष्पें घालून ठेविलेलें दिव्य धनुष्य आण," म्हणून त्या जनक राजानें अमात्यांना सांगितलें. तेव्हा जनकाची आज्ञा झालेले ते सचीव नगरामध्यें गेले आणि तें धनुष्य पुढें घालून ते अपरिमित सामर्थ्यवान् अमात्य बाहेर आले. मोठमोठ्या धिप्पाड व उंच अशा पांच हजार पुरुषांनी कशीतरी ती आठचाकी धनुष्याची पेटी ओढून आणिली. ज्यांत तें धनुष्य होतें, ती लोखंडी पेटी ओढून आणिल्यावर ते मंत्री त्या देवतुल्य जनक राजाला म्हणाले. (१-५)

"हे राजा, सर्व राजांना पूज्य असें हें श्रेष्ठ धनुष्य आणिलें आहे. हे मिथिलाधिपते नृपश्रेष्ठा, तुला जर हें दाखविण्याची इच्छा असेल, तर दाखीव." याप्रमाणे त्यांचें भाषण श्रवण केल्यावर जनक राजा महात्म्या विश्वामित्राला व त्या उभयता रामलक्ष्मणांना म्हणाला, "हे ब्रह्मन्, जनक राजांनी आणि महासामर्थ्यवान्,

इदं धनुर्वरं ब्रह्मञ्जनकैरभिपूजितम् ।
राजभिश्च महावीर्यैरशक्तैः पूरितुं तदा ८
नैतत्सुरगणाः सर्वे सासुरा न च राक्षसाः ।
गन्धर्वयक्षप्रवराः सकिन्नरमहोरगाः ९
क्व गतिर्मानुषाणां च धनुषोऽस्य प्रपूरणे ।
आरोपणे समायोगे वेपने तोलने तथा १०
तदेतद्धनुषां श्रेष्ठमानीतं मुनिपुङ्गव ।
दर्शयैतन्महाभाग अनयो राजपुत्रयोः ११
विश्वामित्रः सरामस्तु श्रुत्वा जनकभाषितम् ।
वत्स राम धनुः पश्य इति राघवमब्रवीत् १२
महर्षेर्वचनाद्रामो यत्र तिष्ठति तद्धनुः ।
मञ्जूषां तामपावृत्य दृष्ट्वा धनुरथाब्रवीत् १३
इदं धनुर्वरं दिव्यं संस्पृशामीह पाणिना ।
यत्नवांश्च भविष्यामि तोलने पूरणेऽपि वा १४

परंतु सज्ज करण्यास असमर्थ अशा इतर राजांनीही पूजा करून ठेविलेलें हें श्रेष्ठ धनुष्य होय. सर्व देवगण, असुरांसहवर्तमान राक्षस, मोठमोठे गंधर्व आणि यक्ष व किन्नर आणि महोरग यांपैकी कोणीही हें धनुष्य सज्ज करण्यास समर्थ नाहींत. कानापर्यंत हें धनुष्य ओढण्याचें, तें सज्ज करण्याचें, त्याला बाण लावण्याचें, प्रत्यंचा ओढण्याचें आणि हाताने तोलून पाहण्याचें सामर्थ्य मानवांचे ठिकाणीं कोठून असणार? ( ८-१० )

हे मुनिश्रेष्ठ, तें हें श्रेष्ठ धनुष्य आणिलें आहे. महाभाग्यवान् मुने, हें आपण या राजपुत्रांना दाखवा.” हें जनक राजाचें भाषण रामासहवर्तमान बसलेल्या विश्वामित्रांनी ऐकिल्यावर, “ वत्सा रामा, धनुष्य पहा, ” असें ते रघुवंशज रामाला म्हणाले. तेव्हा त्या महर्षींनी सांगितल्यावरून ज्या पेटींत तें धनुष्य होतें, ती पेटी उघडून धनुष्य पाहून राम म्हणाला,“या दिव्य व श्रेष्ठ धनुष्याला मी या पेटीमध्ये हात लाविला आहे. हें तोलण्याचा व कर्णापर्यंत ओढण्याचा मी यत्न करून पाहतों. ” याप्रमाणे रामानें म्हटलें असतां “ ठीक आहे, ”

बाढमित्यब्रवीद्राजा मुनिश्च समभाषत ।
लीलया सधनुर्मध्ये जग्राह वचनान्मुनेः          १५
पश्यतां नृसहस्राणां बहूनां रघुनन्दनः ।
आरोपयत्स धर्मात्मा सलीलमिव तद्धनुः          १६
आरोपयित्वा मौर्वीं च पूरयामास तद्धनुः ।
तद्बभञ्ज धनुर्मध्ये नरश्रेष्ठो महायशाः          १७
तस्य शब्दो महानासीन्निर्घातसमनिःस्वनः ।
भूमिकम्पश्च सुमहान्पर्वतस्येव दीर्यतः          १८
निपेतुश्च नराः सर्वे तेन शब्देन मोहिताः ।
वर्जयित्वा मुनिवरं राजानं तौ च राघवौ          १९
प्रत्याश्वस्ते जने तस्मिन्राजा विगतसाध्वसः ।
उवाच प्राञ्जलिर्वाक्यं वाक्यज्ञो मुनिपुङ्गवम्          २०
भगवन्दृष्टवीर्यो मे रामो दशरथात्मजः ।
अत्यद्भुतमचिन्त्यं च अतर्कितमिदं मया          २१

म्हणून जनक राजा आणि विश्वामित्र मुनि यांनी त्याला सांगितल्यावर मुनींच्या वचनावरून त्याने तें धनुष्य मध्ये धरून सहज उचलिलें. ( ११—१५ )

आणि पुष्कळ म्हणजे हजारो राजे पहात असतांना त्या धर्मात्म्या रामाने त्या धनुष्याला सहज प्रत्यंचा चढविली. याप्रमाणे प्रत्यंचा चढविल्यानंतर तें धनुष्य त्या पुरुषश्रेष्ठ महायशस्वी रामाने कानापर्यंत ओढिलें मात्र, तोंच तें मधूनच काडकन मोडलें. त्या वेळीं वीज कडाडल्याप्रमाणे त्याचा मोठा शब्द झाला आणि विदीर्ण होणाऱ्या पर्वताचे समीप जसा भूकंप होतो, तसा फारच मोठा भूकंप झाला व त्या शब्दाच्या योगाने मुनिश्रेष्ठ विश्वामित्र, जनक राजा आणि ते रघुवंशज रामलक्ष्मण यांवाचून इतर सर्व लोक मूर्छित होऊन पडले. नंतर लोक सावध झाल्यावर ( कन्या अविवाहित राहण्याच्या ) भीतींतून मुक्त झालेला संभाषणज्ञ जनक राजा त्यावेळीं हात जोडून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हणाला-( १६—२० )

"हे भगवन्, दशरथपुत्र रामाचें वीर्य मी अवलोकन केलें. हीं अत्यंत अद्भुत

*

जनकानां कुले कीर्तिमाहरिष्यति मे सुता ।
सीता भर्तारमासाद्य रामं दशरथात्मजम् २२
मम सत्या प्रतिज्ञा सा वीर्यशुल्केति कौशिक ।
सीता प्राणैर्बहुमता देया रामाय मे सुता २३
भवतोऽनुमते ब्रह्मञ्छीघ्रं गच्छन्तु मन्त्रिणः ।
मम कौशिक भद्रं ते अयोध्यां त्वरिता रथैः २४
राजानं प्रश्रितैर्वाक्यैरानयन्तु पुरं मम ।
प्रदानं वीर्यशुल्कायाः कथयन्तु च सर्वशः २५
मुनिगुप्तौ च काकुत्स्थौ कथयन्तु नृपाय वै ।
प्रीतियुक्तं तु राजानमानयन्तु सुशीघ्रगाः २६
कौशिकस्तु तथेत्याह राजा चाभाष्य मन्त्रिणः ।
अयोध्यां प्रेषयामास धर्मात्मा कृतशासनम् २७

---

गोष्ट याच्या हातून होईल, असें माझ्या गावींही नव्हतें व माझा तर्कही नव्हता. जनक राजांच्या कुलामध्ये ही माझी कन्या सीता दशरथपुत्र रामाला भर्ता प्राप्त करून घेऊन कीर्ति संपादन करील. हे कुशिकवंशज मुने, सीता वीर्यशुल्का म्हणून जी माझी प्रतिज्ञा होती, ती शेवटास गेली. आता प्राणापेक्षाही प्रिय असलेली ही माझी कन्या रामाला द्यावयाची. करिता, हे ब्रह्मन्, हे कौशिकमुने, आपले देव बरें करो; रथ बरोबर घेऊन माझ्या मंत्र्यांना आपल्या अनुमतानें अयोध्येप्रत सत्वर जाऊं द्या व सविनय शब्दांनी प्रार्थना करून दशरथ राजाला माझ्या नगराप्रत त्यांना घेऊन येऊं द्या. सारांश, वीर्यशुल्का कन्येच्या दानासंबंधानें येथे घडलेला सर्व वृत्तान्त त्यांना तेथे कथन करूं द्या. ( २१–२५ )

रामलक्ष्मणांचें रक्षण मुनींनी केलें आहे, म्हणून त्यांना राजाला निवेदन करूं द्या आणि प्रसन्न झालेल्या दशरथ राजाला त्या अत्यंत शीघ्र गमन करणाऱ्या मंत्र्यांना आणूं द्या." यावर कौशिक मुनींनी "ठीक आहे," असें सांगितल्यानंतर त्या धर्मात्म्या राजानेही त्याप्रमाणे आज्ञा पाळीत असलेल्या मंत्र्यांना सांगितलें आणि घडलेला वृत्तान्त राजाला निवेदन करून, त्याला आणण्याकरिता त्यांना

यथावृत्तं समाख्यातुमानेतुं च नृपं तथा २८

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः ॥६७॥ [२०१५]

अष्टषष्टितमः सर्गः ।

जनकेन समादिष्टा दूतास्ते क्लान्तवाहनाः ।
त्रिरात्रमुषिता मार्गे तेऽयोध्यां प्राविशन्पुरीम् १
ते राजवचनाद्गत्वा राजवेश्म प्रवेशिताः ।
ददृशुर्देवसंकाशं वृद्धं दशरथं नृपम् २
बद्धाञ्जलिपुटाः सर्वे दूता विगतसाध्वसाः ।
राजानं प्रश्रितं वाक्यमब्रुवन्मधुराक्षरम् ३
मैथिलो जनको राजा साग्निहोत्रपुरस्कृतः ।
मुहुर्मुहुर्मधुरया स्नेहसंरक्तया गिरा ४
कुशलं चाव्ययं चैव सोपाध्यायपुरोहितम् ।
जनकस्त्वां महाराजा पृच्छते सपुरःसरम् ५
पृष्ट्वा कुशलमव्यग्रं वैदेहो मिथिलाधिपः ।

---

अयोध्येप्रत पाठविलें ( २६-२८ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६७ ॥

जनक राजाचे आज्ञेने निघालेले ते दूत (तातडीने अति लांबच्या मजला मारीत गेल्याकारणाने ) घोडे थकून गेल्यामुळे मार्गामध्ये रात्रीं तीन ठिकाणीं मुक्काम करून, अयोध्या नगरीला पोहोचले व राजवाड्यांत गेल्यावर आम्ही मिथिलाधिपति जनक राजाकडून आलों आहोंत, असें सांगितल्यावर द्वारपालांनी त्यांचा आंत प्रवेश करविला असतां देवतुल्य व वृद्ध दशरथ राजाला त्यांनी अवलोकन केलें आणि निर्भयपणाने ते + सर्व दूत हात जोडून मधुर शब्दांनी विनयपूर्वक राजाला म्हणाले " ऋत्विजांसहवर्तमान असलेला मिथिलाधिपति जनक राजा स्निग्ध व मधुर वाणीने वारंवार—हे महाराजा, उपाध्याय, पुरोहित आणि सेवक यांसहवर्तमान तुला अखंड कुशल विचारीत आहे आणि स्वस्थांतःकरणपूर्वक कुशल प्रश्न करून, त्या

---

+ बरोबरीच्या राजाकडून आले असल्याकारणाने निर्भयपणाने.

कौशिकानुमते वाक्यं भवन्तमिदमब्रवीत् ६
पूर्वं प्रतिज्ञा विदिता वीर्यशुल्का ममात्मजा ।
राजानश्च कृतामर्षा निर्वीर्या विमुखीकृताः ७
सेयं मम सुता राजन्विश्वामित्रपुरस्कृतैः ।
यदृच्छयागतै राजन्निर्जिता तव पुत्रकैः ८
तच्च रत्नं धनुर्दिव्यं मध्ये भग्नं महात्मना ।
रामेण हि महाबाहो महत्यां जनसंसदि ९
अस्मै देया मया सीता वीर्यशुल्का महात्मने ।
प्रतिज्ञां तर्तुमिच्छामि तदनुज्ञातुमर्हसि १०
सोपाध्यायो महाराज पुरोहितपुरस्कृतः ।
शीघ्रमागच्छ भद्रं ते द्रष्टुमर्हसि राघवौ ११
प्रतिज्ञां मम राजेन्द्र निर्वर्तयितुमर्हसि ।
पुत्रयोरुभयोरेव प्रीतिं त्वमुपलप्स्यसे १२
एवं विदेहाधिपतिर्मधुरं वाक्यमब्रवीत् ।

---

विदेहदेशाधिपति मिथिलाधिपतीनें विश्वामित्र मुनींच्या अनुमतानें आपणांला असा निरोप सांगितला आहे. ( १–६ )

" माझी कन्या वीर्यशुल्का—ही माझी प्रतिज्ञा आपणांला विदितच आहे. यामुळे निर्वीर्य राजे मी नाकारिल्याकारणानें क्रुद्ध होऊन, परत गेलेले आहेत, तीं ही माझी कन्या, हे राजा, विश्वामित्रमुनींसहवर्तमान सहज आलेल्या आपल्या चिरंजीवांनी जिंकिली; कारण, तें दिव्य श्रेष्ठ धनुष्य, हे महापराक्रमी भूपते, लोकांच्या प्रचंड समाजांत महात्म्या रामानें मध्येच मोडून टाकिलें. तस्मात्, वीर्यशुल्का सीता या महात्म्या रामाला देऊन मीं आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेण्याचें मनांत आणिलें आहे; तर त्याला आपलें अनुमोदन असावें. हे महाराज, आपलें देव बरें करो. आपण उपाध्याय आणि पुरोहित यांसहवर्तमान रामलक्ष्मणांना भेटण्याकरिता सत्वर चला. ( ७–११ )

हे राजाधिराज, माझी प्रतिज्ञा आपण शेवटास न्यावी आणि उभयतांही पुत्रांचें विवाहसुख आपण अनुभवावें." याप्रमाणे विश्वामित्रांची अनुज्ञा घेऊन शतानंदाच्या

विश्वामित्राभ्यनुज्ञातः शतानन्दमते स्थितः 13
दूतवाक्यं तु तच्छ्रुत्वा राजा परमहर्षितः ।
वसिष्ठं वामदेवं च मन्त्रिणश्चैवमब्रवीत् 14
गुप्तः कुशिकपुत्रेण कौसल्यानन्दवर्धनः ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा विदेहेषु वसत्यसौ 15
दृष्टवीर्यस्तु काकुत्स्थो जनकेन महात्मना ।
संप्रदानं सुतायास्तु राघवे कर्तुमिच्छति 16
यदि वो रोचते वृत्तं जनकस्य महात्मनः ।
पुरीं गच्छामहे शीघ्रं मा भूत्कालस्य पर्ययः 17
मन्त्रिणो बाढमित्याहुः सह सर्वैर्महर्षिभिः ।
सुप्रीतश्चाब्रवीद्राजा श्वो यात्रेति च मन्त्रिणः 18
मन्त्रिणस्तु नरेन्द्रस्य रात्रिं परमसत्कृताः ।
ऊषुः प्रमुदिताः सर्वे गुणैः सर्वैः समन्विताः 19

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः । ६८ [२०३४]

मताप्रमाणे वागणाऱ्या जनक राजाने मधुर शब्दांनी आपणांला निरोप सांगितला आहे. तो दूतांचा निरोप ऐकून घेऊन दशरथ राजाला पराकाष्ठेचा हर्ष झाला आणि वसिष्ठ, वामदेव व इतरही मंत्री यांना तो म्हणाला, " कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या रामाचें कुशिकवंशज विश्वामित्र मुनींनी रक्षण केलें असून, भ्राता लक्ष्मणासहवर्तमान तो विदेह देशामध्ये वास्तव्य करीत आहे. महात्म्या जनकानें या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचें वीर्य अवलोकन केलें आहे आणि म्हणूनच तो या रघुवंशज रामाला आपली कन्या देऊं इच्छीत आहे. ( १२–१६ )

आपणांला जर महात्म्या जनकाच्या घरची चालरीत ( शरीरसंबंध करण्याला ) योग्य वाटत असेल, तर आपण सत्वर त्याच्या नगरीप्रत जाऊं; कालातिक्रमण होणें योग्य नाही. " याप्रमाणे दशरथ राजाने विचारिलें असतां सर्व महर्षींसहवर्तमान मंत्र्यांनी त्याला " ठीक आहे, " म्हणून म्हटलें. तेव्हा " उदईक प्रयाण " म्हणून अत्यंत प्रसन्न झालेल्या दशरथ राजाने सांगितलें व दशरथ राजाला परम मान्य असलेले ते सर्वगुणसंपन्न मंत्री रात्रभर आनंदामध्ये राहिले. ( १७–१९ )

एकोनसप्ततितमः सर्गः ।

ततो रात्र्यां व्यतीतायां सोपाध्यायः सबान्धवः ।
राजा दशरथो हृष्टः सुमन्त्रमिदमब्रवीत् १
अद्य सर्वे धनाध्यक्षा धनमादाय पुष्कलम् ।
व्रजन्त्वग्रे सुविहिता नानारत्नसमन्विताः २
चतुरङ्गबलं चापि शीघ्रं निर्यातु सर्वशः ।
ममाज्ञा समकालं च यानं युग्यमनुत्तमम् ३
वसिष्ठो वामदेवश्च जाबालिरथ कश्यपः ।
मार्कण्डेयस्तु दीर्घायुर्ऋषिः कात्यायनस्तथा ४
एते द्विजाः प्रयान्त्वग्रे स्यन्दनं योजयस्व मे ।
यथा कालात्ययो न स्याद्दूता हि त्वरयन्ति माम् ५
वचनाच्च नरेन्द्रस्य सेना च चतुरङ्गिणी ।
राजानमृषिभिः सार्धं व्रजन्तं पृष्ठतोऽन्वयात् ६
गत्वा चतुरहं मार्गं विदेहानभ्युपेयिवान् ।

---

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६८ ॥

तदनंतर ती रात्र गेल्यावर उपाध्याय आणि बांधव यांसहवर्तमान दशरथ राजा आनंदित होऊन सुमंत्राला म्हणाला, " आज सर्व खजिनदारांना नाना प्रकारचीं रत्नें व विपुल द्रव्य बरोबर घेऊन मोठ्या बंदोबस्ताने पुढे चालूं लागूं द्या; चतुरंग सैन्य सर्व प्रकारें सत्वर बाहेर पडूं द्या आणि मी आज्ञा केल्याबरोबर शिबिका, अश्व वगैरे उत्कृष्ट वाहनें ( वसिष्ठादिकांकरितां ) तयार असूं द्या. वसिष्ठ, वामदेव, जाबालि, कश्यप, दीर्घायु मार्कंडेय ऋषि व कात्यायन या ब्राह्मणांना पुढे जाऊं द्या व तूंही माझा रथ जोड; विलंब होतां उपयोगी नाही. हे दूत मला घाई करीत आहेत. " याप्रमाणे दशरथ राजाने सांगितल्यावरून ऋषींसहवर्तमान निघालेल्या त्याच्या मागोमाग चतुरंग सेना चालूं लागली. (१–६)

चार दिवस मार्गामध्ये काढल्यानंतर दशरथ राजा विदेह देशाला जाऊन पोचला. दशरथ राजा आल्याचें ऐकिल्याबरोबर वैभवशाली जनक राजाने

राजा च जनकः श्रीमाञ्छ्रुत्वा पूजामकल्पयत् ७
ततो राजानमासाद्य वृद्धं दशरथं नृपम् ।
मुदितो जनको राजा प्रहर्षं परमं ययौ ।
उवाच वचनं श्रेष्ठो नरश्रेष्ठं मुदान्वितम् ८
स्वागतं ते नरश्रेष्ठ दिष्ट्या प्राप्तोऽसि राघव ।
पुत्रयोरुभयोः प्रीतिं लप्स्यसे वीर्यनिर्जिताम् ९
दिष्ट्या प्राप्तो महातेजा वसिष्ठो भगवानृषिः ।
सह सर्वैर्द्विजश्रेष्ठैर्देवैरिव शतक्रतुः १०
दिष्ट्या मे निर्जिता विघ्ना दिष्ट्या मे पूजितं कुलम् ।
राघवैः सह संबन्धाद्वीर्यश्रेष्ठैर्महाबलैः ११
श्वः प्रभाते नरेन्द्र त्वं संवर्तयितुमर्हसि ।
यज्ञस्यान्ते नरश्रेष्ठ विवाहमृषिसत्तमैः १२
तस्य तद्वचनं श्रुत्वा ऋषिमध्ये नराधिपः ।
वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठः प्रत्युवाच महीपतिम् १३

त्याचा आदरसत्कार केला व वृद्ध दशरथ राजाची भेट झाल्यावर आधींच आनंदित झालेल्या जनक राजाला पराकाष्ठेचा हर्ष झाला आणि तो श्रेष्ठ जनक राजा आनंदयुक्त झालेल्या पुरुषश्रेष्ठ दशरथ राजाला म्हणाला, “ हे पुरुषश्रेष्ठा, तुझें स्वागत असो. हे रघुवंशजा, तूं आलास ही गोष्ट फार चांगली झाली. तुझ्या पुत्रांनी आपल्या वीर्यानें पण जिंकला, याचा तुला बहुत आनन्द वाटेल. देवांसहवर्तमान येणाऱ्या इंद्राप्रमाणें सर्व द्विजश्रेष्ठांसहवर्तमान महातेजस्वी भगवान् वसिष्ठ ऋषि आले, हें फार चांगलें झालें. ( ७–१० )

माझें महत् भाग्य की, वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ व महाबलाढ्य अशा रघुवंशजांबरोबर माझा संबंध घडून आला. आज माझीं सर्व विघ्नें टळलीं असून, ईशकृपेनें माझ्या कुलाचाही उद्धार झाला आहे. हे राजा, उदईक प्रातःकाळीं यज्ञ समाप्त झाल्यावर ऋषिश्रेष्ठांसहवर्तमान आपण विवाह उरकून घ्यावा.” हें त्या जनकाचें भाषण ऋषींमध्यें श्रवण केल्यावर संभाषण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ दशरथ राजा जनक भूपतीला म्हणाला “ प्रतिग्रह दात्याच्या इच्छेवर अवलंबून असतो, हें

प्रतिग्रहो दातृवशः श्रुतमेतन्मया पुरा ।
यथा वक्ष्यसि धर्मज्ञ तत्करिष्यामहे वयम् १४
तद्धर्मिष्ठं यशस्यं च वचनं सत्यवादिनः ।
श्रुत्वा विदेहाधिपतिः परं विस्मयमागतः १५
ततः सर्वे मुनिगणाः परस्परसमागमे ।
हर्षेण महता युक्तास्तां रात्रिमवसन्सुखम् १६
राजा च राघवौ पुत्रौ निशाम्य परिहर्षितः ।
उवास परमप्रीतो जनकेनाभिपूजितः १७
जनकोऽपि महातेजाः क्रिया धर्मेण तत्त्ववित् ।
यज्ञस्य च सुताभ्यां च कृत्वा रात्रिमुवास ह १८

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकोनसप्ततितमः सर्गः ६९ [२०५२]

सप्ततितमः सर्गः ।

ततः प्रभाते जनकः कृतकर्मा महर्षिभिः ।
उवाच वाक्यं वाक्यज्ञः शतानन्दं पुरोहितम् १

मी पूर्वी ऐकिलेलें आहे. आता, हे धर्मज्ञ, तूं जसें सांगशील, तसें आम्ही करूं." हें धर्मिष्ठ व यशस्कारक असें सत्यवादी दशरथाचें भाषण श्रवण केल्यावर विदेह देशाधिपति जनक राजाला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. ( ११-१५ )

तदनंतर सर्व ऋषिगणांना एकमेकांच्या भेटी झाल्यामुळे मोठा हर्ष होऊन, त्यांनी ती रात्र मोठ्या आनन्दांत घालविली. आपल्या रघुवंशज पुत्रांना अवलोकन करून पराकाष्ठेचा आनंद झाला आहे, असा दशरथ राजा जनकाकडून अत्यन्त आदरपूर्वक होत असलेल्या मानपानाचा स्वीकार करून, रात्रीं तेथेंच वास्तव्य करून राहिला. व महा तेजस्वी तत्त्ववेत्ता जनक राजाही यज्ञसबन्धी व आपल्या दोघींही मुलींच्या कन्यादानासंबन्धी अवशिष्ट राहिलेलीं कर्मे धर्मशास्त्रानुसार उरकून घेऊन, रात्रीं तेथेंच राहिला. ( १६-१८)

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी एकुणसत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ६९ ॥

तदनंतर प्रभातकाल झाल्यावर स्नानसंध्या आटोपून संभाषणज्ञ जनक राजा

भ्राता मम महातेजा वीर्यवानतिधार्मिकः ।
कुशध्वज इति ख्यातः पुरीमध्यवसच्छुभाम् २
वार्याफलकपर्यन्तां पिबन्निक्षुमतीं नदीम् ।
सांकाश्यां पुण्यसंकाशां विमानमिव पुष्पकम् ३
तमहं द्रष्टुमिच्छामि यज्ञगोप्ता स मे ततः ।
प्रीतिं सोऽपि महातेजा इमां भोक्ता मया सह ४
एवमुक्ते तु वचने शतानन्दस्य संनिधौ ।
आगताः केचिदव्यग्रा जनकस्तान्समादिशत् ५
शासनात्तु नरेन्द्रस्य प्रययुः शीघ्रवाजिभिः ।
समानेतुं नरव्याघ्रं विष्णुमिन्द्राज्ञया यथा ६
सांकाश्यां ते समागम्य ददृशुश्च कुशध्वजम् ।
न्यवेदयन्यथावृत्तं जनकस्य च चिन्तितम् ७
तद्वृत्तं नृपतिः श्रुत्वा दूतश्रेष्ठैर्महाजवैः ।

महर्षीसहवर्तमान शतानंद नामक पुरोहिताला म्हणाला, "कुशध्वज म्हणून प्रसिद्ध असलेला असा माझा महातेजस्वी, वीर्यवान् आणि अति धार्मिक भ्राता आहे व तो पुष्पक विमानाप्रमाणे मनोहर, तटबंदी व यंत्रसामग्री यांनी युक्त, स्वर्गतुल्य आणि पवित्र अशा सांकाश्या नामक नगरीमध्ये इक्षुमती नदीचें जल सेवन करून रहात आहे. त्याची भेट घेण्याची माझी इच्छा आहे; कारण, तो माझा यज्ञरक्षक आहे. करिता, माझ्यासहवर्तमान त्या महातेजस्वी कुशध्वजालाही या मंगलसंबंधी आनंदाचा उपभोग घेण्यास सापडला पाहिजे." ( १-४ )

याप्रमाणे शतानंदाला जनकानें सांगितलें असतां सेवेविषयी तत्पर असे कांही लोक तेथे आले व त्यांना त्या जनकानें ( कुशध्वजाकडे ) जाण्यास आज्ञा केली. तेव्हा, राजाच्या आज्ञेवरून ते सेवक इंद्राच्या आज्ञेने विष्णूला आणण्याकरिता जाणाऱ्या सेवकांप्रमाणे पुरुषश्रेष्ठ कुशध्वजाला आणण्याकरिता शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांवर आरूढ होऊन गेले व सांकाश्या नगरीमध्ये जाऊन कुशध्वजाची भेट घेतली व जनकाचा उद्देश त्यांनी त्याला इत्थंभूत कथन केला. तेव्हा तें वर्तमान ऐकून कुशध्वज राजा जनक राजाच्या आज्ञेप्रमाणे त्या महावेगवान् श्रेष्ठ

आज्ञया तु नरेन्द्रस्य आजगाम कुशध्वजः ८
स ददर्श महात्मानं जनकं धर्मवत्सलम्।
सोऽभिवाद्य शतानन्दं जनकं चातिधार्मिकम् ९
राजार्हं परमं दिव्यमासनं सोऽध्यरोहत।
उपविष्टावुभौ तौ तु भ्रातरावमितद्युती १०
प्रेषयामासतुर्वीरौ मन्त्रिश्रेष्ठं सुदामनम्।
गच्छ मन्त्रिपते शीघ्रमैक्ष्वाकुममितप्रभम् ११
आत्मजैः सह दुर्धर्षमानयस्व समन्त्रिणम्।
औपकार्यां स गत्वा तु रघूणां कुलवर्धनम् १२
ददर्श शिरसा चैनमभिवाद्येदमब्रवीत्।
अयोध्याधिपते वीर वैदेहो मिथिलाधिपः १३
स त्वां द्रष्टुं व्यवसितः सोपाध्यायपुरोहितम्।
मन्त्रिश्रेष्ठवचः श्रुत्वा राजा सर्षिगणस्तथा १४
सबन्धुरगमत्तत्र जनको यत्र वर्तते।

---

दूतांसहवर्तमान निघून आला. ( ५–८ )

नंतर धर्मवत्सल महात्म्या जनकाचें दर्शन झाल्यावर शतानंद व अत्यंत धार्मिक जनक यांना अभिवंदन करून तो राजाला योग्य अशा उत्कृष्ट दिव्य आसनावर बसला. याप्रमाणें जनक व कुशध्वज हे उभयतां अत्यंत तेजस्वी भ्राते आसनावर बसले असतां त्या वीरांनी सुदामा नामक श्रेष्ठ मंत्र्याला "हे मंत्रिपते, सत्वर जा आणि अत्यंत तेजस्वी व अजिंक्य अशा इक्ष्वाकुवंशज दशरथाला पुत्र आणि मंत्री यांसहवर्तमान घेऊन ये,'' असा निरोप सांगून दशरथाकडे पाठविलें. अशी त्यांची आज्ञा झाल्यावर तो सुदामा मंत्रि दशरथाच्या शिबिरामध्ये गेला आणि रघुकुलवर्धक दशरथाला अवलोकन केल्यावर मस्तकाने प्रणाम करून त्याला म्हणाला, " हे अयोध्याधिपते वीरा, विदेहराज मिथिलाधिपति, उपाध्याय आणि पुरोहित यांसहवर्तमान, आपली भेट घेण्याकरिता वाट पहात बसला आहे. " हें त्या श्रेष्ठ मंत्र्याचें भाषण श्रवण केल्यावर दशरथ राजा ऋषिगण आणि बांधव यांसहवर्तमान जिकडे जनक होता तिकडे गेला आणि मंत्री, उपाध्याय व बांधव

राजा च मन्त्रिसहितः सोपाध्यायः सबान्धवः १५
वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठो वैदेहमिदमब्रवीत् ।
विदितं ते महाराज इक्ष्वाकुकुलदैवतम् १६
वक्ता सर्वेषु कृत्येषु वसिष्ठो भगवानृषिः ।
विश्वामित्राभ्यनुज्ञातः सह सर्वैर्महर्षिभिः १७
एष वक्ष्यति धर्मात्मा वसिष्ठो मे यथाक्रमम् ।
तूष्णींभूते दशरथे वसिष्ठो भगवानृषिः १८
उवाच वाक्यं वाक्यज्ञो वैदेहं सपुरोधसम् ।
अव्यक्तप्रभवो ब्रह्मा शाश्वतो नित्य अव्ययः १९
तस्मान्मरीचिः सञ्जज्ञे मरीचेः कश्यपः सुतः ।
विवस्वान्कश्यपाज्जज्ञे मनुर्वैवस्वतः स्मृतः २०
मनुः प्रजापतिः पूर्वमिक्ष्वाकुश्च मनोः सुतः ।
तमिक्ष्वाकुमयोध्यायां राजानं विद्धि पूर्वकम् २१
इक्ष्वाकोऽस्तु सुतः श्रीमान्कुक्षिरित्येव विश्रुतः ।

यांसहवर्तमान तेथें गेलेला व वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला दशरथ राजा विदेहराज जनकाला म्हणाला, " हे महाराज, इक्ष्वाकुवंशजांचें कुलदैवत वसिष्ठ हे आपणांला विदितच आहे. ( ९–१६ )

आमच्या कोणत्याही कार्यासंबंधानें काय बोलावयाचें, तें बोलणारे तेच (वसिष्ठ ऋषि ) आहेत. तेव्हा सर्व महर्षींसहवर्तमान विश्वामित्र मुनींची अनुज्ञा घेऊन, हे धर्मात्मे वसिष्ठ मुनि माझी वंशपरंपरा कथन करतील. " याप्रमाणें सांगून दशरथ स्वस्थ बसला असतां संभाषण कसें करावें, हें जाणणारे भगवान् वसिष्ठ ऋषि पुरोहितांसहवर्तमान बसलेल्या विदेहराज जनकाला म्हणाले, " ( मायोपाधिक ) ब्रह्मापासून शाश्वत, नित्य आणि अव्यय असा चतुर्मुख ब्रह्मदेव उत्पन्न झाला. त्या ब्रह्मदेवापासून मरीचि झाला व मरीचीचा पुत्र कश्यप होय. कश्यपापासून विवस्वान् झाला व मनु हा विवस्वानाचा पुत्र होय.(१७–२०)

मनु हा पहिला प्रजाधिपति होय. इक्ष्वाकु हा मनूला पुत्र झाला व तोच इक्ष्वाकु अयोध्या नगरींतील पहिला राजा होय, असें तूं समज. इक्ष्वाकूला एक

कुक्षेरथात्मजः श्रीमान्विकुक्षिरुदपद्यत २२
विकुक्षेऽस्तु महातेजा बाणः पुत्रः प्रतापवान् ।
बाणस्य तु महातेजा अनरण्यः प्रतापवान् २३
अनरण्यात्पृथुर्जज्ञे त्रिशङ्कुस्तु पृथोरपि ।
त्रिशङ्कोरभवत्पुत्रो धुन्धुमारो महायशाः २४
धुन्धुमारान्महातेजा युवनाश्वो महारथः ।
युवनाश्वसुतश्चासीन्मान्धाता पृथिवीपतिः २५
मान्धातुस्तु सुतः श्रीमान्सुसन्धिरुदपद्यत ।
सुसन्धेरपि पुत्रौ द्वौ ध्रुवसन्धिः प्रसेनजित् २६
यशस्वी ध्रुवसन्धेस्तु भारतो नाम नामतः ।
भरतात्तु महातेजा असितो नाम जायत २७
यस्यैते प्रतिराजान उदपद्यन्त शत्रवः ।
हैहयास्तालजङ्घाश्च शूराश्च शशबिन्दवः २८
ताँश्च स प्रतियुध्यन्वै युद्धे राजा प्रवासितः ।
हिमवन्तमुपागम्य भार्याभ्यां सहितस्तदा २९

---

वैभवशाली पुत्र झाला, तो कुक्षि म्हणून प्रसिद्ध होता. कुक्षीपासून तसाच वैभवशाली विकुक्षि म्हणून पुत्र झाला. महातेजस्वी व प्रतापी बाण हा विकुक्षीचा पुत्र होय. महातेजस्वी व प्रतापी अनरण्य हा बाणाचा पुत्र होय. अनरण्यापासून पृथु झाला; पृथूपासून त्रिशंकु झाला आणि त्रिशंकूला धुंधुमार म्हणून एक महाकीर्तिमान् पुत्र झाला. धुंधुमाराला महातेजस्वी व महारथी असा युवनाश्व पुत्र झाला व युवनाश्वाला पृथ्वीपति मांधाता हा पुत्र झाला. ( २१–२५ )

मांधात्यापासून सुसंधि म्हणून वैभवशाली पुत्र झाला व सुसंधीलाही ध्रुवसंधि व प्रसेनजित् असे दोन पुत्र झाले. ध्रुवसंधीला भरत या नांवाने प्रसिद्ध असलेला एक यशस्वी पुत्र झाला व त्या भरतापासून महातेजस्वी असित उत्पन्न झाला. त्या असिताला हैहय, तालजंघ आणि शूर शशबिंदु हे राजे शत्रु उत्पन्न झाले. त्यांच्याशीं युद्ध करतां करतां संग्रामामध्ये असित राजाला त्यांनी राज्यांतून हाकून लाविलें; तेव्हा तो आपल्या उभयतां भार्यासह्वर्तमान हिमालयपर्वतावर जाऊन

असितोऽल्पबलो राजा कालधर्ममुपेयिवान् ।
द्वे चास्य भार्ये गर्भिण्यौ बभूवतुरिति श्रुतिः ३०
एका गर्भविनाशार्थं सपत्न्यै सगरं ददौ ।
ततः शैलवरे रम्ये बभूवाभिरतो मुनिः ३१
भार्गवश्च्यवनो नाम हिमवन्तमुपाश्रितः ।
तत्र चैका महाभागा भार्गवं देववर्चसम् ३२
ववन्दे पद्मपत्राक्षी काङ्क्षन्ती सुतमुत्तमम् ।
तमृषिं साभ्युपागम्य कालिन्दी चाभ्यवादयत् ३३
स तामभ्यवदद्विप्रः पुत्रेप्सुं पुत्रजन्मनि ।
तव कुक्षौ महाभागे सुपुत्रः सुमहाबलः ३४
महावीर्यो महातेजा अचिरात्संजनिष्यति ।
गरेण सहितः श्रीमान्मा शुचः कमलेक्षणे ३५
च्यवनं च नमस्कृत्य राजपुत्री पतिव्रता ।

राहिला व तो बलहीन असित राजा तेथें परलोकीं गेला. त्या वेळीं त्याच्या दोन्ही भार्या गर्भिणी होत्या, असें ऐकण्यांत आहे. ( २६-३० )

त्यांपैकी एकीनें आपल्या सवतीला तिच्या गर्भाचा नाश होण्याकरिता सविष अन्न घातलें. त्या वेळीं त्या रमणीय श्रेष्ठ पर्वतावर च्यवन भार्गव म्हणून एक मुनि त्या हिमालयाचा आश्रय करून आनंदांत रहात होते. त्या ठिकाणीं त्या दोघींपैकी एक, जिला विषयुक्त अन्न घातलें होतें ती, महाभाग्यवती असिताची भार्या गेली आणि उत्कृष्ट पुत्र प्राप्त व्हावा, असा उद्देश मनांत धरून कमलपत्राप्रमाणे विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या स्त्रीनें त्यांना वंदन केलें. याप्रमाणे समीप जाऊन कालिंदीनें ( हें तिचें नांव होतें ) त्या ऋषींना अभिवंदन केलें असतां त्या पुत्रेच्छु स्त्रीला पुत्रोत्पत्तीविषयी त्या ब्रह्मर्षींनी असा आशिर्वाद दिला की, " हे महाभाग्यवती, महाबलाढ्य, महावीर्यवान् आणि महातेजस्वी असा एक वैभवशाली सत्पुत्र लवकरच विषासहवर्तमान तुझ्या उदरीं येईल. हे कमलनयने, तूं शोक करूं नको." ( ३१-३५ )

याप्रमाणे आशीर्वाद मिळाल्यावर च्यवन भार्गव मुनींना त्या पतिव्रता राज-

पत्या विरहिता तस्मात्पुत्रं देवी व्यजायत ३६
सपत्न्या तु गरस्तस्यै दत्तो गर्भजिघांसया ।
सह तेन गरेणैव संजातः सगरोऽभवत् ३७
सगरस्यासमञ्जस्तु असमञ्जादथांशुमान् ।
दिलीपोंऽशुमतः पुत्रो दिलीपस्य भगीरथः ३८
भगीरथात्ककुत्स्थश्च ककुत्स्थाच्च रघुस्तथा ।
रघोस्तु पुत्रस्तेजस्वी प्रवृद्धः पुरुषादकः ३९
कल्माषपादोऽप्यभवत्तस्माज्जातस्तु शङ्खणः।
सुदर्शनः शङ्खणस्य अग्निवर्णः सुदर्शनात् ४०
शीघ्रगस्त्वग्निवर्णस्य शीघ्रगस्य मरुः सुतः ।
मरोः प्रशुश्रुकस्त्वासीदम्बरीषः प्रशुश्रुकात् ४१
अम्बरीषस्य पुत्रोऽभून्नहुषश्च महीपतिः ।
नहुषस्य ययातिस्तु नाभागस्तु ययातिजः ४२
नाभागस्य बभूवाज अजाद्दशरथोऽभवत् ।

---

कन्येने नमस्कार केला आणि पुढे त्या पतिविरहित असलेल्या राजपत्नीला त्या मुनींच्या आशीर्वादाने पुत्र झाला. गर्भाचा नाश करण्याच्या उद्देशाने सवतीने जें तिला विष घातलें होतें, त्या विषासहवर्तमानच तो पुत्र उत्पन्न झाला आणि म्हणूनच सगर या नांवाने तो प्रसिद्ध झाला. असो. सगराचा असमंज हा पुत्र होय; असमंजापासून अंशुमान् म्हणून पुत्र झाला; अंशुमानाला दिलीप म्हणून पुत्र झाला व भगीरथ दिलीपाचा पुत्र होय. भगीरथापासून ककुत्स्थ झाला; ककुत्स्थापासून रघु झाला; रघूला प्रवृद्ध म्हणून एक तेजस्वी पुत्र झाला व तो (पुढे) राक्षस बनून (पाय चित्रविचित्रवर्णाचे झाल्यामुळे) कल्माषपाद म्हणूनही प्रसिद्ध झाला. त्या कल्माषपादापासून शंखण झाला; शंखणाला सुदर्शन म्हणून पुत्र झाला आणि सुदर्शनाला अग्निवर्ण म्हणून पुत्र झाला. ( ३६–४० )

शीघ्रग हा अग्निवर्णाचा पुत्र असून, मरु हा शीघ्रगाचा पुत्र होय. मरूपासून पशुश्रुक झाला व पशुश्रुकापासून अंबरीष झाला. नहुष राजा हा अंबरीषाचा पुत्र होय. ययाति हा नहुषाचा पुत्र होय व नाभाग हा ययातीचा पुत्र होय. नाभागा-



श्रीराम मारीच-सुबाहूंना मारतो.( बा. ३०।१७-२३ )

अस्माद्दशरथाज्जातौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४३
आदिवंशविशुद्धानां राज्ञां परमधर्मिणाम् ।
इक्ष्वाकुकुलजातानां वीराणां सत्यवादिनाम् ४४
रामलक्ष्मणयोरर्थे त्वत्सुते वरये नृप ।
सदृशाभ्यां नरश्रेष्ठ सदृशे दातुमर्हसि ४५

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्ततितमः सर्गः ७० ( २०९७ )

एकसप्ततितमः सर्गः ।

एवं ब्रुवाणं जनकः प्रत्युवाच कृताञ्जलिः ।
श्रोतुमर्हसि भद्रं ते कुलं नः परिकीर्तितम् १
प्रदाने हि मुनिश्रेष्ठ कुलं निरवशेषतः ।
वक्तव्यं कुलजातेन तन्निबोध महामते २
राजाभूत्त्रिषु लोकेषु विश्रुतः स्वेन कर्मणा ।
निमिः परमधर्मात्मा सर्वसत्त्ववतां वरः ३

---

ला अज म्हणून पुत्र झाला; अजापासून दशरथ झाला आणि या दशरथापासून भ्राते रामलक्ष्मण उत्पन्न झाले. सारांश, ब्रह्मदेवापासून वंशाने शुद्ध, अत्यंत धार्मिक आणि इक्ष्वाकुवंशज असे जे सत्यवचनी व वीर राजे होऊन गेले, त्यांचे-संबंधी जे रामलक्ष्मण त्यांच्याकरिता, हे राजा, मी तुझ्या कन्या मागत आहें व हे पुरुषश्रेष्ठा जनका, योग्य अशा रामलक्ष्मणांना अनुरूप अशा या कन्या देणें तुलाही योग्य आहे. ( ४०-४५ )"

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी सत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७० ॥

याप्रमाणे वसिष्ठ बोलत असतां जनक हात जोडून त्यांना म्हणाला " आपलें देव बरें करो. आता आम्ही आपल्या कुलाची परंपरा सांगतों, ती आपण श्रवण करा. हे मुनिश्रेष्ठ, कन्यादानसमयीं कुलीन पुरुषाने आपलें कुल इत्थंभूत सांगितलें पाहिजे. यास्तव, हे महामते, आपण आमचें कुल श्रवण करा. आपल्या पराक्रमाने त्रैलोक्यामध्ये प्रख्यात, अत्यंत धर्मात्मा आणि सर्व सामर्थ्यवानांमध्ये श्रेष्ठ असा एक निमि म्हणून राजा होऊन गेला. त्याचा पुत्र मिथि होय. जनक

तस्य पुत्रो मिथिर्नाम जनको मिथिपुत्रकः ।
प्रथमो जनको राजा जनकादप्युदावसुः ४
उदावसोस्तु धर्मात्मा जातो वै नन्दिवर्धनः ।
नन्दिवर्धसुतः शूरः सुकेतुर्नाम नामतः ५
सुकेतोरपि धर्मात्मा देवरातो महाबलः ।
देवरातस्य राजर्षेर्बृहद्रथ इति स्मृतः ६
बृहद्रथस्य शूरोऽभून्महावीरः प्रतापवान् ।
महावीरस्य धृतिमान्सुधृतिः सत्यविक्रमः ७
सुधृतेरपि धर्मात्मा धृष्टकेतुः सुधार्मिकः ।
धृष्टकेतोश्च राजर्षेर्हर्यश्व इति विश्रुतः ८
हर्यश्वस्य मरुः पुत्रो मरोः पुत्रः प्रतीन्धकः ।
प्रतीन्धकस्य धर्मात्मा राजा कीर्तिरथः सुतः ९
पुत्रः कीर्तिरथस्यापि देवमीढ इति स्मृतः ।
देवमीढस्य विबुधो विबुधस्य महीध्रकः १०
महीध्रकसुतो राजा कीर्तिरातो महाबलः ।

---

म्हणून त्या मिथीला पुत्र झाला. तोंच आमच्या कुलांतील पहिला जनक राजा होय ( व त्याच्याचमुळे पुढले सर्व राजे जनक म्हटले जातात ). जनकापासून उदावसु झाला. उदावसूपासून नंदिवर्धन म्हणून एक धर्मात्मा पुत्र झाला. त्या नंदिवर्धनाला सुकेतु या नांवाने प्रसिद्ध असलेला एक शूर पुत्र झाला. ( १–५ )

सुकेतूलाही पुढे महाबलाढ्य व धर्मनिष्ठ असा देवरात म्हणून पुत्र झाला व त्या देवरात राजर्षीचा बृहद्रथ हा पुत्र होय. बृहद्रथाला महावीर म्हणून एक शूर व प्रतापी पुत्र झाला व त्या महावीराला सुधृति म्हणून एक धैर्यवान् व अमोघ-पराक्रमी पुत्र झाला. सुधृतीला अत्यंत धार्मिक धर्मात्मा असा धृष्टकेतु म्हणून पुत्र झाला व त्या धृष्टकेतु राजर्षीला हर्यश्व म्हणून प्रख्यात असलेला पुत्र झाला. हर्यश्वाचा पुत्र मरु; मरूचा पुत्र प्रतींधक आणि प्रतींधकाचा पुत्र धर्मात्मा राजा कीर्तिरथ. कीर्तिरथाचा पुत्र देवमिढ म्हणून प्रसिद्ध होता; देवमीढाचा पुत्र विबुध होय व महीध्रक हा विबुधाचा पुत्र होय. ( ६–१० )

कीर्तिरातस्य राजर्षेर्महारोमा व्यजायत ११
महारोम्णस्तु धर्मात्मा स्वर्णरोमा व्यजायत ।
स्वर्णरोम्णस्तु राजर्षेर्ह्रस्वरोमा व्यजायत १२
तस्य पुत्रद्वयं राज्ञो धर्मज्ञस्य महात्मनः ।
ज्येष्ठोऽहमनुजो भ्राता मम वीरः कुशध्वजः १३
मां तु ज्येष्ठं पिता राज्ये सोऽभिषिच्य पिता मम ।
कुशध्वजं समावेश्य भारं मयि वनं गतः १४
वृद्धे पितरि स्वर्याते धर्मेण धुरमावहम् ।
भ्रातरं देवसंकाशं स्नेहात्पश्यन्कुशध्वजम् १५
कस्यचित्त्वथ कालस्य सांकाश्यादागतः पुरात् ।
सुधन्वा वीर्यवान्राजा मिथिलामवरोधकः १६
स च मे प्रेषयामास शैवं धनुरनुत्तमम् ।
सीता च कन्या पद्माक्षी मह्यं वै दीयतामिति १७
तस्याप्रदानान्महर्षे युद्धमासीन्मया सह ।
स हतो विमुखो राजा सुधन्वा तु मया रणे १८

महाबलाढ्य कीर्तिरात राजा विबुधाचा पुत्र असून, राजर्षि कीर्तिरातास महारोमा म्हणून पुत्र झाला. महारोम्याला स्वर्णरोमा म्हणून एक धर्मात्मा पुत्र झाला व त्या राजर्षि स्वर्णरोम्याला ऱ्हस्वरोमा म्हणून पुत्र झाला. त्या महात्म्या व धर्मवेत्त्या ऱ्हस्वरोम राजाचे दोन पुत्र. मी ज्येष्ठ आणि माझा कनिष्ठ भ्राता वीर कुशध्वज. माझ्या त्या पित्याने मी ज्येष्ठ म्हणून मला राज्याभिषेक केला आणि "याचें संरक्षण कर," म्हणून कुशध्वजाला माझे स्वाधीन करून, तो माझा पिता वनांत चालता झाला. वृद्ध असा माझा पिता स्वर्गाला गेल्यावर देवतुल्य कुशध्वज भ्रात्यावर प्रेमदृष्टि ठेवून धर्मानें मी राज्य करूं लागलों. (११–१५)

याला कांही दिवस लोटल्यावर सांकाश्य नगराहून वीर्यवान् सुधन्वा राजा मिथिला नगरीला वेढा देण्याकरितां आला व "अत्युत्कृष्ट त्र्यंबक चाप व कमल-नयना कन्या सीता हीं मला द्यावीं" म्हणून त्यानें मला निरोप पाठविला; परंतु हे महर्षे, हीं दोन्हींही मी त्याला न दिल्यामुळे त्याचें माझ्याशीं युद्ध झालें व

*

निहत्य तं मुनिश्रेष्ठ सुधन्वानं नराधिपम् ।
सांकाश्ये भ्रातरं शूरमभ्यषिञ्चं कुशध्वजम् १९
कनीयानेष मे भ्राता अहं ज्येष्ठो महामुने ।
ददामि परमप्रीतो वध्वौ ते मुनिपुङ्गव २०
सीतां रामाय भद्रं ते ऊर्मिलां लक्ष्मणाय वै ।
वीर्यशुल्कां मम सुतां सीतां सुरसुतोपमाम् २१
द्वितीयामूर्मिलां चैव त्रिर्वदामि न संशयः ।
ददामि परमप्रीतो वध्वौ ते मुनिपुङ्गव २२
रामलक्ष्मणयो राजन्गोदानं कारयस्व ह ।
पितृकार्यं च भद्रं ते ततो वैवाहिकं कुरु २३
मघा ह्यद्य महाबाहो तृतीयदिवसे प्रभो ।
फल्गुन्यामुत्तरे राजंस्तस्मिन्वैवाहिकं कुरु ।
रामलक्ष्मणयोरर्थे दानं कार्यं सुखोदयम् २४

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकसप्ततितमः सर्गः ७१ [२१२१]

संग्रामामध्ये तो राजा सुधन्वा पराजित होऊन, माझ्या हातून मारला गेला. हे मुनिश्रेष्ठ, याप्रमाणे त्या सुधन्व्या राजाचा वध केल्यावर मी आपल्या कुशध्वज नामक शूर भ्रात्याला सांकाश्य नगराचा अधिपति केला. हे महामुने, हा माझा कनिष्ठ भ्राता असून, मी याचा ज्येष्ठ भ्राता आहें. आता हे मुनिश्रेष्ठ, मी अत्यंत प्रसन्न होऊन या कन्या आपल्या स्वाधीन करतों. ( १६-२० )

आपलें दैव बरें करो. सीता रामाला आणि ऊर्मिला लक्ष्मणाला मी देतों. देवकन्येप्रमाणे असलेली माझी वीर्यशुल्का कन्या सीता मी रामाला देतों आणि दुसरी ऊर्मिला लक्ष्मणाला देतों, हें मी तीन वेळ निःशंसय सांगत आहें. हे मुनिश्रेष्ठ, मी आपल्या कन्या अत्यंत आनंदाने आपल्या स्वाधीन करतों. असो. हे राजा, आता आपण रामलक्ष्मणांचा गोदानसंस्कार करावा; आणि नांदीश्राद्धादि कर्मे उरकून घेऊन मग विवाहसंस्कार होऊं द्या. आपलें कल्याण असो. हे महापराक्रमी प्रभो, आज मघा नक्षत्र आहे. तेव्हा आजपासून तिसऱ्या दिवशीं म्हणजे उत्तराफल्गुनी नक्षत्रावर, हे राजा, आपण विवाहसंस्कार करावा आणि राम-

द्विसप्ततितमः सर्गः ।

तमुक्तवन्तं वैदेहं विश्वामित्रो महामुनिः ।
उवाच वचनं वीरं वसिष्ठसहितो नृपम् १
अचिन्त्यान्यप्रमेयाणि कुलानि नरपुङ्गव ।
इक्ष्वाकूणां विदेहानां नैषां तुल्योऽस्ति कश्चन २
सदृशो धर्मसंबन्धः सदृशो रूपसम्पदा ।
रामलक्ष्मणयो राजन्सीता चोर्मिलया सह ३
वक्तव्यं च नरश्रेष्ठ श्रूयतां वचनं मम ।
भ्राता यवीयान्धर्मज्ञ एष राजा कुशध्वजः ४
अस्य धर्मात्मनो राजन्रूपेणाप्रतिमं भुवि ।
सुताद्वयं नरश्रेष्ठ पत्न्यर्थं वरयामहे ५
भरतस्य कुमारस्य शत्रुघ्नस्य च धीमतः ।
वरये ते सुते राजँस्तयोरर्थं महात्मनोः ६

लक्ष्मणांचा अभ्युदय होण्याकरिता सुखावह अशीं कांहीं दानेंही यावेळींच आपण करावीं. ( २१–२४ )

याप्रमाणे महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल कांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७१ ॥

याप्रमाणे विदेहदेशाधिपति जनक राजाने सांगितलें असतां वसिष्ठांसहवर्तमान महामुनि विश्वामित्र त्या वीर राजाला म्हणाले, " हे पुरुषश्रेष्ठा, विदेह आणि इक्ष्वाकु यांचीं कुलें अतर्क्य व अत्यंत योग्य आहेत. यांची बरोबरी करणारा कोणीही नाहीं. रामलक्ष्मणांचा अनुक्रमें सीता व ऊर्मिला यांच्याशीं संबंध होणें हा उभय कुलांना योग्य असून, सौंदर्यसंपत्तीनेही अनुरूपच होणारा आहे. आता, हे पुरुषश्रेष्ठा, मला कांहीं बोलावयाचें आहे, तें तूं ऐकून घे. हा धर्मवेत्ता कुशध्वज राजा तुझा कनिष्ठ भ्राता होय. हे पुरुषश्रेष्ठा राजा, या धर्मात्म्या कुशध्वजाच्या दोन कन्या रूपाने पृथ्वीमध्ये अप्रतीम आहेत. या आम्ही पत्नींकरिता मागत आहोंत. ( १–५ )

सारांश, हे राजा, राजकुमार भरत आणि बुद्धिमान् शत्रुघ्न या महात्म्यां-

पुत्रा दशरथस्येमे रूपयौवनशालिनः ।
लोकपालसमाः सर्वे देवतुल्यपराक्रमाः ७
उभयोरपि राजेन्द्र संबन्धेनानुबध्यताम् ।
इक्ष्वाकुकुलमव्यग्रं भवतः पुण्यकर्मणः ८
विश्वामित्रवचः श्रुत्वा वसिष्ठस्य मते तदा ।
जनकः प्राञ्जलिर्वाक्यमुवाच मुनिपुङ्गवौ ९
कुलं धन्यमिदं मन्ये येषां तौ मुनिपुङ्गवौ ।
सदृशं कुलसम्बन्धं यदाज्ञापयतः स्वयम् १०
एवं भवतु भद्रं वः कुशध्वजसुते इमे ।
पत्न्यौ भजेतां सहितौ शत्रुघ्नभरतावुभौ ११
एकाह्ना राजपुत्रीणां चतसृणां महामुने ।
पाणीन्गृह्णन्तु चत्वारो राजपुत्रा महाबलाः १२
उत्तरे दिवसे ब्रह्मन्फल्गुनीभ्यां मनीषिणः ।
वैवाहिकं प्रशंसन्ति भगो यत्र प्रजापतिः १३

करिता मी तुझ्या भ्रात्याच्या कन्या मागत आहें. सौंदर्य व यौवन यांनी संपन्न असलेले हे दशरथाचे पुत्र देवतुल्य पराक्रमी असून, सर्वही लोकपालांची बरोबरी करणारे आहेत. हे राजाधिराज, तुमचें पुण्यवानांचें कुल आणि इक्ष्वाकुकुल हीं दोन्हीं कुलें मनापासून शरीरसंबंधाने एकमेकांशीं संबद्ध होऊं द्या." हें वसिष्ठांच्या अनुमतीने विश्वामित्रांनी केलेलें भाषण श्रवण केल्यावर जनक राजा हात जोडून त्या उभयतां मुनिश्रेष्ठांना म्हणाला, "ज्यांच्या कुलाचा संबंध योग्य अशा इक्ष्वाकुकुलाशीं करण्याविषयी मुनिश्रेष्ठ स्वतः आज्ञा करीत आहेत, त्यांचें (जनकांचें) हें कुल आज मी धन्य समजत आहें. ( ६-१० )

आपल्या आज्ञेप्रमाणे होऊं द्या; आपलें कल्याण असो. उभयतां भरतशत्रुघ्नांनी या कुशध्वज राजाच्या कन्यांचा भार्या म्हणून स्वीकार करावा आणि हे महामुने, एकाच दिवशीं महाबलाढ्य चारी राजपुत्रांनी चारी राजकन्यांचें पाणिग्रहण करावें. हे ब्रह्मन्, उत्तराफल्गुनी नक्षत्रावर म्हणजे भग ही ज्या नक्षत्राची देवता आहे, त्या नक्षत्रावर विद्वानांनी विवाह प्रशस्त मानिला आहे." याप्रमाणे सौम्य भाषण

एवमुक्त्वा वचः सौम्यं प्रत्युत्थाय कृताञ्जलिः ।
उभौ मुनिवरौ राजा जनको वाक्यमब्रवीत् १४
परो धर्मः कृतो मह्यं शिष्योऽस्मि भवतोस्तथा ।
इमान्यासनमुख्यानि आस्यतां मुनिपुङ्गवौ १५
यथा दशरथस्येयं तथायोध्या पुरी मम ।
प्रभुत्वे नास्ति सन्देहो यथार्हं कर्तुमर्हथ १६
तथा ब्रुवति वैदेहे जनके रघुनन्दनः ।
राजा दशरथो हृष्टः प्रत्युवाच महीपतिम् १७
युवामसंख्येयगुणौ भ्रातरौ मिथिलेश्वरौ ।
ऋषयो राजसङ्घाश्च भवद्भ्यामभिपूजिताः १८
स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते गमिष्यामः स्वमालयम् ।
श्राद्धकर्माणि विधिवद्विधास्य इति चाब्रवीत् १९
तमापृष्ट्वा नरपतिं राजा दशरथस्तदा ।

---

केल्यावर जनक राजा उठला आणि हात जोडून त्या उभयतां मुनिश्रेष्ठांना म्हणाला, "( इक्ष्वाकुकुलाशीं संबंध करविल्यामुळे ) आपण मला पराकाष्ठेचें पुण्य संपादन करून दिलें आहे व दशरथाप्रमाणे मीही ( आपल्या कनिष्ठ भ्रात्यांसहवर्तमान ) आपला शिष्य आहें. करिता, ( तिन्हीं राज्यांचें आधिपत्य स्वीकारून ) आपण उभयतां मुनिश्रेष्ठांनी या तिन्ही सिंहासनांचें परिपालन करावें. ( ११--१५ )

ज्याप्रमाणे दशरथ राजा या मिथिला नगरीचा पाहिजे तसा विनियोग करण्यास समर्थ आहे, त्याचप्रमाणे मीही अयोध्या नगरीचा यथेष्ट विनियोग करण्यास मुखत्यार आहें. सारांश, तिन्हीं राज्यांचें प्रभु आपण आहांत, याविषयीं संशय नाही. करिता, आपण योग्य रीतीने या राज्यांचें आधिपत्य स्वीकारावें." याप्रमाणे विदेहाधिपति जनक राजा विनंती करूं लागला असतां रघुवंशज दशरथ राजा आनंदित होऊन जनक भूपतीला म्हणाला, "तुम्ही उभयतां मिथिलाधिपति भ्राते असंख्य गुणांनी संपन्न आहांत व आपल्या कुलांतील ऋषितुल्य राजसमुदायांचा तुम्ही या विनयाने उद्धार केला आहे. तुला सुखप्राप्ति होवो व तुझें कल्याण असो. आम्ही आता स्वस्थानीं जातों आणि यथाविधि नांदीश्राद्ध वगैरे करतों." याप्रमाणे जनक

मुनीन्द्रौ तौ पुरस्कृत्य जगामाशु महायशाः २०
स गत्वा निलयं राजा श्राद्धं कृत्वा विधानतः ।
प्रभाते काल्यमुत्थाय चक्रे गोदानमुत्तमम् २१
गवां शतसहस्रं च ब्राह्मणेभ्यो नराधिपः ।
एकैकशो ददौ राजा पुत्रानुद्दिश्य धर्मतः २२
सुवर्णशृङ्ग्यः सम्पन्नाः सवत्साः कांस्यदोहनाः ।
गवां शतसहस्राणि चत्वारि पुरुषर्षभः २३
वित्तमन्यच्च सुबहु द्विजेभ्यो रघुनन्दनः ।
ददौ गोदानमुद्दिश्य पुत्राणां पुत्रवत्सलः २४
ससुतैः कृतगोदानैर्वृतः सन्नृपतिस्तदा ।
लोकपालैरिवाभाति वृतः सौम्यः प्रजापतिः २५

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विसप्ततितमः सर्गः । ७२ [२१४६]

---

राजाचा निरोप घेऊन तो महाकीर्तिमान् दशरथ त्या दोघांही मुनिश्रेष्ठांना पुढे घालून तेथून शीघ्र गमन करता झाला व स्वगृहीं गेल्यावर त्याने यथाविधि नांदीश्राद्ध केलें आणि दुसरे दिवशीं प्रभातकालीं उठून ( प्रातःकालामध्ये कर्तव्य असा ) आपल्या पुत्रांचा उत्कृष्ट गोदानसंस्कार त्याने केला व आपल्या पुत्रांकरिता त्या प्रजाधिपति दशरथ राजाने धर्मबुद्धीने प्रत्येक पुत्राबद्दल एक लक्ष अशा गाई ब्राह्मणांना दिल्या. ( १६-२२ )

सारांश, त्या पुरुषश्रेष्ठ दशरथाने सुवर्णशृंगें व विपुल दुग्ध यांनी युक्त असलेल्या चार लक्ष सवत्स गाई कांस्य धातूच्या दोहनपात्रांसहवर्तमान ब्राह्मणांना दिल्या. इतकेंच नव्हे परंतु, पुत्रांच्या गोदानसंस्काराबद्दल त्या पुत्रवत्सल रघुवंशज दशरथ राजाने ब्राह्मणांना आणखीही इतर विपुल द्रव्य दिलें आणि गोदानसंस्कार झालेल्या पुत्रांनी दशरथ राजा परिवेष्टित झाला असतां लोकपालांनी परिवेष्टित असलेल्या सौम्य प्रजापतीप्रमाणे दिसूं लागला. ( २३-२५ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी बहात्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७२ ॥

त्रिसप्ततितमः सर्गः ।

यस्मिंस्तु दिवसे राजा चक्रे गोदानमुत्तमम् ।
तस्मिंस्तु दिवसे वीरो युधाजित्समुपेयिवान् १
पुत्रः केकयराजस्य साक्षाद्भरतमातुलः ।
दृष्ट्वा पृष्ट्वा च कुशलं राजानमिदमब्रवीत् २
केकयाधिपती राजा स्नेहात्कुशलमब्रवीत् ।
येषां कुशलकामोऽसि तेषां संप्रत्यनामयम् ३
स्वस्रीयं मम राजेन्द्र द्रष्टुकामो महीपतिः ।
तदर्थमुपयातोऽहमयोध्यां रघुनन्दन ४
श्रुत्वा त्वहमयोध्यायां विवाहार्थं तवात्मजान् ।
मिथिलामुपयातांस्तु त्वया सह महीपते ५
त्वरयाभ्युपयातोऽहं द्रष्टुकामः स्वसुः सुतम् ।
अथ राजा दशरथः प्रियातिथिमुपस्थितम् ६
दृष्ट्वा परमसत्कारैः पूजनार्हमपूजयत् ।
ततस्तामुषितो रात्रिं सह पुत्रैर्महात्मभिः ७

ज्या दिवशीं दशरथ राजाने आपल्या पुत्रांचा गोदानसंस्कार केला,त्याच दिवशीं वीर युधाजित् तेथें आला, आणि केकय राजाचा पुत्र व प्रत्यक्ष भरताचा मातुल असा तो युधाजित् राजाची भेट झाल्यानंतर कुशल प्रश्न करून त्याला म्हणाला, " केकयदेशाधिपति राजाने तुला प्रेमपूर्वक कुशल प्रश्न विचारला आहे आणि ज्यांचें कुशल वृत्त समजण्याची तुला इच्छा आहे, त्यांचें सांप्रत कुशल आहे, असेंही त्याने सांगितलें आहे. हे रघुनंदना, माझ्या भाच्याला भेटण्याची केकय राजाला इच्छा झाली आहे आणि त्याकरिता मी अयोध्यानगरीलाही आलों.(१-४)

परंतु, अयोध्येमध्ये आल्यावर विवाहाकरिता आपले पुत्र आपणांबरोबर मिथिला नगरीला गेले असें ऐकून, हे भूपते, आपल्या भाच्याला भेटण्याकरिता मी सत्वर येथें आलों." याप्रमाणे युधाजिताने सांगितल्यावर प्रिय अतिथि आला आहे, असें मनांत आणून दशरथ राजाने त्या पूज्य अतिथीचें परम सत्करपूर्वक पूजन केलें. नंतर महात्म्या पुत्रांसहवर्तमान ती रात्र काढल्यावर प्रभातकालीं

प्रभाते पुनरुत्थाय कृत्वा कर्माणि तत्त्ववित् ।
ऋषींस्तदा पुरस्कृत्य यज्ञवाटमुपागमत् ८
युक्ते मुहूर्ते विजये सर्वाभरणभूषितैः ।
भ्रातृभिः सहितो रामः कृतकौतुकमङ्गलः ९
वसिष्ठं तु पुरस्कृत्वा महर्षीनपरानपि ।
वसिष्ठो भगवानेत्य वैदेहमिदमब्रवीत् १०
राजा दशरथो राजन्कृतकौतुकमङ्गलैः ।
पुत्रैर्नरवरश्रेष्ठो दातारमभिकाङ्क्षते ११
दातृप्रतिग्रहीतृभ्यां सर्वार्थाः संभवन्ति हि ।
स्वधर्मं प्रतिपद्यस्व कृत्वा वैवाह्यमुत्तमम् १२
इत्युक्तः परमोदारो वसिष्ठेन महात्मना ।
प्रत्युवाच महातेजा वाक्यं परमधर्मवित् १३

दशरथ राजा उठला आणि नित्य कर्में करून तो तत्त्ववेत्ता दशरथ राजा ऋषींना पुढें घालून यज्ञशाळेसमीप आला. तों इतक्यांत सर्व प्रकारचे अलंकार धारण केलेल्या भ्रात्यांसहवर्तमान मंगलकारक असें स्वस्तिवाचन झालेला रामही वसिष्ठ आणि इतर महर्षि पुढें घालून योग्य अशा विजयमुहूर्तावर तेथें आला. याप्रमाणें तेथें आल्यावर भगवान् वसिष्ठ विदेहराज जनकाकडे जाऊन म्हणाले, (५--१०)

" हे राजा, हे पुरुषश्रेष्ठा, श्रेष्ठ दशरथ राजा मंगलकारक स्वस्तिवाचन वगैरे झालेल्या पुत्रांसहवर्तमान कन्यादान करणाऱ्याची वाट पहात आहे ; कारण देणारे व घेणारे या उभयतांचें जुळल्यावरच सर्व कांहीं गोष्टी तडीस जात असतात. यास्तव पूर्वीं करावयाचें विवाहोपयोगी लौकिक व धार्मिक कर्म उरकून घेऊन, आंत प्रवेश करण्याची आम्हांस अनुज्ञा दे."× याप्रमाणे महात्म्या वसिष्ठांनी त्याला सांगितलें असतां तो परम उदार, महातेजस्वी व मोठा धर्मवेत्ता जनक राजा त्यांना म्हणाला, " माझ्या दारावर कोठें पहारेकरी आहे ?

× ' वैवाह्यः '– नवरा मुलगा लग्नघरीं येऊन पोहोंचल्यावर विवाह लागण्याचे पूर्वी कांहीं लौकिक व धार्मिक कृत्यें केलीं जातात, त्यांना वैवाह्य असें म्हणतात. वैवाह्य म्हणजे विवाह नव्हे.

कः स्थितः प्रतिहारो मे कस्याज्ञां संप्रतीक्षते ।
स्वगृहे को विचारोऽस्ति यथाराज्यमिदं तव  १४
कृतकौतुकसर्वस्वा वेदिमूलमुपागताः ।
मम कन्या मुनिश्रेष्ठ दीप्ता वह्नेरिवार्चिषः  १५
सद्योऽहं त्वत्प्रतीक्षोऽस्मि वेद्यामस्यां प्रतिष्ठितः ।
अविघ्नं क्रियतां सर्वं किमर्थं हि विलम्ब्यते  १६
तद्वाक्यं जनकेनोक्तं श्रुत्वा दशरथस्तदा ।
प्रवेशयामास सुतान्सर्वानृषिगणानपि  १७
ततो राजा विदेहानां वसिष्ठमिदमब्रवीत् ।
कारयस्व ऋषे सर्वामृषिभिः सह धार्मिक  १८
रामस्य लोकरामस्य क्रियां वैवाहिकीं प्रभो ।
तथेत्युक्त्वा तु जनकं वसिष्ठो भगवानृषिः  १९
विश्वामित्रं पुरस्कृत्य शतानन्दं च धार्मिकम् ।
प्रपामध्ये तु विधिवद्वेदिं कृत्वा महातपाः  २०
अलंचकार तां वेदिं गन्धपुष्पैः समन्ततः ।

आणि आपण कोणाच्या आज्ञेची वाट पहात आहांत ? अहो, आपल्याच घरामध्ये प्रवेश करण्याला विचार तो कसला ? हें राज्य जसें माझें आहे, तसेंच आपलेंही आहे. हे मुनिश्रेष्ठ, वह्नीच्या दीप्त ज्वालांप्रमाणे तेजस्वी असलेल्या माझ्या कन्या विवाहसंबंधी पुण्याहवाचन वगैरे सर्व आटोपून वेदीसमीप आल्या आहेत, आणि मीही या वेदीसमीप आपलीच वाट पहात बसलों आहें. तस्मात्, आता सर्व निर्विघ्नपणें होऊं द्या. विनाकारण विलंब कशाकरितां ? ” (११–१६)

याप्रमाणे जनकानें केलेलें भाषण श्रवण केल्यावर दशरथ राजानें आपले पुत्र व सर्व ऋषिगण यांसह आंत प्रवेश केला. तदनंतर विदेहदेशाधिपति जनक राजा वसिष्ठांना म्हणाला, “ हे धर्मनिष्ठ ऋषे, हे प्रभो, ऋषींसहवर्तमान आपण या जगन्मोहक रामाचा संपूर्ण विवाहसंस्कार करावा.” यानंतर भगवान् वसिष्ठ ऋषींनी “ ठीक आहे, ” असें जनकाला म्हटलें आणि विश्वामित्र व धर्मनिष्ठ शतानंद यांना पुढाकार देऊन यज्ञमंडपामध्ये महातपस्वी वसिष्ठांनी यथाविधि वेदि तयार

सुवर्णपालिकाभिश्च चित्रकुम्भैश्च साङ्कुरैः २१
अङ्कुराढ्यैः शरावैश्च धूपपात्रैः सधूपकैः ।
शङ्खपात्रैः स्रुवैः स्रुग्भिः पात्रैरर्घ्यादिपूजितैः २२
लाजपूर्णैश्च पात्रीभिरक्षतैरपि संस्कृतैः ।
दर्भैः समैः समास्तीर्य विधिवन्मन्त्रपूर्वकम् २३
अग्निमाधाय तं वेद्यां विधिमन्त्रपुरस्कृतम् ।
जुहावाग्नौ महातेजा वसिष्ठो मुनिपुङ्गवः २४
ततः सीतां समानीय सर्वाभरणभूषिताम् ।
समक्षमग्नेः संस्थाप्य राघवाभिमुखे तदा २५
अब्रवीज्जनको राजा कौसल्यानन्दवर्धनम् ।
इयं सीता मम सुता सहधर्मचरी तव २६
प्रतीच्छ चैनां भद्रं ते पाणिं गृह्णीष्व पाणिना ।
पतिव्रता महाभागा छायेवानुगता सदा २७
इत्युक्त्वा प्राक्षिपद्राजा मन्त्रपूतं जलं तदा ।
साधु साध्विति देवानामृषीणां वदतां तदा २८

---

करून ती वेदि सभोंवती गंधपुष्पांनी भूषित केली. नंतर सोन्याच्या मुठीच्या सुऱ्या, चित्रविचित्र वर्णांचे अंकुरांसहवर्तमान कुंभ, अंकुरांनी युक्त असे परळ, धूपयुक्त धूपपात्र, शंखपात्रें, स्रुवा, दर्व्या, अर्घ्यादिकांनी युक्त अशीं पात्रें, लाह्यांनी भरलेलीं पात्रें व क्षतरहित आणि संस्कृत असे सारखे दर्भ हीं त्या वेदीवर यथाविधि समंत्रक ठेवून व त्या वेदीवर यथाविधि व समंत्रक अग्नि सिद्ध करून, मुनिश्रेष्ठ महातेजस्वी वसिष्ठांनी अग्नीमध्ये हवन केलें. ( १७-२४ )

तदनंतर सर्व अलंकार धारण केलेली अशी सीता आणून आणि तिला अग्नी-समक्ष रामापुढे उभी करून, जनक राजा कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या रामाला म्हणाला, " ही माझी कन्या सीता तुझी सहधर्मचारिणी आहे. तुझें कल्याण असो. तूं हिचा स्वीकार करून आपल्या हातानें हिचें पाणिग्रहण कर. ही महाभाग्यवती पतिव्रता छायेप्रमाणे सर्वदा तुला अनुसरून वागेल."(२५-२७)

याप्रमाणे रामाला सांगून जनक राजाने कन्यादानाचें समंत्रक उदक सोडलें.

देवदुन्दुभिनिर्घोषः पुष्पवर्षो महानभूत् ।
एवं दत्त्वा सुतां सीतां मन्त्रोदकपुरस्कृताम् २९
अब्रवीज्जनको राजा हर्षेणाभिपरिप्लुतः ।
लक्ष्मणागच्छ भद्रं ते ऊर्मिलामुद्यतां मया ३०
प्रतीच्छ पाणिं गृह्णीष्व मा भूत्कालस्य पर्ययः ।
तमेवमुक्त्वा जनको भरतं चाभ्यभाषत ३१
गृहाण पाणिं माण्डव्याः पाणिना रघुनन्दन ।
शत्रुघ्नं चापि धर्मात्मा अब्रवीन्मिथिलेश्वरः ३२
श्रुतकीर्तेर्महाबाहो पाणिं गृह्णीष्व पाणिना ।
सर्वे भवन्तः सौम्याश्च सर्वे सुचरितव्रताः ३३
पत्नीभिः सन्तु काकुत्स्था मा भूत्कालस्य पर्ययः ।
जनकस्य वचः श्रुत्वा पाणीन्पाणिभिरस्पृशन् ३४
चत्वारस्ते चतसृणां वसिष्ठस्य मते स्थिताः ।
अग्निं प्रदक्षिणं कृत्वा वेदिं राजानमेव च ३५

तेव्हा देव आणि ऋषि "उत्तम उत्तम" म्हणून म्हणूं लागले असतां मोठ्या पुष्पवर्षावाबरोबर देवदुंदुभींचा ध्वनि होऊं लागला. याप्रमाणे समंत्रक व उदकपूर्वक सीता नामक कन्येचें दान करून, हर्षानें उचंबळूं लागलेला जनक राजा म्हणाला, "हे लक्ष्मणा, ये; तुझें कल्याण असो. मी पुढे केलेल्या या ऊर्मिलेचा तूं स्वीकार कर आणि हिचें पाणिग्रहण कर. कालातिक्रमण होणें योग्य नाही." याप्रमाणे लक्ष्मणाला सांगितल्यावर जनक राजा भरताला म्हणाला, "हे रघुनंदना, तूं आपल्या हातानें या मांडवीचें पाणिग्रहण कर." असें भरताला सांगितल्यानंतर तो धर्मात्मा मिथिलाधिपति जनक राजा शत्रुघ्नालाही म्हणाला.( २८-३२ )

"हे महापराक्रमी शत्रुघ्ना, आपल्या हातानें तूं या श्रुतकीर्तीचें पाणिग्रहण कर. तुम्ही सर्व सौम्य असून, सर्वांनीही उत्तम रीतीनें ब्रह्मचर्यव्रत परिपालन केलेलें आहे. याकरिता आता तुम्ही ककुत्स्थकुलोत्पन्नांनी सपत्नीक असावें. आता कालविलंब नको." याप्रमाणे जनक राजाचें भाषण श्रवण केल्यावर वसिष्ठ मुनींच्या आज्ञेंत असलेल्या त्या चारी दशरथपुत्रांनी चारी कन्यांचें पाणिग्रहण केलें आणि

ऋषींश्चापि महात्मनः सहभार्या रघूद्वहाः ।
यथोक्तेन ततश्चक्रुर्विवाहं विधिपूर्वकम् ३६
पुष्पवृष्टिर्महत्यासीदन्तरिक्षात्सुभास्वरा ।
दिव्यदुन्दुभिनिर्घोषैर्गीतवादित्रनिःस्वनैः ३७
ननृतुश्चाप्सरः सङ्घा गन्धर्वाश्च जगुः कलम् ।
विवाहे रघुमुख्यानां तदद्भुतमदृश्यत ३८
ईदृशे वर्तमाने तु तुर्योद्घुष्टनिनादिते ।
त्रिरग्निं ते परिक्रम्य ऊहुर्भार्या महौजसः ३९
अथोपकार्यं जग्मुस्ते सभार्या रघुनन्दनाः ।
राजाप्यनुययौ पश्यन्सर्षिसङ्घः सबान्धवः ४०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः ७३ (२१८३)

चतुःसप्ततितमः सर्गः ।

अथ रात्र्यां व्यतीतायां विश्वामित्रो महामुनिः ।

---

अग्नि, वेदि, जनक राजा व ऋषि यांना त्या महात्म्या रघुवंशजांनी भार्यासहवर्तमान प्रदक्षिणा केली व नंतर शास्त्रोक्त प्रकाराने त्यांनी विधिपूर्वक विवाहकृत्य समाप्त केलें. ( ३३-३६ )

तेव्हा फारच उज्ज्वल अशी मोठी पुष्पवृष्टि आकाशांतून झाली; दिव्य दुंदुभीं-चा घोष कानीं येऊं लागला आणि गायन व वादन यांचेही ध्वनि ऐकूं येऊं लागले. इतकेंच नव्हे, परन्तु अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले आणि रघुवंशजश्रेष्ठांच्या विवाहसमयीं गंधर्वही मधुर गायन करूं लागले. तेव्हा तो सर्वही प्रकार अद्भुत वाटूं लागला. याप्रमाणे जिकडेतिकडे वाद्यघोषांनी दुमदुमून गेलें असतां, त्या महातेजस्वी रघुवंशजांनी भार्यांशीं विवाह केला आणि नंतर ते रघुनंदन भार्या-सहवर्तमान शिबिरामध्ये गेले असतां ऋषिसमुदाय व बांधव यांसहवर्तमान दशरथ राजाही त्यांचे मागोमाग शिबिरामध्ये गेला. ( ३७-४० )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकी त्र्याहात्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७३ ॥

तदनंतर रात्र निघून गेल्यावर महामुनि विश्वामित्र त्या उभयतां राजांचा

आपृष्ट्वा तौ च राजानौ जगामोत्तरपर्वतम् १
विश्वामित्रे गते राजा वैदेहं मिथिलाधिपम् ।
आपृष्ट्वैव जगामाशु राजा दशरथः पुरीम् २
अथ राजा विदेहानां ददौ कन्याधनं बहु ।
गवां शतसहस्राणि बहूनि मिथिलेश्वरः ३
कम्बलानां च मुख्यानां क्षौमान्कोट्यम्बराणि च ।
हस्त्यश्वरथपादातं दिव्यरूपं स्वलङ्कृतम् ४
ददौ कन्याशतं तासां दासीदासमनुत्तमम् ।
हिरण्यस्य सुवर्णस्य मुक्तानां विद्रुमस्य च ५
ददौ राजा सुसंहृष्टः कन्याधनमनुत्तमम् ।
दत्त्वा बहुविधं राजा समनुज्ञाप्य पार्थिवम् ६
प्रविवेश स्वनिलयं मिथिलां मिथिलेश्वरः ।
राजाप्ययोध्याधिपतिः सह पुत्रैर्महात्मभिः ७
ऋषीन्सर्वान्पुरस्कृत्य जगाम सबलान्वितः ।

निरोप घेऊन उत्तर पर्वतावर गेले व विश्वामित्र गेल्यानंतर भूपति दशरथ राजाही मिथिलाधिपति विदेहराज जनकाचा निरोप घेऊन, सत्वर आपल्या नगरीकडे गेला. तेव्हा विदेहराज मिथिलाधिपति जनकानें त्या कन्यांबरोबर विपुल द्रव्य दिलें; लक्षावधि गाई दिल्या; उत्तम उत्तम ऊर्णावस्त्रें व रेशमी वस्त्रेंही पुष्कळ दिली; सामान्य वस्त्रेंही कोडोगणती दिलीं; दिसण्यांत उत्कृष्ट आणि अलंकार घातलेले असे गज, अश्व, रथ व पदाति पुष्कळ दिले. त्या चौघींपैकी प्रत्येकीबरोबर संख्या म्हणून शंभर शंभर कन्या आणि उत्कृष्ट दास व दासी दिल्या आणि रौप्य, सुवर्ण, मोत्यें आणि पोवळीं हीं तर कोडोगणतीं दिली. ( १-५ )

याप्रमाणे त्या जनक राजानें अत्यंत संतुष्ट होऊन आणखीही उत्कृष्ट उत्कृष्ट धन कन्यांना दिलें आणि याप्रमाणे अनेक प्रकारचें द्रव्य देऊन व दशरथ राजाला निरोप देऊन मिथिलाधिपति जनक राजा स्वस्थानीं म्हणजे मिथिलेमध्ये प्रविष्ट झाला. तेव्हा, अयोध्याधिपति दशरथ राजाही महात्मे सर्व पुत्र बरोबर घेऊन व सर्व ऋषींना पुढे घालून सैन्यांसहवर्तमान तेथून निघाला; परंतु, ऋषिगण आणि

गच्छन्तं तु नरव्याघ्रं सर्षिसङ्घं सराघवम् ८
घोरास्तु पक्षिणो वाचो व्याहरन्ति समन्ततः ।
भौमाश्चैव मृगाः सर्वे गच्छन्ति स्म प्रदक्षिणम् ९
तान्दृष्ट्वा राजशार्दूलो वसिष्ठं पर्यपृच्छत ।
असौम्याः पक्षिणो घोरा मृगाश्चापि प्रदक्षिणाः १०
किमिदं हृदयोत्कम्पि मनो मम विषीदति ।
राज्ञो दशरथस्यैतच्छ्रुत्वा वाक्यं महानृषिः ११
उवाच मधुरां वाणीं श्रूयतामस्य यत्फलम् ।
उपस्थितं भयं घोरं दिव्यं पक्षिमुखाच्च्युतम् १२
मृगाः प्रशमयन्त्येते संतापस्त्यज्यतामयम् ।
तेषां संवदतां तत्र वायुः प्रादुर्बभूव ह १३
कम्पयन्मेदिनीं सर्वां पातयंश्च महाद्रुमान् ।
तमसा संवृतः सूर्यः सर्वे नावेदिषुर्दिशः १४
भस्मना चावृतं सर्वं संमूढमिव तद्बलम् ।

रामप्रभृति पुत्र यासहवर्तमान तो पुरुषश्रेष्ठ दशरथ राजा जाऊं लागला असतां त्याच्या आसमंताद्भागीं पक्षी भयंकर शब्द करूं लागले व पृथ्वीवरील सर्व पशु त्याला उजवी घालूनही जाऊं लागले. ( ६–९ )

तेव्हा त्यांना अवलोकन करून नृपश्रेष्ठ दशरथ वसिष्ठांना म्हणाला, " पक्षी भयंकर शब्द करीत आहेत व घोर पशुही उजवी घालून जात आहेत. तेव्हा हृदय कंपित करणारें असें हें काय आहे? माझ्या मनाला तर कांहीं सुचत नाहीं." हें दशरथ राजाचें भाषण श्रवण करून महर्षि वसिष्ठ मधुर शब्दांनीं त्याला म्हणाले, " याचें काय फल आहे, हें श्रवण कर. पक्ष्यांच्या तोंडून जो हा अन्तरिक्षामध्यें शब्द निघाला, त्यानें घोर भय सुचविलें; परंतु उजवी घालून जाणारे हे पशु तें भय शांत करीत आहेत. करिता, तूं हें भय सोडून दे." याप्रमाणे त्यांचा संवाद चालला आहे, तोंच सर्व पृथ्वी कंपित करणारा व मोठेमोठे वृक्ष उलथून पाडणारा असा वारा सुटला; सूर्य अंधकारानें आच्छादित झाला; दिशांचें भान कोणालाही राहिलें नाहीं, व तें बरोबर असलेलें सैन्य तर अगदीं सर्व धुराळ्यानें

वसिष्ठो ऋषयश्चान्ये राजा च ससुतस्तदा १५
ससंज्ञा इव तत्रासन्सर्वमन्यद्विचेतनम् ।
तस्मिंस्तमसि घोरे तु भस्मच्छन्नेव सा चमूः १६
ददर्श भीमसंकाशं जटामण्डलधारिणम् ।
भार्गवं जामदग्न्येयं राजा राजविमर्दनम् । १७
कैलासमिव दुर्धर्षं कालाग्निमिव दुःसहम् ।
ज्वलन्तमिव तेजोभिर्दुर्निरीक्ष्यं पृथग्जनैः १८
स्कन्धे चासज्य परशुं धनुर्विद्युद्गणोपमम् ।
प्रगृह्य शरमुग्रं च त्रिपुरघ्नं यथा शिवम् १९
तं दृष्ट्वा भीमसंकाशं ज्वलन्तमिव पावकम् ।
वसिष्ठप्रमुखा विप्रा जपहोमपरायणाः २०
संगता मुनयः सर्वे संजजल्पुरथो मिथः ।
कच्चित्पितृवधामर्षी क्षत्रं नोत्सादयिष्यति २१

---

आच्छादित होऊन अगदी मूर्च्छित झाल्यासारखें झालें. वसिष्ठ, इतर ऋषि आणि पुत्रांसहवर्तमान दशरथराजा एवढेच काय ते त्या ठिकाणीं शुद्धीवर असल्यासारखे दिसत होते; बाकी सर्व कांहीं मूर्च्छित झालें होतें व त्या घोर अंधःकारामध्ये ती सेना तर धुराळयानें आच्छादित झाल्यासारखीच दिसत होती. ( १०-१६ )

असो. इतक्यांत क्षत्रियनाशक व दिसण्यांतही भयंकर असा जटाधारी भार्गव-पुत्र राम दशरथराजानें अवलोकन केला. तो कैलासपर्वताप्रमाणें धिप्पाड होता; तेजामुळें त्याच्या सम्मुख जाणेंही अशक्य होतें; प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तो दुःसह होता आणि तेजानें जळत असल्यामुळें सामान्य जनांनी तर त्याच्याकडे पाहणेंही शक्य नव्हतें. खांद्यावर त्यानें परशु टाकलेला होता आणि विद्युल्लतांच्या समुदायाप्रमाणें अत्यंत तेजस्वी धनुष्य हातांत घेतलें असल्यामुळें त्रिपुरासुर-नाशक धनुष्य धारण केलेल्या शिवाप्रमाणेंच तो दिसत होता. प्रज्वलित अग्नीच कीं काय, अशा त्या उग्रस्वरूप परशुरामाला अवलोकन केल्यावर जपहोमपरायण असे वसिष्ठप्रभृति विप्र आणि इतर सर्व मुनि एकत्र जमून, आपआपल्यामध्यें पुटपुटूं लागले की, "अहो, पित्याचा वध सहन न करणारा हा परशुराम क्षत्रियां-

पूर्वं क्षत्रवधं कृत्वा गतमन्युर्गतज्वरः ।
क्षत्रस्योत्सादनं भूयो न खल्वस्य चिकीर्षितम् २१
एवमुक्त्वार्घ्यमादाय भार्गवं भीमदर्शनम् ।
ऋषयो राम रामेति मधुरं वाक्यमब्रुवन् २३
प्रतिगृह्य तु तां पूजामृषिदत्तां प्रतापवान् ।
रामं दाशरथिं रामो जामदग्न्योऽभ्यभाषत २४

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः ७४ [२२१०]

पञ्चसप्ततितमः सर्गः ।

राम दाशरथे वीर वीर्यं ते श्रूयतेऽद्भुतम् ।
धनुषो भेदनं चैव निखिलेन मया श्रुतम् १
तदद्भुतमचिन्त्यं च भेदनं धनुषस्तथा ।
तच्छ्रुत्वाहमनुप्राप्तो धनुर्गृह्य परं शुभम् २
तदिदं घोरसंकाशं जामदग्न्यं महद्धनुः ।

---

चा उच्छेद करण्याच्या उद्देशानें तर येथें आला नाहीं ना ? ( १७–२१ )

अहो, पूर्वीं क्षत्रियांचा वध केल्यामुळे याचा क्रोध व संताप नाहीसा झाला होता; तथापि, पुनरपि क्षत्रियजाति उच्छिन्न करून टाकण्याचें तर यानें मनामध्यें आणिलें नाहीं ना ? " याप्रमाणे आपआपसांत बोलून ऋषींनी दिसण्यांत उग्र असलेल्या त्या भार्गवरामाचें, पूजासाहित्य आणून, पूजन केलें. आणि " हे राम, हे राम " असें म्हणून त्याच्याशीं मधुर भाषण करूं लागले. तेव्हा प्रतापी जमदग्निपुत्र रामानें ऋषींनी केलेल्या त्या पूजेचा स्वीकार केला आणि नंतर दाशरथि रामाशीं तो बोलूं लागला. ( २२–२४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बाल-कांडापैकीं चौऱ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७४ ॥

हे रामा, हे दाशरथे, हे वीरा, तुझें वीर्य अद्भुत आहे, म्हणून माझे ऐकण्यांत आलें आहे व धनुष्य मोडणें वगैरे प्रकारही सर्व माझ्या कानावर आलेला आहे. तूं जें त्याप्रमाणे ( अनायासानें ) धनुष्य मोडून टाकलेंस तें कृत्य ( सामान्य जनाला ) मोठें अद्भुत व अतर्क्य ( वाटण्यासारखें ) झालें असल्यामुळे तें ऐकल्या–

पूरयस्व शरेणैव स्वबलं दर्शयस्व च    ३
तदहं ते बलं दृष्ट्वा धनुषोऽप्यस्य पूरणे ।
द्वन्द्वयुद्धं प्रदास्यामि वीर्यश्लाघ्यमहं तव    ४
तस्य तद्वचनं श्रुत्वा राजा दशरथस्तदा ।
विषण्णवदनो दीनः प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत्    ५
क्षत्ररोषात्प्रशान्तस्त्वं ब्राह्मणश्च महातपाः ।
बालानां मम पुत्राणामभयं दातुमर्हसि    ६
भार्गवाणां कुले जातः स्वाध्यायव्रतशालिनाम् ।
सहस्राक्षे प्रतिज्ञाय शस्त्रं प्रक्षिप्तवानसि    ७
स त्वं धर्मपरो भूत्वा कश्यपाय वसुन्धराम् ।
दत्त्वा वनमुपागम्य महेन्द्रकृतकेतनः    ८
मम सर्वविनाशाय संप्राप्तस्त्वं महामुने ।
न चैकस्मिन्हते रामे सर्वे जीवामहे वयम्    ९

नंतर दुसरें चांगलें धनुष्य घेऊन मी आलों आहे. करिता, दिसण्यांतही घोर असलेल्या या प्रचंड जामदग्न्य धनुष्याला बाण लावूनच तूं आपलें सामर्थ्य मला दाखव. सारांश, या धनुष्याला बाण लावण्यावरून तुझें सामर्थ्य माझ्या अवलोकनांत आलें, म्हणजे मी तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करीन व वीर्याच्या दृष्टीनें तें द्वंद्वयुद्ध तुझ्या प्रशंसेसच पात्र होईल." हें परशुरामाचें भाषण श्रवण केल्यावर दशरथराजा खिन्नवदन होऊन दीन झाला आणि हात जोडून त्याला म्हणाला. (१-५)

"क्षत्रियांसंबंधानें जो तुझे ठिकाणीं क्रोध होता, तो क्षत्रियांच्या वधानें नाहींसा करून, तूं महातपस्वी ब्राह्मण शांत झाला आहेस. यास्तव, माझ्या बालवयी पुत्रांना अभयदान दे. वेदाध्ययनरूप व्रतानें संपन्न अशा भार्गवांच्या कुलामध्ये तूं उत्पन्न झाला आहेस आणि ( अतःपर शस्त्र धारण करणार नाहीं, अशी) इंद्राचे संनिध प्रतिज्ञा करून तूं शस्त्राचा त्याग केला आहेस. तस्मात् धर्माचरणाविषयी तत्पर होऊन, तूं कश्यपमुनीला पृथ्वी दिलीस आणि वनामध्ये जाऊन महेंद्रपर्वताचा आश्रय करून राहिलास; परंतु ( असें असतांनाही ) माझा सर्वस्वी नाश करण्याकरिता, हे महामुने, तूं प्राप्त झाला आहेस. अरे, एका रामाचा तूं

*

ब्रुवत्येवं दशरथे जामदग्न्यः प्रतापवान् ।
अनादृत्य तु तद्वाक्यं राममेवाभ्यभाषत १०
इमे द्वे धनुषी श्रेष्ठे दिव्ये लोकाभिपूजिते ।
दृढे बलवती मुख्ये सुकृते विश्वकर्मणा ११
अनुसृष्टं सुरैरेकं त्र्यम्बकाय युयुत्सवे ।
त्रिपुरघ्नं नरश्रेष्ठ भग्नं काकुत्स्थ यत्त्वया १२
इदं द्वितीयं दुर्धर्षं विष्णोर्दत्तं सुरोत्तमैः १३
तदिदं वैष्णवं राम धनुः परपुरंजयम् ।
समानसारं काकुत्स्थ रौद्रेण धनुषा त्विदम् १४
तदा तु देवताः सर्वाः पृच्छन्ति स्म पितामहम् ।
शितिकण्ठस्य विष्णोश्च बलाबलनिरीक्षया १५
अभिप्रायं तु विज्ञाय देवतानां पितामहः ।
विरोधं जनयामास तयोः सत्यवतां वरः १६
विरोधे तु महद्युद्धमभवद्रोमहर्षणम् ।

वध केलास, तर आमच्यापैकी कोणीही जिवंत राहणार नाही." ( ६--९ )

याप्रमाणे दशरथराजा विनंती करीत असतांना प्रतापी जमदग्निपुत्र परशुराम त्याच्या विनंतीकडे दुर्लक्ष्य करून रामाशींच बोलूं लागले की, "हीं दोन श्रेष्ठ दिव्य धनुष्यें लोकमान्य, दृढ, बलाढ्य पुरुषालाच लवणारीं व उत्कृष्ट अशीं विश्वकर्म्यानें मोठ्या यत्नानें निर्माण केलीं होतीं. त्यांपैकीं युद्धाची इच्छा करणाऱ्या त्र्यंबकाला त्रिपुरनाशक असें एक धनुष्य देवांनी पूर्वी दिलें होतें व हे पुरुषश्रेष्ठा, ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्याचाच तूं भंग केलास. हे रामा, हें दुसरें धनुष्य दुःसह असून, सुरश्रेष्ठांनी विष्णूला दिलें होतें. तें हें वैष्णव धनुष्य शत्रुसमूहाचा पराजय करणारें असून, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, सामर्थ्यानें हें रुद्राच्या धनुष्याची बरोबरी करणारें आहे. ( १०--१४ )

( त्रिपुरासुराचा वध झाला ), तेव्हा सर्व देवांनी शिव आणि विष्णु यांचें बलाबल समजण्याच्या उद्देशानें ब्रह्मदेवाला प्रश्न केला असतां देवांचा अभिप्राय जाणून त्या सत्यवानांमध्ये श्रेष्ठ असलेल्या ब्रह्मदेवानें त्या उभयतांमध्ये विरोध

शितिकण्ठस्य विष्णोश्च परस्परजयैषिणोः १७
तदा तु जृम्भितं शैवं धनुर्भीमपराक्रमम् ।
हुङ्कारेण महादेवः स्तम्भितोऽथ त्रिलोचनः १८
देवैस्तदा समागम्य सर्षिसङ्घैः सचारणैः ।
याचितौ प्रशमं तत्र जग्मतुस्तौ सुरोत्तमौ १९
जृम्भितं तद्धनुर्दृष्ट्वा शैवं विष्णुपराक्रमैः ।
अधिकं मेनिरे विष्णुं देवाः सर्षिगणास्तथा २०
धनू रुद्रस्तु संक्रुद्धो विदेहेषु महायशाः ।
देवरातस्य राजर्षेर्ददौ हस्ते ससायकम् २१
इदं च वैष्णवं राम धनुः परपुरंजयम् ।
ऋचीके भार्गवे प्रादाद्विष्णुः सन्यासमुत्तमम् २२
ऋचीकस्तु महातेजाः पुत्रस्याप्रतिकर्मणः ।
पितुर्मम ददौ दिव्यं जामदग्नेर्महात्मनः २३
न्यस्तशस्त्रे पितरि मे तपोबलसमन्विते ।

---

उत्पन्न केला आणि विरोध उत्पन्न झाल्यावर परस्परांचा पराजय करण्याच्या इच्छेने शिव आणि विष्णु यांमध्ये शरिरावर रोमांच उठविणारें असें प्रचंड युद्ध सुरू झालें. तेव्हा विष्णूने हुंकाराने तें भयंकर पराक्रम करणारें रुद्रधनुष्य शिथिल करून त्रिलोचन महादेवाचेंही स्तंभन केलें. ( १५–१८ )

तेव्हा, ऋषिगण आणि चारण यांसहवर्तमान सर्व देवांनी एकत्र होऊन त्या उभयतां सुरश्रेष्ठांची प्रार्थना केली असतां ते शांत झाले आणि विष्णूच्या पराक्रमांनी तें शैव धनुष्य शिथिल झाल्याचें अवलोकन करून ऋषिगणांसहवर्तमान देव विष्णूला अधिक मानूं लागले. असो. तें शिथिल झालेलें धनुष्य क्रुद्ध झालेल्या महाकीर्तिमान् रुद्राने विदेहदेशामध्ये असलेल्या राजर्षि देवराताच्या हातीं बाणांसहवर्तमान दिलें. असो. हे रामा, शत्रुसमूहाचा पराजय करणारें हें वैष्णव धनुष्य त्या विष्णूने भृगुपुत्र ऋचीकाला उत्कृष्ट ठेव म्हणून दिलें. ( १९–२२ )

पुढे महातेजस्वी ऋचीकाने कोणालाही उलट दुःख न देणारा असा जो त्याचा पुत्र व माझा पिता महात्मा जमदग्नि त्याला हें दिव्य धनुष्य दिलें. पुढे त्या

अर्जुनो विदधे मृत्युं प्राकृतां बुद्धिमास्थितः २४
वधमप्रतिरूपं तु पितुः श्रुत्वा सुदारुणम् ।
क्षत्रमुत्सादयं रोषाज्जातं जातमनेकशः २५
पृथिवीं चाखिलां प्राप्य कश्यपाय महात्मने ।
यज्ञस्यान्तेऽददं राम दक्षिणां पुण्यकर्मणे २६
दत्त्वा महेन्द्रनिलयस्तपोबलसमन्वितः ।
श्रुत्वा तु धनुषो भेदं ततोऽहं द्रुतमागतः २७
तदेव वैष्णवं राम पितृपैतामहं महत् ।
क्षत्रधर्मं पुरस्कृत्य गृह्णीष्व धनुरुत्तमम् २८
योजयस्व धनुः श्रेष्ठे शरं परपुरंजयम् ।
यदि शक्तोऽसि काकुत्स्थ द्वन्द्वं दास्यामि ते ततः २९

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः । ७५ [२२३९]

वैष्णवचापरूप शस्त्राचा त्याग केल्यावर तपःसामर्थ्यानें युक्त असलेल्याही माझ्या पित्याला यःकश्चित् समजून कार्तवीर्य अर्जुनाने त्याचा वध केला. तेव्हां, अत्यंत दारुण व अयोग्य असा पित्याचा वध झाल्याचें ऐकतांक्षणीं मी फिरून फिरून उत्पन्न झालेली क्षत्रियजाति अनेक वेळा उच्छिन्न करून टाकली आणि हे रामा, ही संपूर्ण पृथ्वी प्राप्त झाल्यावर महात्म्या पुण्यकर्मी कश्यपाला ती यज्ञाचे शेवटीं दक्षिणा म्हणून मी देऊन टाकिली. ( २३-२६ )

कश्यपाला पृथ्वी देऊन टाकून तपःसामर्थ्यानें युक्त असलेला मी महेंद्रपर्वताचा आश्रय करून राहिलों; परंतु तूं धनुष्याचा भंग केलास हें ऐकतांक्षणीं मी तेथून सत्वर आलों आहे. सारांश, हे रामा, हें प्रचंड वैष्णव धनुष्य पितृपितामहपरंपरेनें मला प्राप्त झालेलें आहे. करिता, क्षत्रधर्माला स्मरून तूं हें उत्कृष्ट धनुष्य घे आणि या श्रेष्ठ धनुष्याला शत्रुसमूहनाशक असा बाण तूं लाव. सारांश, या धनुष्याला बाण लावण्यास तूं समर्थ झालास, म्हणजे हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, मी तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करीन. ( २७-२९ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७५ ॥

षट्सप्ततितमः सर्गः ।

श्रुत्वा तु जामदग्न्यस्य वाक्यं दाशरथिस्तदा ।
गौरवाद्यन्त्रितकथः पितू राममथाब्रवीत् १
श्रुतवानसि यत्कर्म कृतवानसि भार्गव ।
अनुरुध्यामहे ब्रह्मन्पितुरानृण्यमास्थितः २
वीर्यहीनमिवाशक्तं क्षत्रधर्मेण भार्गव ।
अवजानासि मे तेजः पश्य मेऽद्य पराक्रमम् ३
इत्युक्त्वा राघवः क्रुद्धो भार्गवस्य वरायुधम् ।
शरं च प्रतिजग्राह हस्ताल्लघुपराक्रमः ४
आरोप्य स धनू रामः शरं सज्यं चकार ह ।
जामदग्न्यं ततो रामं रामः क्रुद्धोऽब्रवीदिदम् ५
ब्राह्मणोऽसीति पूज्यो मे विश्वामित्रकृतेन च ।
तस्माच्छक्तो न ते राम मोक्तुं प्राणहरं शरम् ६
इमां वा त्वद्गतिं राम तपोबलसमर्जितान् ।

---

याप्रमाणे जमदग्निपुत्र परशुरामाचें भाषण श्रवण केल्यावर दाशरथि राम, पिता संनिध असल्यामुळे उच्च स्वरानें न बोलतां, नम्रपणानें परशुरामाला म्हणाला, " हे भार्गवा, हे ब्रह्मन्, मी त्र्यंबकचाप मोडल्याचें तूं ऐकलें असशील आणि पित्याच्या ऋणांतून मुक्त होण्याकरिता तूं जें कर्म केलेंस, तेंही आम्हांला कबूल आहे; परंतु हे भार्गवा, क्षत्रधर्मानें संपन्न असलेल्या माझा, वीर्यहीन अशक्ता-प्रमाणे, तूं अवमान करीत आहेस, हें मात्र आम्हांला खपत नाही. करिता, आज माझें तेज व पराक्रम तूं पहा. " याप्रमाणे सांगून त्या क्रुद्ध झालेल्या शीघ्रपराक्रमी रघुवंशज रामानें भार्गवाचें धनुष्य व बाण यांचा स्वीकार केला आणि धनुष्याला प्रत्यंचा चढवून रामानें त्याला बाणही लाविला. नंतर दाशरथि राम क्रुद्ध होऊन, त्या जमदग्निपुत्र परशुरामाला म्हणाला. ( १–५ )

" तूं ब्राह्मण आहेस म्हणून मला पूज्य आहेस. एतदर्थ आणि विश्वामित्रा (च्या भगिनीचा पौत्र आहेस, म्हणून त्या) करिता, हे रामा, मी तुझ्यावर प्राण-घातक बाण सोडण्यास असमर्थ आहें. तेव्हा, हे भार्गवरामा, ही तुझी गति

लोकानप्रतिमान्वापि हनिष्यामीति मे मतिः ७
न ह्ययं वैष्णवो दिव्यः शरः परपुरंजयः ।
मोघः पतति वीर्येण बलदर्पविनाशनः ८
वरायुधधरं रामं द्रष्टुं सर्षिगणाः सुराः ।
पितामहं पुरस्कृत्य समेतास्तत्र सर्वशः ९
गन्धर्वाप्सरसश्चैव सिद्धचारणकिंनराः ।
यक्षराक्षसनागाश्च तद्द्रष्टुं महदद्भुतम् १०
जडीकृते तदालोके रामे वरधनुर्धरे ।
निर्वीर्यो जामदग्न्योऽसौ रामो राममुदैक्षत ११
तेजोभिर्गतवीर्यत्वाज्जामदग्न्यो जडीकृतः ।
रामं कमलपत्राक्षं मन्दमन्दमुवाच ह १२
काश्यपाय मया दत्ता यदा पूर्वं वसुंधरा ।
विषये मे न वस्तव्यमिति मां काश्यपोऽब्रवीत् १३

( म्हणजे पाय ) अथवा तपःसामर्थ्याने संपादित केलेले अप्रतिम लोक नाहीसे करावे, असें मला वाटतें; कारण, स्वसामर्थ्याने शत्रूंचा बलाविषयी गर्व नाहीसा करून, शत्रुसमूहांचाही नाश करणारा हा दिव्य वैष्णव बाण व्यर्थ पडणार नाही." ( ६–८ )

याप्रमाणे दाशरथि राम परशुरामाला उद्देशून भाषण करीत असतांना तें श्रेष्ठ वैष्णव धनुष्य धारण केलेल्या रामाला अवलोकन करण्याकरिता ऋषिगणांसहवर्तमान सर्व देव ब्रह्मदेवाला पुढे करून त्या ठिकाणीं आले आणि तो मोठा अद्भुत प्रकार अवलोन करण्याकरिता गंधर्व, अप्सरा, सिद्ध, चारण, किन्नर, यक्ष, राक्षस आणि नाग हेही तेथे जमले. नंतर श्रेष्ठ धनुष्य धारण करणाऱ्या दाशरथि रामाचे ठिकाणीं भार्गवरामामध्ये असलेलें तेज प्रविष्ट झाल्यामुळे भार्गवराम केवल जड झाला आणि नंतर निर्वीर्य बनलेला तो जमदग्निपुत्र राम दाशरथि रामाकडे पाहू लागला. सारांश, तेज रामाचें ठिकाणीं गेल्याकारणाने निर्वीर्य झालेला आणि म्हणूनच जड बनलेला जमदग्निपुत्र परशुराम कमलनयन रामाला हळूहळू म्हणाला, " मी जेव्हा पूर्वी काश्यपाला पृथ्वी दिली, तेव्हा ( हा रात्रीं

सोऽहं गुरुवचः कुर्वन्पृथिव्यां न वसे निशाम् ।
तदाप्रभृति काकुत्स्थ कृता मे काश्यपस्य ह　　१४
तामिमां मद्गतिं वीर हन्तुं नार्हसि राघव ।
मनोजवं गमिष्यामि महेन्द्रं पर्वतोत्तमम्　　१५
लोकास्त्वप्रतिमा राम निर्जितास्तपसा मया ।
जहि ताञ्छरमुख्येन मा भूत्कालस्य पर्ययः　　१६
अक्षय्यं मधुहन्तारं जानामि त्वां सुरेश्वरम् ।
धनुषोऽस्य परामर्शात्स्वस्ति तेऽस्तु परन्तप　　१७
एते सुरगणाः सर्वे निरीक्षन्ते समागताः ।
त्वामप्रतिमकर्माणमप्रतिद्वन्द्वमाहवे　　१८
न चेयं तव काकुत्स्थ व्रीडा भवितुमर्हति ।
त्वया त्रैलोक्यनाथेन यदहं विमुखीकृतः　　१९
शरमप्रतिमं राम मोक्तुमर्हसि सुव्रत ।

---

पृथ्वीवर राहिला असतां क्षत्रियांना झोप येणार नाही, असें समजून ) "माझ्या प्रदेशामध्ये तूं राहूं नकोस," म्हणून मला काश्यपानें सांगितलें. ( ९–१३ )

तेव्हापासून, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, गुरूंची आज्ञा परिपालन करण्याकरिता मी रात्रीं पृथ्वीवर वास्तव्य करीत नाही. कारण, काश्यपासंनिध मीं तशीच प्रतिज्ञा केलेली आहे. तस्मात्, ती ही माझी गति तूं नाहीशी करूं नकोस. म्हणजे, हे वीरा राघवा, मी मनोवेगानें महेंद्रनामक श्रेष्ठ पर्वतावर जाईन. हे रामा, तपश्चर्येच्या योगानें मीं अप्रतिम लोक संपादन केलेले आहेत, ते तूं या श्रेष्ठ बाणानें खुशाल नाहींसे कर कसा. आता विलंब नको. हें धनुष्य ग्रहण केल्यावरून मी तुला अक्षय्य असा सुरश्रेष्ठ विष्णु समजत आहें. हे शत्रुतापना, तुझें कल्याण असो. ( १४–१७ )

हे सर्व देवगण येथे आले आहेत व संग्रामामध्ये ज्याला प्रतियोद्धा नाही व ज्याच्या पराक्रमालाही तोड नाही, अशा तुला अवलोकन करीत आहेत. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं त्रैलोक्यनाथानें मला पराजित केलेंस, म्हणून तुझ्यासंबंधानें मला लाज बाळगण्याचें कारण नाही. हे सदाचरणसंपन्न रामा, तूं आता

शरमोक्षे गमिष्यामि महेन्द्रं पर्वतोत्तमम् २०
तथा ब्रुवति रामे तु जामदग्न्ये प्रतापवान् ।
रामो दाशरथिः श्रीमांश्चिक्षेप शरमुत्तमम् २१
स हतान्दृश्य रामेण स्वाँल्लोकाँस्तपसार्जितान् ।
जामदग्न्यो जगामाशु महेन्द्रं पर्वतोत्तमम् २२
ततो वितिमिराः सर्वा दिशश्चोपदिशस्तथा ।
सुराः सर्षिगणा रामं प्रशशंसुरुदायुधम् २३
रामं दाशरथिं रामो जामदग्न्यः प्रपूजितः ।
ततः प्रदक्षिणीकृत्य जगामात्मगतिं प्रभुः २४

इत्यार्षे श्री० वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः । ७६ [२२६३]

---

हा अप्रतिम बाण सोड; तो तूं सोडलास म्हणजे मी महेंद्रसंज्ञक श्रेष्ठ पर्वतावर चालता होईन. " याप्रमाणे जमदग्निपुत्र परशुराम सांगत असतांना प्रतापी व वैभवशाली दाशरथि रामाने तो उत्कृष्ट बाण सोडिला. तेव्हा तपाने संपादन केलेले आपले लोक रामाने नाहीसे केलेले पाहून, जमदग्निपुत्र परशुराम श्रेष्ठ अशा महेंद्रपर्वतावर लागलीच जावयास निघाला.× तदनंतर सर्व दिशा व उपदिशा अंधकाररहित झाल्या आणि ऋषिगणांसहवर्तमान देवांनी धनुर्धारी रामाची प्रशंसा केली. त्या समयीं दाशरथि रामाने परशुरामाचें पूजन केलें व तो समर्थ परशुरामही दाशरथि रामाला उजवी घालून स्वस्थानीं गेला. ( १८–२४ )

याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी शहात्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७६ ॥

---

× बालकाण्ड सर्ग ७६ – या सर्गामधील शेवटचे श्लोक २२, २३, २४ यांचा क्रम २२, २४, २३, असा असावयास पाहिजे, असें वाटतें; कारण श्लोक २२ मध्ये– " **जामदग्न्यो जगामाशु महेन्द्रं पर्वतोत्तमम् ।** " असा स्पष्ट उल्लेख असून, पुढे– " **ततो वितिमिराः सर्वा दिशश्चोपदिशस्तथा । सुराः सर्षिगणा रामं प्रशशंसुरुदायुधम्** ॥ २३ ॥ असें वर्णन आहे. म्हणजे, जामदग्न्य महेन्द्र पर्वतावर निघून गेला व त्यानन्तर दिशा प्रसन्न झाल्या व देवांनी रामाची प्रशंसा केली, झालें, येथे सर्ग समाप्त झाला. आता, ज्या अर्थी

( टिप्पणी- मागील पृष्ठावरून )
जामदग्न्य पूर्वीच निघून गेला होता, त्या अर्थी तेथे तो नव्हताच, तर श्रीरामानें त्याचें प्रपूजन करणें आणि त्यानेही श्रीरामास प्रदक्षिणा करणें, हें संभवतें कसें ? अर्थात् या श्लोकाचें कांही प्रयोजनच रहात नाही. म्हणजे या श्लोकाला वैयर्थ्य येतें; पण जामदग्न्यऋषि तेथून जाण्यापूर्वी रामाने त्याचें प्रपूजन करणें व त्यानेही रामाला प्रदक्षिणा करून जाणें, या धर्मशास्त्रप्रणीत शिष्टाचारविहित क्रिया आहेत. तेव्हा २४ वा श्लोक व्यर्थ आहे, असें म्हणतां येत नाही. त्यास ही जी अर्थाची विसंगति दिसत आहे, ती २३ वा श्लोक मध्ये पडल्याने दिसत आहे. वास्तव २२ वे श्लोकाचे पुढे २४ वा श्लोक ठेवावा व त्याच्यापुढे म्हणजे शेवटीं २३ वा श्लोक ठेवावा, म्हणजे सर्व संगति नीट लागते, ती अशी-

बाविसाव्या (२२) श्लोकांतील " **जगामाशु** " याचा " जावयास निघाला असतां, " " जाऊं लागला असतां, " असा अर्थ करावयाचा. म्हणजे-" जामदग्न्य महेन्द्र पर्वताकडे जावयास निघाला असतां, श्रीरामाने त्याचें प्रपूजन केलें व श्रीरामाला प्रदक्षिणा करून, जामदग्न्यही "आत्मगतिं जगाम" म्हणजे आपल्या वाटेने जाता झाला. असा दोनही श्लोकांचा मिळून अर्थ सरळ होतो व शेवटीं, " **ततो वितिमिराः सर्वा दिशश्चोपदिशस्तथा** " इत्यादि हा श्लोक क्रमशः योग्य स्थळीं येतो व विसंगति नष्ट होते. या विवेचनान्वयें हे तीन श्लोक अशा क्रमाने असले पाहिजेत—

**स हतान् दृश्य रामेण स्वाँल्लोकान् तपसार्जितान् ।**
**जामदग्न्यो जगमाशु महेंद्रं पर्वतोत्तमम् ॥ २२ ॥**
**रामं दाशरथी रामो जामदग्न्यः प्रपूजितः ।**
**ततः प्रदक्षिणीकृत्य जगामात्मगतिं प्रभुः ॥ २३ ॥**
**ततो वितिमिराः सर्वा दिशश्च प्रदिशस्तथा ।**
**सुराः सर्षिगणा रामं प्रशशंसुरुदायुधम् ॥ २४ ॥**

म्हणजे, तपाचे योगाने संपादन केलेले आपले लोक श्रीरामाने नष्ट केलेले पाहून, जामदग्न्य लागलीच महेन्द्र पर्वताकडे जावयास निघाला असतां, श्रीरामाने त्याचें पूजन केलें व तो श्रीरामास प्रदक्षिणा करून ( उजवी घालून ) आपल्या वाटेने जाता झाला.

सप्तसप्ततितमः सर्गः ।

गते रामे प्रशान्तात्मा रामो दाशरथिर्धनुः ।
वरुणायाप्रमेयाय ददौ हस्ते महायशाः १
अभिवाद्य ततो रामो वसिष्ठप्रमुखानृषीन् ।
पितरं विकलं दृष्ट्वा प्रोवाच रघुनन्दनः २
जामदग्न्यो गतो रामः प्रयातु चतुरङ्गिणी ।
अयोध्याभिमुखी सेना त्वया नाथेन पालिता ३
रामस्य वचनं श्रुत्वा राजा दशरथः सुतम् ।
बाहुभ्यां संपरिष्वज्य मूर्ध्न्युपाघ्राय राघवम् ४
गतो राम इति श्रुत्वा हृष्टः प्रमुदितो नृपः ।
पुनर्जातं तदा मेने पुत्रमात्मानमेव च ५
चोदयामास तां सेनां जगामाशु ततः पुरीम् ।
पताकाध्वजिनीं रम्यां तूर्योद्घुष्टनिनादिताम् ६
सिक्तराजपथां रम्यां प्रकीर्णकुसुमोत्कराम् ।

परशुराम गेल्यावर दाशरथि रामाचें मन शांत झालें व त्या महाकीर्तिमान् रामानें तें धनुष्य तेथें आलेल्या अचिंत्यसामर्थ्यवान् वरुणाच्या हातांत दिलें. नंतर वसिष्ठप्रभृति ऋषींना अभिवंदन केल्यावर खिन्न झालेल्या पित्याला अवलोकन करून रघुनंदन राम म्हणाला, " जामदग्न्य राम गेला. आता आपण प्रभूंनी रक्षण केलेली ही चतुरंग सेना अयोध्येकडे वळून चालूं लागू द्या. " हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर दशरथ राजानें आपल्या रघुवंशज पुत्राला बाहूंनी आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगिलें; कारण परशुराम गेला, हें ऐकिल्याबरोबर दशरथराजाला हर्ष व आनंद झाला आणि पुत्राचा व आपला पुनर्जन्म झाला, असेंही त्याला वाटलें. तदनंतर सेनेला चालू लागण्याची आज्ञा करून तो दशरथ सत्वर आपल्या अयोध्या नगरीकडे चालता झाला. ( १–६ )

( टिप्पणी– मागील पृष्ठावरून )

जामदग्न्य राम गेल्यानंतर सर्व दिशा प्रकाशित झाल्या व त्या धनुर्धारी रामाची सर्व ऋषिगणांसह सर्व देवगणांनी प्रशंसा केली.

राजप्रवेशसुमुखैः पौरैर्मङ्गलपाणिभिः ७
संपूर्णां प्राविशद्राजा जनौघैः समलंकृताम् ।
पौरैः प्रत्युद्गतो दूरं द्विजैश्च पुरवासिभिः ८
पुत्रैरनुगतः श्रीमाञ्छ्रीमद्भिश्च महायशाः ।
प्रविवेश गृहं राजा हिमवत्सदृशं प्रियम् ॥
ननन्द स्वजनै राजा गृहे कामैः सुपूजितः ९
कौसल्या च सुमित्रा च कैकेयी च सुमध्यमा ।
वधूप्रतिग्रहे युक्ता याश्चान्या राजयोषितः १०
ततः सीतां महाभागामूर्मिलां च यशस्विनीम् ।
कुशध्वजसुते चोभे जगृहुर्नृपयोषितः ११
मङ्गलालापनैर्होमैः शोभिताः क्षौमवाससः ।
देवतायतनान्याशु सर्वास्ताः प्रत्यपूजयन् १२

ती रम्य नगरी पताका व ध्वज यांनी युक्त असून, वाद्यघोषाने दुमदुमून गेलेली होती व राजमार्गावर सडा घातलेला असल्यामुळे आणि पुष्पांचे ढीग ठिकठिकाणी पसरले असल्यामुळे ती मनोहर दिसत होती. राजाचा प्रवेश होणार असल्यामुळे ज्यांचीं मुखकमलें प्रफुल्लित झालीं आहेत व ज्यांनी आपल्या हातामध्ये मंगल-कारक पदार्थ घेतलेले आहेत, अशा नगरवासी जनांनी ती परिपूर्ण असून इतरही जनसमुदायांनी ती भूषित झालेली होती व अशा नगरीमध्ये राजाने प्रवेश केला. नगरांत राहणारे द्विज आणि इतरही नगरवासी जन हे दूरपर्यंत ज्याला सामोरे गेले आहेत आणि ज्याच्या मागोमाग वैभवशाली पुत्र येत आहेत, असा तो महा-कीर्तिमान् व श्रीमान् राजा हिमालयपर्वताप्रमाणे असलेल्या आपल्या प्रिय गृहा-मध्ये प्रविष्ट झाला आणि गृहामध्ये स्वजनांनी इष्ट वस्तु देऊन त्याचा उत्तम प्रकारे सन्मान केल्यामुळे तो आनंदित झाला व कौसल्या, सुमित्रा, सुंदरी कैकेयी आणि इतरही राजभार्या स्नुषांचें स्वागत करण्याकडे गुंतल्या. ( ७–१० )

तदनंतर महाभाग्यवती सीता, यशस्विनी ऊर्मिला आणि मांडवी व श्रुतकीर्ति या ज्या उभयता कुशध्वजराजाच्या कन्या त्यांचें राजभार्यांनी स्वागत केलें. आशीर्वाद प्राप्त झालेल्या व गृहप्रवेशनीय होम झाल्यामुळे कल्याणसंपन्न होऊन

अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वा राजसुतास्तदा ।
रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिर्मुदिता रहः १३
कृतदाराः कृतास्त्राश्च सधनाः ससुहृज्जनाः ।
शुश्रूषमाणाः पितरं वर्तयन्ति नरर्षभाः १४
कस्यचित्त्वथ कालस्य राजा दशरथः सुतम् ।
भरतं कैकयीपुत्रमब्रवीद्रघुनन्दनः १५
अयं केकयराजस्य पुत्रो वसति पुत्रक ।
त्वां नेतुमागतो वीरो युधाजिन्मातुलस्तव १६
श्रुत्वा दशरथस्यैतद्भरतः कैकयीसुतः ।
गमनायाभिचक्राम शत्रुघ्नसहितस्तदा १७
आपृच्छ्य पितरं शूरो रामं चाक्लिष्टकारिणम् ।
मातुश्चापि नरश्रेष्ठः शत्रुघ्नसहितो ययौ १८
युधाजित्प्राप्य भरतं सशत्रुघ्नं प्रहर्षितः ।
स्वपुरं प्राविशद्वीरः पिता तस्य तुतोष ह १९

क्षौमवस्त्र परिधान केलेल्या सर्वही राजकन्यांनी देवस्थानांना सत्वर प्रणाम केले; नंतर पूज्यांना अभिवंदन करून त्या सर्वही राजकन्या आनंदित झाल्या आणि भर्त्यांसहवर्तमान त्या एकांतामध्ये आनंदाने कालक्रमणा करूं लागल्या. भार्या, अस्त्रें, धन आणि सुहृद् यांनी युक्त असलेले ते पुरुषश्रेष्ठ रामप्रभृति दशरथपुत्र पित्याच्या सेवेमध्ये तत्पर राहून त्याच्या आज्ञेप्रमाणे वागत असत. याला कांहीं दिवस लोटल्यावर कैकयीपासून झालेल्या आपल्या भरत नामक पुत्राला रघुनंदन दशरथराजा म्हणाला. ( ११–१५ )

" मुला, हा केकयराजाचा पुत्र वीर युधाजित् तुझा मातुल तुला नेण्याकरितां येथे येऊन राहिला आहे." हें दशरथाचें भाषण श्रवण केल्यावर कैकयीपुत्र भरत व शत्रुघ्नाला बरोबर घेऊन जाण्यास निघाला आणि पिता, कोणाला कधीही न दुखविणारा राम व सर्व माता यांचा निरोप घेऊन, तो पुरुषश्रेष्ठ शूर भरत शत्रुघ्ना-सहवर्तमान चालता झाला. तेव्हा शत्रुघ्न बरोबर आल्यामुळे युधाजिताला हर्ष झाला आणि तो वीर आपल्या नगरांत प्रविष्ट झाल्यावर त्याचा पिताही संतुष्ट

गते च भरते रामो लक्ष्मणश्च महाबलः ।
पितरं देवसंकाशं पूजयामासतुस्तदा २०
पितुराज्ञां पुरस्कृत्य पौरकार्याणि सर्वशः ।
चकार रामः सर्वाणि प्रियाणि च हितानि च २१
मातृभ्यो मातृकार्याणि कृत्वा परमयन्त्रितः ।
गुरूणां गुरुकार्याणि काले कालेऽन्यवैक्षत २२
एवं दशरथः प्रीतो ब्राह्मणा नैगमास्तथा ।
रामस्य शीलवृत्तेन सर्वे विषयवासिनः २३
तेषामतियशा लोके रामः सत्यपराक्रमः ।
स्वयंभूरिव भूतानां बभूव गुणवत्तरः २४
रामश्च सीतया सार्धं विजहार बहूनृतून् ।
मनस्वी तद्गतमनास्तस्या हृदि समर्पितः २५
प्रिया तु सीता रामस्य दाराः पितृकृता इति ।
गुणाद्रूपगुणाच्चापि प्रीतिर्भूयोऽभिवर्धते २६

झाला. असो. भरत गेल्यावर राम व महाबलाढ्य लक्ष्मण हे उभयतां आपल्या देवतुल्य पित्याची मानमान्यता ठेवूं लागले आणि पित्याच्या आज्ञेने राम, प्रिय आणि हितावह, अशीं सर्व लोकांचीं कामें सर्व प्रकारें करूं लागला. (१६–२१)

मातांचीं जीं कार्यें असतील, तीं तो त्यांच्याकरिता करूं लागला आणि श्रुतिस्मृतींची मर्यादा यत्किंचितही उल्लंघन न करणारा तो राम गुरुसंबंधी शुश्रूषावगैरे कृत्यांकडेही वेळोवेळीं लक्ष्य पुरवूं लागला व याप्रमाणे राम वागूं लागला असतां त्याच्या सुशील वर्तनाने दशरथ, ब्राह्मण, उदमी आणि देशामध्ये राहणारे इतरही सर्व हे संतुष्ट झाले. त्या चार पुत्रांपैकीं अमोघपराक्रमी राम जगतामध्ये अत्यंत कीर्तिमान् झाला आणि प्राण्यांमध्ये ब्रह्मदेवाप्रमाणे अत्यंत गुणी झाला. सीतेचे ठिकाणीं ज्याचें मन आसक्त होऊन राहिलेलें आहे व सीतेनेही ज्याला आपल्या मनामध्ये ठेविलें आहे, अशा विचारी रामाने पुढे पुष्कळ ऋतु ( म्हणजे बारा संवत्सर ) सीतेसहवर्तमान आनंदामध्ये काढले ( २२–२५ )

पित्याने दिलेली भार्या म्हणून रामाला सीता आधीच प्रिय झाली होती व

तस्याश्च भर्ता द्विगुणं हृदये परिवर्तते ।
अन्तर्गतमपि व्यक्तमाख्याति हृदयं हृदा २७
तस्य भूयो विशेषेण मैथिली जनकात्मजा ।
देवताभिः समा रूपे सीता श्रीरिव रूपिणी २८
तया स राजर्षिसुतोऽभिकामया
समेयिवानुत्तमराजकन्यया ।
अतीव रामः शुशुभे मुदान्वितो
विभुः श्रिया विष्णुरिवामरेश्वरः २९

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये चतुर्विंशतिसाहस्र्यां संहितायां बालकाण्डे रामक्रीडाख्यानं नाम सप्तसप्ततितमः सर्गः ॥७७॥ [२२९२]

॥ समाप्तमिदं बालकाण्डम् ॥ १ ॥

---

अंगच्या गुणांमुळे आणि तिचे ठिकाणीं असणाऱ्या सौंदर्यरूप गुणामुळे तिच्याविषयींचें त्याचें प्रेम अधिकच वृद्धिंगत होत होतें. सीतेकडे रामाच्या मनाचा जितका ओढा असे, त्यापेक्षा सीतेच्या मनाचा रामाकडे दुप्पट ओढा असे आणि रूपामध्ये देवतांची बरोबरी करणारी व मूर्तिमंत लक्ष्मीप्रमाणेच असलेली ती जनककन्या मैथिली सीता रामाच्या अंतःकरणांतील अभिप्राय आपल्या अंतःकरणाने स्पष्टपणें फारच अधिक जाणीत असे. सारांश, तो राजर्षिपुत्र राम, प्रीतीस पात्र असलेल्या त्या उत्कृष्ट राजकन्येचा समागम झाल्यावर, लक्ष्मीशीं संगत झालेल्या देवाधिपति प्रभु भगवान् विष्णूप्रमाणे आनंदित होऊन फारच शोभूं लागला. ( २५–२९ )

याप्रमाणे चतुर्विंशतिसहस्रग्रंथात्मक महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी सत्त्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७७ ॥

या ठिकाणीं बालकांडहीं संपूर्ण झालें. ॥ १ ॥

॥ बाल–काण्ड समाप्त ॥



# श्रीवाल्मीकि रामायणाचें निरीक्षण.

## प्रास्ताविक

वाल्मीकि रामायणाचें व त्याबरोबरच इतर पुराणान्तरींच्या रामकथांचें निरीक्षण करावयाचें आहे. वाल्मीकि रामायणाच्या प्रत्येक काण्डाच्या उपसंहारा-मध्ये हा विषय येणार आहे. या निरीक्षणांत ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक, औद्योगिक, धार्मिक, आध्यात्मिक इत्यादि अनेक दृष्टींनी विचार होणार आहे.

रामायणांतील एकंदर कथेचा विहंगमदृष्टया विचार केला असतां आपणांस असें आढळून येतें की, या रामायणाच्या कथेमध्ये ( १ ) **देव**, ( २ ) **[ नर-मानव ] आर्य**, ( ३ ) **वानर** व ( ४ ) **राक्षस** या चार मानववंशाचा परस्पर राजकीय संबंध आलेला आहे.

दशरथाच्या अश्वमेधामध्ये जी मोठी सार्वराष्ट्रीय परिषद भरली होती व ज्या परिषदेंत रावणाचें साम्राज्य उलथून पाडावें, असें सर्वानुमतें ठरलें व त्या-साठी कोणी कोणी काय काय करावें तेंहि ठरलें, त्या परिषदेमध्ये ( १ ) देव,( २ ) ऋषि हे मुख्य कार्यकर्ते होते व ( ३ ) आर्यराजे व इतर आर्यपुढारी तेथे नुसते जमलेले होते. या परिषदेमध्ये वानर व राक्षस यापैकी कोणीहि आलेले नव्हते. याचें कारण असें होतें की, वानरराज वालीचें व राक्षसराजा रावणाचें अग्निसाक्षिक सख्य झालेलें होतें, म्हणजे यांचा परस्पर अनाक्रमणाचा व वेळप्रसंगीं परस्परांस सहाय्य करण्याचा तह झालेला होता. यामुळे देव व आर्य यांच्या परिषदेंत वानर व राक्षस या वेळीं सामील होणें शक्यच नव्हतें; पण वानरांना आपल्या बाजूस वळवावें व रावणाच्या गट्टींतून त्यांस फोडावें व त्यांची पुढील पिढी आपणांस मिळेल असें करावें, असें या परिषदेंतच ठरलें असल्याचें स्पष्ट दिसत आहे; कारण वानरांची पुढील पिढी कशी तयार करावी, त्याची योजनाहि याच परिषदेंत देव व ऋषि यांनी ठरविलेली दिसत आहे, ती वरील विधानाची सूचक आहे.

रामानें रावणाशीं सख्य करणाऱ्या वालीला ठार मारून सुग्रीवाशीं सख्य करून सर्व वानरांना आपणांकडे आणलें. या एका कृत्यानें रावणाचें अर्धे-अधिक बल कमी झालेलें आहे. राजनीतीच्या दृष्टीनें रामाचें हें धोरण फारच महत्त्वाचें दिसतें. या संबंधाचें सर्व वर्णन पुढे योग्य वेळीं येईलच, पण येथें हें दाखवावयाचें आहे कीं वालिवधापूर्वी—

( १ ) देव + आर्य ( मानव ) व

( २ ) वानर + राक्षस

असे जे गट होते, ते श्रीरामचन्द्रानें वानरांशीं सख्य करून व वालीचा वध करून—

( १ ) [ देव + आर्य ( मानव ) ] + वानर

( २ ) राक्षस

असे केले; यामुळे रावणाशीं युद्ध करतांना भारतीयांचें बळ वाढलें व लंकाद्वीपीय राक्षसांचें बल कमी झालें. हा थोडासा इतिहासाचा भाग येथें दाखवण्याचें कारण असें आहे की, रामायणांतील इतिहास हा या चार मानववंशांशीं कसा संबंधित झालेला आहे, हें वाचकांच्या चटकन लक्ष्यांत यावें.

रामायणांतील वर्णनावरून असें स्पष्ट दिसतें की, देववीर व आर्य-वीर हे रावणास थरकांप भीत असत. श्रीरामाच्यापूर्वी ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या आपसांतील भयंकर दुहीमुळे कांही क्षत्रिय राजांनी कांही ब्राह्मणांचे आश्रम धन मिळविण्यासाठीं लुटले व परशुरामासारख्या ब्राह्मणांतील शूर वीरांनीहि क्षत्रियांचा भयंकर संहार केला. आर्यावर्तांतील क्षत्रियांचा असा फार मोठा संहार २१ वेळा झाला, सुमारें १२०० राजे व लाखों लढवय्ये वीर ठार झाले व त्यामुळेच रावणाशीं टक्कर देण्याजोगा लढवय्या क्षत्रिय वीर आर्यावर्तांत जवळजवळ उरलेला नव्हता. या कारणानें रावणासारख्या परद्वीपस्थ राजानें येथें यावें व या आर्यराजांस हवेंतसें भिववावें, देववीरांस नाना प्रकारांनी त्रास द्यावा व हवातसा धुमाकूळ घालावा, ताटिकेसारख्या राक्षस स्त्रीनेसुद्धा हवातितका त्रास भारतीयांस द्यावा, असा छळगुकीचा प्रकार राजरोस चालला होता; पण वरील देववीर व आर्यवीर यांपैकी कोणीहि रावणाचा प्रतिकार करण्यास धजत नसत.

जेव्हा विश्वामित्र रामलक्ष्मणांस मागण्यासाठी आला, त्या वेळच्या दशरथाच्या भाषणांत रावणाविषयींची ही दहशत स्पष्टपणाने दिसत आहे. ( वा. रा. बा. २०।११-२७) यामुळे या वेळीं देववीर व आर्यवीर यांजकडून प्रत्यक्ष रावणाचा प्रतिकार होणें शक्यच नव्हतें, हें उघड होतें. अयोध्येच्या परिषदेमध्ये यांनी रावण-नाशाचे ठराव केले, हें खरें; पण हा ठराव करतांना या परिषदेंत आर्यवीर प्रत्यक्ष-पणें भाग घेण्याससुद्धा तयार नव्हते. या कारणाने परिषदेंतील ' **रावणवध** ' रूप कार्य प्रत्यक्ष घडवून आणण्यासाठी पुढची तरुण पिढीच नव्या शिस्तीनें तयार करणें त्या वेळच्या ऋषींना भाग पडलें, ही गोष्ट रावणाची दहशत किती होती, तें समजण्यास पुरेशी आहे.

या वेळीं वानरराष्ट्र फार बलाढ्य होतें व रावणास जर कोणाची भीति वाटत असली, तर ती वालीची भीति वाटत होती; कारण वालीनें त्यास खरपूस मार दिलाच होता.म्हणूनच रावणानें वालीशीं मित्रत्वाचा तह करून वानरराष्ट्रास आपणां-कडे ओढलें होतें. इतकेंच नव्हे तर युक्तीनें रावणानें आपलें निवडक १४००० राक्षससैन्य कसलेल्या पराक्रमी वीर खर,दूषण व त्रिशिरा या सेनापतींच्या नेतृत्वा-खाली नासिक--जनस्थान--प्रांतांत ठेऊन दिलें होतें. ही महत्त्वाची सैन्याची पाचर आर्यावर्तांतील क्षत्रिय राजांस वानर--राज्यापासून कायमचें दूर ठेवण्यासाठी म्हणजे या दोघांचा मेळ कधींहि होऊं नये, यासाठी रावणानें मारली होती. बलाढ्य वानरवीरांचा व धोरणी आर्यवीरांचा जर संधि झाला, तर तो आपणांस बाधक होईल, याची जाणीव रावणास पूर्णपणें होती, हें या योजनेवरून स्पष्ट दिसत आहे.

देववीर व आर्य यांचीं संमेलनें यज्ञाच्या मिषानें आर्यावर्तांत वारंवार होत;पण नाशकाच्या रावणाच्या सैन्याचा नाश करून, वालीशीं रुख करून रावणावर चालून जाण्याची योजना श्रीरामचन्द्रापर्यंत कोणासच घडवून आणतां आली नाही. रावणाच्या दहशतीनें देववीर व आर्यवीर गांगरलेले असल्यानेंच यांपैकीं कोणीहि श्रीरामचन्द्राच्या मदतीस प्रथम प्रत्यक्षपणें येऊं शकले नाहींत; पण जेव्हा रामाचा जय निःसंशय होतो, असें वाटलें, त्या वेळींच इन्द्रानें त्यास मदत करण्यास प्रारंभ केला. या वेळच्या राजकारणाची नीट कल्पना झाली, म्हणजे

*

वरील गोष्टींत कांहीं एक आश्चर्य वाटणार नाहीं.

ऋषिमात्र पहिल्यापासूनच आपणांकडून होईल तें सहाय्य श्रीरामचन्द्रास करीत होते. इतकेंच नव्हे तर ते रामजन्माच्या पूर्वीपासून हें कार्य घडवून आणावें अशा यत्नांत होते, हें स्पष्ट दिसत आहे.

या चार मानववंशांपैकीं सध्या राम, दशरथ आदि आर्य मानव होते, हें सर्वांस माहीत आहे व याबद्दल कोणासहि शंका नाहीं; पण **देव, वानर व राक्षस** या मानवी जाति नव्हेत, असा पुष्कळांचा समज झालेला दिसतो. यासाठीं या चारही जाति मानववंशाच्याच होत्या, हें रामायण समजण्यासाठीं प्रथम समजणें अगत्याचें आहे.

## देवजाति

देवजाति हीहि अति प्राचीन काळीं एक पुढारलेली मानवी जातिच होती. दशरथ राजा व त्याचप्रमाणे बरेच प्राचीन आर्यराजे हे वेळप्रसंगीं देवांना देवलोकीं युद्धांत सहाय्य करण्यास गेले होते. पुष्कळ आर्यराजे तप करून पूर्वी इन्द्र झाले होते व कित्येक त्या कार्यांत यश मिळविण्याचा यत्न करीत होते. जनक राजाला मिथिला नगरीस सीतेच्या निमित्ताने आर्यराजांनी वेढा दिला, त्या वेळीं देवसैन्याने शेवटीं येऊन जनकास सहाय्य केलें, तेव्हा मिथिला वाचली (वा. रा. बा. ६६।१५–२६). हा वृत्तान्त याच बालकाण्डांत आहे. पांच पाण्डव हे पांच देवांचे नियोगापासून झालेले पुत्र होत व त्या देवांचा कुन्तीशीं प्रत्यक्ष संबंध घडून हे गर्भ राहिले. इन्द्राने गौतम–स्त्री अहल्येशीं प्रत्यक्ष गौतमाचे वेषाने येऊन व्यभिचार केला, इत्यादि अनेक कथा प्रसिद्ध आहेत, त्यावरून देवजाति ही मानवजातीच होती, हें सहज सिद्ध होणें शक्य आहे. यासंबंधीचीं प्रमाणें हवीं तितकीं मिळतील; पण तीं सर्व येथे देण्याचें कारण नाहीं. वरील चारदोन उल्लेखांवरूनच ती गोष्ट सिद्ध होणें शक्य आहे.

देवांशीं संबंध असणारे '**किन्नर**' हेही मानवच होते; या संबंधीचा पुरावा म्हणून पूर्वीच्या किन्नर जातीचा '**किन्नोर**' किंवा '**किन्नौर**' हा सध्याचा हिमालयांतील प्रांत आपणांस दाखवतां येईल. त्याचप्रमाणे भगवान् शंकरांची भूतजाति हीच सध्या '**भूतान**' किंवा '**भूतस्थान**' या प्रांतांतील मानव-

जाति आहे. सध्या यांस '**भूतिया**' किंवा 'भूतीय' असें म्हणतात. याचप्रमाणे अप्सरा या मानवांनी उपभोग्य मानवस्त्रिया असल्यामुळेच मेनका ही विश्वामित्राकडे स्त्री होऊन राहूं शकली व तिची मुलगी शकुंतला ही दुष्यंताशीं गांधर्व विवाह करूं शकली. यावरून अप्सरा या मानवी स्त्रिया होत्या, हें समजून येणार आहे.

अर्जुनाचें देवलोकांतील इन्द्राजवळ व कैलासांतील महादेवाजवळ समक्ष अस्त्रप्राप्तीसाठी जाणें, तेथील इन्द्रलोकांतील उर्वशी नामक अप्सरेचें अर्जुनावर मन बसणें वगैरे सर्व गोष्टी या दृष्टीनें पुराव्यासाठी पुष्कळच उपयोगी पडण्यासारख्या आहेत. या सर्व येथे देण्याचें कारण नाही. ज्यांचा निर्देश जेवढा येथे केला आहे, त्यावरून देव हे मानववंशापैकीच एक फार शक्तिमान् वीर होत, ही गोष्ट सिद्ध होणें शक्य आहे. आता वानर व राक्षसांविषयी विचार करावयाचा आहे. तो विचार श्री वाल्मीकिवाक्प्रदीप **विष्णु दामोदर पंडित** यांच्या लेखांतील आवश्यक अवतरणें पुढे देत आहों, त्यावरून ठरेल, म्हणून तो लेख पुढे देतों–

# रामायणकालीन आर्य, वानर व राक्षस.

## आर्य संस्कृतीची कालमर्यादा

रामायणकालीन आर्य–संस्कृति म्हणजे—

ऋग्वेदकालापासून आरम्भ करून भगवान् श्रीकृष्णाच्या जन्मकालापर्यंतच्या 'भारतीय आर्यांच्या' संस्कृतीचें ऐतिहासिक दृष्ट्या निरीक्षण.

ऋग्वेदकालापासून आरंभ करून भगवान् श्रीकृष्णाच्या जन्मकालापर्यंतच्या एवढ्या मोठ्या कालखंडाला "रामायणकालीन" असें नांव देण्याचें कारण– "ऋग्वेदकालापासून आरंभ करून प्रभु रामचन्द्र यांचे कालापर्यंत पुढे व भगवान् श्रीकृष्णाचे जन्मकालापासून प्रभु रामचन्द्र यांच्या कालापर्यंत मागे, म्हणजे– प्रभु रामचन्द्र यांचे कालीं आपल्या 'भारतीय आर्यांच्या' संस्कृतीचें स्वरूप पूर्णपणें यथार्थतः दिसून येतें. या कारणास्तव तिला 'रामायणकालीन' असें नांव दिलें आहे.

ही संस्कृति जाणण्यासाठी वाल्मीकि रामायणाचें अध्ययन करणें आवश्यक आहे व त्यासाठीं वाल्मीकि–रामायणान्तर्गत पदपदार्थांचें यथार्थ ज्ञान आधी करून घेतलें पाहिजे. त्यास श्रीवाल्मीकि–रामायणांत मुख्य पदार्थ तीनच आहेत. ते (१) नर, (२) वानर आणि (३) राक्षस हे होत. या तीन्हींपैकी प्रत्येक पदार्थांत अन्तर्भूत असे उपपदार्थ अथवा उपपात्रें अनेक आहेत.

## नर, वानर व राक्षस

"**नर**" या पदार्थांत मुख्य "श्रीरामचंद्र" व तदितर–सीता, भरत, लक्ष्मण, दशरथ, कौसल्या, कैकेयी, मन्थरा, वसिष्ठ, सुमंत्र इत्यादि अनेक उपपात्रें आहेत. या सर्वांचा अन्तर्भाव "नर" या एकाच पदार्थांत होतो. तद्वतच—

"**वानर**" या पदार्थांत मुख्य "मारुति" व तदितर–वाली, सुग्रीव, तारा, अंगद व जांबवान् इत्यादि या सर्वांचा अन्तरर्भाव "वानर" या पदार्थांत होतो. आणि.

"**राक्षस**" या पदार्थांत मुख्य "रावण" व तदितर–मन्दोदरी, कुंभकर्ण, बिभीषण, शूर्पणखा, मारीच व सुमाली इत्यादि. या सर्वांचा अन्तर्भाव "राक्षस" या पदार्थांत होतो. तात्पर्य, श्रीवाल्मीकि–रामायणान्तर्गत सर्व पात्रांचा अन्तर्भाव– "**नर, वानर व राक्षस**" या तीनच पदार्थांत होत असल्याकारणानें, या तीन पदार्थांचा निर्णय मुख्यत्वेंकरून झाला, म्हणजे त्यांचे परस्पर घडलेले व्यवहार व इतरही अनेक संशयास्पद मुद्द्यांचें स्पष्टीकरण होण्याचें कार्य अत्यन्त सुलभ होईल. यास्तव "**नर, वानर व राक्षस**" हे कोण आहेत, याचा प्रथम विचार करूं.

आपल्या प्राचीन संस्कृतीचा धार्मिक व ऐतिहासिक दृष्टया चिकित्सापूर्वक अभ्यास करणें अत्यावश्यक आहे व ज्या अर्थी हा अभ्यास श्रीवाल्मीकि–रामायणाचे आधारेंच व्हावयाचा आहे, त्या अर्थी श्रीवाल्मीकि–रामायणान्तर्गत पदपदार्थज्ञानाची अत्यन्त आवश्यकता आहे, हें स्पष्टच आहे. या कारणास्तव प्रथम हें पदपदार्थज्ञान अत्यन्त काळजीपूर्वक संपादन करून घेतलें पाहिजे.

## आमचे शिक्षक

हें पदपदार्थज्ञान करून घ्यावयाचें म्हटलें, म्हणजे आपणांस आपल्यापेक्षा श्रेष्ठ अशा कोणातरी गुरूचा आश्रय केला पाहिजे. त्यास, हें ज्ञान ज्यांचेपासून प्राप्त करून घेतां येईल, असे गुरु आमच्या दृष्टीपुढे दोनच दिसत आहेत. (१) एक–आमचे शास्त्री, पंडित, पुराणिक, कीर्तनकार व सन्तमण्डळी. यांस आपण '**जुने शिक्षक**' असें नांव देऊं. (२) दुसरे--पाश्चात्य युरोपियन् विद्वान्–ज्यांनी सहस्रावधि कोस समुद्र--सन्तरण करून, लक्षावधि रुपये समुद्रास्तृप्यन्तु करून, आपले जीवदेखील संकटांत घालून, आमच्या देशांत येऊन आमच्या वेदशास्त्रादिकांचा अत्यंत कष्टपूर्वक, अति सूक्ष्मपणें अभ्यास करून, त्यांचीं भाषांतरें करून, आमच्यापुढे आयतीं आणून ठेवलीं ते, व तत्सांप्रदायी देशी विद्वान्, देशीपरदेशी विश्वविद्यालयांचे डॉक्टर–पदवीधर--प्राध्यापक इत्यादि देशी विद्वान्. यांस आपण '**नवे शिक्षक**' असें नांव देऊं.

या दोघां शिक्षकांच्या दृष्टि चार; दोन जुन्या शिक्षकांच्या व दोन नव्या शिक्षकांच्या; पैकी प्रथम जुन्या शिक्षकांचा दृष्टींच्या विचार करूं—

**जुने शिक्षक व त्यांच्या दोन दृष्टि**– जुन्या शिक्षकांमध्ये अत्यंत श्रेष्ठ प्रतीचे विद्वान् म्हणजे वेदान्ती. त्यांच्या दृष्टीने राम हा परब्रह्म आहे व राक्षस म्हणजे कामक्रोधादि षड्रिपु व वानर म्हणजे चञ्चल मनोवृत्ति. तर दुसऱ्या प्रतीचे जे सामान्य विद्वान् म्हणजे पुराणिक, कीर्तनकार, सन्तभक्त इत्यादि, त्यांचे मतें **राम** हा परमेश्वर, देव आहे व **राक्षस** म्हणजे ज्यांचे नांगराच्या फाळासारखे दात, रेलवेच्या बोगद्यासारख्या नाकपुड्या, खिडक्यांसारखे डोळे, सुपासारखे कान, पर्वताच्या दरीसारखे तोंड असून, जीभ सवा हात लांब तोंडाबाहेर लळलळा लोंबत आहे, दहापांच प्रेतें या खांद्यावर, दहापांच प्रेतें त्या खांद्यावर, चारदोन तोंडामध्ये चावत चावतच येत आहे, गळ्यांत नररुण्डाच्या माळा रुळत आहेत व रक्तमांसाने ज्याचें शरीर बरबटलेलें आहे; जो धर्मध्वंसक, यज्ञविध्वंसक व गोब्राह्मणभक्षक असा अकाळविकाळ, अवाढव्य विजातीय प्राणी. व **वानर** म्हणजे पशु--सामान्य माकडें होत. असें ते (जुने शिक्षक) मानतात.

**नवे शिक्षक व त्यांच्या दोन दृष्टि--** नवे शिक्षक राक्षस व वानर यांस मनुष्य तर मानतात; पण ते ( बार्बेरियन, Barbarians ) रानटी व अनार्य होते असें म्हणतात. तर दुसरे राम हा ' काल्पनिक पुरुष ' ( Fictitious person ) होता व रामायण हें काल्पनिक काव्य आहे, असें म्हणतात. येणेप्रमाणे या दोघांही शिक्षकांच्या चार दृष्टि आहेत.

या दोघांही शिक्षकांनी जनतेची अत्यन्त दिशाभूल केली आहे. ती कशी ? तें आता आपण पाहूं.

एक भौतिक दृष्टि जिला आजकालच्या भाषेंत मटीरियल व्ह्यू 'Material view ' असें म्हणतात आणि दुसरी ' आध्यात्मिक दृष्टि ' जिला 'Spiritual view ' ' स्पिरिचुअल् व्ह्यू ' असें म्हणतात, या दोनही दृष्टींचें अवलंबन केल्यावाचून आपल्याकडील ग्रंथांचें रहस्यज्ञान होणें शक्यच नाही; कारण आपली संस्कृति ही कांही पाश्चात्यांच्या संस्कृतीसारखी नुसती भौतिक स्वरूपाचीच नाही, तर आध्यात्मिकही आहे. किंबहुना आध्यात्मिकच अधिक आहे. यास्तव, आपल्या भारतीय आर्यांच्या संस्कृतिसंबंधांत विचार करतांना केवळ एका भौतिक दृष्टीनेच पाहून भागणार नाही, तर आध्यात्मिक दृष्टीचाही अवलंब केला पाहिजे. यास्तव यद्यपि शक्य तोंपर्यंत आधिभौतिक शास्त्रांच्या दृष्टीनेच विचार केला जाईल, तथापि जेथे आधिभौतिक शास्त्रांची मर्यादाच खुंटेल, तेथे तेवढ्यापुरता आध्यात्मिक दृष्टीचाही अवलंब करावा लागेल. तेव्हा आता या दोनही शिक्षकांनी जनतेची दिशाभूल कशी केली आहे, याचा विचार उपर्युक्त तत्त्वानुसार म्हणजे आधिभौतिक व आध्यात्मिक या दोनही दृष्टींचा अवलंब करून करण्याचा प्रयत्न करूं.

## ( १ ) नर कोण होते ?

### राम परब्रह्म आहे काय ?

वेदान्ती पण्डित हे राम हा परब्रह्म आहे, असें प्रतिपादन करतात. त्यास

राम हा परब्रह्म असो, त्याविरुद्ध आमचें कांहीदेखील म्हणणें नाही. उपास्य दैवत या दृष्टीनें रामाला परब्रह्म मानणें योग्यच आहे व तसें आम्हीही मानतों; पण परब्रह्म जो राम तो रामायण या काव्याचा नायक होऊंच शकत नाहीं; कारण परब्रह्माचीं जीं लक्षणें आहेत, तीं रामायणाचा नायक जो दशरथपुत्र सीतापति राम, त्याचे ठिकाणीं लागूच शकत नाहीत. परब्रह्म हें निर्गुण, निर्विकार, निराकार, निरवयव, सर्वज्ञ, सर्वव्यापी, नित्यानन्दमय, सर्वात्मा व सर्वशक्तिमत् असें आहे; पण रामायणाचा नायक राम हा तर सर्वच गुणांनी यांच्या अगदी उलट आहे. राम जर ( १ ) निर्गुण आहे, तर रामायणच होऊं शकत नाही; कारण, रामायण हें गुणवर्णनपर काव्य आहे. निर्गुणाचें गुणवर्णन कसें संभवतें ? ( २ ) राम निर्विकार म्हाणावा, तर त्याचा रावण शत्रूही नाही व बिभीषण मित्रही नाही. ( ३ ) निराकार व निरवयव म्हणावा, तर तो अरण्यांत जाऊं शकत नाही, हातांत धनुष्यही धरूं शकत नाही व युद्धादि व्यवहारही करूं शकत नाहीं. ( ४ ) सर्वज्ञ म्हणावा, तर सीतेला कोणी नेलें ? व नेऊन कोठे ठेवलें ? याचें ज्ञान त्यास असावयास किंवा समाधीनें तरी तें त्यास व्हावयास पाहिजे होतें. मारुतीला पाठवून येवढी सीताशुद्धीची खटपट करण्याची त्यास कांहीच आवश्यकता नव्हती. ( ५ ) सर्वव्यापी म्हणावा, तर तो अयोध्येंत काय, दंडकारण्यांत काय किंवा लंकेंत काय ? सर्व ठिकाणीं व्यापूनच होता. तो कोठे गेलाही नाही व आलाही नाही. अर्थात् दशरथाला पुत्रशोक होण्याचें कारणच नाही. ( ६ ) नित्यानन्दमय म्हणावा, तर त्याला सीतेच्या वियोगानें व इतरही प्रसंगीं शोकमोहादि सर्व विकार झालेले दृष्टीस पडतात. ( ७ ) सर्वात्मा म्हणावा, तर तो रावणांत, बिभीषणांत, दशरथांत, वालींत, सुग्रीवांत कैकैयींत, मन्थरेंत, सर्वत्र आत्मरूपानें भरलेलाच होता. त्याच्यांत व रावणांत मुळींच भेद नव्हता. तेव्हा सीता स्वतः त्याच्यापाशी असली काय किंवा रावणापाशी असली काय ? सारखेंच. मग येवढें सैन्य जमवून, समुद्रावर सेतु बांधण्याचा खटाटोप करून, येवढें घनघोर युद्ध करून, कोव्यवधि राक्षस व वानरांचा संहार करवून, रावणाचा वध करण्याची काय आवश्यकता होती ? ( ८ ) सर्वशक्तिमान म्हणावा, तर त्याला वानरराज सुग्रीवाच्या सहाय्याची काय अपेक्षा होती ? तात्पर्य काय की,

रामायणाचा नायक राम हा कांही परब्रह्म असूं शकत नाही आणि रामही पण स्वतः आपणांला परब्रह्म मानीत नाही. रावणवधानंतर सीतेने आत्मशुद्ध्यर्थ अग्नीमध्ये प्रवेश केला, त्या प्रसंगीं श्रीराम उद्विग्नचित्त होऊन बसले. तेव्हा ब्रह्मदेव, महादेव, इन्द्र, वरुण इत्यादि सर्व लोकपालांनी रामाचें सान्त्वन करतांना–

## राम मनुष्यच आहे

'**कथं देवगणश्रेष्ठं आत्मानं नावबुध्यसे ।**' असें म्हटलें असतां '**आत्मानं मानुषं मन्ये रामं दशरथात्मजम् ।**' (युद्धकाण्ड सर्ग ११७, श्लोक ११) असें उत्तर रामाने त्यांस दिलें. जर श्रीराम स्वतःला परब्रह्म समजत असता, तर तो असें उत्तर न देता. मग त्यास बळजबरीने परब्रह्म बनविण्याचा आग्रह कशास पाहिजे ? एवंच राम हा परब्रह्म नाही.

बरें राम हा ईश्वर आहे काय ? तर तो ईश्वरही नाही. कारण, ईश्वर हा सर्वज्ञ, सर्वेश्वर, सर्वनियन्ता, अव्यक्त, अन्तर्यामी असा असून, जगताचें कारण आहे. म्हणजे हें सर्व जगत् त्या ईश्वरापासून उत्पन्न झालें आहे. रामाचे ठायीं हे गुण मुळीच दिसून येत नाहीत, मग राम ईश्वर कसा असूं शकतो ? तर मग राम हा काय पदार्थ आहे ? त्यास राम हा ईश्वराचा अंशावतार आहे, म्हणजे आपल्याचसारखा मनुष्य आहे; कारण आपणही सर्व त्या ईश्वराचेच अंशभूत आहोंत.

**एतन्नानावताराणां निदानं बीजमव्ययम् ।**
**यस्यांशांशेन सृज्यन्ते देवतिर्यङ्नरादयः ॥**

(श्री० भागवत, १ स्कंद)

म्हणजे जो चैतन्याचा अंश श्रीरामाचे ठिकाणीं आहे, तोच चैतन्याचा अंश आपलेही ठिकाणीं आहे, लवमात्र भिन्नता नाही. असें जर आहे तर रामालाच इतकें श्रेष्ठत्व कां द्यावयाचें ? असा प्रश्न सहजगत्याच उपस्थित होतो. त्याचें उत्तर असें आहे की, यद्यपि राम हा स्थूल शरिराने अगदी आपल्याचसारखा आहे, तथापि योग्यतेने तो आपल्यापेक्षा अनन्त पटीने श्रेष्ठ आहे, या कारणास्तव त्यास श्रेष्ठत्व द्यावयाचें.

श्रेष्ठ मनुष्यापुढे कनिष्ठ मनुष्य दिपतो. याचें कारण हेंच आहे की, वरिष्ठ मनुष्याचे ठिकाणीं कनिष्ठ माणसाच्यापेक्षा तैजस अंश अधिक असतो. राजापुढे सर्वच निस्तेज होतात; कारण राजाचे ठिकाणीं तो तैजस अंश सर्वांपेक्षा अधिक प्रमाणांत असतो, तर मग मोठ्या सार्वभौमापेक्षाही अनन्त पटीने श्रेष्ठ गुण ज्याचे अंगीं वसत आहेत, अशा श्रीरामचंद्रास श्रेष्ठ मानण्यांत कोणता दोष आहे ? हें श्रेष्ठत्व अथवा सामर्थ्य यालाच विभूतिमत्व म्हणतात व हें विभूतिमत्व ज्याचे अंगी असतें, तोच ईश्वराचा अंशावतार होय. याला प्रत्यक्ष भगवानांचीच उक्ति प्रमाणभूत आहे.

**यत् यत् विभूतिमत् सत्वं श्रीमत्-ऊर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥**

( श्री० भगवत् गीता )

अर्थात् राम हा जरी आमच्याचसारखा मनुष्य आहे, तथापि उपरिनिर्दिष्ट कारणांनी तो आमच्यापेक्षा अनन्त पटीने श्रेष्ठ गुणांनी संपन्न आहे, विभूतिमान् आहे, म्हणून त्याला श्रेष्ठत्व द्यावयाचें. श्रेष्ठत्व जें असतें तें मनुष्याच्या विभूतिमत्वांत असतें व विभूतिमत्व हें मनुष्यसाध्य आहे. मनुष्यमात्राला राम होतां येणें शक्य आहे. प्रयत्न मात्र केला पाहिजे. ‘ **जो नर करणी करे तो नरका नारायण होय ।** ’ अशी सन्तांची उक्ति आहे, ती अगदी यथार्थ आहे.

## राम काल्पनिक आहे काय ?

आता शेवटची व चवथी दृष्टि म्हणजे “ राम हा काल्पनिक पुरुष ” होता, असें मानणारांची. तिच्या संबंधांत विचार करूं-- त्यास, आमच्या मतें तर राम हा खरा ऐतिहासिक पुरुष आहे व रामायण हें खरें ऐतिहासिक काव्य आहे. तथापि या लोकांच्या समजुतीस्तव “ तुष्यतु० ” या न्यायाने त्यांचेंही मत खरें आहे, असें गृहीत धरून पाहिलें, तरीदेखील आमची भारतीय आर्यांची संस्कृति सिद्ध होण्यांत कोणत्याही प्रकारें बाध येत नाही; कारण आमचा प्रतिपाद्य विषय “ भारतीय आर्यांची संस्कृति ” हा आहे. “ राम किंवा रामायण ” हा नाही. अभ्यास या दृष्टीने अभ्यासकाला राम व रावण हे दोघेही सारखेच; कारण

सज्जन मनुष्याचें सच्चरित्र अभ्यास या दृष्टीनें जितकें महत्त्वाचें आहे, तितकेंच-किंबहुना अधिकच--दुर्जन मनुष्याचें दुश्चरित्रही महत्त्वाचें आहे. फरक येवढाच की, एक ग्राह्यांशानें महत्त्वाचें आहे, तर दुसरें त्याज्यांशानें महत्त्वाचें आहे. तेव्हा रामायण हें काव्य काल्पनिक असलें, तथापि संस्कृतीचे सिद्धीस त्यापासून कांहींच बाध येत नाहीं; कारण रामायणामध्यें धर्म, राजनीति, शिल्पशास्त्र, वास्तुशास्त्र, युद्धशास्त्र, ललितकला इत्यादि अनेक शास्त्रें व कला या संबंधांत जीं वर्णनें आलीं आहेत, तीं इतक्या उच्च प्रतीचीं आहेत कीं, अशीं उच्च प्रतीचीं वर्णनें नुसत्या कल्पनेनें रंगविणारीं डोकीं ज्या समाजांत जन्माला येतात, तो समाज व ज्या समाजासंबंधांत इतक्या उच्च प्रतीचीं वर्णनें वर्णिलीं जातात तो किंवा ते समाज रानटी किंवा अर्धरानटी असणें शक्यच नाहीं. कल्पित काव्यांतील व्यक्ति जरी काल्पनिक असल्या, तथापि त्यांचे परस्परांमधील घडणारे व्यवहार व ज्या पदार्थांशीं त्यांचा सम्बन्ध येतो ते पदार्थ, हे तर सृष्टीमध्यें यथापूर्व विद्यमानच असावे लागतात; कारण सृष्टीमध्यें ज्या गोष्टी मुळींच अस्तित्वांत नसतील, तर त्यांचें वर्णन कवि केव्हाहि करूं शकणार नाहीं. कवि फार तर अतिशयोक्ति करील; पण आधीं मुळांत कांहींतरी अस्तित्वांत असलें पाहिजे. त्यास रामायणांतला काव्यभाग एकीकडे सारून मुख्य मजकुराचें चिकित्सक दृष्टीनें निरीक्षण करून पाहिलें, तर 'रामायणकालीन भारतीय आर्यांची सुधारणा' वर्तमानकालीन सुधारणेच्या शिखरावर आरूढ असलेल्या पाश्चात्य राष्ट्रियांच्या सुधारणेपेक्षा कमी प्रतीची होती, असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. किंबहुना ती वर्तमानकालीन सुधारणेच्या शिखरावर आरूढ असलेल्या पाश्चात्य राष्ट्रीय लोकांपेक्षा काकणभर अधिकच होती, असें सप्रमाण दिसून येतें. तात्पर्य, "राम हा काल्पनिक पुरुष आहे व रामायण हें काल्पनिक काव्य आहे," असें म्हणणाऱ्यांच्या दृष्टीनें पाहिलें, तरीदेखील आमच्या भारतीय आर्यांच्या संस्कृतीच्या सिद्धीस कांहींच बाध येत नाहीं; पण आमच्या मतें तर श्रीराम हा खरा ऐतिहासिक पुरुष आहे व त्याच्या चरित्रवर्णनपर श्रीवाल्मीकि-रामायण हें खरें ऐतिहासिक काव्य आहे, हें आम्ही वर सांगितलेंच आहे व तें उत्तरोत्तर विवेचनांतही निदर्शनांत येईल.

# वेदान्ताचें रूपक

पण येथे एक प्रश्न असा उपस्थित होतो की, 'राम हा काल्पनिक पुरुष आहे,' ही दृष्टि तरी आली कोठून? याचें उत्तर असें आहे की, ही दृष्टि पाश्चात्य विद्वान् लोकांत उत्पन्न होण्यास आमच्यांतीलच अति विद्वान् वेदान्ती लोकांची विद्वत्ता कारणीभूत झाली आहे. या वेदान्ती लोकांच्या विद्वत्तेंतून ही दृष्टि पाश्चात्य विद्वानांत आली व त्या पाश्चात्य विद्वानांतून परंपरेने तत्सांप्रदायी देशी विद्वानांत उतरली व तेथे दृढमूल झाली. यांत दोष पाश्चात्यांचा नसून, आमच्याच विद्वानांच्या अप्रासंगिक वेदान्तीपणाचा आहे, तो असा—

जेव्हा युरोपीय विद्वान् लोक आमच्या वेदशास्त्रादिकांचा अभ्यास करण्यासाठी आमच्या पण्डित लोकांकडे प्रथम आले, तेव्हा त्यांना पढवितांना, वेदान्तासारख्या शास्त्रांतील अत्यन्त गूढ तत्त्वें ग्रहण व धारण करण्याइतका अधिकार त्यांचे ठिकाणीं आहे कीं नाही, या गोष्टीचा विचार न करतां, आमच्याकडील पंडितांनी त्यांना– 'राम म्हणजे परब्रह्म, सीता म्हणजे चित्कला, मारुति म्हणजे सदसद्विवेकबुद्धि, रावण म्हणजे अहंकार, लंका म्हणजे लिंगदेह, राक्षस म्हणजे कामक्रोधादि षड्रिपु, वानर म्हणजे चञ्चल मनोवृत्ति इत्यादि; मग अहंकाररूपी रावणाने चित्कलारूपी सीता चोरून नेली, तिचा विवेकरूपी मारुतीने शोध लावला, मग त्या परब्रह्मरूपी रामाने लिंगदेहरूपी लंकेचें दहन करून, त्या अहंकाररूपी रावणाचा वध केला व आपल्या चित्कलारूपी सीतेला सोडवून आणलें आणि ते स्वराज्य सिंहासनावर अधिष्ठित होते झाले. हें रामरावणयुद्ध सर्व काल चाललेंच असतें–×' असें पढविलें; पण ज्या या लोकांना आपल्याकडील साधारण धर्मतत्त्वांचेंदेखील आकलन करण्याची योग्यता नाही, त्या लोकांपुढे अशा प्रकारचीं वेदान्तपर रूपकें करून, आपल्या पाण्डित्याचें प्रदर्शन करण्यांत या विद्वान् वेदान्त्यांनी तो साडेतीन हाताचा देहधारी दशरथपुत्र, अयोध्याधीश, सीतापति ऐतिहासिक पुरुष होता कीं नव्हता असें करून टाकलें व त्यांना ( पाश्चात्य

× हें असें वर्णन '**अध्यात्मरामायण**' वगैरे ग्रंथांतही आलेलें आहे; पण वाल्मीकि–रामायणांत '**मानुष राम**'च वर्णिला आहे.

विद्वानांना )– ' राम हा काल्पनिक पुरुष होता व रामायण हें काल्पनिक काव्य आहे, ' अशीं विधानें करण्यास अवसर प्राप्त करून दिला. तात्पर्य, ही कुदृष्टि अपात्रीं विद्यादानाचा परिणाम आहे.

वास्तविक पाहिलें तर, वेदान्तशास्त्र हें सर्वशास्त्रललामभूत अति श्रेष्ठ असें शास्त्र आहे. ती ब्रह्मविद्या आहे. ज्याप्रमाणे ब्रह्मामध्ये अखिल ब्रह्मांडाचा अंतर्भाव होतो, त्याचप्रमाणे या ब्रह्मविद्येमध्ये सर्व विद्यांचा अंतर्भाव होतो. या विद्येच्या श्रेष्ठत्वासंबंधांत स्वतः योगेश्वर भगवान् श्रीकृष्णच **' अध्यात्मविद्या विद्यानाम् '** असें सांगत आहेत. अर्थात् ती विद्या भगवन्ताचें स्वरूप आहे; परन्तु अनधिकाऱ्यांच्या हातीं पडल्याकारणाने तिचा असा दुरुपयोग झाला व सामान्य जनतेच्या बुद्धिभेदाला हें एक साधन झालें. त्याचेंच फल ' राम हा काल्पनिक पुरुष होता, ' ' रामायण हें काल्पनिक काव्य आहे, ' अशीं विधानें करण्यास अवसर त्या लोकांस मिळाला, हें होय. हें अपात्रीं विद्यादानाचें फळ आहे.

तसेंच " राम हा इजिप्शियन् होता, युधिष्ठर हा इराणी होता, लव-कुश ही रावणाची संतति आहे, कौसल्या व दशरथ हीं सख्खीं बहिणभावंडें होतीं, " इत्यादि, असे जे अत्यन्त खोटे, अत्यन्त ओंगळ व बाष्कळपणाचे लेख आजकाल प्रसिद्ध होत आहेत, तेही निराधारच आहेत.

येथपर्यंतच्या विवेचनावरून रामायणाचा नायक राम हा परब्रह्मही नाही व काल्पनिक पुरुषही नाही, तर अवतारी व खरा ऐतिहासिक पुरुष आहे. **तो विभूतिमान् असा मनुष्य आहे**, यांत लवमात्रही सन्देह नाही. येणेप्रमाणे **नरोत्तम जो राम या पदार्थाचा** निर्णय झाला.

याचप्रमाणे सीता, भरत, लक्ष्मण, दशरथ, कौसल्या, कैकेयी, मन्थरा, वसिष्ठ, सुमंत्र यांविषयी जाणावें. हे पुरुष व या स्त्रिया काल्पनिक नव्हेत, रूपकें नव्हेत, तर हीं सर्व पात्रें इतिहासिक आहेत. हीं इतिहासिक आहेत, असें समजूनच जर वाल्मीकि रामायण वाचलें, तरच त्या काळचा इतिहास कसा घडला, तें कळेल. असो. याप्रमाणे राम आदिकरून सर्व पात्रें इतिहासिक आहेत, हें येथे सांगितलें.

## ( २ ) राक्षसांची सुधारणा.

रामायणांतील राक्षस व वानर या पदार्थांचा विचार करतांना आपले जुने शिक्षक ' राक्षस हे कोणीतरी अक्राळविक्राळ, अवाढव्य, अत्यंत हिडीस, ओंगळ, धर्मध्वंसक, यज्ञविध्वंसक, गोब्राह्मणभक्षक असे विजातीय प्राणी आहेत व वानर हीं लांब शेपटांचीं व काळया तोंडाचीं माकडें आहत,' असें सांगत आले आहेत. या त्यांच्या मताविरुद्ध राक्षस हे, ते सांगत आले आहेत तसे, अक्राळविक्राळ, अवाढव्य, अत्यन्त हिडीस, ओंगळ, असे विजातीय प्राणी नाहीत व वानरहीं लांब शेपटाचीं व काळया तोंडाचीं माकडें--पशु नाहीत. तर राक्षस व वानर हे आपल्याचसारखे श्रौताचारसम्पन्न मनुष्य आहेत, हें सिद्ध करावयाचें आहे. आणि आपले नवे शिक्षक, जे राक्षस व वानर यांस मनुष्य तर मानतात, पण 'ते ( बार्बेरियन म्हणजे) रानटी व अनार्य होते, ' असें म्हणतात; त्यांच्याविरुद्ध राक्षस व वानर हे ' बार्बेरिअन व अनार्य तर नव्हतेच ' पण ते जातिवंत मनुष्य असून, सुधारणेमध्ये वर्तमानकालीन सुधारणेच्या अत्युच्च शिखरावर अधिष्ठित असलेल्या पाश्चात्य राष्ट्रांतील जनतेपेक्षाही पुष्कळ पुढे गेलेले होते, हें सिद्ध झालें, म्हणजे या दोघांही शिक्षकांनी जनतेची दिशाभूल कशी केली आहे, हें निश्चितपणें ध्यानीं येईल.

( १ ) रामायणावरून पाहतां, रामाने वर्तमानकालीन विद्वानांचे मतानुसार अनार्य असलेले सुग्रीव किंवा रावण यांपैकी कोणाचेंही राज्य हिरावून घेऊन खालसा केल्याचा उल्लेख आढळून येत नाही. उलट त्यांचीं राज्यें त्यांचेकडे किंवा त्यांच्या वारसाकडेच कायम ठेविल्याचे मात्र उल्लेख आहेत.

( २ ) एखादें राज्य जिंकलें व तेथील राजा युद्धांत धरला गेला, तर त्या राजास फासावर लटकवून किंवा पदच्युत करून, तें राज्य खालसा करून, तेथील प्रजाजनांचे स्वराज्याचे व स्वसंरक्षणाचेही हक्क हिरावून घेऊन, त्यांची संस्कृति नष्ट करून टाकणेचा उपक्रम करणें, हा आपल्या आर्यसंस्कृतीचा स्वभाव नाही. राष्ट्र जिंकलें की, तेथील राजापासून आपलें वर्चस्व कबूल करवून घेतलें व करभार ठरवून घेतला की संपलें.

( ३ ) जित राष्ट्रांतील प्रजाजनांचे स्वराज्याचे व स्वसंरक्षणाचे हक्क हिरावून घेतले जात नसत. त्यांस आपल्या स्वराज्यसुखाचा उपभोग घेण्यास व स्वसंरक्षणाचीं साधनें वापरण्यास पूर्ण स्वातंत्र्य असे.

( ४ ) युद्धांत शत्रुराजा हातीं लागला, तर त्याजकडून आपलें वर्चस्व कबूल करवून घेऊन त्याचें राज्य त्याच्या स्वाधीन केलें जात असे. युद्धांत मेलाच, तर त्याच्या मुलास किंवा मुलीसदेखील राज्यावर बसविलें जात असे व जित राष्ट्र कायम ठेवलें जात असे; आजकालच्यासारखें नष्ट केलें जात नसे. गुहासारखा निषाद ( अनार्य ) राजा तर रामाचा अत्यंत जिवलग मित्रच होता. यावरून, वरील विद्वानांचीं विधानें किती असमंजसपणाचीं आहेत, हें ध्यानीं येईल. यावरून रामायणकालीन राजनीति कशी होती, तें समजण्यासारखें आहे.

पाश्चात्य विद्वानांच्या दृष्टीने "राक्षस व वानर" हे "बार्बेरियन् म्हणजे रानटी व अनार्य" होते. त्यांत "राक्षस बार्बेरियन् होते काय ?" हा मुद्दा प्रथम विचारास घेऊं आणि मग "वानर बार्बेरियन् होते काय ?"याचा विचार करूं.

## राक्षस रानटी होते काय ?

प्रभु रामचंद्राच्या सेना जेव्हा समुद्रसन्तरण करून लंकेंत जाऊन धडकल्या व सुवेलाचलावर त्यांची छावणी पडली, त्या वेळीं रावणाच्या हेरांनी जाऊन त्याला बातमी दिली. ती ऐकून रावण किंचित् उद्विग्न झाला व अति लगबगीने त्याने आपलें मंत्रिमण्डळ बोलाविलें व आता काय उपाय करावा, असा प्रश्न मंत्रिमण्डळापुढें ठेविला. "जोंपर्यंत राम जिवन्त आहे, तोंपर्यंत सीता वश होणें शक्य नाही; राम मेला अशी तिची खतरी करून दिल्यास मग अन्य आधारच न राहिल्याकारणाने निराश होऊन ती सहजच वश होईल. यास्तव कांहींतरी कृत्रिम उपाय करून, ' राम मेला ' अशी तिची खातरी करून द्यावी, " असा विचार मंत्रिमण्डळांत ठरला. तेव्हा सभा विसर्जन करून रावण आपल्या अन्तःपुरांत गेला व अनेक माया जाणणाऱ्या विद्युज्जिह्व नांवाच्या आपल्या शिल्पकलाकोविदास बोलावून आणविलें आणि त्या अनेक मायाज्ञ विद्युज्जिह्वाला रावण म्हणाला की, " **मोहयिष्यावहे सीतां मायया जनकात्मजाम् ।** " कांहींतरी

कृत्रिम उपाय करून, सीतेला भुरळ पाडूं. तो उपाय काय करावयाचा म्हणशील, तर ऐक–

## राक्षसांचें कौशल्य.

**शिरो मायामयं गृह्य राघवस्य निशाचर ।**
**मां त्वं समुपतिष्ठस्व महच्च सशरं धनु ॥ ८ ॥**
**एवं उक्तस्तथेत्याह विद्युज्जिह्वो निशाचरः ।**
**दर्शयामास तां मायां सुप्रयुक्तां स रावणे ॥ ९ ॥**
**तस्य तुष्टोऽभवद् राजा प्रददौ च विभूषणम् ॥ १० ॥**
( युद्धकाण्ड सर्ग ३१, श्लोक ८ )

येणेप्रमाणे रावणाची आज्ञा झाल्याबरोबर "आज्ञा प्रमाण" म्हणून विद्युज्जिव्ह गेला व अगदी ताजें कापून आणलेलें असें श्रीरामाच्या शिरासारखें शिर व धनुष्यबाणासारखे धनुष्यबाण बनवून आणून रावणास दाखविले. अगदी मनाप्रमाणे काम झालें, असें पाहून रावण संतुष्ट झाला व त्यानें विद्युज्जिव्हास एक अलंकार बक्षीस दिला. आणि "मी आता सीतेस वश करण्यासाठी अशोकवनिकेंत जातों, तूं हें शिर व धनुष्यबाण घेऊन तेथे ये व बाहेर गुप्तपणें उभा रहा व मी जेव्हा हाक मारीन, त्या वेळीं आंत येऊन हें शिर सीतेपुढे ठेव," असें विद्युज्जिव्हास सांगून, रावण अशोकवनिकेंत सीता होती तेथे गेला. त्यानें तिची पुष्कळ मनधरणी करून पाहिली; पण कांही केल्या ती वश होईना, तेव्हा तो अतिशय क्रुद्ध होऊन तिला म्हणाला—

**अल्पपुण्ये निवृत्तार्थे मूढे पण्डितमानिनि ।**
**शृणु भर्तृवधं सीते घोरं वृत्रवधं यथा ॥** ( यु. ३१।१७ )

" मूर्ख पोरी, ज्याच्या जिवावर तूं इतक्या गमजा करते आहेस, तो तुझा राम आहे कोठें ? त्यास तर ठार मारलें. त्या तुझ्या भर्त्याचा वध कसा केला, तें श्रवण कर. " असें म्हणून, " कोठे आहे रे तो विद्युज्जिव्ह, ज्याने रामाचें शिर युद्धक्षेत्रावरून स्वतः आणलें आहे ? त्याला बोलवा आणि हिला आपल्या नवऱ्याची शेवटची दशा पाहून घेऊं द्या. " असें रावणाने म्हटल्याबरोबर विद्युज्जिव्ह आंत

आला. त्याने ते धनुष्यबाण रावणाच्या हातीं दिले व श्रीरामाचें कृत्रिम शिर ज्यांत ठेवून आणलें होतें, तें ताट सीतेपुढे ठेवलें व त्यावरचा रुमाल एकीकडे केला. तों सीता काय पाहत आहे ? तर श्रीरामाचें-आपल्या पतीचें-नुकतेंच कापून आणलेलें शिर !! लागलीच रावणानेही ते धनुष्यबाण- ' हे घे ओळख ' म्हणून तिच्यापुढे टाकले; पण रावणाच्या कल्पनेप्रमाणे सीता कांही एकदम फसली नाही. तिला शंका आली आणि विशेष बारकाईने ती निरखून पाहूं लागली. महर्षि वाल्मीकि म्हणतात—

**सा सीता तच्छिरो दृष्ट्वा तच्च कार्मुकमद्भुतम् ।**
**सुग्रीवप्रतिसंसर्गं कथितं च हनूमता ॥१॥**
**नयने मुखवर्णं च भर्तुस्तत्सदृशं मुखम् ।**
**केशान् केशान्तदेशं च तं च चूडामणिं शुभम् ॥२॥**
**एतैः सर्वैरभिज्ञानैः अभिज्ञाय सुदुःखिता ॥३॥**

× × ×

**जगाम जगतीं बाला छिन्ना तु कदली यथा ॥६॥**
**सा मुहूर्तात् समाश्वस्य परिलभ्याऽथ चेतनाम् ।**
**तच्छिरः समुपास्थाय विललापायतेक्षणा ॥७॥** (यु.कां.स. ३२)

सीतेने तें आपल्यापुढे आणून ठेवलेलें आपल्या पतीचें शिर पाहिलें. तसेंच तें अद्भुत धनुष्यही पाहिलें; पण 'राम व सुग्रीव यांचें सख्य झालेलें आहे व रावणाशीं युद्ध करण्यासाठी श्रीरामास सहाय्य करण्यास्तव कोट्यवधि वानरसैन्य सुग्रीवाने एकत्र जमविलें आहे व तुला रावणाच्या तावडींतून सोडविण्यासाठी तो त्या सैन्यासहवर्तमान लवकरच येत आहे, ' इत्यादि वर्तमान जें हनूमानाच्या मुखाने श्रवण केलें होतें, त्यावरून तिला विचार उत्पन्न झाला की, आधी श्रीराम स्वतः अलौकिक पराक्रमी व अत्यंत सावधान. त्यांत लक्ष्मणासारखा एकनिष्ठ, शूर, वीर व बुद्धिमान् असा बन्धु त्याच्या रक्षणार्थ अत्यन्त सावधानपणें अहोरात्र बद्धपरिकर असतां व सुग्रीवासारखा अत्यन्त अनुरक्त, अत्यन्त पराक्रमी व बुद्धिमान् असा मित्र आपल्या कोट्यवधि वानरसेनेने युक्त व '**बुद्धिमतां वरिष्ठ**' हनूमान्, वृद्ध जांबवान्, सेनापति नील व वालिपुत्र युवराज अंगद इत्यादि अलौकिक बुद्धिमान्

व पराक्रामी अशा मंत्रिमंडळासह श्रीरामाचे रक्षणासाठीं डोळ्यांत तेल घालून जपत असतां एवढ्या बंदोबस्तांतून श्रीराम राक्षसांचे तावडींत सापडावा व त्याचा अशा प्रकारें वध करण्यास राक्षसांस अवसर मिळावा, हें कांहीं संभवत नाहीं; तस्मात् हें कांहीतरी कृत्रिम असावें, असा तिला संशय आला व तिने त्या शिराचें विशेष बारकाईने निरीक्षण करण्यास आरंभ केला.

तिने प्रथम ( १ ) **नयने** –डोळे नीट निरखून पाहिले; कारण मृत मनुष्याचे डोळे जरी थिजलेले असतात, तथापि ते स्वाभाविक असतात. त्यांत व केवढ्याही कौशल्याने बनविलेले कृत्रिम डोळे, यांत फरक असावयाचाच; पण तिला तसा कोठेही फरक दिसून आला नाही. हे रामाचेच डोळे आहेत, अशी तिची पूर्ण खात्री झाली.

( २ ) ' **मुखवर्णं च** '– मुखाचा वर्ण, अगदी तोच. कांहीदेखील फरक नाहीं. प्रेताच्या मुखावरचा का होईना, पण तो वर्ण स्वाभाविक असतो, तसा कांही केवढेंही कौशल्य खर्ची घातलें तथापि कृत्रिम चेहऱ्यावर वठविणें शक्य नाहीं; पण येथेही तिची पूर्णपणें खातरी झाली.

( ३ ) ' **भर्तुस्तत्सदृशं मुखम्** ' – आपल्या भर्त्याच्या– श्रीरामाच्या चेहऱ्यावरील सर्व खाणाखुणा अगदी तीळ न् तीळ मिळवून पाहतां, तेंच हें मुख, मुळीच कृत्रिमता नाही, अशी तिची बालंबाल खात्री झाली.

( ४ ) ' **केशान्** '– केस मृताचे का असेनात, डोक्यांतून स्वाभाविकपणें उगवलेले केस व कृत्रिमपणें कृत्रिम डोक्याला चिकटविलेले केस यांत केव्हाही फरक असावयाचाच; यास्तव सीतेने ते केसही निरखून पाहिले; पण त्यांतही तिला लवमात्र कृत्रिमता आढळून आली नाहीं. श्रीरामाचेच हे केस आहेत, अशी तिची पूर्ण खात्री पटली.

(५) ' **केशान्तदेशं च** ' –कपाळपट्टी पाहिली, अगदी तीच, रामाचीच ! कांही शंकाच उरली नाही.

( ६ ) ' **तं च चूडामणिं शुभम्** ' – जनकाने आंदण दिलेला चूडामणि श्रीराम मोठ्या आदराने आपल्या शेंडींत ठेवीत असे. तो निरखून पाहिला आणि ' हाच, हाच तो बाबांनी दिलेला चूडामणि, ' अशी तिची पूर्ण खात्री पटली.

*

तात्पर्य, इतक्या सर्व खाणाखुणांवरून नीट निरखून पाहून, हेंच रामाचें– आपल्या पतीचें–शिर अशी पूर्णपणें खात्री पटून सीता मूर्च्छित पडली. या एकंदर वृत्तांतावरून राक्षसांच्या संस्कृतीची सिद्धि कशा प्रकारें होते, तें पाहूं; पण ती पाहण्यास आपणांस तेरा वर्षें मागें गेलें पाहिजे. तें असें—

प्रभु रामचन्द्र पञ्चवटींत पर्णकुटि करून राहिले असतां, शूर्पणखेनें कुटिलपणानें भर दिल्यावरून, रावण भिक्षुवेश धारण करून, सीतेचें हरण करण्याच्या हेतूनें तेथें आला. मायामृगाचे मिषानें त्यानें श्रीरामाला एकीकडे काढून लावलें. 'भवितव्यतेनुसार बुद्धि होते.' या न्यायानें, सीतेनें लक्ष्मणालाही अनेक अश्राव्य भाषणें बोलून आश्रमांतून बाहेर घालवून लावलें. सीता आश्रमांत एकटीच राहिली. ही संधि साधून भिक्षुवेष–धारी रावणानें आश्रमांत प्रवेश केला. तो ब्राह्मण व अतिथि आलेला आहे, असें पाहून, त्यास आसन बसावयास देऊन सीतेनें त्याचें स्वागत केलें व "श्रीराम मृगयेस्तव वनांत गेले आहेत, ते पुष्कळशी शिकार घेऊन लवकरच परत येतील, तोंपर्यंत आपण थांबा, या आसनावर बसा, विश्रांति घ्या," असें ती त्यास म्हणाली. त्या समयीं रावण तिला म्हणतो– "तूं कोणाची कोण आहेस ? देव, गन्धर्व, किन्नर, विद्याधर यांमध्येंदेखील तुझ्यासारखी रूपवती स्त्री या पृथ्वीवर मी यापूर्वीं कधीं पाहिली नाहीं. तूं या घोर अरण्यांत– जेथें महाभयानक क्रूर राक्षस व हिंस्र प्राणी वास्तव्य करीत आहेत, अशा स्थळीं एकटी काय म्हणून रहात आहेस ? तें सर्व मला कथन कर." येणेप्रमाणें रावणानें प्रश्न केला असतां, ब्राह्मण आहे व त्यांतही अतिथि आहे, याशीं भाषण न केल्यास शाप देईल, या भीतीनें सीतेनें आपला पूर्ववृत्तान्त त्याला सांगण्यास आरंभ केला, तो असा— ( अरण्य. ४७ । ३–७ )

**दुहिता जनकस्याहं वैदेहस्य महात्मनः ।**
**सीता नाम्नास्मि भद्रं ते रामस्य महिषी प्रिया ॥ ३ ॥**
**उषित्वा द्वादशसमाः इक्ष्वाकूनां निवेशने ।**
**भुंजाना मानुषान् भोगान् सर्वकामसमृद्धिनी ॥ ४ ॥**
**तत्र त्रयोदशे वर्षे राजामंत्रयत प्रभुः ।**
**अभिषेचयितुं रामं समेतो राजमंत्रिभिः ॥ ५ ॥**

**तस्मिन् संभ्रियमाणे तु राघवस्याभिषेचने ।**
**कैकेयी नाम भर्तारं ममार्या याचते वरम् ॥ ६ ॥**
**परिगृह्य तु कैकेयी श्वशुरं सुकृतेन मे ।**
**मम प्रव्राजनं भर्तुः भरतस्याभिषेचनम् ॥ ७ ॥**

ती सांगूं लागली, " मी महात्म्या जनक राजाची कन्या आहें. माझें नांव सीता आहे आणि मी श्रीरामाची भार्या आहें. विवाहानन्तर इक्ष्वाकूंच्या घरांत सर्व प्रकारचे भोग भोगीत माझीं बारा वर्षे आनन्दांत गेलीं. त्यानन्तर तेरावे वर्षी माझे श्वशुर दशरथ राजे यांनी मंत्रिमंडळाच्या अनुमतीने, श्रीरामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याचा विचार केला. त्याप्रमाणे अभिषेकाची सर्व तयारी झाली व उद्या रामाला यौवराज्याचा अभिषेक होणार, इतक्यांत कैकेयी नांवाच्या माझ्या सावत्र सासूने मध्येच विघ्न उपस्थित केलें. तिला पूर्वी दशरथ राजाने दोन वर देऊं केले होते; त्यांची याच वेळीं तिने मागणी केली व राजाला त्याच्या सुकृतीची शपथ घालून, अडवून धरिलें आणि एका वराने भरताला यौवराज्याचा अभिषेक व दुसऱ्या वराने रामाला चवदा वर्षे वनवास मागून घेतला. त्या अन्वयें आम्ही वनवासास निघालों. " या सीतेच्या उक्तीवरून, विवाहोत्तर अयोध्येमध्ये सीता बारा वर्षे श्रीरामाच्या ( आपल्या भ्रताराच्या ) सहवासांत होती. पुढे वनवासाचीं बारा वर्षे पूर्ण झाल्यावर तेराव्या वर्षाच्या शेवटीं फाल्गुनांतल्या किंवा माघांतल्या अष्टमीला रावणाने तिला पळविली. म्हणजे अयोध्येंतील बारा वर्षे व वनवासांतील तेरा, मिळून पंचवीस वर्षे सीता रामाच्या सहवासांत होती. यावरून काय सिद्ध होतें ? की पंचवीस वर्षे नवऱ्याचे सहवासांत सावलीप्रमाणे राहिलेली सीतेसारखी विचक्षण बायको, तिला हें आपल्या नवऱ्याचें शिर म्हणून जें आपल्यापुढे आणून ठेवलें आहे, तें कृत्रिम आहे कीं खरोखरीचें आहे, हें इतक्या चिकित्सापूर्वक निरखून पाहूनदेखील ओळखतां येईना, इतकी भूल पाडून देण्याइतकी शिल्पकला ज्या राक्षसांची शिखराला पोहोचली होती, ते राक्षस ( बार्बेरियन् म्हणजे ) रानटी असणें शक्य आहे काय ? ह्याचा विचार व्हावा.

सुधारणेच्या शिखरावर विराजमान असलेल्या पाश्चात्य राष्ट्रांतील कोणत्याही राष्ट्राने अद्यापपर्यंत शिल्पकलेंत इतकी अघाडी मारली नाही. प्रति वर्षी मोठमोठीं

प्रदर्शनें भरविलीं जातात व त्यांमधून अद्ययावत् सुधारलेलीं शिल्पकलेचीं कामें प्रदर्शनार्थ मांडून ठेविलेलीं पाहण्यांत येतात. दुरून काय तो भ्रम पडतो; पण जवळून पाहिलें की, कृत्रिमता उघडकीस येते. इतक्या चिकित्सापूर्वक पाहण्याची पाळीच येत नाही. जर पाश्चात्यांची शिल्पकला इतक्या योग्यतेस चढली असती, तर आजपर्यन्त अनेक दैनिकांतून, साप्ताहिकांतून, अर्धमासिकांतून व मासिकांतून सर्व जगभर डंके वाजले असते; पण ज्या अर्थी इतकी प्रगति झाल्याचें कोठें वाचण्यांत किंवा ऐकण्यांत आलें नाही, त्या अर्थी वर्तमानकालीन सुधारणेच्या शिखरावर झळकत असलेलीं पाश्चात्य राष्ट्रें-त्यांच्या मतानें (बार्बेरिअन् म्हणजे) रानटी असलेल्या राक्षसांपेक्षा, शिल्पकलेंत तरी बरींच मागासलेलीं आहेत, असें निःसन्देहपणें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाही.

आता एवढें खरें की, पाश्चात्य लोक विद्वान् आहेत, संशोधक आहेत, चिकाटीचे आहेत, त्यांचेपाशी द्रव्यबल आहे व स्वातंत्र्यहि आहे. तेव्हा कालान्तरानें तेहि एवढी प्रगति करतील; पण आज कांही त्यांची इतकी प्रगति झालेली दिसून येत नाही. ते अजून मागासलेलेच आहेत.

आता, येथे आणखी एक विचार असा येतो की, या विद्युज्जिव्ह राक्षसानें, हें इतकें साम्य कसें आणलें? श्रीरामाला ( सिटिंग् देऊन ) समोर बसवून, तर कांही हें काम करणें शक्यच नव्हतें. बरें, दुरून दृश्य ( व्हयू ) घेतला असेल म्हणावें, तर लक्षावधि वानरसैन्यामध्ये राम असतांना व त्याच्या रक्षणार्थ लक्ष्मण, सुग्रीव, हनुमान्, जाम्बवान्, अंगद व सेनापति नील असे महापराक्रमी व अलौकिक बुद्धिमान् वानरवीर अहोरात्र अनिमिष नेत्रांनी जागरूक असतांना त्यांची नजर चुकवून, ( व्हयू ) दृश्य घेणें शक्यच नव्हतें, अर्थात् या एवढ्या वानर सैन्याच्या दृष्टीच्या टप्प्याबाहेर राहूनच त्याला हें कार्य साधावें लागलें, हें उघड आहे. म्हणजे कितीतरी मैलांच्या अन्तरावरून, त्यानें हा व्हयू घेतला असला पाहिजे. अर्थात् अनेक मैलांच्या अन्तरावरून व्हयू ( दृश्य ) घेण्याचें कांहीतरी साधन तत्कालीन राक्षसांस माहीत असलें पाहिजे. अनेक मैलांच्या अन्तरावरून शत्रूच्या फौजेचे फोटो घेण्याची कला अद्यापपर्यन्त सुधारणाशिखरस्थ पाश्चात्यांत इतक्या पूर्णतेस पोहोचल्याचें ऐकिवांत नाही. अर्थात् " वॉर-फोटो-

आर्फी"त तत्कालीन राक्षस वर्तमानकालीन सुधारणाशिखरस्थित पाश्चात्यांपेक्षा बरेच पुढे गेलेले होते, हें स्पष्ट आहे.

जर राक्षसांस आजकालसारखी फोटोग्राफीची माहिती नव्हती, असें मानलें, तर इतर कांही अधिक सुधारलेलीं साधनें त्यांजपाशी असलीं पाहिजेत. तीं साधनें भौतिक असलीं तरीही किंवा आध्यात्मिक असलीं तरीही, राक्षसांचें श्रेष्ठत्वच सिद्ध होत आहे. भौतिक असलीं, तर तितकीं सुधालेलीं साधनें पाश्चात्यांत अद्यापि नाहीत म्हणून, व आध्यात्मिक असलीं, तर आध्यात्मिक शास्त्रांचा ओनामाही पाश्चात्य राष्ट्रांत अद्यापि नाही म्हणून; एवंच दोहोंपैकी कोणतीही एक गोष्ट मानली, तरीदेखील राक्षस हे वर्तमानकालीन पाश्चात्य लोकांपेक्षा फार श्रेष्ठ होते, हेंच कबूल करावयास पाहिजे. म्हणजे राक्षस रानटी नव्हते, हेंच सिद्ध होतें.

## राक्षसांची युद्धशास्त्रांतील प्रगति.

आता आणखी एक उदाहरण घेऊं. तें तत्कालीन राक्षसांच्या आकाशयुद्धांतील प्रगतीचें म्हणजे वॉरसायन्समध्ये ते राक्षस किती पुढे गेले होते, याचें द्योतक होय. तें असें--

प्रभु रामचन्द्राच्या फौजा किष्किन्धेहून निघून समुद्रकिनाऱ्यावर जाऊन पोहोचल्या व आता युद्धाचा प्रसंग येणार, असें पाहिलें, तेव्हा रावणानें आपलें मंत्रिमण्डळ बोलाविलें व काय उपाय करावा, असा प्रश्न त्या मंत्रिमंडळापुढे ठेवला. तेव्हा वज्रदंष्ट्र नांवाचा एक सेनापति त्यास सांगूं लागला. तो म्हणतो—

इदं ममापरं वाक्यं श्रृणु राजन् यदीच्छसि ।
उपायकुशलो ह्येव जयेत् शत्रून् अतन्द्रितः ॥१२॥
कामरूपधराः शूराः सुभीमा भीमविक्रमाः ।
राक्षसाणां सहस्राणि राक्षसाधिप निश्चिताः ॥१३॥
काकुत्स्थं उपसंगम्य विभृतं मानुषं वपुः ।
सर्वे ह्यसंभ्रमा भूत्वा ब्रुवन्तु रघुसत्तमम् ॥१४॥
प्रेषिता भरतेनैव भ्रात्रा तव यवीयसा ।
स हि सेनां समुत्थाप्य शीघ्रमेवोपयास्यति ॥१५॥

**ततो वयं इतस्तूर्णं शूलशक्तिगदाधराः ।**
**चापबाणासिहस्ताश्च त्वरितास्तत्र यामहे ॥१६॥**
**आकाशे गणशः स्थित्वा हत्वा तां हरिवाहिनीम् ।**
**अश्मशस्त्रमहावृष्ट्या प्रापयाम यमक्षयम् ॥१७॥**

( युद्धकांड सर्ग ८ )

"राजन्, मर्जी असल्यास माझी एक आणखी विनंती श्रवण करावी. सर्वकाल सावधान असणारा व उपायकुशल [अनेक प्रकारचे डावपेच लढविण्यांत निष्णात] असेल, तोच पुरुष शत्रूवर जय मिळवूं शकतो. नुसती सैन्याची केवढीही उत्तम प्रकारची तयारी असली व शस्त्रास्त्रेंही अगदी अद्यावत् सुधारलेलीं असून, त्यांचा पुरवठाही भरपूर असला, तथापि डावपेच लढविण्यांत कुशल नसेल, तर नुसत्या सैन्याच्या तयारीनें व अद्यावत् सुधारलेल्या शस्त्रास्त्रादि सामुग्रीच्या भरपूर पुरवठ्यानें कांही जय मिळणें शक्य नाही. यास्तव, मला वाटतें अशी उपाययोजना करावी–

इच्छेस येईल तो वेश धारण करून तदनुरूप बतावणी करण्यांत कुशल, शूर, दिसण्यांत रुबाबदार व मोठे पराक्रमी असे कांही हजार राक्षस सैन्यांतून निवडून काढावेत व त्यांचें एक पृथक् सैन्य तयार करावें. त्या सैन्यानें बाह्यतः मनुष्यवेश धारण करून ( रामाच्या सैन्यासारखा गणवेश युनिफॉर्म धारण करून ) अगदी निर्भयपणें—न घाबरतां— रामापाशी जाऊन त्यास सांगावें की, "आपले धाकटे बन्धु भरत यांनी आम्हांस आपले सहायार्थ आपलेकडेस पाठविलें आहे व तेही आणखी सैन्य बरोबर घेऊन, आपल्या मदतीस्तव पाठोपाठ लवकरच येत आहेत." असें सांगून रामाच्या सैन्यांत मिसळावें. त्यानन्तर, आपण येथून सर्व शस्त्रास्त्रांनी सज्ज असें आपलें सैन्य तेथें नेऊन, गणशः ( By companies ) म्हणजे निरनिराळ्या तुकड्यांना आकाशामध्ये उभें करून, तेथून, खाली उभे असलेल्या वानरसैन्यावर शस्त्रास्त्रांचा वर्षाव करूं व तें सर्व वानरसैन्य यमसदनीं पाठवूं." म्हणजे, पूर्वी वेशान्तर करून गेलेल्या राक्षससैन्यानें रामाच्या सेनेंत गुप्तपणें मिसळून रहावें व आपण येथून, आपल्या सैन्यासह आकाशमार्गें जाऊन तेथे पोहोचल्यावर सूचना ( Signal ) दिल्याबरोबर त्या पूर्वीच्या वेशान्तर करून

रामाच्या फौजेंत गुप्तपणें मिसळलेल्या सैन्यानें आंतल्या आंत वानरसेनेची कत्तल करावी व वरून आकाशांतून आपण शस्त्रास्त्रांचा मारा करून, तिचा नाश करावा, असा वज्रदंष्ट्राचा आशय. असो.

## आकाशयुद्धांत राक्षसांची प्रगति.

आता, यांत ऐतिहासिक दृष्ट्या काय दिसतें, तें पाहूं. वज्रदंष्ट्र हा रावणाच्या दरबारांतील एक मंत्री व सेनापति होता. त्यानें जी मसलत दिली, ती उगाच खुळेपणाची असणें शक्य नाही. तसेंच रावण व त्याचें मंत्रिमण्डळ हें कांहीही मसलत खुळचटपणाची असती, तर ती मानण्याइतके भोळवट व खुळचट नव्हते. अर्थात्, आकाशांत सैन्याच्या तुकड्या उभ्या करून, तेथून खाली असलेल्या शत्रुसैन्यावर शस्त्रास्त्रांचा मारा करण्याची कला म्हणजे आकाशयुद्धाची कला तत्कालीन राक्षसांस पूर्णपणें अवगत होती, असें निःसंदेहपणें सिद्ध होतें. आणि ज्या अर्थी आकाशांत सैन्येंचीं सैन्यें उभीं करून, युद्ध करण्याचा उल्लेख ग्रंथांत आहे, त्या अर्थी तीं सैन्यें आकाशांत युद्धार्थ उभीं करण्याच्या योग्यतेचीं अशीं साधनेंही राक्षसांपाशी असलींच पाहिजेत, हेंही निर्विवादपणें सिद्ध आहे.

हीं साधनें भौतिक किंवा आध्यात्मिक या दोहोंपैकीं एका किंवा दोनही स्वरूपांचीं असणें शक्य आहे. भौतिक साधनें असलीं, तर तीं काय आजकालच्या विमानांसारखी होतीं? किंवा अन्य स्वरूपाचीं होतीं? कोणत्याही स्वरूपाचीं असलीं, तरी ज्या अर्थी, सैन्येंचीं सैन्यें त्यांमधून उभीं करून, युद्ध करण्याच्या योग्यतेचीं तीं असल्याचें वर्णन ग्रन्थांत आहे, त्या अर्थी तीं साधनें वर्तमानकालीन सुधारणेच्या अत्युच्च शिखरावर आरूढ असलेल्या पाश्चात्यांच्या साधनांपेक्षा अत्यन्त श्रेष्ठ प्रतीचीं होतीं, हें निर्विवाद आहे. निदान कमी प्रतीचीं तर नव्हतींच नव्हतीं.

विमानांमधून सैन्यें बसवून, खालच्या शत्रूशीं युद्ध करणें शक्य आहे व तें करतांना आपण वर्तमानकालीं प्रत्यक्ष पहातच आहोंत; पण विमानावाचूनही आकाशांत उभें राहून मनुष्याला युद्ध करणें शक्य आहे काय? याचा विचार भौतिक दृष्ट्या म्हणजे आजकालचे सायन्सच्या दृष्टीनें करून पाहूं—

सायन्स हें प्रोग्रेसिव्ह (Progressive) म्हणजे प्रागतिक आहे व मनुष्य

प्राण्याची बुद्धिमत्ताहि अपार आहे, तिला पार नाही. आज जो मनुष्य मोठ्या मत्स्याकृति भांड्यांत बसून आकाशांत संचार करतांना दिसतो, तोच कालान्तरानें एका लहानशा पाळण्यांत बसून आकाशांत संचार करूं शकेल व त्याहीनन्तर नुसते पंख लावून, किंवा अंगांत कोट घालून, किंवा डोक्यास नुसती टोपी चढवून अथवा पायांत खडावा घालून, गळ्यांत एखादा ताईत बांधून, किंवा तोंडांत एखादी गोळी धरूनदेखील आकाशांतून अव्याहतपणें संचार करूं लागेल; कारण या भौतिक शास्त्रांची ( सायन्सची ) प्रगति व मनुष्याची कल्पनाशक्ति हीं कोठपर्यंत पुढे जातील, हें सांगतां येत नाही; पण ज्या अर्थी, ग्रंथांत " **आकाशे गणशः स्थित्वा** " असा उल्लेख आहे, त्या अर्थी विमानें किंवा तत्सदृश इतर भौतिक साधनांपेक्षाही अधिक सुधारलेलीं साधनें राक्षसांस माहीत होतीं, हेंच सिद्ध आहे. म्हणजे, तत्कालीन राक्षस हे आकाशयुद्धांतदेखील आजकालच्या सुधारणाशिखरारूढ पाश्चात्यांपेक्षा बरेच, नव्हे पुष्कळच पुढे गेलेले होते, हें सिद्ध आहे.

# ( ३ ) वानरांची संस्कृति.

## वानर रानटी ( बार्बेरियन् ) होते काय ?

मारुति सीतेचा शोध लावून परत आला. त्याने श्रीरामास तिचें कुशलवृत्त निवेदन केलें व– ( सुंदर. ६५।२५ )

**जीवितं धारयिष्यामि मासं दशरथात्मज ।**
**ऊर्ध्वं मासात् न जीवेयं रक्षसां वशमागता ॥**

असा निर्वाणीचा निरोपही त्यांस सांगितला आणि समुद्रावरून सैन्य पलीकडे नेण्यासंबंधांत काय उपाय योजावयाचे, याचा पूर्णपणें विचार करा, अशी विनन्तीही केली. मारुतीनें सांगितलेल्या वृत्तान्तावरून लंकेच्या वाटेंत अफाट समुद्र आडवा पसरलेला आहे, ही कल्पना मनांत येऊन, श्रीरामाचा उत्साह नष्ट झाला व एवढ्या अफाट समुद्रावरून या सेना पलीकडे कशा न्याव्या, याविषयी श्रीराम अगदी चिन्ताकुल होऊन बसले. त्या वेळीं रामाचा मुख्य सेनापति वानरराज सुग्रीव त्यांस म्हणाला की, "आपण असे एखाद्या प्राकृत माणसासारखे शोक काय

करीत बसलांत ? ही वेळ काय शोक करीत बसण्याची आहे ? शोक हा पुरुषाच्या शौर्याचा नाश करणारा आहे.

**तदलस् शोकमालब्य क्रोधमालम्ब भूपते ।**
**निश्चेष्टाः क्षत्रिया मन्दा सर्वे चण्डस्य बिभ्यति ॥** (युद्ध. २।१९)

यास्तव शोक करणें पुरें करा व क्रोधाचा अबलंब करा. पराक्रमहीन व सौम्य अशा क्षत्रियाला कोणी विचारीत नाही. क्रोधी पुरुषाला सर्व भितात, यास्तव धैर्याचें अवलंबन करा व या अफाट समुद्रावरून सैन्य पलीकडे नेण्यासंबंधांत आम्हां मंत्रिमण्डळाशीं नीट विचार करा. " सुग्रीव पुढे म्हणतो—

**सेतुबन्धः समुद्रे च यावत् लंकासमीपतः ।**
**सर्वं तीर्णं च मे सैन्यं जितमित्यवधार्यताम् ॥** (युद्ध.२।१२-२१)

लंकेपर्यंत सेतु बांधला गेला व माझें सर्व सैन्य एकदाचें समुद्र उल्लंघन करून पार गेलें की, जिंकलेंच समजावें.

**कथंचित् परिपश्यामि लंघितं वरुणालयम् ।**
**हतं इत्येव तं मन्ये युद्धे शत्रुनिबर्हण ॥** ( युद्ध. २।२३ )

कसेंतरी एकदा माझें सैन्य समुद्राचें उल्लंघन करून पार गेलेलें पाहूं द्या की, युद्धांत रावण मेलाच असें समजा. सुग्रीव आणखी पुढे म्हणतो—

**किमुक्त्वा बहुधा चापि सर्वथा विजयी भवान् ।** (युद्ध. २।२४)

रामा ! आता अधिक तें काय सांगूं ? सर्वथा आपणच विजयी व्हाल, ही खात्री बाळगा.

येणेप्रमाणे सुग्रीवाने बहुत प्रकारें धीर दिल्यावरून श्रीराम मारुतीकडे वळून म्हणाले, " मी सर्व प्रकारें समुद्र उल्लंघन करून जाण्यास समर्थ आहें. तथापि, ती लंका कशी आहे ? तिचा बंदोबस्त कसा आहे ? कोणकोणत्या ठिकाणीं कशा प्रकारचें व किती किती सैन्य ठेवलें आहे ? याची माहिती अगदी यथा-तथ्य मिळावी, अशी माझी इच्छा आहे. ती तूं मला सांग. " तेव्हा मारुतीनें लंकेची सर्व माहिती श्रीरामास अगदी यथातथ्य सांगितली आणि म्हणाला, सर्व प्रकारें कडक बंदोबस्त असूनदेखील मी खंदकावरील पूल तोडून टाकलेत, खन्दक भरून टाकले व लंका जाळून भस्म केली आणि तो पुढे म्हणाला– रामा !

**येन केन तु मार्गेण तराम वरुणालयम् ।**
**हतेति नगरी लंका वानरैरुपधार्यताम् ॥** ( युद्ध. ३।३० )

कोणत्यातरी उपायाने समुद्रावरून तरून पार जाऊं या की, वानरांनी लंकेचा पाडाव केलाच समजा. अंगद, द्विविद, मैन्द, जाम्बवान्, पनस, नल, नील व मी एवढेच आम्ही आठ जण समुद्रावरून तरून जाऊन, सारी लंकाच आपल्या-समीप उचलून आणून ठेवण्यास समर्थ आहोंत. बाकीच्या सैन्याची आवश्यकताच काय आहे ? यास्तव आपण सैन्याची तयारी करून लंकेकडेच प्रयाण करण्याची निःशंकपणें शीघ्र आज्ञा द्यावी.

एवंच, सुग्रीव व हनुमान् या दोघाही सेनापति व मंत्रिश्रेष्ठांचें एकच मत पडलें की, कोणत्याही उपायाने का होईना, एकदा समुद्र आपल्या सत्तेखालीं आला की, लंका जिंकल्यासमान आहे.

## सुग्रीव व नेपोलियन.

वर्तमानकालीन अत्यन्त सुधारलेल्या युद्धपद्धतीचे जनक जगद्विख्यात सेना-पति नेपोलिअन् बोनापार्ट् यांचे शब्दतरी काय आहेत की, " Let us be masters of the channel for six hours and we are the masters of the whole world. " म्हणजे ही खाडी ( फ्रान्स आणि ब्रिटिश् बेटें यांच्यामध्ये असलेला समुद्र ) एकदाच फक्त सहा तासांपुरती आपले सत्तेखाली येऊं द्या की, आपण सर्व जगताचे स्वामी झालोंच समजा. नेपोलिअन बोनापार्टने सर्व युरोपखण्ड जिंकलें होतें; पण ब्रिटिश बेटें कांहीं त्यास जिंकतां येईनात; कारण फ्रान्स व ब्रिटिश बेटें यांचेमध्ये ब्रिटिश चॅनल् या नांवाचा समुद्र आडवा आहे. तो त्या काळींही इंग्रजांचे सत्तेखालीं होता. तो आधी स्वतःचे सत्तेखाली आणल्यावाचून ब्रिटिश बेटें जिकणें त्याला शक्य नव्हतें. या कारणा-स्तव नेपोलिअनला सर्वांत आधी ब्रिटिश चॅनल् आपल्या सत्तेखाली आणणें, हें अत्यन्त महत्त्वाचें व अत्यन्त आवश्यक कार्य वाटत होतें; म्हणून तो असें म्हणत असे. हे अठराव्या शतकांतले म्हणजे कलियुगांतले जगद्विख्यात, युरोपखण्डांतील सेनापति नेपोलिअन बोनापार्ट यांचे विचार व त्रेतायुगांतील भरतखण्डांतले वानर-

सेनापति सुग्रीव व हनुमान यांचे विचार यांमध्ये किती चमत्कारिक साम्य आहे, तें पहा ! नेपोलिअन् म्हणतो, ब्रिटिश चॅनल् आमचे सत्तेखाली येऊं द्या की, आम्ही ब्रिटिश बेटें जिंकलीं समजा. तर सुग्रीव हनुमान म्हणतात की, समुद्र आमचे सत्तेखाली येऊं द्या, की, आम्ही लंका जिंकलीच समजा.— लंकेचे स्वामी-झालोंच समजा.

उभय युद्धक्षेत्रांमध्येदेखील कसें चमत्कारिक साम्य आहे, तेंहि लक्ष्यांत घेण्या-सारखें आहे.. एकीकडे सर्व युरोप खण्ड, मध्ये समुद्र ( ब्रिटिश चॅनल् ) व पलीकडे ब्रिटिश बेटें. तर एकीकडे सर्व भरतखंड, मध्ये समुद्र व पलीकडे लंकाबेट. ब्रिटिश बेटें हीं इंग्लंड, स्कॉटलंड आयर्लंड या तीन विभागांत विभागलेलीं आहेत, तर लंकादेखील त्रिकूटाचल, सुवेलाचल व निकुंभिला, या तीन विभागांत विभागलेली आहे. भरतखंडांतून लंकेवर स्वारी व्हावयाची होती व युरोपखंडां-तून ब्रिटिश बेटांवर स्वारी व्हावयाची होती. आता या कार्यांत सुग्रीवाला यश मिळालें व नेपोलिअनला तें मिळालें नाही, ही गोष्ट स्वतंत्र आहे. असो.

रामाचे मंत्रिमण्डळांत समुद्रावर सेतु बांधावा, असें ठरलें. बिभीषणही नुकताच रामाचे पक्षास येऊन मिळाला होता. त्याचेंही मत ' समुद्रावर सेतु बांधावा ' असेंच पडलें व त्याने सामोपचाराने समुद्रास अनुकूल करून घ्यावें, अशी मसलत श्रीरामास दिली. तिला अनुसरून श्रीरामाने प्रायोपवेशन करून आध्यात्मिक सामर्थ्याने समुद्रास अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न केला; पण या सामोपचाराच्या मार्गाने समुद्र कांही अनुकूल होईना. श्रीरामास तीन उपोषणें घडलीं. सामोपचाराने कांही वळत नाही, असें पाहून, श्रीरामास अत्यन्त क्रोध आला व जवळच लक्ष्मण उभा होता, त्यास म्हणाले, " लक्ष्मणा, पाहतोस ना समुद्राचा गर्विष्ठपणा ! मी इतक्या सामोपचाराने त्याची खुशामत करतो आहें; पण अद्याप तो कांही माझ्याकडे लक्ष्यच देत नाही. अरे !

**न साम्ना शक्यते कीर्तिः न साम्ना शक्यते यशः ।**
**प्राप्तुं लक्ष्मण लोकेऽस्मिन् जयो वा रणमूर्धनि ॥**

( युद्ध. २१।१६-१७ )

अरे, या जगांत मनुष्याला कीर्ति, यश किंवा युद्धांत जय हीं सामोपचाराने

प्राप्त करून घेणें केव्हाही शक्य नाही.

**सर्वत्रोत्सृष्टदण्डं च लोकः सत्कुरुते नरम् ॥ १६ ॥** (यु.२१)

सर्वत्र हातीं दण्डा उगारून असलेल्या माणसालाच लोक मान देतात. मी सौम्यपणाने याच्याशीं वागत आहें, म्हणून हा मला अगदी तुच्छ लेखीत आहे व म्हणून माझ्या समक्ष अद्यापि येत नाही. बरें आहे ! आण धनुष्य, पाहतों कसा समक्ष येत नाही तो ! " असें म्हणून श्रीरामाने समुद्रावर जळजळीत अशा बाणांचा वर्षाव करण्यास आरंभ केला. तेव्हा लागलीच समुद्र हात जोडून शरण आला व त्याने सेतु बांधण्यास योग्य असा मार्ग दाखविला व सेतुबंधनाचें काम चालू झालें. त्याचें वर्णन महर्षि देत आहेत—

## सेतुबंधनाचीं यांत्रिक साधनें.

**हस्तिप्रायान् महाकायाः पाषाणांश्च महाबलाः ।**
**पर्वतांश्च समुत्पाट्य यंत्रैः परिवहन्ति च ॥** ( युद्ध.२२।५६ )

म्हणजे हत्तीच्या अंगाएवढाले मोठमोठे दगड व पर्वताचे कडे मुळांतून उखडून काढून, मोठे धिप्पाड वानरवीर यंत्रांच्या सहाय्याने वाहून आणीत होते. या श्लोकांतील "**समुत्पाट्य**" व '**यंत्रैः**' हे दोन शब्द विशेष लक्ष्यांत घेण्यासारखे आहेत. महर्षि येथे '**खनित्वा**' असा शब्दप्रयोग करीत नाहीत. " समुत्पाट्य " असा शब्दप्रयोग करीत आहेत; कारण हत्तीच्या अंगाएवढे मोठमोठाले दगड व पर्वताचे कडे हे कांही सामान्य कुदळीफावड्यांनी खोदून निघणें शक्य नाही. त्यासाठी कांही अधिक शक्तिमान् असें साधन वानरांपाशीं असलें पाहिजे. तें जसें होतें व तें कशा प्रकारचें होतें, हें महर्षि '**समुत्पाट्य**' या शब्दाने स्पष्टतया दाखवीत आहेत. '**समुत्पाट्य**' म्हणजे सम्यक् रीतीने—पाहिजे तितकेंच—मुळांतून उपटून काढून, म्हणजे खननक्रिया न करतांदेखील हत्तीच्या अंगाएवढे मोठमोठाले दगड व पर्वताचे कडे मुळांतून उपटून काढण्याचें म्हणजे '**ब्लास्टिंग्**' करण्याचें, सुरुंगाच्या दारूसारखें कांही साधन, वानरांस माहीत होतें, असें सिद्ध होतें. अर्थात् तें साधन वर्तमानकालीन सुधारणाशिखरस्थ युरोपीय राष्ट्रें '**ब्लास्टिंग पॉवडर किंवा डायनामाइट्**' म्हणून

जें उपयोगांत आणतात, तत्तुल्यच असलें पाहिजे. त्यावाचून '**समुत्पाट्य**' या शब्दाचा प्रयोग यथार्थ होऊंच शकत नाही.

दुसरें, '**यन्त्रैः परिवहन्ति च**' या वर्णनावरून, सामान्य बैलगाड्यांपेक्षा अतिशय शक्तिमान् व सुधारलेलीं वाहतुकीचीं साधनें वानरांपाशीं असली पाहिजेत, असेंच सिद्ध होतें; कारण हत्तीच्या अंगाएवढे मोठमोठाले दगड सामान्य बैलगाड्यांवरून वाहून नेणें, हें शक्यच नाही. ते गाड्यांवर ठेवल्याबरोबर बैलासुद्धा त्या गाड्यांचाच चक्काचूर व्हावयाचा! वाहून नेणें तर दूरच राहिलें. पुन—

**दृश्यन्ते परिधावन्तो देवदानवसंनिभाः ॥** (यु. २२।६२)

म्हणजे, "देव व दानवांसारखे वानरवीर ते दगड व पर्वताचे कडे इत्यादि सामग्री घेऊन धावतच जातांना दिसत होते." असें वर्णन महर्षि करीत आहेत, त्यावरून हीं वाहतुकीचीं साधनें अतिशय द्रुतगतीचीं होतीं, असें स्पष्टतया दिसतें. म्हणजे वानरांपाशी अतिशय शक्तिमान् व द्रुतगतीची यांत्रिक सामुग्री ( Extremely powerful speedy machinary ) होती, हें सिद्ध होतें. म्हणजे वानर रानटी नव्हते, हेंच सिद्ध होतें.

आता हा सेतु कशा रीतीनें बांधला, हें महर्षींच्या शब्दांवरूनच पाहूं. महर्षि म्हणतात—

**सूत्राण्यन्ये प्रगृह्णन्ति ह्यायतं शतयोजनम् ।**
**दण्डान्यन्ये प्रगृह्णन्ति विचिन्वन्ति तथापरे ॥**
**नलश्चक्रे महासेतुं मध्ये नदनदीपतेः ॥** ( युद्ध० २२।५८-६० )

म्हणजे कांही वानरवीर सूत्र हातीं धरून लांबी मोजण्याचें काम करीत होते, कांहीं वानरवीर दण्ड उभे धरून उंचीची लेव्हल पहात व बाकीचे दगड, माती, झाडें, झुडपें आणून भराव घालीत व ती नीटनेटकी रचून, जागा सारखी करीत.

या सूत्रालाच आजकालचे भाषेंत "**मेझरिंग टेप्**" म्हणतात व दण्डाला "**मेझरिंग पोल**" म्हणतात. मेझरिंग टेपने लांबी मोजतात व मेझरिंग पोलने उंचीचें मोजमाप घेतात व कोणत्या ठिकाणीं किती भराव घालावयाचा, हें ठरवितात.

वर्तमानकालीन "**मिलिटरी इंजिनिअरिंग डिपार्टमेंट**" कडूनदेखील

पूलवगैरे बांधावयाचीं कामें याच पद्धतीनें केलीं जातात. यावरून तत्कालीन वानरांचें मिलिटरी इंजिनिअरिंग वर्तमानकालीन सुधारलेल्या मिलिटरी इंजिनिअरिंगपेक्षा कमी योग्यतेचें नव्हतें. उलट एवढा अफाट समुद्र पांच दिवसांएवढ्या अत्यल्प कालांत भरून काढला, यावरून वानरांचें मिलिटरी इंजिनिअरिंग वर्तमानकालीन सुधारलेल्या मिलिटरी इंजिनिअरिंगपेक्षा बरेंच उच्च प्रतीचें होतें, असें कबूल करावें लागतें. म्हणजे वानर ( बार्बेरियन् ) रानटी नव्हते, हेंच सिद्ध होतें.

आता येथे कांहीं आधुनिक पाश्चात्यसांप्रदायी विद्वान् अशी शंका घेतील कीं, बंदुकीची दारू ही तर सन् १२४७ मध्ये फ्रायर बेकन् नांवाच्या गृहस्थानें युरोपखंडांत शोधून काढली. इतक्या प्राचीन काळीं हिंदु लोकांना या दारूची माहिती आलीच कोठून ? तेव्हा कांहींतरी शब्दांची ओढाताण करून, शास्त्रीबोवांनी अर्थ जुळविला आहे. येथे या आधुनिक विद्वानांची अशी विपरीत भावना होणें साहजिक आहे; याकरिता पाश्चात्य विद्वान् या संबंधांत काय म्हणतात, तें पाहूं—

( १ ) युरोपखंडांतील वर्तमानकालीन अत्यन्त सुधारलेल्या युद्धपद्धतीचे जनक नेपोलिअन् बोनापार्ट हे आपल्या " एड्मेमरी टु मिलिटरी सायन्सेस् " या ग्रंथांत म्हणतात की– "Gunpowder was known to India and China and was used for the purpose of war, many centuries before Christian Era." म्हणजे "एश्. ख्रिस्ताच्या जन्माच्या कितीतरी शतकें पूर्वीपासून, हिंदू लोकांना व चिनी लोकांना बन्दुकीच्या दारूची माहिती होती व ते तिचा युद्धांतही उपयोग करीत असत."

( २ ) ग्रीनर म्हणून एक इतिहासकार होऊन गेला. तो आपल्या " Gunnery in 1857 " या ग्रंथांत म्हणतो कीं, " The inhabitants of India were unquestionably acquainted with its ( of gunpowder ) composition at an early date. " म्हणजे हिंदुस्थानांतल्या रहिवाशी लोकांना बंदुकीच्या दारूच्या कृतीची माहिती फार प्राचीन कालापासून आहे. तो आणखी पुढे म्हणतो की,–

" Alexander is supposed to have avoided attacking the Oxydracca, a people dwelling between the Hyda-

phasis and Ganges, from a report of their having supernatural means of defence; for it is said they do not come out to fight those who attack them, but those holy people beloved by God, overthrow their enemies, with tempest & thunderbolts shot from their walls and when Egyptian Hereculise & Baccus overrun India, they attacked those people, but were repulsed with storms of thunderbolts and lightening, hurled from above. This is no doubt evidence of the use of gunpowder " असें सांगतात की, शिकंदर बादशहाने, "गंगा व ब्रह्मपुत्रा या नद्यांमधल्या प्रदेशांत ऑक्सिड्रेसि नांवाचे लोक रहात असत, त्यांजवर हल्ला करण्याचा विचार केला. तेव्हा त्यास असें सांगण्यांत आलें की, त्यांचेवर कोणी शत्रु चालून आला असतां त्यांशीं युद्ध करण्यासाठी ते लोक आपल्या किल्ल्याच्या कोटाच्या बाहेर येत नाहीत. ते देवाचे अत्यंत प्रिय व पवित्र लोक आपल्या शत्रूवर किल्ल्याच्या भिंतीवरूनच वज्रांचा वर्षाव करून, त्या शत्रूंस उधळून लावतात; आणि जेव्हा इजिप्शियन हरक्युलिस् व बॅकस् हे हिंदुस्थानावर चालून आले, तेव्हा त्यांनी या किल्ल्यांतल्या लोकांवर हल्ला केला; परंतु या लोकांनी आपल्या किल्ल्याच्या भिंतीवरूनच त्यांजवर विजा व वज्र यांची भयंकर वृष्टि करून, त्याचा हल्ला परतविला." ग्रीनर म्हणतो की, त्या काळीं हिंदुस्थानांत बंदुकीच्या दारूचा युद्धामध्ये सर्रासपणें उपयोग केला जात असे, याचा हा खात्रीचा असा उघड पुरावा आहे.

(३) प्रोफेसर गुस्ताव, एम्. ए., पीएच्. डी., प्रेसिडेन्सी कॉलेज मद्रास, आपल्या पुस्तकाच्या चवथ्या भागांत " India–the Home of Gunpowder & fire–arms " या विषयावर लिहितांना म्हणतो की (१) " Every School boy ( in India ) prepares his own gunpowder. " म्हणजे हिंदुस्थानांतल्या प्रत्येक शाळेंतलें मूल आपली बंदुकीची दारू स्वतः तयार करून घेतें. ( २ ) " Explosive powder for discharging

projectiles was known in India from the earliest period." म्हणजे तोफेचे गोळे लांब अंतरावर फेकण्यासाठी उपयोगांत येणारी दारू बनविण्याची कृति हिंदु लोकांना अत्यन्त प्राचीन कालापासून माहीत होती. (३) Gunpowder has been known in China as well as in Hindustan, far beyond all period of investigation." म्हणजे चीन व हिंदुस्थान या देशांतील लोकांना बंदुकीची दारू अगदी कल्पनातीत इतक्या प्राचीन कालापासून माहीत आहे.

प्रोफेसर गुस्ताव आणखी म्हणतो की,- "शत्रूंच्या विरुद्ध ज्या ज्या अस्त्रांचा प्रयोग करावयाचा, त्यांत बंदुकीची दारू भरलेल्या धुरांच्या गोळ्यांचाही प्रयोग वैशंपायन आपल्या नीतिप्रकाशिकेंत लिहीत आहे. या धुरांच्या गोळ्याला संस्कृतांत 'धूमगोलक' किंवा 'चूर्णगोलक' असें म्हणतात व यालाच इंग्रजी भाषेमध्ये "Smoke-balls" असें म्हणतात. असो.

हीं जीं पाश्चात्य विद्वानांचीं प्रमाणें वर दिलीं आहेत, त्यांवरून तरी खात्री व्हावयास पाहिजे की, हिन्दूंस सुरुंगाच्या दारूची माहिती होती. अर्थात्, हिंदु हे 'बार्बेरियन्' ( रानटी ) नव्हते, हेंच सिद्ध होतें, येवढेंच नव्हे, तर मिलिटरी इंजिनिअरिंगमध्येंदेखील तत्कालीन वानर हे वर्तमानकालीन पाश्चात्यांपेक्षा मुळीच मागासलेले नव्हते, हें निर्विवादपणें सिद्ध होतें. आता वानरांच्या युद्धशास्त्रांतील प्रगतिसंबंधांत आणखी एक उदाहरण घेऊं—

## मारुतीचें युद्धकौशल्य.

### ( शिस्तीची पीछेहाट )

प्रभु रामचन्द्राच्या सेना समुद्रसंतरण करून पार गेल्यावर त्यांनी, चारही बाजूंनी लंकेस वेढा घातला. उत्तर दरवाजावर स्वतः रावण आपल्या निवडक अशा राक्षससैन्यासह श्रीरामाशीं तोंड देण्यास उभा होता; कारण त्या बाजूला स्वतः श्रीराम आपल्या वानरसेनेसह लंकेवर हल्ला करण्यासाठी सज्ज होऊन उभे होते. पश्चिम दरवाजावर अजिंक्य असा इन्द्रजित् आपल्या अजिंक्य सैन्यासह मारुतीचे

तोंडावर उभा होता; कारण त्या बाजूला मारुति आपल्या वानरसेनेसह सज्ज होऊन उभा होता. त्या वेळीं मारुतीस धोका देण्याचे हेतूने, इन्द्रजिताने मायासीता तयार करून आणली व तिचा वध– मारुति व त्याची वानरसेना पहात असतां– त्यांचेसमोर केला. त्या वेळीं मारुतीस ती खरोखरच सीता आहे, असें वाटून, त्याने इन्द्रजिताचा अतिशय कडक शब्दांनी निषेध केला; तथापि इन्द्रजित् कांही ऐकेना. तो कांही ऐकत नाही, असें पाहून मारुतीने त्याशीं फारच निकराने युद्ध चालू केलें; पण इन्द्रजितापुढे मारुतीचें कांहीच चालेना. इन्द्रजिताचा जोर अधिकच वाढत चालला व मारुतीचें सैन्य अगदी कचाट्यांत सापडलें. आपल्यावर बाजू उलटली, असें पाहून आता पुढे युद्ध चालू ठेऊन, आपलें सैन्य वृथा मारविणें योग्य होणार नाही, असा पोक्त विचार करून, मारुतीने आपण स्वतः कांही निवडक सैन्य घेऊन, इन्द्रजिताच्या सैन्यास थोपवून धरलें व त्या आपल्या सैन्याच्या आडोशांत ( under cover ) बाकीचें सर्व वानरसैन्य एकही शिपाई मरूं न देतां सुरक्षितपणें काढून नेलें. त्याचें वर्णन महर्षि असें करतात—

**सुस्कन्धविटपैः शैलैः शिलाभिश्च महाबलः ।**
**हनुमान् कदनं चक्रे रक्षसां भीमकर्मणाम् ॥१८॥**
**संनिवार्य परानीकं अब्रवीत् तान् वनौकसः ।**
**हनूमान् संनिवर्तध्वं न नः साध्यं इदं बलम् ॥ १९ ॥**
**यन्निमित्तं हि युद्धयामो हता सा जनकात्मजा ॥ २० ॥**
**इमं अर्थं हि विज्ञाप्य रामं सुग्रीवमेव च ।**
**तौ यत्प्रतिविधास्येते तत्करिष्यामहे वयम् ॥ २१ ॥**
**इत्युक्त्वा वानरश्रेष्ठो वारयन् सर्व वानरान् ।**
**शनैः शनैः असंत्रस्तः सबलः संन्यवर्तत ॥ २२ ॥** (युद्ध. ८२)

मोठमोठे वृक्ष व शिळा यांचा वर्षाव करून, हनुमान् याने त्या भयंकर युद्ध करणाऱ्या राक्षसांचें कंदन आरंभिलें॥१८॥ परंतु शत्रु-सैन्याचा जोर फार वाढत चालला आहे व आपलें सैन्य त्याच्या कचाट्यांत सापडत आहे, अशा वेळीं अस्थानीं शौर्य दाखवून, आपलें सारें सैन्य वृथा मारविणें योग्य नाही, असा पोक्त विचार करून, हनुमान् याने कांही निवडक वानरसैन्य आपल्याबरोबर घेऊन, शत्रूच्या

*

(इन्द्रजिताच्या) सैन्यास थोपवून धरून, बाकीच्या वानरसैन्याला-'**संनिवर्तध्वम्**' म्हणजे परत फिरा, हें शत्रुसैन्य आज आपल्या आटोक्यांत येणें शक्य नाहीं, असा हुकूम दिला ॥१९॥ यालाच " रिटायर ऑर्डर " ( Retire order ) म्हणतात.'जिच्यासाठीं आपण प्राणाचीही परवा न करतां युद्ध करीत आहों, ती-जनकात्मजा सीता तर मारली गेली. हा वृत्तान्त श्रीराम व सुग्रीव यांच्या कानावर घालूं व त्यावर ते पुढे जशी आज्ञा देतील, त्याप्रमाणे आपण करूं. ' ( श्लोक २०-२१ ) याप्रमाणे हुकूम देऊन, सर्व वानरसैन्यास परत फिरविलें व आपणही-"**शनैः शनैः**(Gradually) संथपणें"-"**असंत्रस्तः**- (undisturbed) गडबड न होऊं देतां, सैन्याची शिस्त न बिघडूं देतां, "-" **सबलः** ( with army ) सैन्यासहवर्तमान " " **संन्यवर्तत** ( retired ) परत फिरला. " ॥२६॥ यालाच शिस्तीची पीछेहाट ( Orderly retreat ) असें म्हणतात.

आता येथे एक विचार करण्याची गोष्ट अशी आहे की, जेव्हा शत्रूच्या सैन्यावर जय प्राप्त होतो, तेव्हा त्या शत्रूस आपला प्रभाव दाखवणें, हें कांही विशेष महत्त्वाचें नाही; पण लढाई बिघडून, जेव्हा बाजू उलट अंगावर येते, अशा वेळीं आपल्या सैन्यांतील मनुष्य दगावूं न देतां शत्रूच्या कचाट्यांतून आपलें सैन्य सुरक्षितपणें काढून नेणें, यांतच सेनापतीचें खरें कौशल्य आहे. हें कौशल्य या प्रसंगीं मारुतीचे अंगीं दिसून येतें.

अशी एक म्हण आहे की—

**मन्त्रिणां भिन्नसन्धाने भिषजां सान्निपातिके ।**
**कर्मणि व्यज्यते प्रज्ञा स्वस्थे को वा न पण्डितः ॥**

याचा भावार्थ असा की, सर्व सुरळित चाललें आहे, तोंपर्यंत सर्वच शहाणे असतात; पण जर एखादी मसलत बिघडली व अंगावर आली, म्हणजे तिला सुधारून घेऊन, आपल्या राष्ट्राची बाजू सावरून घेणें, यांतच मंत्रिलोकांचें खरें कौशल्य आहे; व व्याधि बिघडली, म्हणजे तिला सावरून घेऊन रोग्याचें जीवित रक्षण करणें, यांतच वैद्याचें खरें कौशल्य आहे. युद्धाची बाजू आपल्यावर उलटली असतां, मारुतीनें प्रसंगावधान राखून, आपलें सैन्य इन्द्रजिताच्या कचाट्यांतून काढून नेलें, यांतच मारुतीचें सेनापतित्व ( सेनापतित्वाचें कौशल्य ) दिसून येतें.

# वानरांचीं ध्वनिवाहक साधनें.

मारुतीचें व इन्द्रजिताचें युद्ध चालू असतां, मारुतीच्या सैन्यावर इन्द्रजिताच्या सैन्याचा दबाव अधिक पडत आहे व मारुतीचें इन्द्रजितापुढे कांही चालत नाही आणि त्यास सहायाची अत्यन्त आवश्यकता आहे, हें श्रीरामाच्या लक्ष्यांत आलें व लागलीच क्षणाचाही विलंब न लावतां आपल्या सैन्यासह मारुतीच्या सहाय्यास धावून जाण्याविषयी प्रभु रामचन्द्राने जाम्बवानाला आज्ञा केली. त्या आज्ञेन्वयें जाम्बवान् आपल्या ऋक्षसेनेसह मारुतीच्या सहाय्यास तत्काल निघाला. त्या प्रसंगाचें वर्णन वाल्मीकि महर्षि असें करीत आहेत—

राघवश्चापि विपुलं तत् राक्षसवनौकसाम् ।
श्रुत्वा संग्रामनिर्घोषं जाम्बवन्तं उवाच ह ॥ १ ॥
सौम्य नूनं हनुमता कृतं कर्म सुदुष्करम् ।
श्रूयते च यथा भीमः सुमहान् आयुधस्वनः ॥ २ ॥
तत् गच्छ कुरु साहाय्यं स्वबलेनाभिसंवृतः ।
क्षिप्रं ऋक्षपते तस्य कपिश्रेष्ठस्य युध्यतः ॥ ३ ॥
ऋक्षराजस्तथेत्युक्त्वा स्वेनानीकेन संवृतः ।
अगमत् पश्चिमं द्वारं हनूमान् यत्र वानरः ॥ ४ ॥
अथायान्तं हनूमन्तं ददर्शर्क्षपतिस्तदा ।
वानरैः कृतसंग्रामैः श्वसद्भिरभिसंवृतम् ॥ ५ ॥
दृष्ट्वा पथि हनूमांश्च तत् ऋक्षबलमद्भुतम् ।
नीलमेघनिभं भीमं संनिवार्य न्यवर्तत ॥ ६ ॥ ( युद्ध. ८३ )

प्रभु रामचन्द्राने इन्द्रजित् व मारुति या दोघांमध्ये चालू असलेल्या त्या युद्धाचा भयंकर कोलाहल श्रवण करून ते जाम्बवानाला म्हणाले, ( १ ) हा जो शस्त्रांचा मोठा भयंकर खणखणाट ऐकूं येत आहे, त्यावरून, मारुतीने खरोखर मोठें दुष्कर असें युद्ध चालविलें आहे, असें दिसतें ( २ ) ( परन्तु त्याला मदतीची अत्यन्त अपेक्षा दिसत आहे ). यास्तव ऋक्षराज, तुम्ही आपलें सैन्य घेऊन सत्वर जा

व इन्द्रजिताशीं युद्ध करीत असलेल्या त्या कपिश्रेष्ठ मारुतीला सहाय्य करा. ( ३ ) आज्ञा प्रमाण, असें म्हणून, ऋक्षराज जाम्बवान् हा आपल्या सैन्यासह-वर्तमान पश्चिमद्वारावर जेथे हनुमान् युद्ध करीत होता, तिकडे अति त्वरेने निघाला. ( ४ ) तों मारुति- इन्द्रजिताशीं युद्ध करून दमलेंभागलेलें व धापा टाकीत असलेलें असें आपलें वानरसैन्य घेऊन, परत येतांना त्याला दिसला. ( ५ ) हनुमानानेही तें नील मेघासारखें भयंकर व अद्भुत असें ऋक्षसैन्य आपल्या सहाय्यास्तव येतांना पाहिलें व त्यालाही परत फिरवून त्याचे पाठोपाठ आपणही आपल्या सैन्यासह निघून गेला. ( ६ ) हें जें श्रीरामाने जाम्बवानाला सैन्यासह मारुतीच्या मदतीस धाडलें, या कृत्यालाच 'Sending reinforcement' असें म्हणतात.

आता या ठिकाणीं प्रश्न असा उपस्थित होतो की, लंकेभोवती वानरसेनेचा चोहोंकडून जो वेढा पडला होता, त्यांत उत्तरद्वारावर रावणाचे तोंडावर श्रीरामचन्द्र आपल्या सैन्यासह उभे होते व पश्चिम द्वारावर मारुति आपल्या सैन्यासह इन्द्रजिताच्या तोंडावर उभा होता. या दोघांमध्ये अन्तर किती असावें बरें ? त्यास, रावणाची राजधानी लंका जी होती, तिचा विस्तार वाल्मीकीच्या वर्णनानुसार—

**दशयोजनविस्तीर्णा विंशद्योजनमायता ।** (युद्ध–कां. ३९।२०)

म्हणजे ५० मैल रुंदी व १०० मैल लांबी–इतका होता. अर्थात् लंकेच्या उत्तर व पश्चिम द्वारांमध्ये अंतर– ( नुसत्या कोटाच्या भिंतीवरून लांबी घेतली, तर ) २५+५० = ७५ मैलांचें होतें. आता, उत्तरद्वारापुढे रावणाचें लक्षावधि सैन्य युद्धार्थ सज्ज होऊन उभें होतें. त्यापुढे लंकेच्या कोटावर असलेल्या तोफांच्या माऱ्याचे पलीकडे ( out of the range of the enemies' guns ) श्रीराम आपल्या वानरसेनेसह उभे होते व त्यांच्या पाठीमागे ती वानरसेना समुद्रापर्यंत पसरली होती. त्याचप्रमाणे पश्चिमद्वारावर–कोटाबाहेर–इंद्रजिताचेंही लक्षावधि सैन्य युद्धार्थ सज्ज होऊन उभें होतें व त्या बाजूच्या कोटावरील तोफांच्या माऱ्याबाहेर मारुतीचें सैन्य त्यांच्या पिछाडीस कित्येक मैलपर्यन्त पसरलेलें होतें व या दोनही म्हणजे श्रीरामाच्या व मारुतीच्या सैन्याच्या पिछाडीकडून निघणाऱ्या

सरळ रेषांच्या काटकोनामध्ये पिछाडीच्या बाजूस ( In the rear ) जाम्बवान् याची फौज दोनही बाजूंना मदत करण्यास उपयोगी पडावी, अशा बेताने उभी केली गेली होती.

या एकंदर सर्व स्थितीवरून पाहतां राम व रावण यांमध्ये कितीतरी मैलांचें अंतर असलें पाहिजे. तसेंच इंद्रजित् व मारुति यांचेमध्येही बहुत मैलांचें अंतर असेंल पाहिजे. आता, रावण व इन्द्रजित् यांचेमध्ये म्हणजे उत्तरद्वारापासून तें पश्चिमद्वारापर्यंत लंकेच्या कोटाच्या आंतल्या बाजूस कर्णरेषेंत अन्तर ५६ मैल येतें. अर्थात् रावणापासून कितीतरी मैल अन्तरावर उभा असलेला राम व तिकडे इन्द्रजितापासून कितीतरी मैल अन्तरावर उभा असलेला मारुति यांजमध्ये ५६ मैलांपेक्षा कितीतरी अधिक अंतर असलें पाहिजे. त्यास वाल्मीकीच्या वर्णनान्वयें, दोनही बाजूंकडील सैन्याच्या संख्येचा विचार करतां व ती संख्या समजा की, पंचवीस पटीने अतिशयोक्तीची आहे, असें मानलें तरीदेखील, तें अन्तर कमींत कमी म्हटलें तरी ७५।८० मैलांपेक्षा कमी असणें शक्य नाही. म्हणजे लंकेच्याबाहेर युद्धक्षेत्रावर श्रीराम व मारुति या दोघांमध्ये अन्तर कमींत कमी ७५।८० मैलांचें होतें. तेव्हा श्रीरामाला हा जो संग्रामनिर्घोष ऐकूं आला, तों पाउणशे किंवा ऐशी मैलांवरून ऐकूं आला. म्हणजे रणक्षेत्रावर पाउणशे–ऐशी मैलांचे अन्तरावर ऐकूं जाण्यासारखीं ध्वनिवाहक अशीं साधनें त्या काळीं वानरांपाशी होतीं, हें सिद्ध होतें.

तर मग हीं साधनें कोणत्या स्वरूपाचीं होतीं ? असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. त्यास, ज्या अर्थी– " **श्रुत्वा संग्रामनिर्घोषम् ।** " व " **श्रूयते च यथा भीमः सुमहान् आयुधस्वनः ।** " असें वर्णन ग्रंथांत आहे, त्यावरून हीं साधनें वर्तमानकालीन रेडिओसारखींच कांहीशीं असलीं पाहिजेत आणि ज्या अर्थीं हीं सर्व साधनें सुग्रीवाचींच म्हणजे वानरांचींच होतीं; त्या अर्थीं वानर हे युद्ध–विषयक रसायनशास्त्रांत ( in War-Science ) वर्तमानकालीन सुधारणाशिखरस्थित पाश्चात्य राष्ट्रांतील लोकांपेक्षा निदान मागासलेले तरी नव्हते, हेंच सिद्ध होत आहे. अर्थात्, वानर हे ( 'बार्बेरियन' म्हणजे ) रानटी होते, हें विधान चुकीचें आहे.

## वानरी व राक्षसी स्त्रियांचें शिक्षण.

आता दुसरा एक विचार असा आहे की, समाज सुधारलेला कोणता म्हणावयाचा ? त्याचें उत्तर असें आहे की, ज्या समाजांतील स्त्रिया सुधारलेल्या– म्हणजे सुशिक्षित, शीलवती, पतिपरायणा व स्वार्थत्यागी अशा असतात– तो समाज सुधारलेला म्हणावयाचा. यांत कांही मतभेद असण्याचें कारण नाही, असें वाटतें; कारण नुसता पुरुषवर्गच तेवढा सुशिक्षित असला, म्हणजे तो समाज सुधारलेला आहे, असें म्हणतां येत नाही, तर समाजाचा अत्यंत महत्त्वाचा अर्धा भाग असा जो स्त्रीवर्ग तोही सुशिक्षित असावयास पाहिजे. तरच त्या समाजाला 'सुधारलेला' असें म्हणतां येईल. या नियमानुसार आपण आता वानरी स्त्रिया व राक्षसी स्त्रिया यांचेविषयी विचार करूं. पैकी प्रथम वानरी स्त्री तारा ही विचारास्तव घेऊं; मग राक्षसी स्त्रियांसंबंधी विचार करूं.

वाली जेव्हा रामाचा बाण उरीं लागून भूमीवर पडला, तेव्हा सुग्रीव, अंगद, तारा व इतरही हनुमानप्रभृति वानरमंत्रिमंडळी त्याचेभोवती गोळा झाली. त्या समयीं राज्य स्वाधीन केल्याची खूण म्हणून, आपल्या गळ्यांतील काञ्चनी–माला सुग्रीवाच्या गळ्यांत घालून पुढे राज्यतंत्र निर्विघ्नपणें कसें चालवावें, याविषयी सुग्रीवास निरवानिरव करतांना, तेथे बसलेल्या तारेकडे बोट दाखवून वाली सुग्रीवास म्हणतो– ( कि. २३।१३–१५ )

**सुषेणदुहिता चैषा अर्थसूक्ष्मविनिर्णये ।**
**औत्पातिके च विविधे सर्वतः परिनिष्ठिता ॥**
**यत् एषा साध्विति ब्रूयात् कर्तव्यं मुक्तसंशयम् ।**
**नहि तारामतं किंचित् अन्यथा परिवर्तते ॥**

ही सुषेण वानराची कन्या तारा समोर बसली आहे, ती तूं पाहतो आहेस ना ? ही अत्यंत सूक्ष्म व गुंतागुंतीच्या अशा राजकीय प्रश्नांचा निर्णय करण्यांत व अनेक प्रकारचीं कुलंगडीं ज्यांत उत्पन्न होतात, अशीं राजकारणें निकालास लावण्यांत सर्व प्रकारें निष्णात आहे, हें तूं जाणतोच आहेस. ही ज्या प्रकरणांत आपलें अनुकूल मत देईल, तें कार्य निःशंकपणें करीत जा; कारण तारेने दिलेलें

मत कधीही अन्यथा होत नाही. ( या वेळींही मी तिच्या मताप्रमाणे वागलों असतों, तर हा असा प्रसंग मजवर आलाच नसता. )

त्यास, अशा प्रकारच्या म्हणजे– 'राजसभेच्या, अत्यन्त विश्वासपात्र ( most reliable ) अशा मुख्य मंत्री ( Member of the Royal Council) होण्याइतक्या सुशिक्षित स्त्रिया ज्या वानरसमाजांत उत्पन्न होऊन गेल्या, तो वानरसमाज " बार्बेरियन " असणें शक्य आहे काय ? यावरून स्त्रीशिक्षणाचे बाबतींत वानरसमाज किती पुढे गेला होता व वर्तमानकालीन स्त्रियांपेक्षा वानर–समाजांतील स्त्रियांना कोणत्या प्रकारचें व किती उच्च प्रतीचें शिक्षण दिलें जात होतें, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

आता तारेच्या पतिपरायणतेचें व स्वार्थपराङ्मुखतेचें उदाहरण पहा– रामाचा बाण मर्मीं लागून वाली भूमीवर पडला व तत्पक्षीय वानरांमध्ये पळापळीस आरंभ झाला. तारेच्या कानांवर ही दुःखदायक वार्ता पोहोचतांच ती धावतच रणक्षेत्रावर जेथे वाली पडला होता, तेथे आली. त्या समयीं तिच्या मंत्र्यांनी तिला बहुत प्रकारें विनवून सांगितलें की, "आपण परत फिरा व आधी अंगदाचें रक्षण करा; आपलें येथे असणें इष्ट नाही. लवकरच किष्किन्धेवर हल्ला येण्याचा संभव आहे. यास्तव एकदम कोटाचे दरवाजे बंद करा व सर्व बाजूंस शूर वानर-वीर नेमून, किष्किन्धेचा पक्का बंदोबस्त करा. अंगदाला सत्वर राज्याभिषेक करा. अंगद एकदा सिंहासनारूढ झाला की, सर्व वानर त्याच्या पक्षास येऊन मिळतील. आम्ही सर्व आपणांस अनुकूल आहोंत." त्यावर तारा उत्तर देत आहे की—

**पुत्रेण मम किं कार्यं राज्येनापि किमात्मना ।**
**कपिसिंहे महाभागे तस्मिन् भर्तरि नश्यति ॥** (कि० १९।१८)
**पादमूलं गमिष्यामि तस्यैवाहं महात्मनः ।**
**योऽसौ रामप्रयुक्तेन शरेण विनिपातितः ॥** ( कि० १९।१९ )

'अहो, तो महाभाग कपिश्रेष्ठ माझा भर्ता नष्ट झाला, माझें सौभाग्य नष्ट झालें, आता मला पुत्राशीं काय करावयाचें आहे, राज्याशींही काय करावयाचें आहे व जगून तरी काय करावयाचें आहे? मी तर आता हा जो रामाच्या बाणानें रणांत पतन पावला आहे, त्या याच महात्म्याच्या चरणावर शरीर समर्पण करीन.' असें

म्हणून धावत जाऊन वालीच्या शरिरावर आपलें अंग टाकून ती अत्यन्त शोक करूं लागली. तेव्हा मारुति पुढे आला व बहुत प्रकारें समजावून व समाधानाच्या गोष्टी सांगून म्हणाला की, " व्हावयाचें तें होऊन गेलें; आता शोक करून काय होणार ? यास्तव शोक आवरा व पुढील व्यवस्था करण्याविषयी अनुज्ञा द्या. आपला पुत्र अंगद यांसहवर्तमान हे सर्व वानरवीर व हें सारें वानरांचें राष्ट्र सर्वस्वीं आपल्याच अधीन आहे. आपले देखरेखीखाली, आपले आज्ञेनुसार अंगद राज्यशकट चालवील व आम्ही सर्व आपल्या आज्ञेचें शिरसा पालन करूं. पुत्राला सिंहासनावर अधिष्ठित झालेला पाहून, आपले डोळे निवतील व सर्व दुःखाचा व शोकाचा विसर पडेल. " मारुतीचें असें भाषण श्रवण करून, तारा त्याला उत्तर देत आहे, तें प्रत्येक आर्यगृहिणीने आपल्या हृदयांत अत्यन्त आस्थापूर्वक साठवून ठेवण्यासारखें आहे. ती म्हणाली, " अरे—

**अङ्गदप्रतिरूपाणां पुत्राणां एकतः शतम् ।**
**हतस्याप्यस्य वीरस्य गात्रसंश्लेषणं वरम् ॥** (किष्किंधा. २१।१३)
**पतिहीना तु या नारी कामं भवतु पुत्रिणी ।**
**धनधान्यसमृद्धापि विधवेत्युच्यते बुधैः ॥**

( किष्किंधा. २३।१२-१३ )

अङ्गदासारख्या शंभर ऐश्वर्यवान् पुत्रांच्या ऐश्वर्योपभोगाच्या सुखापेक्षा मृत अशादेखील या वीराबरोबर सहगमन करणें अधिक श्रेयस्कर आहे. पुत्राचें ऐश्वर्य, राजमातृत्वाचा मान व साऱ्या राष्ट्रावर सत्ता इत्यादि गोष्टींचें जें तूं मला प्रलोभन दाखवितोस, त्यास ऐक की, जी स्त्री एकदा पतिहीन झाली, तिला कितीही पुत्र असले व धन, धान्य, जागा, पागा इत्यादिकांनी कितीही समृद्धी असली, तथापि लौकिकांत तर ती विधवाच म्हटली जाईल ना ? तिला कोणीही सौभाग्यवती म्हणणार नाही. केवढी ही पतिनिष्ठा व तिच्या पायीं केवढा हा स्वार्थत्याग !!

राजमातृत्वाचा मान, साऱ्या वानरराष्ट्रावर सत्ता, सर्व मंत्रिमण्डळाचें आनुकूल्य व राजैश्वर्यजन्य सर्व सुखोपभोग, हीं सर्व पायीं चालून आलीं असतां, यांपैकी एकाच्याही मोहांत न पडतां, सर्वांस तुच्छ लेखून व जीवितही तृणप्राय मानून जी साध्वी आपल्या मृत पतीच्या चितेवर सहगमन करण्यास सिद्ध झाली; तिच्या

स्वार्थत्यागाची, स्वसुखपराङ्मुखतेची, धैर्याची व पतिप्रेमाची प्रशंसा करावी, तेवढी थोडीच होईल.

अशा स्वार्थत्यागी, स्वसुखपराङ्मुख, पतिपरायण व मुख्य राजसभेंतील मंत्रिमंडळांतही श्रेष्ठता मिळविण्याइतक्या तारेसारख्या सुशिक्षित स्त्रिया ज्या वानरसमाजांत जन्माला येतात, तो वानरसमाज जर बार्बेरियन् ( रानटी) म्हणवयाचा, तर पहिल्या नवऱ्यापाशी आपल्या मनाप्रमाणे चैन भोगावयास मिळत नाही, म्हणून त्याला सोडून, त्यापेक्षा श्रीमंत असा दुसरा नवरा करावयाचा व त्यापेक्षाहि अधिक चैन ज्याचेपाशी चालेल किंवा इतर कांही स्वार्थ साधत असेल, तर त्या दुसऱ्या नवऱ्यालाही लत्ताप्रहर करून तिसरा एखादा लक्ष्मीपुत्र किंवा राजपुत्र असा नवरा करावयाचा, अशा केवळ विषयसुखलोलुप स्वार्थसुखैकपरायण महामाया स्त्रिया ज्या समाजांत उजळ माथ्याने वावरू शकतात, तो युरोपियन समाज सुधारलेला म्हणावयाचा काय ? व अशा स्त्रियांना सुशिक्षित म्हणतां येईल काय ?

आता राक्षससमाजांतील स्त्रियांच्या सुशिक्षितपणासंबंधांत विचार करूं—पैकी प्रातःस्मरणीय अशी रावणपत्नी मन्दोदरी तर सर्वांना माहीत आहेच; पण कुंभीनसी या राक्षसी स्त्रीचें नांवही कोणास क्वचितच ठाऊक असेल. कुंभीनसी ही रावणाची धाकटी मावसबहीण. ही रावणाची फार लाडकी होती. एकदा रावण नित्यक्रमानुसार दिग्विजयार्थ गेला असतां मागे मथुरेचा राजा मधुदैत्य याने तिला पळविली व तिच्याशीं विवाह लावून घेतला. पुढे कांही दिवसांनी रावण मोहिमेवरून परत आला, तेव्हा नित्याप्रमाणे कुंभीनसी त्याला कोठे दिसली नाही. शोध करतां बिभीषणाचे सांगण्यावरून कळलें की, कुंभीनसीला मधुदैत्याने हरण करून नेलें. तें ऐकून रावणास अत्यंत क्रोध आला व लागलीच मधुदैत्यास शिक्षा करण्यासाठी त्याच्या राजधानीवर चालून जाण्याची आज्ञा आपल्या सैन्यास दिली व पुष्पकविमान तिकडे फिरविलें.

मधुदैत्याच्या राजधानीपाशी रावणाचें विमान पोहोचलें, त्या वेळीं मधुदैत्य भोजनोत्तर वामकुक्षी करीत झोपलेला होता व कुंभीनसी त्याचेपाशी पादसेवा करीत बसली होती. तिने त्या रावणाच्या विमानाचा शब्द ओळखला व आपल्यास

पळवून आणल्याबद्दल आपले बंधुराज आपल्या पतीस शिक्षा करण्यासाठी चालून येत आहेत, हें ताडलें. तिने आपल्या पतीला मुळीच जागें केलें नाही; कराण त्याला जागें केलें असतें, तर तोही वीर पुरुष व रावणही वीर पुरुष. उभयतांचें युद्ध जुंपलें असतें व शूर्पणखेची स्थिति झाली, तीच आपलीही होईल, या विचाराने त्या दूरदर्शी मुलीने त्याला जागें केलें नाही. तसाच झोपलेला ठेवून आपणच एकदम खाली गेली व आपल्या वाड्याच्या महाद्वारांत आपल्या बंधूचें स्वागत करण्यास्तव उभी राहिली.

इतक्यांत रावणाचें विमानही तेथे येऊन धडकलेंच, तों रावणाला कुंभीनसी आपलें स्वागत करण्यास्तव उभी असलेली समोर दिसलीच. आपली अत्यन्त लाडकी बहिण आपलें स्वागत करण्यासाठी येऊन उभी असलेली समोर दिसतांच, भगिनीच्या प्रेमामुळे रावणाचा क्रोध तत्काल शान्त झाला व विमानांतून खाली उतरून मोठ्या उत्सुकतेने बहिणीकडे धावतच आला. तिने तत्काल आपल्या वडील बंधूच्या चरणांवर मस्तक ठेविलें. त्याबरोबर अर्थातच– " अष्टपुत्रा सौभाग्यती भव "– असे शब्द रावणाचे मुखांतून सहजच बाहेर पडले व काय इच्छा असेल, तें माग, असें तो तिला म्हणाला. त्यावर तिने रावणापाशी काय मागितलें असावें, अशी आपली कल्पना आहे बरें ? काय इन्द्राचें ऐश्वर्य, कीं कुबेराची संपत्ति, कीं वरुणाचा अक्षय्य निधि ? यांपैकी कांही जरी तिने मागितलें असतें, तरी तिला तें ओवाळणींत घालण्यास रावण समर्थ होता; पण तिने भावापाशी असलें कांहीदेखील मागितलें नाही. असल्या कोणत्याही लोभांत न पडतां, ती अत्यन्त काकुळतीस येऊन रावणास म्हणते–

**भर्तारं न ममेहाद्य हन्तुं अर्हसि मानद ।**
**नहीदृशं भयं किंचित् कुलस्त्रीणां इहोच्यते ॥**
**भयानामपि सर्वेषां वैधव्यं व्यसनं महत् ।**
**सत्यवाक् भव राजेन्द्र मां अवेक्षस्व याचतीम् ॥**

( उत्तर० २५ । ४२—४३ )

ती म्हणाली, "दादा– मी मागेन तें देशील ना ? आपलें वचन पाळशील ना ? तर हें दे. ऐक– माझ्या पतीचा तूं वध करूं नकोस. आम्हां कुलस्त्रियांना या

संसारामध्ये वैधव्यासारखें दुसरें भयच नाही. सर्व भयापेक्षाही अत्यन्त मोठें संकट म्हणजे वैधव्य, हेंच होय. यास्तव, दादा, माझ्याकडे पहा, येवढी सौभाग्य-भिक्षा मला घाल व तूं आपलें वचन सत्य कर. " झालें. रावणानें दिलें व तिनें आपला पति मधुदैत्य यास जागें करून बोलावून आणलें व त्यांचें रावणाशीं सख्य करून दिलें.

आता तेथे विचार करण्याची गोष्ट ही आहे की, रावण हा मधुदैत्यास शिक्षा करण्याचे हेतूनें त्यावर चालून आला होता व त्याचा रावणानें वध जरी केला असता, तरी कुंभीनसीचें त्यांत काय वाईट होणार होतें बरें? तिनें तोण्डांतून शब्द काढावयाचाच उशीर होता की, तिला इन्द्राचें ऐश्वर्य अथवा कुबेराची संपत्ति रावणाकडून तत्काल प्राप्त होणें शक्य होतें. असें असतां तिनें भावापाशी पतीच्याच प्राणाची भिक्षा मागितली. म्हणजे एकीकडे इन्द्राचें ऐश्वर्य व कुबेराची संपत्ति आणि एकीकडे पतीचे प्राण या दोहोंपैकी एक कोणतेंतरी तिच्या पुढे होतें. पैकी, एवढ्या मोठ्या राजैश्वर्यावर व अलोट संपत्तीवर लाथ मारून, केवळ पतीच्या प्राणांचीच तिनें भावापाशी भिक्षा मागितली, यावरून तिचें पतिप्रेम केवढें निःस्वार्थी, केवढें पवित्र व केवढ्या उच्च प्रतीचें होतें बरें?

केवळ पतिप्रेमास्तव, पतीचे प्राण वाचावेत म्हणून, एवढ्या मोठ्या राजैश्वर्यावर व अगाध संपत्तीवर लाथ मारण्याइतक्या स्वार्थत्यागी स्त्रिया ज्या राक्षससमाजांत जन्मास येतात, तो राक्षससमाज जर (बार्बेरियन) रानटी म्हणावयाचा, तर घटस्फोट केला असतां, त्या नवऱ्याच्या संपत्तीचा तिसरा भाग मिळतो, एवढ्या अति क्षुद्र प्रतीच्या द्रव्यलोभास्तव, पांच वर्षांत एक वेळ नव्हे, दोन वेळ नव्हे, तर सतरा वेळ घटस्फोट करून, अठराव्या वेळेस पुनः परवानगी मिळावी, म्हणून प्रेसिडेन्टकडे अर्ज दाखल करणाऱ्या—म्हणजे कायदेशीर रीतीनें घटस्फोटाचा धन्दा करणाऱ्या—स्त्रिया ज्या समाजांत उजळ माथ्यानें वावरूं शकतात, तो युरोपियन समाज सुधारलेला म्हणावयाचा काय?

या एकंदर विवेचनावरून ध्यानीं येईल की, वानरी स्त्रिया व राक्षसी स्त्रिया-देखील उत्तम प्रकारें सुशिक्षित व सुसंस्कृत होत्या. तात्पर्य, राक्षस व वानर "रानटी" नव्हते; किंबहुना वर्तमानकालीन सुधारणाशिखरस्थ पाश्चात्यांपेक्षा कांही

बाबतींत ते बरेच पुढे गेलेले होते. अर्थात्, " राक्षस व वानर हे बार्बेरियन म्हणजे रानटी होते "— हें पाश्चात्य विद्वानांचें विधान वस्तुस्थितीला धरून नाही, अगदी मिथ्या आहे.

# (४) राक्षस हेहि मनुष्यच होते.

राक्षसांची मनुष्यत्वसिद्धि करावयाची, तर ती करावयासाठी आपणांस उत्तर-काण्डाचा आश्रय करावयास पाहिजे; पण, " उत्तरकाण्ड " हें बिचारें मोठें दुर्दैवी काण्ड आहे; कारण या काण्डांत—सीतात्याग, लक्ष्मणाचा त्याग, श्रीरामाचें निजधामाला गमन, सीतेचा भूमिप्रवेश, इत्यादि गोष्टी असल्याकारणाने जुने शिक्षक याला अशुभ मानतात व याचेकडे दुर्लक्ष्य करितात; तर नवे शिक्षक " हें वाल्मीकिचें नाही, प्रक्षिप्त आहे " असें मानतात व याचेकडे दुर्लक्ष्य करतात. एवंच, उभयपक्षीयही विद्वान् लोक या उत्तरकांडाकडे " उपेक्षाबुद्धीने " पाहतात; पण या त्यांच्या उपेक्षाबुद्धीमुळे रामायणांतील बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टींचा उलगडा व्हावयाचा तो होत नाही आणि विनाकारण वाद मात्र वाढत जातो. माझ्या अल्पबुद्ध्यनुसार " उत्तरकाण्ड " हें " प्रक्षिप्त " नसून, " पुरवणी " आहे व रामायणांतील बऱ्याच संदिग्ध गोष्टींचा उलगडा होण्यास "उत्तरकांडा" चा अभ्यास अत्यन्त आवश्यक आहे.

वास्तविक पाहतां या पूर्वीच्या निबन्धांतून वानरासारखीच राक्षसांचीही संस्कृति अत्युच्च प्रतीची होती व राक्षसही वैदिक धर्मी होते, हें सिद्ध केलें गेलें आहेच आणि ज्या अर्थी, संस्कृति व आर्यत्व हें मनुष्यावरच अधिष्ठित आहे, त्या अर्थी वानरांसारखेच राक्षस हेही मनुष्यच असल्याचें सिद्ध झालें आहेच. तथापि जुन्या शिक्षकांची खात्री पटण्यासाठीच या संबंधांत थोडें विस्तारपूर्वक विवेचन करणें आवश्यक आहे, म्हणून करीत आहोंत.

## राक्षसांची मनुष्यत्वसिद्धि.

राक्षसांची मनुष्यत्वसिद्धि करावयाची म्हणजे प्रथम उत्पत्तीपासून विचार करावयास पाहिजे. राक्षसांच्या उत्पत्तीसंबंधांत उत्तरकाण्डांत असा उल्लेख आहे—

प्रजापतिः पुरा सृष्ट्वा आपः सलिलसंभवः ।
तासां गोपायने सत्वान् असृजत् पद्मसंभवः ॥९॥
ते सत्वाः सत्वकर्तारं विनीतवदुपस्थिताः ।
किं कुर्म इति भाषन्तः क्षुत्पिपासाभयार्दिताः ॥१०॥
प्रजापतिस्तु तान् सर्वान् प्रत्याह प्रहसन् इव ।
आभाष्य वाचा यत्नेन 'रक्षध्वम्' इति 'मानवा' ॥११॥
'रक्षाम' इति तत्रान्यैः 'यक्ष्याम' इति चापरैः ।
भुंक्षिताभुंक्षितैरुक्तं ततस्तान् आह भूतकृत् ॥१२॥
'रक्षाम' इति यैरुक्तं 'राक्षसाः' ते भवन्तु वः ।
'यक्षाम' इति यैरुक्तं 'यक्षा' एव भवन्तु वः ॥१३॥
( उत्तरकांड सर्ग ४ )

याचा भावार्थ– प्रजापतीने प्रथम पाणी उत्पन्न केलें व त्याच्या रक्षणार्थ प्राणी उत्पन्न केले. ते प्राणी क्षुधा व तृषा यांनीं व्याकुल होत्साते प्रजापतीच्या सान्निध प्राप्त झाले आणि 'आम्ही काय करावें, याची आज्ञा व्हावी,' म्हणून अत्यंत विनयाने म्हणूं लागले. तेव्हा प्रजापतीने स्मित करीत त्यांस म्हटलें– 'हे मानवाः रक्षध्वम्' म्हणजे, 'हे मानव हो, रक्षण करा.' तेव्हा त्यांपैकी कांहींनी 'आम्ही रक्षण करूं. ( आम्हांस पोटाला घाला )' असें म्हटलें. कांहींनी 'यक्षामः' म्हणजे 'आम्ही तर देवा, तुझें यजन करूं. ( तुझी निष्काम भक्ति करूं. तूं पोटास दे अथवा नको देऊस )' असें म्हटलें. तें श्रवण करून प्रजापति म्हणाले– 'यक्षाम' म्हणजे 'यजन करूं,' असें ज्यांनी म्हटलें, ते तुम्ही '**यक्ष**' या नांवाने प्रसिद्ध व्हाल, आणि 'रक्षामः' म्हणजे 'रक्षण करूं' असें ज्यांनी कबूल केलें, ते तुम्ही '**राक्षस**' या नांवाने प्रसिद्ध व्हाल.

या श्लोकांमधील प्रजापतीचा '**रक्षध्वं इति मानवाः**' या वाक्यांतील '**मानवाः**' या पदावरून काय सिद्ध होतें ? की, प्रजापतीने जलाच्या रक्षणासाठी जे प्राणी उत्पन्न केले, ते 'मानव' म्हणजे 'मनुष्य' होते व त्यांस 'रक्षण करा,' म्हणून आज्ञा केली. त्यांपैकी, ज्या मानवांनी रक्षण करण्याची कामगिरी पत्करली ते 'मानव' 'राक्षस' या नांवाने प्रसिद्ध झाले आणि

ज्या मानवांनी केवळ यजन करण्याचेंच पत्करलें, ते ' मानव ' ' यक्ष ' या नांवानें प्रसिद्ध झाले. अर्थात् ' राक्षस ' हे मनुष्येतर विजातीय प्राणी नसून ' मनुष्यच ' आहेत, हेंच सिद्ध होत आहे. म्हणजे ' रक्षण करणारा ' असा राक्षस शब्दाचा अर्थ आहे. यांत अर्थात् कोणतेही प्रकारें वाईटपणाचा भाव मुळीच नाही. मोबदला घेऊन का होईना, रक्षण करण्याचें कार्य करणें, हें कांहीं वाईट काम नव्हे.

भगवान् श्रीकृष्णदेखील आपल्या गीतेमध्ये– '**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च** ' अशी दोनच प्रकारची सृष्टि सांगत आहेत. एक ' दैवी ' आणि दुसरी ' आसुरी. ' दैवी संपत्तीने युक्त जे जन ते ' देव ' आणि आसुरी संपत्तीने युक्त जे जन ते ' असुर. ' महर्षि वाल्मीकि हे यांनाच ' यक्ष ' व ' राक्षस ' म्हणत आहेत. एवंच ' देव ' म्हणजेच ' यक्ष ' आणि ' असुर ' म्हणजेच ' राक्षस. ' हे सर्व ' मनुष्यच ' आहेत. या संबंधांत विशेष विवेचन पुढे केलें जाईल.

## राक्षसांची कुलपरंपरा व त्यांच्या सोयरिकी.

या राक्षसकुलामध्ये हेति व प्रहेति नांवाचे दोघे बन्धु–मधुकैटभासमान पराक्रमी व शत्रूंचा नाश करणारे असे त्या राक्षसांचे अधिपति झाले. त्यांपैकीं प्रहेति हा मोठा धार्मिक होता. तो तप करण्यासाठी तपोवनांत निघून गेला. हेति याने दारपरिग्रह ( विवाह ) करण्यासाठी मोठा प्रयत्न केला आणि यमधर्माची बहीण ' भया ' नांवाची ' सूर्यकन्या ' होती, तिला स्वतःच मागणी घालून तिच्याशीं विवाह केला. तिच्यापासून त्याला विद्युत्केश या नांवाचा पुत्र झाला. त्या विद्युत्केशाने सन्ध्या नांवाच्या राक्षसीची कन्या सालकटंकटा नांवाची होती, तिच्याशीं विवाह केला. त्या सालकटंकटेपासून विद्युत्केशाला सुकेश नांवाचा पुत्र झाला. या सुकेशाला त्याची माता सालकटंकटा, तो जन्मल्याबरोबर मन्दराचलावर टाकून चालती झाली. त्याचें संगोपन स्वतः जगन्माता पार्वती हिने केलें. तो सुकेश मोठा धार्मिक निघाला. त्याने भगवान् शंकर यांस प्रसन्न करून घेऊन, त्यांची कृपा संपादन केली आणि त्यांजपासून त्याने मोठा वर प्राप्त करून घेतला.

हें पाहून त्या सुकेशाला ग्रामणी नांवाचा गंधर्वराज याने त्रैलोक्यामध्ये सुंदर अशी आपली देववती नांवाची कन्या विवाहविधीने दिली. या देववतीपासून सुकेशाला माली, सुमाली व माल्यवान् नांवाचे मोठे तपोबलवान्, ज्ञानी व पराक्रमी असे तीन पुत्र झाले. या तिघांनीही घोर तप करून, भगवान् ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन, त्याजपासून मोठे मोठे वर संपादन केले आणि लंकेमध्ये जाऊन वसाहत केली, व तेथे ते राज्य करूं लागले. त्या काळीं नर्मदा नांवाची एक गन्धर्वी होती. तिने आपल्या तिघीही कन्या– केतुमती, वसुदा व सुंदरी या नांवाच्या– क्रमाने त्या तिघांही बन्धूंस दिल्या. त्या तिन्ही गन्धर्वकन्यांपासून त्या तिघाही बन्धूंना पुष्कळ अपत्यें झालीं. पैकी सुमाली राक्षसापासून वसुदा गन्धर्वकन्येचे ठिकाणीं कैकसी नांवाची कन्या झाली. ही कैकसीच रावणाची जन्मदात्री माता. ही प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा नातू जो विश्रवा ब्रह्मर्षि त्यास दिली होती. या विश्रवा ब्रह्मर्षीपासूनच कैकसीचे पोटीं रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा, आणि बिभीषण हीं अपत्यें जन्मलीं; म्हणजे रावण हा प्रत्यक्ष भगवान् ब्रह्मदेवाचा पणतू आणि विश्रवा ब्रह्मर्षींचा पुत्र आहे. या रावणाला दैत्यराज मयासुर दैत्य याने आपली कन्या मन्दोदरी ही विवाहविधीने दिली. येणेप्रमाणे या राक्षसांची कुलपरंपरा आहे. आता यांच्या सोयरिकींसंबंधांत विचार करूं–

(१) या राक्षसांचे मूळ पुरुष हेति व प्रहेति हे दोघे बन्धु. पैकी धार्मिक प्रहेति तपोवनांत गेला व हेति राक्षस याने सूर्यपुत्र यमधर्म याची बहीण भया नांवाची होती, तिला स्वतः मागणी घातली; आणि यमधर्मानेही तो हेति राक्षस आपल्या बहिणीला ( देवकन्येला ) योग्य वर आहे, असें पाहून त्याला ती दिली. कन्या ज्या कुलांत द्यावयाची, तें कुल आपल्यापेक्षा उच्च, निदान बरोबरीचें तरी असावें लागतें. कोणीही आपली कन्या आपल्यापेक्षा हीन कुलांत देत नाही; आणि ज्या अर्थी यमधर्माने आपली बहीण हेति राक्षस याला दिली, त्या अर्थी हेति राक्षस याचें कुल यमधर्माच्या निदान बरोबरीचें तरी असलेंच पाहिजे.

यापुढेही विद्युत्केश या राक्षसाचा सालकटंकटा या राक्षसी कन्येशीं, सुकेश राक्षसाचा देववती या गन्धर्वकन्येशीं, सुमाली राक्षस याचा केतुमती या गन्धर्वकन्येशीं, कैकसी या राक्षसकन्येचा विश्रवा ब्रह्मर्षि या मनुष्याशीं व रावणाचा

मन्दोदरी या दैत्यकन्येशीं, कुंभकर्णाचा विरोचनाच्या मुलीची मुलगी म्हणजे दैत्यराज बली याची भाची– वृत्रज्वाला या दैत्यकन्येशीं आणि बिभीषणाचा विवाह गन्धर्वराज शैलूष याची कन्या सरमा हिच्याशीं झाला.

यावरून काय दिसतें की, राक्षसांचे शरीरसंबंध म्हणजे सोयरिकी–देव, दैत्य, गन्धर्व आणि मनुष्य यांच्याशीं झालेले आहेत; पण गन्धर्व, देव व दैत्य हे तपोबलाच्या योगानें उत्तरोत्तर श्रेष्ठत्व पावलेले मनुष्यच आहेत आणि ज्या अर्थी या राक्षसांच्या सोयरिकी या सर्वांमधून झालेल्या आहेत, त्या अर्थी हे राक्षस निःसंशय मनुष्यच असले पाहिजेत, मनुष्येतर असणें मुळींच शक्य नाहीं; कारण, मनुष्येतरांच्या सोयरिकी मनुष्याशीं होत नसतात.

(२) श्री प्रभु रामचन्द्राच्या फौजा किष्किन्धेहून निघून समुद्राच्या किनाऱ्यावर जाऊन पोहोंचल्या. आता युद्धाचा प्रसंग कांहीं टळत नाहीं, असें पाहून रावणानें आपलें मंत्रिमंडळ बोलाविलें आणि काय उपाय करावा ? असा प्रश्न त्या मंत्रि-मंडळापुढे ठेविला. त्या वेळीं वज्रदंष्ट्र नांवाचा सेनापति त्यास सांगत आहे की–

**कामरूपधराः शूराः सुभीमा भीमविक्रमाः ।**
**राक्षसाणां सहस्राणि राक्षसाधिप निश्चिताः ॥१३॥**
**काकुत्स्थं उपसंगम्य विवृतं मानुषं वपुः ।**
**सर्वे ह्यसंभ्रमा भूत्वा ब्रुवन्तु रघुसत्तमम् ॥१४॥**
**प्रेषिता भरतेनैव भ्रात्रा तव यवीयसा ।**
**स हि सेनां समुत्थाप्य क्षिप्रमेवोपयास्यति ॥१५॥**

( युद्धकाण्ड, सर्ग ८ )

म्हणजे, इच्छेस येईल तो वेष धारण करण्यांत कुशल, शूर, दिसण्यांत रुबाबदार व मोठे पराक्रमी असे कांहीं हजार राक्षस सैन्यांतून निवडून काढावेत व त्यांचें एक पृथक् सैन्य तयार करावें. त्या सैन्यानें बाह्यतः मनुष्यवेष (रामाच्या सैन्यासारखा गणवेश–Uniform ) धारण करून अगदी निर्भयपणें न घाबरतां रामापाशीं जाऊन त्यास सांगावें कीं, "आपले धाकटे बंधु भरत यांनी आम्हांस आपले साहाय्यार्थ आपणांकडे पाठविलें आहे आणि तेही स्वतः आणखी सैन्य बरोबर घेऊन पाठोपाठ येत आहेत." असें सांगून रामाच्या सैन्यांत मिसळावें.

या ठिकाणीं विचार करण्याची गोष्ट ही आहे की, एखादा मनुष्य वेष पालटून दुसऱ्या समाजांत गुप्तपणें मिसळूं शकेल; पण हजारो लेकांचें सैन्य, चालीरीति, भाषा, ती बोलण्याची पद्धति, उंची व अंगकाठी इत्यादि गोष्टींत पूर्ण साम्य असल्यावाचून परकीय समजांत– ( आणि त्यांतही आल्यागेल्या माणसासंबंधाने अगदी म्हणतात तसें– डोळ्यांत तेल घालून–अत्यंत सावधपणें जागणाऱ्या शत्रूच्या समाजांत )नुसता वेष पालटण्याने, अगदी न ओळखतां येण्याजोगें मिसळणें शक्य नाही. अर्थात् राक्षसांचें मनुष्याशीं सर्वांशीं अत्यंतिक साम्य होतें, म्हणजे ते मनुष्यच होते, हेंच सिद्ध होत आहे—

( ३ ) रावण जेव्हा भिक्षुरूप धारण करून सीतेला नेण्याकरिता तिच्या आश्रमांत गेला, त्या वेळीं तो ब्राह्मण–अतिथि आहे, असें वाटून, सीतेने त्याचा सत्कार केला. सीतेसारख्या विचक्षण स्त्रीला "तो मनुष्य नाही, राक्षस आहे," हें त्याने केवळ वेष पालटल्यामुळे ओळखतां आलें नाही. अर्थात् 'राक्षस व मनुष्य' यामध्ये कोणत्याही प्रकारें वैलक्षण्य मुळींच नव्हतें, हेंच सिद्ध होत आहे. म्हणजे राक्षस हे मनुष्यच होते.

( ४ ) युद्धाला आरंभ होण्यापूर्वी प्रभु रामचंद्रांनी, एक कायमचा हुकूम आपल्या सर्व सैन्यास देऊन ठेविला होता की–

## वानरांनी मनुष्यवेष घेऊं नये.

**न चैव मानुषं रूपं कार्यं कपिभिराहवे ।**
**एषा भवतु नः संज्ञा युद्धेऽस्मिन् वानरे बले ॥३३॥**
**वानरा एव वश्चिह्नं स्वजनेऽस्मिन् भविष्यति ।**
**वयं तु मानुषेणैव सप्त योत्स्यामहे परान् ॥३४॥**
**अहमेव सह भ्रात्रा लक्ष्मणेन महौजसा ।**
**आत्मना पञ्चमश्चाऽयं सखा मम बिभीषणः ॥३५॥**

( युद्धकाण्ड सर्ग ३७ )

याचा अर्थ असा की, " **या युद्धामध्ये वानरांनी मनुष्याचा वेष**

*

**मुळींच धारण करूं नये.** आपल्या सैन्यांतील सैनिक ओळखण्याची वानर हीच खूण असावी. यास्तव ऋक्ष, वानर व गोलांगूल या सर्वांनी वानरांचाच वेष धारण करावा. मी स्वतः, लक्ष्मण आणि आपल्या चार मंत्र्यांसह बिभीषण, असे आम्ही सातजण मात्र मनुष्यवेषानेच शत्रूशीं युद्ध करूं." असा हुकूम वानरसैन्यांमधून जारी करण्याचा हेतु हा होता की, मनुष्यवेष धारण केल्याने वानरसैनिक हा राक्षस-सैनिकासारखाच दिसता आणि मग स्वकीय कोण व परकीय कोण, हें ओळखतां आलें नसतें आणि अनेक घोटाळे झाले असते. यावरून ज्या अर्थी केवळ मनुष्याचा वेष धारण केल्याने वानर हा राक्षसा-सारखा दिसूं लागतो, त्या अर्थी राक्षस हा मनुष्यच आहे, हें सिद्ध होत आहे. पुनः बिभीषण व त्याचे चार राक्षमंत्रि हे मनुष्यवेष धारण करून मनुष्यांत मिसळूं शकतात व वानरही मनुष्यवेष धारण करून राक्षसांत मिसळूं शकतात; अर्थात् वानर व राक्षस हे मनुष्यच आहेत, हें निर्विवाद सिद्ध होत आहे.

हा श्रीरामाचा हुकूम युद्धाला आरंभ झाल्या दिवसापासून तें संपेपर्यन्तच कायम रहावयाचा होता. अशा प्रकारच्या हुकुमाला ( Standing order ) स्टँडिंग ऑर्डर म्हणतात.

( ५ ) मारुति सीतेच्या शोधार्थ लंकेस गेला असतां, रावणाच्या अंतःपुरांत त्याने ज्या स्त्रिया पाहिल्या, त्यांचें वर्णन महर्षींनें केलें आहे, तें सुंदरकाण्ड सर्ग ९, श्लोक ३३ ते सर्ग ११ श्लोक ३६ पर्यन्त मूल ग्रंथामध्ये महर्षींच्या शब्दांतच पाहणें योग्य आहे. तथापि वाचकांस थोडी कल्पना यावी, म्हणून कांही उदाहरणें येथे देत आहें.

**रावणाननशंकाश्च काश्चित् रावणयोषितः ।**
**मुखानीव सपत्नीनाम् उपाजिघ्रन् पुनः पुनः ॥५७॥**
**अन्यावक्षसि चान्यस्याः तस्याः काश्चित् पुनर्भुजम् ।**
**अपरास्त्वंकमन्यस्याः तस्याश्चाप्यपरा कुचौ ॥६०॥**
**ऊरु-पार्श्व--कटि--पृष्ठं अन्योन्यस्य समाश्रिताः ।**
**परस्परनिविष्टांग्यः मदस्नेहवशानुगाः ॥६१॥**

अन्योन्यभुजसूत्रेण स्त्रीमाला ग्रथिता हि सा ।
मालेव ग्रथिता सूत्रे शुशुभे मत्तषट्पदा ॥६३॥
उचितेष्वपि सुव्यक्तं न तासां योषितां तदा ।
विवेकं शक्यमाधातुं भूषणांगांबरस्रजाम् ॥६६॥
(सुन्दरकाण्ड सर्ग ९)

म्हणजे, त्या अंतःपुरांत देव, दैत्य, गन्धर्व, मनुष्य व राक्षस यांच्या कन्या एकमेकींना बिलगून सळमिसळ झोपल्या होत्या. झोपेमध्ये आपल्या सपत्नींचें मुख हें रावणाचेंच मुख आहे, असें वाटून, त्या एकमेकींच्या मुखांचा सुगन्ध पुनःपुनः घेत होत्या. इतकें रावणाविषयी त्यांना पराकाष्ठेचें प्रेम वाटत होतें. आपसांतही त्यांचें इतकें उत्कट प्रेम होतें की, त्या सवतीमत्सर विसरून एकमेकींच्या उरावर, पोटावर, कुशीवर, कंबरेवर, पाठीवर, मांडीवर, निःशंकपणें पडून आनंदाने निद्रासुख अनुभवीत होत्या. एकमेकींच्या भुजांवरून उशीप्रमाणे डोकें टेकून झोपल्यामुळे, जणू काय त्या भुजरूपी सूत्राने, त्यांच्या मुखकमळांची माळच गुंफलेली आहे कीं काय, असें दिसत होतें. शेवटीं महर्षि म्हणतात की, त्या सर्व स्त्रियांचीं वस्त्रें, अलंकार, भूषणें त्यांच्या शरीरानुरूप अगदी पृथक् पृथक् असूनदेखील, त्या एकमेकींना बिलगून झोपल्यामुळे, कोणाचें कोणतें वस्त्र आहे व कोणाचे कोणते अलंकार आहेत आणि ते अलंकार घातलेले हस्तपादादिक अवयव कोणाचे कोणते आहेत, हें ओळखणें शक्यच नव्हतें. इतकें त्या राक्षसी स्त्रिया व मानुषी स्त्रिया यांच्या रूपामध्ये व शारीरिक आकृतीमध्ये आत्यंतिक साम्य होतें. प्रचलित समजुतीप्रमाणें राक्षसी स्त्री सात ताड उंच व मानुषी स्त्री तिच्यापुढे अगदी तान्ह्या पोरीएवढी, असा जर फरक असता, तर एकमेकींच्या मुखांचा सुगंध घेतांना, मानुषी स्त्री आपल्या शेजारच्या राक्षसी स्त्रीच्या श्वासाबरोबर तिच्या नाकपुडींतच शिरून गेली असती किंवा दूर फेकली गेली असती; तिच्या शरिराच्या एखाद्या अवयवाखाली सापडून दडपून किंवा चिरडूनदेखील गेली असती. त्याचप्रमाणे राक्षसी स्त्रीच्या उरापोटावर किंवा मांडीवर झोपावयासाठी मानुषी स्त्रीला शिडी लावूनच वर चढावें लागलें असतें. त्याचप्रमाणे मानुषी स्त्रीच्या भुजेवर डोकें ठेवून झोपणाऱ्या राक्षसी स्त्रीला उशासारखा तिच्या भुजेचा

आधार मिळण्याऐवजी ती मानुषी स्त्रीच त्या राक्षसी स्त्रीच्या कानांखाली झाकून जाऊन अदृश्य झाली असती, आणि मग ' अन्योन्यभुजसूत्रेण स्त्रीमाला ग्रथिता हि सा ' अथवा ' मुखानीव सपत्नीनां उपाजिघ्रन् पुनःपुनः ' असें वर्णन कवीला करतांच आलें नसतें. राक्षसी स्त्रीच्या करंगळींतल्या अंगठीचा मानुषी स्त्रीला कंबरपट्टा झाला असता, तर मानुषीचा कंबरपट्टा राक्षसी स्त्रीच्या करंगळींत एखाद्या वेळ्यासारखा घट्ट बसला असता; पण महर्षि तर सांगत आहेत कीं, ' ( न ) विवेकं शक्यं आधातुं भूषणांगांबरस्त्रजाम् '– म्हणजे त्या स्त्रियांच्या अवयवांमध्ये, अलंकारांमध्ये, वस्त्रांमध्ये, कोणाचें कोणतें, हें ओळखतां येणेंच शक्य नव्हतें. अर्थात् राक्षसी स्त्रिया मानुषी स्त्रियांपेक्षा मुळीच धिप्पाड नव्हत्या. मानुषी स्त्रियांसारख्याच अगदी होत्या. ही गोष्ट, पुढे मंदोदरी जेव्हा मारुतीच्या दृष्टीस पडली, त्या वेळच्या तिच्या वर्णनावरून सुतराम् सिद्ध होत आहे. संशयाला जागाच रहात नाही. तें वर्णन असें आहे–

तासां एकान्तविन्यस्ते शयानां शयने शुभे ।
ददर्श रूपसम्पन्नां अथ तां स हरिः स्त्रियम् ॥५०॥
मुक्तामणिसमायुक्तैर्भूषणैः सुविभूषिताम् ।
विभूषयन्तीमिव च स्वश्रिया भवनोत्तमम् ॥५१॥
गौरीं कनकवर्णाङ्गीं इष्टां अन्तःपुरेश्वरीम् ।
कपेर्मन्दोदरीं नाम शयानां चारुरूपिणीम् ॥५२॥
स तां दृष्ट्वा महाबाहुः भूषितां मारुतात्मजः ।
तर्कयामास सीतेति रूपयौवनसम्पदा ॥५३॥

( सुंदरकांड, सर्ग १० )

म्हणजे त्या अन्तःपुरामध्ये त्या स्त्रियांपासून अगदी एकीकडे एकांतांत ठेवलेल्या पलंगावर झोपलेली ती स्त्री मारुतीने अवलोकन केली. ती हिऱ्यामोत्यांच्या भूषणांनी विभूषित असून, आपल्या अंगकांतीने त्या अन्तःपुराला तिने शोभा आणिली होती. तिच्या शरिराची कांति सोन्यासारखी पिवळी होती. ती त्या अन्तःपुरांतील सर्व स्त्रियांची स्वामिनी व रावणाची अत्यंत आवडती स्त्री मन्दोदरी होती. तिला पाहिल्याबरोबर तिची अंगकाठी, तिचें रूप, तिचें यौवन,

तिच्या शरिराची कान्ति यांवरून " हीच सीता आहे, " असें त्यास वाटलें.

आता या ठिकाणीं विचार करण्याची गोष्ट ही आहे की, मारुतीला मन्दोदरी माहीत नव्हती व सीताही त्यानें पाहिली नव्हती, हें उघड आहे. दोघीपैकी एकीला जरी त्यानें पाहिली असती, तर त्याला हा भ्रम पडण्याचें कारणच नव्हतें. तथापि, राक्षसी स्त्रिया व मानुषी स्त्रिया तर मारुतीच्या चांगल्याच परिचयाच्या असल्या पाहिजेत. जर राक्षसी स्त्री मानुषी स्त्रीच्या मानानें म्हणतात, तशी " सात ताड उंच " व " धिप्पाड " असती, तर, " बुद्धिमतां वरिष्ठ मंत्रिश्रेष्ठ " मारुतीला असा भ्रम कसा बरें उत्पन्न झाला असता ? यावरून राक्षसी स्त्री मन्दोदरी व मानुषी स्त्री सीता यांमध्ये शरिराच्या बांध्यांत, वयांत, रंगांत, रूपांत, अवयवांत सर्व प्रकारें आत्यंतिक साम्य होतें. म्हणजे राक्षसी स्त्रिया व मानुषी स्त्रिया या अगदी एकमेकींसारख्याच होत्या. यत्किंचितही भेद नव्हता यावरून राक्षस हे मनुष्यच होते, हें सिद्ध होत आहे.

( ६ ) रावणाच्या अन्तःपुरांतील स्त्रियांसंबंधांत वाल्मीकि महर्षि म्हणत आहे की—

**राजर्षि-विप्र-दैत्यानां गन्धर्वाणां च योषितः ।**
**रक्षसां चाभवत् कन्याः तस्य कामवशंगताः ॥ ६८ ॥**
**युद्धकामेन ताः सर्वाः रावणेन हृताः स्त्रियः ।**
**समदा मदनेनैव मोहिताः काश्चिदागताः ॥ ६९ ॥**

( सुन्दरकाण्ड, सर्ग ९ )

म्हणजे, रावणाच्या अन्तःपुरामध्ये या ज्या स्त्रिया होत्या, त्या सर्व राजर्षि, विप्र, दैत्य, गन्धर्व अशा मोठमोठ्या कुलांतल्या अविवाहित कन्या होत्या. त्या रावणाच्या रूपावर मोहित होऊन, आपण होऊनच त्याच्या पाठीस लागून आल्या होत्या. म्हणजे, मोठमोठे राजर्षि, विप्र, दैत्य, गन्धर्व यांच्या कन्या त्याला पाहिल्याबरोबर कामवश होण्याइतका व त्यावर मोहित होऊन त्याच्या मागे लागून त्याच्या पाठोपाठ जाण्याइतका रावण सुंदर होता, हें स्पष्ट आहे. म्हणजे रावणादि राक्षस अक्राळविक्राळ व हिडीस होते, ही समजूत चुकीची आहे.

( ७ ) वैषयिक प्रेम हें प्राणिमात्रांत सजातीय व समान आकृतींच्याच

प्राण्यांमध्ये उत्पन्न होत असतें. विजातीय व विषम आकृतीच्या प्राण्यांमध्ये कधींही उत्पन्न होत नाही. उदाहरणार्थ घोडा व गाय, रेडा व शेळी, उंट व म्हैस यांच्यामध्ये वैषयिक प्रेम कधींही उत्पन्न होणार नाही. त्याचप्रमाणे, सहासाडे-सहा फूट उंचीचा पुरुष व दीड-दोन वर्षांची गुडध्याइतकी पोर किंवा मोठी बायको चार-दोन वर्षांचें मूल यांच्यामध्ये कधींही वैषयिक वासना उत्पन्न होत नाही. दोघेही सजातीय तद्वतच समान आकृतीचेही असावे लागतात. राक्षस जर अक्राळविक्राळ व अवाढव्य असे असते, तर त्यांच्या ठिकाणीं त्यांच्या अतिशय धिप्पाड शरिराच्या मानानें, त्यांच्यापुढे अगदीं कुकुल्या बाळाप्रमाणे दिसणाऱ्या मानुषी स्त्रियांसंबंधांत वैषयिक प्रेम उत्पन्न होणें कधींही शक्यच नव्हतें आणि त्या स्त्रियाही काममोहित होऊन अशा राक्षसांच्या पाठीस लागून जाणें शक्य नव्हतें. तात्पर्य, राक्षस हे आकृतीनें अवाढव्य, अक्राळविक्राळ व विजातीय नव्हते. तर सर्वांशीं मनुष्यासारखे म्हणजे मनुष्यच होते.

( ८ ) एखाद्या भयानक क्रूर वाघासमोर एखादी सुंदर स्त्री जर दैववशात् येऊन प्राप्त झाली, तर तो तिचा स्वीकार ' गोड घास ' म्हणून करील. भोगेच्छेने कधींही करणार नाही. राक्षसांनी जेवढ्या म्हणून मानुषी स्त्रिया पळवून नेल्या, त्या भक्षण करण्याच्या इच्छेनें पळवून नेल्या नसून, भोगेच्छेनेच पळवून नेल्याचे उल्लेख सर्वत्र आहेत; व ज्या अर्थीं ही इच्छा व तदनुरूप शरीरसंबंध सजातीयांमध्येच शक्य आहे, त्या अर्थीं राक्षस हे मनुष्य होते, हेंच सिद्ध होत आहे.

( ९ ) या राक्षसांसंबंधांत सर्व वृत्तान्त अगस्ति ऋषि व श्रीरामचन्द्र यांच्या संभाषणाचे प्रसंगानें रामायणांत आला आहे. राज्याभिषेकानंतर अभिनन्दनार्थ भेटीस आलेल्या ऋषिमंडलामध्ये श्रीराम बसले असतां, त्यांनी अगस्ति ऋषींस प्रश्न केला की, या रावणापेक्षा अधिक बलवान् व अधिक पराक्रमी असे पूर्वीं कोणी झालेंच नाही काय ? त्यावर अगस्ति ऋषींनी हा राक्षसांच्या उत्पत्तीचा इतिहास त्या सभेमध्ये श्रीरामाला कथन केला आणि म्हणाले की, " रामा—

**ये त्वया निहताः ते तु पौलस्त्या नाम राक्षसाः ।**
**सुमाली-माल्यवान्-माली ये च तेषां पुरःसराः ।**

**सर्वे एते महाभागा रावणात् बलवत्तराः ॥**

( उत्तरकांड, सर्ग८, श्लोक २४ )

म्हणजे, तूं जे हे राक्षस मारिलेस, ते पौलस्त्य कुलांतले होते आणि मी जे आताच तुला सुमाली प्रभृति राक्षस सांगितले, ते सालकटंकट–वंशांतले असून, ते सर्वही रावणापेक्षा अत्यंत बलवान् होते. ”

अगस्ति ऋषींच्या या भाषणावरून आणखीही इतर बऱ्याच कुलांमधून राक्षस झालेले आहेत, असें दिसतें. सामान्यतः दानव, दैत्य, राक्षस, असुर हे शब्द एकाच अर्थी उपयोगांत आणले जातात आणि ते मनुष्यजाति या दृष्टीने जरी एकच आहेत, भिन्न नाहीत, तथापि त्यांच्या माता भिन्न असल्याकारणाने मातृतः त्यांच्या नांवास व कुलांस भिन्नता प्राप्त झाली, ती अशी–दक्ष प्रजापतीने आपल्या तेरा कन्या कश्यपाला दिल्या. त्यांपैकी दनु, दिति आणि अदिति यांपासून क्रमाने दानव, दैत्य व आदित्य म्हणजे देव झाले. हे सर्व सापत्न बंधु असल्याकारणाने यांच्या या संज्ञा त्यांच्या त्यांच्या मातेच्या नांवावरून पडल्या व कालान्तराने त्यांसच भिन्न कुलाचें स्वरूप आलें.

उदाहरणार्थ, एकाच गृहस्थाला जर अनेक स्त्रिया असल्या, तर त्यांपासून होणाऱ्या त्या गृहस्थाच्या संततीला– ओळख पटण्यासाठी– “ हीं अमकीचीं मुलें व तीं तमकीचीं मुलें ” असेंच म्हणावें लागेल व व्यवहारही असाच आहे; म्हणून तेवढ्याने त्यांची जाति बदलत नाही. कालानुरूप जसजशा पिढ्या अधिक अधिक होत जातील, तसतसा त्यांच्यामधील भेद वाढत जाऊन संबंधही तुटून जातील, व त्यांचीं आपसामध्ये युद्धेंही होतील; पण जाति बदलणार नाही. अर्थात् दानव, दैत्य व आदित्य ( देव ) हे एकाच मनुष्यपित्याची ( कश्यपाची ) संतति असल्याकारणाने व त्यांच्या माताही दक्ष प्रजापतीच्या कन्या म्हणजे मानुषीच असल्याकारणाने त्या भिन्नभिन्न जरी असल्या, तरीदेखील त्यांची संतति असलेले दानव, दैत्य व आदित्य ( देव ) हे मनुष्यच आहेत, हें स्पष्ट आहे. आदित्याप्रमाणेच दानव, दैत्य हीं नांवें मातृतः असल्याकारणाने तिरस्करणीय असा अर्थ त्यांत मुळीच नाही.

( १० ) जसे दानव, दैत्य, आदित्य ( देव ) हे काश्यप म्हणजे कश्यपाच्या

कुलांतले आहेत, तसे रावणादिक राक्षस हे कश्यपाच्या कुलांतले नाहीत. यांचें कुल स्वतंत्र आहे व हे मनुष्य असल्याचें–आरंभींच त्यांची उत्पत्ति सांगितली आहे त्यावरूनच–सिद्ध आहे. या राक्षसांचा कश्यपकुलाशीं संबंध–हेतिराक्षस याचा काश्यप कुलोत्पन्न देवकन्या भया हिच्याशीं विवाह झाल्याकारणाने आला. हेतिराक्षस व देवकन्या भया यांचा पणतू सुमाली, याची कन्या कैकसी, ही ब्रह्मदेवाचा नातू पुलस्त्य–पुत्र विश्रवा ब्रह्मर्षि यास दिली व हिच्या उदरीं त्या विश्रवा ब्रह्मर्षीपासून रावणादिक संतति झाली. म्हणून रावणादिक राक्षस हे "पौलस्त्य" ( पुलस्तीच्या कुलांतले ) म्हटले जातात. हे काश्यप नाहीत. काश्यपाच्या संततीमध्ये दानव, दैत्य, आदित्य ( देव ) आहेत. राक्षस मुळीच नाहीत. राक्षस हा एक स्वतंत्र मानववंश आहे, त्याचप्रमाणे पौलस्त्य हाही एक स्वतंत्र मानववंश आहे. हें [ पुढील पृष्ठावर दिलेल्या ] नकाशावरून पूर्णपणें लक्ष्यांत येईल.

त्यावरून स्पष्टतया ध्यानीं येईल की, दानव, दैत्य व देव हे ब्रह्मदेवापासून तिसरा जो कश्यप प्रजापति त्याच्या कुलांतले आहेत. राक्षस हें मानवकुल स्वतंत्र आहे. कश्यपकुलापैकी नाही. पुलस्तीचें मानवकुल हेंही स्वतंत्र आहे; पण आहेत हीं सर्व मानवकुलेंच. अशीं मानवकुलें भिन्नभिन्न कालीं अनेक झालीं व पुढेही सृष्टीच्या अन्तापर्यंत होतच राहतील.

दुसरी आणखी एक विशेष लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट ही आहे की, रामाचें पितृकुल व रावणाचें मातृकुल हें एकच आहे. कश्यपपुत्र विवस्वान् ( सूर्य ) याचा पुत्र वैवस्वत 'मनु' याच्या वंशांत राम झाला आणि त्याच विवस्वानाची कन्या म्हणजे वैवस्वत् मनूची सख्खी बहीण 'भया' हिच्या वंशांत रावण झाला. म्हणजे पुत्राच्या वंशांतील राम व कन्येच्या वंशांतील रावण होय.

( ११ ) असुर हें कांही स्वतंत्र कुलाचें किंवा जातीचें नांव नव्हे. ही एक गुणबोधक सामान्य संज्ञा आहे. तथापि ही संज्ञा दानव, दैत्य व राक्षस यांस सामान्यतः लाविलेली आढळते. असुर म्हणजे केवळ ऐहिक सुखासाठी धडपड करणारे, आपल्याला एकट्यालाच सुख मिळालें म्हणजें झालें; मग तें मिळविण्यासाठी अखिल जगाचा कां नाश होईना! त्याची पर्वा नाही, अशा मनोवृत्तीचे, दांभिक,

## राम व रावण यांची कुलपरंपरा—



दुराभिमानी, फलप्राप्तीच्या इच्छेनेच कर्म करणारे, आपल्या ऐहिक हितासाठी दुसऱ्याचें बुद्धिपूर्वक अहित करणारें, ईश्वराचें अस्तित्व न मानणारे, मोक्ष न मानणारे कामोपभोग हीज काय ती जन्माची इतिकर्तव्यता आहे, असें मानणारे व तत्प्राप्त्यर्थ अन्यायाने अर्थसंग्रह करणारे इत्यादि, अशा मनोवृत्तीचे जे पुरुष तेच (असुर) होत. या संबंधांत विशेष स्पष्टीकरण श्रीमद्भगवद्गीतेंतील सोळाव्या अध्यायांत " दैवासुरसंपत्-विभाग " श्लोक ६ पासून १८ पर्यंत मुळांतूनच पाहणें योग्य होईल. विस्तारभयास्तव येथे देतां येत नाहीं व भगवद्गीता ही सर्वांच्या परिचयाची आहेच.

सारांश "असुर किंवा राक्षस पूर्वी होऊन गेले, आणि आता नाहीत," असें मानण्याची किंवा पृथ्वीवर इतर कोठे शोधावयास जाण्याची मुळीच आवश्यकता नाही. आपल्यामध्ये किंबहुना आपणच स्वतः- श्रीमद्भगवद्गीतोक्त ' दैवासुर-संपद्विभागानुसार '- हजारामध्ये ९९९ अंशांनी असुर किंवा राक्षसच आहोंत.

( १२ ) राक्षसांच्या नरमांसभक्षणासंबंधांत बराच गवगवा केला जातो व त्याप्रमाणे कांही राक्षस नरमांस भक्षण करीत असतीलही; पण हे रावणादिक राक्षस नरमांस भक्षण करीत असल्याचें निदान रामायणांत तरी कांही सबळ प्रमाण सापडत नाही. मारुतीने जेव्हा रावणाच्या अन्तःपुरांतील पान-भूमीमध्ये प्रवेश केला, तेव्हा तेथे अनेक प्रकारच्या मांसांचीं केलेलीं परोपरीचीं पक्वान्नें त्याने पाहिल्याचें महर्षींनी वर्णन केलें आहे; पण त्यांत नरमांसाच्या पक्वान्नाचें वर्णन मुळीच केलेलें दिसत नाही. त्याचप्रमाणे कुंभकर्णाला जागृत करण्यासाठी पाठविलेल्या राक्षसांबरोबर त्याच्यासाठी जे प्राणी आणि मांसें पाठविलीं, त्यांत मनुष्याचीं कोवळीं कोवळीं बाळें किंवा नरमांसाच्या पाट्या भरून पाठविल्याचा उल्लेख वाल्मीकीने केलेला आढळत नाही.

शूर्पणखेने राम, लक्ष्मण व सीता ही पंचवटींत असतांना त्याचें रक्त प्राशन करण्याची इच्छा खर राक्षसापाशी प्रकट केल्याचा जो उल्लेख आहे, त्यावरून फार तर शूर्पणखेला नररक्ताची गोडी लागली असेल, एवढेंच म्हणतां येईल; पण तेवढ्यावरून रावणाच्या कुटुंबांतील सर्वच राक्षस नररक्ताचें व नरमांसाचें भोजन करीत असत, असें म्हणतां येणार नाही; कारण असें म्हणणें म्हणजे

आजकालही एखाद्या श्रौताचारसंपन्न कुलांतील एखादे चिरंजीव विलायतेस जाऊन, तेथून एखादी मोठी परीक्षा पास करून आले, म्हणजे मग ते बालकुक्कुट भोजन करूं लागतात व एखाद्या सोकाजीच्या क्षुधाशान्तिगृहाचे कायमचे आश्रयदाते बनतात, म्हणून त्या कुटुंबांतील सर्वच बालकुक्कुट भोजन करतात, असें म्हणण्यासारखें होईल; किंवा एखाद्या जातींतील एखादें कुटुंब अभक्ष्य भक्षण करीत असलें म्हणजे सर्व जातची जात अभक्ष्य भक्षण करते, असें म्हणण्यासारखें होईल; पण तें सत्याचे कसोटीपुढे टिकावयाचें नाही.

आता रावणाने सीतेला—

**द्वाभ्यां तु ऊर्ध्वं मासाभ्यां भर्तारं माम् अनिच्छतीम् ।**
**मम त्वां प्रातराशाय सूदः छेत्स्यन्ति खण्डशः ॥**

(सुंदरकांड, सर्ग २२, श्लोक ९)

असें जें म्हटलें आहे तें— असा धाक दाखविल्याने तरी ती आपल्याला वश होईल, अशा कल्पनेने म्हटलें आहे. फार कशाला ? आपल्यापैकीच कोणी एखाद्यावर अत्यंत रागावला, तर "तुला मी कच्चा खाऊन टाकीन, तुझ्या नरडीचा घोट घेईन," असें म्हणतोच कीं नाही ? पण तशी क्रिया कधीही घडत नाही. तद्वतच सीतेला केवळ धाक दाखविण्यासाठी त्याने असें म्हटलें आहे.

मारीचाने रावणापुढे

**कदाचिदप्यहं वीर्यात् पर्यटन् पृथिवीमिमाम् ॥ १ ॥**
**व्यचरन्दण्डकारण्यं ऋषिमांसानि भक्षयन् ॥ २ ॥**

(अरण्यकांड, सर्ग ३८)

असें जें आपल्या स्वतःसंबंधाने म्हटलें आहे, त्याचा विचार करतां, तें रावणासंबंधांत प्रमाणभूत मानतां येत नाही; कारण मारीच हा पुलस्त्य ब्रह्मर्षींच्या कुलांतील खानदानी राक्षस नव्हता. शापाने राक्षस झालेला होता. तात्पर्य, रावणाच्या पितृकुलांत व मातृकुलांतही कोणी नरमांसभक्षक नाही. रावणाचें पितृकुल अत्यंत पवित्र अशा पुलस्त्य महर्षींचें आहे व मातृकुलही (ज्यांना देव व गन्धर्वांनी आपल्या मुली विवाहविधीने दिल्या अशा) महान् तपस्वी आणि धर्मनिष्ठ राक्षसांचें आहे. ते जर नरमांसभक्षक असते, तर देवांसारख्यांनी व

गन्धर्वांसारख्यांनी आपल्या मुली त्यांस स्वखुशीने दिल्याच नसत्या आणि विश्रव्यासारख्या ब्रह्मर्षीनेही अशा नरमांसभक्षक कुलांतली कन्या कैकसी हिचा स्वीकार केव्हाही केला नसता.

तात्पर्य, राक्षस म्हटला म्हणजे त्याच्या नांवाने आक्रोश करण्याची एक चालच पडून गेलेली आहे एवढेंच. विराध किंवा कबन्ध यांच्यासारख्या शापित राक्षसांचे दृष्टान्त येथे लागू होऊं शकत नाहीत; कारण यांच्यामागे नांव घेण्या-सारखी कोणतीही राक्षसांची कुलपरंपरा नाही. यांचीं उदाहरणें अपवादमात्र आहेत; त्यावरून कोणताही सिद्धान्त सिद्ध होऊं शकत नाही. हे पुलस्तिकुलोत्पन्न रावणादिक राक्षस नरमांसभक्षक नव्हते, एवढें मात्र सिद्ध आहे.

सारांश, ज्या अर्थी या राक्षसांचे आचार, विचार, धार्मिक संस्कार, व्यवहार, सामाजिक नीति, राजनीति, मनोवृत्ति व शरिराची आकृति इत्यादिकांचें मनुष्या-च्या या सर्व गुणांशीं पूर्णपणें साम्य आहे, त्या अर्थी राक्षस हे मनुष्याहून भिन्न असूं शकत नाहीत. म्हणजे राक्षस हे मनुष्यच आहेत, हें निर्विवाद सिद्ध होत आहे.

या साम्यतेसंबंधांत विस्तारपूर्वक विवेचन स्वतंत्र निबंधांत केलें जाईल.

येणेप्रमाणे " राक्षसांची मनुष्यत्वसिद्धि " सप्रमाण केली गेली आणि "राक्षस" या पदार्थाचाही निर्णय झाला.

या आतापर्यंतच्या विवेचनावरून ध्यानीं आलेंच असेल की, श्रीवाल्मीकि-रामायणांत वर्णिलेले " वानर व राक्षस " हे ' नवे शिक्षक ' म्हणजे पाश्चात्य युरोपियन विद्वान् व तत्सांप्रदायी आमचे देशी विद्वान् मानतात, तसे " रानटी व अनार्य " नव्हते, तर ते पूर्णपणें सुधारलेले होते व वैदिक धर्मी होते. त्याच-प्रमाणे आमचे ' जुने शिक्षक ' म्हणजे मोठे वेदान्ती विद्वान्, शास्त्री-पंडित, पुराणिक व कीर्तनकार हे सांगतात तसे वानर हे ' लांब शेपटांचीं माकडें-पशु ' नव्हते आणि राक्षसही " अक्राळ-विक्राळ, अवाढव्य, हिडीस असे कोणी विजातीय प्राणी " नव्हते, तर ते आमच्याचसारखे " मनुष्य " होते. एवढेंच नव्हे, तर " श्रौताचारसंपन्न विद्वान् वैदिक धर्मीच " होते.

येथवर " नर, वानर व राक्षस " यांचा निर्णय करून तो विद्वान् वाचकवृंदापुढे ' विचारपूर्वक परीक्षणार्थ ' ठेवला आहे.

या विवेचनावरून ' देव, आर्य, वानर व राक्षस ' हे सर्व मानववंशीय लोक होते, हें सहज समजण्यासारखें आहे. रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याचा जो कट राजा दशरथाच्या अश्वमेधयज्ञाच्या वेळच्या परिषदेंत ठरला, त्यांत देव, ऋषि व आर्यराजे होते. पुढील उलाढाली अनेक ऋषींनी करून आर्यराजकुमारांना उठवलें. यांत ऋषींची भूमिका पडद्यामागे राहून तरुणांकडून क्रान्ति घडवून आणण्याची दिसत आहे. विश्वामित्रानें रामलक्ष्मणांना जें शस्त्रास्त्रांचें शिक्षण दिल्याचें या बालकाण्डांत दिसत आहे, तें या तयारीचें सूचक आहे.

रामाला देवांचें प्रथम सहाय्य झालें नाही. हें अगदी स्वाभाविक आहे; पण रावणाचा पाडाव होत आहे, असें दिसतांच इन्द्रानें त्यास आपला रथ व सारथी पाठवून दिला, यावरून देवांनी प्रथम रावणाचा पाडाव होत आहे, हें ठरेपर्यंत सहाय्य कां केलें नाही व योग्य वेळीं कां केलें, तें सहज समजण्यासारखें आहे. ऋषींनी रामाला अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें देऊन व प्रत्यक्ष घनघोर युद्ध चाललें असतांहि तेथे समक्ष जाऊन सहाय्य केलेलें आहे. याप्रमाणे देव, आर्य, वानर व राक्षस या चार मानवजातींचा हा संघर्ष आहे, ही गोष्ट याप्रमाणे लक्ष्यांत येण्यासारखी आहे. या जातींचा हा संबंध इतिहासिक दृष्टीनें लक्ष्यपूर्वक पाहण्यासारखा आहे.

रामायणाचा इतिहासिक दृष्टीने विचार होण्यासाठी ही पार्श्वभूमि समजणें आवश्यक आहे, म्हणून ती येथे दाखवली आहें. याचा वाचकांनी अधिक विचार करावा.

## या महाकाव्याचें नांव 'रावणवध'

या महाकाव्याला ' **रामायण**× ' म्हणतात, हें खरें आहे; पण याचें मुख्य नांव '**दशशिरसो वधः**' (वा०रा०बा० २।४३) 'रावणाचा वध' हें आहे.

× '**रामायण**' ( राम—अयन ) म्हणजें '**रामाचें शत्रूवर चालून जाणें**' ( March of Rama )

**'रामचरित'** हें तर लोकप्रिय नांव आहेच; पण दशरथाच्या अश्वमेधाच्या वेळीं रावणवधाचा बेत देव व ऋषि यांनी ठरवला. त्याचें साम्राज्य उलथून पाडण्याचा घाट या सर्वांनी घातला, तेथून तों रावणवध प्रत्यक्ष घडून येईपर्यंत सर्वांचे एकाच दिशेने गुप्त अथवा उघड प्रयत्न चाललेले दिसतात. ती एकच दिशा म्हणजे **' रावणाचा निःपात करणें '** ही होय.

सीता रावणाने चोरून नेली नसती, तरीहि रामाला कोणत्यातरी दुसऱ्या निमित्ताने रावणावर स्वारी करणें भागच होतें; कारण राम व सीता यांचा जन्म होण्या पूर्वीच देव, आर्यराजे, आर्यपुढारी व ऋषि यांच्या मनांत हीच एक गोष्ट होती व हे सर्व ही घटना कशी घडवून आणावी, या विवंचनेंत होते. यावरून रावणवधाच्या दिशेने या सर्वांच्या गुप्त किंवा प्रकट हालचाली होत होत्या, असें दिसतें. त्या सार्वजनिक इच्छाप्रवाहाचें सारसर्वस्वच हें रामचरित्र आहे.

सीतेला पळवून रावणाने नेली, हें समजतांच अयोध्येमधून भरतानेही लंकेवर स्वारी करण्याची तयारी केली होती व त्यासाठी अयोध्येस तीनशे राजे भरताने सैन्यासह जमवले होते, यावरूनहि वरील गोष्टच उघड होती. ( उत्तर काण्ड, सर्ग ३७ ते ३९ )

रावणवधाचें राजकारण सार्वजनिक रीतीने प्रथम अयोध्येंत रामजन्मापूर्वी शिजलें, यामुळे या वेळच्या राजकारणांत अयोध्येचें महत्त्व निःसंशय अधिक आहे. अयोध्या हें या वेळीं फारच मोठें नगर होतें, असें दिसतें. पहा—

## अयोध्येची लोकसंख्या

दशरथ राज्य करीत असतां अयोध्येची जनसंख्या कित्येक लाख असावी, असें वाटतें. श्रीरामचन्द्राला आणण्यासाठी भरत चित्रकुटावर सैन्यासह गेला व रावणवधानंतर भरत रामाला सामोरा गेला. या दोनही वेळीं भरताने जें सैन्य आपल्याबरोबर नेलें होतें, तें ९ लक्षांहून अधिक होतें, हें पुढील श्लोकांवरून ध्यानीं येईल—

श्रीरामास परत आणण्यासाठी भरत अयोध्येहून चित्रकूटास गेला, त्या समयीं त्याच्याबरोबर गेलेल्या सैन्याची संख्यानिदर्शक पत्रक—




राक्षसांचें व वानरांचें राज्य

नवनागसहस्राणि कल्पितानि यथाविधि।
अन्वयुः भरतं यान्तं इक्ष्वाकुकुलनन्दनम् ॥ ३ ॥
षष्टी रथसहस्राणि धन्विनो विविधायुधाः।
अन्वयुर्भरतं यान्तं राजपुत्रं यशस्विनम् ॥ ४ ॥
शतं सहस्राण्यश्वानां समारूढानि राघवम्।
अन्वयुः भरतं यान्तं राजपुत्रं यशस्विनम् ॥ ५ ॥

(अयोध्याकांड, सर्ग ८३)

(१) हत्ती ९०००:– प्रत्येक हत्तीमागे २ योद्धे– १ माहुत– ५ साठमार– १ भंगी– १ भिस्ती. मिळून माणसें १० (एकून संख्या ९००००)

(२) रथ ६००००:– प्रत्येक रथामागे १ रथी– १ सारथी– १ पार्ष्णि-सारथी– २ चक्ररक्षक– २ पृष्ठरक्षक व ४ सहीस, मिळून माणसें ११. एकूण मनुष्यसंख्या ६६००००.

(३) घोडे १०००००:– प्रत्येक घोड्यामागे १ स्वार– १ सहीस मिळून माणसें २. एकूण संख्या २०००००.

एकूण सैन्यसंख्या ९५००००. यांत पायदळाची संख्या ग्रन्थांत दिली नाही. ती व अयोध्येंतील प्रजाजन यांची संख्या याशिवाय होय.

ही सर्व संख्या अर्थात् अंदाजी आहे. याशिवाय मागे अयोध्येच्या रक्षणासाठी रक्षक सैन्य (म्हणजे पुलिस फोर्स) पृथक् ठिकठिकाणीं ठेवलाच असला पाहिजे.

भरताबरोबर गेलेल्या सैन्याची छावणी चित्रकूटाच्या आसमंतात् दीड योजन भर पडली होती.

अध्यर्धं इक्ष्वाकुचमूः योजनं पर्यवस्थिता।
पार्श्वे न्यविशदावृत्य गजवाजिसमाकुला ॥

(अयोध्याकांड, सर्ग ९७, श्लोक ३०)

श्रीराम रावणवधोत्तर परत अयोध्येंत आला, तेव्हाची फक्त हत्तीची संख्या ९००० दिली आहे; पण या वेळींहि वरीलप्रमाणेच सर्व सैन्य असलें पाहिजे. याशिवाय–

तीनशे माण्डलिक राजे या वेळीं गोळा झाले होते. त्यांच्या सैन्याचीही भर पडलीच असली पाहिजे.

याशिवाय बरोबर नागरिक लोक होते, त्यांची गणना येथे केलेली नाही. नऊ दहा लाख सैनिक चित्रकूटावर जातात, यांची अयोध्येंत असणारीं बायकामुलें म्हातारे–कोतारे जमेंत धरले, तर या सैनिकांचा गोतावळाच वीस लाखांइतका तरी होईल व इतर नागरिक दहा लाख धरले तर सुमारें तीस लाख वस्तीचें तरी अयोध्यानगर असावें असें म्हणण्यास हरकत नाही.

राजधानीमध्ये जितकें सैन्य असेल त्याच्या कमींत कमी पांच सहापट तरी त्या नगरीची लोकसंख्या असणें स्वाभाविक आहे. अयोध्या ही राजधानी होती, ही केवळ सैन्याची छावणी नव्हती, हें लक्ष्यांत आणलें, म्हणजे ही जनसंख्या फारच मोठी असावी, असें म्हणावें लागतें.

रावणवधाचें राजकारण म्हणजे त्या वेळचें जागतिक राजकारण होय. याची योजना रामजन्माच्या पूर्वींच अयोध्येच्या अश्वमेधपरिषदेंत ठरली. असें जागतिक उलाढालींचें केंद्र बनण्याइतकें महत्त्व अयोध्येस या कालांत प्राप्त झालेलें होतें. हें व्यापार आदिकांचेंहि मोठें केन्द्र होतें. अयोध्येचें वर्णन या दृष्टीने लक्ष्यपूर्वक पाहण्यासारखें आहे. ‘**अयोध्या**’ ही शत्रूंना अभेद्य ( योद्धुं अशक्या Impregnable ) अशी नगरी होती व तटबंदी, तिच्या रक्षणाची योजना या सर्व दृष्टींनी ती तशीच होती. ( बा. कां. स. ५–७ पहा )

अयोध्येचा विस्तार पाहिला, म्हणजे एवढी मोठी लोकसंख्या तेथे राहूं शकेल असें वाटतें. १२ योजनें लांब व ३ योजनें रुंद अशी अयोध्यानगरी होती. अर्थात् ३० कोस लांब व ७॥ कोस रुंद किंवा निदान ३७॥ मैल लांब, सुमारें १० मैल रुंद होती. ( वा. रा. बा. ५।७ ) या नगरीमध्ये ५।५ व ७।७ मजली वाडे होते.

एवढ्या विस्तीर्ण नगरीमध्ये तीसचाळीस लक्ष माणसें राहणें शक्य आहे. हिमालय पर्वतासारखे उंच उंच प्रासाद ( वा. रा. बा. ७७।९ ) या नगरीमध्ये होते. हे वाडे सात मजली सहज असूं शकतील. हिंदी वास्तुशास्त्रांत दहा मजली घरांपर्यंत वर्णनें आढळून येतात. तशा तऱ्हेचे हे प्रासाद असावे.

तेव्हा या अयोध्येच्या विस्तारावरून या नगरीमध्ये इतके किंवा थोडे कमी-जास्ती लोक सामाऊं शकतील.

या नगरींतील लोक चांगल्या संपन्न स्थितींत होते. त्यांस कोणत्याही प्रकारची चिन्ता नव्हती. राष्ट्र भरभराटींत असलें, म्हणजे अशी संपन्नता असूं शकते.

## दशरथाची चिन्ता.

राष्ट्र व राजधानी अशी संपन्न असतां व सर्व लोक सर्व प्रकारें सुखी असतांही त्या सुखी लोकांचा राजा मात्र चिन्तेने व्याकुळ झालेला होता. ती चिन्ता पुत्रप्राप्तीची होय. वयास ६० वर्षे झालीं, तरी पुत्र झाला नाही, याची त्यास चिन्ता लागणें अगदी स्वाभाविक आहे. दशरथाने पुत्रप्राप्तीसाठी व्रतें, वैकल्यें, अनुष्ठानें, जप, तप, आदि जें काय त्या वेळच्या पद्धतीप्रमाणे करावयाचें, तें सर्व त्याने केलें होतें, ( वा. रा. बा. ८। १–२ ) पण पुत्र झाला नाही !

वयाला ६० वर्षे म्हणजे कांही त्या काळच्या मानाने अधिक नाहीत, कारण त्या वेळीं लोक बरेच दीर्घायु होते. ' **आषोडशात् सप्ततिवर्षपर्यंतं यौवनम् ।**' ( वात्स्यायन ) सत्तर वर्षांपर्यंत तारुण्य समजण्यांत येत असे. तथापि ६० वर्षे वयाला झालीं, तरी पुत्र नाही, ही चिन्ता राजाच्या मनाला वाटणें साहजिक आहे; कारण यापुढे पुत्र झाला असतां, तो मोठा होणें व शिकूनसवरून कर्तासवरता होणें, यास २० वर्षे तरी लागणार व त्या वेळीं बापाचें आयुष्य ८० च्या घरांत जाणार. यासाठी ६० वर्षांचें वय झालें तरी पुत्र नाही, ही चिन्ता कोणालाही वाटणें योग्य आहे; पण दशरथासारख्या धार्मिक व सदाचार-संपन्न राजाला पुत्र कां बरें होऊं नये, याचा येथे विचार केला पाहिजे.

दशरथ राजाला कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या तीन राण्या होत्या, त्यांत कौसल्या मुख्य मूर्धाभिषिक्त महिषी होती. हिलाच मुलगा झाला पाहिजे, किंवा या तीन राण्यांना तरी पुत्र झालेच पाहिजेत; तरच ते गादीचे वारस होणार.

दशरथाला या तीन पट्टराण्यांशिवाय आणखी ३५० बायका होत्या. दशरथाला ३५० राण्या होत्या, याबद्दल अयोध्याकांड सर्ग ३९ मध्ये, श्रीराम वनास जातांना त्यांचा निरोप घेतांना खालीलप्रमाणे वर्णन आहे—

*

त्रयः शतशतार्धा हि ददर्शावेक्ष्य मातरः ॥ ३६ ॥
ताश्चापि स तथैवार्ता मातॄर्दशरथात्मजः ।
धर्मयुक्तं इदं वाक्यं निजगाद कृतांजलिः ॥ ३७ ॥

व त्यांपैकी कांहींना मुलें झालेलीं असावीं; पण यांस मुलें झालीं असलीं, तरी पट्टराण्यांस मुलें नव्हतीं, हें शोकाचें कारण निःसंशय मोठें आहे.

अधिक राण्या असणें, हेंच मुख्य कारण दशरथाला पुत्रशोक होण्याचें आहे. या दशरथाला जर या तीनच राण्या असत्या व आणखी ३५० नसल्या, तर असा पुत्र नसण्याचा शोक त्यास होण्याचें कारण घडलें नसतें. आपल्या भरतखंडांतील राजांना अधिक बायका करण्याची जी वाईट सवय होती, तीच त्यांच्या पुत्र नसण्याच्या चिंतेस कारणीभूत होत असे. हे राजे जर अधिक संयमी राहते, तर असा पुत्रशोक यांना न होता.

श्रीरामचन्द्राने '**एकपत्नीव्रता**' चें उदाहरण घालून दिलें, हें या कालाच्या मानानें खरोखरच अपूर्व होय ! यामुळे रामाचें एक पत्नीव्रत फारच चमकून दिसलें ! अनेक स्त्रिया करणें, हा त्या काळच्या राजांचा सर्वसाधारण नियमच दिसतो. त्यांत या प्रतापी व दिग्विजयी रामाचा एकपत्नीव्रतानें राहण्याचा वैशिष्ट्यपूर्ण अपवाद होता; म्हणूनच तो अतिशय खुलून दिसला. सर्व कवि '**एकपत्नी राम**' म्हणून त्याचें कौतुक करीत आले आहेत, तें यामुळे होय.

दशरथानें अश्वमेध करून आपलें सार्वभौम सम्राट्पद स्थिर केलें व पुत्रकामेष्टी करून सुसंतति प्राप्त करून घेतली. वर्ष–सव्वा वर्ष या यज्ञाच्या कालामध्ये या तीनही राण्यांस व स्वतः दशरथालाही कडकडीत ब्रह्मचर्य पाळावें लागलें आहे. पुत्र प्राप्त होण्याचें मुख्य साधन या व्रतस्थ राहण्यांत आहे व तसेंच पुत्र न होण्याचें कारणही असंयमांत आहे, हें येथे निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

वसंत ऋतूमध्ये अश्व सोडला. एक वर्ष अश्व बाहेर हिंडत होता. दुसऱ्या वसंत ऋतूनंतर यज्ञास प्रारंभ झाला. इतका कालपर्यंत कडकडीत ब्रह्मचर्य पाळलें गेलें होतें. व्रतस्थ राहणें, वीरकथा श्रवण करणें, मन सत्कर्मामध्ये ठेवणें, विलास न करणें, मऊ मऊ गाद्यांवर न निजणें, स्त्रियांनीही तसेंच व्रतानें राहणें, खाद्यपेयांवरहि नियंत्रण ठेवणें, या अवधीमध्ये उत्तेजक पदार्थ न खाणें, हविष्यान्ना-

सारखेंच नियत व नियमित अन्न खाणें, वीर्यवृद्धि होऊन, कामवृद्धि न होईल, अशी ही व्यवस्था दिसत आहे. अशा व्यवस्थेने राजा दशरथ व त्याच्या तीनही राण्या वर्षसवा-वर्ष राहिल्या, यामुळेच त्यांस गर्भधारणा होऊं शकली व गर्भ स्थिर राहूं शकला, हें उघड आहे.

जो देवनिर्मित पायस या पुत्रकामेष्टी यज्ञांत तयार केला गेला, तोही साळींचे तांदूळ व गोदुग्ध यांशिवाय सोम व इतर पुत्रदायक वनस्पतींचे रस घालून सिद्ध केला असावा. यासंबंधीचा शोध वैद्यांनी करावा व असा पायस कशा रीतीने सिद्ध करतां येईल, तें वैद्यांनीच ठरवणें योग्य आहे. शमी वृक्षावर अश्वत्थ वृक्ष वाढतो, त्या अश्वत्थाच्या पञ्चांगसेवनाने निःसंशय पुत्र उत्पन्न होतो, असे प्रयोग अथर्ववेदांत आहेत—

**शमीमश्वत्थ आरूढस्तत्र पुंसवनं कृतम् ।**
**तद्वै पुत्रस्य वेदनं तत्स्त्रीष्वाभरामसि ॥ १ ॥**
**पुंसि वै रेतो भवति तत् स्त्रियामनुषिच्यते ।**
**तद्वै पुत्रस्य वेदनं तत्प्रजापतिरब्रवीत् ॥ २ ॥**
**प्रजापतिरनुमतिः सिनीवाल्यचीक्लृपत् ।**
**स्त्रैषूयमन्यत्र दधत्पुमांसमु दधदिह ॥ ३ ॥** (अथर्व० ६।११)

'शमी वृक्षावर अश्वत्थ उगवतो, तें पुत्र उत्पन्न करण्याचें साधनच निर्माण केलेलें आहे. पुत्रप्राप्तीचें तें उत्तम साधन आहे. तें आम्ही स्त्रियांना देतों. पुरुषामध्ये रेत असतें, तें स्त्रियांमध्ये अनुकूलतापूर्वक स्थापन केलें जातें. तें पुत्रप्राप्तीचें साधन आहे, असें प्रजापतीनें घोषणा करून सांगितलें आहे. प्रजापति, अनुमति, आणि सिनीवाली यांनी हें केलें. ( स्त्रैषूयं ) मुलीची उत्पत्ति दुसरीकडे होवो; पण येथे ( पुमांसं ) मुलगाच निःसंशय होवो.' हे मंत्र अथर्ववेदाचे आहेत व असे प्रयोग अथर्व-वेदांत अनेक आहेत. अथर्वविधीनेच हा पुत्रकामेष्टी यज्ञ झाला आहे. (बा. कां. १५।२ )

कांही विवक्षित वनस्पतींच्या सेवनानें निःसंशय मुलगाच होतो, असें येथे दिसतें. '**पुंसवनं**' व '**स्त्रैषूयं**' हे दोन निरनिराळे प्रयोग येथे दाखवले आहेत. ज्यांस मुलगी हवी असेल, त्यांनी स्त्रैषूय प्रयोग करावा व ज्यांस मुलगाच पाहिजे

असेल त्यांनी **पुंसवनाचा प्रयोग** करावा. बृहदारण्यकोपनिषदाच्या शेवटीं व शतपथब्राह्मणाच्या शेवटीं अमूक तऱ्हेच्या संततीसाठी काय करावें, तें सविस्तर सांगितलें आहे. वैद्यशास्त्रांतही या संबंधाचे कांही प्रयोग असले, तर ते शोधले पाहिजेत व प्रत्यक्ष प्रयोग करूनहि यांत तथ्य किती आहे, तें ठरवणें इष्ट आहे. येथे असें दिसतें कीं, अशाच प्रकारच्या कांही प्रयोगाने हा पुत्रीय पायस बनवला गेला असावा.

## अश्वमेध–यज्ञ.

अश्वमेध हा राष्ट्राच्या घडामोडींचा यज्ञ आहे. “ **राष्ट्रं वा अश्वमेधः** ” ( शतपथ ब्रा. १३।१।६।३; तै. ३।८।९।४ ) असें शतपथामध्ये म्हटलेलें आहे. ‘ **क्षत्रं हि राष्ट्रं** ’ ( ऐ. ब्रा. ७।२२ ); ‘ **श्रीर्वैराष्ट्रमश्वमेधः** ’ ( श. ब्रा. १३।२।९।२; तै. ३।९।७।१ ) अशीं ब्राह्मणवचनें आहेत. यावरून अश्वमेधाचें राष्ट्रीय स्वरूप व्यक्त होतें.

आर्यावर्ताची व्याप्ति पूर्वपश्चिम समुद्र व हिमालय आणि विंध्यपर्वत यांच्यामधील प्रदेश एवढीच होय. याला आपण सध्याच्या भाषेंत ‘ **उत्तर भारत** ’ असें म्हणूंन, यामध्ये ३०० तरी राजे होतेच. या ३०० राजांचा उल्लेख उत्तरकाण्डांत आलेला आहे–

## तीनशे राजे

रावणाने सीतेला नेल्याची बातमी भरताला कळल्यावर आता रावणाशीं युद्ध जुंपणार, ही कल्पना मनांत येऊन भरताने रामाच्या सहाय्यास धाडण्यासाठी तीनशे मांडलीक राजे सैन्यासह गोळा केले होते. या राजेलोकांच्या सैन्याची संख्या कित्येक अक्षौहिणी होती. या राजेलोकांमध्ये जे प्रमुख राजे होते, त्यांत काशिपति प्रतर्दन याचें नांव दिसून येतें. हा प्रतर्दन रामाचा अत्यंत जिवलग मित्र होता, असें दिसतें—

**तं विसृज्य ततो रामः वयस्यं अकुतोभयम् ।**
**प्रतर्दनं काशिपतिं परिष्वज्येदमब्रवीत्** ॥१५॥
**दर्शिता भवता प्रीतिः दर्शितं सौहृदं परम् ।**
**उद्योगश्च त्वया राजन् भरतेन कृतः सह** ॥१६॥
( उत्तर कांड, सर्ग ३८ )

या दोन श्लोकांवरून श्रीराम वनवासांत असतांना त्याच्या पश्चात् अयोध्येचा राज्यशकट हाकण्यांत व रामाच्या सहाय्यार्थ पाठविण्यासाठीं सर्व राजेलोकांस त्यांच्या सैन्यासह एकत्र जमविण्यांत प्रतर्दनाचें भरताला बरेंच सहाय्य झालें असल्याचें दिसून येतें.

त्याचप्रमाणें "**विसृज्य तं काशिपतिं त्रिशतं पृथिवीपतीन् ॥२०॥**" येथून आरंभ करून "**पूजितास्ते च रामेण जग्मुर्देशान् स्वकान् स्वकान् ॥३२॥**" सर्ग ३८ च्या समाप्तीपर्यन्तच्या वर्णनावरून या एकत्र जमलेल्या राजांची संख्या तीनशे होती, असें दिसतें. पण हे जे तीनशे राजे आपआपल्या सैन्यासह तयार होऊन रामाच्या सहाय्यासाठीं जाण्यास्तव अयोध्येंत एका ठिकाणीं जमले होते, त्यांस या युद्धाचा निकाल आधींच लागल्याकारणानें अयोध्येहून पुढें जाण्याचें प्रयोजनच उरलें नाहीं. म्हणून ते आले होते, तसेच तेथून आपआपल्या देशास परत गेले, हें सर्ग ३९ मधील ३ ते ६ श्लोकांवरून स्पष्ट दिसून येतें. ते श्लोक असे आहेतः-

**ऊचुस्ते च महीपाला बलदर्पसमन्विताः ।**
**न राम रावणं युद्धे पश्याम पुरतस्थितम्** ॥ ३ ॥
**भरतेन वयं पश्चात् समानीता निरर्थकम् ।**
**हता हि राक्षसाः क्षिप्रं पार्थिवैः स्युर्न संशयः** ॥ ४ ॥
**रामस्य बाहुवीर्येण रक्षिता लक्ष्मणस्य च ।**
**सुखं पारे समुद्रस्य युद्ध्येम विगतज्वराः** ॥ ५ ॥

अर्थात् हे सर्व राजेलोक पुढें श्रीरामाचा राज्याभिषेक-समारंभ साजरा करण्यास उपयोगी पडले. या तीनशे राजेलोकांचीं नांवें येथे दिलेलीं नाहींत.

या ३०० राजांमध्यें ज्याला आपलें बल वाढवतां येई व आपल्यासमोर कोणीहि उभा राहूं शकणार नाहीं, असें वाटे, तो राजा अश्वमेध करी. प्रथम श्यामकर्ण घोडा सोडीत असत. या अश्वाबरोबर आवश्यक तेवढें सैन्य, युद्धसामग्री, उत्तम सेनापति व उत्तम पुरोहित देऊन सर्व देशांत हा घोडा फिरविण्यांत येई. अमूक राजा अश्वमेध करीत आहे, अशी घोषणा आधीं होतच असे. त्यामुळे इतर राजे तयार असत. घोडा यावयाचा तो सैन्यासहच यावयाचा, तेव्हा ज्याच्या राज्यांत तो

येईल, त्याने खण्डणी तरी द्यावी अथवा युद्धास तरी तयार असावें, अशी घोषणा सुवर्णाच्या पत्र्यावर खोदलेली घोड्याबरोबरच पाठवलेली असे.

बहुतेक राजे खण्डणी किंवा करभार देऊन, युद्धाचा प्रसंग टाळींत व अश्वमेध-कार्याचें माण्डलिकत्व मान्य करीत; पण केव्हा केव्हा एखादा राजा, युद्धाची खुमखुमी असली तर, घोड्यास बांधून ठेवी व युद्धास उभा राही. अशा वेळीं युद्धांत जय मिळाला, तरच आरंभलेला अश्वमेध शेवटास जात असे. अशा रीतीने अश्वमेधयज्ञ हा राजाच्या सार्वभौमत्वाचा प्रस्थापक समजला जात असे.

अश्वमेधयज्ञ यथासांग समाप्त झाला, म्हणजे बाकीचे राजे माण्डलिक झालेच. ते अशा यज्ञांत मोठमोठी खंडणी घेऊन येत व ती अश्वमेध करणाऱ्या राजाला अर्पण करीत. दशरथाच्या यज्ञांतहि अशा रीतीने करभार घेऊन शेकडो राजे आलेले होते व त्यांच्याकडून अतोनात संपत्ति दशरथास मिळालेली होती.

अश्वमेधयज्ञाचा व्यापही फारच मोठा असे. शेकडो राजे, त्यांचीं सैन्यें, त्यांचे मानमानकरी व सरदार, शेकडो विद्वान्, ऋषिमुनि, ब्राह्मण, कारागीर व इतर लाखो लोक यज्ञाच्या वेळीं जमत असत. यांची राहण्याची, जेवणाची व इतर सर्व व्यवस्था ठेवण्याचा सर्व भार अश्वमेध करणारावर असे. दशरथ राजाने केलेल्या अश्वमेधामध्ये तर अशी बोलावलेली जनसंख्या फारच मोठी होती व जेवणखाण व इतर मानमरातबाच्या दृष्टीने कोणाचेंही कांही या यज्ञांत कमी पडलेलें नाही. लाखो माणसांचा जनसंमर्द जमला असतां सर्वांचा मान यथायोग्य रीतीने ठेवला जाणें, हें किती कठीण आहे, हें कांही निराळें सांगण्याचें कारण नाही.

या यज्ञांत ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्यांप्रमाणेच शूद्रही मोठ्या आदराने बोलावलेले होते ( वा. रा. बा. १३।२० ). जे लोक आर्यांच्या समाजांत शूद्रांना मानाचें स्थान नव्हतें, असें म्हणतात, त्यांनी हें वर्णन पाहण्यासारखें आहे.

या यज्ञासाठी येणाऱ्या लाखो लहानमोठ्या लोकांना राहण्यासाठी केवढी मोठी जागा लागेल, त्याची कल्पना वाचकांनीच करावी. या यज्ञाच्या वेळीं राजां-साठी मोठमोठे वाडे बनवले होते, व इतरांसाठीही मोठ्या धर्मशाळा उभारल्या

होत्या, असा उल्लेख आहे. म्हणजे राहण्याची व्यवस्था ऐसपैस होती. यावरून हा यज्ञाचा पसारा कित्येक कोसपर्यंत पसरलेला होता, असें दिसतें.

सध्या जे यज्ञ करतात, त्या यज्ञांचा मण्डप फार तर शंभर दोनशे हात लांबरुंद असतो; पण प्राचीन काळचे यज्ञमण्डप फार मोठे असावे, असें प्राचीन वर्णनावरून वाटतें; कारण दोन यज्ञकुण्डांमधून जर गाडा गेला, तर काय प्रायश्चित्त करावें, त्याचा विचार ब्राह्मणग्रंथांत केलेला आढळतो. सध्याच्या यज्ञकुण्डामधून गाडा जाणें अशक्यच आहे; कारण तीं कुण्डें अगदीं जवळजवळ असतात. सध्याच्या यज्ञमण्डपाच्या पन्नास पट मोठा मण्डप होईल, तेव्हा दोन यज्ञकुण्डांमध्ये गाडा जाण्याइतकें अन्तर होणें शक्य होईल. या वर्णनांवरून या प्राचीन काळचे यज्ञमण्डप फारच विस्तीर्ण असावे, असें वाटतें व म्हणूनच सध्याच्या यज्ञांत ऋत्विजास मोठमोठ्याने हाका मारण्याचे जे विधि व्यर्थसे दिसतात, ते पूर्वीच्या विस्तृत मण्डपांत सार्थ असावेसें वाटतें.

सध्या ऋत्विजांमधील अन्तर फार तर ४।५ हात असतें, त्यासाठी मोठ्याने ओरडून हाक मारण्याचें मुळीच कारण नाहीं; कारण हळू बोललें तरी त्यांस ऐकूं येणें शक्य आहे; पण जर हेंच ४।५ हातांचें अन्तर ५०।६० किंवा अधिक हातांचें असेल, तर मात्र तेथें मोठ्याने ओरडून उच्च स्वराने हाक मारणें योग्य होईल. सध्या ऋत्विजांनी परस्परांस मोठ्या स्वराने हाक मारण्याचा जो विधि यज्ञांत आहे, तो पूर्वीचे यज्ञमण्डप फार मोठे असल्याने त्या वेळीं योग्य होता व यावरूनच तेव्हांचे यज्ञमण्डप फार मोठे होते, असें म्हणतां येतें.

अशा मोठ्या यज्ञमण्डपामध्ये एका बाजूस यज्ञविधि चालत असे व दुसऱ्या बाजूस सभासंमेलनें, कारागिरांचीं प्रदर्शनें, जादूचे खेळ, वगैरे अनेक प्रकार चालत. सामाजिक, धार्मिक व राष्ट्रीय दृष्टींनी हा यज्ञाचा भाग फारच महत्त्वाचा असे. अनायासाने सर्व देशचे, सर्व दर्जाचे व सर्व विद्यांमधील निपुण लोक एकत्र येत व निरनिराळ्या विषयांच्या वाटाघाटी येथे होत व पुढील राष्ट्रीय वा धार्मिक कार्यक्रमही निश्चित होत.

एका बाजूस सूत पुराणकथा सांगत असत व तेथे अल्पशिक्षितांचें मनरंजन होऊन, त्यांस ज्ञान प्राप्त होत असे. अन्य ठिकाणीं दुसरे उपयोगाचे व करमणुकीचे

प्रकार चालत असत. सध्या जत्रांमध्ये अव्यवस्थितपणानें यांपैकी कांहीं प्रकार होत असतात, तेच मोठ्या प्रमाणावर व सुव्यवस्थेने या यज्ञामध्ये होत असत.

दशरथ राजाच्या अश्वमेधामध्यें रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याचा जो बेत देवांनी व ऋषींनी मिळून केला, तोही अशाच एका राजकीय परिषदेंत ठरविला होता. त्या वेळीं—

**ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः ।**
**ताः समेत्य यथान्यायं तस्मिन् सदसि देवताः ।**
**अब्रुवन् लोककर्तारं ब्रह्माणं वचनं ततः ।**
**भगवंस्त्वत्प्रसादेन रावणो नाम राक्षसः ।**
**सर्वान् नो बाधते वीर्याच्छासितुं तं न शक्नुमः ।**
**उद्वेजयति लोकांस्त्रीनुच्छ्रितान् द्वेष्टि दुर्मतिः ।**
**शक्रं त्रिदशराजानं प्रधर्षयितुमिच्छति ।**
**ऋषीन् यक्षान् सगन्धर्वान् ब्राह्मणानसुरांस्तथा ।**
**अतिक्रामति दुर्धर्षो वरदानेन मोहितः ।**
**तन्महन्नो भयं तस्माद्राक्षसाद्घोरदर्शनात् ।**
**वधार्थं तस्य भगवन्नुपायं कर्तुमर्हसि ॥** (वा. बा. १५।४–११)

‘ देव, गन्धर्व, सिद्ध, चारण, ऋषि, महर्षि आदि सर्वांची परिषद भरली असतां, सर्व जमलेले सदस्य विचार करूं लागले की, रावण नांवाचा राक्षस फार माजला आहे; त्याची शक्ति फार मोठी असल्यानें तो सर्वांला उपद्रव देतो; पण त्याचें पारिपत्य करण्यास कोणीहि समर्थ होत नाहीं. इन्द्रालाही तो धाक दाखवतो. ऋषि, यक्ष, गन्धर्व, ब्राह्मण व असुर यांनाही तो फारच छळतो. सर्वांनाच त्याचें फार मोठें भय वाटत आहे. या रावणाच्या वधासाठीं काय करावें, हा विचार या सभेमध्ये विचारासाठी निघाला. ’

पुढे याच सभेंत ठरलें की, रावणाचा वध सर्वांनी संघ करून घडवून आणावा व त्याच्या त्रासांतून सर्वांस मोकळें करावें. यासाठी कोणी काय करावें, तेंही येथेच ठरलें.

अश्वमेधासारख्या यज्ञांत राजकीय प्रश्नांचा उलगडा कसा केला जात होता,

तें समजण्यास हा प्रसंग फारच चांगल्या रीतीने उपयोगी पडण्यासारखा आहे.

या ठिकाणीं एक गोष्ट लक्ष्यपूर्वक पाहण्यासारखी आहे, ती ही की, हा यज्ञ दशरथानेच केलेला होता. सर्व राजे तेथे आले होते; पण या राजकीय परिषदेमध्ये ते आल्याचा व त्यांनी भाग घेतल्याचा उल्लेखसुद्धा नाही ! रावणाच्या भयंकर दहशतीचा हा परिणाम आहे.

जमलेल्या राजे लोकांस या परिषदेंत काय घडलें, तें समजलेंच होतें; पण स्वतः तेथे जाण्यास ते धजत नव्हते. उघड रीतीने सभेच्या कामांत भाग घेण्यास त्यांस धैर्य नव्हतें. दशरथही स्वतः घाबरतच होता; पण शेवटीं दशरथपुत्र रामानेच रावणाचें राज्य उलथून पाडलें व भरतानेही त्यावर स्वारी करण्याचा घाट घातला होता. म्हणजे दशरथाच्या पुढच्या पिढींत रावणाच्या विरुद्ध उठण्याचा जोम निर्माण झाला, तसा तो मागच्या दशरथाच्या वेळच्या पिढींत नव्हता.

यज्ञामधील या राजकीय उलाढाली लक्ष्यपूर्वक पाहण्यासारख्या आहेत.

## पायसाची वाटणी

अश्वमेधानंतर पुत्रकामेष्टी यज्ञ झाला व त्या यज्ञाचा प्रसाद म्हणून देवनिर्मित पायस दशरथाला मिळाला. त्याने त्याची वाटणी आपल्या तीन राण्यांमध्ये केली; पण ही वाटणी सारखी झालेली नाही. तिघींना एकतृतीयांश पायस न मिळतां तो कमजास्त मिळालेला आहे.

**कौसल्यायै नरपतिः पायसार्धं ददौ तदा ।**
**अर्धादर्धं ददौ चापि सुमित्रायै नराधिपः ॥**
**कैकेय्यै चावशिष्टार्धं ददौ पुत्रार्थकारणात् ।**
**प्रददौ चावशिष्टार्धं पायसस्यामृतोपमम् ॥**
**अनुचिंत्य सुमित्रायै पुनरेव महामतिः ॥** (वा.रा.बा.१६।२७–२९)

‘ अर्धा पायस सर्वांत प्रथम कौसल्येला दिला. कौसल्येला दिलेल्या अर्ध्या पायसाचा ( अर्धादर्धं ) चौथा भाग सुमित्रेला दिला. [ या वेळीं सहा आणे कौसल्येस व दोन आणे सुमित्रेस पोचला. ] नंतर राहिलेला अर्धा पायस कैकेयीस दिला; नंतर पुनः आठवण होतांच कैकेयीस दिलेल्या पायसाचा चवथा भाग

पुनः सुमित्रेस दिला. [ या वेळीं सुमित्रेस दोन आणे अधिक मिळाले असून, कैकेयीस सहा आणे राहिले. ]

कौसल्येस सहा आणे, कैकेयीस सहा आणे व सुमित्रेस ( दोघींच्या पायसांतील दोनदोन आणे असे ) चार आणे, असा पायसाचा विभाग झालेला आहे. कालिदासहि असाच विभाग झाला, असें म्हणत आहे—

**अर्चिता तस्य कौसल्या प्रिया केकयवंशजा ।**
**अतः संभावितां ताभ्यां सुमित्रां ऐच्छदीश्वरः ॥**
**ते बहुज्ञस्य चित्तज्ञे पत्न्यौ पत्युर्महीक्षितः ।**
**चरोरर्धार्धभागाभ्यां तामयोजयतामुभे ॥**

( रघुवंश )

' दशरथ राजाची मुख्य पट्टराणी कौसल्या होती व कैकेयी त्याची आवडती रमणी होती. म्हणून या दोघींस अर्धा अर्धा पायस दिला व त्या प्रत्येकीकडून प्रत्येकीच्या पायसांतील चवथा हिस्सा पायस सुमित्रेला देवविला. '

दशरथाने स्वहस्ताने कौसल्येस वडीलकीच्या मानासाठीं व कैकेयीस ती प्रिय होती, म्हणून अर्धा अर्धा वाटून दिला व बिचारी सुमित्रा मात्र त्यांकडे पहातच राहिली. तेव्हा त्या दोघींनी आपआपल्यापैकी प्रत्येकीं चवथा हिस्सा तिला दिला. दशरथानेच सुमित्रेला कां देऊं नये, याचें कारण समजत नाहीं; पण येथे सुमित्रा मधली असून, तिचा मान शेवटीं लागत आहे. याला थोडेंसें कारणहि होतें, असें दिसतें, तें असें—

**पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।**
**मातामहे समाश्रौषीद् राज्यशुल्कमनुत्तमम् ॥**

( वा. रा. अयोध्या. १०७।३ )

चित्रकूटपर्वतावर रामचन्द्र रहात होते, त्या वेळीं भरत त्यांना परत अयोध्येस आणण्यासाठीं गेला, त्या वेळीं श्रीरामचन्द्र भरताला सांगत आहेत की— हे ( भ्रातः ) बन्धो ! हे भरता ! पूर्वी ( नः पिता ) आमच्या वडिलांनी 'दशरथ महाराजांनी -तुझ्या आईशीं- कैकेयीशीं- विवाह करावयाचें ठरत होतें, तेव्हा ( मातामहे ) कैकेयीच्या वडिलांना— म्हणजे तुझ्या आजोबांना—कैकयाधि-

पतींना त्यांनी सांगितलें होतें की, ( अनुत्तमं राज्यशुल्कं ) कैकेयीला जो मुलगा होईल, त्यास मी राज्य देईन. '

राजा दशरथाने कैकेयीच्या वडिलांस असें सांगितलें असल्यामुळे कैकेय राजाने आपली मुलगी आमच्या वडिलांस दिली. राजा दशरथ या वचनाने बांधलेला होता व या वचनाप्रमाणे भरतास राज्य मिळणें योग्य होतें. तसेंच झालें, अशी भरताची समजूत येथे राम घालीत आहे.

कौसल्या पहिली पट्टराणी होती, मानाने मोठी होती, म्हणून तिला अर्धा पायस देण्यांत आला, तें योग्य झालें. वर लिहिल्याप्रमाणे दशरथाचें वचन गुंतलें असल्याने त्याने अवशिष्ट अर्धा पायस कैकेयीला दिला. यामुळे बिचारी सुमित्रा मध्येंच यज्ञाच्या प्रसादाशिवाय राहिली. हें पाहून दोनही राण्यांनी आपल्यापैकी थोडा थोडा तिला दिला.

पायसाच्या वाटणीमुळे सुमित्रेला मुलगे दोन झाले व ते राम व भरत यांचे अनुयायी त्याच कारणाने झाले. कौसल्येच्या पायसापैकी एक भाग सुमित्रेकडे आला असल्याने, त्या प्रसादाने उत्पन्न झालेला लक्ष्मण कौसल्यानंदनवर्धक रामाचा अनुयायी झाला व दुसरा तशाच कारणाने भरताचा अनुगामी झाला.

पायसाच्या वाटणीबद्दल अनेक टीकाकारांनी अनेक तर्क केलेले आहेत. त्यांपैकी दोन तर्क मूळ भाषांतराच्या वेळीं दिलेले आहेत; पण येथे वर दिलेला आशय आमच्या मताने निर्दोष दिसत आहे.

राजे लोक अनेक बायका करतात व ते जसजसे म्हातारे होत जातात, तसतशी त्यांची वृत्ति चळत जाते. अशा चळलेल्या वृत्तीच्या वेळीं कैकेयीच्या मुलाला राज्य देऊ करून व पट्टराणीचा अधिकार एका बाजूस सारून कैकेयीशीं दशरथाने लग्न केलें होतें ! कैकेयी तरुणी, गोरीगोमटी व सुंदर असल्याने दशरथ राजा तिच्या महालांत बहुतेक पडलेला असे ! कौसल्या भाबडी, सालस व सात्त्विक वृत्तीची बायको होती. सुमित्रा हीसुद्धा तशी गरीब, मिळतें घेणारी व सोशीक स्त्री होती. यामुळे पायस वाटणीच्या वेळीं कौसल्येला तिच्या अधिकारामुळे प्रथम पायस मिळाला, कैकेयीला वरील करारामुळे मिळाला व सुमित्रा मात्र शान्त

स्वभावामुळे तशीच राहिली व इतर दोनही राण्यांच्या दयेवर तिला विसंबावें लागलें !

अनेक बायका असल्यामुळे असें वैषम्य होणें क्रमप्राप्तच आहे. पण या वेळीं या तीनही बायकांनी खेळीमेळीने हें वैषम्य वाढूं दिलें नाही, हें त्यांच्या व विशेषतः सुमित्रेच्या थोरपणास साजेसें आहे. हिने आपलें '**सु-मित्रा**' हें नांव या ठिकाणीं सार्थ केलें, यांत मुळीच शंका नाही.

दशरथाला राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न हीं चार मुलें झालीं. हे आदर्श पुरुष निर्माण झाले. हीच आर्यराजांची निर्भय पुढली पिढी होय. रावणाला थरकांप भिणाऱ्या आर्यावर्तातील राजांची ही पुढली पिढी निर्भय असून, रावणाचा नाश करण्यासाठी उत्साहाने पुढे सरणारी होती. रामलक्ष्मणांनी रावणाचा नाश केलाच व भरतशत्रुघ्नांनीहि तयारी केली होती, हें वर दिलें आहेच.

## आदर्श पुरुष.

वाल्मिकि ऋषींनी या महाकाव्याच्या वर्णनाने जो आदर्श पुरुष वाचकांपुढे ठेवला आहे व जसे पुरुष आपल्या या आर्यराष्ट्रांत व्हावे, असें सुचविलें आहे, तो पुरुष कसा असावा, याचा विचार वाचक करीत असतीलच. रामायण वाचून याचा विचार वाचकांनी करावा.

'**मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचन्द्र**' हा तो आदर्श आहे. रामायण रचण्यापूर्वी वाल्मीकींनी जी आदर्श पुरुषाची कल्पना मनामध्ये उभी केली व जिला अनुमोदन नारदमुनींनी दिलें, ती आदर्श पुरुषाची कल्पना त्यांच्याच शब्दांत पुढे दाखवली आहे, ती अशी आहे–

## आत्मिक गुण

**१. आत्मवान्** ( १।४ )= आत्मिक बलाने युक्त, ( **वशीकृतान्तःकरणः** ) ज्याने आपलें अन्तःकरण आपल्या आधीन ठेवलें आहे.

**२. नियतात्मा** ( १।८ )= ( **निगृहीतान्तःकरणः** ) ज्याने आपलें अन्तःकरण नियमांमध्ये ठेऊन आपल्या आधीन केलें आहे.

३. अदीनात्मा ( १।१५ )= ( **सहजासाधारणक्षात्रभावेनादीनस्वभावः, अतिव्यसनपरंपरायामप्यक्षुभितान्तःकरणः** )= असाधारण क्षात्रतेजामुळे दैन्यरहित, अत्यंत कष्टांचे प्रसंग आले असतांही ज्याचें अन्तःकरण भयभीत होत नाही.

## सर्वसाधारण गुण.

४. **गुणवान्** ( १।२ )= ( **प्रशस्तबहुगुणवान्** ) उत्तम श्रेष्ठ अशा अनेक प्रशंसनीय गुणांनी युक्त.

५. **सर्वगुणोपेतः** ( १।१७ )= प्रशंसनीय अशा सर्व श्रेष्ठ गुणांनी युक्त.

६. **ज्येष्ठगुणैर्युक्तः** ( १।२० )= श्रेष्ठ गुणांनी युक्त.

७. **शुभलक्षणः** ( १।११ )= ( **शुभानि सामुद्रिकशास्त्रोक्तानि लक्षणानि यस्य सः** ) सामुद्रिकशास्त्रांत सांगितलेल्या शुभ लक्षणांनी युक्त, सर्व प्रकारच्या शुभ लक्षणांनी युक्त.

## संयमी.

८. **वशी** ( १।८ ), **वश्यः** ( १।१२ )=( **वशी जिताशेषबहिरिन्द्रियः, वश्यः पित्राचार्यदेवेषु विनीतः** ) बाह्य सर्व इन्द्रियांला आपल्या स्वाधीन करणारा, तसेंच पिता, आचार्य आदि देवांपुढे नमून असणारा.

९. **जितक्रोधः** ( १।४ )= ज्यानें क्रोध जिंकला आहे.

१०. **साधुः** ( १।१५ )= ( **मृदुमधुरस्वभावः** ) मृदु व मधुर स्वभाव असलेला.

## नीतिमान्.

११. **नीतिमान्** ( १।९ )= ( **नीतिः कामन्दकादिप्रसिद्धराजनीतिस्तद्वान् तज्ज्ञाता** ) कामन्दकी आदि ज्या अनेक राजनीति आहेत, त्यांचें ज्ञान असलेला, सर्व राजनीतींमध्ये प्रवीण, अन्य नीतीप्रमाणे वागणारा.

## धर्मज्ञता.

१२. **धर्मज्ञः** ( १।२;१२ ) = ( **श्रौतस्मार्तसकलधर्मरहस्यज्ञः** ) श्रौत व स्मार्त सर्व धर्मांचें रहस्य जाणणारा.

१३. **कृतज्ञः**( १।२ )= ( **बह्वीं अपि अपकृतिं उपेक्ष्य, एकामप्युपकृतिं बह्वीं मन्यते स कृतज्ञः** ) अपकारांकडे न पाहतां थोडे उपकार केले, तरी त्यांना जो पुष्कळ मानतो तो.

१४. **शुचिः** ( १।१२ )= ( **प्रातः स्नानादिना प्राणायामाभ्यासादिना प्रत्याहारादिजन्यरागद्वेषहानेन नित्यं बाह्यान्तरशुद्धः** )= स्नानाने ज्याची बाह्यशुद्धि झालेली आहे व प्राणायाम–प्रत्याहार आदींनी ज्याची अन्तःशुद्धि झालेली आहे, तो.

१५. **चारित्र्यसंपन्नः** (१।३ )= ( **वृत्तसंपन्नः** )= सदाचाराने युक्त.

१६. **दृढव्रतः** ( १।२ )= (**आपद्यपि धर्माय परिगृहीतव्रतविशेषस्य त्यागरहितः** ) आपत्कालींहि जो धर्माचरणाचा त्याग करीत नाही.

१७. **अनसूयकः** ( १।४ )=( **विद्यैश्वर्यतपःसु परौन्नत्यासहनमसूया तद्रहितः** ) विद्या, ऐश्वर्य, तप आदिकांमध्ये दुसऱ्याची उन्नति सहन न होण्याचें नांव असूया. ही ज्यामध्ये नाही, म्हणजे जो दुसऱ्याची उन्नति पाहून आनन्दित होतो तो.

१८. **आर्यः** ( १।१६ )= ( **सर्वपूज्यः** ) जो सर्वांना पूज्य असतो.

१९. **समाधिमान्** ( १।१२ ) = समबुद्धीनें युक्त.

२०. समुद्र इव **गम्भीरः** ( १।१७ ) = समुद्राप्रमाणे गम्भीर.

२१. पृथ्वीसमः **क्षमावान्** ( १।१८ ) = पृथ्वीप्रमाणे क्षमाशील.

२२. धनदेन समः **त्यागवान्** ( १।१९ ) = कुबेरासारखा दाता.

२३. धर्म इव **सत्ये स्थितः** (१।१९)= धर्माप्रमाणे सत्याचें पालन करणारा.

२४. **समः** ( १।११ ). **सर्वसमः** ( १।२६ )= समभाव ठेवणारा, ( **सर्वेषु सुखदुःखोदर्केषु हर्षविषादरहितः, शत्रुमित्रोदासीनेषु वैषम्यरहितः** ) सुखदुःख प्राप्त झालें असतां किंवा शत्रुमित्र वा उदासीन यांशीं संबंध आला असतां, जो हर्ष किंवा शोक करीत नाही अथवा विषमभाव दाखवीत नाही असा.

## राष्ट्रीय वृत्ति.

२५. **सदा सद्भिरभिगतः** ( १।१६ )= सदोदित ज्याच्याजवळ सज्जन असतात, असा. हीन लोकांस जवळ न करणारा.

२६. **श्रीमान्** ( १।९; १० ), **लक्ष्मीवान्** ( १।१३ ) = संपत्तिमान् शोभावान्, लक्ष्मी ज्याच्याजवळ आहे.

२७ **धाता.** ( १।१३ ) = ( **सर्वप्रजाधारणपोषणसामर्थ्ययुक्तः** ) सर्व प्रजांचें धारण व पोषण करण्याचें ज्याला सामर्थ्य आहे.

२८. **सर्वभूतहिते रतः** ( १।३ ); **प्रकृतिप्रियकाम्यया प्रकृतीनां हितैर्युक्तम्।** (१।२०); **प्रजाहिते रतः**=(१।१२) सर्व प्राण्यांचें हित करण्यांत तत्पर, सर्व प्रजांचें हित करण्यांत दक्ष, प्रजांचें हित करण्याच्या कार्यामध्ये रमणारा.

२९. **जीवलोकस्य रक्षिता** (१।१३); **स्वजनस्य रक्षिता** (१।१४)= सर्व काल जीवांचें रक्षण करणारा, स्वजनांचें रक्षण करणारा.

३०. **धर्मस्य रक्षिता** ( १।१३ ); **स्वधर्मस्य रक्षिता** ( १।१४ )= धर्माचा रक्षक.

३१. **सर्व लोकप्रियः** ( १।१५ ) = सर्व लोकांना प्रिय.

३२. प्रजापतिसमः [**प्रजारक्षकः**] (१।१३)= प्रजापतीप्रमाणे प्रजांचें पालन करणारा,

## शत्रुनिर्दलन.

३३. **अरिन्दमः** ( १।९ ); **रिपुनिषूदनः** ( १।१३ ); **शत्रुनिबर्हणः** ( १।९ ) = शत्रूंचा नाश करणारा.

३४. **प्रतापवान्** ( १।११ ); **सुविक्रमः** (१।१०) = (**प्रतापः स्मृतिमात्रेण रिपुहृदयविदारणक्षमं पौरुषं तद्वान्** ) = केवळ स्मरणानेच ज्याच्या शत्रूंचीं हृदयें विदीर्ण होतात, असा पराक्रमी, उत्तम पराक्रमी, किंवा ( **विक्रमः पादविक्षेपः** ) ज्याची चालण्याची ढब उत्तम आहे.

३५. **यशस्वी** ( १।१२ ) = शत्रूंचा पराभव करून ज्याने उत्तम यश मिळविलें आहे.

३६. **महेष्वासः** ( १।१० ) = मोठें धनुष्य जो वापरतो, ज्याच्याजवळ उत्तम प्रकारचीं शस्त्रास्त्रें आहत.

३७. **जातरोषस्य देवा अपि बिभ्यति** ( १।४ ); **कालाग्निसदृशः क्रोधे** ( १।१८ ) = जो रागावला असतां देवसुद्धा भितात, जो क्रोध आला असतां प्रलयकालच्या अग्नीसारखा भयंकर दिसतो.

## वैयक्तिक गुण—ज्ञान.

३८. **विद्वान्** ( १।३ ); **ज्ञानसंपन्नः** (१।१२); **विचक्षणः** ( १।१५)= (**विद्वान् आत्मानात्मसकलपदार्थतत्त्वज्ञः**) आत्मा व अनात्मा अशा सर्व पदार्थांच्या तत्त्वाला जाणणारा, ज्ञानाने युक्त, ( **विचक्षणो यथोचितलौकिकालौकिक सर्वक्रियासु कुशलः** ) सर्व प्रकारच्या लौकिक व अलौकिक कर्मांमध्ये कुशल, सर्व कर्मांमध्ये निपुण.

३९. **बुद्धिमान्** ( १।९ ); **स्मृतिमान्** ( १।१५ ) = उत्तम बुद्धीने युक्त, उत्तम स्मरणशक्तीने युक्त.

४०. **प्रतिभानवान्** ( १।१५ )= ( **व्यवहारकाले श्रुतस्याश्रुतस्य चोचितार्थस्य शीघ्रं प्रतिभासः प्रतिभा तद्वान्** ) व्यवहार करण्याच्या वेळीं ऐकलेल्या अथवा न ऐकलेल्या अशा उचित विषयासंबंधी सत्वर निर्णय करतां येणें ज्याला शक्य होतें तो.

४१. **वेदवेदाङ्गतत्त्वज्ञः** (१।१४); **सर्व शास्त्रार्थतत्त्वज्ञः** (१।१४)= सर्व वेदशास्त्रें यांचें तत्त्व जाणणारा.

४२. **धनुर्वेदे निष्ठितः** ( १।१४ )= धनुर्वेदाचा उत्तम ज्ञाता.

## शूर वीर.

४३. **वीर्यवान्** ( १।२ ); **महावीर्यः** (१।८)= ( **दिव्यास्त्रबलादिजशक्तिविशेषेण पराभिभवसामर्थ्यं वीर्यं तद्वान्** ) दिव्य अस्त्रांच्या बलाने शत्रूंचा पराभव करण्याचें विशेष सामर्थ्य ज्याला आहे तो.

४४. **धैर्येण हिमवान् इव** (१।१७); **धृतिमान्** ( १।८ )= हिमवानाप्रमाणे धैर्यवान्.

४५. **सत्यपराक्रम** ( १।१९ )= ज्याचा पराक्रम फार मोठा आहे.

४६. **विष्णुना सदृशो वीर्ये** ( १।१८ )= पराक्रमामध्ये जो विष्णूसारखा आहे.

४७. **समर्थः** ( १।३ )= (**लौकिकव्यवहारे प्रजारञ्जनादौ चातुर्यं सामर्थ्यं तद्वान्** ) लौकिकव्यवहारामध्ये व प्रजारञ्जनादि कार्यामध्ये जें नैपुण्य आवश्यक असतें, त्यास सामर्थ्य असें म्हणतात; तें ज्यापाशी विपुल आहे.

## वाणी.

४८. **सत्यवाक्** ( १।२; १२ )= खरें बोलणारा.

४९. **वाग्मी** ( १।९ )= उत्तम वक्ता.

## सुदृढांगत्व.

५०. **समविभक्ताङ्गः** ( १।११ )= शरिराचा प्रत्येक अवयव ज्याचा नीटनेटका, रेखीव आणि हृष्टपुष्ट आहे.

५१. **सुशिराः** (१।१०)= ज्याचें शिर उत्तम आहे, उत्तम मस्तक असलेला.

५२. **सुललाटः** ( १।१० )= ज्याचें ललाट उत्तम आहे.

५३. **महाहनुः** ( १।९ ) = ज्याची हनुवटी मोठी आहे.

५४. **कम्बुग्रीवः** ( १।९ ) = शंखाप्रमाणे पुष्ट ज्याचा गळा आहे.

५५. **गूढजत्रुः** ( १।१० )= गळयाखालील आडव्या जत्रुनामक स्कन्धास्थि ज्यान्च्या झाकलेल्या आहेत. खांदे उत्तम पुष्ट असल्यामुळे त्या भागांतील ज्याचीं हाडें दिसत नाहीत, ज्याचे खांदे अत्यंत पुष्ट आहेत.

५६. **महाबाहुः** ( १।९ ); **आजानुबाहुः** ( १।१० ) = ज्याचे बाहु मोठे आहेत व गुडघ्यापर्यंत ज्याचे बाहु-हात-लांब आहेत.

५७. **पीनवक्षाः** ( १।११ ); **महोरस्कः** (१।९); **विपुलांसः** (१।९)= वक्षःस्थल, ऊर व खांदे ज्याचे पुष्ट आहेत.

५८. **विशालाक्षः** ( १।११ )= ज्याचे डोळे मोठे तेजस्वी आहेत.

*

## शरीरसौंदर्य

५९. **प्रियदर्शनः** ( १।३;१६;८ ) सोमवत् **प्रियदर्शनः** ( १।१८ )= जो दिसावयास चांगला आहे. सर्वांस प्रेम वाटावें, अशी ज्याची मूर्ति आहे.

६०. **द्युतिमान्** ( १।३;८ )= जो तेजस्वी आहे.

वाल्मीकींनी मनामध्ये आणलेला, नारदमुनींनी वर्णिलेला व पुढे वाल्मीकींनी ज्याचें वर्णन सर्व रामायणांत केलें आहे, तो आदर्श पुरुष अशा व इतक्या गुणांनी युक्त असला पाहिजे, असें या ऋषींनी स्पष्ट शब्दांनी वर्णिलें आहे.

आर्यांचा हा **आदर्श पुरुष** आहे. आपली पुढील पिढी अशी तयार केली पाहिजे. रामायणानें हा आदर्श आमच्या सर्वांपुढे ठेवला आहे. आणखी कांहीं उत्तम गुण कोणास सुचले, तर ते त्यांनी यामध्ये घालावे व असा आदर्श प्रत्येक स्त्रीपुरुषानें आपल्यापुढे ठेवावा.

राजा दशरथ व त्याच्या राण्या यांच्यापुढे यज्ञाच्या कार्यक्रमामधील पुराण-कथा श्रवणाच्या रूपानें हा आदर्श ठेवला गेला व गरोदरपणीं जो आदर्श पुढे असतो, तसा पुत्र होतो. या नियमानुसार राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न ही आदर्श वीरसंतति निर्माण झाली.

धर्माप्रमाणे क्षत्रिय–कुमारांचे जे जे संस्कार करावयाचे ते सर्व यांचे केले होते. नव्या नवसांनी व यज्ञयाग करून दशरथाला हे पुत्र झालेले असल्यामुळे व दशरथाचे कुलगुरु ब्रह्मर्षि व ब्रह्मनिष्ठ वसिष्ठ ऋषि असल्यानें रामादि राजपुत्रांचे वैदिक संस्कार झालेच असले पाहिजेत, हें उघड आहे.' **तेषां जन्मक्रियादीनि सर्वकर्माण्यकारयत् ।**' ( वा. रा. बा. का. १८।२३ )

'जातकर्मादि करावयाचे संस्कार मोठ्या थाटमाटानें केले,' असा मोघम उल्लेख रामायणांत आहे. नवसानें 'होणाऱ्या मुलाचे लाड त्याचे आईबाप करतातच व त्याचे संस्कारहि आस्थेनें करविले जातात. मग सम्राट् दशरथाच्या घरीं कशाची ददात होती की, ज्या कारणामुळे या वीरपुत्रांचे संस्कार झाले कीं न झाले, अशी शंका उत्पन्न होऊं शकेल ? अर्थात् जरी संस्कार केल्याचा प्रत्येकीं उल्लेख नसला, तरी जातकर्मापासून उपनयनापर्यंत करावयाचे यांचे सर्व संस्कार झालेच पाहिजेत,

यांत शंका नाही.

रामाच्या उपनयनाचा उल्लेख वाल्मीकि रामायणांत नाही; पण तो आनन्द-रामायणांत असून, तेथे सहाव्या वर्षी रामाचें उपनयन झालें, असें म्हटलें आहे व तें सयुक्तिकहि दिसतें. पहा.

## श्रीरामाचें ब्रह्मचर्य.

**श्रीरामाचा** विवाह त्याच्या वयाच्या १६ व्या वर्षी झाला. तेव्हा **श्रीरामानें ब्रह्मचर्य** किती वर्षे पालन केलें? असा प्रश्न उपस्थित होतो. त्यास ब्रह्मचर्याचा काल "**उपनयनापासून दारपरिग्रहापर्यन्त.**" दार–परिग्रह म्हणजे विवाह; पण श्रीरामाचें उपनयन झाल्याचाच उल्लेख वाल्मीकि रामायणांत कोठे नाही. तर काय श्रीरामाचें उपनयनच झालें नव्हतें, कीं कसें? पण ही शंकाच संभवत नाही. कारण बालकाण्डामध्ये नारद वाल्मीकीला रामाचे गुणवर्णन करीत असतां सांगत आहेत की, "**वेदवेदाङ्गतत्त्वज्ञो धनुर्वेदे च निष्ठितः**" (बा. का. १।१४) म्हणजे राम हा वेद आणि वेदांगांचा ज्ञाता आहे. पुन्हा अयोध्याकाण्ड, सर्ग २ श्लोक ३४ मध्ये श्रीरामासंबंधांत तो "**सम्यक् विद्याव्रतःस्नातः यथावत् सांगवेदवित्**" असल्याचें म्हटलें आहे. तसेंच मारुति अशोकवाटिकेंत सीतेपुढे जाऊन मी रामाचा दूत तुझ्या शोधार्थ श्रीरामाकडून आलों आहें, असें म्हणाला, त्या समयीं सीतेने श्रीरामाच्या खाणाखुणा विचारल्यावरून तिला—

**यजुर्वेदविनीतश्च वेदविद्भिः सुपूजितः ।**
**धनुर्वेदे च वेदे च वेदांगेषु च निष्ठितः ॥**

(सुन्दरकाण्ड, सर्ग ३५, श्लोक १४)

म्हणजे, श्रीराम मोठमोठ्या **वेदवेत्त्या ऋषींनादेखील मान्य** असा यजुर्वेदामध्ये विद्वान् असून, धनुर्वेद व वेदांगें यांमध्येही पूर्ण निष्णात असल्याचें मारुति सांगत आहे. त्याचप्रमाणे अयोध्याकाण्ड, सर्ग ८२, श्लोक ११५ मध्ये भरत म्हणत आहे की,

**चरितब्रह्मचर्यस्य विद्यास्नातस्य धीमतः ।**
**धर्मे प्रयतमानस्य को राज्यं माद्विधो हरेत् ॥**

म्हणजे "गुरुकुलांत वास्तव्य करून ब्रह्मचर्य ज्याने पालन केलें आहे व जो विद्याव्रतस्नात आहे, त्याचें राज्य माझ्यासारखा कोण बरें हरण करील ? कोणी-ही करणार नाही."

हीं जीं प्रमाणें वर दिलीं आहेत, त्यांवरून **श्रीराम** सर्व वेद व वेदांगें उत्तम प्रकारें पढलेला होता. यजुर्वेदामध्ये तर सर्व **ब्रह्मर्षींनादेखील मान्य** असा श्रेष्ठ प्रतीचा विद्वान् होता. त्याने गुरुकुलवासपूर्वक यथाविधि ब्रह्मचर्य पालन केलें होतें व यथाविधि व्रतपालनपूर्वक वेदाभ्यास समाप्त करून, तो "**विद्याव्रत-स्नात**" झाला होता. त्यास ब्रह्मचर्यव्रतपूर्वक वेदाध्ययनाचा अधिकार उपनयन संस्कार झाल्यावाचून तर प्राप्त होंतच नाही. तेव्हा अर्थात् **श्रीरामाचें उप-नयन झालें असलेंच** पाहिजे.

श्रीरामाचा जन्म झाल्यावर त्यासह इतर तिघांही भावांचे **जातकर्मादि सर्व संस्कार** वसिष्ठाने दशरथ राजाकडून करविले. या संबंधांचा उल्लेख बाल-काण्ड सर्ग १८ मधील श्लोक २३ मध्ये "**तेषां जन्मक्रियादीनि सर्व-कर्माण्यकारयत्**" असा आहे. त्यावर "**जन्मक्रियादीनि तदाद्यन्त उपनयनान्तानि,**" म्हणजे जातकर्मापासून आरंभ करून नामकरण, अन्न-प्राशन, चौल, उपनयनान्त सर्व संस्कार वसिष्ठाने राजा दशरथाकडून करविले, असें टीकाकार म्हणत आहेत. तात्पर्य, श्रीरामाचें उपनयन निश्चयपूर्वक झालें, यांत शंका घेण्याचें कारणच उरत नाही.

आता प्रश्न एवढाच उरतो की, तें उपनयन कितव्या वर्षी झालें ? त्यास गृह्यसूत्राप्रमाणे—

> **"अष्टमे ब्राह्मणं उपनायीत गर्भाष्टमे वा, एकादशे क्षत्रियम्, द्वादशे वैश्यम् ।"**

म्हणजे सातव्या किंवा आठव्या वर्षी ब्राह्मणाचें उपनयन करावें, दहाव्या किंवा अकराव्या वर्षी क्षत्रियाचें उपनयन करावें व अकराव्या किंवा बाराव्या वर्षी वैश्याचें उपनयन करावें. मानवधर्मशास्त्रही "**गर्भात् एकादशे राज्ञः**" म्हणजे अकराव्या वर्षी क्षत्रिय-कुमाराचें उपनयन करावें, असें सांगत आहे. यावरून श्रीरामाचें उपनयन दहाव्या किंवा अकराव्या वर्षी झालें असावेंसें दिसतें; पण

दहाव्या अकराव्या किंवा वर्षीं उपनयन व लागलीच पंधराव्या वर्षीं विवाह म्हणजे रामाच्या ब्रह्मचर्यपालनाला शास्त्रोक्त काल मिळत नाही; म्हणजे धर्महानीचा प्रसंग येतो. धर्मशास्त्रानुसार—

**षट्त्रिंशदाब्दिकं चर्यं गुरौ त्रैवेदिकं व्रतम् ।**
**तदर्धिकं पादिकं वा ग्रहणान्तिकमेव वा ॥**

( मनु० अध्याय ३, श्लोक १ )

म्हणजे प्रत्येक वेदाला **बारा वर्षें**, याप्रमाणे तीन वेदांना मिळून छत्तीस वर्षें, किंवा प्रत्येकीं **सहा वर्षें**, म्हणजे तीन वेदांना मिळून अठरा वर्षें, अथवा प्रत्येक वेदाला **तीन वर्षें**, म्हणजे तीन वेदांना **मिळून नऊ वर्षें** तरी ब्रह्मचर्य पालन केलें पाहिजे, किंवा वेदग्रहण होईपर्यंतच पालन करावें, अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. आता, ज्या अर्थीं श्रीरामाचा विवाहच सोळाव्या वर्षीं झाला आहे, त्या-अर्थीं अधिकांत अधिक नऊ वर्षांपेक्षा अधिक काळ श्रीरामाच्या ब्रह्मचर्याला मिळूंच शकत नाही. आणि **नऊ वर्षें ब्रह्मचर्य** म्हटलें म्हणजे श्रीरामाचें उप-**नयन पांचव्या** किंवा **सहाव्या वर्षीं** व्हावयास पाहिजे, तर पांचव्या किंवा सहाव्या वर्षीं उपनयनास शास्त्राधार आहे काय ? त्यास—

**ब्रह्मवर्चसकामस्य कुर्यात् विप्रस्य पञ्चमे ।**
**राज्ञो बलार्थिनः षष्ठे वैश्यस्येहार्थिनोऽष्टमे ॥ ३७ ॥**

( मनु० अध्याय २ )

म्हणजे, **ब्राह्मतेज** संपादन करण्याची इच्छा असणाऱ्या **ब्राह्मणकुमाराचें** उपनयन पांचव्या वर्षीं करावें, बल म्हणजे **क्षात्र तेज** संपादन करण्याची इच्छा असणाऱ्या **क्षत्रिय-कुमाराचें** उपनयन सहाव्या वर्षीं करावें व **लक्ष्मी-प्राप्तीची** इच्छा असणाऱ्या **वैश्यकुमाराचें** उपनयन आठव्या वर्षीं करावें, अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. तदनुसार **सहाव्या** वर्षीं श्रीरामाचें उपनयन झालें असलें, तर **सोळाव्या वर्षीं** विवाह होईपर्यंत **चांगलीं नऊ वर्षें ब्रह्मचर्य**पालनास मिळतात. म्हणजे प्रत्येक वेदाला तीन वर्षेंप्रमाणें अगदी **स्मृत्युक्त काल श्रीरामाला** ब्रह्मचर्यपालनाला मिळतो. म्हणजे **श्रीरामा-ने नऊ वर्षें शास्त्रोक्त विधीने ब्रह्मचर्य पालन केलें** आहे, असें मान-

ण्यास प्रत्यवाय नाही. आणि म्हणूनच **"चरित-ब्रह्मचर्यस्य विद्यास्नातस्य धीमतः"** म्हणून भरताने म्हटलें आहे, तें योग्यच आहे. श्रीरामासंबंधाने जें म्हटलें आहें, तेंच भरतादि तीनही बंधूसंबंधांत सत्य समजावयाचें. पुढे विवाहाचे समयीं रामादि चारही बंधूंचा **"गोदान"** म्हणजे **समावर्तनसंस्कार** मिथिलेमध्ये झाला आहे, त्या समयीं **राम, लक्ष्मण, भरत** व **शत्रुघ्न** या प्रत्येकाचे हातून **एक एक लक्ष गोदान दशरथाने** करविलें आहे. त्या संबंधांत असा उल्लेख आहे—

**स गत्वा निलयं राजा श्राद्धं कृत्वा विधानतः।**
**प्रभाते काल्यमुत्थाय चक्रे गोदानमुत्तमम् ॥ २१ ॥**
**गवां शतसहस्रं च ब्राह्मणेभ्यो ददौ मुदा ।**
**एकैकशो ददौ राजा पुत्रान् उद्दिश्य धर्मतः॥ २२ ॥**

( बालकाण्ड, सर्ग ७२ )

**आनंदरामायणामध्यें** श्रीरामादि बंधूंचा उपनयनसंस्कार **सहाव्या वर्षी** झाल्याचा स्पष्ट उल्लेख आहे, तो असा—

**अथ पित्रोपनीतास्ते गुरुणा मुनिभिर्मुदा ।**
**गर्भात्संवत्सरे षष्ठे जन्मतः पंचमे समे ॥ १२६ ॥**

( आनंदरामायणसार—काण्ड, सर्ग २ )

येणेप्रमाणे **आश्रमधर्मानुसार** श्रीरामाचें **ब्रह्मचर्य नऊ वर्षें** पालन झालें. पुढे विवाहसमयीं सीतेला सातवें वर्ष होतें, त्या मानाने सीतेला ऋतुप्राप्त होईपर्यन्त पुढे आणखी **आठनऊ** वर्षें गेलीं म्हणजे राम **चोवीस—पंचवीस** वर्षांचा होईपर्यंत त्याचें ब्रह्मचर्य पालन झालें.

याप्रमाणे राम आदिक राजकुमाराचें सहाव्या वर्षी उपनयन होऊन, त्यांच्या वयाला पंधरा वर्षें होईपर्यंत म्हणजे सुमारें नऊ वर्षें, वसिष्ठांच्या गुरुकुलामध्ये राहून असो, अथवा वसिष्ठांच्या निरीक्षणाखाली दशरथाच्या राजवाड्यांत राहून असो, त्यांचें सर्व अध्ययन झालें. वेदवेदाङ्गें व धनुर्वेद यांचें हें अध्ययन आहे. सर्व रामायणांत यांचें अध्ययन कोठे झालें, तें लिहिलेलें नाही; पण अयोध्येजवळच कुलगुरु वसिष्ठ ऋषींचा आश्रम होता व या गुरुकुलामध्ये हजारो ब्रह्मचारी

शिकत होते. अशा गुरुकुलांत रहावयाचें सोडून इतर कोठें राम आदि राजकुमारांचें अध्ययन होईल, हें संभवनीय दिसत नाही.

असो. पंधराव्या वर्षापर्यंत या चारहि राजकुमारांचें अध्ययन झालें. हे पंधरा वर्षांचे झाले, असें पाहून राजा दशरथ यांच्या विवाहाचा विचार करूं लागला. या वेळीं हें वय विवाहाला योग्य समजलें जाई, असें दिसतें.

या ठिकाणीं वा० रामयणांत नसलेला असा थोडासा कथाभाग योगवासिष्ठांत आहे. योगवासिष्ठ हा ग्रंथही वाल्मीकि–मुनिप्रणीतच आहे, असें समजण्यांत येतें. या योगवासिष्ठांत असलेला कथाभाग असा आहे.

( योगवासिष्ठ वैराग्य० सर्ग ३ ) ब्रह्मचर्याश्रमांतील सर्व अध्ययन संपवून राम घरीं परत आला व आनंदानें कालक्रमणा करूं लागला. कांही वेळानें तो राजा दशरथाला म्हणाला की–' हे तात! माझें अध्ययन पूर्ण झालें आहे, आता राज्याचें काम पहावयास लागण्यापूर्वी सर्व देश पाहून यावे, असें मला वाटतें, तर त्यासाठीं आज्ञा मिळावी.'

रामाची ही इच्छा योग्य असल्यानें ती अमान्य करण्याचें दशरथाला कांही कारण दिसलें नाही व त्यानें त्याला अनुमोदन दिलें. रामाचे बंधु, वसिष्ठ ऋषींनीं दिलेले सूज्ञ विप्र, कांही निवडक दुसरे राजकुमार व कांही सरदार, इतक्या परिवारासह रामचन्द्र देशनिरीक्षणासाठीं निघाले व सर्व देश, सर्व तीर्थें व ऋषींचे आश्रम पाहून सुमारें एक वर्षाच्या आंतच ही सर्व मण्डळी परत अयोध्येस आली. या वेळीं रामाचें सोळावें वर्ष संपण्याची वेळ आली होती. (यो. वा. वै. स.४)

राजा दशरथ आता राजकुमारांच्या विवाहाचा विचार करूं लागला. इकडे रामाच्या मनावर या प्रवासानें फारच अनिष्ट संस्कार घडून, रामाच्या मनाला फारच खिन्नता वाटूं लागली व त्याचें मन कशांतही रमेना. रात्रंदिवस तो चिंतातुर दिसूं लागला व काळजीमुळे तो खंगतहि चालला. त्यामुळे सर्वांस मोठी काळजी उत्पन्न झाली.

रामानें या प्रवासामध्यें सर्व तीर्थें, क्षेत्रें व राज्यें पाहिलीं; ऋषि, मुनि व विद्वान् लोकांच्या गाठीभेटी घेतल्या, राजांकडून होणारा सन्मान स्वीकारला, हें सर्व होत असतां राक्षसांचा प्रतिकार करण्याचें कोणामध्येंच सामर्थ्य नाही, हें त्यानें

प्रत्यक्ष पाहिलें व आपल्या दुर्बलतेची कीव त्याच्या मनांत उत्पन्न झाली व त्यामुळे राम उदास झाला. सर्व विश्व त्यास उदास व नीरस वाटूं लागलें. त्यास जगाचा वीट आला.

दशरथाने नाना प्रकारें विचारलें; पण ' मला कांही होत नाही. ' असें त्याने मोघम उत्तर द्यावें, यापेक्षा राम अधिक कांहीं बोलत नसे. शेवटीं दशरथाने आपले कुलगुरु वसिष्ठ यांना विचारलें, तेव्हा ते दशरथास म्हणाले की, 'रामाच्या खेदाचें कांहीतरी विशेष कारण असेल. थोर पुरुष अल्प कारणाने शोक, मोह करीत बसत नसतात. रामासारख्या थोर पुरुषाचें खेदाचें कारण कांहीतरी तसेंच विशेष महत्त्वाचें असेल; पण हे राजा ! आपण याविषयी तूर्त कांही विचार करूं नये. योग्य वेळ येतांच आम्ही त्याचा उपाय करूं.' ( यो. वा. वै. स. ५ )

वसिष्ठ ऋषींच्या विश्वासांतले ब्राह्मण रामाबरोबर प्रवासांत गेलेले होते. त्यांनी घडलेला सर्व वृत्तांत वसिष्ठांस सांगितला होता. त्यामुळे रामाची खिन्नता कशामुळे झालेली आहे, हें वसिष्ठांनी जाणलें होतें.

इतक्यांत दशरथाला भेटण्यासाठी विश्वामित्र ऋषि आले. दशरथ राजाने त्यांचा आदरसत्कार केला व येण्याचें काय कारण आहे, तें विचारलें. तेव्हा विश्वामित्राने सांगितलें की, ' यज्ञरक्षणासाठी रामलक्ष्मणाला दे. ' हें ऐकून दशरथाला मूर्च्छा आली. शुद्धीवर आल्यानंतर दशरथाने सांगितलें की, ' रामलक्ष्मण लहान आहेत, म्हणून त्यांस देतां येत नाहीं. ' हें ऐकून विश्वामित्र खवळला व वचनभंगाचें पातक करून सुखाने रहा, असें क्रोधाने बोलला.

वसिष्ठ या वेळीं पुढे होऊन राजास म्हणाले की, 'हे राजा ! विश्वामित्र ऋषि मंत्र व शस्त्रास्त्र या विद्येंत प्रवीण आहेत. या कारणाने रामलक्ष्मणांला त्यांच्याबरोबर पाठवण्यांतच या राजपुत्रांचें फार मोठें कल्याण होणार आहे.' ( यो. वा. वै. स. ९ )

वसिष्ठांचें भाषण ऐकून राजास समाधान वाटलें व त्याने रामाला बोलावून आणण्यासाठी प्रतीहारीला पाठवलें. त्याने परत येऊन रामाच्या उदासीनतेचें वर्णन केलें व कोणीतरी सदुपदेशाने रामाची ही खिन्नता दूर करावी, असें म्हटलें. ( यो. वा. वै. सर्ग १० )

हें सर्व ऐकून विश्वामित्र ऋषि म्हणाले की, " आम्ही रामाची उदासीन वृत्ति समूळ नाहीशी करून टाकूं व त्याला पूर्ण उत्साही बनवूं. त्याला इकडे घेऊन तर या. " याप्रमाणे ऋषींची आज्ञा होतांच राम आला व सर्वांना वंदन करून आपल्या जाग्यावर बसला. विश्वामित्राने त्याच्या उदासीनतेचें कारण विचारलें, तें सविस्तर रामाने निवेदन केलें. ( यो. वा. वै. स. ११-३१ ) या सांगण्याचें तात्पर्य असें की, ' सर्व संसार असार आहे, तेव्हा यासाठी या संसारांत राहून कांहीतरी करावेसें मला वाटत नाही. मला याचा वीट आला आहे. '

रामाचें भाषण ऐकून विश्वामित्रांनी कुलगुरु वसिष्ठांस विनंती केली की, त्यांनी श्रीरामाला मोक्षशास्त्राचा उपदेश या वेळीं करून त्याचा खेद दूर करावा. ( यो. वा. मु. स. ३ )

या विनंतीला मान देऊन कुलगुरु वसिष्ठ ऋषींनी जो उपदेश रामाला केला, तेंच योगवासिष्ठ होय. हा सर्व उपदेश ऐकून श्रीरामचन्द्राचा संशय व खेद दूर झाला व तो असें म्हणाला की-

**नष्टो मोहः, पदं प्राप्तं, त्वत्प्रसादान्मुनीश्वर ।**
**संपन्नोऽहमहं सत्यमत्यन्तमवदातधीः ॥**
**स्थितोऽस्मि गतसन्देहः स्वभावे ब्रह्मरूपिणि ।**
**निरावरणविज्ञानः करिष्ये वचनं तव ॥** ( यो. वा. )

'माझा मोह नष्ट झाला, मला अक्षय्य पद प्राप्त झालें. हें सर्व, हे कुलगुरो ! आपल्या प्रसादानें झालें आहे. मी आता सर्व शक्तींनी संपन्न झालों आहें. मीच सत्यस्वरूप असून, शुद्ध बुद्धीने युक्त आहें, माझा सर्व संशय दूर झाला असून, आता मी आपल्या स्वतःच्या ब्रह्मरूपामध्ये स्थिर झालों आहें, मी आता सर्व बंधनांपासून दूर झालों असून, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणे करण्यास तयार आहें.'

रामाला आपण बद्ध आहों, संदेहमग्न आहों, अल्प आहों, शक्तिहीन आहों, असें वाटत होतें; त्या ठिकाणीं या उपदेशाने त्यास आता आपण मुक्त आहों, संदेहरहित झालों आहों, महान् आहों व सर्व शक्तींचें केन्द्र आहों, असें वाटावयास लागलें. हा आत्मज्ञानाचा प्रभाव आहे. रामाची वृत्तिपालट या वेळीं झाली. त्याला नवी दिव्य दृष्टि प्राप्त झाली व उत्साहाचा सूर्य त्याच्या अन्तःकरणांत

चमकूं लागला !

वसिष्ठ व विश्वामित्र या दोन ऋषींनी हें परिवर्तन रामाच्या अन्तःकरणांत घडवून आणलें. योग्य वेळ आली असतां आपण उपाय करूं, असें जें वसिष्ठांनी राजा दशरथाला सांगितलें होतें, तें या वेळीं त्यांनी घडवून आणलें व खिन्न रामाचा ' **उत्साहमय विजयी राम** ' बनवला गेला.

राजकुमारांची तरुण पिढी नवीन विचारांनी भारून ती विशेष रीतीनें तयार करावी, असें जें ऋषींच्या मनांत होतें, त्याला येथे मूर्त रूप आलेलें दिसत आहे. अशा रीतीने रामलक्ष्मण विजयी विचारांनी संपन्न झाले.

राजा दशरथाने त्यांस विश्वामित्रांबरोबर जाण्यास आनंदाने अनुज्ञा दिली व ते त्या ऋषीबरोबर जाऊं लागले. ( वा. रा. बा. कां. २२।१–५ )

वर जो योगवासिष्ठांतील इतिहास दिला आहे, तो या ठिकाणीं विचारांत घेतला असतां, त्या वेळची आर्यजनता कशी हताश झाली होती व रावणाचा धाक सर्वत्र कसा पसरला होता, हें त्यावरून कळून येणें शक्य आहे.

श्रीरामचन्द्राने आपल्या उदाहरणाने आपल्या पिढीमध्ये नवा जोमदार आत्मविश्वास उत्पन्न केला. हें महत्त्वाचें स्थित्यंतर रामाने घडवून आणलें, हेंच रामचरित्राचें महत्त्व आहे.

रामलक्ष्मण विश्वामित्राबरोबर निघाले. ते तीनचार कोस चालून सरयू नदीच्या तीरावर त्या रात्रीस राहिले. या रात्रीला रामलक्ष्मणांनी गवत पसरून त्यावर निद्रा केली आहे. सम्राटाचे आवडते राजपुत्र, राजधानीपासून थोड्या अंतरावर जातात, तेथे त्यांबरोबर नोकरचाकर कोणीहि असत नाही. फारसे कपडेही नसतात. एखादें कांबळें किंवा शालही नसते. ऋषि जसें गवत पसरून निजतात, तसें राजकुमारही निजतात. ते राजपुत्र कुरकुर करीत नाहीत, ही गोष्ट येथे खरोखरच विचार करण्यासारखी आहे. यावरूनच रामलक्ष्मण हे १५ वर्षेपर्यंत गुरुकुलाच्या शिस्तींतच वाढवले गेले होते, असें वाटतें. नाहीतर एवढ्या १६ वर्षांच्या वयापर्यंत जर ते मऊ बिछान्यावरच निजण्याच्या सवयीने वाढलेले असते, तर त्यांस एकदम उघड्यांत नुसत्या गवतावर झोप येणें शक्य झालें नसतें. ज्या अर्थी ते तेथे आनन्दाने राहिले, त्या अर्थी अशा आरण्यक जीवनाची

त्यांस गुरुकुलांतच सवय झाली होती, हें उघड आहे.

यापुढचा रामलक्ष्मणांचा कार्यक्रम क्रमानें कसकसा होत गेला, तो संक्षेपानें पाहूं व त्यानंतर ऋषींच्या सहवासानें त्यांस काय काय लाभ झाला, तेंही पाहूं. म्हणजे ऋषींच्या आकांक्षा काय होत्या, तेंहि आपणांस समजेल.

## दिनचर्या.

श्रीराम व लक्ष्मण मखरक्षणार्थ विश्वामित्राबरोबर अयोध्येहून निघाले, त्या दिवसापासून श्रीरामाचा सीतेशीं विवाह होईपर्यंतची त्यांची दिनचर्या अशी होती—

( १ ) श्रीराम व लक्ष्मण विश्वामित्राबरोबर अयोध्येहून शुक्लपक्षाच्या षष्ठीला निघाले. दीड योजन मार्ग चालून गेल्यावर शरयू नदीच्या दक्षिण तीरावर प्राप्त झाले. तेथें विश्वामित्रानें श्रीरामाला **बला** व **अतिबला** या विद्या दिल्या ( श्लोक १३, सर्ग २२ ) व त्या रात्रीं शरयूच्या दक्षिण तीरावरच **पहिला दिवस** झाला. ( सर्ग २२, श्लोक २३ )

( २ ) **दुसऱ्या दिवशीं** तेथून शरयू व भागीरथी यांच्या संगमावर कामाश्रमामध्यें रात्रौ वास्तव्य. ( शुक्ल ७ **सप्तमी** ) हा **दुसरा दिवस** होय.

( ३ ) **तिसऱ्या दिवशीं** ( शुक्ल ८ **अष्टमीला** ) नावेंत बसून गंगापार होऊन, दक्षिणेकडे ताटकावनांत शिरले. तेथें सायंकालचे सुमारास ताटका राक्षसीचा वध केला आणि रात्रौ तेथेंच (ताटकावनांतच ) राहिले. हा **तिसरा दिवस** होय.

( ४ ) **चवथ्या दिवशीं** प्रातःकालीं ( **शुक्ल ९ नवमीला** ) विश्वामित्रानें ताटकावनांतच श्रीरामाला प्रयोग—उपसंहारासह अस्त्रदान केलें व तेथून प्रयाण करून ते सर्व सिद्धाश्रमास ( विश्वामित्राच्या आश्रमास ) येऊन प्राप्त झाले. **हा चवथा दिवस.**

( ५ ) याच दिवशीं ( शुक्ल ९ नवमीला ) विश्वामित्रानें **यज्ञदीक्षा** घेतली, व शुक्ल ( १० ) दशमीपासून पूर्णिमेपर्यन्त सहा दिवस व सहा रात्रीं यज्ञ झाला. सहाव्या म्हणजे **पूर्णिमेच्या रात्रीं** मारीच राक्षसाचा पराभव व सुबाहु आदि राक्षसांचा संहार झाला.

( ६ ) कृष्ण **प्रतिपदेला** यज्ञसमाप्ति. त्यानंतर मिथिलेस जाण्याच्या तयारी-साठीं आश्रमांतील सर्व सामानाची आटपाआटप, गाड्या भरणें इत्यादि कामांत तीन दिवस गेले. वद्य ५ **पंचमीला** सिद्धाश्रमांतून निघाले व सायंकाळीं सूर्य अमळ कलला असतां शोणानदीचे **तीरावर वास्तव्य झालें.**

( ७ ) दुसरे दिवशीं म्हणजे **वद्य ६ षष्ठीला** पुढे गंगेच्या तीरावर वास.

( ८ ) तदनंतर **वद्य ७ सप्तमीला** विशाला नगरींत एक रात्र वास्तव्य झालें.

( ९ ) **वद्य ८ अष्टमीला** प्रातःकाळीं विशाला नगरीहून निघाले, ते मार्गात गौतमाश्रमांत **अहल्येचा उद्धार** करून, सायंकाळच्या आधींच मिथिलेला पोहोंचले व **जनकास भेटले.**

( १० ) वद्य **९ नवमीला धनुर्भंग.** मिथिलेहून जनक राजाकडून दशरथाकडे दूत पाठविणें. ते दूत तीन रात्रीं वाट चालल्यावर वद्य १२ **द्वादशीला अयोध्येस** पोहोंचले. **वद्य त्रयोदशीस** दशरथ राजा अयोध्येहून निघाला तो चार दिवसांनी म्हणजे **शुक्ल प्रतिपदेला** मिथिलेस पोहोंचला. शुक्ल तृतीयेला "**गोदान**" संस्कार म्हणजे रामलक्ष्मणादिकांचें " समावर्तन" झालें, व शुक्ल ५ **पंचमीला श्रीरामाचा सीतेशीं विवाह झाला.** त्याच दिवशीं **लक्ष्मण, भरत** व **शत्रुघ्न** यांचेही विवाह झाले.

( ११ ) हा **विवाह** शुक्ल **पंचमीस उत्तरा फाल्गुनी** नक्षत्रावर झाला आणि तत्पूर्वी शुक्ल **तृतीयेला " गोदान** म्हणजे **समावर्तनसंस्कार " मघा** नक्षत्रावर झाला, असें--

**मघा ह्यद्य महाबाहो तृतीयदिवसे प्रभो ।**
**फल्गुन्यां उत्तरे राजन् तस्मिन्वैवाहिकं कुरु ॥**

( बालकाण्ड, सर्ग ७१, श्लोक १४ )

या महर्षींच्या वचनावरून दिसतें. यास--

**सूर्याया वहतुः प्रागात् सविता यवमासृजत् ।**
**मघासु हन्यन्ते गावः फल्गुनीषु व्युह्यते ॥**

( अथर्व० १४-१-३ )

ही **अथर्व श्रुति** प्रमाण आहे.

यज्ञसमाप्तीनंतर शोणातीरावर जो वास झाला आहे, तेथे गोष्टी सांगतां सांगतां बरीच रात्र झाली, असें विश्वामित्राच्या, ( वा. रा. बाल. कां. ३४।१४ )

**" गतोऽर्धरात्रः काकुत्स्थ कथाः कथयतो मम ।**
**निद्रामभ्येहि भद्रं ते माभूत् विघ्नोऽध्वनीह नः ॥ "**

या वाक्यावरून दिसून येतें. त्यास बरीच रात्र म्हणजे सूर्यास्तानंतर किती घटिका ? या संबंधांत श्लोक १४ च्या टीकेंत गोविंदराज म्हणतो– " **अर्ध-शब्दः अत्र अंशवाचि** " इति **यावति रात्रिभागे निद्रा निषिद्धा तावति गतः इत्यर्थः** " यावरून रात्रीचा **पहिला प्रहर** तरी उलटून गेला होता, हें सिद्ध होतें. अर्थात् पुढच्या श्लोकाच्या टीकेंत. " **तत्र पौर्णमास्यां समाप्य द्वितीयायां प्रस्थानम् इति चतुर्घटिकाऽनन्तरं चन्द्रोदयः इति सर्वथा अर्धरात्रशब्दः प्रदोषपर एव** " असें जें म्हणत आहे, तें बरोबर नाहीं; कारण, चार घटिका रात्र झाली असतां. " **गतोऽर्धरात्रः** " म्हणजे अर्धी रात्र झाली किंवा होत आली असें म्हणत नाहीत, व केव्हांही म्हणतां येणार नाही. त्यास पहिला प्रहर उलटून जाऊन दुसऱ्या प्रहराचाही कांहीं काळ व्यतीत झाला असला पाहिजे. तो काळ पहिल्या प्रहराच्या समाप्तीपूर्वी म्हणजे चार घटिकांचा असणें शक्य नाही. अर्थात् तिलक टीकाकारांच्या मतानुसार " **सार्धयामरूपः** " म्हणजे सरासरी **दीड प्रहर,** म्हणजे **१०।११ घटिका** रात्र व्यतीत झाली असली पाहिजे. त्यास १०।११ घटिका रात्रीं **चन्द्रो-**दय **( उत्तिष्ठते च शीतांशुः ) कृष्ण पंचमीच्या** आधीं होऊंच शकत नाहीं. या कारणास्तव सिद्धाश्रमांतून विश्वामित्र रामलक्ष्मणांसह निघाले, ते **कृष्ण पंचमीलाच** निघाले असले पाहिजेत. म्हणजे विश्वामित्रादिक ऋषींनी राम-लक्ष्मणासहवर्तमान मिथिलेकडे जें प्रयाण केलें, तें **कृष्ण पंचमीलाच** केलें, असें निश्चितपणें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

दुसरें, यज्ञसमाप्ति यद्यपि पूर्णिमेला किंवा अमावास्येला होत असते, तथापि त्या समाप्तीचा खरा दिवस तदुत्तरची **प्रतिपदाच** समजला जातो. या संबंधांत " **गौण्यावृत्त्या प्रतिपत् उच्यते** " असें **कात्यायन–गृह्यसूत्रांत** म्हटलें आहे. यावरून ही **कृष्ण प्रतिपदेला** यज्ञसमाप्ति झाली, हें सिद्ध आहे.

तदनंतर सारा **आश्रमचा आश्रम** बायकांमुलांसह रिकामा व्हावयाचा आणि १०० गाड्या भरून जावयाचें, म्हणजे हें कांही एका दिवसाचें काम नव्हे. दोन-तीन दिवस सहजपणें लागणारच. एवंच ही सर्व मंडळी मिथिलेस जावयास निघाली, ती **कृष्ण द्वितीयेस** निघाली नसून, **कृष्ण पंचमीस** निघाली, हेंच सयुक्तिक दिसतें व ग्रन्थांतील वर्णनाची संगति लागते. या कारणास्तव **कृष्ण पंचमी** हाच यज्ञसमाप्तीनंतर सिद्धाश्रमांतून प्रयाणाचा दिवस मानला आहे.

विवाहोत्तर अत्यन्त मौल्यवान् हिऱ्यामोत्यांचे अलंकार, हत्ती, घोडे, लक्षावधि गाई इत्यादि **कोट्यवधि मोलाचें कन्याधन** व शेकडो दासदासी आंदण म्हणून दिल्या गेल्या, त्यांचें **राजकीय रीत्या प्रदर्शन** व मेजवान्या इत्यादि समारंभांत कमींत कमी चारपांच दिवस लागले, असें मानलें, तर **शुक्ल दशमीला** दशरथ राजा **मुलें व सुना** यांना घेऊन मिथिलेहून अयोध्येस निघाला, तो पूर्ववत् चार दिवसांनी म्हणजे **शुक्ल १३ ला**-म्हणजे **पूर्ण पंधरा** दिवसांनी अयोध्येला परत येऊन पोहोचला असें दिसतें.

परशुराम व दाशरथी राम यांची भेट झाली ती मिथिलेहून निघतांच झाली असल्याने शुक्ल १० ला किंवा तत्पूर्वींच ते मिथिलेहून निघाले असले पाहिजेत.

राम, लक्ष्मण हे दोघे राजपुत्र विश्वामित्र ऋषींच्या जवळ केवळ एक महिना सवा महिनाच होते. या अल्पशा अवधींत विश्वामित्रांनी त्यांस अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें दिलीं, युद्धाचें शिक्षण दिलें, पूर्वींचे थोर पुरुषांचे इतिहास सांगून त्यांचा उत्साह वाढविला, इतकेंच नव्हे तर उत्तम कन्याशीं त्यांचा विवाह होईल, असा योगही जुळवून आणला. एका महिन्याच्या अवधींत हें इतकें काम रामासाठी यांनी केलें. राम घरीं राहिला असता, तर यांतलें त्यांस कांहीसुद्धा साधलें नसतें. यावरून ऋषींची दृष्टि कशी असे, तें समजण्यासारखें आहे.

श्रीराम आधी सर्व विद्यांमध्ये व धनुर्वेदामध्ये पारंगत झालाच होता, त्याची बुद्धि कुशाग्र होती, अशा उत्तम तरतरीत राजकुमारास हातीं घेऊन विश्वामित्रांनी कसा तयार केला, तें पहा-

## पहिला दिवस

अयोध्येच्या राजवाड्यांतून रामलक्ष्मणाला बाहेर काढलें व तीनचार कोस

अंतरावर असणाऱ्या सरयू नदीच्या तीरावर पहिली रात्र घालविली. घराकडून निघून, कांही तास झाले असतील, इतक्यांतच त्यांस '**बला आणि अतिबला**' विद्या दिल्या. विश्वामित्रांनी नदीतीरावर पोंचतांच 'आचमन कर' असें रामास सांगितलें. त्यानें हातपाय धुवून आचमन केलें. स्वतः विश्वामित्रांनींहि हातपाय धुतले व त्यास तेथल्या तेथेंच या विद्या दिल्या. राजकुमारानें तत्काल त्या आत्मसात् केल्या. ज्या विद्या रामास दिल्या त्या त्याच वेळीं लक्ष्मणासहि मिळाल्या आहेत. या विद्यांनी कोणते लाभ होणें शक्य होतें, तेंही येथे पाहण्यासारखें आहे.—

१. **न श्रमो न ज्वरः**– कितीहि कार्य करावें लागलें, तरी श्रम किंवा दमल्यासारखें वाटणार नाही, त्रास वाटणार नाही, अथवा कोणत्याच प्रकारचा तापही येणार नाही.

२. **न रूपस्य विपर्ययः**– अंगकान्तीमध्ये निस्तेजता येणार नाही, नेहमी शरीर तेजस्वी, उत्साही व तरतरीत राहील.

३. **न सुप्तं प्रमत्तं धर्षयिष्यन्ति नैऋताः**–निजलें असतां किंवा सावध नसतां राक्षस हल्ला करण्यास धजणार नाहीत.

४. **न बाह्वोः सदृशो वीर्यं पृथिव्यां कश्चन भवेत्**– बाहुबल सर्वांहून अधिक होईल.

५. **सौभाग्ये, दाक्षिण्ये, ज्ञाने, बुद्धिनिश्चये, प्रतिवक्तव्ये उत्तरे समः कोऽपि न भवेत्**– भाग्य, दक्षता, ज्ञान, निर्णायक बुद्धि, समयोचित उत्तर देणें, यांत कोणीहि बरोबरी करूं शकणार नाही.

६. **सर्व ज्ञानस्य मातरौ बला अतिबला च**– बला व अतिबला या दोन विद्या सर्व ज्ञानांचें मूल उत्पत्तिस्थानच आहेत. अर्थात् या दोन विद्या आल्या, म्हणजे बुद्धि तीव्र होते व सर्व विद्या सहज हस्तगत होऊं शकतात.

७. **न क्षुत्पिपासे**– तहान व भूक यांमुळे व्याकुलता येणार नाही, भूक लागली तरी लंघल्यासारखें वाटणार नाही.

८. **भुवि यशः भवेत्**– पृथ्वीवर यश वाढेल.

९. **तेजःसमन्विते विद्ये पितामहसुते**– या दोनही विद्या ब्रह्मदेवानें

निर्माण केल्या असून, या तेजोस्विता वाढवणाऱ्या आहेत.

या विद्या देत असतां विश्वामित्र ऋषि रामाला म्हणाले की, 'या विद्या घेण्यास तूं योग्य आहेस व तूं तपश्चरण करणारा असल्यामुळे तुला या प्राप्त झाल्या असतां अनेक रीतींनी त्या विद्यांची फार वाढ होईल.' हें ऐकून रामाने त्यांचें ग्रहण केलें. या विद्या त्याला मिळतांच त्याचें तेज वाढलें व तो फार शोभूं लागला.

टीकाकारांनी '**बला** आणि **अतिबला**' या मन्त्रसंग्रहरूप विद्या आहेत, असें म्हटलें आहे; पण कोणते ते मन्त्र, हें कांही कोणीहि सांगितलेलें नाही.

## देशहिताचें ध्येय; ( तिसरा दिवस. )

वरील विद्या देऊन दोन दिवसही झाले नाहीत, तोंच ताटिकावधाचा प्रसंग आला. या वेळीं स्त्रीवध करावा वा न करावा, हा बिकट प्रश्न रामापुढे येऊन उभा राहिला; पण या वेळीं देशकार्य व राष्ट्रकार्य करण्याविषयी रामाची बुद्धि तत्पर झाली असल्यामुळे व वरील विद्यांनी त्याची निर्णायक शक्ति वाढल्यामुळे ताटिकेचा वध केलाच पाहिजे, या विषयीचा निर्णय करणें त्यास कठीण गेलें नाही. विश्वामित्र ऋषि या वेळीं रामास सांगतात—

**गोब्राह्मणहितार्थाय जहि दुष्टपराक्रमाम् ।**
**नहि ते स्त्रीवधकृते घृणा कार्या नरोत्तम ।**
**चातुर्वर्ण्यहितार्थं हि कर्तव्यं राजसूनुना ॥**
**नृशंसमनृशंसं वा प्रजारक्षणकारणात् ।**
**पातकं वा सदोषं वा कर्तव्यं रक्षतां सदा ॥**
**राज्यभारनियुक्तानामेष धर्मः सनातनः ।**

(वा. रा. बा. कां. २७।१५-१९)

'गोब्राह्मणांचें हित करण्यासाठी या दुष्टेला ठार मार. स्त्रीचा वध कसा करूं, असें मनांत आणूं नकोस. चारहि वर्णांचें हित करण्यासाठी राजपुत्राने असलीं कामें केलींच पाहिजेत. प्रजारक्षणासाठी एखादे वेळीं क्रूर कर्महि करावें लागतें, तसेंच सौम्य कामही करावेंच लागतें. ज्याच्यावर राज्याचा भार असतो त्याने, प्रजेच्या रक्षणासाठी सदोष किंवा पापयुक्त कर्म करावें लागलें, तर तें केलेंच

पाहिजे. हा क्षात्रियाचा सनातन धर्मच आहे. '

विश्वामित्र रामाला देशहिताचा उपदेश कसा करीत आहे, तें पहा. प्रथम विद्या दिली व त्या विद्येचा प्रयोग करण्याचा प्रसंग येतांच तो करण्यास राजपुत्रांस उत्तेजन देत आहे. स्त्रीवध करावा कीं न करावा, याविषयी प्रथमतः रामाचा निर्णय होईना, मन डळमळूं लागलें. स्त्रीवर शूरानें शस्त्र कसें फेकावें, या विचारांत राम आहे, असें पाहून विश्वामित्रांनी पूर्वीच्या दोन कथा सांगितल्या. (१) इन्द्रानें विरोचन राक्षसाची कन्या मन्थरा पृथ्वीचा नाश करावयास लागली, म्हणून ठार केली; व (२) विष्णूनें भृगुपत्नी व शुक्रमाता इन्द्राचा नाश करावयास तयार झाली तेव्हा ठार केली. या दोन कथा सांगून, देशहितासाठी स्त्रीला ठार मारण्यास हरकत नाही, असें समजावून दिलें. तेव्हा राम म्हणतात–

**गोब्राह्मणहितार्थाय देशस्य च हिताय च ।**
**तव चैवाप्रमेयस्य वचनं कर्तुमुद्यतः ।** (वा. रा. बा. कां. २६।५)

' गोब्राह्मणांचें कल्याण व्हावें व देशाचें हित साधावें, विश्वामित्रासारख्या थोर सत्पुरुषाची आज्ञा पाळली जावी, म्हणून ताटकेचा वध मी करतों. ' असें म्हणून त्यानें ताटिकेचा वध केला.

हा रामाचा पराक्रम पाहून इन्द्रादि देव तेथे आले व त्यांनी रामाच्या शौर्याची फार प्रशंसा केली. ऋषि व देव यांना आपण जो ठराव दशरथाच्या अश्वमेध-यज्ञाच्या वेळीं भरलेल्या परिषदेंत केला, ती आमची आकांक्षा या रामाच्या द्वारें सफल होईल, असें त्यांस आता वाटूं लागलें व राक्षसवधरूपी कार्यास या रामानें आजच प्रारंभ केला, असें वाटून, त्यांस समाधान वाटलें ! या वेळीं सर्व देवांनी विश्वामित्रास विनवून सांगितलें की, तुझ्याजवळ जीं अनेक अमोघ अस्त्रें आहेत, तीं सर्व या रामास या वेळीं द्यावीं व त्यास राक्षसवधाला आवश्यक असणाऱ्या सामर्थ्यानें युक्त बनवावें. विश्वामित्राकडून होकार घेऊन रामाचें कोडकौतुक करून देव आपल्या स्थानीं निघून गेले.

रामाचा पराक्रम पाहून विश्वामित्र संतुष्ट झालेच होते व देवांनी त्यांस प्रोत्साहनहि दिलें; म्हणून ते रामलक्ष्मणास आपल्या जवळचीं सर्व शस्त्रें, अस्त्रें व त्यांचे उपसंहार देण्यास तयार झाले. रामलक्ष्मण विश्वामित्रांकडे आल्यापासून

*

चवथ्या दिवशींच त्यांनी या राजपुत्रांना सर्व अस्त्रें देऊन त्यांत निपुण केलें! हीं अस्त्रें म्हणजे काय पदार्थ आहेत, हें आज जरी कोणासहि समजणें शक्य नसलें, तरी त्यांतील कांही अस्त्रें सध्याच्या प्रचलित युद्धामध्ये प्रयुक्त झाल्यासारखीं दिसतात, म्हणून त्यांपैकी कांहींची कल्पना येणें आज शक्य झालें आहे, असे वाटतें. इतर अस्त्रें काय आहेत, तें आज समजणें जवळ जवळ अशक्य आहे. रामलक्ष्मणांना जीं अस्त्रें या वेळीं मिळालीं तीं हीं आहेतः—

## अस्त्रविद्या.

१. **दंडचक्र**= ज्याचा दण्डाप्रमाणे उपयोग करतां येतो व आवश्यकतेच्या वेळीं त्याचेंच चक्र बनवतां येतें व चक्राप्रमाणेहि ज्याचा उपयोग होऊं शकतो.

२. **धर्मचक्र, ३ कालचक्र, ४ विष्णुचक्र, ५ इंद्रचक्र,**= हीं चार निरानिराळ्या प्रकारचीं मारक चक्रें आहेत. विष्णुचक्र म्हणजे सुदर्शन होय. इतर चक्रेंहि अशींच समजावीं. सध्या हीं चक्रें शीख वापरतात.

६. **वज्रास्त्र**= वज्रासारखें अस्त्र.

७. **शैवास्त्र**= शिवानें तयार केलेलें अस्त्र.

८. **शूलवत्**= ज्या अस्त्रामधून सुळे, तीक्ष्ण काटे शत्रूच्या अंगावर फेकले जातात.

९. **ब्रह्मशिरस्** नामक अस्त्र.

१०. **ऐषिकास्त्र**= ज्याच्या टोकाला कुंचल्यासारखे सुयांसारखे बारीक खिळे बसवलेले असतात. हें बाणासारखें अस्त्र आहे.

११. **ब्राह्मास्त्र.**

१२. **मोदकी गदा**= ज्या गदेच्या शेवटीं गोळे असतात.

१३. **शिखरी गदा**= ज्या गदेच्या टोकावर खिळे व अणकुचीदार काटे असतात.

१४. **धर्मपाश, १५. कालपाश व १६. वारुणपाश**= शत्रूला बांधण्याच्या दोऱ्या, फास घालण्याच्या दोऱ्या, यांनी शत्रूला दुरून बांधतां येतो.

१७. **शुष्काशनि, १८ आर्द्राशनी**= दोन प्रकारच्या विजांचे प्रयोग.

१९. **पैनाकास्त्र, २०. नारायणास्त्र,**

२१. **आग्नेयास्त्र**= ज्याने अग्नीचा वर्षाव करतां येतो. ( insendiary bombs ) आगलावे बांबगोळे. सध्या याचा उपयोग युद्धांत चालू आहे.

**२२. शिखरास्त्र, २३. वायव्यास्त्र, २४ हयशिरस्, २५ क्रौञ्चास्त्र,**

२६. **शक्तिद्वयं** = दोन प्रकारच्या शक्ति. शक्ति ही बारीक पहारीसारखी असून, एक बाजूला गोळा अणकुचीदार करून बसवला असतो. दोनही टोकें अति तीक्ष्ण असतात. या योगाने भोक पडतें व हातोडा मारल्यासारखा आघातही होतो. गदेसारखेंच पण अगदी बारीक, पण हात दीड हात लांब असें हें अस्त्र आहे. हें फेकून मारावयाचें असतें.

२७. **कंकाल**= ज्याला हाडांच्या सापळ्यासारखे लोखंडाचे अवयव बसवलेले असतात. हें आंतून पोकळ असल्याने शरिरांत घुसलें असतां तें बाहेर काढतां येत नाही व बाहेर काढलें, तर त्याबरोबर शरिराचा मांसल भागहि बाहेर ओढला जातो.

२८. **मुसल**= मुसळ. ( लोखंडी किंवा जड लाकडाची पहार )

**२९. कापाल, ३० किंकिणी,**

**३१. वैद्याधरास्त्र,**

३२. **नन्दन** नांवाचें **असिरत्नं**= उत्तम तलवार, जी पाहून वीरास आनंद व्हावा, किंवा ज्याच्या प्रयोगाने आनंदाच्या गुदगुल्या होत होत शत्रूचा नाश व्हावा. ( laughing gas –हसविणारा वायु. )

**३३. गांधर्वास्त्र, मोहनास्त्र**= ज्याने शत्रूचें सैन्य गुंगून जातें, त्यास काय करावें, काय करूं नये, तें समजत नाही. ( Which deprives consciousness. )

३४. **प्रस्वापन**= झोप आणणारें अस्त्र. (Sleeping gas )

**३५. प्रशमन, ३६. सौम्य,**

३७. **वर्षण**= वृष्टि होत आहे, असें वाटवणारें अस्त्र.

३८. **शोषण**= शुष्कता उत्पन्न करणारें.( Making dry–शोषक अस्त्र )

३९. **संतापन**= दाह उत्पन्न करणारें, ( producing burning heat= दाह उत्पन्न करणारें अस्त्र. )

४०. **विलापन**= रडवणारें ( Tear gas– अश्रुवायु )

४१. **मादन**= मद्याचा कैफ चढतो, तसा कैफ ज्याने चढतो.

४२. **मानवास्त्र,**

४३. **पैशाचास्त्र**= ज्याच्या प्रयोगाने भूतचेष्टांसारख्या चेष्टा शत्रु करूं लागतो.

४४. **तामस**= अन्धार ज्याने पडतो, दिसेनासें होतें, जें करूं नये, तेंच करावयास लागतो.

४५. **सोमन**, ४६. **संवर्त**, ४७. **मौसल**, ४८. **सत्य**, ४९. **मायामय**,

५०. **सौरास्त्रं तेजःप्रभं**= ज्याने दिवसासारखा प्रकाश पडतो, शत्रूचे डोळे ज्याने दिपून जातात ( Incendiary bombs= प्रकाश पाडणारे बामगोळे. )

५१. **सोमशिखरास्त्र,**

५२. **त्वाष्ट्रास्त्र**, ५३. **भागमस्त्रं**, ५४. **शीतेषु**, ५५. **मानद**, हीं अस्त्रें विश्वामित्र ऋषीने रामाला दिलीं.

याप्रमाणे हीं अस्त्रें दिल्यानंतर यांचे उपसंहारहि पुढे दिल्याप्रमाणे दिले–

**१ सत्यवान्, २ सत्यकीर्ति, ३ धृष्ट, ४ रभस, ५ प्रतिहारतर, ६ पराङ्मुख, ७ अवाङ्मुख, ८ लक्ष्य, ९ अलक्ष्य, १० दृढनाभ, ११ सुनाभ, १२ दशाक्ष, १३ शतवक्त्र, १४ दशशीर्ष, १५ शतोदर, १६ पद्मनाभ, १७ महानाभ, १८ दुन्दुनाभ, १९ स्वनाभ, २० ज्योतिष, २१ शकुन, २२ नैराश्य, २३ विमल, २४ दैत्यनाशक, २५ योगंधर, २६ विनिद्र, २७ शुचिबाहु, २८ महाबाहु, २९ निष्कली, ३० विरुच; ३१ सार्चिमाली, ३२ धृतिमाली, ३३ वृत्तिमान्, ३४ रुचिर, ३५ पित्र्य, ३६ सौमनस, ३७ विधूत, ३८ मकर, ३९ परवीर, ४० रति, ४१ धन, ४२ धान्य, ४३ कामरूप, ४४ कामरुचि, ४५ मोह, ४६ आवरण, ४७ जृंभक, ४८ सर्पनाथ, ४९ पंथान, ५० वरुण.**

यांपैकी कांहींचा आशय समजतो; पण पुष्कळांचा आशय समजत नाही.

धनुर्वेदाच्या परिभाषा समजल्या तर कदाचित् यासंबंधीं कांहीं ज्ञान झालें, तर होणें शक्य आहे. ज्यांचा किंचित् अर्थ समजल्यासारखा वाटतो, त्यांवर पुढें टिप्पणी दिलेली आहे. इतर अज्ञेय आहेत, असें समजावें—

**३ धृष्ट**— धैर्यानें पुढें होणें;

**६ पराङ्मुख**— ज्या बाजूनें अस्त्र येत असेल, त्याच्याकडे पाठ करणें आणि उलट बाजूस तोंड करणें;

**७ अवाङ्मुख**— खालीं जमिनीकडे तोंड करणें ( सध्या कांहीं बामगोळे पडूं लागले असतां जमिनीवर निजून पडून रहावें लागतें, म्हणजे त्यांपासून फारसा अपाय होत नाहीं, तसाच हा उपाय असेल;

**८ लक्ष्य**— अस्त्राकडे वेधक दृष्टि लावणें किंवा त्या लक्ष्याचा वेध करणें;

**९ अलक्ष्य**— दुर्लक्ष्य करणें;

**१३ शतवक्त्र**— शेकडो तोंडांनीं जें नाश करतें;

**२० ज्योतिष**— उल्का पडल्याप्रमाणें ज्यांतून ज्योति पडतात;

**२२ नैराश्य**— निराश, उदास मन होतें;

**२६ विनिद्र**— निद्रानाश होतो;

**३० विरुच**— प्रकाश कमी होतो;

**३१ सार्चिमाली**— सूर्याप्रमाणें प्रकाश पडतो;

**३४ रुचिर**- तेजःपुञ्ज;

**३६ सौमनस**— मन प्रशस्त राहतें;

**४३ कामरूप**— अनेक रूपें बनतात;

**४४ कामरुचि**— अनेक प्रकारचे प्रकाश पडतात;

**४५ मोह**— मोहित होऊन जातें;

**४६ आवरण**— घेरल्यासारखें वाटतें;

**४७ जृंभक**— जांभया येतात;

**४८ सर्पनाथ**— तक्षक चावल्याप्रमाणें अवस्था होते;

याप्रमाणें काहींचा आशय ध्यानीं येतो, पण हाच आशय असेल, हा निश्चय नाहीं. कोणत्या अस्त्राचा कोणता उपसंहार हेंही समजत नाहीं. हा सर्व विषय तज्ज्ञांनीं

शोधून निश्चित करण्याजोगा आहे. केवळ शब्दांचा अर्थ समजला, म्हणजे अस्त्र किंवा त्याचा उपसंहार समजेल, असें कोणी समजण्याचें कारण नाही.

अस्त्र हें फेकून मारावयाचें असतें. वरील अस्त्रांमध्ये कांही अस्त्रें सध्या प्रचारांतहि आहेत, असें वाटतें. उदाहरणार्थ– ‘ **दण्ड** ( लाठी ), **चक्र** ( चाक, पोलादी तीक्ष्ण धार असलेलें जें शत्रूवर मारतां येतें, ज्याने शत्रूचा गळा कापतां येतो व जें बारीक दोरीच्या सहाय्याने परत आपणांकडे आणतां येतें; हें बोटाने गरगर फिरवून शत्रूवर फेकावें लागतें. सध्यां हें शिख आपल्या पगडीमध्ये वापरीत असतात. हीं चक्रें अनेक प्रकारचीं निरनिराळया प्रकारच्या धारेचीं लहानमोठीं असतात. ), **वज्रास्त्र** ( हेंहि पोलादी अणकुचीदार चक्रासारखेंच असतें; पण चक्रापेक्षा लहान असतें. ); **शूलास्त्र** ( मुद्गलाप्रमाणे लोखंडी असून त्यावर बारीकमोठे पोलादी तीक्ष्ण खिळे बसवलेले असतात ), **ऐषिकास्त्र** ( हे विविध प्रकारचे बाणच होत ), **गदा** ( मुद्गलाप्रमाणे असते. ही फेकून, शत्रूवर मारावी लागते; ही लोखंडी असते, हिला गुळगुळीत अथवा काटेरी गोळा असतो, त्यामुळे हिचे दोन भेद होतात. ), **पाश** ( फास, दोरी ), **शक्ति** ( गदेप्रमाणेच पण बारीक ), **मुसल**, **असि** ( तलवार ) इतकीं हीं अस्त्रें सध्याही प्रचारांत आहेत. यांचा उपयोग सध्या चालू आहे.

सध्या युरोपच्या युद्धांत ज्या बामगोळयांचा उपयोग केला जातो व ज्यांचीं वर्णनें वृत्तपत्रांत प्रसिद्ध होत असतात, त्यांसारखीं दिसणारीं अस्त्रेंही यांत कांही आहेत. **आग्नेय** ( अग्नीचे लोळ सोडणारे बाम, आगलावे बाम, जळते गोळे, प्रकाश पाडणारे बाम, उष्णता वाढवणारे बामगोळे ), **प्रस्वापन** ( झोप आणणारे वायु ), **शोषण** ( कोरड पाडणारे वायु ), **संतापन** ( दाह करणारे वायु ), **विलापन** ( रडवणारे, अश्रु आणणारे वायु ), **मादन** ( कैफ आणणारे वायु ), **तामस** ( अंधार पाडणारे वायु ), **सौर** ( सूर्याप्रमाणे प्रकाश पाडणारे बामगोळे ), **जृंभक** ( जांभया उत्पन्न करणारे वायु ), **मोह** ( मूर्च्छा आणणारे वायु ), **विनिद्र** ( निद्रानाश करणारे प्रयोग ), हे सध्या अस्त्रप्रयोग चालू आहेत. आणखी कांही चालू असल्याचें कोणास समजलें, तर त्यांचाही अन्तर्भाव येथे करावा.

सध्या विषारी वायूचे भयंकर प्रयोग करतात, पण तसे या अस्त्रांच्या यादींत दिसत नाहीत.

हीं सर्व अस्त्रें चांगलीं मारक व प्रभावीं आहेत. ऋषींकडून हीं रामलक्ष्मणांला मिळत आहेत, हें येथे पाहण्यासारखें आहे. यावरून ऋषि हे या काळीं कशा प्रकारच्या चळवळी करीत, तें समजण्यासारखें आहे. विशेषतः आपल्या राष्ट्रांतील तरुण पिढी तयार करण्यासाठी त्यांनी चालवलेले प्रयोग आजही उपयोगी पडण्यासारखे आहेत.

## अस्त्रें स्त्रियांनी निर्माण केलीं.

हीं अस्त्रें विश्वामित्र ऋषींनी रामलक्ष्मणांस दिलीं, हें खरें; पण हीं दोन बायकांनी राक्षसांच्या वधासाठी निर्माण केलीं होतीं, हें येथे विशेष रीतीने ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

दक्ष प्रजापतीच्या **जया** व **सुप्रभा** या दोन कन्या मोठ्या प्रतापी होत्या. **कृशाश्वाला** या दिल्या होत्या. कृशाश्व व या दोन स्त्रिया यांनी मिळून हीं मारक अस्त्रें शोधून काढलीं व त्यांचा उपयोग त्यांनी शत्रुनाशाकडे प्रथम केला. यामुळे या अस्त्रांना ' **कृशाश्वपुत्र** ' असें आदराने समजण्यांत येतें व या दोन स्त्रियांना यांच्या माता मानण्यांत येतें. या स्त्रियांनी युद्धविद्येमध्ये ही इतकी प्रगति करून, आपलें नांव अजरामर करून ठेवलें आहे.

ज्या कालीं स्त्रियाही या शस्त्रास्त्रसंशोधनकर्मामध्ये प्रवीण होत्या, त्या काळीं या देशाकडे शत्रूची वक्रदृष्टीने पाहण्याची तरी छाती कशी कशी होणार ? राष्ट्रसंवर्धक ऋषि, वीर राजपुत्र व स्त्रियाही अस्त्रनिर्माणकर्मामध्ये प्रवीण असत, असा हा काळ होता असें दिसतें. विश्वामित्रादिकांनी ही विद्या प्राप्त केली व वाढवली.

वसिष्ठ, विश्वामित्र, व अगस्ति यांच्याकडून रामलक्ष्मणांस शस्त्रास्त्रें मिळालीं आहेत. विश्वामित्राकडून सर्वांत अधिक अस्त्रें मिळालीं; कारण विश्वामित्र सध्या जरी ब्रह्मर्षि झालेले असले, तरी ते एका वेळीं शूर राजे होते व अस्त्रविद्येंत निपुण होते. ऋषि बनल्यावर स्वतः हिंसा करणें त्यांनी सोडलें असलें, तरी पुढील पिढीस तयार करण्याचें काम त्यांनी आपल्या अंगावर घेतलें होतें.

विश्वामित्र ऋषींनी रामलक्ष्मणांस काटकपणा अंगीं आणण्याचें उत्तम शिक्षण दिलें. उघड्यांत गवतावर निजणें, कपड्यांचे चोचले न करणें, कंद-मुळें-फळें खाऊन निर्वाह करण्याचा प्रसंग आला, तरी थकवा येऊं नये, अशी काटक प्रकृति बनविणें, हे शारीरिक तपाचे प्रकार होत. शस्त्रास्त्रें देऊन रामलक्ष्मणांस युद्ध-शास्त्रांत प्रवीण केलें. रामाला ही युद्धविद्या दिल्यानंतर रामलक्ष्मणांचा आत्म-विश्वास विलक्षण वाढला व त्यानंतर राम विश्वामित्रांस म्हणाला—

**गृहीतास्त्रोऽस्मि भगवन् दुराधर्षः सुरैरपि।** (बा. रा. बा. कां. २८।२)

'मला आता हीं अस्त्रें मिळालीं आहेत व यांमुळे मी आता सुरांनाही अजिंक्य झालों आहें.' हा असा आत्मविश्वास तरुण पिढीमध्ये उत्पन्न करणें, हेंच ऋषींच्या शिक्षणाचें मुख्य मर्म होतें.

## वानरांची नवी पिढी.

जसें विश्वामित्रांनी इकडे रामलक्ष्मणांना तयार केलें, त्याचप्रमाणे दुसऱ्या ऋषींनी वानरराष्ट्रांतील नवी पिढी बनवण्याचें प्रशंसनीय कार्य चालविलें होतें. तेंहि येथे पाहण्यासारखें आहे. म्हणजे सर्व भरतखण्डांत नवचैतन्य कसें तरुण पिढींत संचारलें जात होतें, तें कळून येईल. म्हणून येथे वानरांच्या तरुण पिढीच्या तयारीकडे थोडें लक्ष्य देऊं व मग विश्वामित्रासह होणारा रामलक्ष्मणांचा पुढचा प्रवास कसा काय झाला, तें पाहूं—

वानरांची नवी पिढी उत्पन्न झाली व त्यांचें संगोपन वनांतच करण्यांत आलें व त्यांस वनांतच सर्व शस्त्रास्त्रांचें व युद्धपद्धतीचें सशास्त्र शिक्षण देण्यांत आलें. यांस शहरच्या लोकांचा वारा लागू दिला नाही. शहरच्या लोकांचा वारा लागू दिला असता, तर ते सर्व शहरवासी रावणाच्या धाकाने पूर्णपणें गलितधैर्य झालेले असल्याकारणाने, त्यांच्या तोंडून रावणाच्या पराक्रमाचीं अतिशयोक्ति-पूर्ण वर्णनें पडून, या नव्या पिढीच्याही अन्तःकरणावर रावणाविषयींच्या भीतीचा ठसा दृढ बसला असता व हेही रावणाशीं युद्ध करण्यास तसेच नालायक बनले असते. पुनः शहरांतल्या लोकांची छानछोक राहणी, कृत्रिम आहार-विहार व तज्जन्य अनेक दुर्गुण यांस लागून हे राकटपणा व काटकपणाला मुकून, शिपाई-गिरीच्या कामाला अगदीच नालायक ठरले असते. म्हणून हे सर्व वानरवीर-

शीत, उष्ण, क्षुधा, तृषा, पाऊस, वारा व इतरही अनेक प्रकारचे सृष्टीचे आघात सहन करण्यास समर्थ असे राकट व काटक ( Hardy and Sturdy warriors ) पण सर्वांगांनी सुशिक्षित असे वीरपुरुष बनविले गेले.

युद्धामध्ये शत्रूवर जय मिळविण्यास नुसतीं अद्यावत् सुधारलेलीं शस्त्रास्त्रें व यांत्रिक सामुग्री यांनीच केवळ भागत नाही, तर तीं योग्य रीतीने उपयोगांत आणणारीं माणसेंच काटक असावीं लागतात. ही माणसें जितकीं सुशिक्षित आणि जितकीं राकट, काटक व चिकाटीचीं असतील, तितक्याच अंशाने शत्रूवर जय प्राप्त होण्याची शक्यता अधिक असते. हें तत्त्व लक्ष्यांत घेऊनच, अद्यावत् सुधारलेलीं शस्त्रास्त्रें, यांत्रिक सामुग्री, युनिफॉर्म इत्यादि बाह्य उपकरणांस विशेष महत्त्व न देतां मुख्यतः शिपाई कार्यक्षम असा बनविण्याची विशेष काळजी घेतली गेली आणि म्हणूनच राक्षससैन्यावर जय मिळविण्यास तें वानरसैन्य समर्थ झालें.

अरण्यांत राहणाऱ्या भिल्ल, कोळी, कातकरी इत्यादि लोकांकडे लक्ष्यपूर्वक पाहिल्यास काय दिसेल ? तर या लोकांस धड वस्त्र नसतें, खावयास आमच्यासारखें पौष्टिक व चमचामित अन्नही मिळत नाहीं; रहावयास बहुधा गवताचीं खोपटीं; असतात असें असूनदेखील हे लोक व यांचीं मुलें उन्हांत, पावसांत, थंडींत, वाऱ्यांत निःशंकपणें स्वैर संचार करीत असतात. धीवरांचीं मुलें नुसती लंगोटी, नेसून दिवसभर पाण्यांत डुंबत असतात; पण, त्यांना पडसें–खोकलादेखील फारसा कधी होत नाही. हे सर्व लोक शहरांत राहणाऱ्या लोकांपेक्षा– अधिक राकट, अधिक काटक, अधिक बळकट व अधिक सहनशील, अधिक दीर्घायुषी असतात. हे लोक जितकें ओझें उचलतात किंवा ओढतात, त्याच्या चतुर्थांशही ओझें आपण शहरांत राहणारे लोक उचलूं शकत नाही. याचें कारण अगदी उघड आहे की, या लोकांचे आहारविहार सर्व स्वाभाविकपणें– सृष्टिनियमांना अनुसरून असतात व आपले आहार–विहार कृत्रिम अतएव सृष्टिनियमांना अगदी सोडून असतात.

वानर हे मानवच होते, पण त्यांचें ‘ वानर ’ हें टोपण नांव होतें. वर्तमानकालीन, सुधारणाशिखरस्थ अशा पाश्चात्य राष्ट्रांतदेखील अशीं टोपणनांवाची

चाल आहे. उदाहरणार्थ, रशियाचें टोपण नांव "**व्हाइट बेअर**" म्हणजे 'पांढरें अस्वल' असें आहे. फ्रान्सचें टोपण नांव "**लायन**" म्हणजे 'सिंह' आहे. जर्मनीचें "**ईगल**" म्हणजे 'गरुड पक्षी' आहे आणि इंग्रजांचें टोपण नांव "**बुल्**" म्हणजे– 'बैल' असें आहे. अर्थात् हीं नांवें जीं पडलीं आहेत, तीं त्यांच्या विशिष्ट गुणांवरून पडलेलीं आहेत. यांपैकी एकाही देशांतील मनुष्याच्या शरिराची आकृति त्याला दिल्या गेलेल्या नांवाच्या पशूच्या आकृतीसारखी नाही, ही गोष्ट प्रत्यक्ष आहे. हीच गोष्ट वानरांसंबंधीही आहे. म्हणजे "**वानर**" हें त्यांचें तत्सदृश गुणांवरून ठेवलेलें टोपण नांव आहे. वस्तुतः ते मनुष्यच होते.

असें आहे, तर त्यांचीं तोंडें वानरासारखीं असल्याचें व त्यांना पुच्छ असल्याचें जें वर्णन आहे त्याचा अर्थ काय ? त्यास, त्यांचीं तोंडें म्हणून जीं दिसतात, तीं मुखवट्यांसह शिरस्त्राणें आहेत. पशूंचे कृत्रिम मुखवटे बसवण्याची चाल अजूनहि हिमालयामधील बऱ्याच जातींत आहे. यांचे वार्षिक नाच हे मुखवटे घालून होत असतात. वानरांचें पुच्छ म्हणून जें आहे, तें त्यांच्या कंबरेभोंवती गुंडाळलेल्या '**पाश**' नांवाच्या आयुधाचा सोगा सोडलेला आहे, व त्यालाच पुच्छ म्हटलें आहे.

कोणत्याही मनुष्याचें चित्र जें काढलें जातें, तें त्या त्या प्रसंगानुसार त्याच्या वस्त्रालंकारांसह व त्याच्या शस्त्रास्त्रांसहच काढलें जात असतें. नुसत्या उघड्या शरिराचें कांही काढलें जात नाही. मग तें शब्दचित्र असो अथवा दृश्यचित्र असो. याच न्यायाला अनुसरून हीं वानरांदिकांचीं वर्णनें म्हणजे शब्दचित्रें आहेत. उदाहरणार्थ, मारुति जेव्हा लंकेंत सीताशुद्धीसाठी शत्रूच्या राष्ट्रांत गेला, त्या वेळचें त्याचें चित्र म्हणजे "शिरस्त्राण घातलेला, खांद्यावर गदा घेतलेला, पाश कंबरेभोंवती गुंडाळलेला, असेंच असलें पाहिजे व तें तसेंच काढलें जात असते.

वर्तमानकालीन सुधारणाशिखरस्थ राष्ट्रांतील योद्ध्यांचींच चित्रें पाहाना ? त्यांचीं तोंडें अगदी मारुतीच्या व जाम्बवानासारखीं दिसतात. याचें कारण '**गॅस् हेल्मेट**' नांवाचें शिरस्त्राण त्यांच्या तोंडावरून चढविलेलें असतें.

वानर व राक्षस यांचा गदायुद्धावर विशेष भर असे. अर्थात् शत्रूच्या गदेचा

आघात सहन करण्यायोग्य अशीं शिरस्त्राणें त्यांना घालावीं लागत असत. हीं शिरस्त्राणें घडतांना मुख्यतः डोळे, नाक व तोंड यांच्या बचावाची सोय करण्याकडे विशेष लक्ष्य पुरविलें जात असे. अर्थात् कपाळाच्याखालीं डोळ्यापासून हनुवटीपर्यन्तचा शिरस्त्राणाचा भाग पुढे वाढविलेला व निमुळता असा ठेविलेला असे. म्हणजे शत्रूच्या गदेचा तडाका बसावयाचा, तो त्या भागावर बसल्या कारणानें प्रत्यक्ष नाक, डोळे व तोंड यांच्यावर आघात पोहचत नसे व त्यांचा बचाव होत असे. एवंच वर्णन केलेलीं वानरांचीं तोंडें हीं त्यांचीं खरीं तोंडें नसून, त्यांवर बसविलेलीं शिरस्त्राणें आहेत.

वानरांचें पुच्छ हें वास्तविक पुच्छ नसून, तें पाश नांवाचें आयुध आहे. हा पाश एक प्रकारच्या विशिष्ट विणीचा ३०।४० हात लांबीचा, दोरखंडासारखा असतो. शत्रु पुढे पळत असला म्हणजे त्याच्यावर हा फेकून त्याला फास घालून मागे ओढण्याच्या व बांधण्याच्या इत्यादि कामाकडे त्याचा उपयोग होतो. हा नेहमी कंबरेभोंवती गुंडाळलेला असतो, व तो चटकन् सोडतां यावा, म्हणून त्याचें एक टोक मोकळें सोडलेलें असतें. तें टोक पुच्छासारखें खालीं लोंबकळत रहात असल्याकारणानें त्याला पुच्छ अशी संज्ञा प्राप्त झाली.

मराठेशाहींमध्यें शिलेदार लोक या आयुधाचा उपयोग करीत असत; पण त्या ठिकाणीं ते घोड्याच्या पिछाडीच्या दोरखंडाचा उपयोग करीत असत, असें थोरल्या बाजीरावांच्या चरित्रांत त्यानें चिमाजी अप्पाला निजामाला धरण्यासंबंधीं लिहिलेल्या पत्रावरून दिसतें.

वर्तमानकालींही हिमालयामध्यें राहणाऱ्या पहाडी लोकांपाशी हा अशाच प्रकारचा पाश असतो व तो त्यांच्या कंबरेभोंवती गुंडाळलेला असतो. त्याच्या योगानें ते लोक अति चपल हरिणास किंवा इतर सावजास तें वेगानें पळत असतांना फास घालून धरतात. तिकडे शिकारीस गेलेल्या इंग्रजी मिलिटरी ऑफ़ीसर लोकांचे घोडे पळून गेल्यास ते लोक त्यांस या दोरखंडाचा फास घालून धरून आणतात.

तात्पर्य, वानरांचें पुच्छ हा त्यांच्या शरिराचा अवयव नसून, तें त्यांच्या शरिराहून भिन्न असें त्यांचें पाश नांवाचें आयुध आहे. तो पाश वानर आपल्या

कंबरेभोवती गुंडाळीत असत व सहज सोडतां यावें, म्हणून त्याचें एक टोक मोकळें लोंबत ठेवीत असत. म्हणून त्याला पुच्छ असें म्हटलें आहे.

जर पुच्छ हा वानराच्या शरिराचा अवयव असता, तर रावणानें जेव्हा त्याला चिंध्या बांधून पेटविलें, तेव्हा मारुतीलाही त्याचे चटके बसावयास पाहिजे होते; पण, मारुतीला तर पुच्छ पेटलें असतांना त्यापासून यत्किंचितही अपाय झाला नाही. यावरून पुच्छ हें त्याच्या शरिराचा अवयव नसून भिन्न होतें, हेंच सिद्ध होत आहे.

# वानरांची नवी पिढी शिकवून कशी तयार झाली ?

ऋषींनी रावणवधासाठी आर्यांची व वानरांची तरुण पिढी शिकवून तयार करण्याचें कार्य आपल्या शिरावर घेतलें. याप्रमाणे ही पिढी तयार होऊं लागली, ती कशी तयार झाली, तें वा० रा० बालकाण्ड सर्ग १७ मध्ये दाखवलें आहे. तें आता आपण पाहूं–

## राहण्याचें स्थान.

**वनचारिणः** ( सर्ग १७, श्लोक ९, २३, २४ ); **शैलान् काननानि भेजिरे** ( श्लो० २३ ) = वनांमध्ये, पर्वतांवर, दऱ्याखोऱ्यांत ते रहात असत. यामुळे त्यांचीं शरिरें काटक व सुदृढ बनत गेलीं.

## वज्रदेही वानर.

**दिव्यसंहननान्वित** ( २ ), **वज्रसंहननोपेत** (१६), **वपुष्मन्तः** (१९), ज्यांचा दिव्य स्नायुल देह आहे, वज्रासारखा ज्यांचा कणखर देह आहे, ज्यांचीं शरीरें उत्तम आहेत. तसेंच '**गजाचलसंकाशाः**' ( १९ ) हत्ती व पर्वत यांसारखीं धिप्पाड व थोराड अशीं ज्यांचीं शरिरें आहेत. वानरवीर असे धिप्पाड होते.

## गति.

**वायुवेगसमा जवे** ( ३ ) गतीमध्ये हे वायूसारखे होते, चालण्यांत व दौड मारण्यांत हे प्रवीण असत.

## वानरांची बुद्धि.

**बुद्धिसंपन्नाः ( ३ ), बुद्धिमान् ( १७ )**= वानर फार बुद्धिमान् होते. कुशाग्र बुद्धीने ते युक्त होते. **उपायज्ञाः ( ४ )**= वेळप्रसंगीं काय करावें, हें त्यांस उत्तम समजत असे. **नयज्ञाः ( ३ )**= नीति जाणणारे होते, राजनीतीमध्ये प्रवीण होते. **मायाविदः ( ३ )**= कौशल्याच्या कर्मामध्ये ते निपुण होते. व दुसऱ्याला न कळत एखादें कार्य कसें करावें, तें ते उत्तम प्रकारें जाणत होते.

## वानरांची शक्ति.

**बलिनः ( २ ), बलवान् ( १७ ), अप्रमेयबलाः (१८), महाबलाः ( १९, ३६ )** वानर फार बलवान् होते, त्यांच्या शक्तीशीं इतरांच्या शक्तीची तुलनाच होणें शक्य नव्हतें. **तेजसा यशसा च वीर्यादत्यरिच्यत (१३)**- यांचें सामर्थ्य फार मोठें असल्यामुळे तेजस्विता आणि यश यांमध्ये त्यांची योग्यता इतरांपेक्षा फारच मोठी असे. **बलेन दर्पेण च सिंहशार्दूलसदृशाः ( ३६ )**= शक्ति व आत्मसंमान यांमुळे सिंह व वाघ यांसारखे ते होते. म्हणजे ते फारच बलिष्ठ होते. **गृह्णीयुरपि मातंगान् प्रमत्तान् ( ४१ )**= मदोन्मत्त हत्तींना पकडूं शकतील, अशी त्यांची फार मोठी शक्ति होती. या विशेषणांवरून वानरवीरांना कसें सशक्त बनवलें होतें, तें सहज समजणें शक्य आहे.

## वानरांचें शौर्य.

**शूराः ( ३ ), वीर्यवान् ( १३ ), वीराः (१८), विक्रान्ताः ( १८ ), विपुलविक्रमाः ( ३६ ), विष्णुतुल्यपराक्रमाः ( ३ )** = वानरवीर फार शूर होते, मोठे वीर्यसंपन्न होते, मोठे पराक्रमी होते, विष्णूसारखे शूर व पराक्रमी होते.

## वानरांचें युद्धकौशल्य.

**नखदंष्ट्रायुधाः(२७), शिलाप्रहरणाः(२६), पर्वतयोधिनः(२६), सर्वास्त्रकोविदाः ( २८ ), सर्वास्त्रगुणसंपन्नाः ( ४ ), असहार्याः**

नखांनी व दाढांनी शत्रूला ओरबडणारे, ज्यांच्या हाताची पकड फार दृढ आहे, ज्यांची वज्रमुष्टि फार मारक आहे, जे नखें टोचून शत्रूस मारूं शकतात, दगडांनी युद्ध करण्यांत जे प्रवीण, पर्वतावरील युद्धांत निपुण, सर्व अस्त्रांच्या व शस्त्रांच्या युद्धांत प्रवीण, यामुळे युद्धांत ज्यांचा नाश होणें शक्य नाही, असे हे वानरवीर होते. अस्त्र–शस्त्रांच्या युद्धांत तर हे प्रवीण झालेच होते; पण प्रसंगीं दगडांचा मारा करूनहि हे युद्ध करूं शकत होते. दगडांचा मारा हातानेही करतां येतो, गोफणीनेहि दूरवर करता येतो, व स्वतः पळत असतां पायांनीं दगड मागच्या मागेहि शत्रूवर फेकतां येतात. गोफणीने दगडांचा मारा लांब व फार जोराचा होऊं शकतो. गोफणीच्या दगडाने बाहूंतून हात निखळून काढीत असल्याचीं उदाहरणें आहेत. डोक्यावर असा दगड लागला असतां कपाळ फुटून जातें. दारूगोळा संपला, इतर शस्त्रास्त्रें नाहीत, अशा वेळीं दगड असले, तर त्यांनीहि शत्रूस बेजार करतां येतें. या युद्धांत वानर प्रवीण होते.

## निरनिराळीं रूपें घेण्यांतील कौशल्य.

**कामरूपी** ( २, १८, ३० ), **कामरूपबलोपेताः**, (२५) **यथाकामविचारिणः** ( २५ ) = ज्या वेळीं जसा वेश घ्यावा लागेल, तसा वेश घेऊन कर्तव्य करणारे, इच्छेप्रमाणे आपलें रूप, आपला वेश व आपलें बल ज्यांना वापरतां येतें, असे हे वानरवीर होते. हे हवा तो वेष घेत असत, म्हणूनच रामरावणयुद्धाच्या वेळीं यांनी मानुष वेश घेऊं नये, अशी आज्ञा रामाने केली होती.

## वानर–वीरांचा उत्साह.

**नर्दमाना नादेन विहंगमान् पातयेयुः** ( ३० ) = मोठा शब्द करून पक्ष्यांनाहि खाली पाडतील, **शैलेन्द्रान् विचालयेयुः** ( २७ ) = मोठमोठ्या पर्वतांनाहि हालवून सोडतील, **स्थिरान् द्रुमान् भेदयेयुः** ( २७ ) = स्थिर वृक्षांना उपटून टाकतील, **क्षितिं दारयेयुः** ( २८ ) = भूमीचें विदारण करून टाकतील, **महार्णवं प्लावयेयुः** ( २८ ) = महासागर तरून जातील, **नभस्तलं विशेयुः, तोयदान् गृह्णीयुः** ( २९ ) = आकाशांत उडून मेघांला

पकडूं शकतील, **समुद्रान् क्षोभयेयुः** ( २८ )= समुद्राला खळबळवून टाकतील, असा दुर्दम्य उत्साह या वानरवीरांमध्ये उत्पन्न केलेला होता. आम्हांला अशक्य असें कांहीएक नाही, असें यांना वाटत असे. पडेल तें काम करण्यास हे याप्रमाणे तयार असत व मजकडून हें होईल कीं नाही, अशी शंकासुद्धा यांच्या मनांत येत नसे.

## हें कशासाठी ?

हें सर्व कशासाठी केलें जात होतें ? वानरवीरांची इतकी तयारी कोणत्या हेतूसाठी केलेली होती, तेंही येथे पाहण्यासारखें आहे. सर्व वानरांचा उद्देश एकच होता व तो हा की '**दश-ग्रीव-वधोद्यताः**' ( १८ ) = रावणाचा वध करण्यासाठीच आपण आहों, हें प्रत्येक वानरवीर जाणत होता. आपला एकच एक शत्रु **'रावण'** आहे, सर्वांस तो त्रास देत आहे, सर्वांना तोच कष्ट देत आहे, त्याचा नाश करून सर्वांना त्रासांतून सोडवणें, हें एकच एक आमचें आवश्यक कर्तव्य आहे, त्याच कार्यासाठी आम्ही उत्पन्न झालों आहों, त्याचसाठी आम्ही जगत आहों व त्याच एका कार्यासाठी आम्ही मरणार आहों, असा यांचा निर्धार होता.

वाचकांनी हें येथें लक्ष्यांत ठेवावें की, जेव्हा राष्ट्राने एक ध्येय पुढे ठेऊन तयारी करावी, जेव्हा तशी ती व्हावी, त्याच वेळीं तें राष्ट्र विजयी होऊं शकतें. आपला सर्वांचा एकच शत्रु आहे, याची पक्की जाणीव होऊन, त्याविषयी सर्वांच्या मनांत त्वेष व पूर्ण द्वेष उत्पन्न झालेला असला व त्याचा वध करण्यासाठी आपण हवा तेवढा त्याग करण्यास उद्युक्त आहों, असें वाटलें, तरच तें राष्ट्र तयार होत असतें, व कार्यक्षम होऊं शकतें. रावणवध हेंच एकमेव आपलें कर्तव्य आहे, हें शिक्षण ऋषींनी वानरांच्या तरुण कुमारांस दिलें व याच ध्येयाने हें सर्व वानर-राष्ट्र वीरत्वपूर्ण स्फूर्तीने तयार केलें.

रावण व वाली यांचा परस्पर अनाक्रमणाचा तह झालेला होता, अर्थात् राक्षस व वानर हीं दोन मित्रराष्ट्रें होतीं; पण ही मित्रता पूर्वीच्या पिढींतील पुरुषांमध्येच वसत होती. वाली व रावण हेच या तहाने बांधलेले होते. प्रत्यक्ष वालीचा भाऊ सुग्रीव व त्याचा मन्त्री हनुमान् हे या तहाने बांधले गेले नसावे.

वानरांची सर्व तरुण पिढी तर पूर्णपणें वर लिहिल्याप्रमाणे '**रावणवधा**'च्या ध्येयाने भारली गेली होती व आपण फार मोठें जगद्धिताचें कार्य करून दाखवणार आहों, अशा विचाराने ती उत्साहित झालेली होती.

वानरांमध्ये मारुतीसारखे वीर हे उत्तम विद्वान्, मुत्सद्दी, राजकारणपटू व लढवय्ये होते; याशिवाय इंजिनियर–वास्तुशास्त्रज्ञ, शस्त्रास्त्र निर्माण करणारे कारागीर, व इतर आवश्यक विद्यांत निपुण वानर पुष्कळच होते. मारुति तर वेदशास्त्रसंपन्न असून, तासान् तास चुका न करतां संस्कृतमध्ये उत्तम, अस्खलित भाषण करण्यांत पटाईत होता. हे सर्व अग्नीची उपासना करीत व करारमदार करावयाचे असतां अग्नीमध्ये हवन करून त्याच्या साक्षीने सर्व करार करीत. या सर्व वृत्तान्तावरून वानर या नांवाच्या मानवजातीचे हे लोक होते, हें उघड होत आहे.

रामलक्ष्मण अजून लहान म्हणजे १५।१६ वर्षांचे कुमारच होते; त्यांचीं लग्नें-ही व्हावयाचीं होतीं, सीतेला पळवून नेण्याची कल्पनाही कोणास अजून येणें शक्य नव्हतें. अशा वेळीं '**रावण–वध**' या एका कल्पनेने वानरराष्ट्रांतील तरुण पिढी भारली गेली होती व याशिवाय त्यांच्या मनांत दुसरा विषयच येत नव्हता. यावरून **रावणवध** हें त्या वेळचें एक जागतिक महत्त्वाचें राजकारण होतें, ही गोष्ट अगदी उघड होत आहे. रावणाशीं अनाक्रमणाचा करार कर-णाऱ्या मित्रराष्ट्रांतील तरुण पिढीच या **रावणवधा**च्या कल्पनेने अशी भारली गेली होती, हें त्यांतल्या त्यांत विशेष महत्त्वाचें आहे.

वानरराष्ट्रांतील तरुणांना स्वतन्त्रपणें हवेतसे बहकलेले विचार करण्याची पूर्ण मोकळीक होती, असें दिसत नाही. त्यांनी जो विचार करावयाचा तो आपण '**रावण–वध करण्यास उद्युक्त**' कसे होऊं हाच करावयाचा होता. प्रत्ये-काने हवा तो विचार करून सभांमधून विचारस्वातंत्र्याचे हवेतसे तारे तोडीत बसावयाला त्यांना अवकाशच मिळत नव्हता; तर रावणाचा वध व राक्षसांचा पराभव करण्यासाठी आम्ही आपली तयारी कशी करावयाची, एवढाच एक विचार वानरांच्या तरुण पिढीच्या पुढे सतत ठेवलेला होता व याच दिशेने ते आपली तयारी करीत होते. दुसरा विचारच त्यांच्या मनात येऊं नये, असेंच

वायुमण्डल त्यांच्या सभोंवती बनविलेलें होतें.

वसिष्ठ–विश्वामित्रांच्या सान्निध्यांत त्यांचा नेता तयार होत होता व इतर ऋषि वानरवीरांच्या तयारींत गुंतलेले होते. एकमेकांस एकमेकांचा पत्ताही नव्हता; पण निरनिराळ्या ठिकाणचे वीर परस्परांचा साक्षात् संबंध नसतांही एका ध्येयानें भारले जात होते ! पुढे ते एके ठिकाणीं आले व एका कार्यास लागले, हें निराळें. याप्रमाणे वानरांची तरुण पिढी रावणवधाच्या पूर्वीं सुमारें २४ वर्षें एका ध्येयानें तयार होऊं लागली होती.

आतां आपण रामलक्ष्मणांच्या प्रगतीकडे वळूं. वसिष्ठाच्या संमतीने विश्वामित्रानें रामलक्ष्मणांस राजवाड्यांतून – राजैश्वर्याच्या भोगप्रधान जीवनांतून– बाहेर काढलें व चारच दिवसांत नानाप्रकारचीं शस्त्रें, अस्त्रें, व युद्धशास्त्र यांचें ज्ञान त्यास देऊन त्या तरुणांमध्ये विलक्षण आत्मविश्वास उत्पन्न केला. प्रत्यक्ष रामालाहि आता वाटूं लागलें की, या ज्ञानाने आपण आता राक्षसांचा संहार निःसंशयपणानें करूं शकूं. आत्मविश्वास दशरथामध्यें म्हणजे पूर्वीच्या पिढीमध्ये नव्हता. रावणाचें नांव काढतांच मनाचा थरकाप व्हावा, अशी ती जुनी पिढी होती. तो भित्रेपणा जाऊन १६ वर्षांचे तरुण रामलक्ष्मण हे मारीच, सुबाहु आदि प्रसिद्ध राक्षसांस ठार करण्याचा हिय्या करून, पुढे सरण्यास तयार झाले !

रावणाचा वध होण्यास अद्यापि २६ वर्षांचा अवधि आहे. रावणाच्या गोष्टी अजून रामाच्या कानावर आल्या असतील, किंवा नसतील. राक्षसांचा उपद्रव आपल्या देशास होत आहे, तो दूर केला पाहिजे, एवढी जाणीव मात्र या वयांत रामलक्ष्मणास झालेली होती. पंधरा–सोळा वर्षांचें वय हें त्या वेळीं देशकार्यास प्रारंभ करण्याचें वय आहे, असें समजण्यांत येत असे ! रामानें याच वयांत राक्षसांचा वध करून देशहित करण्यास प्रारंभ केला होता. या वेळीं ताटिकेचा वध झाला होता व ऋषि आणि देव यांस रामलक्ष्मणांच्या पराक्रमाची खात्री पटलेली होती व यांचे आशीर्वाद रामाचा उत्साह वाढवूं लागले होते.

विश्वामित्र ऋषींनी शस्त्रास्त्रें देऊन रामलक्ष्मणांचें रणप्राविण्याचें सामर्थ्य फारच वाढवलें होतें. त्याचप्रमाणे प्राचीन इतिहासांतील उदाहरणें देऊन, रामाचें मन त्यांनी कसें तयार केलें, तेंहि येथे आपण पाहूं–

*

## सिद्धाश्रम.

जवळच विश्वामित्रांचा सिद्धाश्रम होता. आता या आश्रमाजवळ ते आले. या आश्रमाचा पूर्वीचा वृत्तान्त त्यांनी येथे रामलक्ष्मणांस सांगितला. येथे भगवान् विष्णूंनी अनेक वर्षे तप केलें होतें. पुढे वामन–अवतार घेऊन बलीदैत्याचें पारिपत्य त्यांनी केलें. या कथेचा वृत्तान्त संक्षेपाने ( सर्ग २९ मध्ये ) आलेला आहे. हीच कथा श्रीमद्भागवतांत थोडी विस्ताराने आलेली आहे. ती येथे पाहिली, तर विश्वामित्रांनी ही कथा सांगून रामलक्ष्मणांना कोणत्या तत्त्वाचा उपदेश केला, तें समजेल, म्हणून ती कथा आता आपण पाहूं–

## वामन–अवताराचा संदेश.

### बलीची पहिली स्वारी.

बली हा भरतखंडांतील नव्हता व तो देव–जातीचाही नव्हता. तो तिबेटच्या पश्चिमेकडच्या देशांतील होता. त्याने देवांचा पराभव करून, भरतखंडावर स्वामित्व मिळवावें, म्हणून जी पहिली स्वारी तिबेटावर केली होती, तिचें वर्णन श्रीमद् भागवत ( स्कं० ८, अ० १० ) मध्ये आलेलें आहे.

बली, नमुची, यातुधान, वैरोचन, जंभ वगैरे सर्व असुर, दैत्य, दानव व राक्षस या वेळीं एकमुखी हल्ला देवांवर चढवीत होते. हें असुरांचें 'मित्र-दल' या वेळीं बनलेलें होतें. देवांच्या बाजूने मुख्य इंद्र सम्राट् असून, त्याबरोबर मरुत, वरुण, हयग्रीव वगैरे अनेक देववीर होते.

युद्ध फार दिवस चाललें व त्यांत सर्व देवांनी मिळून अद्वितीय संघशक्तीने भाग घेतल्यामुळे बलीचा पूर्ण मोड झाला. याचें वर्णन हें आहे—

**येऽवशिष्टा रणे तस्मिन्नारदानुमतेन ते ।**
**बलिं विपन्नमादाय अस्तं गिरिमुपागमन् ॥**

( श्रीभागवत०८।११।४७ )

युद्धामध्ये बलीला मूर्च्छा आली, त्याचे थोडेसे वीर शिल्लक राहिले, तेव्हा नारदाने त्यांना सांगितलें की, 'आता तुम्ही येथून निघून जा, नाही तर नाश पावाल.'

तेव्हा हा नारदाचा उपदेश त्यांना पटला व मूर्च्छित झालेल्या बलीला घेऊन ते असुर-सैनिक पश्चिमेच्या पर्वतापलीकडे पळून गेले.

बलीने त्रिविष्टपावर हल्ला चढवला, तोही पश्चिमेकडून व असुर-सैनिक मूर्च्छित पडलेल्या बलीला घेऊन पळून गेले, तेही पश्चिमेकडेच पळाले. यावरून उघड होत आहे की, बलीचा देश तिबेटाच्या थेट पश्चिमेस होता. सध्याचे रशियन तुर्कस्थान हा किंवा याच्या लगतचा कोणता तरी त्याचा देश असावा.

**पराजितश्रीरसुभिश्च हापितो हीन्द्रेण राजन् भृगुभिश्च जीवितः।**
**सर्वात्मना तानभजद्भृगून्बलिः शिष्यो महात्मार्थनिवेदनेन ॥**

( श्री० भागवत० ८।१५।३ )

' इंद्राने बलीचा पूर्ण पराभव केला, जवळ जवळ गतप्राण होण्यापर्यंत त्याची अवस्था पोचली. भृगूच्या आश्रमांत पोचल्यानंतर तेथील औषधोपचारांनी तो जगला, म्हणून भृगूला तो मान देऊं लागला. '

मरत असलेल्या बली दैत्यावर भृगु ऋषींनी उपचार केले व त्याचा प्राण वाचवला, म्हणून भरतखंडावर पुढची स्वारी करण्याचा बेत त्याने रहित केला नाही ! या असुरांच्या मनःप्रवृत्तीचा विचार करण्यासारखा आहे. दीनांचें रक्षण करावें, म्हणून जखमी झालेल्या बलीला भृगूंनी आपल्या आश्रमांत ठेवून औषधोपचार केले; पण पुढे त्याच बलीने भृगूंचा असा पाण-उतारा केला की, त्यामुळे भृगूंचे डोळे उघडले व त्यांनी बलीला शाप दिला !

## बलीची दुसरी स्वारी.

पहिली स्वारी फसल्यावर पुनः कमर कसून व अधिक तयारी करून, बलीने दुसरी चढाई देवांच्या राष्ट्रावर केली—

**वृतो विकर्षन्महतीमासुरीं ध्वजिनीं विभुः।**
**ययाविन्द्रपुरीं स्वृद्धां कंपयन्निव रोदसी ॥ ११ ॥**

( श्री० भागवत ८।१५ )

मोठें सैन्य घेऊन बली दैत्याने इन्द्रपुरीवर दुसऱ्यानदां चढाई केली; पण या वेळीं देवसैन्याची मुळीच तयारी नव्हती. यामुळे इंद्राला बलीच्या आसुरी सेनेच

प्रतिकार करणें अशक्य वाटलें—

**भगवन्नुद्यमो भूयान्बलेर्नः पूर्ववैरिणः ।**
**अविषह्यमिमं मन्ये केनासीत्तेजसोर्जितः ॥** (श्री०भागवत ८।१५)

इंद्र म्हणतो— " आमचा जुना शत्रु जो बली, त्याने आता मोठ्या तयारीने हल्ला चालवला आहे. आमची तर सध्या मुळींच तयारी नाही. तेव्हा याचा हा हल्ला परतविणें अगदी अशक्य आहे, असें मला वाटतें. "

देववीर हे आपआपल्या अप्सरांबरोबर विहार करण्यांत गर्क असल्यावेळीं व असुरांच्या हल्ल्याविषयी अगदी गाफील होते त्या वेळीं, बलीने असा प्रचंड हल्ला चढवला की, देववीरांना प्रतिकारसुद्धा करतां आला नाही. सर्व देववीर आपपलीं गावें सोडून जीव घेऊन पळाले व लपतां येईल तेथे लपले—

**देवेष्वथ निलीनेषु बलिर्वैरोचनः पुरीम् ।**
**देवधानीमाधिष्ठाय वशं निन्ये जगत्त्रयम् ॥**

( श्री० भाग० ८।१५।३३ )

" देव पळाले असें पाहून बलीने इंद्राच्या राजधानींत प्रवेश केला व त्रिविष्टप, भरतखंड आणि पाताल या तीनही ठिकाणीं आपल्या विजयाचा नगारा त्याने वाजवला ! " अशा प्रकारें युद्ध न करतांच दुसऱ्याच्या गाफीलपणाचा फायदा घेऊन बली दैत्य या एवढ्या भूप्रदेशाचा बादशहा बनला ! आपला पणजा हिरण्यकशिपु, क्रूरनीतीचा आश्रय करून राज्य करीत होता, यास्तव त्याचें राज्य लोकप्रिय झालें नव्हतें व यामुळेच त्याचा वध केला गेला, ही गोष्ट बली दैत्याला पूर्णपणाने माहीत होती. म्हणून त्याने सौम्य नीतीने राज्य चालवून कोणालाही न दुखवितां सर्वांस वश करण्याची योजना सुरू केली. असें करण्यांत याचा उद्देश हा होता की, देवांनी किंवा आर्यलोकांनी बंड करूं नये व आपलें राज्य उलथून पाडूं नये.

जरी बली दैत्याने सौम्य नीतीने राज्य चालविलें होतें, तरी वरील तीनही राष्ट्रांतील सर्व अधिकारांच्या जाग्यांवर त्याने आपले दैत्यच आणून बसविले होते. भारतीय आर्य व त्रिविष्टपीय देव यांपैकी कोणीही विशिष्ट मर्यादेपेक्षा अधिक डोकें वर न काढील, अशी आंतून सक्तीची व्यवस्था त्याने केली होती. म्हणजे

बलीचें राज्य जरी बाहेरून शांततेचें दिसत होतें व कोणास उघड त्रास होत नव्हता, सर्वांना न्याय सारखा मिळत होता, कोणाच्या धर्मकर्मांमध्ये व्यत्यय येत नव्हता, कोणताही असुर पूर्वीप्रमाणे आर्यादिकांना हाणमार करीत नव्हता, तथापि बलीची राजनीति अशी होती की, तीमुळे भारतीय आर्य, त्रिविष्टपीय देव व पातालांतील सर्पादि जातींचें वीर्य सारखें खच्ची होत रहावें व त्यांमध्ये पुनः उठण्याचा जोम वाढूं नये. सर्वांचा तेजोभंग होत रहावा व त्यांनी निरंतर आपले अंकित रहावें.

## पुरुषांचे विचार.

सदोदित तेजोवध झाल्याने बली दैत्याने पराभव केलेले देववीर व आर्यवीर गर्भगलित होऊन, "बलीचें सुराज्यच बरें आहे, आपणांला तरी अधिक उपभोग कशाला पाहिजेत? दैत्य कर्ते पुरुष आहेत, त्यांच्याइतकी कर्तबगारी आम्हांमध्ये कोठे आहे?" असें म्हणत.

ही त्या वेळच्या कांही पुरुषांची विचारसरणी होती; पण आर्यस्त्रिया व देव-स्त्रिया मात्र पूर्वीचें वैभव आठवून अश्रुपात करीत होत्या; पण त्या जुन्या चालीच्या वेडगळ आहेत, असें कांही लोक समजत व कांहींना त्यांच्या अंतः-करणांत पेटत असलेल्या स्वातंत्र्याच्या अग्नीची कल्पना होतही असे.

## स्त्रियांचा जळफळाट!

मातांच्या मनांत जो विचार घोळत असतो, तो मुलांमध्ये उत्पन्न होत असतो. मातांमध्ये जर राज्यक्रांतीचे विचार घोळले, तर एकदोन पिढ्यांत खात्रीने राज्यक्रांति होते; पण जर बायकांनीच परकीय राज्याचें जूं मानेवर घेण्यांत भूषण मानलें, तर राज्यक्रांति होणें अशक्य; हा सिद्धान्त सार्वकालिक आहे. पराजित देवांच्या व आर्यांच्या स्त्रिया आपलें पूर्ववैभव आठवून मनांत कशा जळफळत असत, तें पहा—

**एवं पुत्रेषु नष्टेषु देवमाताऽदितिस्तदा ।**
**हृते त्रिविष्टपे दैत्यैः पर्यतप्यदनाथवत् ॥**

(श्री० भाग० ८।१६।१)

" दैत्यांनी आपलें राज्य हरण केलें व आपल्या मुलांचा दैत्यांच्या कारणानें सर्वतोपरि नाश झाला आहे, असें पाहून अनाथ झालेल्या देवमाता मनांत जळत असत." या स्त्रियांना असें वाटे की, आपलें वैभव पूर्वीप्रमाणे वाढावें, आपल्या मुलांचा दर्जा राष्ट्रीय दृष्टीनें वाढावा, दैत्य, असुर व राक्षस आपल्या संपत्तीचा उपभोग घेत आहेत, तो आपल्या मुलांना घेतां येण्याजोगी अनुकूल परिस्थिति पुनः प्राप्त व्हावी.

## स्त्रियांची इच्छा.

वर दाखवल्याप्रमाणे आर्यमातांचा जळफळाट झालेला होता. पूजा करून त्या रात्रंदिवस देवाची अशी प्रार्थना करीत—

**तस्मादीश भजन्त्या मे श्रेयश्चिंतय सुव्रत ।**
**हृतश्रियो हृतस्थानान्सपत्नैः पाहि नः प्रभो ॥ १५ ॥**
**परैर्विवासिता साहं मग्ना व्यसनसागरे ।**
**ऐश्वर्यं श्रीर्यशः स्थानं हृतानि प्रबलैर्मम ॥ १६ ॥**
**यथा तानि पुनः साधो प्रपद्येरन्ममात्मजाः ।**
**तथा विधेहि कल्याणं धिया कल्याणसत्तम ॥ १७ ॥**

( श्री० भाग० ८।१६ )

" हे ईश्वरा ! मी तुझी भक्ति करीत आहें, तर माझें कल्याण होईल, असें कर. हे प्रभो ! प्रबल शत्रूंनी आमच्या सर्व संपत्ति हरण केल्या आहेत व आम्हांला स्थानभ्रष्ट केलें आहे. वैभवाच्या शिखरावरून आम्हांला दुःखाच्या सागरांत लोटलें आहे. शत्रूंनी आम्हांला शहरांत फिरण्याचीही मोकळीक ठेवली नाही. प्रबल शत्रूंनी आमचें ऐश्वर्य, आमची संपत्ति, आमचें यश व आमचीं सर्व स्थानें हीं आमच्याकडून हरून घेतलीं आहेत व आम्हांला देशोधडीस लावलें आहे. आमच्या तरुणांना पूर्वीचें वैभव मिळावें, ते पूर्वीप्रमाणे ऐश्वर्यसंपन्न व्हावे, त्यांचें धवल यश पुनः चहूंकडे पसरावें व त्यांचीं सर्व अधिकारस्थानें पुनः त्यांस मिळावीं; अर्थात् राष्ट्रांतील सर्व अधिकारांचीं स्थानें त्यांना प्राप्त व्हावीं, अशी कांही कल्याणाची योजना, हे ईश्वरा ! तूं घडवून आण. "

या प्रार्थनेमधील देवमातांचे शब्द, बलीदैत्याने तेथे केवढा अनर्थ केला होता व पराजित लोकांची स्थिति कशी बनवली होती, हें स्पष्टपणाने दाखवीत आहेत. पहा—

( १ ) **हृतश्रियः**— दैत्यांनी यांची सर्व संपत्ति हरून नेली होती, यामुळें दैत्य प्रत्यहीं श्रीमान् व देव धनहीन बनत होते;

( २ ) **हृतस्थानाः**— देवराष्ट्रांतील सर्व चांगल्या जागा व अधिकाराच्या जागा दैत्यांनी बळकावल्या होत्या; त्यामुळे देवतरुणांना कोणतेंही कार्य-क्षेत्र उरलें नव्हतें;

( ३ ) **विवासिताः**— दैत्यांनी देवाना देशोधडीस लावलें होतें;

( ४ ) **व्यसने मग्नाः**—सर्वांला दुःखसागरांत लोटून दिलें होतें;

( ५ ) **ऐश्वर्य, संपत्ति, यश व जागा**— या देवांच्या व आर्यांच्या राष्ट्रांत देवांना व आर्यांना न मिळतां त्या सर्व दैत्यांना मिळत असत.

बलीच्या सुराज्यांत देवराष्ट्र व आर्यराष्ट्र यांची कशी अवस्था झाली होती व तरुणांना कसें वागविलें जात असे, तें सर्व या शब्दांत पाहण्यासारखें आहे.

## ईश्वरी साक्षात्कार.

कोणत्याही विचारावर एकतानता झाली, म्हणजे साक्षात्कार होतो. तसा तो त्या वेळीं स्त्रियांना झाला होता. पहा—

**देवमातर्भवत्या मे विज्ञातं चिरकांक्षितम् ।**
**यत्सपत्नैर्हृतश्रीणां च्यावितानां स्वधामतः ॥ १२ ॥**
**तान्विनिर्जित्य समरे दुर्मदानसुरर्षभान् ।**
**प्रतिलब्धजयश्रीभिः पुत्रैरिच्छस्युपासितुम् ॥ १३ ॥**
**इन्द्रज्येष्ठैः स्वतनयैर्हतानां युधि विद्विषाम् ।**
**स्त्रियो रुदन्तीमासाद्य द्रष्टुमिच्छसि दुःखिताः ॥ १४ ॥**
**आत्मजान्सुसमृद्धांस्त्वं प्रत्याहृतयशश्रियः ।**
**नाकपृष्ठमधिष्ठाय क्रीडतो द्रष्टुमिच्छसि ॥ १५ ॥**

( श्री० भाग० ८।१७ )

“ हे देवमाते ! तुझ्या मनांतील फार दिवसांची इच्छा मला माहीत आहे. दैत्यांनी तुझ्या मुलांचें सर्व राज्य हरण केलें व त्यांना त्यांच्या स्वतःच्या मालकीच्या घरांतून बाहेर हाकलून दिलें आहे. त्या तुझ्या तरुणांनी युद्धांत दैत्यांचा पराभव करावा व गेलेलें वैभव पुनः प्राप्त करून घ्यावें, अशी तुझी मनापासून इच्छा आहे. इंद्रादि तुझ्या मुलांनी शत्रूंना युद्धांत कापून काढावें व त्यामुळे दैत्यांच्या स्त्रिया दुःखी झाल्या असून, त्या रडत आहेत, असें पाहण्याची तुझी इच्छा आहे. तुझ्या तरुण पुत्रांनी आपलें गतवैभव पुनः प्राप्त केलें आहे व ते आपल्या देशांत पूर्ववत् ऐश्वर्य उपभोगीत आहेत, असें पाहण्याची तुझी इच्छा आहे. ”

या साक्षात्काराच्या वर्णनांतील शब्दही बलीचें राज्य कशा प्रकारचें होतें व तें जित लोकांना कसें काय वाटत होतें, हें स्पष्ट दाखवीत आहेत.

## वामनाची बिकट कामगिरी.

वामनावताराच्या वेळीं राजकारण फारच बिकट झालेलें होतें. त्रिविष्टपांतील देवजाति, भरतखंडांतील आर्य--जाति व इतर सर्व लहानसहान जाति विभागल्यामुळे व कित्येक वर्षे पूर्ण परतंत्र झाल्यामुळे कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाही, अशी स्थिति झाली होती. जो तो आपआपल्यापुरतें पाहूं लागला होता. संघशक्ति उत्पन्न होण्याचा संभव कोणाच्याच दृष्टिपथांत येत नव्हता. तीनही देशांत व्यापलेलें बली दैत्याचें साम्राज्य उलथून पाडणें, अगदी अशक्य, असें सर्वांस मनापासून वाटूं लागलें होतें. देवांचे गण एकत्र जमणें अशक्य झालें होतें, देवसम्राट् इन्द्राला दिवसाढवळ्या रस्त्यावरून फिरणेंही अशक्य झालें होतें. स्त्रियांच्या डोळ्यांतील दुःखाच्या अश्रुधारा बंद होत नव्हत्या, अशा प्रकारें सर्व बाजूंनी विपरीत परिस्थिति उत्पन्न झाली होती. कोणालाच स्वातंत्र्यप्राप्तीचा सरळ मार्ग दिसत नव्हता व त्याची आशाही वाटत नव्हती. अशा पूर्ण निराशामय स्थितीमध्ये वामनाचा जन्म झाला होता. तेव्हा त्याच्या कामगिरीचें महत्त्व किती होतें, हें कोणासही सहज समजण्यासारखें आहे.

त्या वेळच्या वीरांगनांच्या सर्व महत्त्वाकांक्षा वामनाच्या अंतःकरणांत एक-

वटल्या होत्या. बली दैत्य कांही सामान्य धोरणी नव्हता. त्यानें स्वतः वैदिक धर्माची दीक्षा घेऊन, तो स्वतः यज्ञयाग करीत असे व आपण पूर्णपणानें प्रजेच्चेंच आहों, असें भासवीत होता; पण या तीनही देशांतील लोकांनी आपलें डोकें वर काढूं नये, यासाठी जें करणें आवश्यक होतें, तें सर्व करण्यांत मात्र तो कांहीएक कसूर करीत नव्हता. भारतीय लोक धर्माच्या बाबतींत पहिल्यापासून भोळसर असल्यामुळे **बलि राजा स्वतः यज्ञ करतो आहे, हें पाहून ते त्याची वाहवाच करीत होते !** पण त्याची राष्ट्रावरील पकड केवढी जबरदस्त आहे, याची फारच थोड्यांना कल्पना होती. परदेशीय मनुष्य जो राजकारणांत मुरलेला आहे, तो जर जित लोकांचे गुणानुदाद गाईल किंवा जित लोकांचा धर्म स्वीकारील, तर त्यांत त्याचा राजकीय हेतु कांहीतरी आहे कीं काय, हें आधी पाहिलें पाहिजे, हीच शिकवण येथे मिळते. त्रिविष्टपादि तीनही राष्ट्रांवर आपली छाया सर्वकाल रहावी, यासाठी वैदिक धर्म स्वीकारणें हें बलीचें सोंग होतें, ही गोष्ट वामनाच्या पूर्णपणानें मनांत ठसली होती. म्हणून त्यानें बलीचा यज्ञ चालला असतां " सोमाभिषव " होण्याच्या वेळीं यज्ञामध्यें प्रवेश केला व तो बलीच्या पुढे आला. याजक लोक सोमाचा रस काढण्याच्या तयारीस लागले होते, या वेळीं यज्ञसदःस्थानीं तेजस्वी वामनमूर्ति येऊन उभी राहिली.

## वामनाची पूर्वतयारी.

वामन लहान असला तरी स्वतः तो उत्तम राजकारणपटु असून, प्रसंगीं स्वतः चार हात करण्यासही समर्थ होता. युद्धाचे डावपेच, मल्लयुद्धाचे डाव व इतर चढाईच्या योजना यांची त्याला पूर्णपणें माहिती होती. म्हणूनच वामनबटूनें बलीच्या यज्ञमंडपांत स्वतः येण्यापूर्वी गुप्त वेषानें विश्वासाचे शेकडो वीर दर्भ-मुष्टींत, धोतरांत, छाटींत व कृष्णाजिनांत आपापलीं शस्त्रास्त्रें लपवून व दडवून सदस्यांमध्ये आधीच पाठवून दिले होते व ते ब्राह्मणमंडळींत गुप्तपणानें आधीच जाऊन बसले होते. इतर ब्राह्मणांप्रमाणेच यांच्याही टिळेटोप्या असल्यामुळे यांच्या-बद्दल कोणास कांहीएक संशय आला नाही. याप्रमाणें कडेकोट पूर्वतयारी केल्या-नंतर स्वतः वामन बटु ब्रह्मचाऱ्याच्या वेषानें कौपीन, दंडकमंडलु व छाटी, लंगोटी

घेऊन यज्ञमंडपांत शिरून बलि दैत्याच्या पुढे येऊन उभा राहिला. वयाने अगदी लहान पण अत्यंत तेजस्वी, दिसावयाला छोटा पण बुद्धीने थोर, आकाराने लहान पण कृतीने महान्, थोडे पण गंभीर शब्द बोलणारा, असा वामनासारखा ब्राह्मण-कुमार बली दैत्याने यापूर्वी कधीच पाहिला नव्हता. त्याचें तें असामान्य तेज पाहून, बलिराजालाही फार कौतुक वाटलें व म्हणून बलीने त्याचें स्वागत करून, त्याला ' काय पाहिजे तें माग, ' म्हणून सांगितलें. वामनाने तीन पावलें भूमि मागितली. बलीने त्याची समजूत केली व म्हटलें की, कांहीतरी अधिक माग; पण वामनाने आपला हट्ट सोडला नाही.

अशा विपरीत मागणारांच्या मागणींत कांहीतरी श्लेष असतो. तो श्लेष जाणतां आला तर धास्ती नसते; नाही तर समूळ विनाश होतोच होतो. वामनाच्या " **त्रिपाद् भूमि** " शब्दांतील श्लेष स्पष्ट हा होता की, "त्रिविष्टप, भरतखंड व पाताल यांतील सर्व भूमि मला दे ! " पण हा अर्थ बलीला समजणें अशक्य होतें; कारण आपल्या विरुद्ध तरुण ब्राह्मणसमाजाने कांहीतरी क्रांतिकारक कट केला आहे व त्या कटांत बरेच देववीरही संमिलित झाले आहेत, या गोष्टीची जाणीवसुद्धा बली दैत्याला नव्हती, यामुळे तो अगदी बेसावध होता.

बली दैत्य स्वतः व त्याचे सर्व वीर जरी पूर्ण बेसावध होते, तथापि तो मोठाच सम्राट् असल्यामुळे स्वभावतः त्या यज्ञमंडपाजवळ व आंतही शेकडो राक्षसवीर जय्यत उभे होते व कठीण प्रसंग उत्पन्न होतांच बलीचें रक्षण करण्यास सिद्धहि होते.

## आणीबाणीचा प्रसंग.

आपले सर्व वीर यज्ञमंडपांत सशस्त्र तयार व पूर्ण सावध आहेत व शत्रूकडील वीर पूर्ण बेसावध आहेत, याची पक्की खूणगाठ वामनाने जेव्हा बांधली व सर्व वेळ पूर्णपणाने आपणांस अनुकूल अशी आहे, हें जेव्हा त्याने पाहिलें, तेव्हाच त्याने बली राजाबरोबर " तीन पावलें भूमि " मागण्याचा विनोद चालविला; कारण तो ओळखून होता की, सोमाचें सवन होईपर्यंत आपली अनुकूल परि-स्थिति कांही झालें तरी बदलणार नाही.

बलीच्या पुरोहिताला वामनाबद्दल बराच संशय आला असावा किंवा त्याच्या क्रांतीविषयी कांहीं गुणगुणही समजली असावी; म्हणून त्यानें बलीला सावध करण्याची बरीच खटपट केली; पण बलीनें त्याचें कांहीं ऐकलें नाहीं व ऐकलें असतें, तरीहि वामनाच्या पकडींतून त्या वेळीं बली सुटणें अशक्यच होतें.

## बलीवर कुरघोडी.

योग्य संधि येतांच वामनानें बलीला खालीं पाडून, त्याच्या डोक्यावर आपला पाय ठेवला. हें इतक्या क्षणार्धांत त्यानें केलें की, प्रथम तें कोणाच्या लक्ष्यांतही आलें नाहीं. ऋत्विज यज्ञ करण्यांत, इतर ब्राह्मण वेदघोषांत व इतर जन गप्पा मारण्यांत मग्न झाले होते, अशा संधींत वामनानें बली दैत्याला चीत केलें. ही गोष्ट प्रथम बलीच्या पहारेकऱ्यांनी पाहिली, तेव्हां ते आरडाओरडा करून म्हणाले—

**अनेन याचमानेन शत्रुणा बटुरूपिणा ।**
**सर्वस्वं नो हृतं भर्तुर्न्यस्तदण्डस्य बर्हिषि ॥ ११ ॥**
**तस्मादस्य वधो धर्मो भर्तुः शुश्रूषणं च नः ।**
**इत्यायुधानि जगृहुर्बलेरनुचरासुराः ॥ १३ ॥**
**ते सर्वे वामनं हन्तुं शूलपट्टिशपाणयः** ॥ ( श्रीं० भाग० ८।२१ )

" अहो ! या याचना करणाऱ्या ब्राह्मणबटुरूपी शत्रूनें विश्वासघात करून, आमच्या बादशहाचें सर्वस्वच हरण केलें ! आम्ही आपल्या राजाचें संरक्षण केलेंच पाहिजे, म्हणून या भटाच्या मुलाचा वध करणें, हाच आमचा या वेळीं धर्म आहे. असें म्हणून बलीच्या दैत्यसेवकांनी शूल, पट्टिश वगैरे आपआपलीं आयुधें घेतलीं व लगेच तीं सज्ज करून, ते सगळे दैत्य वामनाचा वध करण्यासाठीं वामनाच्या अंगावर धावले."

या वर्णनावरून वामनानें " राज्याची भीक " मागितली व ती बलीनें खुषीनें दिली, हें खरें नव्हे, हें समजण्यासारखें आहे.

**तानभिद्रवतो दृष्ट्वा दितिजानीकपान्नृप ।**
**प्रहस्यानुचरा विष्णोः प्रत्यषेधन्नुदायुधाः ॥ १५ ॥**
( श्री० भाग० ८।२१ )

"ते दैत्य आपल्या पुढारी वामनावर चालून येत आहेत, असें पाहून किंचित्

हसून, आपलीं आयुधें वर उगारून वामनाच्या अनुयायांनी त्या दैत्यसैनिकांना प्रतिबंध केला."

वामनाने आपली पूर्व तयारी जर इतकी कडेकोट केली नसती, तर या वेळीं त्याचा अंतच झाला असता; पण वेळप्रसंगाचें पूर्ण अनुसंधान करून, वामनाने योग्य दिशेने जी आपली अपूर्व तयारी केली, ती या वेळीं त्याच्या फारच उपयोगी पडली. बली दैत्य व त्याचे अनुयायी पूर्ण बेसावध व वामन आणि त्याचे अनुयायी पूर्ण सावध असल्यामुळे, व असा हल्ला होईल याची पक्की जाणीव वामनाच्या अनुयायांना असल्यामुळे, या झटापटीमध्ये वामनाचा जय झाला, हें स्वाभाविकच झालें. अशा रीतीने वामनाने आपल्या अनुयायांकडून सर्व दैत्यांचा पूर्ण मोड केल्यानंतर त्याने बलीला पकडून, त्याला दोऱ्यांनी जखडून बांधून कैद केलें. याचें वर्णन पहा—

**बबंध वारुणैः पाशैर्बलिं सौत्येऽहनि क्रतौ ॥ २६ ॥**
**हाहाकारो महानासीद्रोदस्योः सर्वतो दिशम् ॥**
**गृह्यमाणेऽसुरपतौ विष्णुना प्रभविष्णुना ॥ २७ ॥**

(श्री० भाग० ८।२१)

" सोमरसाचें हवन करण्याच्या दिवशीं बलीला वारुण पाशांनी जखडून बांधलें. तेव्हा एवढ्या मोठ्या सम्राटाला वामनाने कैद केलें, हें पाहून चारही दिशांमध्ये मोठी गडबड उडून गेली."

बलीला कैद केल्यानंतर राज्यामध्ये सर्वत्र दैत्यांची धरपकड झाली. कांही ठिकाणीं दैत्यांनीं हाणमार करण्याची खटपट केली; पण त्यांचा बादशहाच कैद झाल्यामुळे कोणालाही अधिक उत्साह राहिला नाही. सर्व दैत्य, असुर, दानव व राक्षस घाबरून गेले; त्यामुळे वामनाच्या सावध अनुचरांना आपला बेत उत्तम रीतीने तडीस नेतां आला. शेवटीं आपल्या दैत्यांचा विनाकारण संहार होऊं नये, म्हणून स्वतः बलीनेच त्या सर्व दैत्यसैनिकांना वामनाच्या स्वाधीन होण्यास सांगितलें; तेव्हा सर्वत्र शांतता झाली व वामनाने **दैत्यसाम्राज्य नष्ट होऊन देव व आर्य यांना पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त झालें,** अशी दौंडी पिटविली व इंद्राचें निशाण पुनः अमरावतीवर फडकूं लागलें.

नंतर बली राजाचे फार हाल करूं नयेत, म्हणून पुष्कळांनी बऱ्याच शिफारसी केल्या व स्वतः बलीनेही बिनशर्त माफी मागितली, तेव्हा त्याच्या अनुयायांसह त्यास पाशांतून सोडलें, तेव्हा–

**इत्युक्त्वा हरिमानम्य ब्रह्माणं सभवं ततः।**
**विवेश सुतलं प्रीतो बलिर्मुक्तः सहासुरैः ॥ ३ ॥**

( श्री० भाग० ८।२३ )

" बलीने वामनाच्या सर्व शर्ती कबूल केल्या. नंतर वामनाला त्याने नमस्कार केला व आपल्या अनुयायांसह सुतल देशांत जाऊन राहिला. "

हा सुतल देश कोकणचा एक भाग होय. चौदाताल कोंकण आहे व त्या प्रत्येक तालाचीं अतल, वितल, सुतल आदि नांवें आहेत. सगळ्या कोकणपट्टीचे १४ विभाग केले, तर तिसरा सुतल हा विभाग राजापूर–रत्नागिरीच्या आसपास कोठेतरी येतो. या ठिकाणीं बली दैत्याचें शेवटचें आयुष्य गेलें. म्हणजे वामनाने या ठिकाणीं एक जो मोठा शहाणपणा केला, तो हा कीं पूर्वीप्रमाणे बलीला आपल्या अनुयायांसह दैत्यदेशांत जाण्यास मोकळीक दिली नाही; कारण तसें केलें असतें, तर बलीने पुनः चढाई करण्यास कमी केलें नसतें व पुनः रक्तपात करण्याचा प्रसंग ओढवला असता. पुनः पूर्व इतिहासाची पुनरावृत्ति होऊं नये, म्हणून वामनाने बलीला नांवाचा मुक्त केला खरा; पण त्याला कोकणांत नजरकैदेंत ठेवून दिला. तेथेच त्याचे सर्व अनुयायी राहिले. वामनाने बलीच्या एकाही अनुयायास त्यांच्या दैत्य देशांत परत जाऊं दिलें नाही; हें त्याचें फारच मोठें शहाणपण अत्यंत वाखाणण्यासारखें आहे.

यानंतर इंद्राचें राज्य इंद्राला दिलें व आर्य–मांडलिकांना आपल्या संस्थानांत राज्य करण्यास सांगून व सर्वांस जिवंत राजनीतीचा उपदेश देऊन, ब्रह्मचारी वामन आपल्या तपस्येस निघून गेला. तात्पर्य, ऐतिहासिक दृष्ट्या विचार करतां असें स्पष्ट म्हणावें लागतें की, वामनाच्या महत्त्वाच्या कामगिरीशीं दुसऱ्या कोणाच्याहि कामगिरीची तुलना होऊंच शकत नाही.

## वामनावताराचा संदेश.

" स्वकीय स्वराज्याची भूक परकीय सुराज्याने भागत नाही व भागतां काम

नये. " हा राजकारणांतील अति महत्त्वाचा सिद्धांत वामनावताराने जगास इतक्या प्राचीन कालांत सांगितला आहे.

बलीचें राज्य सुराज्य होतें, यांत शंका नाही; पण स्वराज्याच्याऐवजी तें कोणीही स्वीकारणारा नाही व कोणाही समंजस माणसाने तें तसें स्वीकारतां नये. हें मोठें तत्त्व वामनावताराने सांगितलें, म्हणून जग असेपर्यंत सर्व राजनीतिज्ञ पुरुष वामनाचें गोडवे गातील, यांत कोणालाच शंका नाही.

वामनाने ज्या वेळीं सम्राट् बलीचें साम्राज्य उलथून पाडलें, तेव्हा त्याचें वय १५।२० वर्षांचेंहि नव्हतें. सम्राटाच्या मानाने त्याची तयारीहि फारशी नव्हती. सम्राटाचें सैनिकबळ फार मोठें होतें. तो वैदिक धर्माप्रमाणे यज्ञयाग करीत असल्यामुळे जनतेचा पाठिंबाही अंशतः त्याच्याकडे होता. तथापि परकीय राज्य तें परकीय राज्यच, त्याला स्वराज्याची सर केव्हाही येणार नाही. परकीय राज्यांत स्वकीय लोकांच्या आकांक्षाचा कोंडमारा हा होणारच. तो होऊं नये, म्हणून स्वराज्याची स्थापना करणें, हाच एकमात्र उपाय त्यावर असतो. तो प्रयत्न वामनबटूने केला व विजय मिळविला.

रामलक्ष्मणांला ही कथा विश्वामित्रांनी सांगितली, यांतील उद्देश हा की, या राजकुमारांच्या मनांतहि राक्षसांचें राज्य उलथून पाडण्याचे विचार उत्पन्न व्हावे. विश्वामित्रांनी साक्षात् अशा शब्दांनी हा विषय या राजकुमारांस सांगितला नाही, यांतच ऋषीचें चातुर्य दिसून येतें. कथा सांगतां सांगतां मुख्य ध्येयाच्या बीजाचा वृक्ष शिष्याच्या अन्तःकरणांत व्हावा, हेंच शिक्षकाच्या शिकवण्याचें चातुर्य होय.

वामनाची ही कथा सांगण्यापूर्वी विश्वामित्र ऋषींनी आणखीहि कांही कथा रामलक्ष्मणांस सांगितल्या होत्या. त्या संबंधानेही येथे थोडा विचार करणें आवश्यक आहे, तो आता करूं—

**२. कामदहनाची कथा**– ( सर्ग २३ ) शंकरांनी कामविकाराचें दहन केलें, ही कथा प्रथमतः सर्वांत आधी विश्वामित्राने रामलक्ष्मणांस सांगितली. कामविकाराचा प्रभाव आपल्यावर चालू दिला नाही, हें शंकराचें फार मोठें सामर्थ्य होय. या सामर्थ्यामुळे श्रीशंकरास '**महा-देव**' असें लोक म्हणूं लागले. या कथेच्या मिषाने येथे रामलक्ष्मणाला असा बोध ऋषींनी केला की, मोठें सामर्थ्य

प्राप्त करण्याची इच्छा असेल, तर कामाच्या आहारीं जातां नये. इतकेंच नव्हे तर कामाला आपल्या आधीन केलें पाहिजे.

कामाचा संयम करण्याचा उपदेश ऋषींनी या राजपुत्रांस सर्वांत प्रथम केला; याचें कारण उघड आहे. स्त्रीच्या व्यसनांत गुंतणाऱ्यांकडून महत्कार्य घडणें कठीण असतें.

**३. ताटिकावध-कथा** ( सर्ग २५ )-ताटिकेची कथा. सुकेतु नांवाचा एक सदाचारी यक्ष होता. त्याने संतानप्राप्तीसाठी मोठें तप केलें. ब्रह्मदेवाच्या कृपेने त्यास **ताटका** नांवाची कन्या झाली. ती फारच बलवान् होती. जंभपुत्र **सुन्द** राक्षसाशीं तिचा विवाह झाला व यांना **मारीच** नांवाचा पुत्र झाला. **अगस्ति** ऋषींनी सुन्दाचा वध केला. यामुळे ताटिका रागावली व अगस्तीला खाण्यासाठी ती त्या ऋषीवर धावली. ऋषींनी तिला शापलें व ती राक्षसी होऊन या वनांत सर्वांस त्रास देत आहे. रामा, तूं या राक्षसीला ठार मार व या देशाचा हा उपद्रव दूर कर.

या ठिकाणीं या कथेने अगस्ति ऋषींनी सुन्द राक्षसाचा वध केल्याचें सांगून उपद्रव देणारे राक्षस वध्य आहेत, ऋषीहि यांचे वध करीत आले आहेत, तेव्हा क्षत्रियांनी तर त्यांचा वध केलाच पाहिजे, असें सुचविलें आहे. राक्षस हे **मलद** व **करुष** यांसारख्या सुसंपन्न व भरभराटलेल्या देशांनासुद्धा उजाड बनवीत आहेत, यासाठी या देशांचा हा उपद्रव दूर करून, या देशांला पुनः संपन्न बनवणें क्षत्रियाचें कर्तव्य आहे, असें येथे रामलक्ष्मणांना सांगितलें आहे.

देशहित करीत असतां देशघात करणारी जर एखादी स्त्री असली, तर तीहि वध्यच होते, हा उपदेश येथे रामलक्ष्मणांस मिळाला.

**४. मन्थरा-वध-कथा** (सर्ग २५)-सर्व पृथ्वीचा विध्वंस करणारी विरोचन राक्षसाची कन्या मंथरा नांवाची होती. इन्द्राने तिला ठार मारलें व पृथ्वीचें संरक्षण केलें.

**५. भृगुपत्नी-वध-कथा** ( सर्ग २५ )-भृगुमहर्षींची धर्मपत्नी मोठी पतिव्रता होती. शुक्राचार्यांची ही माता होय. ही इन्द्रच नसावा, शासक कोणी नसावा, सर्व विश्व अराजक रहावें, अशी खटपट करीत होती, म्हणून हिचा वध विष्णूने केला.

तात्पर्य. देशहित करण्यासाठीं स्त्रीवध करावा लागला, तर तो केलाच पाहिजे. राजाचें हें कर्तव्यच आहे. या कथा ऐकून रामलक्ष्मणांनीं तत्काल ताटिकेचा वध करून देशहित साधलें.

येथें देशहित हें मुख्य आहे. स्त्रीवध, गुरुपत्नीवध, हें गौण आहे. हा उपदेश रामलक्ष्मणांस मिळाला.

**६. सुबाहुवध-कथा** ( सर्ग ३० )- इतक्या कथा सांगून देशकार्याकडे रामलक्ष्मणाचें मन वळवल्यानंतर विश्वामित्र ऋषि आपल्या सिद्धाश्रमांत पोंचले. त्यांनीं यज्ञास प्रारंभ केला. तेथें राक्षस हे यज्ञाचा विध्वंस कसा करतात, तें प्रत्यक्ष रामास पहावयास सापडलें ! आर्यांचीं वैदिक धर्मकृत्यें हीं हे राक्षस यथासांग होऊं देत नाहीत, हा यांचा केवढा मोठा अत्याचार आहे, हें या वेळीं रामाच्या लक्ष्यांत आलें; त्यामुळे रामाला फार दुःख झालें व रामानें राक्षसवधाची प्रतिज्ञा केली. मारीच राक्षसावर मूर्च्छनास्त्राचा प्रयोग करून, त्यास पळवून लावलें. सुबाहु राक्षसाचा तेथल्या तेथेंच वध केला. यांच्या अनुयायी राक्षसांचाहि वध करून यज्ञाचें विघ्न दूर केलें. विश्वामित्राचा यज्ञ उत्तम रीतीनें पार पडला. विश्वामित्राचे मनोरथ सिद्धीस गेले व रामलक्ष्मणांना सर्व ऋषींनीं आशीर्वाद दिले.

याच वेळीं राक्षसांचा वध करून सर्व त्रिभुवनांस सुख व स्वास्थ्य देण्याची मुहूर्तमेढ श्रीरामानें घातली.

**७. ब्रह्मपुत्र कुशाची कथा** ( सर्ग ३२-३४ )-धर्मवेत्ता ब्रह्मपुत्र **कुश** नांवाचा एक महात्मा राजा होऊन गेला. त्यानें विदर्भ-राजकन्येशीं लग्न करून तिच्या ठिकाणीं त्याला **कुशाम्ब, कुशनाभ, असूर्तरजस** व **वसु** हे चार प्रतापी पुत्र उत्पन्न झाले. कुशानें या मुलांस सांगितलें कीं, प्रजांचें उत्तम रीतीनें पालन करा, म्हणजे पुण्य लागेल. या आज्ञेप्रमाणें वागण्यासाठीं यांनीं क्रमानें **कौशांबी, महोदय, धर्मारण्य** आणि **गिरिव्रज** हीं चार मोठीं नगरें वसवलीं. वसु राजाच्या गिरिव्रज नगरीलाच सध्या **वसुमति** असें म्हणतात व तेथून **शोणा** नदी निघते.

कुशनाभाचा विवाह घृताचीं अप्सरेशीं झाला व त्याला १०० कन्या झाल्या. या कन्या फारच सुंदर होत्या. वायूनें त्यांना आपल्याशीं विवाह करा, असें म्हटलें;

पण त्यांनी पित्याच्या आज्ञेशिवाय आम्ही स्वतःच आपण होऊन कोणाशीं विवाह करणार नाही, असें सांगितलें. वायूच्या प्रकोपानें त्या कुबड्या झाल्या.

कुशनाभानें आपल्या मुलीस काय झालें, असें विचारलें. तेव्हा मुलींनी सर्व वृत्तांत सांगितला. मुनींनी वायूस शापलें नाही, हें पाहून कुशनाभानें मुलींची प्रशंसा केली व क्षमा धारण केल्यामुळे त्यांचा गौरवही केला व तो आपल्या मुलींना योग्य वर धुंडूं लागला.

इकडे महातपस्वी चुलि महर्षींच्या कृपेनें ऊर्मिला पुत्री सोमदा नामक गंधर्वीला ब्रह्मदत्त नांवाचा पुत्र झाला. हा कांपिल्य नगरीमध्ये रहात होता. याला कुशनाभानें आपल्या १०० कन्या दिल्या. ब्रह्मदत्तानें त्यांचें पाणिग्रहण करतांच त्याच्या तपःप्रभावानें पुनः त्या सुंदर बनल्या.

कुशनाभानें पुत्रकामेष्टि यज्ञ केला व त्यास **गाधि** नामक प्रतापी पुत्र झाला. गाधीचा मुलगा **विश्वामित्र**. विश्वामित्राची बहिण सत्यवती, हिलाच **कौशिकी** म्हणतात. हिच्या नांवानें ही कौशिकी नदी प्रसिद्ध आहे.

## विश्वामित्राचे पूर्वज




*

या कथेने विश्वामित्रांनी रामलक्ष्मणांच्या मनांत असें बिंबवलें की, ( **क्रियतां [ प्रजा- ] पालनं, धर्मं प्राप्स्यथ पुष्कलम्।** वा. रा. बा. ३२।४ ) प्रजांचें उत्तम रीतीनें पालन केलें असतांच राजांना फार मोठें पुण्य मिळतें. पुण्य-प्राप्तीचें प्रजापालन हें मोठें साधन आहे. कुश नामक राजाचा हा संदेश आहे व त्याच्या वंशांतच विश्वामित्र जन्मला असल्यामुळे विश्वामित्रही तेंच काम रामाच्या द्वारें करवूं इच्छीत आहे.

**८. देवसेनानी कार्तिकेयाची कथा** ( सर्ग ३५-३७ )- हिमालयाची पत्नी मेना. ही मेना मेरूची कन्या. मेनेच्या पोटीं हिमालयाला गंगा आणि उमा या दोन कन्या झाल्या. त्यांत स्वेच्छासंचार करणारी गंगा हिमालयाने देवांला दिली. दुसरी कन्या उमा ही कडक तप करणारी, व्रतस्थ राहणारी व नेमधर्म पाळणारी होती, ती शंकराला दिली. शंकरापासून उमेच्या पोटीं षडानन (कार्तिकेय, स्कंद ) हा देवांचा सेनापति उत्पन्न झाला. याला उमा, गंगा व कृत्तिका यांनी दूध पाजलें व वाढविलें. याने **सर्व देवसेनांची उत्तम संघटना केली व त्या सैन्याकडून सर्व राक्षसांचा फडशा उडविला.** शक्ति व युक्ति यांनी या सेनापतीने फार मोठें देवकार्य केलें. कोणत्याही देवाकडून न होणारें कार्य या सेनापतीने केलें. यानेच राक्षसांचा फन्ना उडवून देवांना विजय मिळवून दिला.

येथे कार्तिकेयाच्या कथेने रामलक्ष्मणांच्या मनांत हा विचार विश्वामित्राने बिंबविला की, योग्य सेनानायक असला, म्हणजे त्याच सैन्याची संघटना तो अशी करतो की, त्यामुळे त्यास जय मिळतो. असें सेनासंचालनाचें कौशल्य रामलक्ष्मणांनी आपल्या अंगीं आणावें व राक्षसांचा नाश करावा. या कथेने विश्वामित्राने सेनापतीचें कौशल्य विजय मिळविण्यासाठी फार महत्त्वाचें असतें, हें रामलक्ष्मणांच्या मनांत बिंबविलें. ज्या देवसेनेचा पूर्वी पराभव होत असे, त्याच सेनेने कार्तिकेयाच्या नेतृत्वामुळे विजय मिळविला.

रामलक्ष्मणांनी हें सैन्याचें नेतृत्व करण्याचें कौशल्य आपल्या अंगीं आणावें, हें या कथेचें तात्पर्य रामाला विश्वामित्रांनी येथे सांगितलें.

**९. गंगावतरणाची कथा** ( सर्ग ३८-४४ )- अयोध्येचा **सगर** नांवा-

चा एक धर्मात्मा राजा होऊन गेला. विदर्भराजाच्या **केशिनी** नामक कन्येशीं त्याचा विवाह झाला. या सगराची दुसरी भार्या **अरिष्टनेमीची** कन्या व सुपर्णाची बहिण **सुमति** नांवाची होती. केशिनीला **असमंजस** नांवाचा एक मुलगा झाला व सुमतीला साठ हजार पुत्र झाले.

सगराचा वडील मुलगा असमंजस हा प्रजाजनांचीं मुलें नदींत बुडवून मारूं लागला, म्हणून त्यास सगराने हद्दपार केलें. या असमंजसाला **अंशुमान्** नांवाचा तेजस्वी मुलगा झाला.

सगराने अश्वमेध यज्ञास प्रारंभ केला. त्याचा यज्ञीय अश्व चोरीस गेला, तो सापडेना. सगराचे साठ हजार पुत्र अश्वाचा शोध करीत निघाले. त्यांनी अश्व सापडेना, म्हणून पृथ्वी खणून टाकली. शेवटीं कपिलमुनि तप करीत होते, तेथे ते पोंचतांच, ते जळून भस्म झाले. नंतर सगराचा नातु अंशुमान् अश्वाचा शोध करण्यासाठी निघाला. त्याने आपले चुलते मरून पडले आहेत, असें पाहिलें व त्यास फार शोक झाला. त्यांचें श्राद्ध करावें, असें त्याने मनांत आणलें. पण तेथे पाणी नव्हतें, तेव्हा गरुडाने त्यास सांगितलें की, " तूं गंगानदीला येथे आण व त्या पवित्र उदकाने यांची उत्तरक्रिया कर. "

अंशुमानाने यज्ञीय अश्व शोधून आणला व सगराचा यज्ञ शेवटास गेला. सगरानंतर अंशुमान् राजा राज्यावर आला; पण गंगा पृथ्वीवर कशी आणावी, त्याचा कांही उपाय कोणाच्या लक्ष्यांत आला नाही. अंशुमानाच्या मागून त्याचा पुत्र **दिलीप** राज्यावर आला. दिलीपानंतर त्याचा पुत्र **भगीरथ** गादीवर आला.

या भगीरथ राजाने त्रिविष्टपामधून हिमालयांतून गंगानदी या आर्यावर्तामध्ये आणली व या गंगोदकाने पणजांची उत्तरक्रिया भगीरथाने केली व त्यामुळे त्यांचा उद्धार झाला.

सगर-अंशुमान्-दिलीप- भगीरथ या चार पिढ्यांतील राजांनी एकच ध्येय पुढे ठेवून गंगानदी आर्यावर्तातून वहावी, असा यत्न केला; पण पहिल्या तीन पिढ्यांतील राजांस जें यश मिळालें नाही, तें भगीरथाने मिळविलें.

या कथेने विश्वामित्र ऋषींनी रामलक्ष्मणांच्या मनावर असें बिंबविण्याचा यत्न केला की, **चार चार पिढ्यांपर्यंत एकच ध्येय पुढे ठेवून प्रयत्न करावे,**

तेव्हा अशीं महत्कार्यें तडीस जात असतात. चारपांच पिढ्यांपर्यंत चिकाटीचे प्रयत्न होत राहिले पाहिजेत, अशी चिकाटी रामलक्ष्मणांनी आपणांमध्ये आणावी. याशिवाय सगरपुत्रांचा प्रयत्न, अंशुमानाचे प्रयत्नही तरुणांनी ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत; पण या कथेचें तात्पर्य अनेक पिढ्यांपर्यंत चिकाटीने यत्न करणें व यश आलें नाही, तर पुनःपुनः प्रयत्न करणें, व यश मिळेपर्यंत कधीही मध्ये न थांबणें, हें आहे. रामलक्ष्मणांनी अशी चिकाटी धरावी व राक्षसांचा नाश करण्याचें कार्य नेटाने चालवावें, हें सुचविण्याचा मुख्य उद्देश येथे स्पष्ट दिसत आहे.

**१०. समुद्रमन्थनाची कथा** ( सर्ग ४५-४७ )- दितीचे पुत्र दैत्य व अदितीचे पुत्र देव या दोघांनी मिळून आपण निरोगी व अमर होण्यासाठी अमृत प्राप्त करावें, या हेतूने समुद्रमंथन केलें.

समुद्रमन्थन सुरू होतांच त्यांतून भयंकर हालाहल विष निघालें व तें सर्व विश्वाला जाळूं लागलें. तेव्हा सर्व जगाचें रक्षण व्हावें, म्हणून श्रीशंकरांनी तें पिऊन टाकलें व नाश होण्यापासून जगाचा बचाव केला. या मोठ्या कामगिरीमुळे श्रीशंकरांना '**महा-देव**' असें म्हणूं लागले. योगबलाने हें विष त्यांनी पचविलें.

त्यानंतर धन्वंतरी, अप्सरा, वारुणी यांची उत्पत्ति झाली. त्यानंतर अमृत निघालें. हें अमृत आपणांसच मिळावें, असें देव व दैत्य यांनी आग्रहाने म्हटल्यामुळे या दोघांमध्ये भयंकर लढाई झाली व दोघांचाही नाश होऊं लागला. पुढे विष्णूने मोहिनीच्या रूपाने दैत्यांचा समूळ नाश करून टाकला व देवांनी राज्य प्राप्त केलें.

आपल्या सर्व पुत्रांचा नाश झालेला पाहून, दितीने इन्द्रघातक पुत्र उत्पन्न करण्यासाठी तप केलें. आपला नाश करणारा पुत्र व्हावा, म्हणून दिति तप करीत आहे, हें जाणून इन्द्र कपटवेषाने तिच्याजवळ येऊन तिची सेवा करूं लागला. याचा उद्देश हा की, वेळ पाहून आपल्या शत्रूचा उपजण्यापूर्वीच नाश करतां यावा. एक वेळ दितीकडून अपवित्रता घडतांच इन्द्राने दितीच्या गर्भाचे तुकडे केले. अशा रीतीने इन्द्राने आपल्या शत्रूचा नाश, तो उपजण्यापूर्वीच केला. पुढे हेच मरुत् झाले व ते इन्द्राचे सहायक बनले.

या कथेचें तात्पर्य हें आहे की, आपला शत्रु वाढण्यापूर्वीच अथवा प्रबल

होण्यापूर्वीच त्याचा नाश करून टाकावा. या कथेचें दुसरें तात्पर्य हें आहे की, भावाभावांनी एकमताने समुद्रमंथनासारखें प्रचण्ड कार्य केलें; पण लाभाचा वाटा मिळण्याची वेळ येतांच सर्व लाभ मलाच पाहिजे असें म्हणून भांडले व यामुळे नाश पावले. यासाठी आपसांत असा कलह करूं नये.

हे दोनही उपदेश फार महत्त्वाचे आहेत. रामलक्ष्मण-भरत-शत्रुघ्नांनी सहकार्याने मोठमोठीं कामें करावीं, पण लाभ प्राप्त होण्याच्या वेळीं तो आपणां एकट्यासच मिळावा, यासाठी कधींहि आपसांत भांडूं नये. हा उपदेश विश्वामित्रांनी रामलक्ष्मणांना या कथेच्या मिषाने केला.

**११. अहल्येची कथा** ( सर्ग ४८-४९ )- 'गौतमाची स्त्री अहल्या. इन्द्राने गौतम वेषाने येऊन अहल्येशीं जार कर्म केलें. यामुळे गौतमांनी इन्द्राला शाप दिला व त्या कारणाने त्याचें वृषण गळून पडलें. नंतर अहल्येलाही येथे रामलक्ष्मण येईपर्यंत तप करीत राहण्यास सांगितलें. त्याप्रमाणे ती या आश्रमांत तप करीत आहे. तुम्ही दोघांनीहि या आश्रमांत जाऊन, तिचें आदरातिथ्य स्वीकारावें व तिला पावन करावी.' असें म्हणून दोघांही रामलक्ष्मणांस विश्वामित्रांनी गौतमाच्या आश्रमांत नेलें. त्या तपस्विनीला रामलक्ष्मणांनी वंदन केलें व तिने दिलेलें आदरातिथ्य स्वीकारलें. याप्रमाणे पावन झालेल्या अहल्येचा पुनः स्वीकार गौतमांनी केला व त्यांचा गृहस्थाश्रम सुरळीत चालू झाला.

या कथेने रामलक्ष्मणाला हें शिकविलें की, परस्त्रीगमनाने इन्द्रासारख्या देवराजाचीहि अशी फटफजिती झाली, मग इतरांची कथा काय ? तेव्हा परस्त्रीगमनाचें पाप कोणीहि करूं नये. या कथेपासून दुसरा बोध हा की, एखाद्या स्त्रीकडून कळत न कळत पाप घडलें, तरी तिला मरेपर्यंत पतित समजूं नये. तिला जर पूर्ण पश्चात्ताप झाला, तर तिला पावन करून पुनः समाजांत घ्यावें.

या कथेचा आणखीहि अनेक दृष्टींनी विचार केला पाहिजे, तो आता करूं—

श्रीवाल्मीकि मुनिप्रणीत रामायणामध्ये अहल्येच्या उद्धाराची कथा आहे. ही कथा आणखीहि कित्येक पुराणांमध्ये आलेली आहे; पण प्रत्येक पुराणांत कांहींतरी न्यूनाधिक्य आहे. यासाठी या कथेचें मूळ शोधून काढून, ती कथा कशी बनत व वाढत गेली, तें पाहिलें पाहिजे. आपल्या वैदिक वाङ्मयापैकी संहिता-ग्रंथांत

अहल्यादेवीच्या कथेचा मागमूसहि सापडत नाहीं; तथापि वैदिक संहितांचा जो भाग लुप्त झालेला आहे, त्यांत या कथेचा निर्देश आसावा, असें शतपथब्राह्मणां-तील वचनावरून वाटतें. वैदिक वाङ्मयांतील शतपथब्राह्मणामध्यें सर्वांत प्रथम 'अहल्येच्या जारा' चा उल्लेख आढळतो, तो असा-

## अहल्येचा जार ( इन्द्र )

**इन्द्रो वै यज्ञस्य देवता, तस्मात् आह, 'इन्द्र! आगच्छ' इति। 'हरिव आगच्छ,' 'मेधातिथेर्मेष,' 'वृषणश्वस्य मेने,' 'गौरावस्कन्दिन्,' 'अहल्यायै जार' इति। तत् यानि अस्य चरणानि, तैरेव एनं एतत् प्रमुमोदयिष्यति।**

( श. ब्रा. ३।३।४।१८; तै. आ. १।१२ )

"इन्द्र यज्ञाची देवता आहे, यासाठीं यजमान म्हणत आहे कीं, 'हे इन्द्रा! तूं ये.' 'हे ( हरिवः ) घोडे बाळगणाऱ्या! ये,' 'हे मेधातिथीच्या मेंढ्या! ये,' 'हे वृषणश्वाच्या मेने ( मुली ) ये,' 'हे रेड्यावर ( किंवा गौर मृगावर ) बसणाऱ्या! ये,' 'हे अहल्येच्या जारा! ये.' हीं या इन्द्राचीं चरित्रें आहेत, त्या चारित्र्यांच्या उल्लेखानें इन्द्राला तो आनन्दवितो.'

या शतपथब्राह्मणांतील वचनांत इन्द्राच्या वर्णनामध्यें पुढें दिलेल्या गोष्टींचा उल्लेख आहे—

१ '**इन्द्र**' ( इन्-द्र )= शत्रूचा नाश करणें,
२ '**हरिवः**' ( हरि-वान् )= उत्तम घोडे जवळ बाळगणें,
३ '**मेधातिथेः मेषः**' = मेधातिथीसाठीं मेंढा बनणें,
४ '**वृषणश्वस्य मेना**' = वृषणश्वाची मेना नामक मुलगी बनणें,
५ '**गौरावस्कन्दिन्**' = गौर मृगावर अथवा रेड्यावर बसणें.
६ '**अहल्यायै जार**' = अहल्येचा जार होणें.

हीं इन्द्राचीं चरित्रें सुचविणारीं वर्णनें आहेत. या चारित्र्यांची इन्द्राला आठवण करून दिली असतां, इन्द्र फारच संतुष्ट होतो व तो प्रसन्नहि होतो, असें वरील

वचनांत शतपथब्राह्मणकार म्हणतात; निदान या वर्णनांत आपली निन्दा मुळीच नाही. हीं आपलीं प्रशंसनीय कृत्यें आहेत, यांत दोष असा कांहीसुद्धा नाही, असें इन्द्रास वाटत होतें, यांत मुळीच शंका नाही. यासाठीच अशी आपली स्तुति गाइली जावी, असें इन्द्रास वाटत होतें !

यज्ञासाठी सर्व देवांची सभा भरलेली आहे, इतर सदस्य व विद्वान् तेथे उपस्थित आहेत, अशा मोठ्या सभेमध्ये, इन्द्रासारख्या प्रमुख देवतेच्या संबंधाने, त्याचा संतोषा व्हावा, यासाठी जें काय बोलावयाचें, त्यांत त्याची निंदा नसलीच पाहिजे, हें उघड आहे. अशा भर सभेंत मोठ्या आवाजाने '**हे इन्द्रा ! तूं अहल्येचा जार आहेस,**' असें म्हटलें असतां, तें इन्द्राला राग आणण्यास कारणीभूत होत नाही, तर तें त्याचा संतोष वाढवण्यास कारणीभूत होतें, ही गोष्ट येथे लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. त्या वेळचा देवसमाज नैतिक दृष्टया कसाही असला, तरी तो इतका अधःपाताला पोंचला होता, असें वाटत नाही. एका ऋषीच्या पत्नीशीं आपल्या राजाने जार कर्म करावें व त्याचा भर सभेंत यज्ञाच्या वेळीं उल्लेख केला जावा व तें वर्णन आपली प्रशंसाच आहे, असें देवराजाला वाटावें, इतकी समाजाची अधोगति झालेली आपणांस इतिहासांत तर आढळत नाहींच, तेव्हा याचा कांहीतरी दुसरा आशय असावा, असें म्हणणें प्राप्त होतें. याचाच आज विचार करावयाचा आहे. यासाठी आधी वरील शतपथाच्या वर्णनांत आलेल्या गोष्टींचा वेदमन्त्रांत कसा काय उल्लेख आढळतो, तें पाहूं या—

१. इन्द्र हा वृत्रादि शत्रूंचा संहारक आहे, यासंबंधाने वेदामध्ये शेकडो ठिकाणीं उल्लेख आहेत. '**अहन् अहिं ।**' ( ऋ० १।३२।१ ) अहि नामक शत्रूचा इन्द्राने वध केला. अशीं वर्णनें अनेक आहेत. '**वृत्रवध**' हा तर इन्द्रसूक्तांचा प्रमुख विषयच आहे.

२. इन्द्राजवळ उत्तमोत्तम असे पुष्कळ घोडे असल्याचीं वर्णनेंहि वेदामध्ये आहेत— '**हरी समत्सु शत्रवः ।**' (ऋ. १।५।४) '**हरी विपक्षसा रथे !**' ( ऋ. १।६।२ ) ' लढाईमध्ये ज्याच्या चपळ घोड्यांवर शत्रु झडप घालूं शकत नाही, ' ' दोन घोडे रथाला जुंपले आहेत, ' अशीं पुष्कळ वर्णनें

इन्द्राच्या घोड्यांसंबंधाने वेदामध्ये आहेत.

३. मेधातिथीचा मेंढा इन्द्र झाला होता, याविषयीहि वेदमन्त्रांत बरेंच वर्णन आहे. पहा— ' **इत्था धीवन्तमद्रिवः काण्वं मेध्यातिथिम्। मेषो भूतोऽभि यन्नयः।** ' ( ऋ. ८।२।४० ),= ( धीवन्तं काण्वं मेध्यातिथिं ) बुद्धिमान् कण्वपुत्र मेध्यातिथीला ( इत्था ) याप्रमाणे ( मेषः भूतः ) मेंढा होऊन हे ( अद्रिवः ) वज्रधारी इन्द्रा ! तूं ( अभियन् ) जवळ जाऊन, त्यास ( अयः ) पोंचवलेस. ' या वर्णनांत इन्द्राने मेंढा होऊन मेधातिथि ऋषीला सहाय्य केलें, असें म्हटलें आहे. सामवेदाच्या षड्विंश ब्राह्मणामध्ये हाच वृत्तांत आलेला आहे. ' **मेधातिथिं हि काण्वायनिं मेषो भूत्वा आजहार** ' ( ष. ब्रा. १।१ )= कण्वपुत्र मेधातिथीला इन्द्राने मेंढ्याचें रूप घेऊन उचलून नेलें. इन्द्र स्वतः मेंढा झाला होता, यासंबंधी वेदमन्त्रांत हा असा उल्लेख आलेला आहे.

४. वृषणश्वाची मेना ही कन्या इन्द्र स्वतःच बनला होता, याविषयी ऋग्वेदामध्ये जो मंत्र आहे, तो असा— ' **मेनोऽभवो वृषणश्वस्य सुक्रतो।** ' ( ऋ. १।५१।१३ ) हे उत्तम क्रतु करणाऱ्या इन्द्रा ! तूं वृषणश्वाची कन्या मेना झाला होतास. याविषयी शाट्यायन ब्राह्मणांतील वचन आहे, तें असें— **वृषणश्वस्य मेन इति, वृषणश्वस्य मेना भूत्वा मघवा कुल उवास इति। ... वृषणश्वस्य मेना नाम दुहिताऽऽस। तामिन्द्रश्चकमे इति।** ' वृषणश्वाची मुलगी मेना होती, इन्द्रच ती बनला होता.

५. गौर नामक पशु आहे. हा मृग असावा अथवा रेडा असावा. यावर इन्द्र उत्तम प्रकारें बसत असे. मृगावर बसणें फार कठीण आहे; कारण तो फार चपळ असतो. [ गौर शब्द चारही वेदांमध्ये १७ वेळ आला आहे; पण त्यांत इन्द्र त्यावर बसतो, असा उल्लेख अजूनपर्यंत कोठे सापडला नाही. ]

६. अहल्येचा जार इन्द्र आहे. सध्या ज्या वेदांच्या संहिता आपल्याजवळ आहेत, त्यांत ' **अहल्या** ' शब्दच नाही, तेव्हा त्यांत अहल्येच्या जार कर्माचा उल्लेख कोठून सापडणार ? कदाचित् ज्या वेदसंहिता अथवा जे संहिताभाग लुप्त झाले आहेत, त्यांत यासंबंधीचा उल्लेख असला तर असेल.

ज्या अर्थी शतपथब्राह्मणाने ' **अहल्यायै जारेति** ' असा मंत्रप्रतीकाचा

उल्लेख करून निर्देश केलेला आहे, त्या अर्थी संहितामन्त्रांत कोठेतरी हा उल्लेख आला असला पाहिजे; पण तसा स्पष्ट उल्लेख सध्याच्या संहितांमध्ये नाही. तेव्हा जर तो कधी काळीं असला, तर तो लुप्तभागांत असेल; पण आज या संबंधाचा एकही पुरावा मन्त्रभागामध्ये सापडत नाही, हें मात्र निर्विवाद होय.

वरील शतपथवचनांत इन्द्राच्या एकंदर सहा चरित्रांचा उल्लेख आहे. त्यांपैकी चार चरित्रांचा उल्लेख मंत्रभागामध्ये सापडतो. बाकीच्या दोहोंचा उल्लेख सापडत नाही; पण गौराचा इन्द्राशीं संबंध मात्र वेदांत आहे. आपणांस फक्त अहल्येचा उल्लेखच आज पहावयाचा आहे. त्याचा म्हणजे अहल्या या नांवाचा निर्देशसुद्धा मन्त्रभागामध्ये नाही. इन्द्राच्या वर्णनापैकी इतर पांच गोष्टींचा निर्देश मन्त्रभागामध्ये सापडत आहे. यावरून व शतपथब्राह्मणाच्या उल्लेखावरून अहल्येचा निर्देश मन्त्रभागांत असावा, असें म्हणावेंसें वाटतें.

शतपथवचनांत उल्लेखिलेल्या इतर पांच गोष्टींचा विचार आम्ही केव्हांतरी निराळ्या लेखामध्ये करूं. सध्या आपल्या या लेखामध्ये आपणांस फक्त अहल्येच्या कथेचाच विचार करावयाचा आहे. या ठिकाणीं प्रथम हें स्पष्टपणाने मनांत आणलें पाहिजे की, इन्द्राला ‘ **अहल्येचा जार** ’ असें सभेमध्ये म्हटलें असतां संतोष होत आहे, आपली योग्य प्रशंसा झाली, असें त्यास वाटत आहे. इन्द्राच्या दृष्टीने व याजकांच्या मताने यांत कोणत्याही रीतीने इन्द्राची नाचक्की नाही, अनीतीचा निर्देशहि नाही, तर हा इन्द्राच्या प्रौढीचा उल्लेख आहे! म्हणून इन्द्राची स्तुति करतांना याचा उल्लेख करण्याचा परिपाठ पूर्वापार पडलेला असावा.

इतकें ध्यानीं आल्यावर वरील शतपथब्राह्मणांतील वचनासारखेंच एक वचन षड्विंश ब्राह्मण ( अ. १।१ ) किंवा तांड्यमहाब्राह्मण ( २६।१ ) मध्ये आहे, तें आता पहा—

**१ ‘ इन्द्र आगच्छ ’ इति, यत् आह, इन्द्र आगच्छ इति, एतद्वा अस्य प्रत्यक्षं नाम, तेनैव एनं तदाह्वयति ।**

**२ ‘ हरिव आगच्छ ’ इति, पूर्वपक्षावपरपक्षौ वा इन्द्रस्य हरी, ताभ्यां हीदं सर्वं हरति ।**

३ 'मेधातिथेर्मेष' इति मेधातिथिं ह काण्वायनं मेषो भूत्वाऽऽजहार।

४ 'वृषणश्वस्य मेन' इति वृषणश्वस्य ह मेनस्य मेनका नाम दुहिता, स तां ह इन्द्रश्चकमे।

५ 'गौरावस्कन्दिन्निति' गौरमृगो ह भूत्वावस्यन्द्यारण्याद्राजानं पिबति।

६ 'अहल्यायै जार' इति, अहल्याया ह मैत्रेय्या जार आस। कौशिक ब्राह्मणेति, कौशिको ह स्म एनां ब्राह्मण उपन्येति। गोतमब्रुवाणेति, देवासुरा ह संयत्ता आसंस्तानन्तरेण गोतमो शश्राम, तामिन्द्र उपेत्योवाच, इह नो भवांन्स्पृशंश्चरत्विति, नाहमुत्सह इति, अथाहं भवतो रूपेण चराणीति, यथा मन्यस इति, स यत्तद्गोतमो वा ब्रुवाणश्चचार, गोतमरूपेण वा, तदेतदाह। (ष. ब्रा. १।१; ताण्ड्यमहा. २६।१)

पूर्वी दिलेल्या शतपथाच्या वचनाची ही व्याख्याच आहे, असें दिसतें. या वचनामध्ये जो गौतम व इन्द्र यांचा संबंध आला आहे, तो अहल्येच्या कथेचें कोडें उलगडण्याच्या दृष्टीनें उपयोगी पडेल, असें वाटतें; म्हणून वरील वचनांत आलेल्या अहल्येच्या कथेचा वृत्तांत जसा दिसत आहे, तसा तो पहा–

६ "अहल्या ही मैत्रेयी होय, तिचा जार इन्द्र होता. कौशिक ब्राह्मण इन्द्रच होता. कौशिकाच्या रूपानें तो इन्द्र त्या अहल्येकडे गेला. एकदा देव व असुर यांचें घनघोर युद्ध झालें. त्या युद्धांत गौतमानें पुष्कळच काम केल्यामुळे तो अतिशय थकून गेला. तेव्हा इन्द्र त्यांच्याजवळ जाऊन म्हणाला की, "तुम्ही आता या ठिकाणीं (राक्षसांच्या त्रासांतून सुटण्यासाठी) गुप्तचररूपानें संचार करावा." त्यावर गौतम म्हणाला की, 'आता तसें करण्याचा माझ्यामध्ये मुळीच उत्साह राहिलेला नाही.' हें ऐकून इन्द्र त्यास म्हणाला, 'तर मग मी तुमच्या रूपानें येथे संचार करतों.' तेव्हा गौतम म्हणाले की, 'जशी तुझी इच्छा असेल, तसें कर.' हें ऐकतांच इन्द्रानें गौतमाचें रूप धारण केलें व तेथे संचार करूं लागला व त्यानें 'मी गौतमच आहें,' असें सर्वांस सांगितलें.

या कथेमध्ये इन्द्राने अहल्येशीं व्यभिचार केल्याचा उल्लेख मुळींच नाहीं; तथापि इन्द्र हा गौतमाच्या रूपाने केव्हा व कां संचार करीत होता, तें यावरून कळण्यासारखें आहे. जेव्हा गौतमाच्या रूपाने हिंडण्याचा अवसर इन्द्रास मिळाला व तो गौतमाच्या सांगण्यानेच मिळाल्याचें वर आलें आहे, तेव्हा त्या दिवसांत त्याने त्या प्रसंगाचा लाभ घेऊन अहल्येशीं कुकर्म केलें असावें किंवा तसें कर्म त्याच्याकडून झालें असावें, असें मानण्यास येथे जागा आहे.

जैमिनीय ब्राह्मणामध्येहि ही कथा ( २।७० मध्ये ) आलेली आहे. तेथेहि या कथेचा आशय असाच आहे. वरील षड्विंश ब्राह्मणांतील उताऱ्यावरून ‘ इन्द्र-अहल्ये ’च्या कथेवर फारच उत्तम प्रकाश पडत आहे व या कथेमध्ये तपस्येपेक्षा राजकारणी उलाढालीचा संबंध जास्त दिसत आहे.

## कथाभाग.

एकदा देव व असुर यांचें घनघोर युद्ध सुरू झालें. या युद्धभूमीवर देवसेनेचें सेनापत्य गौतमाने पतकरून फार मोठ्या शिकस्तीने युद्ध चालवलें. अनेक दिवस सारखा ताण पडल्यामुळे गौतम अतिशयच थकून गेले. ते इतके की, यापुढे त्यांच्याकडून काम होणें शक्य नव्हतें. तेव्हा इन्द्राने त्यांना विश्रांति घेण्याचा कांही उपाय सुचवला; पण तोही त्या वेळीं गौतमाकडून होणें शक्य नव्हतें. अशा वेळीं इन्द्र म्हणाला की, ‘ तुमच्या वेषाने पुढचें काम मी करतों व तुम्ही गुप्त ठिकाणीं जाऊन पुरेसा विसावा घ्या. ’ याप्रमाणे ठरतांच मुख्य सेनापतीचा वेष-गौतमाने घातला होता, तो इन्द्राने धारण केला व तेथे इंद्रच गौतमाचे वेषाने वावरूं लागला. युद्धाचा शेवट झाला नसल्याने व मध्येच ही गोष्ट बाहेर आली, तर सैनिकांची शिस्त बिघडेल, ही मोठी भीति असल्याने, गौतमाच्या जागीं इंद्र आला आहे, ही गोष्ट बाहेर फोडणें त्या वेळीं इन्द्रास अशक्यच होतें. देवांचा विजय झाला पाहिजे, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं मुख्य सेनापति नाहीसा झाला आहे, असें जर सैनिकांस समजलें, शत्रूस कळलें किंवा इतरांस कळलें, तर सर्वच बेत फसतील, असा हा आणीबाणीचा प्रसंग होता.

अशा वेळीं अहल्यादेवीशींहि कांही घरगुती नित्यनैमित्तिक अथवा कसल्यातरी

अन्य कृत्यांत भाग घेऊन वागण्याचा अवसर इन्द्रास मिळाला असण्याचा संभव आहे. या प्रसंगाचें महत्त्व ओळखून गुप्त गोष्ट प्रकट न करणें, हेंच त्या वेळीं इन्द्राचें कर्तव्य झालेलें असावें. जर अहल्येला तो सांगता की, आपण गौतम नाही, तर गुप्त गोष्ट फुटली जाण्याचा संभव होता. असें झाल्यास कदाचित् लढाईचें स्वरूपच बदलण्याचाहि संभव होता. अशा वेळीं इन्द्राने कांही कुकर्म केलें असेल, किंवा त्याला तें करावें लागलें असेल, अथवा अशा संधीचा फायदा त्याने दुष्ट बुद्धीने घेतलाहि असेल.

## देवांचें कार्य.

वाल्मीकीय रामायणामध्ये गौतमाचा क्रोध झाल्यावर जेव्हा इन्द्र देवांकडे गेला, तेव्हा देवांपुढे जें भाषण त्याने स्वतः केलें, त्यांत ' मी ( वा० रामा० बाल० ४९।४ '**सुरकार्यकरं** ' ) **देवांचें कार्य** किंवा देवांच्या हितासाठी काय करणें योग्य, तें केलें, ' असें सांगितलेलें आढळतें; पण वाल्मीकीय रामायणामध्ये कोणतें देवकार्य घडलें, त्याचा उल्लेख नाही; परंतु या षड्विंश ब्राह्मणाच्या उताऱ्यावरून त्या सुरकार्याचा थांग लागतो. देवासुरयुद्ध चालू होतें, मुख्य संचालकत्व गौतमांकडे होतें, अविश्रांत श्रम झाल्यामुळे त्यांस अत्यंत थकवा आला व दीर्घ विश्रांतीची आवश्यकता उत्पन्न झाली; तेव्हा गौतमाच्या अनुमतीनेच इन्द्राने गौतमाचा वेष धारण केला व सेनासंचालन करण्यास प्रारंभ केला. या वेळीं सर्व वेष गौतमाचाच असल्याने व गुप्त गोष्ट बाहेर फोडावयाची नसल्याने इन्द्राला आपण गौतमच आहे, असें भासवावें लागलें. गौतमाचीं सर्व कर्तव्यें करावीं लागलीं. हीं कर्तव्यें करीत गौतमाच्या घरचींहि सर्व कृत्यें बेमालूमपणाने करणें त्यास भाग पडलें असावें. येथे कोणाला अशी शंका येईल की, गौतमाचीं सर्व कृत्यें करणें त्यास भाग पडलें, हें जरी खरें मानलें, तरी त्या वेळेचा फायदा त्याने असा घ्यावा कीं काय ? हें म्हणणें खरें आहे; पण राजकारण उलटण्याचा प्रसंग आला असतां व येथे गौतम नाही, हें गुप्त बाहेर फोडावयाचें नाही, असा प्रसंग आला, तर तेथे काय करावें, हाही एक मोठा बिकट प्रश्न आहे. या प्रसंगाची साद्यन्त हकीगत आपणांकडे नाही व षड्विंशब्राह्मणांत इन्द्राने अहल्येशीं जारकर्म केल्याचा उल्लेखही नाही. फक्त इन्द्र आपण गौतम आहे, ( **गौतमब्रुवाणः** ) असें सांगत होता, इतकेंच आहे.

पण हें इन्द्राचें करणें राजकीय महत्त्वाचें होतें. देवांचा विजय होण्यासाठी गुप्त बातमी फोडणें त्यास शक्य नव्हतें, अशा स्थितींतील तें आहे.

येथे कोणाला असें वाटेल की, इन्द्राला कोणी ओळखलें कसें नाही? यासंबंधाने इतकें लिहिलें की पुरें कीं, सेनापति, उपसेनाध्यक्ष आदिकांस ओळखणें, हें त्यांच्या चिन्हांवरूनच शक्य असतें. सेनाचालकत्व करीत असतां चिलखतांनी सर्व शरीर आच्छादिलेलें असतें. कित्येक चिलखतें तोंडावरहि आलेलीं असतात, केव्हा केव्हा तर नाक-तोंड-डोळ्यांवर जाळीहि बसविलेली असते. कोणताही अवयव दिसूंच शकत नाही. तेव्हा बाह्य खुणांशिवाय कोणीहि कोणास ओळखूं शकत नाही. ( **भवतो रूपेण चराणीति** ) तुमच्या वेषाने येथे मी संचार करतों, असें इन्द्र म्हणतो व गोतमाच्या अनुमतीने तसें करीत आहे. कित्येक पुराणांत इन्द्र हा अहल्येकडे वेषान्तराने अनेक दिवस येत होता, असें लिहिलें आहे. गौतमाला जर पुष्कळ दिवस विश्रांति घेणें व ती गुप्त ठिकाणीं जाऊन घेणें आवश्यक झालें असेल, तर इन्द्र अहल्येकडे अनेक दिवस वेषान्तराने का येत होता, याचा सरळ उलगडा होतो व जर अनेक दिवस तो येत असेल, तर या दोघांसहि एकान्तवास करण्यास अवसर मिळणें शक्य झालें असेल, असें दिसत आहे.

वाल्मीकीय रामायणाप्रमाणे अहल्येने इन्द्रास ' हा गौतम नाही, इन्द्र आहे. ' असें ओळखल्याचें दिसतें, तेंही वरील स्थितींत शक्य दिसतें; कारण दररोज बरोबर वागणारी धर्मपत्नी वेषान्तरित पतीला कदाचित् पहिल्या भेटींत ओळखणार नाही; पण तो अनेक वेळा आला व घरांतील अनेक कामें करूं लागला, तर त्यास ओळखणें पत्नीस अशक्य नाही. यासाठी तिनें इन्द्राला ओळखलें, हेंहि शक्य दिसतें व इंद्राने आलेल्या अवसराचा अयोग्य फायदा जाणूनबुजून घेतला, हेंहि अशक्य दिसत नाही.

खरोखर काय घडलें, तें सविस्तर या ठिकाणीं म्हणजे शतपथ व षड्विंश या ब्राह्मणांत नाही; पण जें काय आपणांस रामायणादि ग्रंथांत लिहिलेलें आढळतें, तें तसें घडणें शक्य आहे, असें या प्रसंगाचा विचार करतां म्हणावें लागतें.

इतकी संगति सहज लागत असली, तरी ' **अहल्येचा जार** ' हे शब्द, आपत्कालीं न कळत ती गोष्ट घडली, असें मानलें, तरी भूषणावह कसे ठरूं

शकतात, हें ध्यानांत येत नाही. चुकून ऋषिपत्नीशीं कुकर्म घडलें, तरी तें प्रशंसनीय ठरूं शकत नाही; पण शतपथांत तर या वर्णनानें इन्द्र हर्षित होतो, असें म्हटलें आहे. तेव्हा हें काय कोडें आहे, तें आणखी शोधून पाहणें इष्ट आहे.

## मैत्रेयी अहल्या.

वरील षड्विंश-ब्राह्मणामध्ये अहल्या ही "**मैत्रेयी**" आहे, असें म्हटलें आहे. मित्राची मुलगी मैत्रेयी होय. '**मित्र**' हें या सहस्ररश्मी सूर्याचें नांव आहे. त्या सूर्याची मुलगी उषा ही जर अहल्या मानली, तर हें नांव अन्वर्थक होऊन, ही कथा रूपकालंकारानें घडलेली असेल, असें वाटावयास लागतें. रात्री उषा, या सूर्याच्या पत्न्या, स्त्रिया, बहिणी, माता किंवा मुली आहेत व सूर्य हा त्यांचा पति, भाऊ, पुत्र, पिता किंवा जार आहे, अशीं वर्णनें काव्यामध्ये होणें शक्य आहे. अशीं रूपकें होणें काव्यदृष्टीनें अशक्य नाही. यासाठी या संबंधानें वेदमंत्रांचें अन्वेषण करणें आवश्यक आहे.

'**अहल्या**' शब्दच वेदमंत्रांत नाही. हा मोठा दोष या संशोधनामध्ये राहणार, यांत शंका नाही. शतपथामध्ये जें प्रतीक '**अहल्यायै जारेति**' असें घेतलें आहे, तें कोठून घेतलें आहे, तें समजत नाही; म्हणूनच तें लुप्त वेदमन्त्रराशीमधून घेतलें असावें, असें आम्ही म्हटलें आहे. तेव्हा '**अहल्ये**'चा शोध वेदामध्ये होणें शक्य नाही. तेव्हा शिल्लक राहिलेल्या '**जारा**'चा शोध वेदामध्ये करणें एवढेंच कार्य आज आपलें या ठिकाणीं आहे. वेदाच्या सध्या उपलब्ध असलेल्या संहितांमध्ये २८ मंत्रांत '**जार**' शब्द आलेला आहे. यांतील ६ मंत्र पुनरुक्त झाल्यामुळे एकूण ३४ मंत्रांत हा '**जार**' शब्द आलेला आहे. (कदाचित् यजुर्वेदाच्या अन्य संहितांमध्ये कोठें तो असलाच, तर तो आम्ही या गणनेमध्ये घेतलेला नाही; पण त्यांमध्ये तो नाही, असेंच आमच्या गणनेवरून आम्हांस वाटतें.)

ऋग्वेदामध्ये २६ वेळा, वा० यजुर्वेदामध्ये २ वेळा, सामवेदामध्ये ३ वेळा, अथर्ववेदामध्ये ३ वेळा असा एकूण ३४ वेळा '**जार**' शब्द आलेला आहे. यांत ६ मंत्र पुनरुक्त आहेत. यासाठी केवळ २८ मंत्रच आमच्या या संशोधनासाठी आम्हांस पहावयाचे आहेत, ते आता क्रमानें पाहून, त्याचा पुढे विचार करूं.

# वेदांमधील 'जार' शब्द.

वेदांमध्ये ज्या ज्या मंत्रांत 'जार' हा शब्द आलेला आहे, तो त्या त्या मंत्रांत किती अर्थांनी आलेला आहे व त्या मंत्रांवरून अहल्येची कथा उलगडण्यास सहायता मिळेल, असा कांहीतरी मंत्रभाग सापडतो कीं काय, तें आता पाहूं या–

## संधीसाठी जार (वृद्ध मनुष्य).

यजुर्वेद वाजसनेयी संहितेमध्ये '**संधये जारं**' (वा० य० ३०।९) असा मन्त्र आहे. संधि करावयाचा असतांना, म्हणजे युद्धयमान दोन राष्ट्रांमध्ये तडजोड करून समेट घडवून आणावयाचा असतांना, तह करावयाचा असतांना, तेथें ' **जार** ' म्हणजे ' **वृद्ध मनुष्य** ' नेमावा, असें या मंत्रांत सांगितलें आहे.

तडजोड करावयाची असतां तरुण माणसें विकारवश होऊन समेट होत असलेला बिघडवितील, अथवा त्या समेटांतच पुढील युद्धाचें बीज गोवून देतील व या कारणाने जनतेमध्ये शान्तता नांदणार नाही, म्हणून असा संधि, तह किंवा तडजोड घडावयाच्या वेळीं अनुभवशीर वृद्ध मनुष्य नेमावा, हें वेदाचें सांगणें खरोखरच बहुमोलाचें आहे.

या ठिकाणीं ' **जार** ' शब्दाचा अर्थ ' **म्हातारा** ' '**जीर्ण झालेला**' असा आहे. ज्याला वृद्ध अवस्था आलेली आहे, ज्याने बराच अनुभव घेतलेला आहे, तो '**जार**' होय. ' **जॄ=वयोहानौ** ' या धातूवरून हा शब्द बनलेला असल्याने याचा येथे अर्थ ' ज्याचें वय संपलें आहे, जो म्हातारा झाला आहे ' असा आहे.

या ठिकणीं ' **जार** ' शब्दाच्या एका उत्तम अर्थाचा पत्ता आम्हांस लागला. यावरून वेदांमध्ये ' **व्यभिचारी** ' अर्थ नसलेला ' जार ' शब्द आहे, असें दिसतें. असेच आणखी कांही मन्त्र असल्यास आपण ते आता पाहूं—

## जलांचा जार.

( प्रस्कण्वः काण्वः । अश्विनौ । गायत्री )

**हविषा ' जारो अपां ' पिपर्ति पपुरिर्नरा ।**
**पिता कुटस्य चर्षणिः** ॥ ( ऋ. १।४६।४ )

हे ( नरा ) शूर वीर हो ! ( पपुरिः ) तृप्त करणारा ( अपां जारः ) जलांचा जार ( हविषा ) हविर्द्रव्यानें देवांना तृप्त करतो. हा ( कुटस्य पिता ) कृतकर्मांचा स्वामी व ( चर्षणिः ) सर्वांचा द्रष्टा आहे.

या ठिकाणीं ' **अपां जारः** ' जलांचा जार, हें सूर्याला नांव आहे. ( निरुक्त ५।२४ ) पाणी सूर्याच्या उष्णतेने वाळून जातें, हा अर्थ येथे आहे. 'हानि करणें' या अर्थाच्या ' जॄ ' धातूवरून हा शब्द बनला आहे. यांत व्यभिचाराचा संबंध नाहीं. सूर्य आपल्या किरणांनी पाणी शोषून घेतो व पाणी नाहींसें करतो व पाण्याची वाफ आकाशांत जाऊन तेथे मेघ बनले, म्हणजे त्या पाण्याच्या मेघांनाही त्यांतून वृष्टि करवून त्यांस क्षीण करतो. हा अर्थ ' **आपां जार** ' यांत आहे. ' **पाण्याचा जार** ' यांत कोणत्याही दृष्टीने पाहिलें, तरी व्यभिचाराचा संबंधच येऊं शकत नाहीं, हें तर अगदी उघड आहे. आणखी पहा—

## यज्ञाचा जार ( यज्ञ पूर्ण करणारा ).

( त्रित आप्त्यः । अग्निः । त्रिष्टुप् )

**द्युभिर्हितं मित्रमिव प्रयोगं प्रत्नमृत्विजमध्वरस्य जारम् ।**
**बाहुभ्यामग्निमायवोऽजनन्त विक्षु होतारं न्यसादयन्त ॥**

( ऋ० १०।७।५ )

( द्युभिः हितं ) प्रकाशांनी युक्त ( मित्रं इव प्रयोगं ) मित्राप्रमाणे सत्कार करण्यास योग्य ( प्रत्नं ) पुराण पुरुष, ( ऋत्विजं ) ऋतूप्रमाणे यज्ञ करणाऱ्या व ( अध्वरस्य जारं ) हिंसारहित यज्ञाची पूर्णता करणाऱ्या ( अग्निं ) अग्नीला ( आयवः बाहुभ्यां अजनन्त ) मनुष्यांनी आपल्या बाहूंनी उत्पन्न केलें व ( विक्षु ) सर्व प्रजांमध्ये ( होतारं न्यसादयन्त ) देवांना बोलावणारा म्हणून त्यास स्थापन केलें.

या मंत्रांत ' **अध्वरस्य जार** ' म्हणजे ' हिंसारहित यागांना पूर्ण करणारा ' असा जार शब्दाचा अर्थ आहे. तसेंच—

सर्व देवतांना अग्नि यज्ञस्थानामध्ये बोलावून आणतो; हा या अग्नीचा अधिकार आहे. या अग्नीला उत्पन्न करण्यासाठी लाकडाच्या दोन अरणी एकमेकांवर घासतात व यज्ञ करणारे अग्नि उत्पन्न करतात. यामध्ये हवन केल्याने यज्ञ सिद्ध होतो.

अशा रीतीनें हा अग्नि यज्ञाची सांगता करतो, म्हणून यास येथे ' **अध्वरस्य जारः** ' ( यज्ञाचा जार ) असें म्हटलें आहे. येथे जार शब्दाचा अर्थ ' पूर्ण करणारा, सिद्ध करणारा ' असा आहे. अग्नि हाच सर्व यज्ञ पूर्ण करीत असल्याने त्यास येथे यज्ञाचा जार म्हटलें आहे. हा ' **जार** ' शब्दाचा अर्थ अनेक दृष्टींनी पाहण्यासारखा आहे. येथे ' **अध्वर** 'शब्द यज्ञवाचक आहे. ' **ध्वरा** ' म्हणजे कुटिलता किंवा हिंसा. ती ज्यांत नाही, त्याचें नांव ' **अध्वर** ' होय. असे यज्ञ अग्नि करतो. यज्ञाची सिद्धि करणारा, असा याचा येथे अर्थ आहे. आणखी पहा–

## शत्रूचे किल्ले जिंकणारा जार.

( अष्टादंष्ट्रो वैरूपः । इन्द्रः । त्रिष्टुप् )

**सध्रीचीः सिन्धुमुशतीरिवायन्त्सनाज्जार आरितः पूर्भिदासाम्।**
**अस्तमा ते पार्थिवा वसून्यस्मे जग्मुः सूनृता इन्द्र पूर्वीः ॥**

( ऋ० १०।१११।१० )

( उशतीः इव ) कामुक स्त्रिया पतीकडे जातात, त्याप्रमाणे ( सध्रीचीः सिन्धुं आयन् ) वाहणाऱ्या नद्या समुद्राकडे जातात. ( आसां ) या नद्यांचा ( आरितः ) प्रेरणा करणारा स्वामी ( पूः भित् ) शत्रूंचे किल्ले तोडून ( जारः ) शत्रूंना जीर्ण करणारा इन्द्रच ( सनात् ) चिरकालापासून प्रसिद्ध शूर आहे. हे इन्द्र ! ( ते पार्थिवा वसूनि ) तुझीं पृथ्वीवरील धनें ( पूर्वीः सूनृताः ) प्राचीन सत्य स्तोत्रें ( अस्मे अस्तं आ जग्मुः ) आमच्या घराप्रत येवोत.

या मंत्रांत ' **जार** ' शब्द आहे, पण तो व्यभिचारी या अर्थी नसून, ' शत्रूंचा नाशकर्ता, शत्रूंना क्षीण करणारा, शत्रूंना जीर्ण करणारा ' या अर्थी आहे.

शत्रूंच्या किल्ल्यांना तोडून, शत्रूंचीं नगरें मोडूनतोडून जाळून शत्रूंना पादाक्रांत करणारा, शत्रूंची शक्ति क्षीण करणारा शूर वीर या अर्थी हा शब्द आहे. पूर्वी ' वृद्ध ' या अर्थी ' जार ' शब्द आलेला आहे. या जार शब्दाचा अर्थही शौर्यामध्ये, शत्रूंचा फन्ना उडवण्यामध्ये, वृद्ध म्हणजे अनुभवी असा आहे. कोणी वयाने वृद्ध, दुसरा ज्ञानामध्ये वृद्ध व तिसरा शौर्यामध्ये वृद्ध ; या सर्वात वृद्धत्व सामान्येंकरून आहे, हेंच वृद्धत्व येथे ' जार ' शब्दाने दाखवलें आहे. तसेंच–

*

## जार (वृद्ध, म्हातारा ).

( भूतांशः काश्यपः । अश्विनौ । त्रिष्टुप् )

**पज्रेव चर्चरं जारं मरायु क्षद्मेवार्थेषु तर्तरीथ उग्रा ।**
**ऋभू नापत् खरमज्रा खरज्रुर्वायुर्न पर्फरत् क्षयद्रयीणाम् ॥**
( ऋ. १० । १०६ । ७ )

हे ( उग्रा ) उग्र अश्विदेव हो ! ( पज्रा इव ) वीरांप्रमाणे तुम्ही दोघेही (जारं) जीर्ण होणाऱ्या व ( मरायु ) मरणाऱ्या या ( चर्चरं ) हालचाल करणाऱ्या जगताला ( अर्थेषु ) सर्व विषयांमध्ये –सर्व आपत्तींमध्ये– ( क्षद्म इव ) उदकाप्रमाणे ( तर्तरीथः ) तारीत आहां. ( ऋभू न ) ऋभूंप्रमाणे ( खरमज्रा ) वेगाने जाणाऱ्या तुम्हां दोघांना ( खरज्रुः ) वेगवान् रथ ( आपत् ) प्राप्त होवो. ( वायुः न पर्फरत् ) वायूप्रमाणे तो चहूकडे जावो व ( रयीणां क्षयत् ) संपत्ति आणून देवो.

या ठिकाणीं ' जार ' शब्द म्हातारें होणें, जीर्ण होणें या अर्थी आहे. येथे **' जारं, मरायु, चर्चरं '** हे तीन शब्द क्रमाने ' क्षीण होणारें, मरणारें जगत् ' या अर्थाचे वाचक आहेत. त्यामुळे ' **जार** ' शब्दाचा अर्थ येथे आपोआपच स्पष्ट होत आहे. ज्याचें आयुष्य क्षीण होत आलें आहे व जें मरणार आहे, तें ' जार ' संज्ञक जगत् होय. येथेसुद्धा जार शब्दाचा व्यभिचारी असा अर्थ नाही. तसेंच–

## जार ( सूर्य ).

( हविर्धान आंगिः । अग्निः । जगती )

**उदीरय पितरा जार आ भगमियक्षति हर्यतो हृत्त इष्यति ।**
**विवक्ति वह्निः स्वपस्यते मखस्तविष्यते असुरो वेपते मती ॥**
(ऋ. १० । ११ । ६; अथर्व. १८ । १ । २३ )

हे अग्ने ! ( पितरौ उदीरय) तूं द्यावापृथिवीमध्ये तसा प्रकाशित हो की, जसा ( जारः भगं आ )सूर्य आपला प्रकाश पाडतो. ( हर्यतः इयक्षति ) यजमान यज्ञ करूं इच्छीत आहे, ( हृत्तः इष्यति ) अन्तःकरणपूर्वक यज्ञ करूं इच्छीत आहे.

( वह्निः स्वपस्यते ) अग्नि आपलें काम करूं इच्छितो व स्तोत्रें ( विवक्ति ) म्हटलीं जात आहेत. ( मखः तविष्यते ) यज्ञ वाढविला जात आहे. ( असुरः मती वेपते ) बुद्धिमान् मनुष्य [ आपल्या कर्मांत प्रमाद होईल कीं काय यासाठीं ] आपल्या बुद्धीमध्यें कापत असतो. [ यासाठीं तूं प्रदीप्त हो. ]

येथें ' जार ' शब्द ' रात्रीचा नाशकर्ता सूर्य ' या अर्थी आहे. सूर्य हा या ग्रहमालिकेमध्यें सर्वांत वृद्ध म्हणजे मोठा असल्यानें त्याला जार म्हणजे ( वृद्ध ) मोठा, अशा अर्थाचा शब्द लावण्यांत आला आहे. सूर्य आल्यानें वार, तिथि, महिने, वर्षे बनतात व तो एक एक दिवसानें सर्वांचें आयुष्य क्षीण करतो, म्हणून सूर्यास ' जार ' शब्द लावलेलाहि असेल. ' **जॄ=स्तुतौ** ' असा एक धातु आहे, त्यावरून स्तुत्य, स्तुतीस योग्य, या अर्थी ' **जार** ' शब्द बनत असतो. तो येथें घेतला, तर सूर्य हा स्तुतीला योग्य असल्यानें सर्वांना ' जार ' ( स्तुत्य ) आहे, असाही अर्थ होऊं शकेल. स्तुत्य या अर्थी जार शब्द पुढील मंत्रांत अधिक स्पष्ट आहे, तो आता पहा–

## जार ( स्तुत्य ) इन्द्र.

( कृष्ण आंगिरसः । इन्द्रः । त्रिष्टुप् )

**दोहेन गामुप शिक्षा सखायं प्र बोधय जरितर्जारमिन्द्रम् ।**
**कोशं न पूर्णं वसुना न्यृष्टमा च्यावय मघदेयाय शूरम् ॥**

( ऋ. १०।४२।२; अथर्व. २०।८९।२ )

हे ( जरितः ) स्तुति करणाऱ्या साधका ! ( दोहेन गां ) दूध काढण्यानें गाईला जवळ करतात, त्याप्रमाणें ( सखायं उप शिक्ष ) आपल्या मित्ररूपी इन्द्राला जवळ कर. ( जारं इन्द्रं प्रबोधय ) स्तुति करण्याला योग्य इन्द्राला जागें कर. ( पूर्णं कोशं न ) पूर्ण भरलेल्या खजिन्याप्रमाणें ( वसुना न्यृष्टं ) धनानें परिपूर्ण असणाऱ्या ( शूरं ) शूर इन्द्राला ( मघदेयाय च्यावय ) धन देण्यासाठीं प्रेरित कर.

या ठिकाणचा ' जार ' हा शब्द स्तुत्य, प्रशंसा करण्यास योग्य, या अर्थी आहे. येथें एकाच मंत्रांत ' **जरितः** ' आणि ' **जारः** ' हे शब्द जवळजवळच

आलेले आहेत व ते परस्परांचा अर्थ व्यक्त करण्यास सहायता करीत आहेत. स्तुत्यर्थक '**जॄ**' धातूवरून हे दोनही शब्द झालेले आहेत. म्हणून '**जरिता**'चा अर्थ 'स्तुति करणारा, उपासक' असा असून, जार शब्दाचा अर्थ 'स्तुतीला योग्य, स्तुत्य, प्रशंस्य' असा आहे. येथील '**जार**' शब्द इन्द्राचें विशेषण आहे. आपल्या अहल्येच्या कथेंतहि इन्द्राला 'जार' म्हटलेलें आहे. जर येथील जार हा शब्द 'स्तुत्य' या अर्थी आहे, असें ठरेल, तर '**अहल्यायै जार**' अहल्येकारणें, अहल्येसाठीं जार म्हणजे प्रशंसा करण्यास योग्य इन्द्र आहे, असा त्याचा अर्थ होऊन, अहल्येच्या कथेंतील गुप्त रहस्य शोधण्याच्या कामीं याची सहाय्यता होऊं शकेल. 'अहल्येकडून प्रशंसा होण्यास योग्य, अहल्येला स्तुति करण्यास योग्य, अहल्या ज्याची स्तुति करते,' असा अर्थ '**अहल्यायै जार**' याचा सरळ होऊं शकेल. तथापि याविषयीं आणखी मन्त्र पहा—

## उषांचा जार.

शत्रूंचे किल्ले फोडून शत्रूंची शक्ति क्षीण करणारा, या अर्थी 'जार' शब्द आपण पूर्वी पाहिला आहेच. आता यापुढील पांच मंत्रांत '**उषांचा जार**' म्हणजे उषांची शक्ति क्षीण करणारा, उषांचा नाश करणारा, या अर्थी जार शब्द आलेला आहे. या ५ मंत्रांत कांही मन्त्र अग्नीचे आहेत, तसेच कांही सूर्याचेहि आहेत. ते आता पहा—

( पराशरः शाक्त्यः । अग्निः । द्विपदा विराट् )

**शुक्रः शुशुक्काँ उषो न जारः पप्रा समीची दिवो न ज्योतिः ।**
**परि प्रजातः क्रत्वा बभूथ भुवो देवानां पिता पुत्रः सन् ॥**

( ऋ. १।६९।१ )

( शुक्रः ) बलवान् ( उषः जारः न ) उषेच्या जाराप्रमाणे म्हणजे सूर्याप्रमाणे ( शुशुक्कान् ) तेजस्वी, ( समीची पप्रा ) एकमेकांशीं जुळून असणाऱ्या द्यावा-पृथिवींना भरून टाकणाऱ्या ( दिवः न ज्योतिः ) दिवसाच्या ज्योतिरूप सूर्या-प्रमाणे अग्नि ( प्रजातः ) उत्पन्न होतांच ( क्रत्वा ) आपल्या सामर्थ्यानें ( परि बभूथ ) सर्वत्र तेजानें व्यापतो. तूं ( देवानां पुत्रः सन् ) देवांचा पुत्र असतांहि

त्यांचा ( पिता भुवः ) पालक पित्यासमान झाला आहेस.

येथें ( उषः जार ) उषेचा जार सूर्य आहे, असें सांगितलें आहे; कारण सूर्य आला, म्हणजे उषा नाहीशी होते. तसेंच-

**उषो न जारो विभावोस्रः संज्ञातरूपश्चिकेतदस्मै ।**
**त्मना वहन्तो दुरो व्यृण्वन्नवन्त विश्वे स्वर्दृशीके ॥**

( ऋ. १।६९।५ )

( उषः जारः न ) उषेचा जार असा जो सूर्य आहे, त्याप्रमाणे ( विभावा ) विशेष तेजस्वी, ( उस्रः ) सर्वांचा निवास करणारा, ( संज्ञातरूपः ) ज्याचें रूप प्रत्यक्ष दिसत आहे, असा हा अग्नि ( अस्मै चिकेतत् ) या उपासकाला ओळखो. ( त्मना वहन्तः ) स्वतः हवि वाहून नेणारे याचे प्रकाशकिरण ( दुरः व्यृण्वन् ) यज्ञसभेचीं दारें उघडतात व नंतर तेच ( विश्वे ) सर्व त्या अग्नीचे किरण ( दृशीके स्वः ) दर्शनीय अशा आकाशामध्ये ( नवन्त ) व्यापतात.

या ठिकाणींहि सूर्य हा उषेचा जार आहे, असें म्हटलें आहे. सूर्याची उपमा येथे दिलेली आहे. सूर्य आला असतां उषा नाहीशी होते, हें सर्वांस माहीत आहे. म्हणूनच सूर्य हा उषेचा जार म्हणजे उषेचा नाश करणारा आहे. '**जॄ=वयोहानौ**' या धातूवरून हा शब्द झालेला आहे. उषेच्या वयाचा नाश करणारा, म्हणजे उषेचा नाश करणारा हा सूर्य आहे. पूर्वीचा अग्नीचा मंत्र आहे व हा सूर्याचा आहे; पण दोनही मंत्रांत उषेचा नाश करणारा हा अर्थ समानच आहे. या ठिकाणींसुद्धा ' स्तुत्य किंवा स्तुति होण्यास योग्य ' हा अर्थ लागू होऊं शकतो व '**उषेचा जार**' चा '**उषःकालीं स्तुति होण्यास योग्य**' असा, अग्नि अथवा सूर्य या देवतांना उद्देशून अर्थ होऊं शकेल. उषःकालापासूनच अग्नीची व सूर्याची स्तुति होण्यास प्रारंभ होत असतो, हें यज्ञामध्ये प्रसिद्ध आहे.

सूर्य व विद्युत् यांच्यापासून पृथ्वीवर अग्नि उत्पन्न होतो, म्हणून अग्नि हा सूर्याचा पुत्र आहे; परंतु अग्नीमध्ये आहुति दिल्या असतां, त्या आहुतींनी सर्व देवतांना पोषण मिळतें, यामुळे हाच अग्नि स्वतः मुलगा असतांहि त्यांचा पालकही आहेच. हा अग्नि उषेचा जारहि आहे. याचें कारण असें की, उषःकालीं अग्नि प्रदीप्त केला जातो व लगेच दिवस सुरू होतो, व दिवस उगवला की उषेचा

नाश होतो. म्हणून अग्नीचें जळणें व उषेचा नाश, हीं एका समयींच होत असल्यानें अग्नि हासुद्धा उषांचा नाशकर्ता आहे, असें म्हटलें आहे.

( वसिष्ठो मैत्रावरुणिः । अग्निः । त्रिष्टुप् )

**अबोधि जार उषसामुपस्थाद्धोता मन्द्रः कवितमः पावकः ।**
**दधाति केतुमुभयस्य जन्तोर्हव्या देवेषु द्रविणं सुकृत्सु ॥**

( ऋ. ७।९।१ )

( होता ) देवांना बोलावणारा, ( मन्द्रः ) प्रिय, ( कवितमः ) अत्यंत कवि, ज्ञानी, ( पावकः ) शुद्धता करणारा, ( उषसां जारः उपस्थात् ) उषःकालाचा जार अर्थात् विनाशक समीपस्थानापासून हा अग्नि ( अबोधि ) जागा झाला आहे. हा ( उभयस्य जन्तोः ) दोनही प्रकारच्या म्हणजे द्विपाद व चतुष्पाद प्राण्यांना ( केतुं दधाति ) ज्ञान देतो, ( देवेषु हव्या ) देवांना हविर्भाग देतो व ( सुकृत्सु द्रविणं ) सत्कर्म करणाऱ्यांना द्रव्य देतो.

या ठिकाणीं ' जार ' शब्दाचा अर्थ ' जृ– स्तुतौ ' या धातूवरून बनवला असतां ' सर्वांस स्तुति करावयास लावणारा ' किंवा स्तुतीला योग्य, असा दोनही प्रकारांनी होऊं शकेल. सर्व लोक अग्नीची प्रशंसा करतात. अग्नि प्रदीप्त झाला असतां ज्ञानी लोक त्याची स्तुति करतात. हा सकाळीं पेटविला जात असल्याकारणानें याला येथे ' उषांचा जार ' म्हणले उषःकालीं स्तुति करण्यास योग्य असेंहि म्हणतां येईल किंवा पूर्वीच्या अर्थाप्रमाणे ' उषेचा नाशकर्ता ' असा अर्थ केला असतां, अग्नि पेटला असतां उषा संपते व दिवस सुरू होतो, अर्थात् हा उषेचा नाशक आहे, असाहि याचा अर्थ होईल. तसेंच–

**उषो न जारः पृथु पाजो अश्रेद्दविद्युतद्दीद्यच्छोशुचानः ।**
**वृषा हरिः शुचिरा भाति भासा धियो हिन्वान उशतीरजीगः ॥**

( ऋ. ७।१०।१ )

( उषः जारः न ) उषांच्या जाराप्रमाणे म्हणजे सूर्याप्रमाणे ( पृथु पाजः अश्रेत् ) पुष्कळच प्रकाश हा अग्नि धारण करतो; हा ( दविद्युतत् ) चमकणारा, ( दीद्यत् ) तेजस्वी व ( शोशुचानः ) प्रकाशमान आहे. हा ( वृषा ) कामनांची

पूर्ति करणारा, ( हरिः ) दुःखांचें हरण करणारा, ( शुचिः ) पवित्र, ( धियः हिन्वानः ) आमच्या बुद्धींना प्रेरणा देणारा अग्नि ( भासा आभाति ) आपल्या तेजानें प्रकाशतो व ( उशतीः अजीगः ) उन्नतीची इच्छा करणाऱ्या प्रजांना जागें करतो.

येथील ' उषेचा जार ' सूर्य आहे. याविषयींचें स्पष्टीकरण पूर्वी आलें आहेच. उषेचा जार अग्नि असो अथवा सूर्य असो, दोघांहीपासून उषेच्या नाशास प्रारंभ होतो, हें सर्वांना समजण्यासारखें आहे.

हे चारही मंत्र ' उषेच्या जारा ' चें वर्णन करीत आहेत. मंत्रांतील वर्णन वाचलें, म्हणजे हें स्पष्ट दिसेल की, येथे व्यभिचाराची कल्पना करणेंहि अशक्य आहे. उषःकालीं अग्नि पेटवितात, सूर्य–उदय होण्यास प्रारंभ होतो व हळूहळू उषःकाल संपून सूर्य प्रकाशूं लागतो. इतकाच भावार्थ येथे आहे.

' **जार** ' शब्दाचा अर्थ ' स्तुत्य ' असा घेतला, तर ' उषेचा जार ' शब्दाचा अर्थ ' उषःकालीं स्तुति करण्यास योग्य ' असा होईल; पण कसाही अर्थ केला, तरी येथे व्यभिचार अर्थास थारा मिळणें शक्य नाही, हें उघड आहे.

पुढील मंत्रांत हेंच रूपक आहे; पण व्यभिचाराची, पति परस्त्रीगामी असल्याची थोडीशी कल्पना त्यांत आहे. तो मन्त्र आता पहा–

## जार पतीची परिचर्या करणारी सती स्त्री.

( वसिष्ठो मैत्रावरुणिः । उषसः । त्रिष्टुप् )

**तानीदहानि बहुलान्यासन्या प्राचीनमुदिता सूर्यस्य ।**
**यतः परि जार इवाचरन्त्युषो ददृक्षे न पुनर्यतीव ॥**

( ऋ. ७।७६।३ )

" ( या सूर्यस्य प्राचीनं उदिता ) जे सूर्योदयाच्या पूर्वी प्रकाशणारे असतात, (तानि अहानि इत् ) ते दिवस खरोखर ( बहुलानि आसन् ) पुष्कळच असतात. (यतः) कारण की ( उषः ) हे उषे ! तू (जारः इव परि आचरन्ती ददृशे) जार पति असताहि त्याची सेवा करणाऱ्या साध्वी स्त्रीप्रमाणे दिसत आहेस; ( पुनः

सती इव न ) पण पतीला सोडून देणाऱ्या स्त्रीप्रमाणे दिसत नाहीस.

या ठिकाणीं सूर्योदयापूर्वी (**बहुलानि अहानि**) पुष्कळ दिवस उषःकालाचे असतात, ही अपूर्व गोष्ट सांगितली आहे. या दृश्यावर कवीनें रूपक रचलें आहे, तेंहि फार मनोरम आहे. उषा ही सूर्याची पत्नी; उषेचा सूर्य हा पति आहे; पण तो अनेक दिवस उषेच्या घरीं येत नाही, दुसरीकडेच रमतो; पण उषा मात्र एकनिष्ठ साध्वीप्रमाणे त्या जार म्हणजे आपल्याकडे ढुंकूनहि न पाहणाऱ्या व अनेक दिवस दुसरीकडे दुसरीच्या घरीं रमत राहणाऱ्या, जार बनलेल्या पतीच्या दर्शनाच्या आशेने त्याच्या मार्गाभोवतीच वारंवार घिरट्या घालीत राहते, त्याप्रमाणे उषा ही सूर्य येईपर्यंत सूर्याचीच अनेक रात्रीं मनोभावाने सेवा करते; पण नवऱ्याला सोडून ( यती ) यतीण बनत नाही अथवा नवऱ्याला सोडून व्यभिचारिणी बनणाऱ्या स्त्रीप्रमाणे जारिणीहि बनत नाही.

या ठिकाणीं '**जार**' शब्द व्यभिचारी या अर्थीच आहे; पण हा सूर्य व उषा यांचाच वाचक असल्यामुळे त्यांत कांहीं दोष नाही. पति जार झाला, तरी त्याचीच एकनिष्ठेने सेवा करावी, हा सतीधर्मच या उपमालंकारामध्ये सांगितला आहे.

या मंत्रांतील '**यति**' हा शब्द मात्र पतीला सोडून ( **या** = जाणें ) जाणाऱ्या स्त्रीचा वाचक आहे.

या मंत्रांत जरी उषा व सूर्य यांचेंच रूपक असलें, तरी सती साध्वी स्त्रीने कसें आचरण करावें, तें सांगितलें आहे. येथे उषा ही साध्वी सती कल्पिली आहे. तिचा पति सूर्य, हा आपल्या धर्मपत्नीच्या घरीं महिनाभर येत नाही व दुसरीच्या घरींच राहतो व तेथेच रमतो, असें रूपक सूर्यावर रचलें आहे. पति असा वागत असला, तरी सती साध्वी धर्मपत्नीने कसें वागावें, या प्रश्नाचें उत्तर सतीनें उषेप्रमाणे वागावें, असें येथे दिलेलें आहे. उषा ही सतीधर्माप्रमाणे प्रत्यहीं आपल्या पतीची मार्गप्रतीक्षा करीत राहते व शेवटीं आपल्या पतीस वश करून आपल्या घरीं आणते.

आपल्या पतीवर रागावून घर सोडून दूर ( यति ) जाणाऱ्या स्त्रीप्रमाणे उषा वागत नाही. पतीवर रागावून घर सोडून जी स्त्री घराबाहेर जाते, ती स्वतःचा

नाश करतेच; पण त्याबरोबर आपल्या घरासंसाराचाही नाश करते व दुसऱ्यांस वाईट उदाहरणही घालून देते.

पतीकडून अपमान झाला, पतीने आपला छळ केला, पति अनीतीने वागला, तरी पतिव्रता स्त्रीने आपला धर्म सोडूं नये व आपल्या नमुनेदार आचरणाने पतीसहि पवित्र मार्गावर व स्वधर्मावर आणावें, हा बोध येथे घेण्यासारखा आहे.

या मंत्रांतील **'जार'** शब्द व्यभिचारी या अर्थी आहे, यांत शंका नाही; पण हें रूपक सूर्यावर केलेलें आहे. अनेक दिवस उषःकाल जेथे असतो, त्या देशांतील उषेवर ही काव्यमयी कल्पना कवीने केलेली आहे. यासाठी व्यभिचारी सूर्य आहे, असें जरी येथे म्हटलेलें असलें, तरी ती कल्पना कवीची आहे; निसर्गावरील तें एक रूपक आहे, इतकेंच येथील वर्णनाचें तात्पर्य आहे. आता पुढील मंत्र पहा-

## बहिणीचा जार.

( भरद्वाजो बार्हस्पत्यः । पूषा । गायत्री )

**पूषणं न्वजाश्वमुप स्तोषाम वाजिनम्**
**स्वसुर्यो जार उच्यते ॥**
**मातुर्दिधिषुमब्रवं स्वसुर्जारः शृणोतु नः ।**
**भ्रातेन्द्रस्य सखा मम ॥** (ऋ. ६।५५।४-५)

"(अजाऽश्वं) ज्याच्या जवळ पुष्कळ बकरे व पुष्कळ घोडे आहेत, (वाजिनं) जो बलवान् आहे, त्या (पूषणं उप स्तोषाम) पूषा देवाची आम्ही प्रशंसा करतों. (यः स्वसुः जारः उच्यते ) हा आपल्या बहिणीचा-उषेचा-जार आहे, असें म्हणतात."

"(मातुः) याची आई- जी रात्री आहे- तिचा हा (दिधिषुं) पति आहे, याची ( अब्रवं ) मी स्तुति करतों. तो ( नः ) आमची स्तुति ( स्वसुः जारः शृणोतु ) आपल्या बहिणीचा-उषेचा-जार हा पूषा ऐको. ( इन्द्रस्य भ्राता ) हा इन्द्राचा भाऊ व ( मम सखा ) माझा मित्र आहे."

ही पूषा देवाची स्तुति आहे. या मंत्रांत याला 'बहिणीचा जार' (**स्वसुः जारः**)

व ( **मातुः दिधिषुः** ) 'आईचा' जार म्हटलेलें आहे. याचा बाहेर दिसतांना असा अर्थ दिसतो की, या पूषादेवाने आपल्या आईशीं व बहिणीशीं जारकर्म केलें; पण पूषा हा आदित्यच आहे. सूर्य हाच पूषा होय. रात्री ही त्याची जननी-आई व उषा ही त्याची बहिण होय. 'जार' शब्दाचा अर्थ 'नाशकर्ता' असा आहे. आई व बहिण यांचा नाश हा उगवतांच होतो, हा आशय येथे आहे. उषा व सूर्य यांचें हें वर्णन असल्यामुळे यांत व्यभिचाराचा कांही संबंधच नाही.

पूषा हा सूर्य आहे. सूर्य हा रात्रीचा मुलगा असल्याने तो उषेचा भाऊ झाला. रात्रीचीं दोन अपत्यें, एक उषा व दुसरा सूर्य. म्हणून उषा व सूर्य हीं बहिणभावंडें आहेत. जेव्हा सूर्याचा जन्म होतो, तेव्हा उषेचा नाश होतो; म्हणून सूर्याला 'बहिणीचा जार' असें म्हटलें आहे. जार शब्दाचे 'नाश करणारा,' 'क्षीण करणारा,' असे अर्थ असल्याचें पूर्वी दाखवलें आहेच.

दुसऱ्या वर दिलेल्या मंत्रांत पूषा-सूर्य- हा (**मातुः दिधिषुः**) आईचा पति किंवा द्वितीय पति-जार- किंवा पुनर्विवाहिक पति आहे, असें वर्णिलें आहे. रात्रीचा विवाहित पति चन्द्रमा आहे; पण तिचा जार सूर्य आहे. उषेचाही जार सूर्यच आहे. सूर्य आल्याने रात्रीचा व उषेचा असा दोघींचाही नाश होतो, यावर ही काव्यमयी कल्पना रचलेली आहे. सूर्य हा इन्द्राचा-विद्युद्देवाचा-मित्र आहे. अशा मंत्रांत 'जार' शब्दाचा अर्थ 'प्रिय किंवा प्रिय पति' असाही करतात.

स्तुत्यर्थक 'जॄ' धातूवरून बनणारा 'जार' शब्द आहे. तोहि येथे आहे, असें म्हणतां येईल. ( **स्वसुः जारः** ) बहिण ज्याची प्रशंसा करते, किंवा बहिणीचा स्तुत्य, प्रिय पति, उषःकालीं ज्याची स्तुति केली जाते, असाही अर्थ येथे होणें शक्य आहे. उषेचा पति सूर्य आहे, अशींही वर्णनें मंत्रांत आहेत. कसाही अर्थ केला, तरी येथे जी व्यभिचाराची कल्पना '**स्वसुः जारः**' बहिणीचा जार शब्द उच्चारल्याबरोबर मनांत उत्पन्न होते, ती कल्पना मंत्रांतील एकंदर रूपक ध्यानीं आणलें असतां टिकत नाही, हें निर्विवाद आहे.

'बहिणीचा जार' असें म्हणून वाचकांच्या मनाला धक्का द्यावा, असें कवींचें हृद्गत येथे स्पष्ट दिसतें. हा एक प्रकारचा अलंकारच आहे. असेच आणखी दोन-तीन मंत्र आहेत, ते पहा-

( त्रित आप्त्यः । अग्निः । त्रिष्टुप् )

**भद्रो भद्रया सचमान आगात्स्वसारं जारो अभ्येति पश्चात् ।**
**सुप्रकेतैर्द्युभिरग्निर्वितिष्ठन्रुशद्भिर्वर्णैरभि राममस्थात् ॥**

( ऋ. १०।३।३; साम. १५४८ )

" ( भद्रः ) कल्याण करणारा अग्नि ( भद्रया सचमानः ) कल्याण करणाऱ्या उषेसह येथे ( आगात् ) आला आहे; हा ( जारः ) जार आपल्या **( स्वसारं )** बहिणीच्या **(** पश्चात् अभ्येति **)** मागून जणू जात आहे. ( सुप्रतीकैः द्युभिः ) उत्तम तेजस्वी प्रकाशाने युक्त ( वितिष्ठन् ) असलेला हा ( अग्निः ) अग्नि आपल्या ( रुशद्भिः वर्णैः ) तेजस्वी किरणांनी ( रामं अभि अस्थात् ) रमविणाऱ्या रात्रीच्या अंधकाराला दूर घालवितो. "

येथे ' **स्वसारं जारः पश्चात् अभ्येति** ' आपल्या बहिणीमागून तिचा जार जात आहे, असें म्हटलें आहे. येथे उषा ही बहीण असून, तिचा भाऊ अग्नि आहे. येथे अग्नीचेंच वर्णन आहे व त्याचा वाचक अग्नि शब्द येथे मंत्रांतील दुसऱ्या चरणांत आहे. सकाळीं उषःकालीं यज्ञासाठीं अग्नि प्रदीप्त केला जातो, म्हणून उषा व अग्नि यांची एका वेळींच उत्पत्ति होत असते. उषा प्रथम येते म्हणून ती वडील बहिण व अग्नि मागून पेटवतात, म्हणून तो तिचा लहान भाऊ होय. बहिणीच्या मागून तिचा भाऊ जातो, हें वर्णन या रीतीनें सार्थ होतें.

येथे उषा व अग्नि यांचा संबंध असल्याने त्यांत व्यभिचाराचा संबंध असणें शक्य नाही. उषेची वयोहानि करणारा इतकाच येथे जार शब्दाचा अर्थ आहे.

'बहिणीचा जार' असे शब्द असलेले हे तीन मंत्र आहेत. **( स्वसुः जारः )** बहिणीचा जार हे शब्द कानी पडतांच जी भयंकर व्यभिचाराची कल्पना मनांत उठते व जो मनाला धक्का बसतो, तें सर्व मंत्रांचे अर्थ पाहिले असतां दूर होऊन, हें एक रूपक आहे अशी खात्री झाली, म्हणजे मन शांत होतें. येथील जार शब्दाचा अर्थ ' **वयोहानि करणारा** ' असा आहे. रात्रीचे दोन पुत्र एक अग्नि व दुसरा सूर्य. या दोघांची बहिण उषा आहे. या दोनही भावांची उत्पत्ति उषेनंतर होत असल्याने ते उत्पन्न होतांच ते बहिणीच्या नाशास कारणीभूत होत असतात.

कोणी येथे अशी शंका काढतील की, एकदा सूर्य हा पति म्हटला आहे, दुसऱ्या वेळीं भाऊ व तिसऱ्या वेळीं जार म्हटला आहे, हें काय आहे ? एक तर हे मंत्र निरनिराळ्या ऋषींचे आहेत व दुसरें असें की, जेथे रूपकालंकारच करावयाचा आहे, तेथे तो कवीच्या इच्छेप्रमाणेंच केला जाणार, हें उघड आहे. अमूक वस्तूवर अमूकच अलंकार रचावा, असें बंधन कवीवर कोण कसें घालणार ? तेव्हा अमूक अलंकार हा सदोष आहे व अमूक निर्दोष आहे, असें म्हणणें शक्य नाही. फक्त ज्या रीतीचें वर्णन आलें आहे, तें नीट उपमा व उपमेयांतील कल्पनेला जुळत आहे कीं नाहीं, एवढेंच पहावयाचें असतें. त्या दृष्टीने रूपकालंकार बरोबर आहे, असेंच म्हणावें लागतें. असो. आता या बहिणीच्या जाराचा आणखी एक मंत्र आहे, तो पहा–

( गोतमो राहूगणः । उषाः । त्रिष्टुप् )

**व्यूर्ण्वती दिवो अन्ताँ अबोध्यप स्वसारं सनुतर्युयोति ।**
**प्रमिनती मनुष्या युगानि योषा जारस्य चक्षसा वि भाति ॥**

( ऋ. १।९२।११ )

"( दिवः अन्तान् व्यूर्ण्वती ) द्युलोकाच्या अन्तभागांना आच्छादित करणारी उषा ( अबोधि ) जागी झाली आहे. ती उषा आपल्या ( स्वसारं ) बहिणीला–रात्रीला– ( सनुतः युयोति ) एका बाजूस करते. ( मानुष्या युगा प्रमिनती ) मानवांच्या युगांची गणना करणारी ही ( योषा ) स्त्रीरूपी उषा ( जारस्य चक्षसा विभाति ) आपल्या जाराच्या–( वयोहानि करणाऱ्या सूर्याच्या )–प्रकाशानेच प्रकाशते."

या ठिकाणचा 'जार' शब्द सूर्याचा वाचक आहे; कारण तो उषा व रात्री यांना जीर्ण करणारा, यांचा नाश करणारा आहे.

जेव्हा उषा येते, तेव्हा त्या बाजूचा आकाशाचा भाग लाल होतो. उषा आकाशाच्या अन्तभागाला आच्छादित करते, याचा हा अर्थ आहे. जेव्हा उषा येते, तेव्हा ती रात्रीला दूर सारते, हें तर उघडच आहे. येथे रात्रीची बहिण उषा आहे, अशा प्रकारचें वर्णन आहे. रात्री ही मोठी बहिण असून, उषा ही तिची धाकटी बहिण आहे. '**काल**' नामक पित्याच्या या दोन मुली आपसांत बहिणी आहेत. या ( **मानुष्या युगा प्रमिनती** ) मानवी आयुष्यांची मोजणी करीत

असतात. उषा आल्याने नवा दिवस येतो व पूर्वीचा निघून जातो. अशा प्रकारें ही कालगणना होत आहे.

'**उदयादुदयं वारः**' हें म्हणणें या मंत्रावरून वैदिक आहे, असें दिसतें. मध्यरात्री उलटतांच दुसरा दिवस लागतो, असें जें युरोपियन म्हणतात, त्यास वेदांत कांही आधार आहे कीं काय समजत नाही; पण उदयाने दुसरा दिवस होतो, यास आधार या मंत्राचा देतां येणें शक्य आहे.

'**उषेचा जार**' सूर्य आहे; कारण सूर्य–उदय होतांच उषा नाहीशीच होते. येथील ' जार ' शब्द नाशक या अर्थाचा आहे. हा मंत्र उषा व सूर्य यांच्या वर्णनाचा असल्याने येथे कल्पना जरी व्यभिचाराची असली, तरी उषा व सूर्य यांची कधी गाठच पडत नसल्याने व्यभिचाराच्या कल्पनेशिवाय येथे प्रत्यक्ष व्यभिचारास स्थान आहे, असें म्हणतां येणें शक्य नाही.

येथे ' उषा व अग्नि, ' तसेंच ' **उषा व सूर्य** ' यांचेंच वर्णन आहे. कवि आपला विषय उत्तम प्रकारें जाणत आहे, यामुळे, ' बहिणीचा जार, ' ' आईचा जार ' किंवा ' मुलीचा जार ' असें कांही जरी म्हटलें, तरी तो एक अलंकार आहे, इतकें ठरतांच त्यांतील व्यभिचाराचा दोष मुळीच उरत नाही. काव्यामध्ये द्व्यर्थी शब्दयोजना करून, विविध अलंकारांच्या सहाय्याने निरनिराळे रस उत्पन्न करून, विवक्षित भाव दाखवणें, हें उत्तमच गणलें जात असतें. ' बहिणीचा जार ' म्हणतांच वाईट कल्पना मनांत येते, हें खरें आहे; पण येथील ' उषेचें आयुष्य क्षीण करणारा, उषेचा नाश करणारा, ' हे अर्थ लक्ष्यांत आले, म्हणजे तो दिसणारा अर्थ शिल्लक रहात नाही. ' **स्वसुः जारः** ' बहिणीच्या स्तुतीस पात्र असाही या पदांचा अर्थ होणें शक्य आहे, हें पूर्वी दाखवलें आहेच.

सूर्य व अग्नि हे रात्रीचा नाश करतात, हें उघड आहे. मग यावर विशेष रसनिष्पत्ति करण्यासाठी कवीने द्व्यर्थी शब्दप्रयोग करून कांही वर्णन केलें, तर तें सदोष आहे, असें म्हणतां येणार नाही व तसें तें वर्णन करण्यांत कोणत्याही प्रकारची हानीही नाही.

आता अशीच एक नवीन कल्पना वेदांत आहे, ती पहा—

# कन्यांचा जार.

( पराशरः शाक्त्यः । अग्निः । द्विपदा विराट् )

**सेनेव सृष्टामं दधात्यस्तुर्न दिद्युत्त्वेषप्रतीका ।**
**यमो ह जातो यमो जनित्वं जारः कनीनां पतिर्जनीनाम् ॥**

( ऋ. १।६६।४ )

" ( सृष्टा सेना इव ) शत्रूवर पाठवलेल्या सैन्याप्रमाणे ( अमं दधाति ) हा अग्नि भय दाखवतो, ( अस्तुः ) फेकणाऱ्या धनुर्धाऱ्याच्या ( दिद्युत् ) तेजस्वी व प्रदीप्त जळजळणाऱ्या बाणाप्रमाणेहि अग्नि भय उत्पन्न करतो. ( यमः ह जातः ) हाच अग्नि यम असून, तो झालेले सर्व पदार्थ आहे व ( यमः जनित्वं ) होणारे सर्व पदार्थहि तोच आहे. हा अग्नि ( कनीनां जारः ) कन्यांचा जार आहे व ( जनीनां पतिः ) स्त्रियांचा पतीहि आहे. "

येथे अग्नि हा यम व ' कन्यांचा जार ' आहे, असें म्हटलें आहे. या ठिकाणीं ' जार ' शब्द ' व्यभिचारी ' या अर्थीं नसून, कन्यांचें कन्यात्व नष्ट करणारा अशा अर्थीं आहे. अग्नीमध्ये हवन केल्यानंतर कन्या विवाहित होते व तिचें कन्यात्व नष्ट होतें व ती विवाहित स्त्री बनते. तसेंच——

कन्यांचा विवाह करावयाचा असतां, तेथे अग्नि प्रदीप्त करून हवन करतात व त्या अग्नीसमोर पतिपत्नींचा करार होत असतो. यामुळे अग्नि हा कन्यांचें कन्यात्व नष्ट करणारा ( जार ) आहे. रजिस्टर विवाह करावयाच्या वेळीं मॅजिस्ट्रेट असतो, तसा वैदिक विवाहपद्धतीमध्ये अग्नि असतो. हा अग्नि कन्याचें कन्यात्व हरण करून, त्यांना पत्नीत्व देत असतो. म्हणून हा ( कनीनां जारः ) ' कन्यांचा जार ' व ( जनीनां पतिः ) स्त्रियांना स्त्रीत्व देणारा आहे. येथलि ' जार ' शब्द खात्रीनें व्यभिचारी या अर्थाचा नाही. वैदिक संस्कार हे अग्नीद्वाराच होत असतात; म्हणून अग्नीच ते करतो, असें म्हटलें तर तें अन्वर्थकच आहे. याविषयी आणखी एक मंत्र पहा——

( दीर्घतमा औचथ्यः । मित्रावरुणौ । त्रिष्टुप् )

**प्रयन्तमित्परि जारं कनीनां पश्यामसि नोपनिपद्यमानम् ।**
**अनवपृग्णा वितता वसानं प्रियं मित्रस्य वरुणस्य धाम ।**

( ऋ. १।१५२।४ )

( कनीनां जारं ) त्या कन्यांसमान असणाऱ्या उषांचा जो जार म्हणजे सूर्य आहे, त्याला आम्ही ( प्रयन्तं इत् परिपश्यामसि ) चालत असतांनाच पाहतों पण ( न उपनिषद्यमानं ) बसलेला असा कधीहि पहात नाही. हें त्या सूर्याचेंच मोठें सामर्थ्य आहे. ( अनवपृग्णा वितता वसानं ) अखंड आणि विस्तीर्ण अशा प्रकाशरूपी वस्त्रांना पांघरणारा व ( मित्रस्य वरुणस्य प्रियं धाम ) मित्र व वरुण या दोघांचें प्रिय स्थानच असा हा सूर्य आहे.

या ठिकाणीं सूर्याला ' कन्यांचा जार ' म्हटलें आहे. येथे ' कन्या ' या उषा आहेत. सूर्य आल्याने कन्यारूपी उषा नाश पावतात, एवढेंच येथे जारत्व आहे.

सूर्याला एका ठिकाणीं बसून राहिलेला कोणीहि पहात नाही, ती त्याची उद्योगी वृत्ति प्रशंसनीय आहे. हा सतत संचार करतो व सतत प्रकाशत असतो. प्रकाशाचें वस्त्र हा पांघरत असतो. उषा ही याची कन्या आहे; कारण सूर्यप्रकाशाने तिचा जन्म होत असतो. आपल्या कन्यांच्याच आयुष्याचा हा नाश करीत असतो; कारण हा उगवला म्हणजे उषा राहूंच शकत नाही. शिवाय सूर्य हा दररोज कन्यांचें कन्यात्व हरण करीत असतो, हा एक प्रकारें कन्येच्या कौमार्यावर घालाच घालीत असतो; पण हा जरी कवीने घाला म्हणून वर्णिला असला, तरी वास्तविक स्थितीमध्ये तो कन्यांवर हल्ला असूनहि नसल्यासारखा आहे.

या कन्या सूर्याच्याही म्हणतां येतील; कारण एक उषा ही जशी सूर्याची कन्या आहे, तशीच त्या ( ऋ० ७।७६।३ मध्ये ) वर्णिलेल्या अनेक उषा यासुद्धा सूर्याच्याच कन्या होत; पण येथील कन्या या सर्वसाधारण माणसांच्या मुली मानल्या, तरी चालतील. त्या सर्व कन्यांचें कन्यापण कोण बरें नेतो, कोण बरें या सर्व मुलींच्या कन्यात्वावर घाला घालतो ? सूर्यच कन्यांच्या पाठीशीं लागलेला आहे; पण हा करतो काय ? तर या कन्यांना वाढवतो व त्यांस पत्नी होण्यास योग्य करतो. तेव्हा अशा अर्थाने योजलेला हा **' कनीनां जारः '** शब्दप्रयोग नुसता वस्तुस्थितीचा दर्शक आहे. यांत व्यभिचाराला स्थान नाही.

येथपर्यंत १७ मन्त्र दिले आहेत. त्यांत व्यभिचारी या अर्थाचा जार शब्द नाही, येथे जे जार शब्द आहेत, ते खाली दिलेले अर्थ दाखवणारे जार शब्द आहेत—

१. **संधि ( तह ) करणारा ( जार ) वृद्ध मनुष्य.**
( वा० य० ३०।९; काण्व य० ३४।९ )

२. **जलांचा जार** ( पाण्याला अथवा मेघांला क्षीण करणारा ).
( ऋ० १।४६।४ )

३. **यज्ञाचा जार** ( यज्ञ सिद्ध करणारा ) ( ऋ० १०।७।५ ).

४. **शत्रूचे किल्ले फोडून शत्रूची शक्ति क्षीण करणारा जार.**
( ऋ० १०।१११।१० )

५. **वृद्ध मनुष्य** ( जो थोड्याच वेळाने मरणार ). ( ऋ० १०।१०६।७)

६. **आयुष्याची क्षीणता करणारा** ( जॄ= वयोहानौ ).
( ऋ० १०।११।६; अथर्व० १८।१।२३ )

७. **स्तुत्य,** प्रशंसनीय ( जॄ= स्तुतौ ) ( ऋ० १०।४२।२; अ० २०।८९।२)

८. **उषेचा नाश करणारा** ( ऋ० १।६९।१-२;७।९।१; ७।१०।१ ).

९. **बहिणीचा जार** ( उषेचा नाशकर्ता ). ( ऋ० ६।५५।४-५;
१०।३।३; साम. १५४८ )

१० **कन्यांचा जार** ( कन्यांना तारुण्य देऊन त्यांना पत्नीत्व देणारा )
( ऋ० १।६६।४ )

हे अर्थ दाखवणारा ' जार ' शब्द वरील शब्दांमध्ये आलेला आहे. **'जॄ-स्तुतौ'** स्तुति करणें या अर्थी जॄ धातु आहे. या धातूवरून **'स्तुतीला योग्य, स्तुत्य'** या अर्थी 'जार' शब्द बनत असतो. दुसरा **'जॄ-वयोहानौ'** आयुष्याची हानि होणें किंवा करणें या अर्थाचा धातु आहे, त्या धातूवरूनहि 'जार' शब्द बनत असतो. याचा अर्थ- ( १ ) **वृद्ध**, ज्याचें आयु क्षीण झालें आहे, ( २ ) **जीर्ण**, जो क्षीण निर्बल झाला आहे व ( ३ ) क्षीणत्व उत्पन्न करणारा आहे. प्रायः हे अर्थ वरील मंत्रांत दिसत आहेत.

'स्तुत्य, स्तुतीला योग्य' हे अर्थही वरील मंत्रांत उपयोगी पडूं शकतील, असें वाटतें; पण वरील मंत्रांत व्यभिचारी या अर्थाचा ' जार ' शब्द नाही, हें मात्र स्पष्ट आहे.

' **जार** ' शब्दामध्ये मूळचा अर्थ ' व्यभिचारी ' असा नसावा. ' आयुष्याचा

नाश' करणें, एवढाच मूळचा अर्थ असावा, असें वाटतें. व्यभिचार हा लाक्षणिक अर्थ 'जार' शब्दामध्ये आलेला असावा. कोणत्या एखाद्या कन्येशीं किंवा स्त्रीशीं व्यभिचार करणें, याचा अर्थ तिच्या जीविताचा नाश करणें असाच आहे. सध्या मराठीमध्ये व्यभिचार हाच एक अर्थ जार शब्दांत भरलेला दिसतो; पण वरील वेदमंत्रांत त्याचे कितीतरी निरनिराळे अर्थ असलेले आपणांस दिसून येत आहेत. जार शब्दाचे व्यभिचार या अर्थाहून भिन्न असलेले हे अर्थ या शब्दाचे मूळचे अर्थ असावे, असें दिसतें व नंतर लक्षणेने या शब्दाचा व्यभिचारी असा अर्थ झाला व तोच पुढे रूढ होऊन बसला. यामुळे हा शब्द ऐकतांच भय वाटूं लागतें; पण वेदकालीं याचे मूळचे अर्थच रूढ होते, यामुळे या शब्दाबद्दल कोणास कांही वाटत नव्हतें.

वेदामध्ये व्यभिचारी या अर्थाचा जार शब्द ११ मन्त्रांत आलेला आहे. ते मंत्र आता पहा—

## व्यभिचारी अर्थाचा जार शब्द.

वेदामध्ये व्यभिचारी या अर्थाचाही जार शब्द आहे, त्याचे मंत्र आता पहा—

**यद्धरिणो यवमत्ति न पुष्टं पशु मन्यते ।**
**शूद्रा यदर्यजारा न पोषाय धनायति ॥**
**यद्धरिणो यवमत्ति न पुष्टं बहु मन्यते ।**
**शूद्रो यदर्यायै जारो न पोषमनु मन्यते ॥**

(वा० य० २३ । ३०-३१)

(यत्) जेव्हा (हरिणः यवं आत्ति) हरिण शेतांतील जव खातो, तेव्हा शेताचा मालक [ आपलें शेत खाऊन ] हा पशु पुष्ट होत आहे असें समजत नाही, [ तर त्यानें शेताची नासाडी केली असें मानतो, त्याप्रमाणेच ] (शूद्रा) शूद्राची स्त्री (यत्) जेव्हा (अर्यजारा) वैश्याशीं जार-कर्म करते, तेव्हा तो शूद्र (पोषाय न धनायति) आपण पोसले जाऊं किंवा आपणास धन मिळेल, म्हणून आनंदित होत नाही, [ तर आपल्या स्त्रीने फार वाईट काम केलें, असें मानून दुःखीच होतो. ]

*

( यत् ) तसेंच जेव्हा एखादा हरिण जवाच्या शेतांत जाऊन तें खाऊं लागतो, तेव्हा शेताचा स्वामी पशु पुष्ट झाला, हें बरें झालें, असें ( न मन्यते ) मानीत नाहीं; त्याचप्रमाणे शूद्र ( यत् अर्यायै जारः ) जेव्हा वैश्यस्त्रीशीं जार कर्म करतो, तेव्हा तो वैश्यहि ( न पोषं अनुमन्यते ) त्याला बरें म्हणत नाहीं तर हें वाईट झालें, असेंच मानतो.

तात्पर्य, अनुलोम अथवा प्रतिलोम दोनही प्रकारचें जारकर्म अत्यंत वाईट होय. शूद्र व आर्य, अथवा आर्य व शूद्र यांचें सर्व प्रकारचें जार-कर्म सर्वथा त्याज्यच होय, हा या मंत्रांचा आशय आहे. आणखी पहा—

## स्त्रीशीं जार कर्म करणारा तरुण.

( कक्षीवान् दैर्घतमस औशिजः । अश्विनौ । त्रिष्टुप् )

**शुनमन्धाय भरमह्वयत्सा वृकीरश्विना वृषणा नरेति ।**
**जारः कनीन इव चक्षदान ऋज्राश्वः शतमेकं च मेषान् ॥**

( ऋ० १।११७।१८ )

( अन्धाय ) आंधळा झालेल्या ऋज्राश्वाला ( शुनं भरं ) सुखकारक पोषण मिळावें, यासाठी ( सा वृकीः ) त्या लांडगीने ( अह्वयत् ) तुमची अशी प्रार्थना केली की, हे ( अश्विना वृष्णा नरा इति ) अश्विदेव हो ! हे सामर्थ्यवान् हो ! हे पुरुषार्थी वीर हो ! ज्याप्रमाणे ( कनीनः जारः इव ) तरुण जार ( आपल्या इष्ट स्त्रीला सर्वस्व देतो, त्याप्रमाणे ) ऋज्राश्वाने मला ( शतं एकं च मेषान् ) एकशे-एक मेंढे ( चक्षदानः ) कापून खाऊं घातले आहेत. ( यासाठी तुम्ही यास दृष्टि द्यावी. )

या ठिकाणीं जार कर्म करणाऱ्याचा उल्लेख उपमेमध्ये केलेला आहे. तसेंच-

( परुच्छेपो दैवोदासिः । वायुः । अत्यष्टिः )

**वायुर्युङ्क्ते रोहिता वायुररुणा वायू रथे अजिरा धुरि वोळ्हवे वहिष्ठा धुरि वोळ्हवे। प्र बोधया पुरंधिं जार आ ससतीमिव प्र चक्षय रोदसी वासयोषसः श्रवसे वासयोषसः ॥**

( ऋ० १।१३४।३ )

( वायुः रोहिता युङ्क्ते ) वायु आपल्या रथाला लाल घोडे जोडतो, ( वायुः अरुणा ) वायु लालसर वर्णाचे घोडे जोडतो, ( वायुः रथे अजिरा) वायु रथाला चपल घोडे ( धुरि वोळ्हवे ) धुरेला ओढण्यासाठी जोडतो, ( वहिष्ठा धुरि वोळ्हवे ) धुरा वाहण्यासाठी उत्तम घोडे जुंपतो. ज्याप्रमाणे ( जारः आ ससतीं इव ) जार डोळा लागलेल्या स्त्रीला जागी करतो, त्याप्रमाणे, हे वायो ! तूं ( पुरंधिं ) बुद्धिमान् यजमानाला ( प्रबोधय ) जागा कर, ( रोदसी प्रचक्षय ) द्यावापृथिवींना प्रकाशित कर, ( उषसः वासय ) उषःकालाला प्रकाशित कर, ( श्रवसे उषसः वासय ) अन्नासाठी उषःकालाला प्रकाशित कर.

या ठिकाणी 'जार जसा आपल्या प्रेमाच्या स्त्रीला खुणेने योग्य वेळीं जागी करतो, तसा वायु यजमानाला जागें करो,' असें वर्णन आहे. येथे जाराची उपमा दिलेली आहे. या उपमेमध्ये आतुरता विशेष आहे. ज्या आतुरतेने जार स्त्रीला जागृत करतो, त्याप्रमाणे वायूने तेवढ्या आतुरतेने यजमानाला जागृत करावें, असें सुचविलें आहे. तसेंच—

( रहूगण आंगिरसः । पवमानः सोमः । गायत्री )

**एष स्य मानुषीष्वा श्येनो न विक्षु सीदति ।**
**गच्छञ्जारो न योषितम् ॥** ( ऋ० ९।३८।४; साम. १८७६ )

( श्येनः न ) बहिरी ससाणा जसा वेगाने जातो व ( जारः योषितं गच्छन् न ) जसा जार आपल्या इष्ट स्त्रीकडे जातो, त्याप्रमाणे ( मानुषीषु विक्षु ) मानवी समाजामध्ये ( एषः स्यः आ सीदति ) हा तो सोम जाऊन बसतो.

येथे जाराची उपमा सोमाला दिली आहे, ती आतुरता, वेग व गुप्तता दाखवण्यासाठी आहे. तसेंच-

( प्रतर्दनो दैवोदासिः । पवमानः सोमः । त्रिष्टुप् )

**अपघ्नन्नेषि पवमान शत्रून् प्रियां न जारो अभिगीत इन्दुः ।**
**सीदन् वनेषु शकुनो न पत्वा सोमः पुनानः कलशेषु सत्ता ॥**
( ऋ० ९।९६।२३ )

( अभिगीतः पवमानः इंदुः ) स्तुति केलेला हा पवित्र करणारा सोम ( अपघ्नन् शत्रून् ऐषि ) हल्ला करीत शत्रूकडे तसा जातो, ( प्रियां जारः न ) जसा

प्रिय स्त्रीकडे जातो. ( पत्वा शकुनः वनेषु सीदन् न ) जसा उडणारा पक्षी वनामध्ये बसतो, त्याप्रमाणे ( पुनानः सोमः ) पवित्र करणारा सोम ( कलशेषु सत्ता ) कलशांमध्ये जाऊन बसतो.

जार जसा स्त्रीकडे वेगाने जातो, तसा सोम कलशामध्ये जातो, अशी वेग-दर्शक उपमा या ठिकाणी दिलेली आहे.

( अवत्सारः काश्यपः । पवमानः सोमः । गायत्री )

**अभि त्वा योषणो दश जारं न कन्यानूषत ।**
**मृजसे सोम सातये ॥** ( ऋ०।९।५६।३ )

हे सोमा ! ( जारं कन्या न ) ज्याप्रमाणे जाराला कन्या त्याप्रमाणे ( त्वा दश योषणः ) तुला दहाही अंगुली पिळतांना ( अभि अनूषत ) शब्द करावयाला लावतात. असा तूं ( सातये मृज्यसे ) इन्द्रासाठी पिळला जात आहेस.

या ठिकाणीं कन्या जाराला बोलावयास लावतात, त्याप्रमाणे हातांचीं दहाही बोटें सोमाला पिळतांना लागत असल्यामुळे या दहाहि कन्या सोमाला शब्द करावयास लावतात, अशी उपमा आहे. सोम दहाही बोटांनी जोराने पिळला जातो, तेव्हा त्यांतून शब्द निघतो. तशा कन्या आपल्या प्रियाला बोलावयास लावतात.

( वैश्वामित्रो वाच्यो वा प्रजापतिः । पवमानः सोमः । अनुष्टुप् )

**आ जामिरत्के अव्यत भुजे न पुत्र ओण्योः ।**
**सरज्जारो न योषणां वरो न योनिमासदम् ॥**

( ऋ० ९।१०१।१४; साम १३८७ )

( जामिः ) आमचा बन्धु सोम हा ( अत्के आ अव्यत ) गाळणीमध्ये तसा जाऊन बसतो की, जसा ( ओण्योः भुजे पुत्रः न ) वडिलांच्या बाहूंमध्ये पुत्र, किंवा ( जारः योषणां न सरत् ) जसा जार आपल्या प्रिय स्त्रीकडे जातो, किंवा ( वरः योनिं न आसदत् ) जसा पति आपल्या स्त्रीकडे जातो.

या ठिकाणीं जाराची उपमा हीसुद्धा वेग दाखवण्यासाठी आहे.

येथे ( वरः योनिं न ) जसा पति आपल्या पत्नीकडे जातो, अशी दुसरी उपमा आहे, म्हणून ( जारः योषणा न ) जार स्त्रीकडे जातो, यांत व्यभिचारी जार हा

अर्थ अधिक स्पष्ट आहे.

( वेनो भार्गवः । वेनः । त्रिष्टुप् )

**अप्सरा जारमुपसिष्मियाणा योषा बिभर्ति परमे व्योमन् ।**
**चरत्प्रियस्य योनिषु प्रियः सन्त्सीदत्पक्षे हिरण्यये स वेनः ॥**
(ऋ० १०।१२३।५)

( अप्–सरा ) जलामधून संचार करणारी विद्युत् हीच एक ( योषा ) स्त्री ( परमे व्योमन् ) मोठ्या अन्तराळांत ( उपसिष्मियाणा ) जवळ जात जात ( जारं बिभर्ति ) आपल्या जार म्हणजे जीर्ण करणाऱ्या मेघाला धारण करते. ( प्रियस्य योनिषु चरत् ) आपल्य प्रियाच्या स्थानांमध्ये ती विहार करते ( सः प्रियः सन् वेनः ) तो तिचा प्रिय तेजस्वी मेघ तिच्यासह रहात असतां ( हिरण्यये पक्षे सीदत् ) सुवर्णाप्रमाणे चमकणाऱ्या आकाशाच्या भागामध्ये राहतो.

याच मंत्राचा दुसरा अर्थ असा आहे—

' अप्सरा आपल्या जाराजवळ जाते व ही स्त्री त्याला अगदी एकांतांत गाठते, ती त्या प्रियाच्या स्थानांमध्ये विहार करते, तो तिचा प्रिय कान्त सोन्य ने सजविलेल्या महालांत तिच्यासह राहतो.'

या मंत्रातील वर्णन मेघ व विद्युत् यांचेंच आहे, पण तें अभिसारिका व तिचा प्रिय यांच्या विहाराला लागू शकेल, अशा द्व्यर्थी शब्दयोजनेने केलेलें आहे. येथील ' जार ' हा शब्द एका अर्थी ' जार, प्रिय ' या अर्थी आहे व दुसऱ्या अर्थी ' वयाने मोठा झालेला, पाण्याने भरल्यामुळे गळणारा, ' अशा अर्थी आहे.

( श्यावाश्व आत्रेयः । पवमानः सोमः । गायत्री )

**अभि गावो अनूषत योषा जारमिव प्रियम् ।**
**अगन्नाजिं यथा हितम् ॥** ( ऋ० ९।३२।५ )

हे सोमा ! ( योषा प्रियं जारं इव ) ज्याप्रमाणे स्त्री आपल्या प्रिय जाराची [ स्तुति करते, त्याप्रमाणे] (गावः अभि अनूषत )गाई–वाणी–तुझी प्रशंसा करतात, (यथा हितं ) ज्याप्रमाणे हितकारक ( आजिं अगन् ) युद्धाला वीर जातो ( त्याप्रमाणे

सोम आपल्या भांड्यांत जातो ).

या ठिकाणीं ' जार ' शब्द प्रिय, जार किंवा पति या अर्थी आहे. सोमरसामध्ये गाईचें दूध मिळवितात, याला ' स्त्री जाराकडे जाते तसा सोम दुधाकडे जातो ' अशी उपमा येथे आहे. दुसरी उपमा ' वीर युद्धामध्ये जसे जातात ' ही आहे. या दोनही उपमा वेग दाखवणाऱ्या आहेत. तसेंच—

## प्रजामारकाला वधदण्ड.

( ब्राह्मो रक्षोहा । रक्षोहा । अनुष्टुप् )

**यस्त्वा भ्राता पतिर्भूत्वा जारो भूत्वा निपद्यते ।**
**प्रजां यस्ते जिघांसति तमितो नाशयामसि ॥**

( ऋ. १०।१६२।५; अथर्व. २०।९६।१५ )

हे स्त्रिये ! ( यः त्वा ) जो तुला ( भ्राता पतिः भूत्वा ) भाऊ होऊन, पति होऊन, ( जारो भूत्वा ) किंवा जार होऊन ( नि पद्यते ) जवळ येतो व ( यः ते प्रजां जिघांसति ) संततीचा नाश करूं इच्छित असतो ( तं इतः नाशयामसि ) त्याला येथून आम्ही नाहीसा करतों.

या ठिकाणीं संतानाचा नाश करणाऱ्या भ्राता, पति अथवा जार यांचा नाश करावा, असें म्हटलें आहे. हत्या किंवा बालकवध करणाऱ्या अपराध्यांस वधदण्ड द्यावा, असें यावरून दिसतें. इतक्या मन्त्रांत ' जार ' शब्द व्यभिचारी या अर्थी आलेला आहे. येथपर्यंत मंत्रांत पुढील वर्णनें दिसत आहेत—

१ शूद्रस्त्रीनें वैश्याशीं जार– कर्म केलें तर तिच्या शूद्रपतीला दुःख होतें.
( वा. य. २३।३० )

२ वैश्यस्त्रीनें शूद्राशीं जार– कर्म केलें तर तिच्या वैश्य पतीलाही दुःख होतें.
( वा. य. २३।३१ )

३ जसा तरुण जार ( आपल्या प्रिय स्त्रीला धन देत असतो. )
( ऋ. १।११७।१८ )

४ जसा जार निजणाऱ्या स्त्रीला ( चाहूल न लागूं देतां गुपचुप जागी करतो. )
( ऋ. १।१३४।३ )

५ जसा स्त्रीजवळ जार जातो. ( ऋ. ९।३८।४ )
६ जसा जार प्रिय स्त्रीकडे जातो. ( ऋ. ९।९६।२३; ९।१०१।१४ )
७ जशी कन्या जाराजवळ जाते. ( ऋ. ९।५६।३ )
८ जशी स्त्री जाराला एकान्तांत प्राप्त करते. ( ऋ. १०।१२३।५ )
९ जशी स्त्री आपल्या प्रिय जाराला भेटते. ( ऋ. ९।३२।५ )

या मंत्रांपैकी पहिल्या दोन मंत्रांत प्रत्यक्ष जार-कर्म करण्याचा उल्लेख आहे. तसेंच तो शेवटच्या ( ऋ. १०।१२३।५ ) मंत्रांतहि आहे. म्हणजे एकूण तीन मंत्रांत प्रत्यक्ष जार-कर्माचा उल्लेख आलेला आहे. सर्व वेदामध्ये सुमारें वीस हजार मंत्र आहेत. त्यांत केवळ तीनच मंत्रांत अशा जार-कर्माचा उल्लेख आहे.

याशिवाय जे मंत्र येथे दिलेले आहेत, त्यांत जार-कर्म करणाराची उपमा दिलेली आहे. या उपमेमध्ये वेग, एकान्त, आतुरता इत्यादि बाबी सुचवणें हें मुख्य आहे. सर्व वेदमंत्रांमध्ये एकंदर दहा हजारावर उपमा आहेत, त्यांपैकी केवळ आठच उपमा जार-कर्म करणाऱ्याच्या आहेत, यासाठी या कांही जास्ती नाहीत.

उपमांमध्ये जेवढा भाव घ्यावयाचा असतो, तेवढाच पाहणें योग्य असतें. अशापुरताच उपमेचा उपयोग करावयाचा असतो; यापेक्षा त्यांतून अधिक आशय काढावयाचा नसतो. असो. याप्रमाणे वेदामध्ये व्यभिचारी अर्थाचा ' जार ' शब्द आहे; पण तो '**अहल्येच्या जाराची कथा**' उलगडण्याच्या संबंधांत कोणत्याही रीतीने उपयोगी पडेल असा नाही.

वेदांमध्ये ज्यांत ' जार ' शब्द आलेला आहे, असे मंत्र इतकेच आहेत, यापेक्षा अधिक नाहीत; म्हणून अहल्येच्या जार-कर्माचें स्पष्टीकरण होईल, असा कांहीसुद्धा उल्लेख वेदांमध्ये सापडत नाही, असेंच म्हणावें लागतें.

## अहल्येचा अर्थ.

ज्या वेळीं कोणत्याही स्पष्ट पुराव्याने उलगडा होत नाही, त्या वेळीं यौगिक अर्थ पाहून कांही साधतें कीं काय, तें पहावें, अशी प्राचीन रीति आहे. त्या रीतीचा अवलंब करून आता या कथेंत काय निष्पन्न होतें तें पाहूं. अहल्या

शब्दाचा यौगिक अर्थ असा आहे—

१ '**अहः लीयते अस्यां**' = दिवस जींमध्ये लीन होऊन जातो, मिळून जातो, ती रात्री, अथवा संध्या ( संध्याकाळची वेळ ).

२ '**अहनि लीयमाना**' = दिवसामध्ये जी लीन होते किंवा मिळून जाते, ती रात्री अथवा उषःकाल ( सकाळची सूर्योदयापूर्वीची वेळ ).

३ '**हल्यते इति हल्या, न हल्या अहल्या**' = हल् म्ह० नांगराने नांगरणे, नांगरणें ज्या भूमीमध्ये होतें, ती '**हल्या**' व ज्या भूमींत नांगरट होत नाही, ती भूमि '**अहल्या**' होय. 'अहल्या म्हणजे पडीक जमीन.'

पहिल्या दोनही अर्थांमध्ये '**अहल्या**' शब्दाचा अर्थ '**उषा** अथवा **रात्री**' असा आहे. 'उषेचा जार' याचा अर्थ उषेचा अथवा रात्रीचा नाश करणारा सूर्य किंवा अग्नि होय. अशा प्रकारचीं वर्णनें ज्यांत आलीं, असे मंत्र यापूर्वी दिलेले आहेत.

'**अहल्या**' शब्दाचा तिसरा अर्थ 'न नांगरलेली जमीन' असा आहे. अशा पडीक जमिनीचा उद्धार श्रीरामचंद्राने केला व ती जमीन नांगरून धान्य उपजण्याजोगी केली. हा अर्थ मोठा मजेदार व मनोरंजक वाटतो, यांत शंका नाहीं; पण अशा प्रकारचा अर्थ दाखवणारे वेदमंत्र, ब्राह्मणवचनें अथवा कथाभाग आम्हांस अजून कोठेही सापडले नाहीत. या कारणाने हा अर्थ आम्ही वचनांच्या आधाराने सिद्ध करून दाखवून देऊं शकत नाही.

वाल्मीकीय रामायणाच्या उत्तरकाण्डांत '**अहल्या**' शब्दाचा आणखी एक अर्थ दिलेला आहे. तोही येथे पाहण्यासारखा आहे—

४ **ततो मया गुणरूपैरहल्या स्त्री विनिर्मिता ।**
**हलं नामेह वैरूप्यं हल्यं तत्प्रभवं भवेत् ॥**
**यस्या न विद्यते हल्यं तेनाहल्येति विश्रुता ।**
**अहल्येत्येव च मया तस्या नाम प्रकीर्तितम् ॥**

( वा. रामा. उ. ३०।२२–२४ )

ब्रह्मदेव म्हणतात—

"मी एक रूपवती स्त्री निर्माण केली. 'हल्य' म्हणजे कुरूपता ती जीमध्ये

नाही, ती ' अहल्या ' म्हणजे अत्यंत सुंदर, रूपवती स्त्री होय. ही अहल्या अशी सुंदर होती, म्हणून हिचें नांव अहल्या असें ठेवलें. ”

ब्रह्मदेव इन्द्राला अहल्येच्या उत्पत्तीची कथा सांगतांना वरील वृत्तान्त सांगत आहेत. पुढे ते म्हणतात की, ' हे इन्द्रा ! ज्या वेळीं तुला अहल्येच्या रूपाने मोह उत्पन्न झाला व त्या वेळीं तूं त्या मुनिपत्नीकडे गेलास व तिचें धर्षण केलेंस. ' इत्यादि कथा या उत्तरकाण्डांत आली आहे. त्या कथेंत इन्द्राचा डोळा या कन्येवर लहानपणापासून होता, असें लिहिलें आहे. पुढे जेव्हा गौतमाशीं हिचें लग्न झालें, असें इन्द्रास कळलें, तेव्हा तो निराश झाला व वेळ साधून हें कुकर्म त्याने केलें, असा वृत्तांत येथे दिलेला आहे. हा वृत्तांत कांही बालकाण्डांतील वृत्तांताशीं जुळत नाही; कारण बालकांडांमध्ये अहल्येने जाणूनबुजून इन्द्राला ओळखून हें कर्म केलें, असें लिहिलें असून, उत्तरकाण्डांत तिच्याकडून नकळत हें कर्म घडलें, असें लिहिलें आहे. असो.

येथे ' **अहल्या** ' शब्द ' अत्यंत सुंदर ' या अर्थी आलेला आहे. हा अर्थ व हा वृत्तांतहि पाठीमागचाच आहे. आम्ही वेदांमध्ये जो शोध करीत आहों, त्या वेदमंत्रांतील जार शब्दाचा भाव निराळाच आहे. वेदांमध्ये ' **रात्रीचा जार, उषेचा जार** ' असे जे शब्द आले आहेत, त्यांचे वेदमंत्र या पूर्वी दिले आहेतच. आता त्यातील जार शब्दाचा अर्थ ' अहल्या ' शब्दाचा अर्थ पाहिल्यानंतर विचार करूं —

१ ' **संधये जारं** ' = ' संधि, तह करण्यासाठी वृद्ध मनुष्य योग्य आहे.
( वा. य. ३०।९; काण्व. ३४।९ )

२ ' **अपां जारः** '= पाण्याला क्षीण करणारा ( सूर्य ). ( ऋ. १।४६।४ )

३ ' **अध्वरस्य जारं अग्निं**'=यज्ञाची पूर्णता करणारा अग्नि ( ऋ.१०।७।५ )

४ ' **पूर्भित् जारः** ' = ' शत्रूंचे किल्ले तोडणारा व शत्रूंची शक्ति नाहीशी करणारा ( इन्द्र ). ( ऋ. १०।१११।१० )

५ ' **जारं मरायु चर्वरं** ' = ' जीर्ण होणारें, मरणारें जगत्.
( ऋ. १०।१०६।७ )

६ ‘ **जारः भगं आ इयक्षति** ’ = ‘सर्वांना क्षीण करणारा सूर्य प्रकाशतो’-
( ऋ० १०।११।६ )

७ ‘ **जरितः प्रबोधय जारं इन्द्रं** ’= ‘ हे स्तुति करणाऱ्या ! स्तुतीला योग्य अशा इन्द्राला स्तुतीनें जागृत कर. ’ ( ऋ. १०।४२।२ )

या मंत्रांमध्ये ‘ ‘ **जार** ’ शब्दाचा प्रयोग आहे, पण येथे ‘ जार ’ शब्दाचा व्यभिचारी असा अर्थ नाहीं; म्हणून आपल्या इन्द्राच्या जार=कर्माचा शोध करण्यासाठी या मंत्रांचा उपयोग होणें शक्य दिसत नाही. येथे ‘ जार ’ शब्द ‘ इन्द्राचे विशेषण आहे; पण ‘ **जरितः ! जारः** ’ या शब्दांच्या परस्परसहकार्यामुळे ‘ स्तुति करणारा किंवा स्तुत्य ’ असाच या जार शब्दाचा अर्थ दिसतो. अन्य अर्थ त्या त्या मंत्रांच्या अर्थामध्ये दिलेले आहेत. ‘ **जार इन्द्र** ’ यांचा अर्थ करावयाच्या वेळीं हे मंत्र उपयोगी पडतात कीं काय, ते विचारी वाचकांनी पहावें; पण एवढें खरें की, येथील ‘ **जार** ’ शब्दाचे अर्थ जार शब्दाच्या निराळ्या अर्थांवर प्रकाश पाडीत आहेत, यांत शंका नाही; म्हणून अहल्येच्या जाराचा विचार करतांना हे अर्थ वाचकांनी अवश्य लक्ष्यांत ठेवावे.

८ ‘ **स्वसुः जारः** ’ = ‘बहिण जी उषा तिचा नाश करणारा पूषा (सूर्य).’
( ऋ. ६।५५।४ )

९ ‘ **स्वसुः जारः इन्द्रस्य भ्राता** ’ = ‘ बहिण जी उषा तिचा नाश करणारा इन्द्राचा बन्धु पूषा. ’ ( ऋ. ६।५५।५ )

१० **स्वसारं जारो अभ्येति** ’ = ‘ बहिण जी उषा तिचा नाश करणारा तिचा भाऊ ( अग्नि ). ( ऋ. १०।३।३ )

सकाळीं उषःकालीं उषा येते, त्यानंतर अग्नि प्रदीप्त करतात; म्हणून यांस बहिणभाऊ असें येथे म्हटलेलें आहे. अग्नि प्रदीप्त होतांच दिवस उगवतो व उषा नाहीशी होते. म्हणून अग्नि किंवा सूर्य हे उषेचे नाशकर्ते आहेत.

११ **योषा जारस्य चक्षसा विभाति**, = ‘उषा स्त्री आपल्या नाशकर्त्या ( सूर्या ) च्या प्रकाशानें प्रकाशते. ( ऋ. १।९२।११ ) येथे एखादी स्त्री जाराने दिलेल्या आभूषणांनी जशी शोभते, तसी उषा सूर्याच्या प्रकाशानें शोभते, अशी उपमा आहे.

येथे उषा व सूर्य यांचेंच केवळ वर्णन आहे.

हे सर्व मंत्र 'जार' शब्द असतांही, उषा व सूर्य यांचेंच येथे रूपक असल्यामुळे, प्रत्यक्ष जारकर्म झालें, असें दाखवीत नाहीत. कवि ती उपमा घेत आहे, इतकेंच येथे आहे. पहिल्या तीन ( ८,९,१० ) मंत्रांत ' स्वसा ' बहिण असा शब्दप्रयोग असल्याने अहल्येची कथा उलगडण्यास त्यांचा कांहीं उपयोग होणें शक्य नाहीं; कारण अहल्या ही कांहीं इन्द्राची बहिण नाही. ती गौतमाची पत्नी आहे. चवथ्या ( ११ व्या ) मंत्रांत ' जाराच्या प्रकाशाने प्रकाशणाऱ्या ' स्त्रीचें वर्णन आहे; पण हें वर्णन उषेचेंच आहे व येथील जार हा सूर्यच निःसंशय आहे. तथापि कदाचित् याचा उपयोग अहल्येची कथा उलगडण्याच्या कामीं होईल. तसेंच आणखी चार मंत्र आहेत, ते आता पहा—

१२ ' **कनीनां जारः** ' = ' कन्यांच्या कन्यापणाच्या आयूचा नाश करणारा अग्नि. ' ( ऋ. १।६६।४; १।१५२।४ ) विवाहाच्या वेळीं होम होऊन, कन्यांचें कौमार्य संपून त्यांस पत्नीत्व येतें, हा भाव येथे आहे.

हे मन्त्र अग्नीच्या वर्णनाचे आहेत. म्हणून हे आपल्या ' अहल्येच्या जारा ' चा शोध करण्यास उपयोगी पडण्याजोगे नाहीत. आता उषेच्या जाराचा ज्यांत स्पष्ट उल्लेख येतो, ते मंत्र पहा–

१३ ' **उषो न जारः** ' = ' उषेला क्षीण करणारा, नष्ट करणारा ( सूर्य ) '. ( ऋ. १।६९।१; १।६९।५; ७।१०।१ )

१४ ' **उषसां जारः** ' = अनेक उषांचा नाश करणारा एक ( अग्नि ) '. ( ऋ. ७।९।१ )

१५ ' **उषा जार इव पर्याचरन्ती ददृशे** ' ' जणू काय उषा आपल्या जार बनलेल्या पतीची सेवा करते आहे, असें दिसतें. ' ( ७।७६।३ )

या सर्व मंत्रांत ' **उषो जारः** ' चा अर्थ ' उषेचा नाश करणारा, उषेला क्षीण करणारा ' असा आहे. सूर्य उगवल्याने उषा नाश पावते, हें सत्य येथे अशा अलंकाराने वर्णिलें आहे. काव्यदृष्टीने हा अर्थ फारच उत्तम आहे. '**उषांचा प्रस्तावक** ' असाही अर्थ येथे होऊं शकेल. ' **उषो जारः** ' म्हणजे उषा येणें ही सूर्य येण्याची एक प्रस्तावनाच आहे; किंवा उषःकाल होतांच सूर्याच्या

स्तुतीला प्रारंभ होतो, असाही भाव यांतून निघूं शकेल. **'जार'** हा शब्द **'जॄ= स्तुतौ'** व **'जॄ= वयोहानौ'** या दोनही धातूंवरून बनूं शकेल. पहिल्या धातूवरून 'जार' शब्द झाला, असें मानल्यास त्याचा 'स्तुत्य, स्तुति करणारा, प्रस्तावक, स्तावक,' असा अर्थ होईल व दुसऱ्या धातूवरून तो शब्द बनला आहे, असें मानल्यास त्याचा अर्थ 'वृद्ध, नाशकर्ता, क्षीण कर्ता' अशा प्रकारचा होऊं शकेल.

उषःकाल होतांच सूर्याच्या स्तवनाला प्रारंभ होतो, म्हणून **'उषो जारः'** चा अर्थ 'उषःकालीं स्तुत्य' असा होणें शक्य आहे. सध्या मराठी भाषेंमधील **'जार'** शब्द व्यभिचारी हा एकच अर्थ दाखवीत आहे; पण वैदिक भाषेंतील 'जार' शब्द अगदी भिन्न असे अनेक अर्थ दाखवणारा आहे, हें आपण येथील मंत्रांतून पाहिलें. याचा वाचकांनी अवश्य विचार करावा,

**उषा ( अहनि लीयमाना )** दिवसांत लीन होऊन जाते, म्हणूण ती **( अहः+ली= अहल्या )** अहल्या अशी वर्णिली जाते. प्रातःकालच्या उषेचें हें नांव यावरून होतें. संध्याकाळची संध्या असाही अहल्येचा अर्थ होईल. **( अहः लीयते अस्यां )** दिवस जिच्यांत लीन होतो; पण संध्येचा नाशक सूर्य किंवा अग्नि होऊं शकणार नाही. म्हणून अहल्या शब्द जर उषेचा वाचक मानावयाचा असेल, तर तो पहिल्या अर्थाप्रमाणेंच मानणें भाग आहे. सकाळीं येणारी हीच उषा येथे अपेक्षित आहे. हिचाच नाश सूर्य करतांना दिसतो. ही अनुभवाचीच गोष्ट आहे. या उषेचा पति अग्नि व जार ( नाशकर्ता ) सूर्य आहे, असें हें मुळांतील रूपक असावें.

**उष्=** जळणें ( **उष् = दाहे** );

**उष्=** उषःकाल, सकाळ, प्रातःकाळ;

**उष=** उषःकाल;

**उषस्=** उषा, प्रातःकाल ( उषसः= प्रभातीभावे );

**उषा=** उषःकाल;

**उषप=** अग्नि, सूर्य;

**उषाकर=** चन्द्र, रात्रीचा निर्माता, उषेचा निर्माता ( सूर्य );

'**उषापति**' अग्नि किंवा चन्द्र आहे. विशेषतः अग्नि हा उषापति आहे व तो तपही करतो, म्हणजे तापत असतो. म्हणून तो तपस्वीहि आहे. उषःकालीं तो असतो म्हणून तो उषेचा पति म्हणतां येईल. चन्द्र हा घेतला तरी तो तप करून कृश होत असतो, असें रूपक होणें शक्य आहे. यांना '**गोतम**' हें नांव मानलें, तर त्याची पत्नी उषा होते व तिचें धर्षण सूर्य करतो, असें हें रूपक यावर होणें शक्य आहे. अशी ही कथा मुळांत केवळ रूपकानें सिद्ध होत असलेली येथे दिसत आहे. एवढ्या मुळाचा विस्तार पुढे काव्यकलाप वाढून अनेक प्रकारांनी झाला असावा.

शतपथामध्ये '**अहल्यायै जारेति**' असे शब्द आहेत. निःसंशय हे मंत्राचें प्रतीक आहे; पण तो मन्त्र सध्याच्या संहितांमध्ये सापडत नाही. म्हणून तशा-सारखा आशय दाखवणारे वेदमंत्र आपण या लेखामध्ये पाहिले. या वर्णनाशीं जुळ-तील असे इतक्या मंत्रांपैकी ४१५ च मंत्र आपणांस उपलब्ध झाले आहेत. यांमध्ये '**अहल्येचा जार**' असे प्रत्यक्ष शब्द नाहीत, हें खरें आहे. तथापि '**उषा**' ही '**अहल्या**' मानतां येणें शक्य आहे व अशा उषेचा जार वरील मंत्रांत सूर्य हा वर्णिलेला आहे; म्हणून या मंत्रांचा उपयोग या कथेचा उलगडा करावयाचा असतांना थोडातरी होऊं शकेल, एवढाच संबंध आपणांस या कामीं या मंत्रांचा दाखवतां येणें शक्य आहे.

ज्या प्रतीकाचा उल्लेख शतपथब्राह्मणांत आहे, तें प्रतीक '**उषेचा जार**' हें नव्हे व या अर्थाचेंहि नव्हे. तथापि उषेच्या जाराचा अहल्येच्या जाराशीं पुष्कळच मोठा संबंध आहे, हेंहि कांही खोटें नव्हे. अहल्येच्या कथेचें एवढेंच मूळ वेदमंत्रांत आहे.

(१) ज्या अर्थीं '**अहल्यायै जारेति**' हें शतपथाचें वचन इन्द्राच्या प्रशंसेसाठीं योजलेलें आहे व—

(२) ज्या अर्थीं वैदिक वाङ्मयांत '**जार**' शब्दाचा मूळचा अर्थ व्यभिचारी असाच केवळ नाही, हें आपण वेदमंत्रांच्या आधारानें यापूर्वी पाहिलें आहे व—

(३) ज्या अर्थीं ( जार ) व्यभिचारी हा अर्थ नंतर त्या शब्दाशीं संबंधित

झाला आहे, हेंहि आम्ही वर पाहिलें आहे. तसेंच—

( ४ ) ज्या अर्थी शतपथवचनाचें स्पष्टीकरण करणाऱ्या षड्विंशब्राह्मणांत **' अहल्यायै जारेति '** हें वचन दिलें असतांही व सविस्तर वृत्तांत दिला असतांहि जारकर्माचा उल्लेखसुद्धा त्यांत केला गेला नाही.

( ५ ) त्या अर्थी **' अहल्या व इंद्र '** यांचें जारकर्म झाल्याचें शतपथा-पर्यंत कोणास माहीतही नव्हतें, हें उघड आहे.

( ६ ) तें नुसतें ' उषा व सूर्य ' यांवरचें एक रूपकच होतें, ही गोष्ट यावरून स्पष्टपणें दिसण्यासारखी आहे.

यासंबंधीचे आवश्यक सर्व वेदमंत्र वरील भागांत येऊन गेले आहेत, तेव्हा आता याविषयी अधिक लिहिण्याची आवश्यकता आहे, असें वाटत नाही.

ब्राह्मणग्रंथांच्या कालानंतरच्या कालामध्ये कवींनी या कथेंत व्यभिचाराचा संबंध कल्पून कथा वाढवल्या. अशा कथेस वाल्मिकीय रामायणांत प्रारंभ झालेला आपणांस दिसतो. पुढे हेच कथाभाग प्रत्येक कवीकडून मीठमिरची लागत गेल्या-मुळे वाढत गेले. ही वाढ कसकशी होत गेली, तें आता पाहूं—

## अहल्येची उत्पत्ति.

**वध्र्यश्वान् मिथुनं जज्ञे मेनकायामिति श्रुतिः ।**
**दिवोदासश्च राजर्षिरहल्या च यशस्विनी ॥ ७ ॥**
**शरद्वतस्य दायादमहल्या संप्रसूयत ।**
**शतानन्दं ऋषिश्रेष्ठं तस्यापि सुमहातपाः ॥ ८ ॥**

( ह. वं. १।३२।६९–७१; मत्स्य. ५० )

**मिथुनं मुद्गलाद् भार्म्याद् दिवोदासः पुमानभूत् ।**
**अहल्या कन्यका यस्यां शतानंदस्तु गौतमात् ॥**

( श्री. भा. ९।२१।३४ )

**' मुद्गलाद् बृहदश्वः । बृहदश्वाद्दिवोदासोऽहल्या च मिथुनमभूत् । शरद्वतश्चाहल्यायां शतानन्दोऽभवत् ।**

( विष्णु. ४।१९।६१–६३ )

मुद्गलाचा मुलगा दिवोदास व मुलगी अहल्या होय. अहल्येचा गौतमापासून झालेला मुलगा शतानन्द होय. अहल्येचा भाऊ दिवोदास. अहल्येची आई मेनका व बाप वध्यश्व किंवा विन्ध्याश्व. ( वध्याश्व, विन्ध्याश्व मुद्गल हे एक कीं काय ? )

याप्रमाणे मेनकेपासून अहल्या झाली, ती ब्रह्मदेवाने आपली मुलगी म्हणून पाळली व गौतमाला पत्नी म्हणून दिली. या अहल्येची वाल्मिकीय रामायणात आलेली कथा अशी आहे.

## रामायणांतील अहल्येच्या कथा.

वाल्मिकीय रामायणांत अहल्येच्या दोन कथा आहेत व त्यांतील कथाभागही भिन्न आहेत. या कथेचा विचार करावयाचा असतांना या दोनही कथा पाहणें इष्ट आहे; म्हणून त्या आता पाहूं. यापैकी पहिली बालकाण्डांतील कथा अशी आहे—

### ( अ ) बालकाण्डांतील अहल्येची कथा.

गौतम ऋषि आपल्या आश्रमांत आपल्या अहल्या नामक भार्येसह अनेक वर्षे रहात होता. एकदा इन्द्राने आश्रमामध्ये गौतम नाहीं, असें पाहिलें व गौतमरूपाने आंत येऊन तो अहल्येला म्हणाला की, माझी इच्छा पूर्ण कर—

संगमं त्वहमिच्छामि त्वया सह सुमध्यमे ॥ १८ ॥
मुनिवेषं सहस्राक्षं विज्ञाय रघुनन्दन ।
मतिं चकार दुर्मेधा देवराजकुतूहलात् ॥ १९ ॥
अथाब्रवीत्सुरश्रेष्ठं कृतार्थेनान्तरात्मना ।
कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ गच्छ शीघ्रमितः प्रभो ॥ २० ॥
आत्मानं मां च देवेश सर्वथा रक्ष गौतमात् ।
इन्द्रस्तु प्रहसन् वाक्यमहल्यामिदमब्रवीत् ॥ २१ ॥
सुश्रोणि परितुष्टोऽस्मि गमिष्यामि यथागतम् ।
एवं संगम्य तु तदा निश्चक्रामोटजात्ततः ॥ २२ ॥

**स संभ्रमात्त्वरन् राम शङ्कितो गौतमं प्रति ।**
**गौतमं स ददर्शाथ प्रविशन्तं महामुनिम् ॥ २३ ॥**

( वा. रा. बा. ४८ )

" मुनिवेष धारण केलेला इन्द्रच आहे, हें अहल्येने ओळखलें; पण पापबुद्धीने देवराजाशीं समागम करावा, या वाईट हेतूनेच तिने त्यास अनुमोदन दिलें. शेवटीं ती इन्द्रास म्हणाली की, 'मी कृतार्थ झालें आहें, आता तुम्ही लवकर येथून पाय काढावा, हेंच उत्तम. तुम्ही लवकर येथून बाहेर जा व आपलें व माझें रक्षण करा. गौतम ऋषि येण्याची वेळ झाली आहे.' हें ऐकून इन्द्र हसत हसत लघळपणाने म्हणाला की, ' मीही संतुष्ट झालों आहें, हा पहा आलेल्या मार्गानें चाललोंच.' असें म्हणत पर्णकुटींतून इन्द्र निघत आहे, इतक्यांत गौतम ऋषि आंत आले व त्यांनी इन्द्रास पाहिलें. "

गौतमांच्या हातांत दर्भ होते व समिधा होत्या, व तपाचें तेज त्यांच्या चेहऱ्यावर चमकत होतें. गौतमाला पाहतांच इन्द्राचें तोंड काळेंठिक्कर पडलें, तेव्हा गौतमाच्या लक्ष्यांत सर्व आलें. त्यांस क्रोध आला व त्यांच्या तोंडांतून तत्काळ पुढील शाप बाहेर पडला—

## ( आ ) इन्द्राचें वृषण गळून पडलें.

**मम रूपं समास्थाय कृतवानसि दुर्मते ।**
**अकर्तव्यमिदं यस्मात् विफलस्त्वं भविष्यसि ॥ २९ ॥**

( वा. रा. बा. ४८ )

' हे इन्द्रा ! ज्या अर्थी माझें रूप धारण करून तूं करूं नये तें पापकर्म येथे केलें आहेस, त्या अर्थी तूं यापुढे निष्फल होशील, ( म्हणजे तुझें अण्ड गळून पडतील.)' असें म्हणतांच इन्द्राचें वृषण गळून पडलें व इन्द्र अत्यंत खजिल होऊन पळून गेला.

## लिंगपुराण.

**इन्द्रस्यापि च धर्मज्ञ छिन्नं तु वृषणं पुरा ।**
**ऋषिणा गौतमेनोर्व्यां क्रुद्धेन विनिपातितम् ॥२७॥** ( लिं. पु. २९ )

" गौतम ऋषि रागावले, तेव्हा त्यांनी इन्द्राचें वृषण छेदून भूमीवर टाकलें."
हें रामायण–बालकाण्डाच्या कथेशीं जुळणारें कथन आहे. येथे ( **गौतमेन इन्द्रस्य वृषणं छिन्नं उर्व्यां निपातितं** ) गौतम ऋषीनें इन्द्राचें वृषण रागानें कापलें व जमिनीवर फेकलें, असें म्हटलें आहे. स्वपत्नीशीं जोरकर्म करणाऱ्यावर नवऱ्यानें अशा तऱ्हेनें रागावणें व त्याला पकडून, खालीं पाडून, त्याचें वृषण वगैरे कापून टाकणें, हेंच अगदीं स्वाभाविक घडण्यासारखें कृत्य आहे. रामायणांत शापानें वृषण गळलें असें आहे; पण लिंगपुराणांत ( **छिन्नं निपातितं** ) छेदून टाकलें असें आहे. राग आलेल्या माणसाकडून नुसता शाप देण्यापेक्षा असेंच होणें अधिक शक्य आहे.

अहल्येला जें गौतमानें शापलें, त्यांत तिला तूं आपलें अन्तःकरण शुद्ध करण्यासाठीं अमूक रीतीनें वाग, असा आदेश आहे. अशा रीतीनें वागलीस तर तुझें अन्तःकरण शुद्ध होईल व तूं माझ्याबरोबर राहण्यास योग्य होशील, हा आदेश या शापामध्यें आहे. पहा–

अहल्येलाही गौतमांनीं शापलें, तें असें—

**इह वर्षसहस्राणि बहूनि निवसिष्यसि ॥ ३० ॥**
**वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी ।**
**अदृश्या सर्वभूतानामाश्रमेऽस्मिन् वसिष्यसि ॥ ३१ ॥**
**यदा त्वेतद्वनं घोरं रामो दशरथात्मजः ।**
**आगमिष्यति दुर्धर्षस्तदा पूता भविष्यसि ॥ ३२ ॥**
**तस्यातिथ्येन दुर्वृत्ते लोभमोहविवर्जिता ।**
**मत्सकाशं मुदा युक्ता स्वं वपुर्धारयिष्यसि ॥ ३३ ॥**
**एवमुक्ता महातेजा गौतमो दुष्टचारिणीम् ।**
**इममाश्रममुत्सृज्य सिद्धचारणसेविते ॥ ३४ ॥**
**हिमवच्छिखरे रम्ये तपस्तेपे महातपाः ॥** ( वा. रा. बा. ४८ )

* हे अहल्ये ! येथेच अनेक वर्षे निवास कर. निराहार ( निरशनाचे, उपवासाचे पदार्थ खाऊन ) रहा, वातभक्षण ( श्वासनिरोधनरूप प्राणायामाने आपली शुद्धता कर ), तप करीत रहा, भस्मामध्येच नीज ( विलासी कपडे वापरूं नको. )

*

कोणाच्या दृष्टी पडूं नको, या आश्रमांतच रहा, आश्रमाच्या बाहेर जाऊं नको; जेव्हा रामचन्द्र येथ येतील, तेव्हा त्यांचें योग्य आदरातिथ्य कर म्हणजे पवित्र होशील. तोंपर्यंत लोभ व मोह यांत आपणांस गुंतवूं नकोस. अशा रीतीने वागून पुनीत झालीस, म्हणजे मग माझ्याजवळ राहण्यास योग्य होशील. असें बोलून ते हिमालयांत तप करण्यासाठी निघून गेले. '

यामध्ये अहल्येला जो शाप दिला आहे, तो अन्तःकरणशुद्धीसाठी करावयाच्या धर्म्य व्रताचरणाचा आदेश आहे. शरिरामध्ये अयोग्य अन्नसेवनामुळे मल व दोष उत्पन्न होतात, ते दूर करण्यांसाठी निरशनसेवन, तपश्चरण, प्राणायाम, भस्मशयन, मौन, एकान्तवास आदि नियम आहेत. इन्द्राशीं सहवास करावा, अशी बुद्धि अहल्येला झाली, ती तिच्या मनांतील दोषांमुळे झाली. नाहीतर तिने मनःसंयमनच केलें पाहिजे होतें. परपुरुष दिसतांच त्यावर मन जाणें, हें अन्तःकरणांतील दोषांमुळे होणें शक्य आहे. हे दोष दूर करण्यासाठी येथे अहल्येला हें प्रायश्चित्त सांगितलें आहे व तें योग्यही आहे. अहल्येला करावयास सांगितलेल्या सर्व नियमांचा उद्देश अन्तःकरणशुद्धि हा एकच येथे दिसत आहे.

इकडे इन्द्राचें वृषण गळून पडलें होतें. त्या इन्द्रावर त्या वेळच्या शस्त्रवैद्यांनी शस्त्रक्रिया करून मेषाचें वृषण काढून तें तेथे बसवून दिलें व इन्द्राला पुनः पुंस्त्वयुक्त केलें. तेव्हापासून इंद्राचें नांव ' **मेषवृषण** ' असें झालें.

( वा. रा. बा. ४९।६–७ )

शस्त्रक्रियेच्या चिकित्साविद्येची ही फारच उच्च प्रगति आहे, यांत शंका नाहीं.

**अग्नेस्तु वचनं श्रुत्वा पितृदेवाः समागताः ।**
**उत्पाट्य मेषवृषणौ सहस्राक्षे न्यवेशयन् ।** ( वा. रा. बा. ४९।८ )

याप्रमाणे इन्द्राची चिकित्सा वैद्यांनी केली व इकडे अहल्येची शुद्धि तपाने झाली. जेव्हा श्रीरामचन्द्र या गौतमाच्या तपोभूमीमध्ये आले, तेव्हा त्यांनी तप करीत असलेल्या अहल्येस पाहिलें-

**विश्वामित्रवचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः ।**
**विश्वामित्रं पुरस्कृत्य आश्रमं प्रविवेश ह ॥ १२ ॥**
**ददर्श च महाभागां तपसा द्योतितप्रभाम् ।**

लोकैरपि समागम्य दुर्निरीक्ष्यां सुरासुरैः ॥ १३ ॥
राघवौ तु तदा तस्याः पादौ जगृहतुर्मुदा ।
स्मरन्ती गौतमवचः प्रतिजग्राह सा हि तौ ॥ १७ ॥
पाद्यमर्घ्यं तथातिथ्यं चकार सुसमाहिता ।
प्रतिजग्राह काकुत्स्थो विधिदृष्टेन कर्मणा ॥ १८ ॥
साधु साध्विति देवास्तां अहल्यां समपूजयन् ।
तपोबल विशुद्धाङ्गीं गौतमस्य वशानुगाम् ॥ २० ॥
गौतमोऽपि महातेजा अहल्यासहितः सुखी ।
रामं संपूज्य विधिवत् तपस्तेपे महातपाः ॥ २१ ॥
( वा. रा. बा. ४९ )

' विश्वामित्र, राम व लक्ष्मण हे त्या आश्रमामध्ये प्रविष्ट झाले व त्यांनी त्या साध्वी अहल्येला तपाने तेजस्वी बनलेल्या स्थितीमध्ये अवलोकन केलें. या वेळे-पर्यंत ती कोणालाहि दिसत नव्हती, म्हणजे ती आश्रमाबाहेर गेलीच नव्हती. रामलक्ष्मणांनी तिचे पाय धरले. तिने गौतमाच्या वचनाचें स्मरण करून, त्या रामलक्ष्मणांचा आदरसत्कार केला. पाद्य, अर्घ्य व आतिथ्य तिने त्यांना दिलें, तें त्यांनी स्वीकारलें. तेव्हा सर्व देवांनी ' उत्तम झालें ' असें म्हटलें. ती तपानें शुद्ध झाली व गौतम ऋषीला मिळाली. ती प्राप्त झाल्यामुळे गौतम ऋषीस फार सुख झालें. त्यांनीही रामाचा आदरसत्कार केला व नंतर आपल्या तपश्चरणाला ते निघून गेले. '

या ठिकाणीं राम आले, त्या वेळीं अहल्या तप करीत होती व तपानें ती तेजःपुंज दिसत होती. आल्याबरोबर त्यांनी तिला पाहिली व वंदन केलें. लगेच तिने त्यांच्यासाठी पाणी व पूजासाहित्य अर्पिलें. हें सर्व तत्काळ झालेलें आहे. रामपादस्पर्शाने शिळेची अहल्या बनल्याचा वृत्तान्त येथे नाही.

वाल्मीकि–रामायणांतील वृत्तान्त हा सरळ घडला, तसा वृत्तांत असावा असें दिसतें. त्यांत अद्भुत गप्पांना फारसा थारा मिळाला असल्याचें दिसत नाही. यानंतर इन्द्राने देवांकडे जाऊन जें सांगितलें व आपलें कृत्य क्षमा करण्याजोगें अथवा वाखाणण्याजोगें आहे, असें जें सांगितलें, तेंहि पाहण्यासारखें आहे—

## ( इ ) सुरकार्य

अफलस्तु ततः शक्रो देवानग्निपुरोगमान् ।
अब्रवीत्त्रस्तनयनः सिद्धगंधर्वचारणान् ॥ १ ॥
कुर्वता तपसो विघ्नं गौतमस्य महात्मनः ।
क्रोधमुत्पाद्य हि मया सुरकार्यमिदं कृतम् ॥ २ ॥
अफलोऽस्मि कृतस्तेन क्रोधात्सा च निराकृता ।
शापमोक्षेण महता तपोऽस्यापहृतं मया ॥ ३ ॥
तन्मां सुरवराः सर्वे सर्षिसंघाः सचारणाः ।
सुरकार्यकरं यूयं सफलं कर्तुमर्हथ ॥ ४ ॥

( वा. रा. बा. ४९ )

' वृषण गळून पडल्यानंतर इन्द्र देवांना, सिद्ध–चारणांना व ( ऋषींना ) म्हणाला की, गौतम ऋषीच्या तपामध्ये मी विघ्न उत्पन्न करून फार मोठें देवकार्य केलें आहे. मी ऋषीला क्रोध येईल, असें केलें; त्याला क्रोध आला, त्यानें शाप दिला व शापामुळे त्याचें तप मी हरण केलें आहे. हें फार मोठें सुरकार्य मी केलें आहे. यासाठी सगळे देव, सगळे ऋषि व सर्व चारण यांनी या वेळीं मला सहाय्य केलें पाहिजे. '

महर्षींच्या धर्मपत्नीशीं केलेल्या व्यभिचाराचें असें हा इन्द्र समर्थन करीत आहे; पण पक्षभेदाचें राजकारण मानल्याशिवाय याचें समर्थ होईलसें वाटत नाही. पक्षाश्रित राजकारणामध्ये मात्र दुसऱ्या पक्षास पाडण्याकरता बरेंवाईट केलेलें कर्म समर्थनीय आहे, असें मानतात; पण त्यांत झालें तरी व्यभिचार क्षम्य मानला जाईल, हें शक्य वाटत नाही.

तथापि येथे इन्द्र आपल्या कृत्याचें समर्थन करीत आहे व देव, सिद्ध–चारण व ऋषि त्याच्या मदतीस धावत असलेले दिसत आहेत ! मानवाने तप करून सुरपद प्राप्त करून घेऊं नये व त्याचें तप कमी करण्यासाठी देवेन्द्राने व्यभिचारसुद्धा करावा व त्याचें समर्थन करावें, हा सर्व अगदी शोचनीय प्रकार आहे.

इन्द्राला याचें प्रायश्चित्त खूपच भोगावें लागलें. शरीरभर व्रण झाले, पुढे त्या

व्रणाचे डोळे बनेल! डोळे बनेल तरी तें कांही शोभेचें लक्षण झालें नाही. दोन डोळे जसे शोभिवंत दिसतात, तसे सर्वांगावर डोळेच डोळे झाले, तर ती एक आपत्तीच समजली जाईल. इन्द्रालाही यामुळे कांही सुख झालें असें वाटत नाही. यामुळे व्यभिचाराचें प्रायश्चित्त त्याला पुरेपूर मिळालें, असेंच म्हणणें योग्य दिसतें.

इन्द्र एवढा मोठा होता, तरीसुद्धा त्यालाही हा व्यभिचार असा भोवला, मग इतर माणसांची काय गति होईल, हा विचार येथे उत्पन्न होण्यासारखा आहे.

शस्त्रवैद्यांनी त्याला मेषवृषण बसवलें हें खरें; पण तें नांव त्याला जें मिळालें, तें अजूनपर्यंत चालत आलें आहे. ' अहल्याजार, सहस्रभग, मेषवृषण, सहस्रनेत्र, हीं इन्द्राचीं नांवें चालू आहेत. इन्द्रालाही क्षमा झालेली नाही. म्हणूनच सर्वांनी या पापकर्मापासून आपणांस बचावून सन्मार्गावरच आपलें पाऊल राहील, असें करावें, हा यांतील बोध आहे.

आता या गोष्टीचा अधिक शोध करण्यासाठी अहल्येच्या कथा ज्या अन्यत्र आलेल्या आहेत, त्याही पाहूं या—

## उत्तरकाण्डांतील अहल्येची कथा.

ब्रह्मदेव इन्द्राला म्हणतात की, ' " मी सर्व प्रजा उत्पन्न केल्या व एक स्त्री अत्यंत सुंदर निर्माण केली. हल म्हणजे कुरूपता; ही कुरूपता जेथे नाही, अशी ही स्त्री होती. यासाठी हिचें नांव **' अ-हल्या '** असें ठेवलें. अहल्या म्हणजे अत्यंत सुंदर रूपाने युक्त. ही अत्यंत सुंदर असल्यामुळे ही कोणाला द्यावी, असा विचार माझ्या मनांत उत्पन्न झाला. हे इन्द्रा! हिचें रूप पाहून तुलाहि असें वाटलें की, ही आपल्यालाच मिळावी." ( वा. रा. उ. ३०।१९–२५ )

ब्रह्मदेव पुढे म्हणाले की " हे इन्द्रा! पुढे तिला मी गौतमाच्या घरीं ठेव म्हणून ठेवली. जेव्हा ती वयांत आली, तेव्हा त्या ब्रह्मर्षींनी ती जशीच्या तशी मजकडे परत आणून दिली. सौंदर्याने त्यांचें मन चंचल झालें नाही. हा त्यांचा संयम पाहून हेच गौतम ऋषि या स्त्रीला योग्य पति आहेत, असें ठरवून त्यांना पत्नी म्हणून मी ही अहल्या दिली. तेव्हा सर्व देव निराश झाले; पण हे इंद्रा!

तुला मात्र फारच राग आला व कामाने व्याकुल होऊन, तूं तिच्याशीं वाईट व्यवहार केलास. हें गौतमाला समजलें व त्यांनीं तुला शाप दिला—

**तस्मात्त्वं समरे शक्र शत्रुहस्तं गमिष्यसि ॥ ३२ ॥**
**अयं तु भावो दुर्बुद्धे यस्त्वयेह प्रवर्तितः ।**
**मानुषेष्वपि लोकेषु भविष्यति न संशय ॥ ३३ ॥**
**तत्रार्धं तत्र यः कर्ता त्वय्यर्धं निपतिष्यति ।**
**न च ते स्थावरं स्थानं भविष्यति न संशयः ॥ ३४ ॥**
**यश्च यश्च सुरेन्द्रः स्यात् ध्रुवः स न भविष्यति ।**

( वा. रा. उ. ३० )

( १ ) या व्यभिचारामुळे इन्द्राचा पराभव होईल व तो शत्रूच्या हातीं सापडेल,
( २ ) जगांतील व्यभिचाराचें अर्धें पाप कर्त्याला व अर्धें राजाला ( इन्द्राला ) लागेल, व
( ३ ) राजपद ( इन्द्रपद ) एकाकडेच कायमचें टिकणार नाही.

एका राजाने– एका इन्द्राने– व्यभिचार केल्यामुळे त्याच्या राजपदाची अशी दुर्गति झाली. इन्द्राला असा शाप दिल्यानंतर गौतम ऋषि अहल्येकडे वळून तिला म्हणाले—

'हे अहल्ये ! या ठिकाणीं रूपहीन होऊन रहा.' हें ऐकल्यावर तिने गौतमाची अशी विनवणी केली–

**सा तं प्रसादयामास महर्षिं गौतमं तदा ॥ ३९ ॥**
**अज्ञानाद्धर्षिता विप्र त्वद्रूपेण दिवौकसा ।**
**न कामकाराद्विप्रर्षे प्रसादं कर्तुमर्हसि ॥ ४० ॥**

" ऋषे ! इन्द्र कपटवेषाने आला व त्याने मला फसविलें, यामुळे हें पाप मजकडून झालें. मी कांही हें जाणूनबुजून केलेलें नाही, तेव्हा याची मला क्षमा करा. "

हें अहल्येचें भाषण ऐकून, गौतमाला तें खरें वाटलें व त्याने "राम येईल तेव्हा त्याचें आदरातिथ्य करून तूं पवित्र होशील," असा उच्छाप दिला.

एकाच रामायणामध्ये अशा दोन प्रकारच्या कथा आहेत. लेखक दुसरी हीं

कथा लिहीत असतां तो पहिली कथा अजिबात विसरून गेला होता, असें दिसतें अथवा हा लेखक कोणी दुसरा असावा. एकानेच या दोनही कथा लिहिलेल्या नाहीत, हें उघड दिसत आहे.

पहिल्या कथेंत अहल्येची कबुलीच अशी आहे की, "हें कृत्य तिने इन्द्राला ओळखून जाणूनबुजून केलें, तिला त्या इन्द्राच्या पापकृत्यापासून आनंद झाला व ती इन्द्राला आश्रमांतून लवकर निघून जाऊन आपणांस व स्वतःस वाचव असें सांगत आहे." तर दुसऱ्या कथेंत ती "हें पाप न कळत झाल्याचें सांगत आहे." म्हणून या दोनही कथा एका लेखकाच्या नव्हेत. विशेषतः पहिल्या कथेंत जो स्वाभाविक कथाभाग घडल्यासारखा दिसतो, तसा तो दुसरींमध्ये दिसत नाही. यासाठी ही दुसरी कथा प्रक्षिप्त असावी, असें म्हणणें प्राप्त होतें.

तथापि (१) व्यभिचारी राजाचा पराभव होतो व तो शत्रूच्या हातीं सापडतो; (२) व्यभिचारी राजाचें राज्यपद शाश्वत टिकत नाही. त्याला पदच्युत व्हावें लागतें; (३) राष्ट्रांतील व्यभिचाराबद्दल राजा जबाबदार असतो, हे या कथेंतील शापांत आलेले उल्लेख निःसंशय विचार करण्यासारखे आहेत.

## गणेशपुराणोक्त अहल्येची कथा.

नारद अमरावतीस गेला व इन्द्राला भेटला. तेव्हा इन्द्राने त्यास त्रिभुवनामध्ये अद्भुत असें कांही असेल तर सांग, असें म्हटलें. तेव्हा नारद म्हणाला की, 'पृथ्वीवर गौतम ऋषींच्या आश्रमामध्ये त्यांची धर्मपत्नी अहल्या आहे, ती सर्व जगांत अत्यंत सुंदर आहे. तिचें रूप पाहून माझें मनही मोहित झालें, म्हणून मी अमरावतीस आलों.' हें नारदाचें भाषण ऐकून इन्द्र तिच्याविषयी आतुर झाला व गौतमाचें रूप घेऊन तो त्यांच्या आश्रमांत गेला. ते स्नान करण्यासाठी नदीवर गेले होते व स्नानानंतर जपजाप्य उरकून ते परत येणार होते. इतका वेळ मोकळा मिळणार, हें जाणून इन्द्र गौतमरूप घेऊन अहल्येकडे गेला व एकान्त मागूं लागला.

अहल्येने ओळखलें नाही व तो गौतमच आहे, असें समजून ती त्यास म्हणाली, 'अवेळीं हें असें काय बोलतां?'

त्यावर गौतमाचें सोंग घेतलेल्या इन्द्रानें उत्तर दिलें की ' मी नदीवर स्नानासाठी गेलों असतां तेथें नग्न स्नान करीत असलेल्या अप्सरा पाहिल्या. यामुळे स्नानसंध्या–जपजाप्य मजकडून होईना. यासाठी मी लवकर इकडे आलों. तूं जर अनुमति देणार नाहीस, तर मी संन्यास घेईन. '

हें त्या तोतया गौतमाचें भाषण अहल्येस खरें वाटलें व ती त्याच्या म्हणण्या-प्रमाणे वागण्यास पतिशुश्रूषाबुद्धीनें तयार झाली.

प्रथम अहल्येस संशय आला नाहीं; पण इन्द्र अगदी जवळ आला, तेव्हा तिला त्याचा संशय आला–

**आकृत्या गौतमस्यैवं चिक्रीडे जम्भहा तया ।**
**दिव्यगन्धानुपाघ्राय चकिता शंकिता भृशम् ॥ २२ ॥**
**तर्कयामास मनसि किमयं कूटरूपवान् ॥ २३ ॥**

( गणेश० १।३० )

' त्याच्या अंगाला अत्तरें लागलेली होतीं, त्यांचा सुवास येतांच हा कोणीतरी कपटी तोतया आहे, अशी तिला जाणीव होतांच ती व्याकुळ झाली व ती रागानें त्याला म्हणाली–

**पप्रच्छ तं शठं कोपात् कोऽसि त्वं कूटरूपधृक् ॥ २५ ॥**
**विश्वस्ता स्वामिरूपेण वद नोचेच्छपामि ते ॥ २६ ॥**

(गणेश० १।३०)

' तूं तोतया कोण आहेस तें सांग. तुजवर विश्वास ठेवल्यामुळे मी फसलें आहें. आता तूं खरें न सांगशील तर शाप देऊन भस्म करीन. ' इतक्या थरास ही गोष्ट गेली, हें पहातांच इन्द्रानें आपलें खरें रूप प्रकट केलें व ' मी इन्द्र देवराज आहें. तुझ्या सुंदर रूपाला भाळून मी या कपटरूपानें तुझ्याकडे आलों, ' असें तिला तो म्हणाला.

या भाषणानें अहल्येचा क्रोध वाढला व ती अग्निज्वाला मुखांतून फेकीत आहे कीं काय, अशा तऱ्हेनें त्याची निर्भर्त्सना करीत त्यास पुष्कळच टाकून बोलली. हें भाषण चाललें आहे, इतक्यांत गौतम मुनि नदीवरून स्नानसंध्या, जपजाप्य

करून आश्रमांत आले व अहल्येस हाक मारून ' पाय धुवावयास पाणी दे,' असें म्हणाले.

'हे स्त्रिये ! नेहमीप्रमाणे तूं का बरें आसन वगैरे आणीत नाहीस?' असें गौतम ऋषि म्हणाले, तेव्हा थोड्या वेळाने कापत असलेली, खिन्न झालेली, अश्रूंनी नेत्र भरलेली अशी ती अहल्या गौतमाजवळ आली, त्यांच्या चरणांवर तिने आपलें मस्तक ठेवलें व रडूं लागली. तिने झाला तसा वृत्तान्त त्यांस निवेदन केला व शेवटीं ती म्हणाली की, ' हा वृत्तान्त घडत आहे, इतक्यांत मी तुमचा शब्द ऐकला? पण या झालेल्या प्रकारामुळे मला जी खिन्नता आली, त्यामुळे तुमच्यापुढे येऊं शकलें नाहीं, त्याची क्षमा करा. '

**लज्जयाऽनागता शीघ्रं अपराधं क्षमस्व मे ॥ १० ॥**
**स्वयं निवेदनेऽदोषो दोषोऽपरनिवेदने ।**
**मन्त्रायुर्गृहरन्ध्रश्रीरतयश्चौषधानि च ॥ ११ ॥**
**मानापमानदानानि प्रकटानि न कारयेत् ॥ १२ ॥**

( गणेश० १।३१ )

'आपला अपराध सांगण्यांत दोष नाही, तो दुसऱ्याने सांगण्यांत दोष आहे. मंत्र, आयु, गृहाच्छिद्र, धन, रति, औषध, मान, अपमान व दान हीं प्रकट करूं नयेत.' हें ऐकतांच गौतम ऋषीस राग आला व त्यांनी तत्काल तिला शाप दिला—

**शशाप वनितां स्वीयां दुःशीलां त्वं शिला भव ।**
**नाज्ञासीर्मे स्वरूपं तं स्वभावं चेष्टितानि च ॥ १३ ॥**

( गणेश० १।३१ )

' ज्या अर्थीं माझें रूप वगैरे तुला ओळखतां आलें नाही व तूं परपुरुषाशीं संग केलास, त्या अर्थीं तूं शिला हो.' येथे गौतमाच्या म्हणण्याचा आशय असा की, कितीहि कपटवेषाने परपुरुष आला, तरी त्याला स्त्रीने ओळखलाच पाहिजे व हा परका व हा आपला, हें जाणलेंच पाहिजे. बावळटपणा संसारांत उपयोगाचा नाही. पुरुष घरीं नसला, तरी स्त्रियांनी आत्मरक्षण करण्याचें धैर्य दाखवलेंच पाहिजे. अहल्या योग्य वेळीं आत्मरक्षण करूं शकली नाही, बावळटपणाने फसली, म्हणून तिला शाप दिला. राम येईपर्यंत शिला होऊन पड, असा शाप अहल्येला

झाल्याचा वृत्तान्त येथें आहे.

इकडे इन्द्रही तेथें होताच. तोही हें सर्व पहातच होता. त्याला गौतमानें पाहिलें व त्यालाही शापिलें–

**शपामि त्वां शचीभर्तः सहस्रभगवान् भव ॥ २१ ॥**

( गणेश० १।३१ )

' हे इन्द्रा ! शचीपते ! तुझ्या अंगावर हजारो व्रण होवोत, ' असा शाप इन्द्राला दिला; इतक्यांत त्याच्या अंगावर हजारो व्रण झाले व त्यांतून पू वाहूं लागला ! ही आपल्या शरिराची अवस्था पाहून, त्याला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला व तो रडत व विव्हळत कमळांच्या वनांत जाऊन दडून बसला.

सर्व देवांना हा वृत्तांत समजतांच ते फार चिन्ता करूं लागले व गौतम ऋषींकडे जाऊन इन्द्राविषयी रदबदली करूं लागले. तें ऐकून गौतम म्हणाले–

**नामापि तस्य न ग्राह्यं पतितस्य कृतागसः ॥ २७ ॥**
**कपटस्य शठस्यापि दुष्टस्याप्यविवेकिनः ।**
**अनुतापविहीनस्य निष्कृतिर्नैव विद्यते ॥ २८ ॥** (गणेश० १।३१)

' देव हो ! त्या पतित, कपटी, शठ, दुष्ट, पापी, अविवेकी इन्द्राचें नांवसुद्धा येथें घेऊं नका. ज्याला पश्चात्ताप झालेला नाहीं, त्याचें पाप दूर होणें शक्य नाहीं.'

पुढे देवांनी पुष्कळ विनंती केली, तेव्हा त्यांनी त्यांस एक गजाननाचा षडक्षरी मन्त्र सांगितला व याचा जप केला असतां इन्द्राचा दिव्य देह होईल, असें ते म्हणाले.

ते देव इन्द्र होता तेथें गेले. या वेळीं इन्द्राचा देह फारच कुजलेला असून त्यांतून पू वहात आहे, असा त्यांस दिसला. सर्व देवांनी वस्त्रांनी आपलीं नाकें दाबून इन्द्राचें दर्शन घेतलें व त्यास हा मंत्र सांगितला. तो जपतांच त्याचा देह निर्दोष झाला व प्रत्येक व्रणांच्या ठिकाणीं हजारो नेत्र उत्पन्न झालें.

## कथेचा विचार.

या कथेमध्ये इन्द्र हा मुद्दाम व्यभिचार करण्याच्या इच्छेने आला, असें लिहलें आहे. अहल्येने त्यास प्रथम ओळखलें नाही. पण त्याच्या शरिरावरील अत्तराच्या

वासाने तिने हा कोणी परका पुरुष आहे, असें जाणलें. यावरून गौतमाच्या पर्ण-कुटीमध्ये फार प्रकाश नसावा, असें स्पष्ट दिसतें. साधारण अंधुक प्रकाश असला तरच असें घडणें शक्य आहे. उत्तम प्रकाश असता, तर बायकोने नवऱ्यास ओळखलेंच असतें.

इन्द्र असतांही त्यास स्थानभ्रष्ट व्हावें लागलें, शरिरांतून पू वाहण्यापर्यंत पाळी आली, सर्व प्रकारें विटंबना झाली. व्यभिचाराचा हा भयंकर परिणाम होतो, हें पाहून कोणीहि व्यभिचार करूं नये, हा बोध येथे घेण्यासारखा आहे.

## ब्रह्मपुराणांतील अहल्येची कथा.

' ब्रह्मदेवाने एक सुंदर कन्या निर्माण केली. तिचें पोषण कोणी करावें, या संबंधाने ब्रह्मदेवाने विचार केला. गौतम ऋषीच यासाठी योग्य आहे, असें त्यास आढळून आलें व त्या कन्येस ब्रह्मदेवाने गौतम ऋषीकडे ठेवलें. जेव्हा ही कन्या उपवर झाली, तेव्हा अलंकार वगैरे घालून त्या ऋषीने ती सुंदर कन्या पुनः ब्रह्मदेवाकडे पोचती केली. तिचा अभिलाष त्याने धरला नाही. गौतम ऋषींचा हा संयम व ही कर्तव्यनिष्ठा पाहून, ब्रह्मदेवासहि विस्मय वाटला !' (ब्रह्म० २।१६।१-१२ )

' पुढे विवाहाचा प्रश्न निघाला. तेव्हा पृथ्वीप्रदक्षिणा करून लवकर येईल त्यास ही कन्या देऊं, असें ब्रह्मदेवाने ठरवलें. तें ऐकून अनेक देव पृथ्वीप्रदक्षिणा करण्यासाठी निघाले. इकडे गौतम ऋषींनी अर्धप्रसूत गाईला प्रदक्षिणा केली व ही गाय वसुधाच असल्यामुळे आपण पृथ्वीप्रदक्षिणा केली आहे, असें म्हणून, आता पुढे आपली प्रतिज्ञा पूर्ण करा, असें ते ब्रह्मदेवास म्हणाले, तेव्हा कशी प्रदक्षिणा केली तें जाणून, ब्रह्मदेव म्हणाले की, तुम्ही योग्य रीतीने पृथ्वीप्रदक्षिणा केली आहे, तेव्हा तुम्हांसच अहल्या देणें योग्य आहे. असें ठरवून गौतमाशीं अहल्येचें लग्न ब्रह्मदेवाने लावलें. नंतर हळूहळू देवहि पृथ्वीप्रदक्षिणा करून आले; पण ते येण्याच्यापूर्वीच गौतम व अहल्या यांचा विवाह झालेला होता. यामुळे ते सर्व देव खिन्न होऊन आपल्या घरी गेले; पण इन्द्राला मात्र गौतम ऋषीविषयी फारच मत्सर वाटूं लागला. ( ब्रह्म० २।१६।१३-३२ )

'ब्रह्मगिरीवर गौतम ऋषींनीं आपला आश्रम थाटला व तेथें ते अहल्येसह राहूं लागले. इकडे इन्द्राच्या मनांत या ऋषीसंबंधाने फार मत्सर होता व अहल्येवर त्याची पापबुद्धीही होतीच. एक वेळ इन्द्र अहल्येस पाहण्याच्या इच्छेने ब्रह्मगिरीवर गौतमाश्रमाजवळ आला व तेथील वैभव पाहून, त्यास फारच वैषम्य वाटलें. तो इतका कामान्ध झाला की, आपण कोठे आहों, काय करीत आहों व याचा परिणाम काय होईल, याची काळजी मुळीच न करतां तो तेथेच गुप्तरूपाने राहूं लागला व रात्रंदिवस अहल्येचें चिंतन करूं लागला.' (ब्रह्म० २।१६।२३–३८).

'एकदा गौतम ऋषि सकाळचें आह्निक संपवून आपल्या कांहीं शिष्यांसह कांहीं निरीक्षण करण्यासाठी आपल्या आश्रमांतून बाहेर पडले. ही संधि बरी आहे, असें समजून गौतमाच्या रूपाने इन्द्र आश्रमांत शिरला व एकदम अहल्येकडे गेला. अहल्येशीं सलगीचें भाषण करूं लागला व अगदी गौतमाप्रमाणे तिच्याशीं व्यवहारहि करूं लागला. तिच्या हातांत हात घालून तो अन्तःपुरांतही पोचला. तो इतका उत्तम रीतीने तिच्याशीं वागला की, तिला कांहीच संशय आला नाहीं व तिने त्याच्याशीं पतीशीं करावयाच्या वर्तनाप्रमाणे सर्व वर्तन केलें. आश्रमामध्ये इन्द्र याप्रमाणे गौतम गेल्यावर वारंवार येऊं लागला व अहल्येशीं संबंधहि करूं लागला. आश्रमांतील लोकांस अशा रीतीने अवेळीं गौतम ऋषि परत कां येत आहेत, याबद्दल फारच आश्चर्य वाटलें; पण बोलणार कोण व कां? (ब्रह्म० २।१६।३९–४५).

'एका गौतमाचे दोन गौतम कसे दिसतात, याबद्दल त्या आश्रमामध्ये लोक वारंवार चर्चा करूं लागले—

**तामदृष्ट्वा महाप्राज्ञो मेने तन्महदद्भुतम् ।**
**द्वारास्थितं मुनिश्रेष्ठं सर्वे पश्यन्ति नारद ॥ ४६ ॥**
**अग्निहोत्रस्य शालायां रक्षिणो गृहकर्मिणः ।**
**ऊचुर्मुनिवरं भीता गौतमं विस्मयान्विताः ॥ ४७ ॥**

रक्षिण ऊचुः—

**भगवान्किमिदं चित्रं बहिरन्तश्च दृश्यसे ।**
**प्रिययाऽन्तः प्रविष्टोऽसि तथैव च बहिर्भवान् ॥ ४८ ॥**
**अहो तपःप्रभावोऽयं नानारूपधरो भवान् ।**

ब्रह्मोवाच—

**तच्छुत्वा विस्मितस्त्वन्तः प्रविष्टः को नु तिष्ठति ।**
**प्रिये अहल्ये भवति किं मां न प्रतिभाषसे ॥** ( ब्रह्म० २।१६ )

'एक वेळ गौतम ऋषि बाहेरून लवकर घरीं आले, त्या वेळीं जार इन्द्राबरोबर अहल्या आंत होती. यामुळे पाय धुण्यास पाणी वगैरे देण्यासाठी ती बाहेर येऊं शकली नाही. या वेळीं अन्तःपुरांत एक गौतम व दारांत दुसरा गौतम, असे दोन गौतम ऋषि पाहून गौतमाश्रमांतील कार्यकर्त्यांस व शिष्यांस फारच आश्चर्य वाटलें. ते गौतमाच्या योगसामर्थ्याचा हा चमत्कार आहे, असें म्हणूं लागले. कित्येकांनी गौतमाजवळ जाऊन, ' काय हो, तुमच्या तपाचा चमत्कार आहे ! तुम्ही एकाच वेळीं घरांत आहां व त्याच वेळीं बाहेरहि आहां ' असें म्हटलें. तें ऐकतांच गौतम संशयग्रस्त होऊन आंत गेले व 'हें काय आहे?' असें त्यांनी अहल्येस विचारलें. तेव्हा अहल्येसहि खरा गौतम कोण व खोटा कोण, याविषयी संशय उत्पन्न झाला व ती त्या तोतया गौतमास म्हणाली—

अहल्या— मुनिवेषाने येणारा हा गौतम कोण आहे बरें? अरे तूं कोण आहेस, जो येथे वेषान्तराने येऊन, असें पापकर्म करीत आहेस ?

असें म्हणत ती उठली व इन्द्रही पळून जाऊं लागला. गौतमाने दरडावले तेव्हा तो हात जोडून त्यास म्हणाला—

इन्द्र— हे ऋषे ! मी इन्द्र आहें. मींच देवांचा राजा आहें. मींच हें पाप केलें आहे. कामबाणांनी विह्वल झाल्यामुळे मजकडून हें पाप घडलें. मी दुष्ट आहें, हें तर खरेंच; पण आपल्यासारख्या थोर सात्त्विक ऋषींचा शान्त स्वभाव असल्यामुळे आपण कधीहि कठोरता धारण करणार नाही. करिता मज दीनाला क्षमा करावी.

गौतम— ज्या अर्थी तूं भगावर आसक्त होऊन हें पाप केलेस, त्या अर्थी तुझ्या अंगावर हजारो भगें होवोत. ( अहल्येकडे वळून ते म्हणाले ) हे अहल्ये ! तूं शुष्क नदी हो.

हा शाप ऐकून अहल्या म्हणाली— हे ऋषि ! मी मनाने मुळीच पाप केलेलें नाही. अगदी तुमच्यासारखें रूप घेऊन हा आला, म्हणून मी फसल्यें. अशा

स्थितींत मी काय बरें करावें ?

आश्रमांतील लोकांनीहि सांगितलें की, ' अगदी हुबेहुब तुमच्यासारखें रूप घेऊन हा इन्द्र येथे येत असे. आम्ही सर्वच फसत होतों, तेव्हा अहल्या फसली तर त्यांत कांही आश्चर्य नाही. '

हें ऐकून गौतमाने विचार करून जाणलें की, यांत अहल्येचा दोष नाही. तिने जाणून कांही हें पाप केलेलें नाही; तेव्हा त्यांनी त्या शापाचा अन्त करण्यासाठी असें म्हटलें की ' जेव्हा गौतमी नदी तुला येऊन मिळेल, तेव्हा तूं पुनः पूर्वरूपाला प्राप्त होशील.'

इकडे इन्द्राने पुष्कळ कळवळ्याने गौतमाची प्रार्थना केली, तेव्हा त्यास गौतम ऋषि म्हणाले– ' या अहल्यासंगमामध्ये स्नान कर, म्हणजे तत्काल या पापापासून मुक्त होशील व तुझ्या अंगावर भगांच्या जागीं सहस्र डोळे होतील. '

याप्रमाणे घडलें. ( ब्रह्म. २।१६।४६–७१ )

या ठिकाणीं अद्भुतरसाची वाढ झालेली दिसत आहे. अहल्या शुष्क नदी बनणें, पुढे तिची अहल्या होणें व इन्द्राची शुद्धताहि तीर्थस्नानाने होणें, हे सर्व अद्भुत–रसाच्या वाढीचे प्रकार आहेत. गणेशपुराणांत गणेशाच्या षडक्षरी मंत्राने जें झालें, तें येथे तीर्थस्नानाने झालें आहे.

रामायणांतील कथेमध्ये जी कांही वास्तविकता दिसत आहे, ती या पुढील कथांत राहिलेली नाही.

## पद्मपुराणांतील अहल्येची कथा.

' ब्रह्मदेवाने आपली मानसकन्या लोकपालांपैकी एखाद्या लोकपालाला न देतां ती गौतम ऋषीला दिली. यामुळे इन्द्राला फारच वाईट वाटलें. इन्द्राच्या हृदयांत हें शल्यासारखें टोचूं लागलें.' ( पद्म० सृ० ५५।१–९ )

एकदा गौतम ऋषि स्नानाला पुष्करतीर्थावर गेले असतां व अहल्या गृहकृत्यांमध्ये गुंतली असतां, इन्द्राने गौतमाचें रूप घेऊन ऋषीच्या आश्रमामध्ये प्रवेश केला व तो अहल्येस म्हणाला की, ' हे अहल्ये ! मला चुंबनादिक दे. ' हें ऐकून लाजलेली अहल्या म्हणाली– 'ही वेळ देवपूजा व ध्यानधारणा करण्याची असतांना असें काय बरें अभद्र बोलायचें होत आहे ? '

हें ऐकून गौतमरूपी इन्द्र तिला म्हणाला– ' हे पतिव्रते ! तूं आता अधिक बोलूं नकोस, देवकार्य आता एका बाजूस ठेव व मी म्हणत आहें, तेंच कर. पति सांगत असलेलें जी स्त्री करीत नाही, ती अधोगतीस जाते. यासाठी दुसरें कांही या वेळीं मनांत आणूं नकोस.'

याप्रमाणे बोलणें चाललें असतां अहल्या त्या इन्द्रासच आपला पति आहे, असें मानून त्याला अनुमोदन देती झाली. इकडे गौतम ऋषि स्नान करून ध्यान लावून बसले असतां, त्यांस ध्यानस्थितीमध्ये इन्द्राने घरीं काय चालवलें होतें, तें सर्व दिसलें. तें पाहतांच ध्यान संपवून गौतम ऋषि एकदम घरीं आले व येतांच घरामध्ये इन्द्राला त्यांनी पाहिलें व त्यास त्यांनी शाप दिला—

**यत्त्वया चेदृशं कर्म भगार्थं छलसाहसम् ।**
**कृतं तस्मात्तवाङ्गेषु सहस्रभगमुत्तमम् ॥ २९ ॥**
**भवत्विह तु पापिष्ट लिङ्गं ते निपतिष्यति ।**

( पद्म० सृ० ५५।१०–३० )

" हे इन्द्रा ! ज्या अर्थी भगाच्या लालसेने तूं हें पापकृत्य केलें आहेस, त्या अर्थीं तुझ्या अंगावर हजारो भगें होतील व तुझें शिस्न गळून पडेल. " असा इन्द्रास शाप देऊन त्यांनी अहल्येकडे वळून तिलाही शाप दिला– " हे अहल्ये, तूं परपुरुषाशीं संगत झालीस, हें मोठें पाप केलें आहेस. यासाठी तुझें शरीर अस्थिचर्म म्हणजे अगदी शुष्क होईल. मांस व नखेंही राहणार नाहीत. '

तिने त्यांची क्षमा मागितली, अजाणतां असें घडलें, असें सांगितलें, तेव्हा ते म्हणाले की– " जेव्हा दाशरथी राम येथे येतील, तेव्हा वसिष्ठाच्या पुढे हसत राम हें वाळकें प्रेत कसलें हो आहे, असें विचारील. त्यांना वसिष्ठ घडलेला वृत्तान्त सांगतील, तो ऐकून राम म्हणतील की, यांत हिचा कांहीच दोष नाही, सर्व दोष इन्द्राचा आहे. तेव्हा ही शापापासून मुक्त झालीच पाहिजे. असें रामांनी म्हणतांच तूं मुक्त होशील व माझ्या घरीं येशील." (पद्म० पु० सृ० ५५।३१–४३)

इकडे इन्द्राने पाण्यांत राहून देवीची उपासना केली. देवी प्रसन्न झाली व तिने इन्द्राच्या शरिरावरील भगांचे डोळे केले व त्याला मेषाण्ड बसवलें जाईल असें तिने म्हटलें. त्याप्रमाणे सर्व घडलें. ( पद्म० सृ० ५५।४४–५१ )

यांत पूर्वीच्या कथेपेक्षाही अद्भुत रस वाढवलेला दिसत आहे. यांत कवीनें देवीच्या कृपेनें इन्द्राला मेषवृषण बसवल्याचें जें लिहिलें आहे, तें फारसें समंजसपणाचें दिसत नाही. देवाकडून हें शस्त्रकर्म करवण्यापेक्षा दुसऱ्या कोणा पुरुषदेवाकडून करविलें असतें, तर बरें झालें असतें.

## स्कंदपुराणांतील अहल्येची कथा.

अहल्येला इन्द्राशीं पापसंबंध केल्याबद्दल गौतमानें शाप दिला. त्यामुळे तिला फार दुःख झालें व त्या गौतमालाहि आपल्या पत्नीकडून असें पातक घडलें यामुळे फारच खिन्नता वाटली; म्हणून गौतमानें कोटीतीर्थावर बसून अहल्येच्या उद्धारासाठीं तप केलें. या तपाच्या योगानें अहल्या पवित्र होऊन त्याला पुनः प्राप्त झाली. त्या साध्वी अहल्येनें येथेंच एक सरोवर तयार केलें, त्यास अहल्यातीर्थ असें म्हणतात.

या ठिकाणीं गौतम आपल्या पत्नीच्या दोषाबद्दल स्वतः तप करीत आहे व तिची अन्तःकरणशुद्धि व्हावी, म्हणून स्वतः प्रार्थना करीत आहे, ही महत्त्वाची गोष्ट आहे. स्त्रीच्या वर्तनाबद्दल पुरुष जबाबदार आहे. ही जबाबदारी पुरुषांनी ओळखली पाहिजे. स्त्री बिघडण्यास पुष्कळच वेळा पुरुष कारणीभूत होत असतात. पुरुष जर रात्रंदिवस तपच करीत राहिला, तर अशा वेळीं स्त्रीचें पाऊल वाकडें पडण्याचा पुष्कळच संभव असतो. आपल्या वर्तनाचा परिणाम आपल्या स्त्रीवर काय होत आहे, तें अवश्य पाहिलें पाहिजे. हें पुरुषाचें कर्तव्य आहे. स्त्रीलाही आपल्या सारखेच मनोविकार आहेत व उभयतांच्या संमतीनेंच संसाराचा रथ चालविला पाहिजे; या दृष्टीनें येथें आपल्या स्त्रीच्या पापकृत्याच्या निराकरणार्थ गौतम ऋषि स्वतः प्रायश्चित्त करीत आहेत. यांतून पुष्कळच बोध संसारी मानवास मिळण्यासारखा आहे.

## अध्यात्मरामायणांतील अहल्याकथा.

गौतम ऋषींनी श्रीहरीची उपासना केली. त्या गौतमाला ब्रह्मदेवानें आपली मानसकन्या अहल्या दिली. गौतम व अहल्या सुखानें एकत्र राहूं लागलीं. पुढें इन्द्रानें अहल्येवर डोळा ठेवला व एकदा गौतम घरीं नाहीं, असें पाहून तो

गौतमाचें रूप घेऊन, आश्रमांत शिरला व त्यानें अहल्येशीं पापकर्म केलें.

इतक्यांत गौतम ऋषि आले व जात असलेल्या इन्द्रास त्यांनीं पाहिलें व ' तूं कोण आहेस व माझें रूप घेऊन तूं मी नसतांना कां येथें आलास ? ' असें विचारलें. मुनि रागावले, असें पाहून इन्द्रानें आपला अपराध कबूल केला व क्षमा मागितली.

गौतमानें तें ऐकून इन्द्रास शाप दिला कीं, ' ज्या अर्थी तूं योनिलंपट होऊन हें कुकर्म केलें आहेस, त्या अर्थी तुझ्या अंगावर हजारो भगें होवोत.' याप्रमाणे झालें

इकडे आश्रमांत येऊन त्यांनीं कांपत असलेल्या अहल्येस पाहिलें व तिलाही शाप दिला, तो असा- ' हे दुष्ट स्त्रिये ! तूं या आश्रमांतील या शिलेवर बैस ( **शिलायां तिष्ठ** ), येथून हालूं नकोस. निराहारव्रतानें राहून तप कर. वृष्टि, वारा, पाऊस यांना सहन कर व परमेश्वराचें ध्यान कर.

**दुष्टे त्वं तिष्ठ दुर्वृत्ते शिलायामाश्रमे मम ।**
**निराहारा दिवारात्रं तपः परममास्थिता ॥**
**आतपानिलवर्षादि सहिष्णुः परमेश्वरम् ।**
**ध्यायन्ती राममेकाग्रमनसा हृदि संस्थितम् ॥**

(अ० राम० बा० स० ५)

" जेव्हां श्रीरामचन्द्र येथें येतील व तूं बसलेल्या शिलेला पायांनीं स्पर्श करतील, तेव्हां पवित्र होशील. ते येतील, तेव्हां त्यांचें आदरातिथ्य करून भक्ति कर. असें केलेस म्हणजे मला पुनः प्राप्त होशील. "

रामपादरजःस्पर्शाची प्रतीक्षा करीत ती त्याच आश्रमामध्यें राहिली. विश्वामित्रमुनींनीं आश्रमांत श्रीरामचन्द्राला नेऊन तप करीत असलेल्या अहल्येला दाखविलें. श्रीरामाच्या पायांचा त्या शिळेला स्पर्श होतांच त्या तपोधन अहल्येला त्यांनीं पाहिलें. रामानें अहल्येला वंदन करून, तिच्याशीं आदरयुक्त भाषण केलें. नंतर तिनें अर्घ्यपाद्य देऊन, त्यांची पूजा केली.

याप्रमाणें अध्यात्मरामायणामध्यें अहल्या ही आश्रमांतील एका शिलेवरच उन्हातान्हांत व पावसांत तप करीत बसली होती, असा वृत्तान्त आहे. याचाच अर्थ शिलेमध्यें गुप्त स्थितींत राहिली होती, असा मानण्यांत येत आहे.

*

# आनन्दरामायणसारामध्ये आलेली अहल्येची कथा.

गमनावसरे मार्गे भर्तृशप्तां शिलां मुनिः ॥१६॥
मुनिरूपमहेन्द्रेण भुक्तां रहसि शोभनाम् ।
गौतमस्याङ्गनां नाम्ना ह्यहल्यां कथयत्तयोः ॥१७॥
ब्रह्मणा निर्मिताहल्या द्विमुखी गोः परिक्रमात् ।
दत्ता पुरा गौतमाय विसृज्येन्द्रादिकान्सुरान् ॥१८॥
तत्स्मरन् मघवा वैरं तां भुक्त्वा मुनिशापतः ।
सहस्रभगवान् जातः सहस्रलोचनस्ततः ॥१९॥
श्रीरामचन्द्रो निजपादपद्मस्पर्शेन तां गौतमधर्मपत्नीम् ।
निष्कल्मषामद्भुतरूपयुक्तां चकार देवः करुणासमुद्रः ॥२०॥
नदीरूपा जनस्थानेऽहल्या गौतमशापतः ।
रामेण भ्रमतारण्ये स्वांघ्रिस्पर्शा समुद्धृता ॥२१॥
कल्पभेदाद्वदन्तीत्थं मुनयश्चापि केचन ।
नैव शापोऽस्ति सर्वेषु कल्पेषु सत्कथा तथा ॥२२॥
ततस्तौ सुरगन्धर्ववर्षितौ पुष्पवृष्टिभिः ।
दत्त्वाऽहल्यां गौतमाय जग्मतुर्जाह्नवीं प्रति ॥२३॥
रामं नौकां कांक्षमाणं नौकापो वाक्यमब्रवीत् ।

नाविक उवाच—

आदावहं क्षालयित्वा पादरेणूंस्तव प्रभो ॥२४॥
पश्चान्नौकां स्पर्शयामि तव पादौ रघूद्वह ।
नौचेत्त्वत्पादरजसा स्पृष्टा नारी भविष्यति ॥२५॥
अस्ति मे गृहिणी गेहे किं करोम्यपरां स्त्रियम् ॥२७॥

(आनंदरामायणसार ३, सर्ग)

" इन्द्राने गौतम मुनीचा वेष घेऊन अहल्येशीं जारकर्म केलें. तेव्हा गौतमाने तिला ' शिला हो ' असा शाप दिला. त्यामुळे येथे ती शिला होऊन पडली

आहे. ही अहल्या ब्रह्मदेवाची मानस पुत्री होय. गौतमानें द्विमुखी गाईची प्रदक्षिणा केल्यामुळे ब्रह्मदेवानें ती गौतमाला दिली. इतर देवांना यामुळे ती मिळूं शकली नाही. यामुळे इन्द्रानें मनामध्ये द्वेष धरला व कपटानें गौतमाचा वेष घेऊन, तिच्याशीं त्यानें जारकर्म केलें. हें समजतांच गौतमानें त्याला शापून सहस्र भगयुक्त केलें. पुढे त्या भगांचेच हजारो नेत्र त्याच्या अंगावर झाले.

इकडे रामाच्या चरणस्पर्शामुळे शुष्क नदी– शिला झालेली अहल्या– पुनः स्त्रीरूप झाली."

"निरनिराळ्या कल्पांमध्ये असे निरनिराळे शाप झाले असून, या कथाही निरानिराळ्या बनल्या आहेत; म्हणून यांमध्ये अशी भिन्नता आढळते. रामपाद-स्पर्शानें शिलेची अहल्या झाली व पुनः गौतम ऋषीला मिळाली. पुढे जेव्हा राम गंगेवर पोंचले, तेव्हा तेथील नावाडी रामाला म्हणाला कीं, ' आधी ' मी तुमचे पाय नीट धुतों व मग तुम्ही माझ्या नौकेंत बसा. तुमच्या पायांच्या धूळीनें शिलेची स्त्री होते, तशी या नौकेची जर स्त्री झाली, तर मज गरिबाचें कसें होईल ? मला घरीं एक पत्नी आहे. ही दुसरी झाली, तर माझा धंदाही बसेल व घरीं दोन स्त्रिया पोसाव्या लागतील ! "

## अहल्येच्या कथेचें विश्लेषण

| ग्रंथाचें नांव | अहल्येनें पाप कसें केलें | अहल्येला शाप | इन्द्राला शाप |
|---|---|---|---|
| १. वाल्मीकि रामायण बालकाण्ड. | अहल्येला हा परपुरुष आहे, हें समजलें असून तिनें जाणून-बुजून हें पाप केलें. | तप कर, उपवास कर, प्राणायाम कर, कोणा-च्या दृष्टीस पडूं नको. ऐषआराम करूं नको. | अण्ड गळून पडतील. |
| २. लिंगपुराण. | | | इन्द्राचें वृषण गौ-तम ऋषीनें उप-टून फेकून दिलें. |

| ग्रंथाचें नांव | अहल्येने पाप कसें केलें | अहल्येला शाप | इन्द्राला शाप |
|---|---|---|---|
| ३. वा० रामायण उत्तर काण्ड. | न जाणतां पाप घडलें. | विरूप होऊन रहा. नट्टापटा करूं नको. | पराभव होईल, शत्रु पकडील, इन्द्रपद अस्थिर होईल. |
| ४. अध्यात्मरामायण बालकाण्ड | ,, ,, | शिलेवर बैस, तप कर. | शरिरावर हजारो भगें होतील. |
| ५. गणेशपुराण | परपुरुष आहे, असें प्रथम वाटलें नाहीं; पण इन्द्र जवळ आल्यावर त्याच्या वासानें तिनें ओळखलें की, हा परका आहे. | शिला हो. | शरिरावर हजारो व्रण होतील, दुर्गंधीयुक्त पू वाहील; नंतर सहस्र नेत्र झाले. |
| ६. ब्रह्मपुराण | न जानतां पाप घडलें, पण इन्द्र वारंवार येत होता. | शुष्क नदी हो. | सहस्र भगें होतील. नंतर सहस्र नेत्र झाले. |
| ७. पद्मपुराण | न जाणतां पाप घडलें. | मांसरहित शुष्क शरीर होईल. | ,, ,, |
| ८. स्कंदपुराण | | अहल्येसाठी गौतम तप करतो. | |
| ९. आनंदरामायण | ,, ,, | नदी हो. | ,, ,, |

## समजून कीं न समजून ?

अहल्येच्या कथेचें विश्लेषण करावयाचें असतांना प्रथम अहल्येने हें पाप

समजून केलें कीं न समजून, याचा विचार केला पाहिजे.

केवळ वाल्मीकि रामायणानेच असें लिहिलें आहे की, अहल्येने इन्द्र हा गौतमाचें रूप घेऊन आला असून, खरा गौतम हा नव्हे, हें ओळखलें होतें व हें ओळखूनच तिने त्याला संमति दिली. इतकेंच नव्हे तर सर्व कृत्य आटोपल्यावर "मला फार आनंद झाला आहे. आता आपण येथून लवकर जावें व गौतमाच्या तडाख्यातून आपला व माझा बचाव करावा," असेंहि तिने इंद्राला सांगितलें असल्याचें वाल्मीकि मुनि सांगत आहेत! यावरून या ऋषीच्या मताप्रमाणे हें पाप तिने समजूनउमजून केलें व इंद्राला तिने पूर्ण अनुमतीने घरांत घेतले, हें सिद्ध होत आहे. वाल्मीकीनेहि यामुळेच अहल्येला 'दुर्मेधा' असें म्हटलें आहे.

त्यानंतर गणेशपुराणांत असें म्हटलें आहे कीं, प्रथम जेव्हा गौतमरूपाने इन्द्र आला, तेव्हा तिने ओळखलें नाही; पण जवळ येऊन तो लगट करूं लागला, तेव्हा त्याच्या अंगावर लावलेल्या अत्तरांच्या वासाने तिला समजलें की, हा गौतम नाही. याशिवाय इतर ग्रंथ म्हणतात की, अहल्येकडून न समजतांच हें पाप घडलें, करिता न समजतां घडलें हें खरें, कीं समजून घडलें हें खरें, याचा विचार केला पाहिजे.

अहल्या व गौतम हे विवाहित होऊन अनेक वर्षे झालीं होतीं व त्यामुळे गौतमाची ओळख अहल्येस उत्तम प्रकारें होणें स्वाभाविक होतें. इन्द्र गौतमाचें रूप घेऊन आला, हें खरें आहे. इन्द्र हा राजकारणी पुरुष असल्याने तो अनेक रूपें बेमालूमपणाने घेण्यांत प्रवीण असणें स्वाभाविक आहे. कितीहि जरी प्रवीणतेने त्याने रूप घेतलें, तरी स्त्रीला हा आपला पति आहे कीं नाही, हेंसुद्धा ओळखतां येणार नाही, असें होऊं शकणार नाही व जेव्हा तो अगदी जवळ येऊन व्यवहार करूं लागेल, तेव्हासुद्धा स्त्रीला समजणार नाही, असें मानतां येईल, असें वाटत नाही.

तेव्हा अहल्येला प्रथम ओळख पटली नसली, तरी एकान्तांत गाठ पडल्यानंतर हा गौतम नाही, हें तिला समजलेंच असलें पाहिजे. ब्रह्मपुराणकार म्हणतात, त्याप्रमाणे इन्द्र वारंवार येत असून व वारंवार एकान्त करीत असूनही मला हा परका आहे, हें समजलें नाही, असें जें अहल्या म्हणत आहे, त्यावर

आमचा विश्वास बसूं शकत नाही.

म्हणून या बाबतींत वाल्मीकीनें जो वृत्तान्त दिला आहे, तोच योग्य आहे, असें वाटतें. फारतर असें म्हणतां येईल की, दुरून ती इन्द्राला ओळखूं शकली नाही; पण एकान्ताच्या वेळीं तरी तिला समजलेंच असावें.

घरांत एकटी स्त्री आहे. परका पुरुष घरांत घुसत आहे. सोंग घेऊन तो येत आहे. घरांत अंधार असल्यामुळे प्रथम स्त्रीच्या लक्ष्यांत हें कपट येत नाही; पण पुढें तिला कळतें, तेव्हा तिनें काय करावें ? अशा वेळीं गोष्ट लक्ष्यांत येतांच तिनें त्याचा निषेध केला पाहिजे. न समजलेल्या स्थितीपर्यंत दोष नसेल; पण लक्ष्यांत येतांच दोषाला प्रारंभ झाला, असें मानणें योग्य आहे.

वाल्मीकींच्या म्हणण्याप्रमाणे नंतरहि तिनें इन्द्राचें संरक्षण करण्याचीच खट-पट केली. इतर सर्व ग्रंथ जरी न समजतां पाप घडलें, असें म्हणत असले, तरी तें विश्वसनीय वाटत नाही. वाल्मीकीचें म्हणणेंच जास्त विश्वसनीय वाटतें. म्हणून अहल्येचें पाऊल असें वाकडें कां पडावें, याचें कारण शोधणें आवश्यक आहे.

## वाकडें पाऊल कां पडावें ?

गौतम फारच संयमी असल्याचें ब्रह्मदेवानेच कबूल केलें आहे. अहल्या वयांत येण्यापूर्वीच गौतम प्रौढ झालेला होता, असें ब्रह्मदेवाच्या म्हणण्यावरून स्पष्ट दिसतें. अहल्या १६ वर्षांची असून, गौतम ४० वर्षांचा तरी असावा, असें वाटतें. ब्रह्मदेवाचें म्हणणें मान्य केलें, तर अहल्येइतकी उफाड्याची सुंदर तरुणी त्या वेळीं दुसरी कोणतीहि नव्हती. हिच्या सौंदर्यानें पुष्कळच तरुण आकर्षित झाले होते, हें ब्रह्मदेवाला माहीत होतें. ब्रह्मदेव हा पक्का सनातनी म्हातारा होता. म्हणून त्यानें गौतम संयमशील आहे, घरंदाज आहे, कुलशीलवान् आहे, असें पाहून त्यास अहल्या देऊन टाकली व आपण मोकळा झाला. सुंदर उफाड्याची **तरुण स्त्री** व अति प्रौढ तपस्वी **संयमी पति**, असें हें जोडपें येथें आपणांस दिसत आहे.

पतीनें तप करणें हा कांही गुन्हा नाही; पण त्यास पत्नीची राजीखुषीनें अनु-मति असली पाहिजे, असें धर्मशास्त्र म्हणतें, याचें इंगित या कथेवरून समजण्या-सारखें आहे. पति तपस्येंत व ध्यानधारणेंत निमग्न असला, तरी पत्नीनें त्याची

सेवा करीत रहावें, हें योग्य व हा आदर्शच आहे, यांत शंका नाही; पण अवसर मिळतांच जबरदस्तीने दाबांत ठेवलेलें मन मर्यादेचें अतिक्रमण करूं शकतें, हीच गोष्ट येथे वाल्मीकींना दाखवावयाची असावी, असें वाटतें. म्हणूनच त्यांनी इन्द्र येतांच व तो देवराज आहे, हें समजतांच ती त्याला आढेवेढे न घेतां कबूल झाली; इतकेंच नव्हे तर पुढेही ती त्याला बचावाचा मार्ग दाखवण्याच्या खटपटींत राहिली, असें अहल्येचें पात्र वाल्मीकींनी रामायणांत रंगवलें आहे.

कामविकार अनावर आहे, त्याचा संयम केला पाहिजे; पण तो संयम मनाला योग्य वळण लाऊन केला पाहिजे. जबरदस्तीचा संयम उपयोगी नाही, हें येथे तात्पर्य आहे.

तरुण, सुंदर व उफाड्याची स्त्री घरांत असतां, तिची पूर्ण अनुमति न घेतां, तिच्या पतीने सर्व वेळ ध्यानधारणेंत व संयमांत घालवणें, हा गृहस्थधर्म नव्हे. स्त्रीपुरुषांनी मिळून एकमताने आपला धर्ममार्ग आखला पाहिजे, हें तात्पर्य येथे स्पष्ट दिसत आहे.

## इन्द्राचें पाप.

इन्द्राचें पाप फारच भयंकर आहे. इन्द्र हा एक मोठा सम्राट् होता. त्याने एका विवाहित स्त्रीवर डोळा ठेवणें हें त्यास केव्हाही योग्य नाही. तिला फसवून आपली इच्छा शांत करण्यास तिला भाग पाडणें, हें त्यास काळिमा आणणारें आहे. कोणत्याही दृष्टीने पाहिलें, तरी त्याचें कृत्य समर्थनीय ठरत नाही.

वाल्मीकि-रामायणांत गौतमाला राग आणून आपण मोठें देवकार्य केलें आहे, असें इन्द्र म्हणत आहे व तें ऐकून कांही देव, पितर व ऋषि त्याच्या मदतीस धावले आहेत, पण यांत त्याचें समर्थन झालें आहे, असें म्हणवत नाही. यांत कांहीच सुरकार्य घडल्याचें दिसत नाही.

पितरांनी इन्द्रावर शस्त्रक्रिया करून,त्यास मेषवृषण बसाविलें, ही त्या काळच्या शस्त्रक्रियेची उच्चता पटवणारी बाब निःसंशय आहे व सम्राटाचें वृषण गळलें असतां त्याच्या राज्यांतील वैद्यांनी आपल्या कौशल्याची पराकाष्ठा करून, राजाला पुनः आरोग्यसंपन्न करणें, हें त्यांचें कर्तव्यच ठरतें; पण त्यामुळे इन्द्राचें कृत्य

समर्थनीय ठरत नाही.

वाल्मीकि-रामायणांत इन्द्राचें वृषण गळून पडलें, असें म्हटलें आहे; पण लिंग-पुराणामध्ये असें स्पष्ट म्हटलें आहे की, गौतमानें रागाऊन इन्द्राचें वृषण उपटून काढलें व जमिनीवर आपटलें. हा वृत्तान्त अधिक खरा, झाला तसाच लिहिलेला असावा, असें वाटतें.

परका पुरुष स्वस्त्रीशीं व्यभिचार करीत आहे, हें पाहून कोणालाहि संताप येणें स्वाभाविक आहे. असा भयंकर संताप आल्यावर तो नुसताच शिव्याशाप देत राहील, हें शक्य दिसत नाही. शिवाय गौतमाच्या आश्रमांत त्याचे शिष्य व यज्ञरक्षक बरेच लोक होते व ते गौतमाच्या जिवाला जीव देणारेंहि होते. इन्द्र एकटा, अपराधी, परस्थळीं असून गांगरलेला होता. अशा स्थितींत इन्द्राला गौतमानें आपल्या सहाय्यकांच्या मदतीनें खाली पाडून त्याचें वृषण कापलें अथवा उपटलें असलें, तर तें कांही अस्वाभाविक नाही. षड्विंशब्राह्मणांतील वर्णनावरून गौतमही लढवय्याच होता, असें दिसत आहे; तेव्हा गौतमानें इन्द्राचें वृषण उपटलें, हें अधिक सयुक्तिक दिसतें.

राजा व्यभिचारी असला, तर त्याचा पराभव होणें, तो शत्रूच्या हातीं सापडणें व त्याचें राज्यपद त्याच्या हातून काढून घेणें, या गोष्टी क्रमप्राप्तच आहेत. व्यभिचारी माणसाच्या शरिरावर निरनिराळे रोग झाले, तर त्यांतहि कांहीच आश्चर्य नाही.

या वेळीं इन्द्रासारख्या त्रिभुवनविजयी सम्राटाची व्यभिचाराच्या बाबतींत कोणीहि बाजू धरूं शकत नव्हते, तर त्याला खाली पाडून त्याचें वृषणही उपटीत व त्याला सर्व प्रकारें मान खाली घालावयास लावीत, भीडमुरवत ठेवीत नसत. राजपदावरून व्यभिचाऱ्यास दूर करीत व शक्य तितकी त्याची अव-हेलना करीत, इतकें लोकमत व्यभिचाराविषयी प्रतिकूल असे, असें या कथेवरून दिसतें. इन्द्राला जितकें या वेळच्या लोकांनी निंदिलें, तितका पुढे कोणत्याही राजाचा व्यभिचाराबद्दल अपमान झालेला असेल, असें वाटत नाही. इन्द्रानें एक वेळ एका स्त्रीशीं व्यभिचार केला असला, तर सध्या पुष्कळ श्रीमंत राजे लोक असे आढळतील की, त्यांनी असे अपराध अनेक केलेले आहेत; पण

सध्या व्यभिचाराबद्दल लोकमत इतकें प्रक्षुब्ध झालेलें दिसत नाही. व्यभिचाराबद्दल सध्या लोकांस किळस येईनाशी झाली आहे, असें वाटतें.

एकट्या सीतेच्या पळवून नेल्याबद्दल रावणाचें साम्राज्य उलथून पाडलें गेलें; एकट्या द्रौपदीचा छळ होतांच सात अक्षौहिणी सैन्य तिच्या संमानरक्षणासाठी मरण्यास तयार झालें. सतीत्वरक्षणाची चाड इतकी या वेळीं होती, असें दिसतें. याचा विचार सामाजिक परिस्थितीचा विचार करणारांनी अवश्य केला पाहिजे.

## अहल्येचा शाप.

अहल्येस जो शाप झाला, असें वाल्मीकि-रामायणकार म्हणतात, तो विधि केवळ अन्तःकरणशुद्धीसाठीच होता, असें दिसतें– ( १ ) तप कर, ( २ ) उपवास कर, निरशनाचे पदार्थ सेवन करून रहा, ( ३ ) कोणाच्या दृष्टीस पडूं नकोस, एकान्त सेवन कर, कोणाबरोबर बोलूं नकोस, मौन धर, ( ४ ) भस्मावर नीज. ( वा. रा. बाल. ) ( ५ ) आश्रमाबाहेर जाऊं नको, चांगलीं वस्त्रें व आभूषणें धारण करूं नकोस, ( ६ ) विरूप होऊन रहा, म्हणजे नट्टापट्टा करूं नकोस ( वा. रा. उत्तर कांड ); ( ७ ) शरीर क्षीण कर, म्हणजे तपाने तें शुष्क होऊं दे. ( पद्म. ); ( ८ ) आश्रमांतील शिलेवर बसून तप कर, इकडेतिकडे हिंडूं नकोस, ( ९ ) शिलेवर बसून रहा, येथेच ऊन, वारा, पाऊस सहन करीत रहा. ( अध्यात्म–रा० ), ( १० ) ईश्वरभक्ति करीत रहा.

हे सर्व आदेश अहल्येचें अन्तःकरण शुद्ध व्हावें, यासाठी आहेत. ज्या ज्या कारणाने भोगवासना वाढते, तीं तीं कारणें या आदेशांनी दूर केलीं असून, तिची अन्तःकरणशुद्धि व्हावी, अशी येथे योजना आहे. या शापाने अहल्येची समाजांतून उठवणूक केलेली नसून, अमूक प्रकाराने ती राहिली असतां, तिची समाजामध्ये पुनः प्रतिष्ठा होईल, असा मार्ग येथे दाखवला आहे.

आश्रमांतील शिलेवर बसून तप कर, असा मूळचा आदेश होता. शुष्क नदी हो, हा त्याचाच अपभ्रंश होय; कारण शुष्क नदी ही खडकाळ प्रदेशांत शिलारूपच असते. ‘ **शिलायां तिष्ठ** ’ याचा अर्थ ( १ ) शिलेवर बैस, व ( २ ) शिलेमध्ये आंत गुप्त होऊन रहा, असा दोन तऱ्हेने होऊं शकतो. पहिला अर्थ

स्वाभाविक आहे व तो इतर तपाच्या मार्गाशीं जुळणाराहि आहे; पण दुसरा अर्थ अद्भुतता वाढवण्याची इच्छा कवींमध्ये प्रबळ झाल्यानंतर उत्पन्न झाला असावा व त्यापुढे अहल्या शिळा झाली, हा भाव यांतूनच निघाला असावा, असें वाटतें. प्राचीन कथांत याचा मागमूसहि नाही.

## गौतम अहल्येसाठी तप करतो.

स्कंदपुराण म्हणतें की, गौतमानेसुद्धा अहल्येच्या अन्तःकरणशुद्धीसाठी तप केलें. इतर सर्व पुराणांत अहल्येला तप करण्याचा आदेश देऊन, गौतम तप करण्यासाठी गेले, असा उल्लेख आहे. येथे जरी अहल्येसाठी त्यांनी तप केलें, असा स्पष्ट उल्लेख नाही, तथापि ' अमूक इतकें तप होतांच तूं मजकडे येऊन राहूं शकशील. ' असें म्हटल्याचा प्रत्येक कथेंत दाखला आहे. यावरून गौतमही आपल्या पत्नीच्या परिशुद्धतेसाठी तप करीत राहिले असावे, असें मानण्यास बरीच जागा आहे.

गौतमाने तप कां करावें ? या प्रश्नाचें उत्तर पूर्वी आलें आहे. गौतमाच्या सतत तपस्येमुळे अहल्येचें मन इतकें हळुवार झालेलें रामायणांत दिसतें कीं, इन्द्र येतांच मुळीच आढेवेढे न घेतां तिने त्यास रुकार दिला व झालें तें बरें झालें, असें म्हटलें व इन्द्रास पळून जाण्यासही शेवटीं मदत केली ! यावरून गौतमाच्या सतत तपश्चरणाने अहल्येचें मन फारच दबलें गेलें होतें; पण शान्त झालेलें नव्हतें, हें उघड दिसतें. गौतमाने या घरांतल्या परिस्थितीचा विचार केला पाहिजे होता. तो त्याने केला नाही, यामुळेच अहल्या पापमार्गावर घसरली. अशा वेळीं बायकोच्या पापाचा वाटा पतीला भोगावा लागणें योग्य आहे. यासाठीच गौतमाला तप करणें प्राप्तच होतें व तें योग्यही होतें.

या दृष्टीने ही कथा सामाजिक प्रश्नांवर पुष्कळच प्रकाश पाडणारी आहे.

## ही कथा खरी कीं काल्पनिक ?

गौतम, अहल्या व इन्द्र यांची ही कथा खरी ऐतिहासिक घडलेला वृत्तान्त नाही, हें आम्ही पूर्वी वेदाच्या मंत्रांचा विचार करतांना दाखवून दिलें आहे. कथा रूपकात्मक असली, तरी तिच्या विचाराने कित्येक सामाजिक प्रश्नांवर प्रकाश

पडूं शकतो, त्याचा विचार वर केला आहे. हा बोध सामाजिक प्रश्नांचा विचार करावयाचा असतां फार महत्त्वाचा आहे, असें आमचें मत आहे. कथा इतिहासिक असो वा रूपकात्मक असो, दोन्हींपासून बोध सारखाच मिळूं शकतो. तथापि कथा रूपकात्मक असली, तर ती तशी आहे, असें स्पष्टपणें ठरणें अगत्याचें आहे.

ही कथा रूपकात्मक आहे, यास वेदमंत्रांचीं प्रमाणें पूर्वी दिलीं आहेत. आता येथे आणखी प्रमाणें देणें आहेत, तीं कांही द्व्यर्थी शब्दांचीं आहेत.

इन्द्राला '**सहस्रनेत्र, सहस्रभग**' हे शब्द आहेत. सूर्यालाहि हे शब्द लावतात. 'भग' शब्द **ऐश्वर्य, योनि व व्रण**' या अर्थी आहे. तेव्हा कवींनी 'सहस्रभग' शब्दाचा 'सहस्रैश्वर्ययुक्त' हा अर्थ लोपवून त्या ठिकाणीं 'ज्याच्या शरिरावर सहस्र व्रण झाले आहेत,' असा अर्थ कल्पून, शाप दूर केल्यानंतर त्याचे सहस्र नेत्र केले. मूळचे दुसऱ्या अर्थाचे शब्द होते, ते कथेच्या सोयीसाठी या अर्थांनी मानले व कथा रचली.

'सहस्रनेत्र, सहस्रभग' हे दोनही शब्द अग्नि, सूर्य व इन्द्र यांना लागलेले दिसतात. वेदांमध्ये हे शब्द नसले, तरी या अर्थाचीं वर्णनें वेद व पुराणें यांत बरींच आहेत. कथेच्या सोईसाठी असे शब्दाच्या अर्थातील श्लेष स्वीकारले जातात, हें सर्वांस माहीत आहे. अग्नि, सूर्य व इन्द्र यांचा संबंध रात्री व उषा यांशीं असल्याचें पूर्वी दाखवलें आहे. निशापति चन्द्र हा तपस्वी असल्याचें वर्णनही त्याच्या शान्त किरणांनी व वद्यपक्षांतील क्षीण होण्यामुळे समजण्यासारखें आहे.

तेव्हा रूपकाने कथा बनावी, अशी सामग्री इतक्या रीतीने हाताशीं सहज मिळण्यासारखी असतांना ती कोण कवि सोडूं शकेल बरें ? एकदा तशी कथा घडूं लागल्यावर तींत मीठमिरची वारंवार मिसळत गेली, तर त्यांत तरी काय अस्वाभाविक आहे बरें ?

तात्पर्य, मूळची ही कथा ऐतिहासिक नव्हे, ती रूपकालंकाराने रचली गेली व पुढे वाढत गेली आहे, म्हणूनच या कथेकडे रूपकालंकाराच्या दृष्टीनेच पाहणें योग्य आहे. ही इतिहासिक कथा नव्हे.

**विश्वामित्राची कथा** ( सर्ग ५१–६५ ) = विश्वामित्र हा एक मोठा राजा होता. तो सैन्यासह हिंडत असतां एके दिवशीं वसिष्ठ ऋषींच्या आश्रमांत आला. वसिष्ठ ऋषींनी त्याचें स्वागत केलें व राजा नको नको म्हणत असतांही त्यास आग्रह करून सैन्यासह मोठें थाटाचें भोजन दिलें. एका ऋषीनें सैन्यासह राजाला असें थाटामाटाचें भोजन देणें, हें कसें बरें शक्य आहे, याचा राजानें शोध केला, तेव्हा वसिष्ठाकडे एक कामधेनु आहे, तिच्या प्रसादानें एवढें ऐश्वर्य वसिष्ठास प्राप्त झालें, हें त्यास कळलें. विश्वामित्र राजास या वेळीं असें वाटलें की, असली कामधेनु माझ्याकडेच असली पाहिजे. ऋषीकडे हिचा काय उपयोग ? असा विचार करून राजानें वसिष्ठाकडे तिची मागणी केली !

वसिष्ठ म्हणाले– राजा ! आमचें हें सर्व गुरुकुल व त्यांत शिकणारे हे सर्व हजारो छात्र यांचा योगक्षेम या कामधेनूवर चालला आहे. तेव्हा ही कामधेनु आम्ही तुला देऊं शकणार नाहीं.

वसिष्ठ व राजा विश्वामित्राची पुष्कळ बोलाचाली झाली व शेवटीं वसिष्ठ कामधेनु देत नाही, असें पाहून आपल्या सेनापतीस त्यानें आज्ञा केली की, कामधेनूस घेऊन जा. त्याप्रमाणे सैनिक तिला घेऊन हाणमार करीत नेऊं लागले. तेव्हा ती वसिष्ठाकडे आली व त्यांस म्हणाली की, ‘ मला कां टाकता ? ’ तेव्हा वसिष्ठ म्हणाले— ‘ मी तुला टाकली नाहीं. राजा बलात्कारानें तुला नेत आहे, तेव्हा त्याच्या सैन्याचा नाश करणारें सैन्य त्यावर पाठीव. ’

कामधेनूचें सैन्य राजाच्या सैन्याशीं भिडलें; पण राजाच्या सैन्यानें त्यांचा नाश केला. तेव्हा कामधेनूनें दुसरें सैन्य पाठवलें; त्यांनी राजसैन्याचा धुव्वा उडविला. मग स्वतः राजा विश्वामित्र पुढें आला व त्यानें आपल्या अस्त्रानें त्या सैन्यास पराजित केलें. तेव्हा कामधेनूनें तिसरें सैन्य पाठवलें त्यांनी विश्वामित्राचा पूर्ण मोड करून टाकला.

तेव्हा विश्वामित्राच्या १०० पुत्रांनी वसिष्ठ ऋषीवर हल्ला केला; पण वसिष्ठांनी त्यांस दग्ध करून टाकलें.

आपला पूर्ण पराजय झाला, सैन्य नाश पावलें व आपले १०० मुलगेही मारले गेले, हें पाहून विश्वामित्र लाजला. तो आपल्या राजधानींत आला व

आपल्या मुलाला गादीवर बसवून आपण तप करून अस्त्रें मिळविण्यासाठी वनांत गेला व येथे तप करूं लागला.

महादेवापासून अनेक अस्त्रें प्राप्त करून घेतल्यानंतर आता 'वसिष्ठ मेलाच' असें समजून पुनः वसिष्ठाच्या आश्रमावर राजा विश्वामित्र धाऊन गेला. राजा विश्वामित्र व वसिष्ठ ऋषि यांचें भयंकर युद्ध झालें. वसिष्ठांच्या ब्रह्मदण्डनामक अस्त्रापुढे विश्वामित्राची सर्व अस्त्रें फिक्कीं पडलीं. राजाचा पूर्ण पराभव झाला. तेव्हा विश्वामित्र म्हणाला की, '**क्षात्रबलाला धिक्कार असो, ब्राह्म बलच खरें बल आहे.** यासाठी प्रचण्ड तप करून मी ब्राह्मण्य प्राप्त करून घेतों.' विश्वामित्र आपल्या पत्नीसह दक्षिण दिशेला जाऊन तप करूं लागला. बरेंच तप झाल्यानंतर ब्रह्मदेव त्यास (१) '**राजर्षि**' म्हणाले. तें ऐकून विश्वामित्र म्हणाला, मला ब्रह्मर्षि व्हावयाचें आहे, यासाठी मला राजर्षि या पदवीची इच्छा नाही; तो पुनः पश्चिम दिशेला जाऊन पुष्कर तीर्थावर तप करूं लागला. बरेंच तप झाल्यावर ब्रह्मदेव प्रसन्न झाले व हे राजा तूं आता (२) '**ऋषि**' झाला आहेत, असें म्हणाले. विश्वामित्राला ब्रह्मर्षि व्हावयाचें होतें, म्हणून ऋषित्वप्राप्तीनें त्याचें समाधान न होऊन, तो पुनः उत्तर दिशेला जाऊन तप करूं लागला. तेव्हा ब्रह्मदेव प्रसन्न झाले व त्यांनी त्यास (३) '**महर्षि**' म्हटलें; पण विश्वामित्र तर ब्रह्मर्षि होणार होता. तेव्हा त्यानें विचारलें की, 'माझ्यांत अजून काय कमी आहे?' तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले की, संयम कमी आहे. हें ऐकून विश्वामित्र पुनः तप करूं लागला.

विश्वामित्राचें तप चाललें असतां तेथे रंभा आली. ती आपल्या तपांत विघ्न करणारी आहे, असें समजून त्यानें तिला शापिलें, तेव्हा त्याच्या लक्ष्यांत आलें की, आपण अजून क्रोध जिंकला नाही; तेव्हा त्यानें पुनः तप केलें. जेव्हा त्याला संयम साधला व त्यानें क्रोधादि विकार जिंकले, तेव्हा ब्रह्मदेव विश्वामित्राला 'ब्रह्मर्षि' झालास, असें म्हणाले. तेव्हा विश्वामित्र म्हणाला की, जर मी खरोखरच ब्रह्मर्षि झालों असेन, तर तसें मला वसिष्ठांनी म्हणावें. तेव्हा वसिष्ठांनी तो पूर्ण ब्राह्मण झाला आहे, असें पाहून त्यास (४) '**ब्रह्मर्षि**' असें म्हटलें.

याप्रमाणे राजा विश्वामित्रानें दुष्प्राप्य असें ब्रह्मर्षिपद प्राप्त करून घेतलें !!

ही कथा जनकाचा पुरोहित शतानन्द यानें रामलक्ष्मणांस सांगितली. एक

ध्येय पुढे येऊन सतत तपश्चर्या करण्याचें महत्त्व या कथेने याने रामलक्ष्मणांस सांगितलें. यांत ब्राह्मण्याचें महत्त्व व त्याची दुदुष्प्राप्यता यांचेंहि वर्णन आहेच.

या कथेमध्ये वसिष्ठ ऋषि ' मी ब्राह्मण क्षमावान् ' असा वर्णिला नसून, तो शमदमसंपन्न असतांही, क्षत्रिय राजा आपल्या आश्रमावर चालून आला असतां या राजाच्या आक्रमणाचा सशस्त्र प्रतिकार करीत आहे व शेवटीं राजाच्या सर्व शस्त्रास्त्रांचा प्रतिकार करून त्याचा पूर्ण पराभव करीत आहे, असा वर्णिला आहे.

या कथेपासून पुष्कळच बोध मिळण्यासारखा आहे. वसिष्ठ ऋषीच्या आश्रमांत हजारो ब्रह्मचारी शिकत होते. राजाने अशा आश्रमाचें संरक्षण करावयाचें, तें न करतां, वसिष्ठाचा पाहुणचार घेतला व तो पचण्यापूर्वीच त्या आश्रमावर सैन्याच्या द्वारें क्रूर हल्ला करून, तो आश्रम उध्वस्त करून टाकला व तो लुटला. हें राजा विश्वामित्रास शोभण्याजोगें कृत्य नव्हतें. हें दुष्कृत्य राजाने केलें, तरी सामर्थ्य असूनहि वसिष्ठाने या राजास ठार केलें नाही.

पुढे विश्वामित्राने आपले १०० पुत्र नष्ट केले, हें पहात असूनहि वसिष्ठानें क्षत्रियांस ठार मारावयाचें नाही, त्यांची राष्ट्रास आवश्यकता आहे, असें म्हणून क्षमा केली. विश्वामित्राने आश्रमावर स्वारी केली, तेव्हा मात्र राष्ट्राची आपणाजवळ असलेली ठेव असे जे विद्यार्थी त्यांचें रक्षण व्हावें, म्हणून वसिष्ठाने बचावाच्या धोरणाने त्याचा प्रतिकार केला. आक्रमक धोरण ठेवलें नाही, किंवा राजाचा द्वेषही केला नाही.

नंतर विश्वामित्राने आपल्या विरुद्ध धार्मिक क्षेत्रांतहि पुष्कळच अपकृत्यें केलीं, हें पहात असूनहि त्याच्याविरुद्ध कांही केलें नाही. इतकेंच नव्हे तर ज्या वेळीं विश्वामित्र **राजर्षि, ऋषि, महर्षि व ब्रह्मर्षि** या एकाहून एक वरिष्ठ पदव्या देवांकडून प्राप्त करून, ब्रह्मर्षित्वाची मागणी करण्यासाठी वसिष्ठांकडे आला, तेव्हा पूर्वीच्या अनंत अपकारांचा नुसता उच्चारहि न करतां, अत्यंत उदार अन्तःकरणाने त्यांचें ब्रह्मर्षित्व मान्य केलें व त्याबरोबरच शमदमाने सिद्ध झालेलें आपलें ब्राह्मण्य कसें असतें, तें जगास दाखवलें. वसिष्ठांची ही लोकोत्तर शान्ति खरोखरच प्रशंसनीय आहे.

विश्वामित्र ब्रह्मर्षि होऊन जेव्हा दशरथाकडे रामलक्ष्मणांची मागणी यज्ञरक्षणासाठी करण्याकरता आला, तेव्हा स्वतः वसिष्ठांनी राजाचें मन वळवून रामलक्ष्मणांस देवविलें. पूर्वीच्या अपकृत्यांचें स्मरणहि केलें नाही.

अशा प्रकारचे अनेक बोध या कथेपासून रामलक्ष्मणांना मिळण्यासारखे आहेत. आता या कथेंतच विश्वामित्राकडून क्षत्रियोचित विलक्षण उत्साहामुळे, परोपकारबुद्धीमुळे व त्यागभावनेमुळें कसकशीं अपकृत्यें घडत गेलीं, त्यासंबंधीच्या तीन कथा आल्या आहेत, त्या आता पाहूं–

( १३ ) **त्रिशंकूची कथा** ( सर्ग ५७ – ५८ ) = त्रिशंकु राजाच्या मनांत आलें की, आपण यज्ञ करावे व सदेह स्वर्गास जावें. त्याचे कुलगुरु वसिष्ठ ऋषि होते. त्यांस त्याने विचारलें, पण त्यांनी असें होणें अशक्य आहे, असें सांगितलें. नंतर तो राजा वसिष्ठाच्या मुलांकडे गेला व सदेह स्वर्गप्राप्तीसाठी आपलें याजन करा, असें त्यांस म्हणाला.

हें ऐकून वसिष्ठपुत्र त्यास म्हणाले की, ‘ हे राजा ! तूं आपल्या कुलगुरूचा अवमान केलास हें योग्य झालें नाही. आता हा नाद सोड व आपल्या राजधानीला परत जा. ’ हेंही राजाने ऐकलें नाही व तो म्हणाला की, ‘तुम्ही हें करीत नसाल, तर मी दुसऱ्या याजकाकडून हें यज्ञकृत्य करवीन. ’ हें ऐकून वसिष्ठपुत्रांनी त्यास शापिलें.

नंतर तो त्रिशंकु राजा विश्वामित्राकडे आला व त्यांस म्हणाला की, ‘ मला सदेह स्वर्गास जावयाचें आहे, त्यासाठी यज्ञ करा. ’ हें ऐकून विश्वामित्राने त्याचें याजन करण्याचें मान्य केलें व यज्ञास प्रारंभही केला. सर्व ऋषींस त्या यज्ञास बोलावलें. इतर ऋषि आले, पण वसिष्ठ व त्याचे पुत्र आले नाहीत. वसिष्ठपुत्र असेंहि म्हणाले की, ‘ या चाण्डाल राजाचें याजन हा क्षत्रिय करीत आहे, तेव्हा या यज्ञांत देवता कशा येतात व हविर्भाग कशा घेतात तें पाहूं. ’ हें जेव्हा विश्वामित्राने ऐकलें, तेव्हा त्याने वसिष्ठपुत्रांस शापून त्यांना नष्ट करून टाकलें. पुढे यज्ञ झाला, पण एकही देवता आली नाही व हविर्भागहि कोणी घेतला नाही; पण विश्वामित्राने आपलें सगळें पुण्य राजासाठी अर्पण केलें व त्यास सदेह स्वर्गास पाठवून दिला; पण इन्द्राने त्यास परत पृथ्वीवर ढकलून दिला. विश्वामित्र

त्रिशंकूला वर ढकली व इन्द्र खाली लोटी; यामुळे तो राजा बिचारा मध्येच लटकत राहिला!

या कथेचें तात्पर्य हें आहे की, अयोग्य माणसाला एखाद्या कार्यामध्ये लावलें असतां तें कार्य तर पूर्ण होत नाहीच, पण मध्येच गटंगळ्या खाव्या लागतात. यासाठीं अर्धवट माणसाच्या नादीं लागू नये.

या ठिकाणीं विश्वामित्राची परोपकार व त्यागबुद्धि फार मोठी दिसते; पण स्वतःची योग्यता किती आहे, तें न समजल्यामुळे स्वतःची हानि झाली, दुसऱ्याचीहि अर्धवट स्थिति झाली. यासाठीं आपली उच्च अवस्था होण्यापूर्वीं केला जाणारा उदारपणा हा फारसा लाभदायक होऊं शकत नाही. हे बोध या कथेच्या योगानें शतानन्द पुरोहिताने रामलक्ष्मणांस सांगितले. आता विश्वामित्राचें आणखी एक कृत्य पहा —

(१४) अयोध्येस अम्बरीष नांवाचा एक राजा यज्ञ करीत होता. त्याचा यज्ञीय पशु चोरीस गेला. तो सापडेना, तेव्हा त्याबद्दल दुसरा आणण्यासाठीं राजा स्वतः हिंडूं लागला. पुढे ऋचीक मुनींनी अपला मधला पुत्र शुनःशेप नांवाचा होता, तो राजास दिला. त्यास घेऊन राजा आपल्या यज्ञमंडपाकडे येत होता. पुष्करतीर्थावर विश्वामित्र तप करीत होता, तेथे शुनःशेपासह राजा आला. शुनःशेप विश्वामित्रास शरण गेला. तेव्हा विश्वामित्राने आपल्या स्वतःच्या औरस मुलांस सांगितलें की, या शुनःशेपाबद्दल तुम्ही यज्ञासाठीं अर्पण व्हा.

विश्वामित्राचें हें म्हणणें त्याच्या मुलांनी ऐकलें नाही. यामुळे त्यानें आपल्या मुलांसहि निर्दयपणाने शापून नष्ट केलें. नंतर शुनःशेपाला बचाव करण्यासाठीं कांही मंत्रांचा जप करण्यास सांगितलें. त्यांचा जप करून शुनःशेप वाचला व राजाचा यज्ञ समाप्त झाला.

या कथेमध्ये विश्वामित्र एका ब्राह्मणकुमाराचा जीव वाचवण्यासाठीं आपल्या पुत्रांचा बलि देण्यास उद्युक्त झाल्याचें वर्णिलें आहे. निःसंशय हें औदार्य आहे. या वेळीं आपल्या पुत्रांनाही शापून नष्ट करण्यास विश्वामित्र मागे सरला नाही. पूर्वीच्या कथेंत शापून जसें वसिष्ठपुत्रांस नष्ट केलें, त्याचप्रमाणे येथे आपल्या पुत्रांसही नष्ट केलें. दोनही ठिकाणीं क्रोध व अविचारच स्पष्ट दिसत आहेत. येथे

परोपकाराबद्दल याची प्रशंसा करावी कीं अविचारी क्रोधाबद्दल निंदा करावी, हें कांहीं समजत नाहीं.

(१५) **विश्वामित्रमेनकेची कथा** (सर्ग ६३)= विश्वामित्राने राजर्षि व ऋषि या दोन पदव्या ब्रह्मदेवाकडून प्राप्त केल्यानंतर ब्रह्मर्षि बनण्यासाठी पुष्करतीर्थावर तो तप करीत असतां तेथे स्नान करण्यासाठी मेनका नांवाची अप्सरा आली. ती स्नान करीत असतां विश्वामित्राने तिला पाहिलें व तो मोहित झाला. तो तप सोडून देऊन तिच्याबरोबर दहा वर्षें क्रीडा करीत राहिला ! दहा वर्षें लोटल्यावर त्याच्या लक्ष्यांत आलें की, आपण आरंभलें होतें काय व झालें काय ! तेव्हा मेनकेला सोडून उत्तर पर्वतावर जाऊन तो घोर तप करूं लागला, तेव्हा ब्रह्मदेव प्रसन्न होऊन तूं आता **'महर्षि'** झाला आहेस, असें म्हणाले.

ही कथा सांगून कामविकाराचा संयम करणें किती कठीण कार्य आहे, हें रामलक्ष्मणांच्या मनावर शतानन्दाने बिंबविलें. शक्य तो यत्न करून वीराने कामविकारामध्ये फसूं नये, हा उपदेश यांना या ठीकाणीं मिळाला.

## शुनःशेपाच्या बलीचा थोडासा विचार.

वरील १४ व्या कथेमध्ये राजा अम्बरीषाने आपल्या पशुबलीच्या ऐवजी ऋचीक ऋषींकडून त्याचा मधला पुत्र शुनःशेप विकत घेतला व तो बली देण्यासाठी नेला, अशी कथा आली आहे.

रामचन्द्राच्या पूर्वजांच्या यादीमध्ये हरिश्चन्द्र राजाचें नांव नाहीं, हें एक खरोखर आश्चर्य आहे ! कांहीं टीकाकार अम्बरीष हाच हरिश्चन्द्र आहे, असें म्हणत आहेत. याचें कारण असें की, बली देण्यासाठी विकत घेतलेला शुनःशेप जसा हरिश्चन्द्राच्या कथेंत आहे, तसाच तो अम्बरीषाच्याही कथेंत आहे व शुनःशेपाला वाचविणारा दोनही कथांमध्ये विश्वामित्रच आहे. फरक इतकाच की, हरिश्चंद्राचें याजनच विश्वामित्राने केलें आहे, तर अम्बरीषाच्या कथेंत मन्त्र-जप सांगून शुनःशेपाचा बचाव त्याने केला आहे. हरिश्चन्द्राच्या व अम्बरीषाच्या कथेंत कांहीं साम्य आहे, तर कांहीं भेदही आहे. म्हणून येथे या दोन कथांची तुलना करूं. हरिश्चन्द्राची पुराणान्तरींची कथा न घेतां ती ऐतरेय ब्राह्मणांत आलेली प्राचीन कथा घेऊं व तिचा आता विचार करूं—

*

## हरिश्चन्द्राचा नरमेध

हरिश्चन्द्र या क्षत्रिय राजाने नरमेध केल्याची कथा ऐतरेय ब्राह्मणामध्ये पुढे दिल्याप्रमाणे आलेली आहे—

हरिश्चन्द्रो ह वैधस ऐक्ष्वाको राजाऽपुत्र आस। तस्य ह शतं जाया बभूवुः। तासु पुत्रं न लेभे। ... स नारदं पप्रच्छ...किंस्वित्पुत्रेण जातेन तन्ममाचक्ष्व नारदेति।...स प्रत्युवाच-... सखा ह जाया कृपणं ह दुहिता। ज्योतिर्ह पुत्रः परमे व्योमन्।... नाऽपुत्रस्य लोकोऽस्तीति।... ॥ १३ ॥ अथैनमुवाच वरुणं राजानमुपधाव पुत्रो मे जायतां तेन त्वा यजा इति। तथेति स वरुणं राजानमुपससार...तस्य ह पुत्रो जज्ञे रोहितो नाम। तं होवाचाजनि ते वै पुत्रो यजस्व मानेनेति। स होवाच यदा वै पशुर्निर्दशो भवत्यथ स मेध्यो भवति...। स ह निर्दश आस। तं होवाच निर्दशोऽन्वभूद्यजस्व मानेनेति स होवाच यदा वै पशोर्दन्ता जायन्तेऽथ स मेध्यो भवति...तस्य ह दन्ता जज्ञिरे। तं होवाचाज्ञत वा अस्य...दन्ता यजस्व मानेनेति...स होवाच यदा वै क्षत्रियः सान्नाहुको भवत्यथ स मेध्यो भवति सन्नाहन्नु प्राप्नोत्वथ त्वा यजा इति तथेति। स ह सन्नाहं प्रापत्तं होवाच सन्नाहं नु प्राप्नोद्यजस्व मानेनेति। स तथेत्युक्त्वा पुत्रमामंत्रयामास ततायं वै मह्यं त्वामददाद्धंत त्वयाऽहमिमं यजा इति। स ह नेत्युक्त्वा धनुरादायारण्यमपातस्थौ... ॥ १४ ॥ अथ हैक्ष्वाकं वरुणो जग्राह तस्य होदरं जज्ञे। तदु ह रोहितः शुश्राव। सोऽरण्याद्ग्राममेयाय तमिन्द्रः...उवाच...चरैवेति।...स षष्ठं संवत्सरमरण्ये चचार।......सोऽजीगर्तं सौयवसिमृषिमशनया परीतमरण्य उपेयाय। तस्य ह त्रयः पुत्रा आसुः शुनःपुच्छः शुनःशेपः शुनोलांगूल इति। तं होवाच ऋषेऽहं ते शतं ददाम्यहमेषामेकेनात्मानं निष्क्रीणा इति। स ज्येष्ठं पुत्रं निगृण्हान उवाच, नन्विममिति नो एवेममिति कनिष्ठं माता। तौ ह मध्यमे संपादयां

चक्रतुः शुनःशेपे। तस्य ह शतं दत्त्वा स तमादाय सोऽरण्याद्ग्राममेयाय। स पितरमेत्योवाच हन्ताहमनेनात्मानं निष्क्रीणा इति। स वरुणं राजानमुपससारानेन त्वा यजा इति। तथेति। भूयान्वै ब्राह्मणः क्षत्रियादिति वरुण उवाच। ... ... तमेतमभिषेचनीये पुरुषं पशुमालेभे ॥ १५ ॥ तस्य ह विश्वामित्रो होतासीज्जमदग्निरध्वर्युर्वसिष्ठो ब्रह्मायास्य उद्गाता। तस्मा उपाकृताय नियोक्तारं न विविदुः। स होवाचाजीगर्तः सौयवसिर्मह्यमपरं शतं दत्ताहमेनं नियोक्ष्यामीति। तस्मा अपरं शतं ददुस्तं स निनियोज। ... विशासितारं न विविदुः स होवाच... मह्यमपरं शतं दत्ताहमेनं विशसिष्यामीति। तस्मा अपरं शतं ददुः सोऽसिं निःशान एयायाथ शुनःशेप ईक्षां चक्रेऽमानुषमिव वै मा विशसिष्यन्ति। हन्ताहं देवता उपधावामीति स प्रजापतिं... अग्निं... सवितारं... वरुणं .. विश्वान्देवान्...इन्द्रं... आश्विनौ... उषसं तुष्टाव ...विपाशो मुमुचे...अगद ऐक्ष्वाक आस ॥ १६ ॥... ...स ह शुनःशेपो विश्वामित्रस्यांकमाससाद। स होवाचाजीगर्तः सौयवसिर्ऋषे पुनर्मे पुत्रं देहीति, नेति होवाच। विश्वामित्रो देवा वा इमं मह्यमरासतेति स ह देवरातो वैश्वामित्र आस...॥१७॥ ...विश्वामित्रस्यैकशतं पुत्रा आसुः... ये ज्यायांसो न ते कुशलं मेनिरे... ते वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः। स होवाच मधुच्छंदाः पञ्चशता सार्धं यन्नः पिता संजानीते तस्मिंस्तिष्ठामहे वयम्। ...अथ विश्वामित्रः प्रतीतः...वीरवन्तो भविष्यथ... ॥ १८ ॥"

(ऐ० ब्रा० ७।३)

अर्थ– "इक्ष्वाकु कुलांतील वेधस् राजाचा पुत्र हरिश्चन्द्र नांवाचा राजा निपुत्रिक होता. त्याला शंभर बायका होत्या, तरी त्याला एकसुद्धा मुलगा झाला नाही...पुढे नारद ऋषि त्याच्या घरीं आले, तेव्हा त्याने त्यांस विचारलें... 'हे नारद ऋषि! पुत्र झाला, म्हणजे काय बरें लाभ होतो?'... नारद म्हणाले–'या संसारांत बायको हा खरा मित्र आहे, मुलगी कांही विशेष नाही, पण पुत्र मात्र

विशेष तेजच आहे...म्हणून निपुत्रिकाला कोणतीच सद्गति मिळत नाही.... म्हणून हे राजा ! तूं पुत्रप्राप्तीसाठी वरुणाची उपासना कर व जो मुलगा होईल, त्यानें तुझें यजन करीन, असा नवस कर.' राजानें बरें आहे, असें म्हणून वरुणाची उपासना केली...त्यानंतर त्याला मुलगा झाला व त्याचें रोहित असें नांव ठेवलें. तेव्हा वरुण व हरिश्चन्द्र यांचा संवाद पुढे दिल्याप्रमाणे झाला–

वरुण– हे राजा ! आता तुला नवसाप्रमाणे मुलगा झाला आहे. आता यज्ञ करून तो मला अर्पण कर.

हरिश्चन्द्र– हे देवा ! मुलगा झाला खरा, पण सुवेराच्या दहा दिवसांत तो अपवित्र असतो, म्हणून दहा दिवस होऊं देत, म्हणजे तो तुला दिला जाईल.

वरुण– ( दहा दिवसांनंतर पुनः राजाजवळ येऊन म्हणतो ) राजा ! आता दहा दिवस होऊन गेले आहेत, आता तरी मुलाचा यज्ञ कर.

हरि०– दहा दिवस झाले खरे, पण दात आले आहेत कोठे ? दात येईपर्यंत मुलगा अपवित्र असतो; म्हणून त्यास दात येऊं देत, मग तो तुला अर्पण करीन.

वरुण– ( दांत आल्यानंतर येऊन म्हणतो )– राजा आता मुलाला दांत आले. आता कर बरें त्याचा यज्ञ !

हरि०– देवा ! दांत आले खरे, पण हे दुधाचे दांत आहेत, खरे दांत येऊं देत, इतक्यांत घाई कसली ? करतां येईल यज्ञ !

वरुण– ( दुसरे दांत आल्यावर पुनः येऊन म्हणतो )– राजा ! आता तूं म्हटल्याप्रमाणे तुझ्या मुलाला दुसऱ्यानदा दांत आले, आता आण तुझा मुलगा इकडे.

हरि०– देवा ! दुसरे दांत आले हें अगदी खरें, पण आम्ही क्षत्रिय आहों, आम्हीं कांही दुसरे तिसरे कोणी नाहीं. तेव्हा आम्हांस आमच्या कुलधर्माप्रमाणे वागलें पाहिजे. जेव्हा चिलखत घालून युद्धाला सज्ज होण्यासारखा मुलगा होतो, तेव्हाच तो खरा मुलगा झाला, असें आम्ही समजतों; तेव्हा देवा ! अजून थोडे थांबा. अशी घाई काय करतां ? तो जरा वयांत येऊं दे, मग तुम्हांला तो देऊं.

वरुण– ( मुलगा पूर्ण वयांत आल्यावर येऊन म्हणतो ) राजा, आतापर्यंत पुष्कळच सबबी सांगितल्यास. आता तुझा रोहित पूर्ण वयांत आला आहे. चिलखत चढवून स्वाऱ्या–शिकाऱ्या करूं लागला आहे, तेव्हा आता तूं बऱ्या गोष्टीनें

नवस केलास, त्याप्रमाणे तो मला अर्पण कर; नाही तर तुझें कल्याण होणार नाही.

हरि०– ( देव रागावलासें पाहून मुलास जवळ बोलावून म्हणतो ) बा वत्सा रोहिता ? याच्या कृपेने तूं मला झालास, म्हणून तुझा यज्ञ करून या देवाचा नवस फेडला पाहिजे, तेव्हा कसें काय ?

रोहित– ( क्षत्रियाचाच बच्चा असल्याने तत्काळ उद्गारला ) बाबा, नवस तुम्हीं केला असेल, त्याचें मला काय ? मी तें कांहीं जाणत नाहीं. तुम्ही नवस केला असला, तर हवा तसा फेडा. आता मी पूर्ण वयांत आलों आहें, तेव्हा मी पूर्ण स्वतंत्र आहें. आजपासून तुमच्या घरांतसुद्धा रहात नाहीं. मी आपलें धनुष्य-बाण घेऊन तुमच्या घरांतून चालता होतों; मग देव व तुम्ही काय पाहिजे तें करा.

असें म्हणून खरोखरच बापाच्या वचनाची मुळींच पर्वा न करतां तो क्षत्रियाचा बच्चा बापाच्या व देवाच्या देखत घरांतून निघून गेला. तेव्हा वरुण देवाला राग आला व त्याने नवस न फेडल्याबद्दल हरिश्चन्द्राच्या पोटांत उदररोग उत्पन्न केला. हरिश्चंद्र राजा हा उदररोगाने फारच क्षीण झाला. पुढे ही बातमी जंगला-मध्ये त्याच्या मुलाला समजली. तेव्हा तो बापाला पाहण्यास घरीं येऊं लागला. तेव्हा वाटेंत त्यास इन्द्र नांवाचा दुसरा क्षत्रिय भेटला. तो त्यास म्हणाला, " बा रोहिता ! कशाला घरीं जातोस ? घरीं गेलास तर तुझें चांगलें होणार नाही. म्हणून तूं असाच हिंडत रहा. " हा उपदेश ऐकून बापाच्या आजारीपणाचा वृत्तांत समजला असूनसुद्धा आपला जीव वाचविण्यासाठी रोहित सहा वर्षे अरण्यांत राहिला. बापाच्या समाचारासमुद्धा आला नाही. पुढे रोहित हा राजपुत्र अरण्यांत हिंडत असतां सुयवसपुत्र अजीगर्त ऋषीच्या आश्रमांत आला. या वेळीं अजीगर्त ऋषि बरेच दिवस उपाशी होते. त्या ऋषीला तीन मुलगे होते, तें पाहून रोहित ऋषीला म्हणाला–

रोहित– हे अजीगर्त ऋषे ! तुम्हांला शुनःपुच्छ, शुनःशेप व शुनोलांगूल हे तीन मुलगे आहेत. त्यांपैकी एक मला विकत द्या. ( आपण एक मुलगा मला विकत दिला, तर माझ्यावर फार उपकार होतील; कारण आमच्या वडिलांनी– राजा हरिश्चन्द्राने वरुणाला–नवस केल्यामुळे त्याच्या प्रसादाने मी उत्पन्न झालों.

नवस फेडण्यासाठी वडिलांनी जेव्हा अर्पण करावयास मला काढलें, त्यास आज सहासात वर्षें झालीं. नवस न फेडल्यामुळे वडिलांना उदररोग वरुणदेवाच्या अवकृपेनें झाला आहे व ते दिवसानुदिवस खंगत चालले आहेत. वडील मला देवाला देऊन टाकतील म्हणून मी गेलीं सहा वर्षें घरींसुद्धा गेलों नाहीं. यासाठी मी तुम्हांला विनवतों की, तुमच्या तीन मुलांपैकी एक मला विकत द्या. म्हणजे ) मी तुम्हांला त्याच्याबद्दल शंभर गाई देईन व माझ्याबद्दल माझे वडील तुमच्या मुलाला वरुणदेवाला अर्पण करतील. ( तुम्ही आपला मुलगा दिलात, तर या देशच्या राजावर अनंत उपकार होतील व राजपुत्राचा—माझा स्वतःचा—जीव वाचवल्यासारखें होईल. ) यासाठी शंभर गाई घेऊन तुमचा एक मुलगा मला द्या. ( माझ्या वडिलांना मी एकुलता एकच मुलगा आहें; पण तुम्हांला तीन मुलें आहेत. तेव्हा त्यांपैकी एक देण्याने तुम्हांला वाईट वाटण्याचें कांही एक कारण नाही. )

अजीगर्त ऋषि— ( रोहिताचें मागणें ऐकून आश्चर्याने म्हणाले )— बा राजपुत्रा ! आम्ही जरी गरीब असलों व आम्हांकडे पुरेंसें खावयास अन्नही जरी नसलें किंवा बरेच दिवस जरी आम्ही उपाशी असलों, तरी मुलगे कांही कोणास अधिक झालेले नसतात. तथापि माझा मुलगा देण्याने या देशाच्या राजाला जर आरोग्य प्राप्त होत असेल व राजपुत्राचे जर प्राण वाचत असतील, तर राष्ट्रकार्यासाठी मी आपला मुलगा देण्यास तयार होईन. हें पहा रोहिता ! ) हा वडील मुलगा मला असूं दे.

अजीगर्ताची पत्नी— ( मध्येच म्हणाली ) मी कांही हा अगदी धाकटा मुलगा, कांही झालें तरी देणार नाहीं. आईचें प्रेम सर्वांत लहान मुलावर असतें, हें सर्वांस माहीत आहे.

हें धर्मपत्नीचें बोलणें ऐकल्यावर अजीगर्त ऋषीने आपल्या पत्नीस समजावलें की, ‘ आपण ज्या राजाच्या राज्यांत राहतों, ज्याच्या राज्यशासनामुळे आपलीं यज्ञयाग व अध्ययन—अध्यापन आदि कर्मे सुरळीत चालू राहिलीं आहेत, त्या राजाचें आरोग्य रहावें व त्या राजाच्या राजपुत्राचा प्राण वाचावा म्हणून आम्हांला कांहीतरी आत्मत्याग केलाच पाहिजे. आपला मुलगा अर्पण करून

जर राजवंश सुरक्षित रहात असेल, तर आम्हां ब्राह्मणांला इतका स्वार्थत्याग राष्ट्रासाठी करण्यास तयार झालेंच पाहिजे.' इतकी वाटाघाट झाल्यावर मधल्या मुलाला द्यावा, असें दोघांनी ठरवलें व शंभर गाई देऊन शुनःशेपाला राजपुत्राच्या हवालीं केलें. शुनःशेप हा ऋषिकुमार वडिलांची आज्ञा घेऊन राजपुत्राबरोबर निघाला. राजपुत्र रोहित या ऋषिकुमाराला बरोबर घेऊन घरीं आला व वडिलांस म्हणाला—

रोहित— बाबा ! तुमचा नवस फेडण्यासाठीं हा ब्राह्मणकुमार आणला आहे. त्याला तुम्हीं वरुण देवाला अर्पण करा, म्हणजे तुमचा नवस फिटेल; तुमचा उदररोग बरा होईल व मला घरीं राहतां येईल. अरण्यांत भटकत राहण्याचें यापुढे कारण राहणार नाहीं. यासाठीं, बाबा ! माझ्याबद्दल या ब्राह्मण-पुत्राला बली द्या.

हरिश्चन्द्र राजाला हें मुलाचें म्हणणें पसंत पडलें व त्याने वरुणाला म्हटलें कीं, 'देवा ! नवस फेडण्यासाठीं माझा मुलगा तुला न देतां हा ब्राह्मणाचा मुलगा आणला आहे, तो तुला अर्पण करतों. देवा ! तुम्हांला काय ? कोणतातरी मुलगा पाहिजे आहे. मग राजपुत्र घेण्याच्या ऐवजी ब्राह्मणकुमार घेतलात, तर माझा राजवंश तरी स्थिर राहील. तेव्हा तुम्हीं याचा स्वीकार करा.'

वरुण– (राजाच्या म्हणण्याचा सर्व अर्थ लक्ष्यांत घेऊन गंभीरपणाने म्हणतो)– बरें, बरें, कांहीं हरकत नाहीं. एकूण तूं अल्प किंमतीचा बली न देतां अधिक किंमतीचा बली देणार आहेस आं !!! फार चांगलें ! **क्षत्रियापेक्षा ब्राह्मणाची किंमत जास्त आहे**, हें सर्व जगास माहीत आहे. वाः ! तूं तर फारच उदार आहेस बुवा ! मी आपला क्षत्रियाचा मुलगा मागत होतों; पण तूं तर उदार-पणाने ब्राह्मणाचा मुलगा देऊं करीत आहेस !! वाहवा ! तुझ्या उदारपणाची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे ! आता लवकर आटोप. नवस करून कित्येक वर्षें होऊन गेलीं, आता काय करावयाचें तें लवकर कर.

वरुणाची आज्ञा होतांच राजाने त्या शुनःशेपाला यज्ञामध्ये नेऊन उभे केलें. या नरमेधामध्ये विश्वामित्र, जमदग्नि, वसिष्ठ व अयास्य हे अनुक्रमें होता, अध्वर्यु, ब्रह्मा व उद्गाता या ऋत्विजांचें काम करीत होते. नियोजकाचें काम होईपर्यंत

सर्व विधि आटोपल्यानंतर या शुनःशेपाला देवतेसाठी समर्पण कोण करतो? असा प्रश्न याजक ऋषींनी केला. तेव्हा कोणी पुढे होईना. तेव्हा शुनःशेपाचा बाप अजीगर्त ऋषि तेथे बसला होता, तो म्हणाला की, "**जर माझ्या मुलाच्या समर्पणाने राजाला आरोग्य मिळत असेल व राजकुमाराचे प्राण वाचत असतील, तर शंभर गाई मला आणखी द्या, म्हणजे त्याचें नियोजन मी करतों.**" हें ऐकतांच आणखी शंभर गाई राजाने त्याला दिल्या व त्याने आपल्या मुलाला नियुक्त केला. पुढे त्याचें विशसन करण्यास कोणी तयार आहे काय? असा याजकांनी प्रश्न केला, तेव्हा कोणी पुढे येईना. तेव्हा अजीगर्त पुढे येऊन म्हणाला की, "**जर माझ्या मुलाच्या विशसनाने राजाला आरोग्य मिळत असेल व राजकुमाराचे प्राण वाचत असतील तर शंभर गाई आणखी मला द्या, म्हणजे तें काम मी करतों.**" असें म्हणतांच राजाने आणखी शंभर गाई त्याला दिल्या. तेव्हा तो शस्त्र घेऊन पुढे झाला. शुनःशेप टक लावून पाहूं लागला व म्हणाला की, 'हे सर्व पशूप्रमाणेच मला मारणार आहेत कीं काय? असें असेल तर आता **मी परमेश्वरालाच शरण जातों.**' असें म्हणून त्याने प्रजापति आदि देवतांचा धावा केला. तेव्हा त्याचे बंध तुटले व शुनःशेप मुक्त झाला... व इकडे राजाही बरा झाला... नंतर शुनःशेप विश्वामित्राच्या मांडीवर जाऊन बसला. तेव्हा अजीगर्त ऋषि विश्वामित्राला पुत्रमोहाने म्हणाला की, "आता माझा मुलगा मला परत दे."

तेव्हा विश्वामित्र म्हणाला, 'नाहीं, साफ देणार नाहीं. कारण हा देवांनी मला दिला आहे. आता तो मी तुला देणार नाही. तो आता माझा मुलगा झाला आहे. तूं तर त्याला केव्हाच विकून टाकलास. आता तो तुला कसा पुनः मागतां येईल?"

तेव्हा पुत्रमोहाने अजीगर्त ऋषि आपल्या मुलास म्हणाला- 'बा शुनःशेपा! आता तूं मला येऊन भेट, ये इकडे, बाळा, ये.'

हें ऐकून शुनःशेप म्हणाला- "बाबा! आता कशाला बोलावता? तुम्ही तर मला विकून टाकलात ना? आता मी कसा तुमच्याकडे येऊं. तुम्ही वडील मुलाला

आपल्यासाठीं ठेवलात, आईने धाकटा मुलगा आपल्यासाठी ठेवून घेतला. मी मधला असल्यामुळे तुम्ही दोघांनी मला विकून टाकलात. व्हावयाचें तें झालें, आता कां कष्टी होतां? पूर्वीच विचार करावयाचा होता. आता मी तुमच्याकडे येणार नाहीं.'

तेव्हा अजीगर्त ऋषि गप्प बसला व त्याने आपल्या मुलाच्या समर्पणाने राजाला आरोग्य लाभलें व राजपुत्राचे प्राण वाचले, एवढ्यावरच समाधान मानून घेतलें.

विश्वामित्र ऋषीला शंभर मुलगे होते; पण जेव्हा या शुनःशेपाला तो वडीलपणाचा हक्क देऊं लागला, तेव्हा पहिल्या पन्नास मुलांनी त्याच्या त्या करण्यास विरोध केला. तेव्हा संतापून विश्वामित्राने त्या पन्नास मुलांस हाकून घातलें. तेव्हा ते क्षत्रियपुत्र पुढे दरोडेखोर बनले. बाकीच्या पन्नास मुलांनी शुनःशेपाला आपला वडील भाऊ मानला, तेव्हा विश्वामित्राने त्या आज्ञा मानणाऱ्या मुलांवर कृपा केली.

ही शुनःशेपाच्या नरमेधाची गोष्ट आहे. या भाषान्तरामध्ये मागच्या-पुढच्या वाक्यांचा संबंध लक्ष्यांत यावा, म्हणून संदर्भाचे कांही शब्द अधिक जोडले आहेत, त्यावरून कोणाचा काय उद्देश होता, हें तेव्हाच समजून येईल. पोटच्या गोळ्यावर पैशासाठी ब्राह्मण शस्त्र चालवीत होते, कीं त्या काळचे ब्राह्मण हे क्षत्रियांचे प्राण वाचविण्यासाठी केवळ परोकारबुद्धीने आपले पुत्र राष्ट्रकार्यासाठी अर्पण करीत असत, तें वाचकांनी येथे पहावें.

## क्षत्रियांची संस्कृति.

वरील कथेमध्ये कथाभाग असा आहे की, हरिश्चन्द्र राजाने देवाला नवस केला व त्यांत त्याने असें मागणें मागितलें की, 'मला जर मुलगा झाला, तर तो मी तुलाच अर्पण करीन.' पण मुलगा झाल्यावर नवस फेडण्याची त्याने जाणून-बुजून टाळाटाळी चालवली. नवस न फेडल्यामुळे हरिश्चन्द्रास उदररोग झाला व मुलगा हद्दपार झाल्यासारखा झाला. त्यामुळे मुलगाही नाही व आरोग्यही नाहीं, अशी राजाची स्थिति झाली. युवराजही बापाची मुळीच पर्वा न करणारा निघाला. शेवटीं युवराजांनी ब्राह्मणाचा मुलगा बली देऊन टाकण्याचा सल्ला वडिलांस

दिला व तो राजाने मानला व त्याप्रमाणे आपल्या प्राणांच्या बचावासाठी ब्राह्मण-पुत्राच्या गळयावर सुरी ठेवण्यास हे क्षत्रिय व क्षत्रियकुमार तयार झाले !!

( १ ) नवस करून तो न फेडणें, ( २ ) देवाशींसुद्धा निरनिराळे लपंडाव करणें, ( ३ ) बापाच्या गुंतलेल्या वचनाची मुळींच पर्वा न करतां राजकुमाराचें घरांतून जाणें, ( ४ ) बाप आजारी पडला, तरी त्याच्या समाचारासुद्धा न येणें, व ( ५ ) शेवटीं दुसऱ्याचा मुलगा बळी देऊन आपला जीव वाचवणें, या गोष्टी वरील कथेंत क्षत्रियांनी केल्या आहेत.

## ब्राह्मणी संस्कृति.

वरील गोष्टींत ब्राह्मणी संस्कृतीचा जो उदारपणा दिसतो, तो हा आहे. ( १ ) आपल्या देशच्या राजावर व राजपुत्रावर जिवावरचें संकट आलें आहे, असें पाहतांक्षणीं आपल्या कुटुंबांतील एका माणसाचा बळी देण्यास तत्काळ तयार होणें. ( २ ) आपणांस बळी जावें लागणार, हें समजलें असून मुलाचें बापाच्या आज्ञेंत राहून राजपुत्राबरोबर जावयास तयार होणें. ( ३ ) [ **दद्यात् राजा, न याचेत** । म. भा. शां. ६०।१३ ] राजाने दान द्यावें, पण राजाने स्वतः दान घेऊं नये, या नियमाप्रमाणे क्षत्रियाने फुकट दान घेतलें असतां, त्याचा अधःपात होतो, म्हणून मुलाच्या मोबदल्यांत त्याचें मूल्य म्हणून कांही गाई घेऊन दान घेण्यापासून होणाऱ्या अधःपातापासून क्षत्रियाचा बचाव करणें व त्या योगाने राष्ट्राचें रक्षण करणें.

या गोष्टीमध्ये जी क्षत्रिय–संस्कृति व जी ब्राह्मणी संस्कृति स्पष्ट दिसते, ती ही आहे.

## विश्वात्म्याचा आत्मयज्ञ.

आता नरमेधामध्ये मनुष्याचा बळी देण्याची आवश्यकता आहे कीं काय, या संबंधाने येथे थोडासा विचार करणें आवश्यक आहे. शुनःशेपाला नरमेधासाठी नेला होता, हें वरील गोष्टींत आहे. या नरमेधामध्ये नरबली दिला जात असे कीं काय, हा येथे विचाराचा प्रश्न आहे. युरोपियन लोक या नरमेधाबद्दल काय म्हणतात, ते आधीं पाहूं-

These nominal victims were afterwards released uninjured, and so far as the text of white Yajurveda goes, the whole ceremony was merely emblematical, a type of the allegorical self-immolation of Purusha, Embodied Spirit or the Cosmic Man.

म. ग्रिफिथसाहेबांनी चारही वेदांचें भाषान्तर केलें आहे व पुरषमेधा-संबंधानें त्यांनी वरील वाक्य लिहिलें आहे. जर पुरुषमेधामध्ये हिंसा, वध किंवा नरमांसाचा थोडातरी संबंध असता, तर युरोपियन लोकांनी तो जगजाहीर केला असता; पण वैदिक वाङ्मयामध्ये नरमेध हा मांसाच्या हवनाशिवाय केला जात असे, असेंच सर्वांचें मत आहे. वरील उताऱ्याचा आशय असा आहे—

" हे बली कोणत्याही प्रकारची दुखापत न करतांना पुढे सोडून दिले जातात व हा सर्व नरमेधाचा विधि केवळ आलंकारिक रीतीनें विराटपुरुषाचें आत्मबलिदान दाखवण्यासाठी रचला आहे. " ( म० ग्रिफिथ. शु. य० अ ३० पहा )

नरमेध, अश्वमेध, गोमेध, अजमेध, पितृमेध, गृहमेध, सर्वमेध या सर्व यज्ञामध्ये कोणत्याही प्रकारें हिंसा, वध किंवा मांस–हवन यांची मुळीच आवश्यकता नाही; पण ही गोष्ट जरी आज एका बाजूस ठेवली, तरी नरमेध हें एक विश्वात्म्याचें स्मारक किंवा विश्वात्म्याच्या आत्मयज्ञाचें प्रत्यक्ष प्रदर्शन आहे.

## या गोष्टींतील गूढ तत्त्व.

हरिश्चन्द्राला शंभर बायका असून, तो निपुत्रिक; अजीगर्ताला खावयाला नसतांही त्याला एका बायकोच्या पोटीं तीन मुलगे; नवस न फेडल्यानें राजाला उदररोग होणें, अजीगर्ताचा मुलगा बली दिल्याचें नाट्य करतांच तो राजा बरा होणें, पण शेवटीं त्या ऋषीचा पुत्र कायमचा दूर होणें, इत्यादि ज्या गोष्टी या कथेमध्ये आल्या आहेत, त्या इतिहासिक मानणें कठीण आहेत. ब्राह्मणग्रंथांत अशा गोष्टी बहुतेक ठिकाणीं आलंकारिक तऱ्हेनें लिहिलेल्या आहेत. तशीच ही गोष्ट आहे. हें कसें तें आपण पाहूं—

या गोष्टींत दोन भाग आहेत. एक **हरिश्चन्द्र**, त्याच्या शंभर बायका व

त्याचा मुलगा **रोहित** यांचा भाग आहे. दुसऱ्या भागांत राजा व राजकुमार यांचा प्राण वाचवणारा **अजीगर्त** ऋषि व त्याचा मध्यम कुमार **शुनःशेप** यांचा समावेश होतो. वरुण देवाचाही एक भाग आहे, पण त्याचा संबंध हरिश्चन्द्राला वर देण्याच्या बाबतींत असल्यामुळे त्याचा विचार पहिल्या भागाच्या विचारांत अन्तर्गत होण्यासारखा आहे. म्हणून या गोष्टीच्या मूळ तत्त्वाचा विचार करावयाचा असतांना या दोन विभागांचा विचार केला पाहिजे, म्हणजे आपणांस या गोष्टीच्या मुळांत जें तत्त्व आहे, तें कळून येईल.

## बहुपत्नीत्वापासून हानि.

अनेक बायका केल्यामुळे पुरुष निर्वीर्य होत असल्यामुळे व त्याच्याकडून गृहस्थाश्रमांत पाळणें आवश्यक असलेलें ब्रह्मचर्य– ऋतुगामी होऊन घडावयाचें ब्रह्मचर्यही पालन होत नसल्यामुळे पुरुष निःसत्त्व होतो व त्यामुळे तो संतानोत्पत्ति करण्यास अयोग्य होतो. हा बोध सर्वांत प्रथम या गोष्टीवरून मिळण्यासारखा आहे.

बहुपत्नीत्वाचा रोग बहुत करून क्षत्रियांसच होत असतो. पुराणान्तरीं शेकडो क्षत्रिय राजे बहुपत्नीत्वामुळे निपुत्रिक झालेले व म्हातारपणापर्यंत पुत्रासाठीं हळहळत असलेले दिसतात. सोम, हरिश्चन्द्र, दिलीप, दशरथ हे व अशांसारखे अनेक दुसरे राजे आहेत. सध्याच्या क्षत्रिय संस्थानिकांनासुद्धा या रोगानें सोडलेलें नाही. तेव्हा क्षत्रियांनी विशेषतः व इतरांनी सामान्यतः या गोष्टीपासून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. हरिश्चन्द्र राजाला शंभर बायका होत्या व खाण्यापिण्यासही हवें तितकें होतें; पण त्यास एकही पोर होत नाही व अजीगर्त ऋषीला एक बायको असतां व घरांत अठरा विसवे दारिद्र्य असतांही राजाला वाचवणारे धडधाकट तीन कुमार होतात, यावरून एकपत्नीव्रताचें महत्त्व व बहुपत्नीव्रताचें हीनत्व सहज समजून येणार आहे. सामाजिक चालीरीतींच्या संबंधाचा हा बोध येथे घेण्यासारखा आहे. तरी ज्या तत्त्वावर ही कथा रचली आहे, तें निराळेंच आहे. तें पाहण्यासाठीं आपणांस निराळ्या दृष्टीनें या कथेंतील पात्रांचा विचार केला पाहिजे.

वैदिक भाषेमध्ये ' चन्द्रं ' या नपुंसकलिंगी शब्दाचे अनेक अर्थ आहेत; त्यांत " सुवर्ण, रौप्य व कान्त– लोह ' असेही अर्थ आहेत. म्हणून वैद्यशास्त्रांत

' चन्द्र ' शब्द ज्या औषधांच्या नांवामध्ये येत असतो, त्या औषधांत सुवर्ण, रौप्य किंवा लोह कमी-आधिक प्रमाणांत असतें. या अर्थापैकी ' लोह ' हा अर्थ ' हरिश्चन्द्र ' या शब्दांत येथें अभीष्ट आहे.

वेदामध्ये ' हरित, हरित्, हरिस्, हरिमाण, ' हे शब्द ' निस्तेज, फिका, फिक्कट, पिवळट, कळकट, हिरवट ' या अर्थानें येत असतात. म्हणून 'हरिस्+चन्द्र ' किंवा ' हरित्+चन्द्र ' या दोन शब्दांचा संयुक्त अर्थ असा होऊं शकतो- " ज्यामधील लोह निस्तेज झालें आहे, ज्याचा वर्ण अगदी कळकट, निस्तेज, हिरवट असा झाला आहे. ज्याच्या अंगावर तेज मुळींच नाही, असा जो असतो तो. "

मनुष्याच्या शरिरांतील रक्तांत कांही विशेष प्रमाणामध्ये लोह असतें. तें ज्या प्रमाणांत असावयास पाहिजे, त्या प्रमाणांत असलें व त्यास प्राणवायूचा पूर्ण संबंध घडूं लागला, म्हणजे त्यामुळे रक्तास लाल रंग येत असतो. रक्तांतील लोह म्हणजे चन्द्र कमी झाला किंवा त्यास भरपूर प्राणवायु मिळेनासा झाला, म्हणजे त्याचें शरीर हरिद्वर्णाचें म्हणजे पिवळट, फिक्कट व निस्तेज होत जातें. या पांडु-रोगाच्या अवस्थेंत असणाऱ्या माणसाचें नांव हरिश्चन्द्र किंवा हरिच्चन्द्र होय. या सांकेतिक शब्दावरून अशा मनुष्याची कल्पना करावयाची आहे की, ज्या रोग्याच्या शरिरांतील रक्तांत लोहाचें प्रमाण कमी झालें आहे व जें कांही लोह आहे, त्याला शुद्ध होण्याला हवा तितका शुद्ध वायु ज्याच्या शरिरांत मिळत नाही असा रोगी. याचें विशेष स्पष्टीकरण होण्यासाठी वाचकांनी एखाद्या गोऱ्या माणसाचें शरीर पहावें, म्हणजे त्यांस असें आढळून येईल की, कांही धमन्या हिरवें रक्त घेऊन हृदयाकडे जात आहेत व हृदयाकडून येणाऱ्या धमन्या लाल रक्त घेऊन येत आहेत. शरीरभर फिरल्यामुळे ज्या रक्तांत पुष्कळ मळ साठला आहे, तें रक्त हिरवट किंवा हरित् वर्णाचें होतें. जोंपर्यंत शरीर निर्दोष असतें, तोंपर्यंत हें रक्त छातींत येऊन तत्काळ शुद्ध होऊन पुनः शरिरांत संचार करावयास जातें; पण ज्याच्या शरिरांतील लोहाचें प्रमाण कमी होतें व विपुल प्राणवायु ज्यास मिळत नाही, त्याच्या शरिरांत दूषित हिरवट रक्ताचें प्रमाण वाढत जातें व शेवटीं सर्व शरीर निस्तेज होतें. ब्रह्मचर्य न पाळणें, बहुपत्नीगमन करणें, किंवा

असले अत्याचार करणें, नेहमी झनानखान्यांत राहणें व मोकळया हवेंतील व्यायाम न करणें, या व अशासारख्या इतर कारणांनी हे रोग होतात व अशा माणसाला कितीही जरी बायका असल्या, तरी संतति होणें शक्य नसतें. आपल्या कथेंतील हरिश्चन्द्र राजाला याच कारणामुळे संतान होत नव्हतें.

नारद ऋषीने या पण्डुरोगी निस्तेज हरिश्चंद्राला पाहून वरुणोपासना करावयास सांगितलें. येथे " नारद " म्हणजे कोण, तेंही पाहिलें पाहिजे—

**नरस्य धर्मो नारं, तत् ददाति इति नारदः ।**

" मनुष्याच्या मानवी धर्माला नार म्हणतात. जो या धर्माचा उपदेश करतो, त्याचें नांव नारद होय. " मनुष्याने कसें वागलें असतां त्यास असले रोग होणार नाहीत व उत्तम संतति होईल, या संबंधाचे नियम समजाऊन सांगणारा जो असतो, त्या सल्लामसलत देणाऱ्या विद्वानाचें हें नांव आहे. याने हरिश्चन्द्राला वरुणाची उपासना करावयास सांगितलें.

वरुणाची उपासना करण्यास समुद्रतीरीं जावें लागतें; कारण वरुण हा महासागरांचा देव आहे. नारदाने हरिश्चन्द्राला प्रथम हें सांगितलें की, तूं घरीं न राहतां समुद्रतीरावर हवापालट कर व तेंथील प्रणवावायूचें सेवन कर. वरुण या शब्दाचा अर्थ 'प्राणवायु' असाही आहे. सर्वांनी जीवनासाठी ( व्रीयते स्वीक्रीयते सःवरुणः ) जो स्वीकारला जातो, तो वरुण होय. हा समुद्रावर विपुल मिळतो. वरुणाच्या साम्राज्यामध्ये हा भरपूर असतो. नारदाने आपल्या उपदेशाने हरिश्चन्द्राला बायकांपासून दूर केलें, समुद्रतीरीं नेलें व छातींत अधिक प्राणावायु जावा, म्हणून प्राणायामही करावयास सांगितलें असावें.

पुत्रासाठी तडफडत असणाऱ्या क्षत्रियराजाने हें केल्याबरोबर वर्ष दोन वर्षांनी त्यास 'रोहित' नांवाचा मुलगा झाला. संस्कृतमध्ये '**र व ल**' हे एकमेकांच्या स्थानीं येतात. या नियमाप्रमाणे '**रोहित व लोहित**' हे एकच मानणें शक्य आहे. लोहित म्हणजे '**लोह+इत**' ज्यांत लोह आहे तो. ज्यांत असावें तितकें लोह, असाव्या तशा स्थितींत आहे, तो मनुष्य लोहित किंवा रोहित होय.

नारदाचा उपदेश मिळण्यापूर्वी जो हरिश्चन्द्र म्हणजे निस्तेज क्षीण—लोह होता, त्यालाच नारदाचा उपदेश पाळल्याने रोहित किंवा लोहित म्हणजे ' लाल वर्णाचा

तेजस्वी पुत्र' झाला. त्याच्या रक्तांतील लोह उत्तम स्थितींत आला व संततीही तेजस्वी झाली. पंडुरोग्याच्या शरिरांतील प्रत्येक रक्ताणु हरिश्चंद्राच्या अवस्थेमध्ये-च असतो व जोंपर्यंत ब्रह्मचर्य पाळलें जात नाही व प्राणवायूचा पूर्ण संबंध होत नाही, तोंपर्यंत तो त्याच निस्तेज स्थितींत राहतो व वरील नियम पाळले जाऊं लागले, म्हणजे प्रत्येक रक्ताणु रोहित म्हणजे लालबुंद होत असतो. **लोहित** व **रोहित** हे शब्द रक्ताचे वाचक असून, त्याबरोबरच ते लाल रंगाचेही वाचक आहेत.

चन्द्राचें स्थान बाह्य विश्वांत अन्तरिक्ष व शरिरांत अन्तःकरण म्हणजे हृदय आहे. याच हृदयांत क्षीणचन्द्र किंवा पूर्णचन्द्र दोनही प्रकारचे रक्ताणु रहात असतात. पाण्डु रोग्याच्या हृदयांत क्षीणचन्द्र, हरिचन्द्र किंवा हरिश्चन्द्र नामक रक्ताणु असतात व निरोगी माणसाच्या हृदयामध्ये पूर्णचन्द्र तेजस्वी रोहित वर्णाचे लाल रक्ताणु असतात. क्षीण चन्द्र रक्ताणु ज्या हृदयामध्ये राहतात, त्या सर्व हृदया-लाही जर आपण तेंच नांव दिलें, तर त्यापासून निघणाऱ्या व त्याला पुढे शाखा फुटून होणाऱ्या शंभर धमन्या या हृदयाच्या बायका आहेत, असें आलंका-रिक रीतीने मानतां येणें शक्य आहे व हा हृदयरूपी क्षीणलोह हरिश्चन्द्र आपल्या पत्नीरूपी शंभर नाड्यांमध्ये लाल रंगाचा एकही रक्ताणु राहिला नाही, असें म्हणून विव्हळत आहे, ही आलंकारिक गोष्ट या ठिकाणीं काय बोध देत आहे, तें वाचकां-नी पहावें. हा जेव्हा वरुणाची—पूर्वी सांगितल्याप्रमाणे समुद्रतीरावर जाऊन तेथील शुद्ध प्राणवायूची— भक्ति करतो, म्हणजे त्याचें सेवन करतो, तेव्हा त्याचे रक्ताणु पुनः रोहित किंवा लोहित म्हणजे लाल रंगाने युक्त होत जातात. हा परस्परसंबंध पाहिला म्हणजे वाचकांच्या लक्ष्यांत येईल की, हें हरिश्चन्द्रराजा-च्या कथेचें रूपक आपल्या हृदयांतील रुधिराभिसरणाच्या व्यवस्थेचा एक सिद्धांत दाखवण्यासाठी आहे.

प्राणवायूच्या सेवनाने एक वेळ रक्ताणु जरी लालबुन्द झाला, तरी पुनःपुनः तो वरुणाला अर्पण होत राहिला, म्हणजे प्राणवायूशीं संबंध जोडीत असला, तरच ठीक आहे, तसें न झालें, तर जलोदर होणें अपरिहार्यच आहे. वरुणाची उपासना करण्याने रक्त ( लोहित ) लाल होतें व वरुणाच्या ( प्राणवायूच्या ) अवकृपेने

रक्त निस्तेज होऊन उदररोग होतो, यांतील तत्त्व आरोग्यशास्त्राच्या दृष्टीने हें असें सत्य आहे.

रक्तांतील प्रत्येक अणूला स्वतः नवीन रक्ताणु बनतांच येत नाहीत. बाहेरच्या अन्नाच्या रसाचे परमाणु रक्ताच्या रूपांत परिणत करावे लागतात, म्हणजे रक्ताचे परमाणु बनवावयाचे असतां, त्यासाठी अन्नरसाच्या परमाणूंचा बलि घेणें आवश्यकच असतें. हें काम दाखवण्यासाठी वरील गोष्टीत अजीगर्त ऋषीची कल्पना केलेली आहे. ' अजीगर्त ' हा ' **अन्न-जीर्ण-गर्त** ' म्हणजे ' अन्न पचविण्याचा खड्डा, ' होय. ' गर्त ' म्हणजे खड्डा. ज्या खड्ड्यामध्ये अन्न जीर्ण होत असतें, पचत असतें, तो पोट या नांवाचा खड्डा होय. किंवा "अज्यै गर्तः" म्हणजे गतीसाठी ज्या खड्ड्यामध्ये सोय केलेली आहे तो खड्डा म्हणजे पोटच होय. यांत अन्न यावें, तें पचावें व तेथून पुढे निघून जावें, अशी सोय केलेली आहे. म्हणून याचें नांव ' अजी-गर्त ' होय. गोष्टींत या अजीगर्ताला ब्राह्मण मानलें आहे. ब्राह्मण हा आपणांसाठी कांही ठेवीत नसतो. जें आपणांस प्राप्त होईल, तें तो सर्वांस देऊन टाकतो. त्याचप्रमाणे हा पोटरूपी अन्न पचविण्याचा खड्डाही जें त्यांत पडेल, तें सर्व शरिरासाठी देऊन मोकळा होतो, म्हणून त्यास येथे ब्राह्मण म्हटलें आहे. मिळालेले पदार्थ जेव्हा पोट पचवून त्या सर्वांना सर्व शरिरासाठी देऊन टाकतें व आपणांसाठी शिल्लक कांहीएक ठेवीत नाही, तेव्हाच शरिराचें आरोग्य कायम राहतें; पण जेव्हा आलेलें अन्न पोट आपणांकडेच ठेवतें, तेव्हा अजीर्ण होऊन सर्व शरीर रोगी होतें, हा सामान्यतः पोटाचा स्वभाव झाला. आता आपल्या कथेकडे आपण वळूं–

या अजीगर्ताचे तीन मुलगे. शुनःपुच्छ, शुनःशेप व शुनोलांगूल. या तीनही नांवामध्येही पहिला शब्द ' **श्वान** ' हा आहे. ' **श्व-न** ' म्हणजे ' जो उद्या रहात नाही तो.' तीनही मुलगे उद्यापर्यंत न राहणारे आहेत. पोटांत घातलेलें अन्न उद्यापर्यंत म्हणजे २४ किंवा ३६ तास पोटांतच राहतां नये. कालचें अन्न जर आतापर्यंत तसेंच पोटांत राहिलें, तर पोट बिघडलें आहे, असें समजावें. म्हणून पोटांत गेलेल्या अन्नाचे तीन भाग होतात व त्या विभागांना ( श्वःन ) ' उद्या न राहणारे ' म्हणजे ' आजच्या आज रूपान्तर पावणारे '

अशा अर्थाचीं नांवें दिलेलीं आहेत. मधला ' शुनःशेप ' हाच आपल्या कथेचा नायक आहे. ' शेप ' म्हणजे मनुष्याचें वीर्य. ' पुच्छ ' म्हणजे ( end of any-thing ) अन्नाचा शेवटचा भाग मल व ' लांगूल ' म्हणजे ( Mambrium virile ) सप्तधातूंचा साठा ज्या ज्या ठिकाणीं किंवा ज्या ज्या केन्द्रांत राहतो तो. अन्नाचे तीन भाग होतात. मुख्य सत्त्वाचें वीर्य बनतें, निरुपयोगी भागाचा मल बनतो व राहिलेल्या भागाचे इतर वीर्यधारक अवयव बनतात. हे सर्व भाग प्रतिदिवशीं बदलत असल्यामुळे त्यांना ते ( श्वा-न ) उद्या टिकणारा नाहीं, उद्या याचें निराळेंच रूप होणार, असें सुचविण्यासाठी अशी शब्दयोजना केलेली आहे.

अजीगर्ताच्या या तीन मुलांपैकी वीर्यवर्धक " शुनःशेप " हा हरिश्चन्द्राला विकत दिला जातो. याचा अर्थ हा आहे कीं, पोटामध्ये जें अन्न जातें, त्यापैकी रक्त बनण्यास उपयोगी असा अन्नरस रक्त बनवण्याच्या स्थानीं रक्त बनवण्या-साठी पाठवला जातो. याप्रमाणे अजीगर्ताच्या मधल्या मुलाच्या बलिदानाने हरिश्चन्द्राचा मुलगा वाचतो व प्रतिक्षणीं अजीगर्ताचा एक एक मुलगा बली दिला जातो व त्या योगाने रोहित-लोहित-रक्त वाढत जातें. **अजीगर्ताच्या वंशाच्या बलीनें ' लोहिता ' ची वृद्धि प्रतिक्षणीं होत आहे.** आपल्या मुलावर शस्त्र धरणें अजीगर्ताला आवश्यकच आहे. आंत आलेल्या प्रत्येक कणाचे तीन भाग करून एक रक्त बनविण्याच्या कामाकडे दिला जातो, एक आपल्या वाढीस ठेवला जातो व एक आतडींतून खाली मलरूपानें बाहेर जातो. ही अजीगर्ताच्या तीन कुमारांची व्यवस्था आहे. याप्रमाणे हा शुनःशेपाचा बली लोहित ( रोहित ) वाढवण्यासाठी आपल्या शरीरांत दररोज दिला जात आहे. पोटांत आलेल्या अन्नांशांतील सत्त्वाचा उपयोग जर लोहित-रक्तवृद्धीसाठीं न होईल, तर मनुष्य थोड्याच दिवसांत लयास जाईल. म्हणून लोहितासाठी अजीगर्ताच्या कुळाचा बळी अवश्य दिलाच पाहिजे. **अ-जी-गर्त** ( अन्न जीर्ण करण्याचा खड्डा ) हें आपलें पोट आहे, सर्व अन्ननलिका ( आतडीं ) ही त्याची एकुलती एक धर्म-पत्नी आहे व त्यामध्ये लोहितवृद्धि करणारा अन्नरस, शरीरधारक मध्यम अन्नभाग व तिसरा अधोभागीं जाणारा मल हे तीन त्यांचे मुलगे. यांपैकी मुख्य भागाचा

*

बली देऊन हा अजीगर्त हरिश्चन्द्राचें कुळ वाढवतो व या शरीररूपी राष्ट्राचें रक्षण करतो.

हरिश्चन्द्राला 'पुत्र' पाहिजे असतो. पुत्र म्हणजे (पु+त्र) पु नामक अपवित्रतेच्या दोषापासून रक्षण करणारा, नवीन तरतरीत रक्ताणु पाहिजे असतो. पुत्र शब्दाचा अर्थच 'नरकापासून वाचवणारा व मलापासून रक्षण करणारा' असा आहे. इकडे अजीगर्ताला मुलाची पर्वा नाही. तो 'उद्या नाही' अशा अकिंचन वृत्तीचा आहे. ब्राह्मणाला दोन दिवसांचेंही अन्न घरांत ठेवतां येत नाही. मुलें झालींच तर तीं-सुद्धा 'उद्या टिकणारीं नसल्यामुळे' राष्ट्रोद्धारासाठी तो तीं देण्यास तयार असतो.

या शब्दार्थातील श्लेषांची कल्पना नीट झाली, म्हणजे वाचकांस तेव्हाच कळून येईल की, हा शुनःशेपाचा नरमेध आपल्या देहांत प्रत्येक दिवशीं चालू आहे. ज्या दिवशीं अजीगर्त हरिश्चन्द्रासाठी आपल्या पुत्राचा बली देईनासा होतो, त्या दिवशीं मनुष्याच्या जीवाला येथून प्रस्थान करण्याची तयारी करावी लागते.

पुष्कळ लोकांना 'मेध' म्हणजे काय, तेंच कळत नसतें. "मेध्" धातूचे 'संगति, मेधा व हिंसा' हे तीन अर्थ आहेत. मेध शब्दामध्येही हे अर्थ आहेत.परस्पर भिन्न शक्तींची संगति किंवा मेलमिलाफ करणें, बुद्धि वाढवणें व या दोन कार्या-मध्ये जे विघ्न करतील, त्यांचा नाश करणें, इतका आशय मेधामध्ये आहे. नरमे-धामध्येही भिन्न शक्तींचा मेळ घालणें, मेधाबुद्धि वाढवणें व या कार्यामध्ये जे विघ्न करतील त्यांना दूर करणें, या तीन कार्यांचा अन्तर्भाव होत असतो. आपल्या शुनःशेपाच्या गोष्टीमध्येही हरिश्चन्द्र व अजीगर्त यांच्या भिन्न शक्तींचा एका कार्यासाठी मिलाफ झाला आहे, मेधावृद्धि झाली आहे व रोगादि आपत्तींचा नाशही झालेला आहे. मानवी समाजामध्येसुद्धा परस्पर संघटन होऊन मनुष्य-मात्राची बुद्धि-शक्ति वाढावी व मानवी शत्रु दूर केले जावे, अशा स्वरूपाचा नरमेध पूर्वी जसा होत होता, तसा तो आजही कोण करील तर तें इष्टच आहे. पण त्यांत हवनासाठीं कोणाचा घातपात करण्याची मुळीच आवश्यकता नाही.

पितृमेधामध्येही वडिलांच्या संगतींत राहणें, त्यांच्या उपदेशानें आपली मेधा वाढवणें व त्यांस जे त्रास देतील, त्या शत्रूंला दूर करणें, हें त्रिविध कार्य मुख्य

आहे. यावरून मेध शब्दाचा अर्थ किती गंभीर आहे, याची कल्पना वाचकांस होईल.

या लेखामध्ये या कथेचा सर्व बाजूंनी विचार केला आहे. मूळ कथा जशी लिहिली आहे, तशीच घडली, असें मानूनच प्रथम विचार केला व त्यामध्येही कोणत्याही प्राण्याचा वध झालेला नाही, हें दाखवलें. आलंकारिक दृष्टीनेही या गोष्टीचा विचार करून हें कथानक आपल्याच शरिरामध्ये प्रत्यहीं कसें घडत आहे, हेंही सिद्ध केलें आहे. तसेंच ज्या अन्य रीतींनी या कथेचा विचार होऊं शकतो, त्या सर्व बाजूंचा विचार या ठिकाणीं केलेला आहे. कोणत्याही रीतीने पाहतां या कथेमध्ये कांही आक्षेपार्ह आहे, असें दिसत नाही.

वरील कथेचें शारीर शास्त्राच्या दृष्टीने केलेलें स्पष्टीकरण हें डॉ० संगतराम नांवाच्या पंजाबी संशोधकांच्या लेखावरून दिलें आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, पूर्वी अशा शास्त्रीय कथा ( Scientific stories ) लिहिण्याची परिपाठी होती व त्यांपैकी ही ( Biological story ) शारीर शास्त्रांतील एका घटनेवर रूपकालंकाराने लिहिलेली ही कथा आहे.

ही कल्पना खरी असो वा नसो, डॉ० संगतरामांनी या कथेंतील शब्दांची उत्तम संगति लावली आहे, हें खरें. आपण या ठिकाणीं ही कथा इतिहासिक मानूनच विचार करणें अधिक पसंत करतों. इतिहासिक मानतां येत नाहीत, अशा घटना या कथेंत मुळीच नाहीत. तेव्हा जी कथा इतिहासिक ठरणें शक्य आहे, ती रूपकालंकाराने खुलविण्याचें कांहीएक कारण दिसत नाही.

डॉ० संगतरामांची कल्पना आम्ही येथे एवढ्यासाठी दिली आहे की, त्यांच्या स्पष्टीकरणावरून एक नवी दृष्टि वाचकांच्या समोर यावी. शास्त्रीय कथांमध्ये सर्व शास्त्रांच्या घटनांच्या आधारावर पौराणिकांनी कथा रचल्या आहेत. विशेषतः ज्योतिषशास्त्रांतील घटनांवर पुष्कळच कथा आहेत. अहल्येची कथा या स्वरूपाची असावी, असें आम्हांस वाटतें, तें आम्ही वैदिक वचनांचा विचार करून यापूर्वी दाखवलें आहेच.

शुनःशेपाच्या बलिदानाची जी कथा ऐतरेय ब्राह्मणांत आलेली वर दिलेली आहे व जी कथा रामायणांत आली आहे, या दोन कथांमध्ये इतकें अंतर कां असावें,

हें समजत नाही. या हरिश्चन्द्राच्या कथेचा सर्व पौराणिक कथा एकत्र करून विचार करणें योग्य आहे. वाल्मीकि कवि हे वैदिक वाङ्मयास जवळ असतांही त्यांनी ऐतरेयांतील कथा दिली नाही व निराळीच दिली, हा मुद्दा फार महत्त्वाचा असून तो विशेष विचार करण्यासारखा आहे.

या संबंधाचें संशोधन करणें, हें या ठिकाणीं अप्रस्तुत आहे; पण या कथेवरून राजा अम्बरीष हाच राजा हरिश्चंद्र आहे, हें निश्चयाने म्हणतां येईल कीं काय, हासुद्धा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आम्हांला तर याबद्दल बराच संशय वाटत आहे.

**अम्बरीष– नहुष– ययाति– नाभाग– अज– दशरथ** या पिढ्या रामायणांत दिल्या आहेत. जर अम्बरीष हाच हरिश्चन्द्र मानला, तर तो दशरथाच्या पूर्वी सहावा येतो. सहाव्या पिढींतील हरिश्चन्द्रासारख्या विख्यात राजाबद्दल दशरथाला व वसिष्ठाला नीटशी माहिती नसावी, असें म्हणणें कधीहि योग्य होणार नाही.

दुसरें असें की, ज्या सत्यप्रतिज्ञ हरिश्चन्द्र राजाबद्दल आपल्या मनांत आदराचें स्थान आहे, तो ऐतरेय कथेंतहि दिसत नाही व रामायणकथेंतहि दिसत नाही. स्वप्नांत दान दिलें, हेंसुद्धा ज्याने खरें करून दाखवलें व त्यासाठी अनंत कष्ट भोगले, तो हरिश्चन्द्र कांही ऐतरेयांतील वरुणदेवाला फसवूं पाहणारा हरिश्चन्द्र नव्हे व रामायणांतील अम्बरीषही नव्हे; पण ऐतरेयाने आपल्या हरिश्चन्द्राला '**ऐक्ष्वाक**' म्हटलें आहे. तेव्हा इक्ष्वाकुकुलांत अनेक हरिश्चन्द्र झाले असतील, पण असें म्हणावें तर सर्वत्र शुनःशेप एकच दिसत आहे व विश्वामित्रही एकच आहे. तेव्हा या कथेचा विचार सर्व पुराण–वाङ्मय पाहून विस्ताराने केला पाहिजे, एवढेच येथे सुचवितों.

## रामायणांतील उपकथा.

रामायणामध्ये १५।१६ उपकथा आल्या आहेत, त्या कथा संक्षेपाने वर देऊन, त्यांपासून रामलक्ष्मणांच्या मनांवर कोणता बोध ऋषींनी ठसविण्याचा यत्न केला, तें दाखवलें. आता अति संक्षेपाने तोच विषय येथे पुनः दाखवावयाचा आहे–

| कथा | बोध |
|---|---|
| १. **वामनाची कथा** | = स्वराज्याची श्रेष्ठता. |
| २. **कामदहन** | = कामविकार प्रबल होऊं देऊं नये. |
| ३. **ताटिकावध** | = देशहितासाठी स्त्रीवधहि करावा. |
| ४. **मन्थरावध** | = ” ” ” |
| ५. **भृगुपत्नीवध** | = ” गुरुपत्नीवधहि ” |
| ६. **सुबाहुवध** | = ” राक्षसवध करावा. |
| ७. **ब्रह्मपुत्र कुश** | = प्रजापालन हाच पुण्यसंचय करण्याचा उत्तम उपाय आहे. |
| ८. **कार्तिकेय** | = उत्तम सेनापतींच्या कौशल्याने विजय मिळतो. |
| ९. **गंगावतरण** | = चार पिढ्या एकाच ध्येयाने काम करून यश मिळविलें. |
| १०. **समुद्रमन्थन** | = संघटनेने कार्य करून फायद्याच्या वाटणीच्या वेळीं आपसांत भांडूं नये. |
| ११. **अहल्येची कथा** | = परस्त्रीगमनानें इन्द्राचेंहि यश कमी होतें, म्हणून असलें पाप कोणीहि करूं नये. |
| १२. **विश्वामित्र-कथा** | = एकच ध्येय पुढे टेऊन उन्नति करून घेतली. |
| १३. **त्रिशंकूची कथा** | = अयोग्य मनुष्याचें सहाय्य घेऊं नये. फसवणूक होते. |
| १४. **अम्बरीष ,,** | = क्रोध व अविचार यांपासून दुष्परिणाम होतो. |
| १५. **विश्वामित्र-मेनका** | = कामविकारापासून आपलें रक्षण करावें. |
| १६. **परशुराम-कथा** | = क्षत्रियवध करूं नये व क्षत्रियांनीही उन्मत्त होऊं नये. |

या उपकथा रामलक्ष्मणांला सांगितल्या गेल्या, त्या कांही त्यांचें मनरंजन करण्यासाठीच केवळ सांगितलेल्या नाहीत. त्या काळीं व त्यांच्या पूर्वकाळीं क्षत्रियांमध्ये जे दुर्गुण उत्पन्न झाले होते, त्यांपासून रामलक्ष्मणांला सर्वथा अलिप्त ठेवावें व या तरुणांमध्ये उत्तम सद्गुण वाढावे, व हे राष्ट्रकार्य करण्यासाठी विशेष शिस्तीने तयार व्हावे, म्हणूनच या कथा सांगितल्या आहेत. या दृष्टीने या

कथांकडे वाचकांनी पहावें.

यांशिवायहि कांही बारीकसारीक आणखीहि कथा बालकाण्डांत आल्या आहेत. त्या पूर्ण नसल्याने त्यांचा विचार आम्हीं येथे केला नाहीं; पण वाचकांनी त्यांचा-ही या दृष्टीने विचार करावा.

यांपैकी, कांही कथा काल्पनिक किंवा रूपकालंकाराने रचलेल्या आहेत. उदाहरणार्थ – **मदनदहन, गंगावतरण, समुद्रमंथन अहल्यासमागम, त्रिशंकु.** या कथा खऱ्या घडलेल्या नव्हेत. **कामदहन** हें मानसिक क्षेत्रावरील वस्तुस्थितीचें रूपक आहे. **गंगावतरण** हें भगीरथाने जो कालवा हिमालयांतून काढला, त्यावरील रूपक आहे. **समुद्रमंथन** प्रथम दोन प्रबळ राष्ट्रांत सख्य असून, पुढे वितुष्ट आल्याचें रूपक आहे; **अहल्याकथा** ही तर उषा व सूर्य यांवरील रूपक आहे. या कथा खऱ्या नसल्या, तरी त्या जो बोध देत आहेत, तो बोध मात्र त्रिकालाबाधित असल्यामुळे खरा व उपयोगी आहे.

इतर कथा इतिहासिक आहेत; पण त्या अति प्राचीन असल्यामुळे इतिहासातीत झाल्या आहेत. कथा खऱ्या असोत वा काल्पनिक असोत, त्यांपासून जो बोध मिळावयाचा, तो मिळतोच. तथापि, यांपैकीं खऱ्या इतिहासिक असूं शकतील अशा कोणत्या व रूपकात्मक कोणत्या, हें चिकित्सेनें ठरवणें इष्ट आहे. यासाठींच तें वर संक्षेपाने दाखवलें आहे. याचा वाचकांनी अधिक विचार करावा.

## वर्णपरिवर्तन.

विश्वामित्र तपस्या करून ब्राह्मण झाला व त्यास तत्कालीन ब्राह्मणांनी आपणांत मिळवून घेतलें व कोणत्याही रीतीने त्याला निराळा मानला नाही. आणखीहि कांही क्षत्रियवंशांत उत्पन्न होऊन नंतर ब्राह्मण झालेल्यांचीं उदाहरणें आहेत; पण हे अपवाद होत. सर्वसाधारण नियम कुलाप्रमाणे वर्ण समजणें, हाच होता, हें उघड आहे. शिवाय इतक्या परिश्रमाने झालेलें वर्णपरिवर्तन हें परिवर्तितास कितीसें लाभणार ? विश्वामित्राने अर्धें आयुष्य राजवैभवांत घालविल्यानंतर तो ब्राह्मण्यप्राप्तीच्या उपायाकडे वळला. मधल्या धडपडाटीमध्ये त्याने बरेंच आयुष्य खर्ची घातलें, यामुळे ८० वर्षांच्या घरांत पोंचल्यावर त्यास ब्राह्मण्य मिळालें,

असें जरी मानलें, तरी त्याचा उपयोग काय ? या धडपडाटींत त्याच्या अर्ध्या अधिक आयुष्याचा जो नाश झाला, त्यापेक्षा राज्यपदावर राहून त्यास अधिक राष्ट्रहित करतां आलें असतें. यासाठी वर्णपरिवर्तन हा सर्वसाधारण नियम नव्हे. त्यापासून लाभही नाही व कालक्षेप मात्र विशेष होतो व तेवढें आयुष्य फुकट जातें.

**'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः !'** ( गीता ) आपआपल्या वर्णाला उचित अशीं कर्तव्यें करीत राहिल्याने मनुष्याला उत्तम सिद्धि मिळते, हाच सिद्धान्त खरा आहे व तो भीष्मपितामह, युधिष्ठिर व रामचन्द्र यांनी आपल्या आचरणांत आणून दाखवली. हे राजे उत्तम धर्मज्ञानसंपन्न असूनहि ब्राह्मण बनण्यांत यांनी आपल्या आयुष्याचा अपव्यय केला नाही व हे स्ववर्णोचित कर्तव्यें करीत राहिले. असेंच करणें सर्वांस योग्य होय. परशुराम, द्रोण, कृप आदि ब्राह्मण क्षात्रकर्मप्रवीण होते, तरी त्यांना कोणी क्षत्रिय म्हटलें नाही. क्षत्रियोचित कर्में यांनी केलीं खरीं; पण तपाकडेच यांची प्रवृत्ति राहिली व हीच त्यांच्या ब्राह्मण्याची साक्ष पटवीत आहे.

तेव्हा वर्णपरिवर्तनामध्ये आयुष्याचा बराच भाग व्यर्थ खर्चीं न घालतां, आपल्या वर्णोचित कर्तव्यामध्येच होईल तेवढी उन्नति करून—

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ।** ( गीता )

आपल्या वर्णोचित कर्तव्याने ईश्वरसेवा करून, उत्तम सिद्धि मिळवावी, हाच मार्ग सर्वांस योग्य होय.

वर्णपरिवर्तनाच्या धडपडाटीमध्ये जो आयुष्याचा भाग व्यर्थ जातो, तो भाग न व्यक्तीला उपयोगी होतो व न राष्ट्राला उपयोगी होतो. असा काल जर राष्ट्रांतील पुष्कळच व्यक्तींचा खर्च होऊन व्यर्थ जाईल, तर त्या राष्ट्राचें जें नुकसान होईल, तें कशानेहि भरून निघणार नाही. वर्णपरिवर्तन हें एक अहंकाराचें आविष्करण आहे. महत्प्रयासाने तें जरी शक्य होणारें असलें, तरी तें राष्ट्राची हानि करणारें आहे; कारण अशा परिवर्तनासाठी खटपट करण्यांत जें आयुष्य जातें, तें व्यर्थ जातें. सर्वच वर्ण राष्ट्राला सारखे उपयोगी असल्याने प्रत्येक वर्णाने आपली शक्य तितकी उन्नति करून घेणें व स्वकर्तव्य करून राष्ट्रपुरुषाची सेवा करणें, हेंच

सर्व दृष्टीने राष्ट्राच्या हिताचें आहे.

## वसिष्ठविश्वामित्रकथेचा आणखी थोडा विचार.

वसिष्ठविश्वामित्राच्या या एकंदर कथाभागावरून पाहतां प्रथम आगळीक विश्वामित्राकडून झाली आहे. वसिष्ठाने आपल्या आश्रमधर्माला अनुसरून आपल्या घरीं आलेल्या विश्वामित्राचें आदरातिथ्य केलें, म्हणून त्याची कामधेनु बळजबरीने नेण्याचा त्याला काय अधिकार होता ? अर्थात् हा जो येवढा वाद माजला, त्याबद्दल दोषी विश्वामित्र आहे, हें सांगावयास पाहिजे असें नाही.

## वादाचें स्वरूप.

( १ ) कोणी विद्वान् या वादाला आजकालच्यासारखें क्षत्रिय व ब्राह्मण यांमधील जातीय कलहाचें स्वरूप देतात; पण तें बरोबर नाही; कारण वसिष्ठ व विश्वामित्र यांचीं जीं दोन युद्धें झालीं, त्यांत वसिष्ठाच्या बाजूनेही कोणी ब्राह्मण विश्वामित्राशीं युद्ध करण्याकरिता धावून आले नव्हते आणि विश्वामित्राच्या बाजूनेही इतर कोणी क्षत्रिय राजे वसिष्ठाविरुद्ध विश्वामित्राच्या सहाय्यार्थ धावून आले नव्हते. या दोन्ही प्रसंगीं वसिष्ठाने विश्वामित्रावर स्वतः मुळींच प्रहार केला नाही. विश्वामित्राचे अस्त्रप्रहार मात्र त्याने शांततेने सहन केले व आपल्या केवळ ब्रह्मबलानेच विश्वामित्राचा निग्रह केला.

जर वसिष्ठ व विश्वामित्र यांमधील वैर आजकालच्यासारखें ब्राह्मण व क्षत्रिय यांमधील जातीय द्वेषाच्या स्वरूपाचें असतें, तर जेव्हा क्षत्रिय विश्वामित्र रामलक्ष्मणांस मागावयास आला, त्या वेळी क्षत्रिय दशरथ राजा आपलीं मुलें ( राम व लक्ष्मण ) त्याच्या स्वाधीन करीना, तेव्हा ब्राह्मण वसिष्ठाने आपली भीड खर्चून, दशरथ राजाकडून तीं मुलें क्षत्रिय विश्वामित्राच्या यज्ञाच्या रक्षणार्थ देवविलींच नसतीं. ( बालकांड सर्ग २१, श्लोक ५ ते २२ सर्गसमाप्तीपर्यंत ).

त्याचप्रमाणे ब्राह्मणाच्या एका मुलाचे प्राण वाचविण्यासाठी, आपलीं शंभर मुलें यज्ञांत बळी देण्याला क्षत्रिय विश्वामित्र कधीही तयार झाला नसता आणि तीं मुलें ब्राह्मणाच्या मुलाऐवजी यज्ञांत बळी जाण्याची आज्ञा मानीनात, तेव्हा त्या शंभरासही शाप देऊन त्याने भस्म केलें नसतें व त्या ब्राह्मणाच्या मुलाला इन्द्र

व इन्द्रानुज यांच्या स्तुतीपर दोन गाथा शिकवून त्यास प्रसन्न करून घेऊन आपला जीव वाचविणाचा मार्गही त्याने दाखविला नसता. या संबंधांत बालकांड सर्ग ६२, मुळांतूनच संपूर्ण पहावा.

कांही विद्वानांचें विधान असें आहे की, पूर्वीं परशुराम व क्षत्रियराजे यांच्यामध्ये जीं एकवीस युद्धें झालीं, त्या वेळीं वेळोवेळ पराभव झाल्याकारणाने क्षत्रिय दबले; पण त्या वेळेपासून क्षत्रियांच्या मनांत जो वैराग्नि पिढ्यान् पिढ्या धुमसत होता, त्याने या वसिष्ठविश्वामित्रांच्या युद्धाच्या रूपाने पुनः पेट घेतला; पण तसेंही म्हणतां येत नाही. कारण परशुरामाने कृतयुगांत निःक्षत्रिय पृथ्वी केल्यानंतर द्वापराचे शेवटीं कौरवपांडवांच्या युद्धापर्यंत कोणाही क्षत्रियराजाने ब्राह्मणावर आक्रमण करून त्यांची घरेंदारें जाळलीं नाहीत किंवा कोणाही क्षत्रियराजाने ब्राह्मणद्वेषाने प्रेरित होऊन ब्राह्मणांचा नाश केला नाही.

प्रसंगविशेषीं क्षत्रियांना उपनयनादि वेदोक्त संस्कार करून, त्यांस विद्यादान देऊन, धनुर्वेद पढवून, त्यांच्या आचार्यपणाचीं, त्यांच्या पुरोहितपणाचीं इत्यादि सर्व कार्यें ब्राह्मणच करीत असत आणि ते क्षत्रियही ब्राह्मणाकडून मोठ्या भक्तीने व मोठ्या पूज्यतेच्या भावनेने तीं कार्यें करवून घेत असत.

बरें, परशुरामाने जो क्षत्रियांचा संहार केला, तो कांही सरसकट सर्वच क्षत्रियांचा केला नाही. जे क्षत्रियराजे आपल्या प्रजापालनाचें कर्म न करतां प्रजांना पीडा देऊं लागले होते, ब्राह्मणांचें द्रव्य हरण करूं लागले होते, दुराचार करूं लागले होते, अशा दुष्ट क्षत्रियांचा मात्र संहार केला. जनककुळांतील, इक्ष्वाकुकुळांतील किंवा असेच इतरही जे धर्मनिष्ठ सज्जन क्षत्रिय होते, त्यांच्या वाटेलाही परशुराम गेला नाही. कारण ते क्षत्रिय आपल्या वर्णविहित मार्गावर आरूढ होते व धर्म आणि नीतीने प्रजापालन करीत होते. दुष्ट, दुराचारी क्षत्रियांना शिक्षा करण्याचा अधिकार केवळ ब्राह्मणांचाच आहे, म्हणून,–

**क्षत्रस्यातिप्रवृद्धस्य ब्राह्मणान् प्रति सर्वशः।**
**ब्रह्मैव सन्नियन्तृ स्यात् क्षत्रं हि ब्रह्मसंभवम् ॥ ३२० ॥**

( मनुस्मृति अध्याय ९ )

या मानव–धर्मशास्त्रानुसार परशुरामाने असल्या "उद्धृत" क्षत्रियांचा

संहार केला, हें योग्यच झालें. धर्ममार्ग सोडून सर्वत्र वर्णसंकर करण्यास प्रवृत्त झालेल्या वेन राजालादेखील प्राणदण्ड ब्राह्मण ऋषींनीच दिला. अपराध्याला यथान्याय दंड दिला, यांत वंशपरंपरा वैराग्नि धुमसत राहण्याचें कांहीच प्रयोजन नाहीं. जर क्षत्रियांच्या मनांत तसा वैराग्नीच धुमसत असता, तर आपल्या क्षत्रियकुलाचा समूल उच्छेद करणाऱ्या त्याच परशुरामापाशी भीष्मासारखे क्षत्रिय धनुर्वेद शिकावयास गेले असते काय ?. अथवा त्याच क्षत्रिय भीष्म पितामहांनी कौरवपांडवादि आपल्या नातवंडांना धनुर्विद्या शिकविण्यासाठीं कृपाचार्य, द्रोणाचार्य, यांच्यासारखे ब्राह्मण आचार्य ठेवले असते काय ? तसेंच भरतखंडांतील इतरही द्रुपदासारख्या क्षत्रिय राजांनी आपले राजपुत्र द्रोणाचार्यांकडे धनुर्विद्या शिकावयास धाडले असते काय ? मुळीच धाडले नसते.

कृपाचार्य, द्रोणाचार्य इत्यादि ब्राह्मणांनी कौरवपांडवादि तत्कालीन सर्व क्षत्रियांना धनुर्विद्या शिकविली. एवढेंच नव्हे तर द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न हा केवळ आपला वध करण्यासाठीच यज्ञवेदींतून उत्पन्न झाला आहे, हें माहीत असूनदेखील त्या क्षत्रिय धृष्टद्युम्नाला ब्राह्मण द्रोणाचार्यानें सांगोपांग सरहस्य धनुर्वेद निष्कपटपणें शिकविला आणि शेवटींही या ब्राह्मणवीरानें क्षत्रियांच्या बाजूनेच लढून रणांगणावर आपला देह ठेविला.

ज्या अर्थी परशुरामानें कृतयुगांत निःक्षत्रिया पृथ्वी केल्यापासून द्वापराचे शेवटीं झालेल्या भारतीय युद्धापर्यंत क्षत्रिय हे ब्राह्मणांना मुख्यत्व देऊन त्यांना अनुसरूनच वागत आले होते व धनुर्वेदादि विद्या शिकण्यास्तव ब्राह्मणाकडेसच आपलीं मुलें विश्वासानें पाठवीत होते, त्या अर्थी क्षत्रियांच्या मनांत परशुरामाच्या काळापासून ब्राह्मणाच्या बद्दल वैराग्नि धुमसत होता, हें संभवनीय दिसत नाहीं. द्रुपदराजाचें द्रोणाचार्यांशीं वैर वैयक्तिक स्वरूपाचें होतें. त्याचा परशुरामाच्या निःक्षत्रिया पृथ्वी करण्याकडे कांहीं संबंध नाहीं.

तात्पर्य, हें वसिष्ठविश्वामित्रामधलें वैर **"क्षत्रिय-ब्राह्मणा"** मधलें नव्हतें, **ब्राह्मणब्राह्मणेतरांतलें** नव्हतें. **परंपरागतही नव्हतें,** तर **वसिष्ठ व विश्वामित्र** या दोघांच मधलें **केवळ वैयक्तिक स्वरूपाचें होतें** आणि तेंही **तात्पुरतेंच** होतें, कायमचें नव्हतें.

श्रीमहाभारताच्या उपसंहारांत श्री चिंतामणराव वैद्यांनी **"ब्राह्मण व क्षत्रिय"** या मथळयाखाली पृ. २४७ वर " ब्राह्मणाचा मुलगा हाच ब्राह्मण व्हावा, असा ब्राह्मणांचा आग्रह होता; पण क्षत्रियांनी हा ब्राह्मणांचा आग्रह प्रथम चालू दिला नाही व त्याविषयी मोठा तंटा केला, ही गोष्ट आपणांस वसिष्ठ व विश्वामित्र यांच्या वादावरून स्पष्ट होते......'ब्राह्मणाचा मुलगा ब्राह्मण व्हावा व क्षत्रियाचा मुलगा क्षत्रिय व्हावा,' हा ब्राह्मणांचा आग्रह, आणि विश्वामित्राचा आग्रह असा की, 'क्षत्रियाच्या मुलाने जर आपली बौद्धिक शक्ति वाढविली, तर त्याला ब्राह्मण कां होतां येऊं नये?' अखेरीस विश्वामित्राचा जय झाला, असें विधान केलें आहे; पण हेंही सत्य नाही; कारण विश्वामित्राचा जो ब्राह्मण होण्याचा प्रयत्न होता, तो स्वतः **आपल्याचपुरता** होता. त्याने " क्षत्रियाच्या मुलाने जर आपली बौद्धिक शक्ति वाढविली, तर त्याला ब्राह्मण कां होतां येऊं नये?" अशा प्रकारचा सर्व क्षत्रिय-जातीच्या वतीने वाद उपस्थित केलाच नाही आणि स्वतःला ब्राह्मण्य प्राप्त झाल्या-नंतरदेखील सर्व क्षत्रिय–जातीनेही ब्राह्मण व्हावें, अशाविषयी पुढे चळवळ केल्याचाही उल्लेख कोठे पाहण्यांत आला नाही. त्याचप्रमाणे कोणाही क्षत्रियाला ब्रह्मकर्म करण्यास प्रतिबंधही केला नाही. उलट क्षत्रियांचें उपनयन करून, वेद पढवून त्यांस ब्रह्मकर्म करावयास ब्राह्मणच लावीत असत. एक विश्वामित्रच काय, विश्वामित्राच्या पूर्वी कित्येक क्षत्रियराजे ब्राह्मण झालेले आहेत, **त्यांना ब्राह्मणांनी कधीही अडथळा केला नाही. उलट, त्यांपैकी कांही क्षत्रियांचें यज्ञकर्मांत सहाय्यही घेतलें आहे व त्यास दक्षिणाही दिली आहे.** या संबंधांत श्रीमद् भागवतांत नवम स्कंधांत पुढीलप्रमाणे उल्लेख आहे.

**शर्यातिर्मानवो राजा ब्रह्मिष्ठः स बभूव ह।**
**यो वै आंगिरसः सत्रे द्वितीयमहमूचिवान् ॥**

( श्रीमद्भागवतस्कंध ९, अध्याय ३ )

मनूचा एक पुत्र शर्याति नांवाचा राजा होता. त्याने आंगिरस ब्राह्मणांना यज्ञामध्ये द्वितीय दिवसाचें कर्म समजावून दिलें. त्याचप्रमाणे, एकदा आंगिरस ब्राह्मण मोठें सत्र करीत असतां दर सहाव्या दिवशीं म्हणवयाचीं सूक्तें त्यास

आठवत नव्हतीं, तीं पित्याच्या आज्ञेवरून, वैवस्वत मनूचा नातू नाभाग यानें त्या ब्राह्मणांस आठवून दिलीं आणि त्या ब्राह्मणांनीही त्या नाभागास ( क्षत्रियास ), यज्ञशेष दक्षिणा दिली. या संबंधांत श्रीमत् भागवत नवमस्कंधांत चतुर्थाध्यायांत यणप्रमाणे उल्लेख आहे—

**इमे आंगिरसः सत्रं आसतेऽत्र सुमेधसः ।**
**षष्ठं षष्ठं उपेत्याह कवे मुह्यंति कर्मणि ॥ ३ ॥**
**तान् त्वं संशयसूक्तेऽह्ने वैश्वदेवे महात्मनः ।**
**ते स्वर्यन्तो धनं तत्र परिशेषितमात्मनः ॥ ४ ॥**
**दास्यन्तत ततो गच्छ तथा सकृतवान् यथा ।**
**तस्मै दत्वा ययुः स्वर्गं ते यज्ञपरिशेषितम् ॥ ५ ॥**

यावरून ध्यानीं येईल की, ब्राह्मणांनी कोणत्याही क्षत्रियाला त्याच्या ब्राह्मण होण्याच्या मार्गांत कोणत्याही प्रकारें हरकत घेतली नाही. किंबहुना, त्याला सहाय्यार्थ घेऊन उत्तेजनच दिलें आहे व त्याप्रमाणे विश्वामित्राचे पूर्वी कित्येक क्षत्रिय ब्राह्मण होऊन ब्रह्मलोकाला गेले आहेत.

आता "ब्राह्मणाचा मुलगा ब्राह्मण व्हावा व क्षत्रियाचा मुलगा क्षत्रियच व्हावा," हा आग्रह ब्राह्मणांचा मुळींच नव्हता. हा आग्रह नव्हे, तर ही श्रुतिस्मृतींची "आज्ञा" आहे व या आज्ञेला अनुसरून परम ज्ञानी वैदेह जनक, मर्यादापुरुषोत्तम प्रभु रामचंद्र, योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण आणि परम ब्रह्मचारी भीष्मपितामह इत्यादि श्रेष्ठ क्षत्रिय वागत असल्याचें इतिहासप्रसिद्ध आहे. जनक, राम, कृष्ण, भीष्म आदि क्षत्रिय हे विश्वामित्रापेक्षा नुसत्या बौद्धिक शक्तीनेंच काय, सर्व गुणांनी त्यांच्यापेक्षा अनन्तपटींनी श्रेष्ठ होते. ते सर्व प्रकारें " कर्तुं, अकर्तुं, अन्यथा कर्तुं " असे समर्थ राजे होते. मनांतच आणिलें असतें, तर त्यांनी क्षत्रियाचे ब्राह्मण करण्याची परंपरा चालू करून, अखिल जगतीतलावरील सर्व क्षत्रियांस केव्हाच ब्राह्मण करून घेतलें असतें; पण, ते फार दूरदर्शी होते.. त्यांना वैदिक आर्यांचें राष्ट्र मरूं द्यावयाचें नव्हतें, तें चिरकाल जिवन्त राहील, असें करावयाचें होतें, म्हणून ते असला सर्व क्षत्रियांस ब्राह्मण करून घेण्याचा अविचार करण्याच्या भरीस पडले नाहीत.

राष्ट्र चिरकाल जिवन्त राहण्यासाठी चार प्रकारच्या शक्तींची आवश्यकता असते. १ शिक्षक–शक्ति (ब्राह्मण), २. रक्षक–शक्ति (क्षत्रिय), ३. पोषक–शक्ति ( वैश्य ) आणि ४. सेवक–शक्ति ( शूद्र ).

यांपैकी, रक्षक–शक्तीवरच बाकीच्या तीनही शक्ति अवलंबून असल्याकारणाने राष्ट्र जिवन्त राहण्यासाठीं " रक्षक–शक्ति " म्हणजे क्षत्रिय जाति कायम ठेवण्याची विशेष काळजी घेतली पाहिजे. क्षत्रियांच्या संख्येंत एकदेखील कमी होतां कामा नये. इकडे लक्ष्य ठेविलें पाहिजे.

जनक राम कृष्णांनी जर का क्षत्रियाचे ब्राह्मण करण्याची प्रथा पाडली असती, तर कालांतराने बहुतेक सर्व क्षत्रियजातच नामशेष झाली असती आणि परचक्रापासून आर्यराष्ट्राचें रक्षण करण्यास कोणीच क्षत्रिय उरला नसता. एका क्षत्रियाला ब्राह्मण करणें म्हणजे राष्ट्राच्या संरक्षक शक्तीला तेवढ्याच अंशाने पक्षाघात करण्यासारखें आहे. अर्थात् क्षत्रियाच्या संख्येंत एक जरी क्षत्रिय कमी पडला, तर तेवढ्यानेच राष्ट्राच्या शक्तीला उणेपणा येईल व परकीय शत्रूस त्याचा फायदा घेण्यास अवसर सापडेल, याची जाणीव जनक रामकृष्णादिकांना पूर्णपणें असल्याकारणाने अंगीं सामर्थ्य असूनदेखील त्यांनी क्षत्रियांना ब्राह्मण करून घेण्याचा उपक्रम मुळीच केला नाही आणि ब्राह्मण होण्याची अंगीं सर्वप्रकारें पूर्णपणें पात्रता असूनही आपण स्वतःदेखील ब्राह्मण झाले नाहीत व "**स्वे स्वे कर्मण्यभिरतः**" या तत्त्वाला उराशीं घट्ट धरून ठेऊन आमरणान्त क्षात्र कर्म करीत राहूनच जगताला वंदनीय झाले. या कारणाने क्षत्रियजाति कायम राहिली आणि युधिष्ठिराचे पश्चात् अडीच तीन हजार वर्षें कोणाही परकीयांची भरतखंडाकडे डोळा वाकडा करून पाहण्याची छाती झाली नाहीं; पण, पुढे गौतमबुद्धाने हें तत्त्व न समजून म्हणा किंवा बुद्धिपूर्वक दुर्लक्ष्य करून म्हणा, सर्वांसच सरसकट ब्राह्मणत्वाची ( बौद्ध भिक्षूची ) दीक्षा देण्याचा सपाट चालविला. याचा दुष्परिणाम असा झाला की, पुढे ग्रीक यवनादि परकीयांनी भरतखंडावर आक्रमण केलें, तेव्हा देशांतील बहुतेक सर्व क्षत्रियवीर बौद्ध भिक्षु बनून, अहिंसा–तत्त्वाचा जप करीत मठामध्ये जाऊन बसल्याकारणाने, या परकीय शत्रूंशीं तोंड देऊन, त्यांचा प्रतिकार करण्यास उरलेली अल्पसंख्याक सना–

तनी क्षत्रिय मंडळी असमर्थ झाली आणि परकीयांनी विशेष श्रम न पडतां देश पादाक्रांत केला.

हिंदुस्थान देश परकीयांचे हातीं जाऊन कायमचा पारतंत्र्यपंकांत रुतून बसण्याचीं जीं अनेक कारणें झालीं आहेत, त्यांपैकीच– गौतमबुद्धाचें सरसकट सर्वांस ब्राह्मण ( बौद्धभिक्षु ) बनवून घेणें– हेंही एक प्रमुख कारण आहे, असें म्हटल्यास वावगें होणार नाही. असो.

आता विश्वामित्र ब्राह्मण झाला, म्हणजे काय झाला ? तो त्रैवर्णिक असल्या-कारणानें द्विज तर होताच. त्यांत त्याला नवीन तें काय व्हावयाचें होतें ? आणि त्यासाठी त्याला एवढें 'आकांडतांडव' करण्याचें प्रयोजन तरी काय होतें ? त्यास हें जें एवढें आकांडतांडव त्यानें केलें, तें इतर द्विजांसारखें सामान्य द्विज होण्यासाठी केलें नसून, ब्रह्मर्षि वसिष्ठाच्या ब्रह्मतेजापुढे आपलें क्षात्रतेज अगदी फिकें पडलें, म्हणून ईर्ष्येला चढून वसिष्ठासारखाच आपणही ब्रह्मर्षि व्हावें, एवढ्या-साठी केलें. अर्थात् विश्वामित्र ब्राह्मण झाला, म्हणजे "ब्रह्मर्षि" झाला.

त्यानें जें प्रथमतः अनेक वर्षे घोर तप केलें, तें ब्रह्मर्षि वसिष्ठाविषयी अन्तः-करणांत वैरभावानें जळफळत राहूनच केलें. तें पूर्ण झालें, तेव्हा सर्व देवगणांसह येऊन ब्रह्मदेवानें त्यास "राजर्षि" अशी पदवी दिली. ब्रह्मदेव म्हणाले—

**जिता राजर्षि लोकास्ते तपसा कुशिकात्मज ॥ ५ ॥**
**अनेन तपसा त्वां हि राजर्षिरिति विद्महे ॥ ६ ॥**

( बालकांड सर्ग ५७ )

पण, ही ' राजर्षि ' पदवी त्याला नको होती, म्हणून त्यानें पुनः तपाला आरंभ केला. याही तपाला अनेक वर्षे पूर्ण झालीं, तेव्हा पुनः देवगणांसह ब्रह्मदेव आले व "**ऋषिस्त्वमसि भद्रं ते स्वार्जितैः कर्मभिः शुभैः**" ( बालकांड सर्ग ६३, श्लोक २ ), असें म्हणून त्याला " ऋषि " अशी पदवी दिली; पण तेवढ्यानेंही त्याचें समाधान झालें नाही; कारण, त्याला ब्रह्मर्षि व्हावयाचें होतें व त्यासाठीं त्यानें पुनः तपाला आरंभ केला; पण इंद्रानें त्याच्या अंतःकरणांत कामविकार उत्पन्न करून, या तपापासून त्याला भ्रष्ट केलें. म्हणून पुनः कांहीं वर्षे घोर तप केल्यावर सर्व देवगणांसह भगवान् ब्रह्मदेव पुनः प्रकट होऊन, त्यानें

त्याला " **महर्षे स्वागतं वत्स तपसोग्रेण तोषिताः** (बालकांड सर्ग ६३, श्लोक १८ ) असें म्हणून " महर्षि " अशी पदवी दिली. तेव्हा विश्वामित्राने अत्यंत नम्रपणाने हात जोडून ब्रह्मदेवाला विनंती केली की, " **ब्रह्मर्षि शब्दं अतुलं स्वार्जितैः कर्मभिः शुभैः** " ॥२०॥ मला आपल्या तपोबलाने सर्वश्रेष्ठ अशी " ब्रह्मर्षि " ही पदवी मिळावी, अशी इच्छा आहे. हें ऐकून ब्रह्मदेव म्हणाले, " **न तावत् त्वं जितेंद्रियः** " ॥२१॥ बाबा रे ! अजून तूं जितेन्द्रिय नाहीस. यास्तव, **यतस्व मुनिशार्दूल** – हे मुनिश्रेष्ठा जितेन्द्रिय होण्याचा ( सर्व इंद्रियें जिंकण्याचा ) नेटाने प्रयत्न कर, " असें सांगून ब्रह्मदेव निघून गेले. त्यावर विश्वामित्राने पुनः दृढनिश्चयाने चवथ्यांदा तपाला आरंभ केला; पण इन्द्राने त्याच्या अंतःकरणांत क्रोध उत्पन्न करून याही तपापासून त्याला भ्रष्ट केलें. तेव्हा पुनः ईर्ष्येला चढून पांचव्यांदा त्याने अत्यंत घोर तप केलें.

या खेपेलाही त्याच्या तपामध्ये अनेक विघ्नें उपस्थित केलीं गेलीं; पण त्या सर्वांनाही दाद न देतां विश्वामित्राने अनेक वर्षेपर्यंत आपलें तप पूर्ण केलें; आणि व्रतानंतर स्नान करून उपोषणाचें पारणें करण्यासाठी भात शिजविला व आता घास घेणार, इतक्यांत इन्द्र त्याची परीक्षा पाहण्यास्तव ब्राह्मणाचा वेष धारण करून आला व मी बहुत उपोषित आहे, हा चरु मला दे, असें त्यास म्हणाला. त्याबरोबर विश्वामित्राने अंतःकरणांत कोणत्याही प्रकारें विकार उत्पन्न होऊं न देतां तो भात प्रसन्न अंतःकरणाने त्या ब्राह्मणाला (इन्द्राला ) सर्वच्या सर्व देऊन टाकिला आणि आपण नुसतें पाणी पिऊन निर्विकार अंतःकरणाने पुनः तपाला-आरंभ केला. झालें. **विश्वामित्र जितेंद्रियत्वाच्या शेवटच्या परीक्षेत उत्तीर्ण झाला.** तेव्हा सर्व देवांसह भगवान् ब्रह्मदेव प्रकट झाले आणि म्हणाले–

**ब्रह्मर्षे स्वागतं तेऽस्तु तपसा स्म सुतोषिताः ॥१९॥**
**ब्राह्मण्यं तपसोग्रेण प्राप्तवान् असि कौशिक ॥२०॥**

" हे ब्रह्मर्षे, तुझें स्वागत असो. तुझ्या तपाने आम्ही अत्यंत संतुष्ट झालों आहोंत. तूं आपल्या उग्र तपाने ब्राह्मण्य प्राप्त करून घेतलें आहेस. 'आता तूं "ब्रह्मर्षि " झालास."

याप्रमाणे भगवान् ब्रह्मदेवाने त्याला ब्रह्मर्षि म्हटलें असतां विश्वामित्र पुनः ब्रह्मदेवाला अत्यंत नम्रपणें म्हणाला— "जर असें आहे, ( म्हणजे मी खरोखर ब्रह्मर्षि झालों आहे ) तर—

**क्षत्र वेदविदां श्रेष्ठः ब्रह्मवेदविदां अपि ॥ २३ ॥**
**ब्रह्मपुत्रो वसिष्ठो मां एवं वदतु देवताः ॥ २४ ॥**

( बालकांड सर्ग ६५ )

म्हणजे 'क्षत्रिय वेदवेत्त्यांमध्येही श्रेष्ठ व ब्रह्मवेदवेत्त्यांमध्येही श्रेष्ठ' असा हा ब्रह्मपुत्र वसिष्ठ याने मला असें ( ब्रह्मर्षि ) म्हणावें." तेव्हा सर्व देवांनी ब्रह्मर्षि वसिष्ठाला प्रसन्न करून घेऊन "विश्वामित्र आता पूर्णपणें परीक्षेला उतरला आहे, यास्तव याला आता 'ब्रह्मर्षि' म्हणावें. अशी विनंती केल्यावर, ब्रह्मर्षि वसिष्ठाने देवांची ती विनंती मान्य केली आणि तो विश्वामित्राला म्हणाला—

**" ब्रह्मर्षिस्त्वं न सन्देहः सर्वं सम्पद्यते तव ॥ २६ ॥**

तूं खरोखर ब्रह्मर्षि आहेस. यांत मुळीदेखील संदेह नाही." असें जेव्हा ब्रह्मर्षि वसिष्ठाने त्याला म्हटलें, तेव्हा इच्छेप्रमाणे श्रेष्ठ असें ब्राह्मण्य ( ब्रह्मर्षित्व ) आपल्याला प्राप्त झालें, असें पाहून त्याने ब्रह्मर्षि वसिष्ठाला अत्यादराने वंदन करून त्याचें पूजन केलें व वैर करणें सोडून, त्याच्याशीं पूर्ण सख्य केलें. येणेप्रमाणे विश्वामित्र ब्राह्मण म्हणजे "**ब्रह्मर्षि**" झाला.

या एकंदर वृत्तांतावरून पाहतां विश्वामित्र ब्राह्मण्य-प्राप्त्यर्थ तप करूं लागल्या दिवसापासून त्याला कोणीही ब्राह्मणाने अडथळा केल्याचें दिसत नाही. उलट सर्व ब्राह्मणश्रेष्ठ ब्रह्मदेवाने "तुझ्यांत अमुक उणीव आहे, तेवढी पुरती कर, तूं जितेंद्रिय हो," असें सांगून त्याला उत्तेजन देऊन ब्राह्मण्य प्राप्त करून घेण्यास सहाय्यच केलें आहे, हें स्पष्टतया दिसत आहे. तेव्हा "ब्राह्मणाचा मुलगाच ब्राह्मण व्हावा, क्षत्रियाचा मुलगा ब्राह्मण न व्हावा," हा ब्राह्मणांचा आग्रह होता, हें विधान सत्याला धरून नाही, अशी विचारांतीं विद्वान् वाचकवृन्दांची खात्री होईल.

रामलक्ष्मणांला या कथा सांगून अविचारी कामक्रोधापासून आपणांस दूर ठेवण्यास सुचविल्याचें दिसत आहे. गर्व, क्रोध, अविचार यांचें प्राबल्य येथे विश्वा-

मित्राच्या कृत्यांत स्पष्ट दिसत आहे. विश्वामित्रामध्ये फार थोर गुण होते; पण गर्वानें व्यापल्यामुळे त्यांचें चीज होऊं शकलें नाही; पण त्यामध्ये दांडगी महत्त्वाकांक्षा असल्यानें त्याची शेवटीं उन्नति झाली व वरील दुर्गुणांचें सद्गुणांमध्ये परिवर्तन झालें.

असो. याप्रमाणे थोर बनलेल्या विश्वामित्रानें रामलक्ष्मणांची जनकाला ओळख करून दिली, रामानें जनकाजवळचें धनुष्य सज्ज केलें व पण जिकल्यामुळे सीतेचें रामाशीं लग्न करण्याचें ठरलें. त्याचप्रमाणे इतर तीनही बंधूंचीं लग्नें जनकाच्या व त्याच्या बंधूच्या मुलींशीं मोठ्या थाटानें झालीं.

सीतेला पणाला लावली होती, यामुळे हा **स्वयंवर** होत नाहीं. या संबंधीचा कांहीं विचार येथे करणें इष्ट आहे, तो असा.

## सीतास्वयंवर नव्हे, ' सीता–समाह्वय. '

सीतास्वयंवरावर अनेक कवींनी रसभरित काव्यें करून ठेविलीं आहेत आणि कीर्तनकार लोकही त्यांत आपल्या कल्पनेची भर घालून अधिक मनोरंजक करून, आपल्या कीर्तनांतून त्यांचें वर्णन करीत असतात. तें सर्व लोकरंजनाचे दृष्टीनें योग्य असेल; पण आपल्याला या संबंधांत मूळ वाल्मीकि–रामायणाच्या आधारानें ऐतिहासिक दृष्ट्या विचार कर्तव्य आहे. ऐतिहासिक दृष्ट्या विचार करावयास आरंभ केला, म्हणजे मूळ ग्रंथांत याला कांहीं आधार आहे काय, हें प्रथम पहावयास पाहिजे. त्यास मूळ ग्रंथांत म्हणजे वाल्मीकि–रामायणांत " बालकाण्ड सर्ग ७० पासून सर्ग ७३ चे समाप्तीपर्यन्त " हा विषय वर्णिला आहे, त्यांत राम व सीता यांचा विवाह " **ब्राह्म विवाहपद्धती** " ने झाल्याचें सर्वत्र स्पष्ट वर्णन आहे. " **स्वयंवरा** " चें कोठे नांवदेखील नाहीं. असें आहे, तर हें जें **सीता–स्वयंवर** म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहे, हें काय आहे ? असा प्रश्न साहजिकतयाच उत्पन्न होतो. त्यास आधीं " **स्वयंवर** " म्हणजे काय ? याचें स्पष्टीकरण झालें पाहिजे.

" **स्वयंवर** " म्हणजे " कन्येनें आपल्या आवडीप्रमाणे वराची निवड करावयाची व त्याला वरावयाचें. " याला " स्वयंवर " असें म्हणतात. ही

" स्वयंवर " शब्दाची व्याख्या होय. या व्याख्येला अनुसरून विचार करूं लागलें असतां " जो कोणी धनुष्याला वाकवून त्याला दोरी चढवील, त्याला सीता द्यावयाची, " असा पण जनकाचा, म्हणजे सीतेच्या बापाचा आहे. स्वतः सीतेचा नाही. याचा अर्थ जो कोणी तो पण जिंकील, त्याला वरणें सीतेला प्राप्त होतें; रामाने पण जिंकिला, रामाला तिने वरिलें. रावणाने जिंकला असता, तर रावणाला वरावें लागलें असतें. अथवा अन्य कोणी जिंकला असता तर त्याला वरावें लागलें असतें. त्यांत सीतेची आवडनिवड कोठे राहिली ? बापाने पणाला लावलेली मुलगी; ज्याने पण जिंकिला त्याने नेली. यांत स्वतः मुलीच्या आवडीनिवडीचा प्रश्नच नाही. तेव्हा याला स्वयंवर कसें म्हणतां येतें ? याला स्वयंवर म्हणतां येत नाही. हें "**स्वयंवर** " नसून "**समाह्वय**" आहे.

मानवधर्मशास्त्रांत " **द्यूत-समाह्वय** " प्रकरण सांगितलें आहे, त्यांत ' **द्यूत** ' कशास म्हणावयाचें व ' **समाह्वय** ' कशास म्हणावयाचें, याचें स्पष्टीकरण मनु महर्षींनी केलें आहे, तें असें—

**अप्राणिभिर्यत् क्रियते तत् लोके द्यूतमुच्यते ।**
**प्राणिभिः क्रियते यस्तु स विज्ञेयः समाह्वयः ॥ २२३ ॥**

( मनु. अध्याय ९ )

म्हणजे ' **निर्जीव वस्तु** ' पणाला लाऊन जें केलें जातें, त्यास ' **द्यूत** ' असें म्हणतात आणि "**सजीव वस्तु**" पणाला लाऊन जें केलें जातें, त्यास '**समाह्वय** ' असें म्हणतात.

कायद्याच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे सीता ही " **सजीव वस्तु** " होती. ती तिच्या बापाने पणाला लाविली होती. या कारणास्तव हें "**समाह्वय** " आहे, "**स्वयंवर** " नव्हे.

तर मग अनसूयेने विचारिलें असतां, आपलें स्वयंवर झाल्याचें स्वतः सीतेने सांगितलें आहे, त्याची संगति कशी लावावयाची ? अनसूयेने विचारिलें की—

" **स्वयंवरे निर्जिताऽसि त्वं अनेन यशस्विना ।**
**राघवेणेति मे सीते कथा श्रुतिमुपागता ॥**"

( अयोध्या-काण्ड, सर्ग ११८।२४ )

म्हणजे या यशस्वी रामाने **स्वयंवरांत** तुला जिंकली, असा वृत्तान्त माझ्या कानीं आला आहे. तें सर्व तुझ्या मुखाने ऐकावें, अशी माझी इच्छा आहे, तर तें तूं मला सविस्तर सांग. तेव्हा सीता तिला सांगत आहे की–

**"तस्य बुद्धिरियं जाता चिन्तयानस्य साम्प्रतम् ।**
**स्वयंवरं तनूजायाः करिष्यामीति धीमतः ॥ ३८ ॥**

× × × ×

**एवं दत्ताऽस्मि रामाय तदा तस्मिन् स्वयंवरे ॥ ५४ ॥"**

(अयोध्या०, सर्ग ११८)

येणेप्रमाणे आपलें **स्वयंवर** झाल्यासंबंधांत सीतेची स्वतःचीच कबुली आहे. तर हें कसें ? त्यास, याचा विचार असा आहे की, या ठिकाणीं "**स्वयंवर**" हा शब्द **औपचारिक** आहे. वस्तुतः नाही. **औपचारिक** म्हणजे एखादी गोष्ट वरवर दिसण्यांत दुसऱ्या एखाद्या गोष्टीसारखी दिसते; पण खरोखर ती तशी नसते, तिला **औपचारिक** म्हणतात. जसें एखाद्या भाग्यवान् गृहस्थाच्या घरीं नेहमी पाहुण्याची गर्दी असते. नवे पाहुणे यावयाचे व जुने जावयाचे; त्यांच्या मेजवानीची गडबड, त्यांचे करमणुकीसाठी गाणीं-बजावणीं, नाटकें, सिनेमा इत्यादि अनेक करमणुकीचे प्रकार, 'नित्य श्रीर्नित्यमंगलम्' असा समारंभ चाललेला असतो. त्यास आपण म्हणतों, "काय हो ! आमच्याचें घर म्हणजे **लग्नघरच** आहे ? " तर काय तेथे लग्नघराप्रमाणे **वधूवर** असतात ? मुळीच नाही. तेथे **वधू**ही नसत्ये आणि **वर**ही नसतो. म्हणजे वधुवरें नसूनदेखील आपण त्या घरास लग्नघर म्हणतों. याच न्यायाने याला **स्वयंवर** म्हणावयाचें; कारण स्वयंवरा-सारखेच राजे लोकांचें गोळा होणें, त्यांच्या राहण्याची व्यवस्था, मेजवानीचे थाट, मान-पान, पाहुणचार, नृत्यगायनादिक करमणुकीचे प्रकार, सभामंडपांत रंगभूमीवर होतकरू राजपुत्रांचें आगमन इत्यादि सर्व प्रकार स्वयंवरासारखेच असतात. फरक इतकाच की, वधूने आपल्या इच्छेप्रमाणे कोणा राजपुत्रास पसंत करून त्यास माळ घालावयाची, त्याऐवजी कोणी राजपुत्र पण जिंकून, त्या मुलीला तिच्या आवडीनिवडीविरुद्ध घेऊन जातो. पुढे पण जिंकणाऱ्याशीं त्या मुलीचा यथाविधि विवाह होतो.

यावरून लक्ष्यांत येईल की, हें खरोखर **स्वयंवर** नसून, यांत स्वयंवरा-सारखेच सर्व उपचार होत असतात, म्हणून **औपचारिक** रीत्या याला '**स्वयंवर**' असें म्हटलें आहे.

खरें म्हटलें असतां, स्वयंवर **सावित्रीचें** झालें. तिनें पसंत केलेला वर अति अल्पायुषी आहे, एक वर्षांत मरणार आहे, असें नारदानें सांगितलें असून व प्रत्यक्ष बापही त्याचा छंद सोडून देण्याविषयी परोपरीनें सांगत असूनदेखील तिकडे लक्ष्य न देतां—

**सत्यवान् अनुरूपो मे भर्तेति मनसा वृतः ॥ १० ॥**
**दीर्घायुरथवाल्पायुः सगुणो निर्गुणोऽपि वा ।**
**सकृत् वृतो मया भर्ता न द्वितीयं वृणोम्यहम् ॥ २७ ॥**

( महाभारत, वनपर्व. अ० २९४ )

असें त्यांस उत्तर देऊन, एकदा ज्याला आत्मसमर्पण केलें, त्याच्याशींच विवाह केला. भावी वैधव्य डोळ्यापुढे दिसत असूनदेखील चित्तवृत्ति ढळूं दिली नाहीं. आणि याच आपल्या अढळ पतिनिष्ठेच्या बळावर आपला पति प्रत्यक्ष यमाच्या हातून परत मिळविला.

( २ ) दुसरें स्वयंवर दमयन्तीचें. इन्द्र, सूर्य, यम आणि वरुण हे चारही लोकपाल नलाचें रूप धारण करून स्वयंवरमंडपांत बसले असतां, तेथे नलासारखे पांच पुरुष पाहून, हात जोडून अत्यन्त नम्रपणानें दमयन्ती त्यांस म्हणाली—

**हंसानां वचनं श्रुत्वा यया मे नैषधो वृतः ।**
**पतित्वे तेन सत्येन देवास्तं प्रदिशन्तु मे ॥ १७ ॥**
**मनसा वचसा चैव यथा नातिचराम्यहम् ।**
**तेन सत्येन विबुधाः तमेव प्रदिशन्तु मे ॥ १८ ॥**
**स्वं चैव रूपं पुष्यन्तु लोकपाला महौजसः ।**
**यथाऽहं अभिजानीयाम् पुण्यश्लोकं नराधिपम् ॥ २१ ॥**

( महाभारत—वनपर्व अ० ५४ )

म्हणजे, हंसाचें वचन श्रवण करून, ज्या अर्थीं मी **नलाला** वरिलें आहे, त्या सत्याच्या बलावर, हे देव हो, तुम्हांमध्ये खरा **नल** कोणता आहे, तो मला

दाखवावा. ॥ १७ ॥ ज्या अर्थी मनाने, वाचेने मी ( नलाचें ) अतिक्रमण करूं इच्छीत नाही, त्या अर्थी, त्याच सत्याच्या बलावर, हे देव हो, तोच **नल** तुम्ही मला दाखवावा. ॥ १८ ॥ हे महातेजस्वी लोकपाल हो, आपण आपल्या मूळच्या स्वरूपाचा पुनरपि अवलंब करावा की, ज्या योगाने मी त्या **पुण्यश्लोक नराधिपाला ( नलाला )** ओळखण्यास समर्थ होईन ॥२१॥

याप्रमाणे, दमयन्तीची करूण प्रार्थना श्रवण करुन व तिचें नलावरील अढळ प्रेम व भक्ति अवलोकन करून देवांनी आपापलें मूळचें रूप धारण केलें, आणि दमयन्तीने यथाविधि नलालाच वरिलें.

खरें म्हटलें असता त्या लोकपालांपैकी कोणा एकाला वरिलें असतें, तर दमयंतीला तत्काल देवत्व प्राप्त झालें असतें, आणि ती अजरामर झाली असती, आणि तिला सार्वभौम राजालाही अप्राप्य असे दिव्य भोग भोगावयास मिळाले असते; पण त्या सर्व सुखांना तुच्छ लेखून, ज्याला एकदा आत्मसमर्पण केलें, त्या नलालाच तिने वरिलें. याला म्हणतात स्वयंवर.

( ३ ) तिसरें स्वयंवर **रुक्मिणी**चें– हें स्वयंवर उपरिनिर्दिष्ट दोन स्वयंवरांपेक्षा कांही निराळें आहे. या स्वयंवरांमध्ये रुक्मिणीचें नैतिक धैर्य पूर्णपणें दृग्गोचर होत आहे, तें असें—

आईबापांनी निश्चित केलेला वर चेदिराज **शिशुपाल** वऱ्हाडी मंडळींसह येऊन दाखल झाला. मगधाधिपति **जरासंधा**सारखे सार्वभौम राजेही वरपक्षाकडील वऱ्हाडी म्हणून आले. सीमान्तपूजन, वाङ्निश्चय इत्यादि सर्व विधि आटोपले. आता काय तो कन्यादानविधीच तेवढा व्हावयाचा राहिला; इतक्या अवसरांत अत्यन्त गुप्तपणें आपल्या ईप्सित वराकडे म्हणजे श्रीकृष्णाकडे दूताबरोबर प्रेमपत्रिका पाठवून, त्याने कोणते वेळीं, कोठे येऊन भेटावें व कशा रीतीने आपणांस पळवून न्यावें, इत्यादि संकेत त्यास कळवून, अगदी ऐन लग्नाचे वेळींच, सर्वजण पहात असतां त्यांच्या डोळ्यादेखत रुक्मिणी आपल्या ईप्सित वराबरोबर चालती झाली.

ज्या प्रेमळ आईबापांनी सर्व प्रकारें खस्ता खाऊन, अत्यन्त कष्ट सोसून आपलें आजपर्यंत संगोपन केलें, आपणांस सज्ञान केलें, आपले परोपरीने लाड

पुरविले, त्या आईबापांच्या तोंडाला आपल्या या अशा वर्तनामुळे कशा प्रकारें काळोखी लागेल, लौकिकांत त्यांना किती खाली पहावें लागेल, आपल्या अपमानामुळे चिडून जाऊन शिशुपाल व तत्पक्षीय जरासन्धादिक राजांनी आक्रमण केल्यास, आपल्या जन्मदात्या मातापित्यास वृद्धापकालीं राज्यभ्रष्ट होऊन आजन्म शत्रूच्या कैदेंत पडून राहण्याचा संभव, यादवांच्या सैन्याशीं युद्ध जुंपून त्यांत उभयपक्षीय हजारो वीर पडणार आणि हजारो गरीब बिचाऱ्या वीरास्त्रिया सौभाग्याला मुकणार आणि त्यांचीं मुलेंबाळें अनाथ होणार, इत्यादि अनेक महान् अनर्थपरंपरा डोळ्यापुढे प्रत्यक्ष दिसत असूनही त्यांची मुळींच पर्वा न करितां केवळ आपल्या एकटीच्या स्वार्थापायीं, आपल्या पूज्य व प्रेमळ मातापित्यांना महत्संकटांत पाडून, हजारो शूरवीर योद्ध्यांना मृत्यूच्या मुखांत लोटून आणि त्यांच्या स्त्रियांना व मुलाबाळांना कायमचे शोकसागरांत बुडवून रुक्मिणी कृष्णाबरोबर पळून गेली. हा **स्वयंवर** आहे.

स्वयंवराची पद्धति आपल्या भरतखंडांत फार प्राचीन काळापासून आहे. या स्वयंवरांत ( १ ) **सावित्रीचें**, ( २ ) **दमयन्तीचें**, ( ३ ) **रुक्मिणीचें** ( ४ ) **सीतेचें** आणि ( ५ ) **द्रौपदीचें**, हीं पांच स्वयंवरें प्रसिद्ध आहेत. या पांचांपैकी, पहिलीं तीन मात्र '**स्वयंवर**' या संज्ञेला पात्र आहेत; पण या तिहींमध्ये तीन प्रकार दिसून येतात, ते असे—

१. पहिला प्रकार **सावित्रीच्या स्वयंवराचा**– सावित्रीच्या स्वयंवरांत स्वतः सावित्री आपल्या मातापित्याच्या आज्ञेने आपल्यासाठी वर शोधावयास्तव देशोदेशीं जाते आणि आपल्याला अनुरूप असा वर आढळल्याबरोबर त्याला मनाने वरिते. ज्याला आपण आपलें प्रेम समर्पण करीत आहोंत, तो राज्यभ्रष्ट, दरिद्री, वनवासी आहे आणि आपण राज्यपदारूढ राजाची राजकन्या आहोंत, याचें तिला भान नसतें. नारदमुनींच्या सांगण्यावरून भावी वैधव्याचें संकट निश्चित असूनदेखील ती आपला दृढ निश्चय ढळूं देत नाही आणि एकदा ज्याला प्रेम समर्पण केलें, त्यालाच वरिते. हा पूर्ण निःस्वार्थीपणाचा आणि दैवी प्रेमाचा नमुना होय.

२. दुसरा प्रकार **दमयन्तीच्या स्वयंवराचा**– यांत स्वतः कन्या

आपल्यासाठी वर शोधावयास कोठें बाहेर देशीं जात नसून, वरांनाच त्या कन्येच्या घरीं बोलावून एकत्र केलें गेलें आहे. या प्रसंगीं दमयंतीचें नलावरील निःस्वार्थी व अढळ प्रेम, नळाचा दमयंतीच्या कल्याणास्तव स्वार्थत्याग व औदार्य, देवांचा उदारपणा आणि स्वयंवरास जमलेल्या इतर सर्व राजांचा व राजपुत्रांचा समंजसपणा हीं चांगलीं दिसून येतात.

**दमयन्तीचें निःस्वार्थी व अढळ प्रेम**— दमयन्तीनें चौघा लोकपाल देवांपैकीं कोणा एकाला जरी वरिलें असतें, तरी तिला देवत्व प्राप्त होऊन ती अजरामर झाली असती व मनुष्यलोकीं, सार्वभौम राजासही अप्राप्य असे, सर्व प्रकारचे दैवी भोग तिला प्राप्त झाले असते; पण तें सर्व तुच्छ लेखून, एकदा ज्याला आत्मसमर्पण केलें, त्या नलावरचें प्रेम तिळमात्र ढळूं दिलें नाहीं. देवांचाही अव्हेर करून त्या नलालाच तिनें वरिलें.

**नलाचा स्वार्थत्याग व औदार्य**— आपल्यावर दमयन्ती प्रेम करीत आहे, हें नलाला पूर्णपण माहीत होतें, पण इन्द्रादि लोकपालही तिच्यावर प्रेम करीत आहेत, हें पाहून तिनें जर त्यापैकीं कोणा लोकपालाला वरिलें तर तिला देवत्व प्राप्त होऊन ती अजरामर होईल व आपल्यापेक्षा तिला अनंतपटीनें सुख लाभेल, या विचारानें तिच्या सुखास्तव, आपल्या प्रेमावर पाणी ओतून त्या लोकपाल देवांचें दौत्य पत्करिलें आणि दमयन्तीचें मन त्या देवांकडे वळविण्याचा त्यानें प्रयत्न केला.

**लोकपाल देवांचा उदारपणा**— चारही लोकपाल नलाचा वेष धारण करून, रंगभूमीवर नलासमवेत बसलेसे पाहून, त्यांच्या ऐश्वर्यास न भुलतां, त्यामध्ये खरा नल कोणता आहे, तो दाखविण्याविषयीं तिनें त्या देवांची करुणा भाकली असतां, तिचा अभिलाष धरून आलेल्या देवांनीं आपलें मन आवरून धरून, नलावरील तिच्या दृढ भक्तीवर व उत्कृष्ट प्रेमावर प्रसन्न होऊन, तिच्यावरचें आपलें प्रेम त्यांनी माघारें घेतलें व तिला खऱ्या नलाची भेट करवून दिली. यांत देवांचाही स्वार्थत्याग आणि औदार्य दिसून येतें.

स्वयंवरास गोळा झालेले राजे व राजपुत्र यांचा समंजसपणा— दमयंतीनें आपल्यापैकीं एकास वरिलें, हें पाहून भांडाभांडीं न करितां उदारपणें नल-

दमयंतीच्या विवाहसमारंभांत भाग घेऊन, शुभ मंगल करावयास सिद्ध होऊन, समारंभ निर्विघ्नपणें पार पडूं दिला. हा त्या राजेलोकांचा व राजपुत्रांचाही उदारपणा होय. तात्पर्य, दमयन्तीचें स्वयंवर हें सर्व बाजूंनी स्वार्थत्यागाचें व उदारपणाचें अपूर्व व अलौकिक उदाहरण होय.

**३. तिसरें स्वयंवर रुक्मिणीचें**– यांत रुक्मिणीचें श्रीकृष्णावरचें प्रेम पराकाष्ठेला पोहोंचलेलें दिसतें. तें इतकें की, त्या आपल्या एकटीच्या प्रेमास्तव भयंकर रक्तपात आणि मनुष्यहानीचा मार्गही पत्करण्यास श्रीकृष्णाला लिहिण्यापर्यंत तिची मजल गेली. यामुळे तिचें प्रेम स्वार्थी ठरून, तिच्या त्या स्वयंवरास आसुरी स्वरूप प्राप्त झालें.

**४. द्रौपदीचें स्वयंवर**– हें सीतेच्यासारखेंच ' स्वयंवर ' नसून 'समाह्वय' आहे. जो कोणी मत्स्य--यंत्र--भेद करील त्याला द्रौपदीने वरावें, असा पण तिच्या बापाचा होता. म्हणजे सीतेसारखीच द्रौपदी ही पणाला लावलेली मुलगी ( सजीव वस्तु ) होती. हिच्या स्वयंवरांत रुक्मिणीच्या स्वयंवरासारखा भयंकर रक्तपात किंवा थोडंदेखील प्राणहानि झाली नाही हें खरें, तथापि थोडीतरी मारामारी झालीच.

स्वयंवर म्हटलें म्हणजे त्यांत मारामारी व रक्तपात न झाला तरच नवल. दमयंतीस्वयंवरासारखे क्वचित् सात्त्विक स्वयंवर हे अपवादच होत.

## श्रीरामचन्द्राचे पूर्वज.

( वा० रा० बाल० स० ७०, श्लो० १९–४४ )

**मायोपाधिक ब्रह्म**– **१ ब्रह्मदेव**– **२ मरीचि**– **३ कश्यप**– **४ विवस्वान्**– **५ मनु** ( पहिला प्रजापति )– **६ इक्ष्वाकु** ( अयोध्येचा पहिला राजा )– **७ कुक्षि**– **८ विकुक्षि**– **९ बाण**– **१० अनरण्य**– **११ पृथु**– **१२ त्रिशंकु**– **१३ धुन्धुमार**– **१४ युवनाश्व**– **१५ मान्धाता**– **१६ सुसन्धि**– **१७ ध्रुवसन्धि**– **१८ भरत**– **१९ असित** ( असित हा पराजित होऊन परागन्दा होऊन मेला; याला दोन स्त्रिया गर्भिणी होत्या, त्यांपैकी एकीपासून )– **२० सगर**– **२१ असमञ्जाः**– **२२ अंशुमान्**– **२३ दिलीप**–

**२४ भगीरथ- २५ ककुत्स्थ- २६ रघु- २७ प्रवृध्द** ( कल्माषपाद )- **२८ शंखण- २९ सुदर्शन- ३० अग्निवर्ण- ३१ शीघ्रग- ३२ मरु- ३३ पशुश्रुक- ३४ अंबरीष- ३५ नहुष- ३६ ययाति- ३७ नाभाग- ३८ अज- ३९ दशरथ-** ४० राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न.

## सीतेचे पूर्वज.

**१ निमि- २ मिथि- ३ जनक** ( पहिला जनक, याच्यामुळे पुढे सर्वांस जनकच म्हटलें जातें )- **४ उदावसु- ५ नन्दिवर्धन- ६ सुकेतु- ७ देवरात- ८ बृहद्रथ- ९ महावीर- १० सुधृति- ११ धृष्टकेतु- १२ हर्यश्व- १३ मरु- १४ प्रतीन्धक- १५ कीर्तिरथ- १६ देवमीढ- १७ विबुध- १८ महीध्रक- १९ कीर्तिरात- २० महारोमा- २१ स्वर्णरोमा- २२ ऱ्हस्वरोमा- २३ जनक** [ सीरध्वज ] + ( भाऊ ) कुशध्वज

**जनक** = सीता, उर्मिला.

**कुशध्वज** = माण्डवी, श्रुतकीर्ति.

विवाहापूर्वी २०।२० किंवा ४०।४० पूर्वजांची माहिती सांगत असत, ही येथें विशेष महत्त्वाची पद्धति दिसत आहे. स्मृतीमध्ये ५ किंवा ७ पिढ्या पाहण्याचा आदेश आहे; पण येथे रामाच्या ४० पिढया व जनकाच्या २३ पिढ्या सांगितल्या आहेत. ४२ पिढ्यांचा उद्धार करण्याची कल्पना आपणांमध्ये फारच प्राचीन कालापासून चालत आली. कुल पहावयाचें तें ४२ पिढ्यांपर्यंत पहावें, त्यापेक्षा गौणपक्ष म्हणजे २० अथवा ७, नाहीतर ५ तरी पिढ्या पहाव्या. निदान तीन तरी पहाव्याच. इतक्या पिढ्यांतील पूर्वज थोर कर्ते यशस्वी असले, म्हणजे पुढची पिढी यशस्वी व कर्तृत्ववान् होईलच, यांत शंका नाही. प्राचीन काळच्या लोकांचें वंशशुद्धीकडे फार लक्ष्य होतें; त्या वंशशुद्धीकडे सध्याच्या लोकांचें दुर्लक्ष्य होत आहे, हें फारच वाईट होय.

युरोपियन लोक कुत्रा, मांजर, घोडा आदि पशूंचेही वंश वीस, पंचवीस अथवा चाळीस पिढ्यांपर्यंत पाहतात व यांच्या वंशाचा वृत्तांतही जतन करून ठेवण्याचा व त्यांच्या वंशांत भेसळ न व्हावी, अशी दक्षतेनें योजना करण्याचा

अट्टाहास ते करीत असतात. तितका जरी मानवांचा वंशवृत्तांत ते ठेवीत नसले, तरी तशी कुलाची शुद्धता ठेवण्याची आवश्यकता अत्यंत आहे, असें आता त्यांस वाटावयास लागलें आहे.

आपल्या श्रुतिस्मृतींमध्ये वंशशुद्धीचें महत्त्व फारच वर्णिलें आहे व कुलशील पाहून मग विवाह करण्याची पद्धति ब्राह्मविवाहामध्ये पूर्णपणें पाळली जाते, म्हणूनच ब्राह्म-विवाहपद्धति सर्व विवाहांमध्ये श्रेष्ठ होय.

स्वयंवर व समाह्वय या पद्धतींमध्ये कुलशील पाहण्यास सवडच नसते, हा या पद्धतींमध्ये मोठा दोष आहे. समाह्वयामध्ये असा मोठा पण लावलेला असतो की, तो पण जिंकणें हें असाधारण योग्यता अंगीं असल्यावाचून अशक्यच असे. त्यामुळे स्वाभाविकच असाधारण योग्यतेचा वर मिळत असे. एवढी योग्यता सर्वांनाच असणें शक्य नसतें. म्हणून समाव्हयामध्ये पाहून नसली तरी गुणांच्या उत्कर्षानें वरपरीक्षा होत असे.

सीतेच्या समाह्वयामध्ये श्रीशंकरांनी वापरलेच्या प्रचण्ड चापास दोरी चढवून बाण लावावयाचा पण होता. ज्याचा प्रताप श्रीशंकराइतका असेल, तोच हा पण जिंकूं शकणार, हें उघड आहे. यामुळेच शेकडो राजे आले व अपमानित होऊन चाप सज्ज करतां येईना म्हणून लाजेनें निघून गेले. शेवटी श्रीरामचन्द्रानेंच तें चाप सज्ज केलें. तेव्हा समाह्वयामध्ये हवा तो वर येईल व त्यास मुलगी द्यावी लागेल, असें होणें शक्य नसे. यांत विशेष गुणांनी संपन्न असलेला वरच निवडला जाई.

स्वयंवरामध्ये मात्र नुसती परस्परांची पसंतीच पुरत असल्यानें तेथें कुलशील पाहण्यास फारसा वाव नसे; पण जातीय व्यवस्था अंगीं बाणलेली असल्यामुळे व राहणीहि जातवार विभागलीं असल्यामुळे स्वजातीयांतच बहुधा क्षत्रियांचे स्वयंवर होत. कित्येक उदाहरणें भिन्नजातीयांत स्वयंवर झाल्याचीं असलीं, तरी तीं अपवादरूप असत. दुष्यंत म्हणत आहे की, ‘ ज्या अर्थी शकुंतलेवर माझें मन गेलें, त्या अर्थी ही क्षत्रिय-कन्याच असली पाहिजे. ’ माझें क्षात्र मन अन्यजातीय कुमारीवर जाईल, हें शक्य नाही. बहुधा असेंच घडत असावें, असें वाटतें; कारण स्वयंवराला क्षत्रियच जमत, प्रत्येक राजाच्या गुणांचें

वर्णन करावें लागे व लग्नापूर्वींहि कर्णोपकर्णी अमूक राजपुत्र चांगला आहे, असें पूर्वींपासून ऐकलेलें असे. यामुळे जवळजवळ स्वयंवरांतहि ऐन वेळची स्वरूपाची पसंतीच लग्नाला कारण होत असे, असें म्हणणें अयोग्य होईल. नल, श्रीकृष्ण यांसंबंधींचें वृत्तांत या संबंधाचा निश्चय करतांना विचारांत घेण्यासारखे आहेत.

स्वयंवर किंवा समाह्वय यांमध्ये जरी वर व वधू ठरवतांना पूर्वीच्या पिढ्या प्रथमतः पहात नसत, तथापि जो विवाह व्हावयाचा, तो ब्राह्म पद्धतीनेच होत असल्याने विवाहसंस्काराच्या वेळीं वर लिहिल्याप्रमाणे ४०।४० पिढ्यांचा उच्चार केला जात असे. जसा सीता व राम यांच्या विवाहाच्या वेळीं केला गेला होता.

तात्पर्य हें कीं, विवाहामध्ये कुलशुद्धि पाहणें हा पक्ष उत्तम होय व ती चाळीस पिढ्यांपर्यंत पाहणें, हें श्रेष्ठच होय. चाळीस पिढ्यांपर्यंतची आपल्या कुलाची माहिती संग्रहित करणें, हें या दृष्टीने विचार करतां प्रत्येक कुलजाचें आवश्यक कर्तव्य ठरतें. सध्या एकदम पूर्वीच्या आपल्या वंशसंभवांचा वृत्तांत जमवणें शक्य नसलें, तरी आपल्या पूर्वीच्या ५।६ पिढ्यांची माहिती मिळणें शक्य आहे. ही एका '**कुलवृत्त**' नामक ग्रंथांत लिहावी. पुढील प्रत्येक पिढीस त्यांत एक एक पृष्ठ ठेवलेलें असावें व दर पिढीस याप्रमाणे एक एक किंवा अधिक पृष्ठें त्यांत मिळवीत गेलें असतां, दर पिढीस ही माहिती वाढत जाईल व कांही शतकांनी चाळीसच काय पण शंभर कुलांचा वृत्तांत मिळणेंही शक्य होईल.

या पिढीच्या पृष्ठांत मुलगे, मुली, त्यांचे संबंध, गोत्रें, प्रवरें यांची माहिती, कर्तृत्ववान् व यशस्वी पुरुषांचे वृत्तांत, मृत्यूचीं कारणें, वगैरे सर्व वृत्त अगदी संक्षेपाने लिहिलेलें असावें.

कुलगुरु वसिष्ठ ऋषींकडे दशरथाच्या घराण्याची अशी माहिती होती. पुरोहिता-कडेच पूर्वी अशी माहिती असे. आता सर्वांस लिहितां-वाचतां येत असल्याने प्रत्येकाचा कुलवृत्तांत प्रत्येकाच्या घरीं सुरक्षित ठेवला जावा, हें योग्य आहे.

या कुलवृत्ताच्या योगाने पुष्कळच ज्ञान मिळणें शक्य असून, वंशशास्त्रविषयक पुष्कळ शोध लागणें शक्य आहे. यासाठी या विषयाकडे वाचकांनी विशेष लक्ष्य पुरवावें.

# परशुरामाची कथा.

( सर्ग ७६ )

चारहि राजपुत्रांचे विवाह झाले व राजा दशरथ आपल्या सर्व परिवारासह मिथिलेहून अयोध्येस यावयास निघाला. इतक्यांत वाटेंत **परशुराम** आला व दाशरथी रामचन्द्राला म्हणाला की, 'मिथिलेस जनक राजाजवळ असलेलें जुनें, निरुपयोगी झालेलें शिथिल शिवधनुष्य तूं सज्ज करून मोडून टाकलेस, हें वृत्त मी ऐकलें. म्हणून मुद्दाम मी तुला भेटण्यासाठी आलों आहें व हें वैष्णवधनुष्यही बरोबर आणलें आहे. पूर्वी हीं दोन धनुष्यें देवांनी निर्माण केलीं, त्या वेळीं जें तूं मोडलेंस तें प्रथमपासूनच शिथिल बनलें होतें, म्हणून तूं तें मोडलेंस, यांत कांही तुझें सामर्थ्य प्रकट झालें नाही. हें वैष्णव चाप हातांत घे व त्याला प्रत्यंचा चढवून बाण लाव. असें तूं करूं शकलास तरच तूं सामर्थ्यवान् आहेस, असें मला वाटेल व मग मीही तुझ्याशीं द्वन्द्वयुद्ध खेळेन.'

हें परशुरामचें भाषण ऐकून, तेथे असलेले सर्व लोक भयभीत झाले व त्यांस वाटलें की, निःक्षत्रिय पृथ्वी करणारा हा परशुराम येथे येऊन या रामलक्ष्मणांचा नाश करतो कीं काय ?

नंतर रामचन्द्राने परशुरामाकडचें वैष्णव चाप घेतलें, तें सज्ज केलें व त्यावर बाण चढवला. रामचन्द्र इतकें केल्यानंतर परशुरामास म्हणाला की, 'आता माझा पराक्रम पहावयाचा असेल तर पहा.' रामचन्द्राचें हें सामर्थ्य पाहून परशुरामास आनंद झाला. नंतर रामचन्द्राने त्याचा सत्कार केला, तो स्वीकारून परशुराम महेंद्र पर्वतावर तप करण्यासाठी निघून गेला.

परशुराम जो येथे आला, तो रामलक्ष्मणांचा वध करावयास अथवा दशरथाच्या कुटुंबियांचा नाश करावयासाठी आला होता, असें वाटत नाही; कारण त्याने कश्यप ऋषि व देवराड् इन्द्र यांसमोर प्रतिज्ञा केली होती की, आपण यापुढे क्षत्रियवध करणार नाही. परशुराम अशा थोर व्यक्तीपुढे केलेली प्रतिज्ञा भंग करून पुनः क्षत्रियवध करावयास प्रवृत्त होईल, हें शक्य नव्हतें. परशुराम कांही वचनभंग करणारा अधम पुरुष नव्हता. परशुरामाने प्रजापालन न करणाऱ्या,

ऋषींच्या आश्रमांस गांजणाऱ्या जुलमी क्षत्रियांचा नाश करण्याची प्रतिज्ञा केली होती. तें काम त्याकडून पूर्णपणाने घडलेंहि होतें. त्यास यापुढे रामलक्ष्मणांचा वध करण्याचें कांहींएक कारण नव्हतें. क्षत्रिय-जातीचें निर्मूलन करणें, हा कांही त्याचा जीवनोद्देश्य नव्हता. उन्मत्त, जुलुमी क्षत्रियांचा वध त्यास करावयाचा होता. तो करून आपल्या पितरांचें तर्पण त्याने क्षत्रियांच्या रक्ताने केलें होतें. म्हणून तो या वेळीं कृतकार्य झाला होता.

पृथ्वीचें राज्य करावें व स्वतः पुष्कळ उपभोग भोगावे, हें त्याला कधीच इष्ट नव्हतें. क्षत्रिय राजांस मारून ब्राह्मणांच्या आश्रांतील जी संपत्ती क्षत्रियांनी लुटून नेली होती, ती दाम-चौपट करून त्याने क्षत्रियांच्या खजिन्यांतून परत आणली होती. सर्व पृथ्वीवर त्याची मालकी प्रस्थापित झाली होती. सर्व मारक शस्त्रास्त्रें त्याच्याजवळ भरपूर होतीं; पण त्याने राज्याचा अथवा या संपत्तीचा स्वतः मुळीच उपभोग घेतलेला नाही. तशी त्याची केव्हाच इच्छा नव्हती.

त्याने जमा केलेली सर्व संपत्ति ब्राह्मणांला वांटून दिली व त्यांस सांगितलें की, विद्येचा प्रसार जगतामध्ये करा. या वेळीं ब्राह्मणाचें घर ही एक मोठी पाठशालाच असे व ब्रह्मणांची सर्व संपत्ति ही विद्याप्रसारासाठी खर्च होत असे. फी घेतल्या-शिवाय सर्व विद्या शिष्यांस दिली जात असे व विद्या शिकून समावर्तन-संस्काराच्या वेळीं काय गुरुदक्षिणा दिली जाई, तेवढीच गुरूस मिळत असे. त्या वेळचे राजे व सधन वैश्य आपलीं मुलें या गुरुगृहीं ठेवीत असत व मोठमोठ्या देणग्या या गुरूंस देत. यामुळे हे कुलगुरु फारच सधन होते. या आश्रमास कशाचीहि ददात नसे. राष्ट्रांतील विद्यार्थी येथे शिकत असल्याने सर्व राष्ट्राला हे ऋषींचे आश्रम फारच प्रिय व वंद्य असत; यामुळे आप-आपल्या शक्तीप्रमाणे सर्व लोक या आश्रमांस देणग्या देत व यामुळे या आश्रमांत भरपूर संपत्ति असे.

या संपत्तीमुळेच राजा विश्वामित्राने वसिष्ठांच्या आश्रमावर हल्ला केला व त्याच कारणसाठी राजा कार्तवीर्याने जमदग्नीच्या आश्रमावर हल्ला केला. या दोनही कथांचा थोडासा विचार येथे आता करूं—

## परशुरामाचा क्रोध.

ऋचीक नांवाच्या ऋषीस गाधिराजाची सत्यवती नामक कन्या दिली होती.

यांपासून जमदग्नि ऋषि उत्पन्न झाला. जमदग्नीची बायको रेणुका. ही रेणु नामक राजाची मुलगी. या स्त्रीपासून जमदग्नीस रुमण्वान्, सुषेण, वसुमान्, विश्वावसु व परशुराम असे पांच मुलगे झाले. या जमदग्नीचा आश्रम नर्मदातीरावर होता.

जमदग्नि ऋषि धनुष्यास बाण चढवून निरनिराळ्या लक्ष्यावर वेध करण्याचा अभ्यास करीत असे. या वेळीं रेणुकेस मारलेला बाण परत आणण्यास सांगत असे. याप्रमाणे याने धनुर्विद्या सिद्ध केली होती.

जमदग्नीला इन्द्राने कामधेनु दिली होती व सर्व आश्रमाचा योगक्षेम तिच्यावर उत्तम चालला होता. एकदा हैहयदेशचा राजा कार्तवीर्य आपल्या सैन्यासह जमदग्नीच्या आश्रमांत आला. जमदग्नीने राजाचें सैन्यासह उत्तम आदरातिथ्य केलें. तेव्हा जमदग्नीचें जें वैभव कार्तवीर्याने पाहिलें, त्यामुळे त्यास या ऋषीचा फार हेवा वाटला. लगेच कार्तवीर्याने त्या ऐश्वर्याच्या लोभाने त्या आश्रमावर हल्ला चढवला. त्याने आश्रम लुटला व उध्वस्त करून टाकला. कामधेनूही पळवली.

जेव्हा परशुरामास हें समजलें, तेव्हा त्याने कार्तवीर्याच्या राजधानीवर हल्ला केला व कार्तवीर्याला ठार मारून गाय परत आणली व जमदग्नीचा आश्रम पुनः पूर्वीप्रमाणे थाटला.

कार्तवीर्य राजास परशुरामाने ठार मारलें, हें जमदग्नि ऋषीस पसंत पडलें नाही; म्हणून जमदग्नीने परशुरामास १२ वर्षे तप करून आत्मशुद्धि करून घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणे परशुरामाने केलें. परशुरामाने आपल्या वडिलां-पासून व श्रीशंकरांपासून संपूर्ण धनुर्वेदाचें यथासांग अध्ययन केलें.

परशुराम महेन्द्रपर्वतावर तप करण्यासाठी बापाच्या आज्ञेप्रमाणे गेला असतां, इकडे कार्तवीर्याच्या मुलांनी जमदग्नीच्या आश्रमावर हल्ला चढवला व २१ बाण मारून जमदग्नीस ठार केलें. त्याचा प्राण जाईना, असें पाहून बुक्क्या मारमारून त्याचा प्राण घेतला. आश्रम लुटून उध्वस्त करून टाकला. तेव्हा रेणुका ऊर बडवून घेऊन रडूं लागली.

परशुराम तपश्चर्या संपवून घरीं आला, तों हें वृत्त त्यास कळलें. रेणुकेने परशुरामास उन्मत्त क्षत्रियांचा चांगला समाचार घेण्यास प्रोत्साहन दिलें ! याप्रमाणे परशुराम उन्मत्त क्षत्रियांचा नाश करण्यास तयार झाला. क्षत्रियांच्या

जाचामुळे कंटाळलेले सर्व लोक परशुरामाचे अनुयायी बनले व ब्राह्मण--क्षत्रियांची लढाई जुंपली. ही लढाई २१ वेळा झाली व यांत अतोनात संहार झाला. १२००० राजे ठार झाले व इतर लढवय्ये लाखो वीर मारले गेले. क्षत्रियांच्या ६४ कुळींचा या वेळीं नाश झाला.

असा संहार चाललेला पाहून कश्यप ऋषि व इंद्र यांनी भीड घालून परशुरामास यापुढे क्षत्रियांचा वध करण्यापासून निवृत्त केलें व तशी त्याच्याकडून प्रतिज्ञाहि करून घेतली.

परशुरामाने सर्व भूमि कश्यपाला दिली व सर्व धन ब्राह्मणांला देऊन टाकलें व आपण महेन्द्रपर्वतावर तप करण्यास निघून गेला. परशुरामाने पुनः महेन्द्रपर्वतावरून पृथ्वीवर येऊंच नये, असें या वेळीं ठरलें होतें; कारण जर पुनः परशुरामास क्षत्रिय दिसले, तर चेव चढेल व पुनः क्षत्रियवध सुरू होईल. तो होऊं नये, म्हणून परशुरामाला खाली उत्तरण्याचीच बंदी केली होती.

इतकें केल्यानंतर कश्यपानें जेथेजेथे क्षत्रिय होते, तेथून त्यांस आणून राज्यांवर बसविलें व पुनः क्षत्रियांचें राज्यशासन सुरू केलें. या वेळीं ब्राह्मणांनी क्षत्रियांच्या वाढीसाठी फारच सहाय्य केलें.

याप्रमाणे ही परशुरामाची कथा आहे. वसिष्ठांची कथा पूर्वी आलीच आहे. या दोनही कथांची तुलना आता करूं या—

## दोन कथांची तुलना.

| वसिष्ठ व विश्वामित्र. | जमदग्नि व कार्तवीर्य. |
| --- | --- |
| १ वसिष्ठ ऋषि कुलपति होते व त्यांच्या आश्रमांत हजारो विद्यार्थी शिकत होते. | १ जमदग्नीचा आश्रमही मोठा होता व तेथेहि शेकडो विद्यार्थी शिकत होते. |
| २ वसिष्ठ ऋषि मंत्र व अस्त्र यांनी संपन्न होते. | २ जमदग्नि ऋषीही मन्त्र व शस्त्रास्त्रविद्येंत निपुण होते. |
| ३ वसिष्ठांचा आश्रम ऐश्वर्यसंपन्न होता. | ३ जमदग्नीचा आश्रम धन व ऐश्वर्य यांनी युक्त होता. |

| वसिष्ठ व विश्वामित्र | जमदग्नि व कार्तवीर्य |
|---|---|
| ४ वसिष्ठाश्रमांत राजा विश्वामित्र सैन्यासह थकून भागून आला. | ४ जमदग्नीच्या आश्रमांत कार्तवीर्य राजा सैन्यासह आला. |
| ५ वसिष्ठांनी राजासह सर्व सैन्याला थाटाचें भोजन दिलें व मोठा सत्कार केला. | ५ जमदग्नीने कार्तवीर्याचा त्याच्या सैन्यासह फार आदरसत्कार केला व भोजन दिलें. |
| ६ विश्वामित्रास ऋषींचें ऐश्वर्य पहावलें नाही. | ६ कार्तवीर्यास जमदग्नीच्या ऐश्वर्याचा हेवा वाटला. |
| ७ विश्वामित्राने आपल्या सैन्यास आज्ञा दिली की, आश्रम लुटा. | ७ कार्तवीर्याने आश्रम लुटला व उध्वस्त केला. |
| ८ आश्रमाशीं सहानुभूतीने राहणाऱ्या भिल्ल वगैरे जातींनी विश्वामित्राचें सैन्य चोपून काढलें. | ८ जमदग्नीच्या परशुराम नामक मुलाने नंतर कार्तवीर्य राजावर उलट हल्ला केला, राजास ठार करून सर्व ऐश्वर्य परत आणलें, पण राजाला ठार मारलें हें जमदग्नीस आवडलें नाही. त्याने परशुरामास आत्मशुद्धि करण्यासाठी १२ वर्षें तप करण्यास पाठवलें. |
| ९ विश्वामित्राच्या १०० पुत्रांनी वसिष्ठावर हल्ला केला; पण ते सर्व युद्धांत मारले गेले. | ९ कार्तवीर्याच्या पुत्रांनी जमदग्नीच्या आश्रमावर हल्ला केला व जमदग्नीस ठार करून पुनः आश्रम लुटला व उध्वस्त केला. |
| १० विश्वामित्र पराजित होऊन अधिक मारक अस्त्रें प्राप्त करण्याच्या खटपटीस लागला. | १० परशुरामाने १२ वर्षें तप केलें व आश्रमांत परत आला, तों बापाचा वध झाल्याचें समजलें व आईने सूड घेण्यास त्यास प्रोत्साहन दिलें. |

| वसिष्ठ व विश्वामित्र | जमदग्नि व कार्तवीर्य |
|---|---|
| | परशुरामास आवरणारा कोणी राहिला नाही. |
| ११ विश्वामित्राने मारक पुष्कळ अस्त्रें प्राप्त केली व वसिष्ठाश्रमावर चाल केली; पण वसिष्ठांनी बचावाचें धोरण ठेऊन प्रतिकार केला व शेवटीं या झटापटींत विश्वामित्राचा पूर्ण पराभव झाला. | ११ परशुरामाने क्षत्रियांवर हल्ले केले व क्षत्रियांनी ब्राह्मणांचे आश्रम उध्वस्त केले. अशा रीतीने द्वेषाग्नि वाढत गेला. |
| १२ विश्वामित्राने वसिष्ठांचे १०० पुत्र नष्ट केले. | १२ परशुरामाने २१ वेळा अनेक क्षत्रियांचा नाश केला. |
| १३ नंतर विश्वामित्र ब्राह्मण बनण्यासाठी तप करूं लागला व त्याने राजर्षि, ऋषि, महर्षि बनून शेवटीं ब्रह्मर्षिपद प्राप्त केलें. | १३ या २१ वेळा झालेल्या युद्धांत हजारो राजे व लाखो क्षत्रिय कापले गेले. |
| १४ हें पाहून वसिष्ठांनीहि पूर्वीचे अपकार न आठवतां त्यास ब्रह्मर्षि म्हटलें. | १४ हा विद्वेष वाढत गेला व ब्राह्मणांचा आणि क्षत्रियांचा संहार होत गेला. |
| १५ तसेंच यज्ञरक्षणासाठी दशरथास चार उपदेशाच्या गोष्टी सांगून, रामलक्ष्मणांस देवविलें व विश्वामित्रास सहाय्य केलें. | १५ कश्यप ऋषि व इन्द्र यांनी मध्यस्थी करून परशुरामास क्षत्रियवधापासून निवृत्त केलें. |
| १६ वसिष्ठ व विश्वामित्र यांनी परस्परांस सहाय्य करून, रावणवधाच्या राष्ट्रीय उलाढालींत मोठा भाग घेतला. | १६ कश्यपाने उरलेल्या क्षत्रियांना आणून पुनः राज्यावर बसवलें व क्षत्रियवंशाची जतन करून वाढ केली. |

*

विश्वामित्र–वसिष्ठांच्या पूर्वीच्या काळांतील कार्तवीर्य–परशुरामाचा झगडा होय. रामचंद्राच्या पूर्वीचा हा वृत्तांत होय. या आपसांतील यादवींत हजारो ब्राह्मणांचा व लाखो क्षत्रियांचा वध झाला. कर्ती पिढी कापली गेली. यामुळे राष्ट्र दुर्बल झालें. राष्ट्रांत कर्ते प्रतापी क्षत्रियच राहिले नसल्याने ठिकठिकाणीं राक्षस माजले, रावणासारखे शत्रु उन्मत्त झाले व आर्यावर्तास फार त्रास झाला.

वसिष्ठ–विश्वामित्राच्या झगड्यांत वसिष्ठांनी अथवा वसिष्ठपुत्रांनी आक्रमक धोरण न स्वीकारल्यामुळे पुढे भांडण पेटत गेलें नाही व सलोखा घडून आला. पूर्वी झालेली चूक वसिष्ठ ऋषि जाणत होते. राष्ट्राचा घात न व्हावा, यासाठी क्षत्रियवध करतां नये, हें जमदग्नि ऋषीला माहीत होतें; पण त्यांचाच वध कार्तवीर्य–पुत्रांनी केल्यामुळे परशुरामाला आवरणारा कोणी राहिला नाही. इतकेंच नव्हे तर रेणुकेने परशुरामास क्षत्रियांचा सूड घेण्यासच प्रोत्साहन दिलें. यामुळे भडका उडाला.

या कथांनी रामचन्द्राला कित्येक गोष्टी समजल्या. त्या या की, क्षत्रियांनी उन्मत्त होऊन ऋषींचे आश्रम लुटूं नये. हे आश्रम हीं विश्वविद्यालयें असल्याने ते उध्वस्त केल्याने सर्व राष्ट्रच्या राष्ट्र क्षत्रियांचा द्वेष करूं लागतें. यासाठी अशा आश्रमांचें संगोपन करणें, हेंच क्षत्रियांचें कर्तव्य आहे. यापासून दुसरा बोध हा की, आपसांतील यादवीमुळे राष्ट्र दुर्बल होतें व परकीय शत्रूला फावतें. यासाठी आपसांत यादवी माजवणें, केव्हाही योग्य नव्हे.

असे अनेक बोध या कथांपासून रामलक्ष्मणांस मिळाले.

परशुराम जो या वेळीं रामचन्द्राकडे आला होता, तो त्याचें सामर्थ्य पहावयासाठीच आला होता. क्षत्रियवधापासून तो यापूर्वीच निवृत्त झालेलाच होता व तसा वध करणें, हें या वेळीं त्याचें अभीष्ट असणेंही शक्य नव्हतें. वीराचें वीर्य वीराने ओळखलें व एकमेकांचा सन्मान एकमेकांनी करून जो तो आपआपल्या मार्गाने निघून गेला.

# रम् धातूचा अर्थ.

**“ रेमिरे मुदिताः सर्वा भर्तृभिः सहिता रहः ”**

( बालकाण्ड, सर्ग ७७, श्लोक १३ )

श्रीराम व सीता यांचा विवाह झाल्यानंतर वरात घेऊन दशरथ राजा परत अयोध्येंत आल्यावर त्या प्रसंगींचें हें वर्णन आहे. संपूर्ण श्लोक असा आहे:-

**अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वा राजसुतास्तदा ।**
**रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिः सहिता रहः ॥**

याचा अर्थ "नन्तर सर्व वडील मंडळींना नमस्कार करून त्या राजकन्या आनंदानें आपल्या पतीसह एकांतांत रममाण होऊं लागल्या," असा करतात. हा अर्थ बरोबर नाही, हें पुढे निदर्शनास आणिलें जाईल. प्रस्तुत वर आहे, असा अर्थ करून, यामधील "**रेमिरे**" या पदावरून, "**सीता** आदि राजकन्या विवाहाचे समयीं चांगल्याच प्रौढ होत्या," असें ठरविण्याचा प्रयत्न कांहीं विद्वान् लोक करितात. हा प्रयत्न करण्यांत "त्या काळीं लग्नामध्ये मुली चांगल्या तरुण असत व त्या काळीं बालविवाहाची चाल मुळीच नव्हती," हें सिद्ध करावयाचा या विद्वान् लोकांचा हेतु असतो; परंतु '**रेमिरे**' या पदावरून हें सर्वांशांनी सिद्ध होऊं शकत नाही; कारण '**रम्**' या धातूचा अर्थ, 'स्त्रीपुरुषांचा एकांतांतील समागम' असा एकच अर्थ होत नाही. "**रम्**" म्हणजे (१) "खेळणें," (२) "आनन्द करणें," (३) "करमणूक करणें," (४) "चित्त रमणें," (५) "मनोरंजन करणें," आणि (६) "आनन्दानें कालक्रमणा करणें" असे अनेक अर्थ होतात. या संबंधांत दिग्दर्शनार्थ प्रथम कांहीं उदाहरणें पुढे देत आहोंत, ती अशीं:-

(१) "**रमन्ते योगिनोऽनन्ते नित्यानन्दे चिदात्मनि**" याचा अर्थ "नित्य, आनंदमय, अनन्त व चिदात्मा अशा त्या **श्रीरामाच्या** ठिकाणीं योगी **रममाण होतात**," असा होतो. या ठिकाणीं '**रमन्ते**' या पदाचा "स्त्रीपुरुषांच्या एकान्तसंबंधाचा" अर्थ मुळीच संभवत नाही. "ज्याच्या ठिकाणीं योग्याचें **चित्त रममाण** होतें" असा या ठिकाणीं अर्थ आहे.

(२) "राम रामेति रामेति **रमे** रामे मनोरमे" यांत "मनोरमे रामे रमे" असा शब्दप्रयोग आहे. याचा अर्थ "मनोरम अशा रामाचे ठिकाणीं मी रममाण होतों," म्हणजे "माझें **चित्त रममाण** होतें," असाच होतो. अन्य होत नाही.

( ३ ) दशरथापासून रामलक्ष्मणाला मागून घेऊन विश्वामित्र आपल्या आश्रमाकडे जात असतां मध्ये कामाश्रमांत सायंकाळीं ते वसतीस राहिले. तेथे रामलक्ष्मणांना अनेक मनोरंजक कथा सांगून विश्वामित्राने त्यांची करमणूक केली. त्याचें वर्णन वाल्मीकि महर्षि असें करीत आहेतः—

**कथाभिरभिरामाभिः अभिरामौ नृपात्मजौ ।**
**रमयामास धर्मात्मा कौशिको मुनिपुङ्गवः ॥ २१ ॥**

( बालकाण्ड, सर्ग २३ )

येथे '**रमयामास**' याचा अर्थ '**करमणूक केली**' असा होतो. म्हणजे या ठिकाणीं '**रम्**' या धातूचा अर्थ '**करमणूक** करणें' असा आहे.

( ४ ) श्रीराम वनांत जाऊं लागले असतां सीतेने आपणांसही बरोबर नेण्याविषयीं त्यांना अतिशय गळ घातली. ती म्हणाली—

**शुश्रूषमाणा ते नित्यं नियता ब्रह्मचारिणी ।**
**सह रंस्ये त्वया वीर वनेषु मधुगन्धिषु ॥ १३ ॥**

( अयोध्या काण्ड सर्ग २७ )

या ठिकाणीं गोविंदराज आपल्या टीकेंत असा अर्थ— "**नियता नियमयुक्ता, ब्रह्मचारिणी–नियतेन्द्रिया, कामभोगविवर्जिता इत्यर्थः**" "**रंस्ये**" **अपूर्वदर्शनेन संतुष्टा भविष्यामि**" असा देत आहेत.

आता येथे कोणी "**ऋतुकालाभिगमन**" हें गृहस्थाचें ब्रह्मचर्यच आहे, अशी शंका करतील आणि "**नियता ब्रह्मचारिणी**" याचा अर्थ "ऋतुकालाभिगामिनी होईन," असा घेऊन, "**रंस्ये**" या पदाचा अर्थ संभोगपर करतील, तर तो तसा होऊं शकत नाही; कारण "ऋतुकालाभिगामी" होणें हा गृहस्थाचा श्रुतिविहित नित्य व स्वाभाविक धर्म आहे. त्यासाठी "मी तुझ्यासह ऋतुकालाभिगामिनी होईन," असें म्हणण्याचीच आवश्यकता काय आहे? कोणीही, अगदी सामान्य स्त्रीदेखील आपली स्त्रीजातीची स्वाभाविक लज्जा सोडून असें म्हणेल, हें संभवत नाही. अर्थात् येथेही "**सह रंस्ये त्वया**" याचा अर्थ "तुझ्या सहवासांत **आनंदाने कालक्रमणा करीन,**" असाच होतो. अन्य

अर्थ होत नाही.

(५) पुनः "**वैदेही रमसे कच्चित् चित्रकूटे मया सह**" (अयोध्याकांड, सर्ग ९४, श्लोक १८) येथेही **रमसे** याचा अर्थ 'संभोग' असा होत नाही; कारण संभोग हा विवाहित पति-पत्नीमधला साधारण धर्म आहे. त्यासाठी मुद्दाम पतीनें पत्नीला असें विचारण्याची आवश्यकताच नाही आणि कोणीही प्रतिष्ठित गृहस्थ धर्मपत्नीला असा प्रश्न करणारही नाही. येथे "**रमसे कच्चित्**" याचा "**तुला आनंद वाटेल ना?**" असा आहे. म्हणजे "माझ्या सहवासांत अरण्यामध्ये चित्रकूटावर राहण्यांत तुला आनंद वाटेल ना? चैन पडेल ना?" असा अर्थ आहे.

कोणतेंही व्रत ग्रहण केलें, म्हणजे त्यांत स्त्रीसंबंध अगदीं वर्ज्य करावा लागतो. उभयता पतिपत्नींना पूर्ण ब्रह्मचर्य पालन करावें लागतें. श्रीराम यानें "**वनवासव्रत**" स्वीकारलें होतें, म्हणून त्याला वल्कलें, अजिन-धारण, जटाजूटबंधन, पायांत वाहणाही नसणें, इत्यादि, हे जे व्रताचरणाला आवश्यक नियम आहेत ते पालन करणें हेंही अत्यावश्यकच होतें आणि म्हणूनच या नियमाकडे लक्ष्य देऊन रामाला सीता "**नियता ब्रह्मचारिणी**" अशी "**सह रंस्ये त्वया**" असें म्हणत आहे. अर्थात् "**सह रंस्ये त्वया**" व '**वैदेही रमसे कच्चित्**' यामधील "**रंस्ये**" व "**रमसे**" यांचा अर्थ 'स्त्रीपुरुषांचा एकान्तांतील संबंध' असा नसून, 'आनंदानें कालक्रमणा करणें, चैन पडणें, मन लागणें' असाच होतो.

(६) श्रीरामाच्या भोजनोत्तर कालक्रमाचें वर्णन करितांना वाल्मीकि ऋषि म्हणत आहेत-

**दक्षिणारूपवत्यश्च स्त्रियः पानवशंगताः ।**
**उपानृत्यन्त काकुत्स्थं नृत्यगीतविशारदाः ॥ २२ ॥**
**मनोऽभिरामा रामास्ताः रामो रमयतां वरः ।**
**रमयामास धर्मात्मा नित्यं परमभूषिताः ॥ २३ ॥**
**स तया सीतया सार्धं आसीनो विरराज ह ।**
**अरुन्धत्या इवासीनो वसिष्ठ इव तेजसा ॥ २४ ॥**

**एवं रामो मुदा युक्तः सीतां सुरसुतोपमाम् ।**
**रमयामास वैदेहीं अहन्यहनि देववत् ॥ २५ ॥**

( उत्तरकांड, सर्ग ४२ )

याचा भावार्थ– ( भोजनोत्तर श्रीराम सीतेसहवर्तमान शयनागारांत झोपाळ्यावर येऊन बसले असतां ) नृत्यगीतविशारद अशा देखण्या व रूपवती स्त्रिया श्रीरामाच्या समीप येऊन नृत्य–गायन करीत असत. आणि दुसऱ्याचें मनोरंजन करण्यांत कुशल असा धर्मात्मा श्रीरामही मनाला आनन्द देणाऱ्या, रमणीय आणि वस्त्रालंकारांनी उत्कृष्टपणें भूषित अशा त्या स्त्रियांचें मनोरंजन करीत असे. त्या समयीं अरुन्धतीसह वसिष्ठ जसा शोभायमान दिसतो, तसा तो श्रीराम त्या सीतेसह विराजमान झालेला शोभायमान दिसत असे. येणेप्रमाणे मोठ्या आनंदाने युक्त असा श्रीराम, देवकन्येसमान असलेल्या त्या सीतेचें प्रति दिवशीं मनोरंजन करीत असे.

येणेप्रमाणे श्रीरामाच्या नित्याच्या कालक्रमणेचा हा एक भाग आहे. यामधील आमच्या आक्षेपक विद्वानांचा कटाक्ष " **मनोभिरामा रामाः ताः, रामो रमयतां वरः, रमयामास** " या शब्दांवर आहे; पण या वर्णनांत त्यांना आक्षेपार्ह वाटणारें तें काय आहे ? गवयाच्या गाण्यापासून जसें श्रोत्यांचें मनोरंजन होतें, तसें त्या गाण्याला समजणारा व त्याची कदर करणारा योग्य असा श्रोता मिळाल्यास त्यापासून त्या गवयाचेंही मनोरंजन होतें. याच न्यायानें येथेही समजावयाचें. त्या नृत्यगीतविशारद स्त्रिया नाचून व गाऊन श्रीरामाला दाखवीत असत व त्याचें मनोरंजन करीत असत, आणि श्रीरामही त्या गाणारणींच्या तानेवर उलट एखादी उत्कृष्ट तान घेऊन, रागाचे सूक्ष्म भेद दाखवून किंवा समेला बरोबर सम देऊन त्यांचें मनोरंजन करीत असे. असे प्रकार खाजगी बैठकींत होत असतात. पुनः " **स तया सीतया सार्धं आसीनो विरराज ह** " म्हणजे हें नृत्यगायन **श्रीराम सीतेला आपल्याजवळ घेऊन बसला असतांना म्हणजे सीता तेथेच प्रत्यक्ष असतांना तिच्यासमोर होत असे** व येणेप्रमाणे " **रमयामास वैदेहीं अहन्यहनि**

राघवः" म्हणजे प्रति दिवशीं श्रीराम सीतेची करमणूक करीत असे. तेव्हा "**रमयामास**" या पदाचा अर्थ आमचे आक्षेपक विद्वान् करितात, त्याप्रमाणे कसा होऊं शकतो ? याचा विद्वान् वाचकवृन्दांनी विचार करून पहावा.

राजे लोकांची ही नित्याची कालक्रमणा स्मृत्युक्त आहे, मनु महर्षि म्हणतात–

**भुक्तवान् विहरेच्चैव स्त्रीभिरन्तःपुरे सह ।**
**विहृत्य तु यथाकालं पुनः कार्याणि कारयेत् ॥**

( मनुस्मृति, अध्याय ७, श्लोक २२१ )

म्हणजे "राजाने भोजनोत्तर अन्तःपुरामध्ये स्त्रियांसहवर्तमान करमणूक करावी."

( ७ ) आता शेवटचें उदाहरण–

**रामोऽपि रेमे तैः सार्धं वानरैः कामरूपिभिः ।**
**राक्षसैश्च महावीर्यैः ऋक्षैश्चैव महाबलैः ॥ २८ ॥**

( उत्तरकांड, सर्ग ३९ )

म्हणजे राज्याभिषेक समारंभाची गडबड आटोपल्यानंतर चार दिवस विश्रांति घ्यावी, या हेतूने **श्रीरामाने** युद्धांत आपल्या उपयोगी पडलेले वानरवीर, राक्षस व ऋक्ष यांस ठेऊन घेतलें व त्यांच्याशीं "**रममाण**" झाला. म्हणजे काय केलें ? तर खाणीं–पिणीं, नाचणीं–गाणीं, सहल–सपाटे, थट्टा–मस्करी इत्यादि अनेक प्रकारच्या करमणुकी त्यांच्यासह केल्या. "**रेमे**" या पदाचा अर्थ आमचे आक्षेपक विद्वान् लोक करितात, तसा 'संभागपरच' केला, तर तो येथ कसा लागू होऊं शकेल ?

आता शेवटीं वादाचा मुख्य श्लोक "**रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिः सहिता रहः**" याच्या संबंधांत विचार करूं. यासाठी याच्या पूर्वीचे कांही श्लोक विचारास घेणें आवश्यक आहेत, ते येथे घेऊं–

**कौसल्या च सुमित्रा च कैकेयी च सुमध्यमा ॥**
**वधूप्रतिग्रहे युक्ता याश्चान्या राजयोषितः ॥ १७ ॥**

**ततः सीतां महाभागां उर्मिलां च यशास्विनीम् ।**
**कुशध्वजसुते चोभे जगृहुर्नृपयोषितः ॥ ११ ॥**
**मंगलालापनैर्होमैः शोभिताः क्षौमवाससः ।**
**देवतायतनान्याशु सर्वास्ताः प्रत्यपूजयन् ॥ १२ ॥**
**अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वा राजसुतास्तदा ॥**
**'रेमिरे' मुदिताः सर्वा भर्तृभिः सहिता रहः ॥ १३ ॥**

( बालकांड, सर्ग ७७ )

यांचा भावार्थ– कौसल्या, सुमित्रा, कैकेयी आणि दशरथाच्या इतरही राण्या सुनांचें स्वागत करण्यासाठी सिद्ध झाल्या. त्यानंतर महाभाग्यवती सीता, यशस्विनी ऊर्मिला आणि कुशध्वजाच्या दोघीही कन्या माण्डवी व श्रुतकीर्ति यांचे 'गृहप्रवेशनीय होम' आटोपल्यावर मंगल आशीर्वादात्मक अशा भाषाणांनी ( कौसल्या, सुमित्रा, कैकेयी प्रभृति सर्व राण्यांनी ) त्यांचें स्वागत केलें व त्या सर्वांकडून देवघरांतील कुलदेवतांची पूजा करविली.

या वर्णनावरून पाहतां हा सर्व समारंभ गृहप्रवेशाच्या वेळचा ( घरभरणीचा ) आहे. कुलदेवतांची पूजा आटोपल्यानंतर—

**अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वा राजसुतास्तदा ।**
**रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिः सहिता रहः ॥ १३ ॥**

या श्लोकाचा अर्थ बहुधा सर्व विद्वान् लोक पुढीलप्रमाणे करितात– "नन्तर सर्व वडील मंडळींना वंदन करून त्या राजकन्या आपल्या पतीसह 'एकान्तांत रममाण' होऊं लागल्या."(महाराष्ट्रियांची समालोचना. संदिग्ध परामर्श पृ० २७८)

या अर्थानुसार या श्लोकाचा अन्वय करावयाचा, म्हणजे तो पुढीलप्रमाणे होतो–

**"तदा सर्वा राजसुताः अभिवाद्यान् मुदिताः (सत्यः) भर्तृभिः सहिता रहः रेमिरे"** म्हणजे **'भर्तृभिः सहिता'** या शब्दांचा संबंध **'रहः रेमिरे'** या शब्दाशीं लावितात; पण तें बरोबर नाही. **"भर्तृभिः सहिताः"** याचा संबंध '**अभिवाद्यान् अभिवाद्य**' या शब्दांशीं आहे.

म्हणजे या श्लोकाचा अन्वय असा करावयास पाहिजेः– **"तदा सर्वाः राजसुताः भर्तृभिः सहिता, अभिवाद्यान् अभिवाद्य, ताः सर्वाः रहः रेमिरे"** म्हणजे "त्या सर्व राजकन्या आपआपल्या पतिसहवर्तमान वडील माणसांना वंदन करून, त्या सर्वही एकांतांत रममाण झाल्या."

असाच अर्थ कां करावा, याचें कारण असें आहे की, गृहप्रवेशाच्या समयीं वधूच्या अंगावरील शेल्याच्या पदाराशीं वराच्या अंगावरील शेल्याच्या पदराची गाठ बांधतात व त्याच्याकडून कुलस्वामीला व वडील माणसांना **जोडप्यानें नमस्कार करवितात** अशी प्रथा आहे. या प्रथेस अनुसरून **"भर्तृभिः सहिता"** या पदांचा संबंध **"अभिवाद्यान् अभिवाद्य"** या पदाशींच असणें योग्य आहे. **"रेमिरे"** या पदाशीं संबंध जोडणें योग्य होणार नाही. आता शेष राहिलें **"रहः"** हें पद. याचा संबंध **"रेमिरे"** या पदाशीं आहे. म्हणजे **"ताः सर्वाः राजसुताः रहः रेमिरे"** असा अन्वय करावयाचा. याचा अर्थ "त्या सर्व राजकन्या, रहः म्हणजे एकान्तांत रममाण झाल्या," असा होतो; पण राजकन्या एकान्तांत रममाण झाल्या म्हणजे काय? याचा अर्थ असा आहे की, या चौघीही बहिणी सुना म्हणून दशरथाच्या घरांत आल्या होत्या. त्यांना एकमेकींशीं बोलावयाला, बसावयाला, हसावयाला, खिदळावयाला, खेळावयाला, लोळावयाला म्हणजे मोकळपणानें वागावयाला स्वतंत्र जागा एकांतांतच असावयाची आवश्यकता होती; कारण सासुरवासिनीच त्या! त्यांना हे असले व्यवहार सास्वांसमोर, सासऱ्यासमोर अथवा तत्सदृश इतर कोणा वडील माणसांसमोर करणें प्रशस्तपणाचें कसें झालें असतें? अर्थात् या सासुरवासिनीसाठी एक पृथक् स्थान व तेंही सासूसासऱ्यांच्या किंवा तत्सदृश कोणा वडील माणसांच्या कानांवर या मुलींचें हसणें खिदळणें जाऊन आदळणार नाही, अशा एकांतांतच ( **रहः** ) असणें इष्ट व योग्य होतें व तशाच एकान्त जागीं त्यांच्यासाठी योजना केली गेली असली पाहिजे. त्या एकांतस्थळीं त्या सर्व राजकन्या **"रेमिरे"** म्हणजे आनंदानें एकमेकींच्या सहवासांत कालक्रमणा करूं लागल्या. या एकांतांत त्या कन्यांचा भर्त्यांशीं कांहीच संबंध येत नाही.

या एकंदर विवेचनावरून ध्यानीं येईल की, **सीताप्रभृति या मुली** अगदी

गृहप्रवेशाच्याच दिवशीं आपल्या **पतिसहवर्तमान एकांतांत रममाण होण्याइतक्या प्रौढ नव्हत्या.** त्या अगदी सहा सहा, सात सात वर्षांच्या लहान मुलीच होत्या.

**नव्या नवलाईच्या सुना!** एक, दोन, तीन नव्हेत तर **साडेतीनशें आणि तीन सास्वा.** तेव्हा त्यांच्या कौतुकाला काय सीमा! सुपाऱ्या खेळविणें, सुपाऱ्या लपविणें, चौपट खेळविणें, उखाणे घेवविणें, एकमेकांस घास देवविणें इत्यादि इत्यादि, तत्कालानुरूप काय असतील ते कौतुकाचे प्रकार प्रत्येकींकडून होतच असले पाहिजेत व अशा रीतीने त्या मुलींची कालक्रमणा आनंदांत होत असली पाहिजे. हे सर्व करमणुकीचे प्रकार राणीवशांतच होत असल्याकारणाने "**रहः रेमिरे**" असें म्हटलें आहे आणि हे सर्व प्रकार **नवरानवरी** यांचे **एकमेकांसहवर्तमानच** व्हावे लागत असल्याकारणाने "**भर्तृभिः सहिताः**" याचा संबंध "**रहः**" या पदाशीं जोडला, तरीदेखील आमच्या आक्षेपक विद्वानांचा "**संभोग**" हा अर्थ या राजकन्यांच्या संबंधांत **मुळीच संभवत नाहीं;** कारण रामलक्ष्मणादिक मुलांचें वय **सोळा वर्षांपेक्षा अधिक** नव्हतें व सीताप्रभृति मुलींचें वय **सात वर्षांपेक्षा अधिक** नव्हतें. हें **वाल्मीकि-रामायणाप्रमाणेच अग्निवेश-रामायण** व **लोमश-रामायण** या दोनही रामायणांवरूनदेखील सिद्ध आहे, हें त्या दोनही रामायणांतलीं अवतरणें पुढे दिलीं आहेत, त्यांवरून ध्यानीं येईल.

( १ ) **अग्निवेश-रामायणांतील** अवतरण—

**रामः पंचदशे वर्षे षड्वर्षामपि मैथिलीम्।**
**उपयेमे त्वयोध्यायां द्वादशाब्दान् उवास सः॥ १॥**
**सप्तविंशतिमे वर्षे वनवासं अकल्पयन्।**
**अष्टादश तु वर्षाणि सीतायास्तु तदाऽभवन्॥ २॥**

( २ ) **लोमशाचें रामचरित—**

**रामः पंचदशे वर्षे षड्वर्षामथ मैथिलीम्।**
**उपयेमे विवाहेन रम्यां सीतां अयोनिजाम्॥१५-१६॥**

**ततो द्वादशवर्षाणि रेमे रामस्तया सह ।**
**सप्तविंशतिमे वर्षे यौवराज्यं अकल्पयत् ॥ १७ ॥**

या दोनही रामायणांच्या अवतरणांतील अर्थ एकच आहे. तो असा की, “ **रामाने** आपल्या वयाच्या **पंधराव्या वर्षी सहा वर्षांच्या सीतेशीं** लग्न लावलें. तदनन्तर **बारा वर्षे** तो अयोध्येंत होता. वनवासास जातांना त्याचें वय **सत्तावीस वर्षांचें** होतें. सीतेच्या वयाला **अठरा वर्षे** पूर्ण झालीं होतीं व हेंच **वाल्मीकि-रामायणावरूनही सिद्ध** आहे. अर्थात् आक्षेपक विद्वान् लोकांच्या कल्पनेप्रमाणे त्या मुली विवाहाचे वेळीं प्रौढ वयस्क नसून ६।७ वर्षांच्या लहान मुलीच होत्या, हें स्पष्टपणें ध्यानीं येईल.

यावरून **प्रौढ विवाह** होतच नव्हते, असें आमचें म्हणणें नाही. कन्यांचे **प्रौढ विवाह**ही होत असत व **बालविवाह**ही होत असत. क्षत्रियांमध्ये **स्वयंवर** पद्धति रूढ असल्याकारणाने स्वयंवरा **क्षत्रिय-कन्या** बहुधा **प्रौढाच** असत. **सीतेचा** विवाह हा **अपवादासमान** आहे. **ब्राह्मण-कन्यांचे** मात्र विवाह **बालपणींच ब्राह्मविधीने** होत असत.

ज्या कन्यांचा स्वयंवर होतो, त्या आपली आवडनिवड समजण्याइतक्या जाणत्या असतात हें खरें; पण तें ‘ **स्वयंवर** ’ असेल तेव्हाच. **सावित्री, दमयन्ती, रुक्मिणी,** या मुली चांगल्या **प्रौढ** होत्या व त्यांचे **खरोखरच स्वयंवर** झालें. **सीतेचें** कांही **स्वयंवर** झालेलें नाही; कारण स्वयंवरांत **मुलीच्या आवडीनिवडीचा** प्रश्न असतो, तो सीतेच्या संबंधांत मुळीच लक्ष्यांत घेतला गेला नाही. तिच्या बापाने तिला **पणाला** लाविली होती. ज्याने **पण जिंकला,** त्याने ती नेली. त्यांत **सीतेची आवडनिवड** कोठे राहिली ? तेव्हा **सीतेचें स्वयंवर** कसें म्हणतां येतें ? सीतेचें हें ‘ **स्वयंवर** ’ नसून ‘ **समाह्वय** ’ आहे. त्याला **औपचारिकपणें ‘ स्वयंवर ’** हें नांव दिलें गेलें आहे. यासंबंधांत “ **सीतास्वयंवर** ” या विषयावरील लेखांत विस्तरशः पहावें.

# कांहीं बन्धु

## बंधुप्रेम व भाऊबंधकी

| क्रम | बन्धूंचीं नांवें | नातें. | प्रेम | वैर | टिप्पणी |
|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | |
| १ | सुन्द, उपसुन्द | सख्खे बंधु | प्रेम | वैर | प्रथम या दोघांही बंधूमध्ये आत्यन्तिक प्रेम होतें; पण मोहिनीच्या निमित्तानें वैर वाढून, हे एकमेकांच्या हातून मृत्यु पावले. |
| २ | नल व पुष्कर | सख्खे बंधु | ,, | वैर | द्यूत खेळल्याकारणानें वैर झालें होतें. |
| ३ | राम व लक्ष्मण | सापत्न बंधु | प्रेम | | स्वतःच्या सुखावर पाणी सोडून आजन्म रामाचें सहाय्य केलें. |
| ४ | राम व भरत | सापत्न बन्धु | प्रेम | | बापाने राज्य दिलें असूनदेखील, तें न घेतां केवळ बंधुप्रेमास्तव निःस्वार्थीपणानें त्याचे राज्याचें रक्षण केलें व राम वनवासांतून परत आल्याबरोबर तें त्याच्या स्वाधीन केलें. |
| ५ | रावण व कुंभकर्ण | सख्खे बंधु | प्रेम | | सीतेसंबंधांत रावणाची बरीच खरड काढिली व ती परत करण्याविषयीं शक्य तितका उपदेशही केला; पण ऐकतच नाहीं, असें पाहिलें, तेव्हा आपल्या |

| क्रम | बंधूंचीं नांवें | नातें | प्रेम | वैर | टिप्पणी |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | भावाचें कृत्य निस्तारलेंच पाहिजे, म्हणून शक्य तेवढा प्रयत्न करून शेवटीं युद्धांत जीवही दिला. |
| ६ | रावण व बिभीषण | सख्खे बंधु | प्रेम | वैर | प्रथम या दोघांमध्ये प्रेम होतें; पण सीतेला आणल्यामुळे वैर झालें. सीतेचा त्याग करण्याविषयीं बहुत प्रकारें सांगून पाहिलें; पण कांहीच उपयोग होत नाहीं, असें पाहून मंत्री या नात्यानें, राष्ट्राचें स्वातंत्र्य-रक्षण करण्याच्या हेतूनें रावणाचा त्याग करुन रामास येऊन मिळाला व राक्षसांचें राज्य वाचविलें. |
| ७ | वाली व सुग्रीव | सख्खे बंधु | प्रेम | वैर | याही दोघां बंधूमध्ये प्रथम प्रेम चांगलेंच होतें; पण पुढे राज्य व स्त्री या दोन कारणांमुळे भयंकर वैर पडलें; त्याचा परिणाम वालीच्या वधांत झाला. |
| ८ | कौरव व पाण्डव | सावत्र बंधु | | वैर | केवळ सापत्न भावामुळे वैर व शेवटीं कौरवांचा नाश. |
| ९ | अवरंगजेब व त्याचे भाऊ | सख्खे बंधु | | वैर | राज्यलोभमूलक वैर. ( बहुतेक मोगल बादशहांमध्ये बहुधा हीच प्रथा दिसते. ) |
| १० | शिवाजी व व्यंकोजी | सावत्र बंधु | | वैर | राज्यलोभमूलक वैर. शिवाजीच्या मनांत पाप नाहीं; पण व्यंकोजीकडून आगळीक. |

| क्रम | बंधूचीं नांवें | नातें | प्रेम | वैर | टिप्पणी |
|---|---|---|---|---|---|
| ११ | संभाजी व राजाराम | सावत्र बंधु | प्रेम | | संभाजीने राजारामाच्या आईला भिंतींत चुणून मारलें; त्याच्या मातुल–कुलाचें शिरकाण केलें असूनदेखील तो संभाजीशीं सहानुभूतीने राहिला आणि यवन–शत्रूपासून प्रत्येक क्षणाला प्राणसंकट उपस्थित होत असतां अनेक प्रकारचे प्राणांतिक छल सहन करावे लागले, ते करून-देखील वडील बंधूशीं त्याच्या पश्चात्‌देखील इमानावर राहून केवळ प्रतिनिधि या नात्याने राज्याचा सांभाळ केला. यावरून भरताचें बंधुप्रेम व राजारामाचें बंधुप्रेम यांची तुलना करून पहातां राजारामाचें बंधुप्रेम वरिष्ठ ठरतें. ( पुढील कोष्टक पहा. ) |
| १२ | थोरले बाजीराव व चिमाजी अप्पा. | सख्खे बंधु | प्रेम | | थोरले बाजीरावसाहेबांवरचें चिमाजी अप्पांचें प्रेम रामलक्ष्मणाच्या प्रेमासारखेंच प्रसिद्ध आहे. थोरले बाजीरावसाहेबांच्या पाठीवर चिमाजी अप्पा त्यांच्या रक्षणार्थ लक्ष्मणाप्रमाणेच दक्ष असे. |

# श्रीरामचन्द्र व छत्रपति शिवाजी महाराज

## यांच्या परिस्थितीची तुलना.

### श्रीरामचन्द्र

१ श्रीरामाचा पिता सम्राट् होता.

२ श्रीरामाचें वंशपरंपरागत साम्राज्य होतें.

३ श्रीरामाविरुद्ध कोणीही क्षत्रिय राजे रावणास मिळाले नव्हते.

४ श्रीरामाचा सावत्र (भरत) वडिलांनी दिलेलें व प्रत्यक्ष श्रीराम स्वतः देत असतांही अयोध्येचें राज्य घेईना.

५ श्रीरामाचा सावत्र भाऊ लक्ष्मण यानें आपल्या सर्वस्वावर व सर्व सुखावर पाणी सोडून, श्रीरामाच्या रक्षणीं १४ वर्षें वनवासदेखील पतकरला. आणि त्याच्या वनवासासारख्या अत्यन्त आपत्कालांतदेखील त्याचाच पक्ष धरून त्या (श्रीरामाच्या) शत्रूंशीं घोर युद्ध केलें.

### श्रीछत्रपति शिवाजी

१ शिवाजीचा पिता सम्राटाचा नोकर होता.

२ शिवाजीला नवें साम्राज्य स्थापावयाचें होतें.

३ शिवाजीविरुद्ध त्याचे नातलग मराठे सरदारच त्याचे शत्रु मुसलमान बादशाह यांस मिळालेले होते.

४ शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी वडिलोपार्जित जहागिरीचा नुसता वाटा शिवाजी मागत असूनदेखील त्यास देईना.

५ शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी यानें वडिलोपार्जित जाहगिरीचीं सर्व सुखें, आपणांस एकट्यासच उपभोगावयास मिळावींत, म्हणून शिवाजीच्या शत्रूंचा पक्ष धरून शिवाजीशीं युद्ध केलें.

| | श्रीरामचंद्र | | श्रीछत्रपति शिवाजी महाराज |
|---|---|---|---|
| ६ | श्रीरामाला शत्रूचा भाऊ बिभीषण सहाय्यार्थ येऊन मिळाला. | ६ | शिवाजीचा प्रत्यक्ष मुलगा संभाजी शिवाजीविरुद्ध शत्रूंस ( मोगलास ) प्रथम जाऊन मिळाला होता. |
| ७ | श्रीरामाच्या सहाय्याला, रावणालादेखील ज्याचा धाक वाटत होता, असा वानरराज सुग्रीव आपल्या अफाट वानरसैन्यासह होता. | ७ | शिवाजीच्या सहाय्याला सरदारदेखील कोणी नव्हता व कोणाचें सैन्यही त्याच्या मदतीला नव्हतें. |
| ८ | श्रीरामाला सुग्रीवाचें आयतें सैन्य मिळालें होतें. त्यामुळे सैन्य उभारण्याची, त्याला शिकविण्याची त्याच्या पोटापाण्याची, त्याला हत्यारें पुरविण्याची इ० मुळींच काळजी करावी लागत नव्हती. | ८ | शिवाजीला एकएक मावळा शिपाई गोळा करावा लागला व त्याला शेतकऱ्याचा शिपाई बनवावा लागला आणि त्याच्या पोटापाण्याची, शस्त्रादिकांची, इ० सर्वच काळजी वहावी लागली. |
| ९ | श्रीरामाचे वानरवीर, सर्व शस्त्रास्त्रकोविद, युद्धशास्त्रांत निष्णात, राजकारणपटु व खानदानी लढवय्ये असून, राक्षसांशीं टक्कर देण्यासारखे धिप्पाड असे होते. | ९ | शिवाजीचे मावळे अत्यन्त अडाणी, केवळ नांगरे, अगदी अक्षरशत्रु, राजकारण व युद्ध यांसंबंधी अनभिज्ञ व बादशाही सैन्यापुढे किरकोळ असे होते. |
| १० | श्रीराम वनवासांतदेखील मोकळा होता. | १० | शिवाजी शत्रूच्या कैदेंत अडकून पडला होता व तेथून त्याला मोठ्या चातुर्यानें व धाडसानें सुटका करून घ्यावी लागली आहे. |
| ११ | श्रीरामाचे शत्रु रावणादिक हे वैदिक धर्मी आर्य होते. | ११ | शिवाजीचे शत्रु यवन हे वैदिक धर्मविध्वंसक अनार्य होते. |

| श्रीरामचंद्र | श्रीछत्रपति शिवाजी महाराज |
|---|---|
| त्या कारणानें शत्रूपासून धर्मरक्षण करण्याची काळजी रामाला मुळीच वहावी लागली नाही. | त्यामुळे शिवाजीला राष्ट्ररक्षणास्तव अनेक राजकारस्थानें संभाळून पुनः धर्मरक्षणाचीही काळजी अत्यंत वहावी लागत असे. |
| १२ श्रीरामावर असे प्रसंग कधीच आले नाहीत व त्रासही त्याला कधीच भोगावे लागले नाहीत. | १२ शिवाजीला शत्रूपासून, आपला जीव वाचविणेसाठी वेषान्तर करून गुप्त रूपाने राहणें, भुयारांतून, रानावनांतून पळून जाणें, असे कितीतरी त्रास भोगावे लागले आहेत. |
| १३ रावणाशीं युद्ध चालू झालें असतां श्रीरामाच्या मदतीस धाडण्यासाठी भरताने ३०० क्षत्रियराजे ससैन्य एकत्र केले होते. | १३ शिवाजीला अशा प्रकारचें सहाय्य करणारें कोणीच नव्हतें. उलट त्याचा पक्ष निर्बल करण्याचेच प्रयत्न अगदी आरंभापासून त्याच्या आप्तस्वकीयांकडूनच होत होते. |
| १४ श्रीरामाचा वनवासही ( रावण सीतेला नेईपर्यंत ) अत्यन्त सुखाचा होता. | १४ शिवाजीचा गृहवासदेखील अनेक प्रकारच्या काळज्यांमुळे रामाच्या वनवासापेक्षा दुःखाचा होता. |

तात्पर्य– शिवाजीची वर दाखविल्याप्रमाणे अत्यन्त प्रतिकूल परिस्थिति होती. अशा प्रतिकूल परिस्थितीशीं तोंड देऊन, सर्वत्र विखुरलेल्या मावळ्यांची एकजूट करून, त्यांच्यांत देशाभिमान व शौर्य उत्पन्न केलें आणि शत्रूंच्या जिवंतपणींच त्यांच्या नाकावर टिच्चून " **मराठ्यांचें साम्राज्य** " स्थापन केलें व महाराष्ट्राला स्वतंत्र केलें. श्रीरामापेक्षा शिवाजीपुढे फार बिकट प्रश्न होता. ( येथें वाचकांनी दोघांच्या परिस्थितीची तुलना करावी व भावांचे संबंध जाणावे. )

# तप

या बालकाण्डामध्यें अनेकांनी तप करून उच्च सिद्धि मिळविली, अशा कथा आल्या आहेत. विश्वामित्रानें तर आपलें वर्णपरिवर्तनही तपानें करून घेतलें. या तपासंबंधी जें काय या ठिकाणीं वर्णिलें आहे, त्यावरून अमूक केलें असतां अमूक होतें, हें जाणणें जवळजवळ अशक्य आहे. वायुभक्षण केलें, आंगठ्यावर उभा राहिला, हात वर करून राहिला, अशा प्रकारचें कांहीतरी येथे लिहिलेलें आहे. तें वाचून कोणास कांही तप करतां येईल, असें मुळीच नाही. नुसत्या आंगठ्यावर वर्षानुवर्ष उभें राहणें अशक्य आहे व कोणी तसा उभा राहिला, तरी त्यापासून आत्मिक उन्नति प्राप्त होईल, असेंहि मानतां येणार नाही.

रामायणासारख्या राष्ट्रीय ग्रंथांत या तपश्चरणासंबंधी कांही एक सविस्तर माहिती मिळूं नये, हें खरोखरच आश्चर्य आहे ! तपश्चरणाची साद्यन्त कल्पना स्पष्टपणानें देणारे ग्रंथच आपल्याकडे उपलब्ध नाहीत.

तपश्चरण हा शक्तिसंवर्धनाचा एक शास्त्रोक्त मार्ग आहे. सध्या अशा प्रकारची शक्तीची प्राप्ति **संमोहनविद्या, स्वप्नविद्या,** ( मेस्मेरिजम्, हिप्नॉटिजम् ) आदि विद्यांच्या अभ्यासानें इंग्रजी पुस्तकांच्या सहाय्यानें लवकर करून घेतां येते. सध्या हीं शास्त्रें सोपपत्तिक रीतीनें जगापुढे आलेलीं आहेत. प्रचीन काळीं आर्यांनी अशा अनेक विद्या सिद्ध केल्या होत्या व त्या विद्यांच्या सोपपत्तिक परंपराही आपल्यामध्यें होत्या; पण सध्या या सर्व विद्या अडाणी व अप्रबुद्ध लोकांच्या हातीं पोचल्या असल्यामुळे त्यांचा कोणासच व्हावा तसा उपयोग होऊं शकत नाही.

तंत्रशास्त्रामध्यें अनेक पद्धति आहेत. योगाच्याही अनेक पद्धति आहेत. पण त्यांचा अभ्यास करून, स्वतः प्रगति करून घेऊन, उपपत्तीसह नव्या तऱ्हेनें हे ग्रन्थ कोणी तरी लिहिले पाहिजेत. या विद्या आपणांकडे असूनहि सध्या आपण त्यांस पारखें झालों आहोंत. उपपत्तीसह शास्त्रशुद्ध मार्गानें गेलें असतां विशेष शक्तींची प्राप्ति लवकर होऊं शकते; पण या परंपरा अडाणी लोकांकडे पोचल्यामुळे त्यांत अवडंबर व भोंदूपणा फारच वाढलेला आहे. हाच या विद्यांच्या ऱ्हासाला कारण

झाला आहे.

यासाठी या विषयाकडे संशोधकांनी आपलें लक्ष्य लावावें, ऐवढेंच येथे सुचवितों.

## शाप

जसें तपाच्या संबंधानें त्या त्या तप करणारानें काय केलें, तें येथील वर्णनावरून ध्यानीं येत नाही, तसेंच शाप देण्यासंबंधी व त्याच्या परिणामासंबंधानेंहि ध्यानीं येत नाही. केव्हा केव्हा हे शाप कसे परिणामकारक होत असावे, हें तर मुळीच लक्ष्यांत येत नाही. या संबंधी एकदोन उदाहरणें घेऊं–

त्रिशंकु राजानें कुलगुरूचा अपमान केला, म्हणून वसिष्ठपुत्रांनी त्यास ' चाण्डाल हो, ' असा शाप दिला व रातोरात हा राजा चाण्डाल झाला. त्याच्या अंगावरचे कपडे निळे झाले, केस लांब होते ते आखूड झाले, शरिराची कान्ति रुक्ष झाली व अंगावरील सोन्यामोत्यांचे दागिनेही लोखंडाचे बनले ! ! ( वा. रा. बा. कां. ५८।१० ) नुसता शाप होतांच सोन्याचें लोखण्ड बनलें, इतकें धातूचें व असें माणसाचें परिवर्तन करण्याचें सामर्थ्य शापांत आहे काय ? असा प्रश्न येथे उत्पन्न होतो.

याहीपेक्षा याच कथेमध्ये विश्वामित्रानें या वसिष्ठपुत्रांस शाप दिला आहे, तो तर फारच विलक्षण आहे ! वसिष्ठपुत्रांनी असें म्हटलें की, ' चाण्डालाचें ' याजन क्षत्रिय करीत आहे, तेव्हा अशा यज्ञांत कोणती देवता येते, तें पाहूं. असें म्हणण्याचा अधिकार वसिष्ठपुत्रांस होता. वसिष्ठपुत्र हे वसिष्ठाचे पुत्र असून, आपल्या धर्माचरणांत तत्पर होते, तपस्वी होते, मंत्रपूत होते व त्यांनी जें म्हटलें, तें अगदी खरें होतें. ती असत्य–निंदा नव्हती; तर विश्वामित्राच्या अनधिकार चेष्टेचें तें नुसतें वर्णन होतें.

असें असतांही विश्वामित्र आपल्या घमेंडखोर वृत्तीनें रागावतो, डोळे लाल करतो व कांही कारण नसतां व वसिष्ठपुत्रांचा कांही दोष नसतां रागानें त्यांस शाप देतो– 'वसिष्ठपुत्रांचें भस्म होईल, पुढील सातशे जन्म ते मृतमांस खातील, ते कुत्र्याचें मांस खाऊं लागतील. ते निर्दय व कुरूप डोंब होऊन, दुरा-

चारी बनतील. ( बा. का. ६० । १८–२३ )

याप्रमाणे घडलें असेंही म्हटलें आहे. विश्वामित्राची चूक, विश्वामित्राचा व्यर्थ क्रोध व त्याचें प्रायश्चित्त वसिष्ठपुत्रांना इतकें जबरदस्त मिळतें, हें आश्चर्य होय! या ठिकाणीं स्वतः वसिष्ठ एवढा ब्रह्मर्षि असतांहि आपल्या पुत्रांस बचाऊं शकला नाही व वसिष्ठपुत्रांची स्वतःची तपश्चर्या, धर्मनिष्ठा, सदाचार यांपैकी कांहीहि त्यांचा बचाव करण्यास समर्थ झालें नाही, याचें आश्चर्य वाटतें! एखाद्या उर्मट घमेंडखोर क्रोधी माणसाने उठावें व एखाद्या सदाचारी माणसास शापावें व त्यामुळे त्या सदाचाऱ्याचें वाटोळें होऊन जावें. हें जर खरोखर असेंच घडत असेल, तर सदाचाराचा पाठीराखा धर्म नाही, असा याचा अर्थ होतो.

शाप झाल्याबरोबर कोणी चाण्डाल झाला, कोणी डोंब झाला, कोणी राक्षस झाला, इतकेंच नव्हे तर आज निर्मांस भोजन करणारा, कन्दमुळांवर उपजीविका करणारा उद्यापासून मृतमांस खाऊं लागला, असलीं जीं वर्णनें आहेत, तीं धर्माचरणाचें महत्त्व वर्णन करणारीं आहेत कीं काय, अशीहि शंका येथे येते.

पुष्कळच ठिकाणीं हे शाप निष्कारण कठोर झालेले असून, त्या त्या पुरुषांच्या पूर्वीच्या धर्माचरणाची राखरांगोळी करणारे झाल्याचें वर्णिलें आहे. मग धर्माचरणाचें महत्त्व तें काय राहिलें? असा प्रश्न अशा वेळीं उत्पन्न होतो.

असे शाप व त्यांचे परिणाम हे केवळ अर्थवादरूप आहेत, ते परमार्थतः सत्य मानावयाचे नाहीत, तें एक काव्य आहे, असें याविषयी म्हणणें योग्य होईल. तथापि अशा शापांसंबंधाने, तपांसंबंधाने, कांही प्रमाणबद्धता अशा राष्ट्रीय काव्यांत राहिली असती, तर बरें झालें असतें, हें मात्र निर्विवाद आहे. '**काव्या**'मध्ये हें सर्व क्षम्य आहे, यांत शंका नाही; पण काव्य जर धर्माचरणाची वाढ करणारें असलें, तर त्यांत असा प्रकार न होईल तर बरा.

यज्ञाच्या पुण्याईने त्रिशंकु स्वर्गाला जाईना, तेव्हा विश्वामित्राने आपलें पुण्य त्यास देऊन, त्यास वर वर आकाशांत ढकलून स्वर्गांत सदेह पोंचवला, तेथे त्यास इंद्राने राहूं दिलें नाही व खाली ढकलून दिलें, तेव्हा तो खाली पडूं लागला. विश्वामित्राचें पुण्य मात्र खर्ची पडलें. शेवटीं विश्वामित्राने नवें तारामंडळ निर्माण केलें व त्यांत त्रिशंकूला लटकवून टांकला. हीहि **काव्य**मय कथा आहे.

वरच्या बाजूलाच आकाशांत स्वर्ग आहे, या कल्पनेवर या कथेची रचना झाली आहे; पण स्वर्ग हा मनोमय लोक आहे व तो केवळ वरच आहे, असें म्हणणें खरें नव्हे. असे वस्तुस्थितीचे विपर्यास '**काव्या**' मध्ये चालू शकतात. यासाठी काव्याला असल्या वस्तुस्थितीच्या कसोट्या लावूं नयें, हेंच खरें आहे.

## बालकाण्डाचा उपसंहार.

याप्रमाणे बालकाण्डाचा उपसंहार वाचकांस सादर केला आहे. या उपसंहारामध्ये रामायणाच्या पाठांतील प्रक्षिप्त व अप्रक्षिप्त श्लोकांचा विचार केलेला नाही. याचें कारण असें की, लाहोरला पं० रघुवीर शर्मा M. A., Ph. D. हे आखिल भारतांतील अनेक लिपींतील वाल्मीकि रामायणाच्या प्रति एकत्र जमवून, विशेषतः नेपाळी, तिबेटी व चिनी दुर्मिळ प्रति मिळवून वाल्मीकि रामायणाचे शुद्ध पाठ कोणते व अशुद्ध कोणते, तें ठरवीत आहेत. यांनी सध्या जेवढीं साधनें उपलब्ध होणें शक्य आहे, तेवढीं गोळा करून संशोधन चालविलें आहे. हा ग्रंथ तयार झाल्यानंतर प्रक्षिप्ताप्रक्षिप्त वचनांसंबंधी लिहिलेलें बरें, असें ठरवून या संबंधी आम्ही येथे कांही लिहिलें नाहीं.

या लाहोरच्या ग्रन्थांत सर्वच पाठ संग्रहित होणार आहेत व अनायासाने ते विचार करतांना उपयोगी पडतील; यासाठी त्यानंतरच विचार करून प्रक्षेप कोणता, तें ठरवणें सोपें पडेल, असें आम्ही ठरवलें आहे.

ज्या वाल्मीकि-रामायणावर तिलकादि अनेक प्राचीन टीका प्रकाशित झालेल्या आहेत, या टीकाकारांनी शुद्ध म्हणून मानलेला पाठच आम्ही या ठिकाणीं स्वीकारला आहे. सर्व टीकाकारांनी ठरवलेला आशयच आम्ही स्वीकारला आहे. क्वचित् ठिकाणीं मतभेद असला तर तो टिप्पणीमध्ये दिला आहे. या पाठाला सोडावें व अन्य पाठ घेऊन त्याची चर्चा करावी, असें करण्यास कोणतेंही बलवत्तर कारण आम्हांस दिसलें नाही.

कित्येकांनी बालकाण्डाचे सर्ग मागेपुढे करावें, अयोध्याकाण्डाचा कांही भाग बालकाण्डांत घ्यावा, असे तर्क प्रसिद्ध केले आहेत; पण ते नुसते तर्क आहेत. तसा फरक करण्यास कांही बलवत्तर प्रमाण आहे, असें आम्हांस वाटत नाही. ज्या तर्काला कागदोपत्रींचा पुरावा असेल, त्याच तर्कांचा कांहीतरी उपयोग

होईल. विनाप्रमाण तर्क सुरू झाले, म्हणजे रामायणाचा काय अथवा अन्य ग्रंथाचा काय, कोणता भाग शिल्लक राहील व कोणता नाही, हें कांही सांगतां यावयाचें नाही.

जें रामायण या सर्व प्राचीन टीकाकारांनी मान्य केलें, व त्यांपैकी कांही त्यांनीच प्रक्षिप्त भाग म्हणून ठरवला, हा रामायणाचा ग्रंथ जसा या टीकाकारांनी स्वीकारला आहे, तसाच प्रमाण मानून, त्यांतील काव्य एका बाजूस करून, बाकीचा जो इतिहासाचा भाग त्यांत दिसत आहे, त्याचा विचार करून, जशी क्रान्ति त्या वेळीं घडली असावी, असें वाटतें, तिची रूपरेषा आम्ही या उपसंहारांत दाखवण्याचा यत्न केला आहे. यांत कांही ठिकाणीं संगति लागली नसेल किंवा कांही ठिकाणीं दुसरीं अनुमानेंही निघूं शकतील; पण आम्ही रामायणाचा जो विचार करीत आहों, तो इतिहासिक दृष्टीनें होय व हा इतिहास काव्यांतून काढावयाचा आहे. वाचकांनी हा विचार करून या दृष्टीनें हा उपसंहार पहावा व त्याच दृष्टीनें मूल रामायण वाचावें, अशी त्यांस विनंती आहे.

रामायणाचा विचार करण्याच्या अनेक दृष्टि आहेत, त्यांपैकी या ठिकाणीं केवळ ऐतिहासिक दृष्टीनेच विचार केला आहे. त्यांत कांही ठिकाणीं कोणास दोष आढळला, व जर तो त्यांनी आम्हांस कळविला, तर तो खरा असला तर तो आम्ही पुढच्या आवृत्तींत सुधारूं.

वाल्मीकीय रामायण हें महाकाव्य आहेच, भक्तिरसानें तें पुष्कळ कवींनी रंगविलें आहे. या सर्वांनी इतिहासाकडे उपेक्षादृष्टीनें पाहिलें, असें जरी वाटत नाही, तरी हें खरें की, आम्हांस आज जितकें प्रेम इतिहासिक दृष्टीचें वाटतें, तितकें तें त्यास वाटत नव्हतें. शुद्ध व शुष्क इतिहासापेक्षा रसभरित काव्याकडे व भक्तीकडे त्यांचा ओढा अधिक होता व संतांचा तर तो भक्तीकडे अधिक होता. त्या त्या कालाप्रमाणें त्यांनी केलें. आज आम्ही त्यांत इतिहास पहात आहों व रावणवधाची क्रान्ति कशी घडविली गेली, हें आपण शोधून काढीत आहों व यावरून आपल्या तरुणांस काय बोध मिळूं शकेल तो आपण पाहूं इच्छीत आहों.

सर्व रामायणाचा याच दृष्टीनें पुढें विचार होईल. असें म्हणून या बालकाण्डाचा उपसंहार येथें समाप्त करतों.

**बालकाण्ड-उपसंहार समाप्त.**